# श्रीमद्भागवत

या ग्रंथाचें

# मराठी सुरस भाषांतर.

भाग पहिला.

ढविलेली आवृत्ति दुसरी.

फलं । शुकमुखादमृतद्रवसंयुतम् ।
लयं । मुहुरहो रसिका भुवि भावुकाः ।।

संशोधकः

बाळकृष्ण गोविंदशास्त्री उपासनी

आणि

रामचंद्र भिकाजी दांबार.

प्रकाशकः

गणेश विष्णु चिपळूणकर आणि मंडळी,

मुंबई आणि पुणें.

शके १८२६ क्रोधीनाम संवत्सरे



## नमो भगवते वासुदेवाय.

ज्या अखिलब्रह्मांडनायकाच्या लीलेनें या जगाचीं यच्चयावत्
कार्यें घडतात, ज्याच्या कृपेनें ह्या अनिवार मायामोहाचें
निरसन करितां येतें, व अल्पशक्ति जीवांना परमपद
प्राप्त करून घेतां यावें म्हणून जो त्यांस
बुद्धिसामर्थ्य देतो, त्या

**परमकारुणिक**

**श्रीमन्नारायणाच्या चरणीं**

**त्याच्याच कृपेनें पूर्ण झालेला हा ग्रंथ**

**अर्पण असो.**

---

शुभं भूयात् ।

पहिल्या आवृत्तीविषयीं

# प्रकाशकांचे चार शब्द.

जगतीं जीं जीं कार्यें घडती । आम्ही करितोंसें जीव म्हणती ।
परी तयांची वास्तव स्थिती । कोणसही कळेना ॥

जगच्चालक परमेश्वरानें जें हें विश्व निर्माण केलें आहे, त्यांत घडणारी प्रत्येक गोष्ट त्याच्या इच्छेनेंच होत असते. झाडाचें पान देखील त्याच्या आज्ञेवांचून हालत नाहीं. त्याच्या कर्तृत्वाची कल्पना देवादिकांस सुद्धां होत नाहीं, मग तेथें मनुष्यांचा काय पाड ! कर्तृत्वाचा अभिमान बाळगणें हा केवळ भ्रम होय. वास्तविक तें सामर्थ्य एका परमेश्वरासच आहे. जेव्हां एखादी गोष्ट करण्याची त्यास इच्छा होते, तेव्हां तो प्रथम प्राण्याच्या अंत:करणांत ती करण्याविषयींच्या वासनेचें बीजारोपण करितो, आणि नंतर त्यास साहाय्यजीवन घालून त्याची वाढ करितो. पुढें, त्याच्याच जोपासनेनें वाढलेल्या त्या वृक्षास मधुर फळें येऊं लागतात, व त्यांचें सेवन करण्याच्या इच्छेनें अनन्यभावानें त्या झाडाखालीं येऊन बसणाऱ्यांसच त्यांची प्राप्ति होते !

आतां, ही गोष्ट जरी प्रत्येकास कळत असते, तरी अनिवार मायामोहाच्या प्रभावानें मनुष्यांस भ्रम उत्पन्न होतो; व त्यामुळें, ' कर्ता करविता देव तोचि । ' हें भान त्यांस न राहून, त्यांच्या अंत:करणांत आत्मकर्तृत्वाभिमानाचें वारें शिरतें ! परंतु सूक्ष्म विचाराअंतीं त्यांच्या अंत:करणांत लख्ख उजेड पडतो, व त्या योगें ह्या वृथाभिमानाची निरर्थकता त्यांच्या प्रत्ययास येऊन नेत्रांवरचें अज्ञानपटल दूर होतें; आणि आत्मकर्तृत्वाचा अभिमान नाहींसा होऊन, आपण केवळ निमित्तमात्र आहों, ही गोष्ट अंत:करणांत पूर्णपणें बिंबते.

असो. या वर लिहिलेल्या परिस्थितीचा अनुभव कमीअधिक प्रमाणानें प्रत्येक मनुष्यास असतोच. कोणाही मनुष्यास कळूं लागल्यानंतर पुढें, किंबहुना तो हें जग सोडून जाई तोंपर्यंत सुद्धां, आपल्या हातून अमुक अमुक गोष्टी घडणार आहेत, याचा त्यास निश्चय करितां येत नाहीं. त्याच्या हातून ज्या गोष्टी घडतात, त्या केवळ यदृच्छेनेंच घडून येतात; अर्थात् त्या घडून येण्यास तसतसे योगायोग जुळून येतात; व मग, नाकांत वेसण अडकवलेल्या बैलाप्रमाणें मनुष्यही तदनुसार वागतो; आणि शेवटीं त्या जगन्नायकाच्या इच्छेप्रमाणेंच त्या गोष्टींचा परिणाम घडतो !

हे विचार सुचण्याचें कारण आमच्या या पुस्तकाची मूलपीठिका होय. हें पुस्तक आमच्या हातून छापून निघण्याचा योगही केवळ यदृच्छेनेंच आला. वास्तविक पहातां, आमची ही मंडळी स्थापन होऊन आज सतरा वर्षें झालीं, पण ग्रंथप्रकाशनाचें काम आपण करावें, हा विचार आमच्या मनांत कधींच आला नाहीं; इतकेंच नव्हे, तर आजपर्यंत आम्हीं जे धंदे केले, त्यांशीं आणि पुस्तकप्रकाशनाशीं अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं. प्रथमत: व्यवहारांत लागणाऱ्या किरकोळ जिनसांचा म्हणजे स्टेशनरी सामान वगैरेंचा

व्यापार आम्ही करीत होतों; पुढें थोडथोडें कापडविक्रीचें काम करूं लागलों; आणि नंतर कपडे शिवण्याचेंही काम आमच्याकडे होऊं लागलें. अर्थात् अशा प्रकारच्या धंद्यांचा पुस्तकप्रकाशनाशीं कांहीं संबंध नव्हता; आणि 'फक्त स्वदेशीच माल विकणारी—धि को-ऑपरेटिव्ह स्वदेशी मॅन्युफॅक्चर्स डेपो, लिमिटेड' या नांवाची जी नवीन संस्था पुणें येथें स्थापन झाली आहे, तिचीही व्यवस्था आमच्याच मंडळीकडे असल्यामुळें, यापुढें आम्ही एखादें पुस्तकविक्रीचें दुकान काढूं, अशी कल्पना संभवतच नाहीं. पण काय ? कल्पना ती कल्पनाच ! ती असते आकुंचित दृष्टीच्या मनुष्यांची ! तेव्हां तिचा नेहमीं ईश्वराच्या इच्छेशीं कसा मेळ पडेल ! आपण कल्पना करितों एक, आणि यदृच्छेनें घडून येतें दुसरेंच ! त्याचप्रमाणें, पुस्तकप्रकाशनाचें काम आपण करावें, ही महत्त्वाकांक्षा जरी आम्हीं कधीं बाळगिली नव्हती, तरी केवळ ईश्वरी इच्छेनेंच तो योगायोग घडून आला. मोठमोठीं कामें हातीं घेऊन तीं परकीय लोक ज्याप्रमाणें पार पाडितात, त्याप्रमाणेंच तीं प्रयत्नाअंतीं आपणांसही पार पाडितां येणार नाहींत असें नाहीं, असे विचार रात्रंदिवस डोक्यांत घोळत असलेल्या आमच्या मंडळींतील एका भागीदाराच्या मनांत श्रीमद्भागवत वाचीत असतां अशी कल्पना आली कीं, अशा या श्रेष्ठ आणि निरुपम ग्रंथाचें सरळ व सुबोध भाषांतर छापवून, तें लोकांस अतिशय थोड्या किमतींत दिल्यास या अप्रतिम धर्म-ग्रंथाचा लाभ सामान्य जनांसही होईल; व संस्कृत भाषेच्या अज्ञानामुळें श्रीमद्भागवतांतील तत्त्वांची ओळख करून घेण्यास जी अडचण पडते, ती पडणार नाहीं. पुढें ह्या गोष्टीचा खल सुरू झाला. पण एवढा मोठा ग्रंथ आपणांस अल्प किमतींत कसा देतां येईल, हा मोठाच प्रश्न येऊन पडला; तेव्हां, याच्या पुष्कळ प्रती काढिल्या म्हणजे आपणांस तसेंही करितां येईल; आणि शिवाय, या ग्रंथावर लोकांची श्रद्धा असल्यामुळें तो खपेलही, असा विचार ठरून आम्हीं हें काम हातीं घेतलें. असो; अशा प्रकारें, बुद्धिदाता जो भगवान, ह्यानेंच आमच्या मंडळीच्या मनांत प्रेरणा आणि स्फूर्ति उत्पन्न करून हें काम तडीस नेलें.

'देव करी तरी काय न होय?' क्षणांत रावाचा रंक व रंकाचा राव करण्याचें ज्याचें सामर्थ्य, त्यानेंच स्फूर्ति दिल्यावर मग काय होणार नाहीं ? हें काम सुरू केल्यापासून यांत इतकीं संकटें आलीं कीं, त्यांपैकीं एकाच्या योगानें देखील आमचें हें काम गर्भावस्थेमध्येंच राहिलें असतें; परंतु जगदीशकृपेनें त्या सर्व संकटांचा परिहार झाला, आणि हें काम करणाऱ्या लोकांसही यांत तनुमन खर्च करून झटण्याची ह्यानेंच बुद्धि दिली ! आम्ही त्या भगवंताला अनन्यभावानें शरण आहों. आमची मंडळी स्थापन होण्यास तरी त्याचीच कृपा ! त्या बुद्धिचालकाच्याच कृपेनें कै. वेदशास्त्रसंपन्न रा. रा. विनायक परशुराम वैद्य, श्रीमंत पंतसचीव यांच्या पदरचे राजवैद्य, यांच्यासारख्या जुन्या पद्धतीच्या गृहस्थास आमच्या मंडळीला बोध करण्याची बुद्धि झाली. आमच्या या मुख्य पुरस्कर्त्या गृहस्थांनीं आम्हांस जें वळण लाविलें व दिशा दाखविली, त्या त्यांच्या ऋणांतून आम्हांस कधींही उतराई होतां येणार नाहीं. सांप्रतच्या स्थितीमध्यें आपल्या लोकांना योग्य दिशा दाखविणारे पुरुष कशा प्रकारचे पाहिजेत, ह्याचें उदाहरण ह्या थोर पुरुषाच्या आचारविचारांवरून घेण्यासारखें आहे.

कै० विनायकशास्त्री वैद्य हे विद्वान गृहस्थ जुन्या पद्धतीचे असून त्यांचे विचार अगदीं स्वतंत्र असत. दुसऱ्याचें दास्य न पतकरितां आपण स्वतंत्र राहून आपल्या आयुष्याचा मार्ग क्रमावा, कितीही संकटें आलीं असतां डगमगूं नये, उलट त्या संकटांना तोंड देऊन मोठ्या धैर्यानें व नेटानें आपला उद्योग चालवावा, अशा प्रकारचा जो बोध—आम्ही संसारांतील कर्तव्यास लागण्याच्या संधीस त्यांनीं आम्हांला केला, त्यामुळेंच हा स्वतंत्र मार्ग पतकरण्याच्या कामीं आम्हांस धैर्य आलें. रा० विनायकशास्त्री हे केवळ एवढा शाब्दिक उपदेश करूनच राहिले नाहींत; तर आम्ही या व्यापाराच्या कामांत नवे असल्या कारणानें आम्हांस कांहीं ठोकरा बसल्या असतां शास्त्रीबोवांनीं आम्हांस प्रोत्साहन देऊन आमची हिंमत खचूं दिली नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्यांनीं प्रसंगविशेषीं द्रव्याचेंही साहाय्य केलें !

तसेंच, आमच्या मंडळींचे साहाय्यकारी जे श्रीमंत राजश्री काशिनाथ विनायक बावडेकर, त्यांचेंही आमच्यावर अनंत उपकार आहेत. हे गर्भश्रीमंत गृहस्थ वयानें अगदींच लहान असतां प्रपंचाचा आणि अवाढव्य व्यवहाराचा बोजा एकाएकीं ईश्वरेच्छेनें यांच्या अंगावर पडला; तेव्हां, अज्ञानावस्थेंत वडिलार्जित धन हातीं आल्यावर त्याचा चांगला विनियोग करून लौकिक संपादन करणाऱ्या थोड्याशा मंडळीमध्यें नांव येण्यासारखेंच यांचें स्तुत्य वर्तन होतें. ते लहान होते, तरी दुर्व्यसनी आणि अत्याचारी मंडळींची संगति न धरितां ते दुर्गुणांपासून अलिप्त राहिले; इतकेंच नव्हे, तर परमेश्वरानें जो भार आपल्या अंगावर टाकिला आहे, तो वडिलांच्या नांवलौकिकास शोभेल असाच वाहून, वयास उक्त अशा विद्याव्यासंगांत ते गढलेले असत ! पुढें थोडक्याच दिवसांनीं, त्यांच्या गुणांचें योग्य परीक्षण करून, भोर संस्थानचे गुणग्राही, प्रजावत्सल व लोकप्रिय अधिपति श्रीमंत पंतसचिव यांनीं त्यांची ज्या न्यायाधिशाच्या अधिकाकारावर योजना केली आहे, त्या अधिकाराचें महत्त्व ओळखून ते मोठ्या दक्षतेनें व निष्पक्षपातानें तो चालवीत आहेत, व श्रीमंतांना आणि रयतेला आनंद देत आहेत ! या सन्मान्य गृहस्थांकडून आमच्या मंडळीस जें साहाय्य होत आहे, त्यास मोलच नाहीं ! पांडवांचें यश वाढविण्याकरितां श्रीकृष्णानें जसें आपणास वाहून घेतलें होतें, तसेंच आमच्या मंडळीचा उत्कर्ष व्हावा म्हणून आपणास ह्यांनीं वाहून घेतलें आहे !

कै. विनायकशास्त्री वैद्य यांच्या पाठीमागें त्यांचे दोघे चिरंजीव वेदशास्त्रसंपन्न रा. रा. बाळशास्त्री व श्रीधरशास्त्री यांनींही आम्हांस मदत करण्याचें काम तसेंच अव्याहत चालविलें आहे; व पाठीच्या लहान भावंडांच्या कल्याणाकरितां जसे आपण झटतों, तसे तेही आमच्या हिताकरितां झटत असतात, ह्या गोष्टीचा उल्लेख केल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं ! आमच्या या साहाय्यकर्त्यांच्या आधारामुळेंच आम्हांस हा एवढा प्रचंड उद्योग हातीं घेतां आला, व परमेश्वराच्या कृपेनें तो पारही पडला. असो. आमच्या या मंडळीची पूर्वस्थिति व सांप्रतची स्थिति यांमधील अंतर पाहूं गेलें तर आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं ! आमची परमेश्वराच्या चरणीं अशी प्रार्थना आहे कीं, 'देवा, धनिक लोकांना सद्बुद्धि देऊन आपल्या धनाचा योग्य व देशकल्याणाच्या कामीं व्यय करण्याची वासना त्यांस दे, म्हणजे लक्ष्मी आणि उद्योग यांच्या एकीकरणानें देशाचें कांहीं तरी हित होईल !'

असो; श्रीमद्भागवत हा ग्रंथ मूळ संस्कृतांत आहे, व म्हणून सामान्य वाचकांस तो समजणें अशक्य होय, ह्यास्तव त्याचें हें मराठी सुरस भाषांतर आम्हीं विद्वान लोकांकडून तयार करविलें आहे, आणि मध्यम प्रतीच्या गृहस्थांसही याचा संग्रह करितां यावा म्हणून याची किंमतही अल्पच ठेविली आहे, वगैरे गोष्टी आम्हीं पूर्वी वाचकांस कळविल्या आहेतच. ह्या ग्रंथाचा भर भक्तीवर असून त्या विषयाचें विस्तृत विवेचन करितां करितां, जगाची उत्पत्ति, स्थिति व नाश, जीवास प्राप्त होणारी जन्ममरणपरंपरा, व तिच्या मोक्षाचा उपाय वगैरे गहन गोष्टींचें उद्घाटन ह्यामध्यें करण्यांत आलें असून, तें जसें या ग्रंथांत विशद झालेलें आहे, तसें इतर कोठेंही झालेलें आढळून येत नाहीं!

मूळ भागवत श्रीआदिनारायणापासून ब्रह्मदेवांस मिळालें, ब्रह्मदेवांपासून तें नारदांस प्राप्त झालें, नारदांनीं तें व्यासांस उपदेशिलें, व्यासांनीं तें शुकाचार्यांस पढविलें, आणि शुकाचार्य हे परीक्षितास तें सांगत असतां, सूत पुराणिकानें तें श्रवण करून पुढें नैमिषारण्यांत शौनकादिकांस त्याचा अनुवाद केला.

अशी या ग्रंथाची परंपरा असल्यामुळें, व प्रत्येकानें त्याचा थोडथोडा विस्तार केल्यामुळें, मूळ चार श्लोकांच्या पायावर ही एवढी मोठी इमारत उभारली गेली; तेव्हां अर्थात् त्या मानानें त्यांत थोडाबहुत विसंगतपणा असणें साहजिकच आहे. परंतु मूळ ग्रंथाचा विषय जो भक्तिप्रतिपादन व अद्वैतस्थापन, त्यास कोठें यत्किंचितही विरोध आलेला नाहीं. देवर्षि नारद, यदुकुलावतंस भगवान श्रीकृष्ण वगैरे थोरथोर महात्म्यांच्या मुखें निरनिराळ्या प्रसंगीं ज्या एकाच विषयाचें प्रतिपादन झालेलें आहे, त्यांत सकृद्दर्शनीं सामान्य जनांस किंचित् विरोध दिसतो खरा; परंतु इष्टकार्यसिद्धीच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां, त्यामध्यें मुळींच विरोध नाहीं, असें चतुर वाचकांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं! असो.

ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय फारच गहन असल्यामुळें, त्याचें रहस्य सहजासहजीं लक्षांत येणें कठिण आहे खरें; तथापि, मननपूर्वक वाचणारास त्याचें खरें हृद्गत कळावें म्हणून भाषांतर करण्यांत अतिशय परिश्रम केलेले असून, मूळ ग्रंथांतील कित्येक स्थलांची दुर्बोधता नाहींशी करण्याकरितां प्रसंगविशेषीं मूळाहूनही विस्तृत विवेचन केलेलें आहे. ह्याची साक्ष, 'देवहूतीचें आख्यान,' (स्कं. ३ अ. २१ ते ३३.) 'देहादिकांच्या खोटेपणाचें विस्तृत विवेचन,' (स्कं. ७ अ. १५.) 'वेदस्तुति,' (स्कं १० अ. ८७.) 'गोरूप पृथ्वीचें दोहन,' (स्कं. ४ अ. १८.) 'तत्त्वांच्या भिन्न भिन्न संख्यांची एकवाक्यता,' (स्कं ११ अ. २२.) वगैरे स्थलांवरून पटेल.

आतां, या ग्रंथाबरोबर याचें मूळ सुद्धां दिलेलें असतें तर बरें झालें असतें, असें कित्येकांचें म्हणणें आहे; पण त्यावर आमचें उत्तर हें कीं, जे लोक संस्कृतज्ञ आहेत, त्यांना श्रीमद्भागवताचा अर्थ समजतो आहेच; पण ज्यांना संस्कृत कळत नाहीं, अशा लोकांचाच भरणा जास्त असल्यामुळें, मूळ ग्रंथ छापून व त्याची किंमत आणखी वाढवून, कांहीं थोड्या लोकांकरितां समाजांतील इतर सर्व लोकांची गैरसोय करणें आम्हांस

इष्ट वाटलें नाहीं. त्यांतूनही, वेदस्तुति, चतुःश्लोकी भागवत, हंसगुह्य स्तोत्र वगैरे जे अनेक महत्त्वाचे विषय मुखोद्गत करण्यासारखे आहेत, ते मूळ संस्कृतांत दिलेले आहेतच असो.

हा ग्रंथ तयार करण्याच्या कामीं ज्या अनेक विद्वान लोकांचें साहाय्य घेतलें आहे, त्यांत विशेषेंकरून वेदशास्त्रसंपन्न बाळकृष्णशास्त्री उपासनी व रा. रा. रामचंद्र भिकाजी दातार, पुणें–फीमेल ट्रेनिंग कॉलेजांतील शिक्षक, यांच्या नांवांचा प्रसिद्धपणें उल्लेख करणें इष्ट होय. त्यांनीं या कामीं जे अश्रांत परिश्रम केले, त्यांचें वर्णन करण्यास आमच्यापाशीं शब्दांची उणीव आहे, एवढेंच सांगितलें म्हणजे पुरे ! आम्ही या संबंधानें त्यांचे फार आभारी आहों.

तसेंच, हा सर्व ग्रंथ प्रचलित मराठी भाषेच्या पद्धतीस अनुसरून आणि सरळ व सोप्या शब्दांची योजना करून, होतां होईल तों केवळ लिहितां वाचतां येणाऱ्या सामान्य जनांसही समजेल असें स्वरूप त्यास देण्यांत आमचे मित्र रा. रा. हरि कृष्ण दामले यांनीं फारच उत्तम प्रकारचें साहाय्य केलें. रा. दामले यांनीं या कामीं केवळ एवढेंच केलें असें नाहीं. कर्मधर्मसंयोगानें असें झालें कीं, ग्रंथ छापण्याचें काम ऐन भरांत येण्यास व गांवांत प्लेगाचा कहर उडण्यास एकच गांठ पडली; तेव्हां त्या बिकट प्रसंगीं त्यांनीं बाकीच्या सर्व व्यवस्थेचीं सूत्रेंही मोठ्या धैर्यानें हातीं घेऊन थंडी-वारा वगैरे कांहींएक न बघतां, गांवांत मृत्युसंख्येचें मान भयंकर वाढलें असतांही आपल्या साह्यकर्त्यांसह येथेंच राहून काम तडीस नेलें, हें त्यांचें आम्हांस केवळ अपूर्व साहाय्य झालें. याबद्दल आम्ही त्यांचे फार आभार मानितों.

त्याचप्रमाणें, आमचे ग्रामस्थ मित्र रा. रा. रघुनाथ गंगाधर गद्रे यांनींही आम्हांस फारच मोठी मदत केली. हा ग्रंथ अनेक निरनिराळ्या गृहस्थांच्या हातून लिहिला गेला असल्यामुळें, प्रत्येकाची सरणी भिन्न भिन्न असणें साहजिकच होतें; परंतु ती आरंभापासून शेवटपर्यंत एकसारखी ठेवण्यांत, तसेंच प्रूफें तपासण्यांत, छापणी सुबक दिसेल अशी योजना करण्यांत, न्यूनाधिक दिसेल तेथें भाषांतर मुळाशीं ताडून पाहण्यांत, आणि वाचकांच्या सोयीसाठीं व माहितीसाठीं ठिकठिकाणीं सदरें, टीपा वगैरे देण्यांत आमच्या या तरुण व होतकरू मित्रांनीं, हें केवळ आपलें स्वतांचेंच काम आहे, असें समजून जे अविश्रांत परिश्रम केले, ते खरोखर अलौकिक आहेत ! त्यांच्या हातून हें काम इतक्या उत्तम तऱ्हेनें पार पडलें, हें त्यांस मोठें भूषण होय. त्यांची ही सुंदर कृति पाहून, पुढील आयुष्य-क्रमांत त्यांच्या कीर्तींत अशीच भर पडत जावो, असें आम्ही मनःपूर्वक इच्छितों !

येथील इंदिरा छापखान्याचे मालक रा. रा. त्र्यंबक हरि आवटे यांनींही हा ग्रंथ छापून काढण्याच्या कामीं प्लेगासारख्या भयंकर प्रसंगीं दक्षता व मनाची शांतता ठेवण्यांत जें अप्रतिम धैर्य दाखविलें, तें अवर्णनीय आहे. यंदाची येथील प्लेगाची स्थिति मनांत आणितां, एवढें मोठें काम, ठरींव मुदतींत, मालकास यत्किंचित्ही त्रास पोहोंचण्याचा व निराश होण्याचा प्रसंग न येऊं देतां, दुसऱ्या कोणीं केलें असतें कीं नाहीं, याची वानवाच आहे ! कारखान्यांतील लोक भयानें गांगरून गेले, कित्येकांचे आप्त-इष्ट

आजारी पडले व एक चांगला इसम तर परलोकवासी झाला! अशा आणीबाणीच्या प्रसंगीं रा० आवटे यांनीं आपल्या मनाची समता कायम ठेवून, नेहमींच्या प्रफुल्लित व आनंदी मुद्रेनें कारखान्यांतील लोकांस आंजारून गोंजारून आणि व्यापारी दृष्टि एका बाजूस ठेवून खुष राखिलें व कार्यभाग तडीस नेला, ह्या गोष्टी केवळ असामान्य होत! आम्ही त्यांचे याबद्दल मोठे आभारी आहों. त्याप्रमाणेंच, त्या कारखान्यांतील लोकांनीं या कामीं जे मनःपूर्वक श्रम केले, व जी ईर्षा धरून काम पार पाडिलें, ह्याबद्दल त्यांचेंही अभिनंदन करणें योग्य आहे.

याचप्रमाणें येथील चित्रशाळा छापखान्याचे व्यवस्थापक रा. रा. शंकरराव जोशी यांनींही आपलीं सर्व कामें एकीकडे ठेवून व अनेक प्रकारच्या गैरसोयी सोसून श्रीमद्भागवताचें 'क्यालेंडर' व या ग्रंथांत घातलेलीं तीन चित्रें आमच्या मनाप्रमाणें, सुबक रीतीनें व वेळेवर छापून दिलीं, याबद्दल आम्ही त्यांचे अतिशय आभारी आहों.

तसेंच, या ग्रंथास आपला उदार आश्रय देऊन ज्या सद्गृहस्थांनीं हें काम पार पाडण्यास आम्हांस मदत केली, त्यांचेही आम्ही अंतःकरणपूर्वक उपकार मानितों.

सारांश, या कामांत संबंध असणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें आपलें कर्तव्य सामान्य व्यवहारांतल्याप्रमाणें यत्किंचितही क्षुद्र बुद्धि न दाखवितां उदार व प्रेमभरित अंतःकरणानें आणि निष्ठापूर्वक बजाविलें, याबद्दल आम्हांस परमानंद होत आहे.

तथापि, मनुष्यकृति सर्वथैव निर्दोष असणें मुळींच संभवत नाहीं; ह्याकरितां ह्या ग्रंथांत जे कांहीं हस्त-नेत्र-दोष राहिले असतील, त्याबद्दल आम्ही वाचकांची क्षमा मागतों.

शेवटीं, सर्वांच्या बुद्धि-शक्तीस प्रेरणा देणाऱ्या ज्या सर्वांतरनिवासी सर्वकर्मसाक्षी भगवंताच्या कृपेनें हा ग्रंथ शेवटास गेला, त्यास अनन्यभावानें वंदन करून आम्ही हा लेख संपवितों.

पुणें, चैत्र शुद्ध १
शके १८२५.

ग. वि. चिपळूणकर आणि मंडळी.

दुसऱ्या आवृत्तीविषयीं

# प्रकाशकांचे दोन शब्द.

परमेश्वरकृपेनें श्रीमद्भागवत ग्रंथाच्या मराठी सुरस भाषांतराची ही दुसरी आवृत्ति आम्ही प्रसिद्ध करीत आहों. पहिल्या आवृत्तींतील मजकूर पुन: मूळ संस्कृत ग्रंथाशीं सूक्ष्मपणें ताडून पाहून जरूर त्या सर्व दुरुस्तीसह ही आवृत्ति सुधारून काढविली आहे. शिवाय ह्या आवृत्तींत, येथें नवीनच स्थापन झालेल्या "डेक्कन प्रिंटिंग वर्क्स कंपनीच्या" प्रेसमध्यें छापलेले सप्तद्वीपवती पृथ्वीचा एक आणि जंबुद्वीपाचा एक असे दोन नकाशे आणि विषयानिदर्शक सूचि हीं जोडिलीं असून, राजा रविवर्मा यांच्या छापखान्यांत छापलेलीं पंधरा सुंदर चित्रें घातलीं आहेत.

ह्या ग्रंथाची पहिली आवृत्ति प्रसिद्ध होऊन अद्याप दोन वर्षेंही झालीं नाहींत; तोंच अशा मोठ्या ग्रंथाची दुसरी आवृत्ति निघण्याची वेळ आली, ह्यावरून आम्हां भारतीयांच्या अंत:करणांत धर्मप्रीति कशी जागृत आहे हें व्यक्त होत आहे. वास्तविक ह्या ग्रंथाची पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यापासून सुमारें एक वर्षांतच त्या आवृत्तीच्या सर्व प्रती संपून लोकांकडील मागण्या आमच्याकडे शिल्लक पडूं लागल्या. परंतु मध्यंतरीं आम्ही श्रीवाल्मीकि-रामायण छापिलें व पुढें श्रीमन्महाभारत छापण्यांत गुंतलों असल्यामुळें आम्हांस श्रीमद्भागवत ग्रंथाच्या ह्या आवृत्तीचें काम कांहींसें लांबणीवर टाकणें भाग पडलें; नाहीं तर ह्या दुसऱ्या आवृत्तीचीं ही पुस्तकें आजला फारच थोडीं शिल्लक राहिलीं असतीं. असो. आज सुमारें दोन वर्षें आम्ही धर्मविषयक ग्रंथ प्रसिद्ध करीत आहों. श्रीमद्भागवत, श्रीवाल्मीकिरामायण व श्रीमन्महाभारत, पुस्तक पहिलें—आदिपर्व व सभापर्व—हे ग्रंथ आम्हीं आजवर प्रसिद्ध केले; आणि त्यांतील पहिल्या ग्रंथाची ही दुसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग आला, ह्यावरून अशा प्रकारचा हा प्रयत्न लोकांस पसंत पडत आहे, हें सहज सिद्ध होतें. भारत-भागवतांसारखे ग्रंथ म्हणजे राष्ट्राचें केवळ जीवनच होय. त्यांमध्यें प्रतिपादन केलेलीं तत्त्वें म्हणजे प्राचीन आर्यांचे पंचप्राण होत. ह्यास्तव, प्रत्येक सहृदय भारतीयानें ह्या ग्रंथांचें मनन करून त्यांतील उदात्त विचार आपल्या अंगीं बाणले जाण्याविषयीं अवश्य यत्न केला पाहिजे.

ह्या दुसऱ्या आवृत्तीचें संशोधन करण्याचे कामीं वेदशास्त्रसंपन्न बाळकृष्णशास्त्री उपासनी आणि रा. रा. रामचंद्र भिकाजी दातार यांनीं मागील आवृत्तीप्रमाणेंच अतिशय परिश्रम घेतले, याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों. वे. शास्त्रीबोवा आणि रा. दातार हे आम्हांकरितां एवढेच परिश्रम करीत आहेत असें नाहीं; तर सांप्रत जो आम्ही "श्रीमन्महाभारताचें मराठी सुरस भाषांतर" हा प्रचंड राष्ट्रीय ग्रंथ छापवीत आहों, त्यांत तर आम्हांस या दोघांचें फारच मोठें साहाय्य आहे. रा. रा. दातार हे अतिशय महत्त्वाच्या व कठिण अशा

शांतिपर्वाचें भाषांतर करीत असून, शास्त्रीबुवा तर अथपासून इतीपर्यंत सर्वच भाषांतर तपासून देत आहेत ! अशा प्रकारें आम्हांस अतिशय साहाय्य करणाऱ्या या गृहस्थांचे आभार मानण्यास आम्हांपाशीं शब्दांची उणीव आहे !

त्याचप्रमाणें, ह्या पुस्तकांत जे नकाशे आणि सूचि हीं घातलेलीं आहेत, तीं आमचे मित्र रा. रा. महादेव नारायण ऊर्फ भाऊसाहेब ठोसर बी. ए. एल्.एल्. बी. आणि रा. रा. दत्तात्रय केशव जोशी यांनीं तयार केलेलीं आहेत. हीं दोन्ही कामें फार परिश्रमाचीं असतांही त्यामच्या या दोन्ही मित्रांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून तीं उत्तम प्रकारें तयार करून दिलीं, याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहों.

शेवटीं आमच्या आश्रयदात्यांचे अतिशय आभार मानून, व पुस्तकांत कांहीं हस्त-नेत्र-दोष राहिले असतील त्यांबद्दल क्षमा मागून, ज्याच्या कृपेनें ही द्वितीयावृत्ति काढण्याचा सुयोग आला, त्या जगन्नायकाच्या चरणकमलाप्रत वंदन करून आम्ही हे दोन शब्द पुरे करितों.

पुणें, गुरुवार, मिती मार्गशीर्ष शुद्ध १५, शके १८२६.

ग. वि. चिपळूणकर आणि मंडळी.

# अनुक्रमणिका.



## द्वितीयस्कंध.

## चतुर्थस्कंध.

## षष्ठस्कंध.

## सप्तमस्कंध.

## अष्टमस्कंध

१ या ठिकाणीं चुकून 'दितीस' असें पडलें आहे.

# चित्रांची सूचि.





## नकाशे.





# श्रीमद्भागवतमाहात्म्य.

पूर्वी परम पवित्र अशा नैमिषारण्यामध्यें एक-सहस्र-संवत्सरात्मक सत्र करण्याची दीक्षा घेऊन शौनकादि ऋषि बसले असतां, एके दिवशीं सर्व कर्मांपासून निवृत्त झाल्यावर त्यांनीं सूत पुराणिकास प्रश्न केला, " हे महाभाग्यवंता पुण्यपुरुषा, सांप्रत कलियुग प्रचलित असल्यामुळें, लोक दैत्यांप्रमाणें पातकाचरण करूं लागले आहेत; दिवसानुदिवस त्यांमध्यें धर्मबुद्धीचा लोप होत चालला आहे; अधर्माचा उत्कर्ष होऊं लागला आहे; व सर्वत्र अनाचार माजून एकच गोंधळ उडालेला दिसत आहे! आतां यापुढें तर कलीचा प्रसार फारच वाढेल; व त्यामुळें एकच कहर उडून जाईल! लोकांना धर्माचरणाचें यथावत् ज्ञान नसल्यामुळें त्यांच्या हातून वर्णाश्रमधर्मांचें आचरण मुळींच होणार नाहीं; व मग ते अधोगतीस जातील! तेव्हां, ज्याच्या योगानें या सर्व प्राण्यांचें इहपरलोकीं कल्याण होईल, असा कांहीं सुलभ मार्ग आम्हांस सांग. हे पुण्यपुरुषा, तूं सकल शास्त्रांचें अध्ययन केलें आहेस; तेव्हां त्या सर्वांचें सार असें जें कांहीं तुझ्या मतानें निश्चित ठरलें असेल, तें आम्हांस सांगून आमच्या मनाची ही तळमळ दूर कर."

सूत म्हणाले:—हे शौनकादि ऋषीहो, तुम्हीं जो अत्यादरानें व उत्कंठेनें प्रश्न केला, तो ऐकून मला फार संतोष वाटतो. सत्पुरुषांनो, तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें सांप्रत प्रजांची स्थिति झाली आहे खरी! या दुःस्थितीचा नाश करून सायुज्य प्राप्त करून घेण्यास माझ्या मतें एक सुलभ व खातरीचा उपाय आहे, व तो म्हटला म्हणजे श्रीमद्भागवताचा अवलंब हा होय. शौनका, श्रीमद्भागवताचें माहात्म्य फार अगाध आहे. याच्या श्रवणमननिदिध्यासानें परीक्षित राजा केवळ सात दिवसांत उद्धरून गेला! ह्याच्या योगें, केवळ कर्माचरणांच्या योगें प्राप्त न होणारें पद (सायुज्य) सुद्धां निश्चयानें मिळतें, असें सनकादिकांनींही भगवान नारदास सांगितलें आहे. आतां, नारदाला प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें हें भागवत सांगितलें असतां सनकादिकांनीं त्यास फिरून हें कां सांगितलें, तो सर्व वृत्तांत मी तुम्हांस कथन करितों. ह्याच्या श्रवणानें मनुष्याच्या अंतःकरणांत भक्तीचा इतका जोमदार अंकुर उगवतो कीं, त्याच्या योगें अंगावर रोमांच उभे राहतात, व चित्त षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीवासुदेवाच्या ठिकाणीं लीन होतें; म्हणून हें कथानक एकाग्र चित्तानें ऐका.

एके वेळीं सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार हे चारही मुनि सत्समागमासाठीं बदरिकाश्रमांत आले असतां नारदांची व त्यांची गांठ पडली. त्या वेळीं नारद मुनि मोठे चिंतातुर दिसले; तेव्हां सनकादिकांनीं त्यांस म्हटलें कीं, " नारदा, तूं असा खिन्न कां दिसतोस? द्रव्यलोभी मनुष्याचें द्रव्य नष्ट झालें असतां तो जसा भ्रमिष्ट होतो, तशी तुझी वृत्ति दिसत आहे; तर असें होण्याचें कारण काय बरें?"

नारदांनीं उत्तर दिलें:—अहो, ही पृथ्वी सर्वोत्तम आहे असें समजून, मी चारही दिशांकडील मुख्य मुख्य तीर्थांच्या ठिकाणीं हिंडलों;

पण मनाला समाधान होण्यासारखें एकही स्थल मला आढळलें नाहीं. जिकडे जावें तिकडे सर्व विपरीत दिसूं लागलें. कलिप्रादुर्भावानें लोकांमध्यें सत्याचा अभाव झाला आहे; भूतदयेची त्यांस ओळख सुद्धां राहिली नाहीं; धर्माविषयीं त्यांस अश्रद्धा उत्पन्न झाली आहे; आणि तपाचरणाकडे तर कोणी ढुंकूनही पहात नाहीं; जो पहावा तो उदर भरण्याच्या कामीं तेवढा तत्पर; अशा एक का दोन, हजारों शोचनीय गोष्टी पाहून माझें चित्त अगदीं उद्विग्न होऊन गेलें! पुढें मी तसाच फिरत फिरत यमुनेच्या तीरावर आलों, तों तेथें एक सुंदर तरुण स्त्री माझ्या दृष्टीस पडली. तिच्या पुढें दोन वृद्ध पुरुष निश्चेष्टित पडले असून ती त्यांना सावध करीत होती, व तिच्या सभोंवतीं उभ्या असलेल्या अनेक दासी तिला वारा घालीत असून, वारंवार तिचें मधुर शब्दांनीं समाधान करीत होत्या. तेव्हां हा काय चमत्कार आहे तो पहावा म्हणून मी त्यांच्या सन्निध गेलों. मला पाहिल्याबरोबर त्या स्त्रीला जरा हुशारी वाटली, आणि ती मोठ्या केविलवाण्या स्वरानें मला म्हणाली, "नारदा, अशा वेळीं मला आपलें दर्शन झालें, हें माझें मोठें भाग्यच! जेव्हां एखाद्याचा भाग्योदय होण्याची वेळ येते, तेव्हांच आपणांसारख्या साधुपुरुषांची गांठ पडते. मुनिवर्या, मी 'भक्ति' या नांवानें प्रख्यात आहें; आणि हे येथें पडलेले पुरुष 'ज्ञान' व 'वैराग्य' या नांवाचे माझे पुत्र होत. हे माझे पुत्र असून मजपेक्षां वृद्ध कसे, अशी आपल्याला शंका येईल; पण, मुने, कलिप्रभावानें यांची ही अशी स्थिति झाली आहे! मला वारा घालणाऱ्या ह्या स्त्रिया गंगादि नद्या होत. मुनिश्रेष्ठा, आपल्या दर्शनानें मी धन्य झालें आहें; आतां मी आपली सविस्तर हकीकत आपणांस सांगतें, ती श्रवण करून आपण माझ्या दुःखाचें निवारण करावें."

भक्ति म्हणाली:—हे नारदा, प्रथमतः या पृथ्वीवर मी द्रविड देशामध्यें उत्पन्न झालें, आणि पुढें कर्नाटक देशामध्यें वृद्धिंगत होऊन मी तशीच भ्रमण करीत करीत महाराष्ट्रामध्यें आलें. तेथें माझें संगोपन साधारण झालें. कोठें कोठें मात्र माझी चांगली जोपासना झाली. नंतर मी गुर्जर देशामध्यें आलें. तेथें मला अतिशय त्रास झाला. कलिप्रभावानें त्या देशांत अनेक नास्तिक व पाखंडी पुरुष निर्माण झालेले आहेत. वास्तव त्यांनीं माझी आणि माझ्या या लाडक्या पुत्रांची फारच दुर्दशा केली. तेव्हां मी अत्यंत कष्टी झालें; व या वृंदावनामध्यें तरी सुख लागेल म्हणून, या दुःखी पुत्रांना तसेंच बरोबर वागवीत वागवीत हळू हळू येथें आलें. येथें आल्यावर मला थोडें बरें वाटलें; पण माझ्या या प्रिय पुत्रांची स्थिति मात्र फारच भयंकर झाली. येथें येतांक्षणींच हे जे निश्चेष्ट पडले, ते कांहीं केल्या अजून सावधच होत नाहींत! तेव्हां, या आपल्या पुत्रांकरितां हा देश आपण सोडून जावें, असें माझ्या मनांत येऊं लागलें आहे; पण यांच्या ह्या अशा अवस्थेमुळें तसेंही मला करितां येत नाहीं. तेव्हां, नारदा, आतां मीं काय करावें तें मला सांगा.

नारद म्हणाले:—सनत्कुमारहो, असें हें त्या स्त्रीचें दीनवाणें भाषण ऐकून मला तिची कींव आली, व तिचें सांत्वन करून मीं तिला म्हटलें, "हे निष्पाप स्त्रिये, तूं कांहीं चिंता करूं नको; परमेश्वर तुझें दुःख निवारण करील." मुनिवर्य, नंतर मीं थोडा विचार केला, आणि तिच्या दुःखाचें कारण शोधिलें; तों मला आढळून आलें कीं, "हल्लीं कलियुग प्राप्त झालें असल्यामुळें सदाचरण, योग, तप इत्यादिकांचा लोप होऊन लोकांची दुराचरणाकडे प्रवृत्ति फार झाली आहे; व यामुळेंच सदाचरणी लोक दुःखी आहेत; आणि दुष्ट, दांभिक व असद्वर्तनी लोक आनंदानें कालक्रमणा करीत आहेत! पुण्यकर्माचा

शेशही कोठें राहिला नाहीं, व त्यामुळें शेषाला सुद्धां पृथ्वी दिवसानुदिवस भारभूत होऊं लागली आहे; आणि म्हणूनच हिचे हे ज्ञान आणि वैराग्य नामक पुत्र क्षीणबल होऊन निश्चेष्टित पडले असावे. मुनीहो, तेव्हां मीं तिला म्हटलें, "बाईगे, तुझे पुत्र क्षीणबल झाले आहेत, हें सर्व कलिमाहात्म्य होय. या कलीच्या प्रभावानें तुझ्या ज्ञानाला आणि वैराग्याला कोणी विचारिनासें झालें आहे; लोक केवळ विषयांध झाल्यामुळें त्यांना तुझी आठवण होत नाहीं; आणि पूर्वी जी तूं कांहीं दिवस गुर्जर देशांत असतांना जराग्रस्त झाली होतीस, त्याचें तरी कारण हेंच. तूं तेथून निघून येथें या वृंदावनांत आलीस, म्हणून कांहीं तरी बऱ्या स्थितींत आहेस. कारण, येथें तुझा आदर करणारे कांहीं लोक आहेत. आतां, या ठिकाणीं ज्ञान-वैराग्यांचे भोक्ते जरी कोणी नाहींत, तरी निदान त्यांचा द्वेष करणारे तरी कोणी नसल्यामुळें, वाटलें तर त्यांना येथेंच कांहीं बरें वाटेल; व त्यांना जी किंचित् निद्रा लागली आहे, त्याचें तरी कारण हेंच आहे."

नारद पुढें म्हणतात:—सनकादिक मुनिश्रेष्ठहो, याप्रमाणें मीं भक्तीला सांगितल्यानंतर तिनें मला फिरून प्रश्न केला कीं, "कलि प्रवृत्त झाल्याबरोबर एकदम ही अशी स्थिति कशी झाली, व परीक्षित राजा या कलीस धरून शासन करण्यास सिद्ध झाला असतां त्यानें यास कां सोडून दिलें, हें मला कांहीं कळत नाहीं; तर आपण या शंकेचें निवारण करावें. शिवाय, मला दुसरेंही मोठें आश्चर्य वाटतें कीं, या सर्व गोष्टी भगवान श्रीहरीला तरी कशा खपतात!" सनकादिकहो, तेव्हां मीं तिला सांगितलें कीं, "तुझ्या शंका बरोबर आहेत; पण भगवान श्रीकृष्ण हा पृथ्वीचा त्याग करून गेल्यानंतर कलि प्राप्त झाला. पुढें पुण्यप्रतापी परीक्षित राजा त्याला शासन करण्यास प्रवृत्त झाला, पण हा धूर्त कपटी कलि त्याला शरण गेला; तेव्हां, शरणागताचें रक्षण करणें हा क्षत्रियांचा धर्मच असल्यामुळें त्यानें याला जीवदान दिलें; तरी त्यानें याला कांहीं अगदींच स्वतंत्र ठेविलें नाहीं. याला त्यानें कांहीं स्थलें मात्र नेमून दिलीं, व तेथेंच त्यानें वास करावा असा निर्बंध केला. शिवाय त्यानें असा विचार केला कीं, या युगांत लोकांचे ठिकाणीं जरी ज्ञान-वैराग्यादिकांचा अभाव असला, तरी केवळ भक्तीनेंच परमेश्वराचें आराधन करितां येण्यासारखें आहे; मग कलि हा असला तरी काय झालें? राहीना बिचारा!" मुनीहो, अशा रीतीनें मीं तिच्या प्रश्नांस सयुक्तिक उत्तर दिलें, तेव्हां तिला समाधान वाटलें. नंतर फिरून मीं तिला सांगितलें कीं, "तुझ्या जिवाला कांहींएक धोका नाहीं, तूं निर्भय ऐस. कलीचा कितीही प्रसार झाला, तरी भगवान कृष्ण परमात्मा तुझें रक्षण करण्यास सदोदीत तत्पर आहे."

सूत म्हणाले:—ऋषीहो, याप्रमाणें आपला व भक्तीचा झालेला संवाद नारदांनीं सनकादिकांना सांगितला, तेव्हां ते मुनि, 'पुढें आणखी काय झालें तें आम्हांस सांग,' असें नारदांना म्हणाले. ऋषीहो, तें ऐकून नारद मुनि पुढें सांगू लागले.

नारद म्हणाले:—सनकादिकहो, पुढें मीं तिला म्हटलें, "हे भक्ति, तूं त्या श्रीकृष्णाच्या चरणकमलांचें स्मरण कर, म्हणजे तुझें कल्याण होईल. आपल्या भक्तांचें रक्षण करणें हें त्या भक्तवत्सल परमेश्वराचें ब्रीदच होय. कौरवसभेंत अनंत वस्त्रें पुरवून द्रौपदीची लाज त्यानेंच राखिली; गोपस्त्रिया शंखचूडादिकांपासून अत्यंत ताप पावल्या असतां त्यांचें त्या दुष्टांपासून त्यानेंच रक्षण केलें; आणि आतां तोच तुझेंही रक्षण करील. या कलियुगांत मनुष्यांस ईशपदप्राप्तीचें साधन भक्तिच होय, व याकरितांच त्यानें तुला उत्पन्न केलें आहे. तुझें राहण्याचें मुख्य

स्थान म्हटलें म्हणजे वैकुंठ होय. पण त्या परमेश्वराच्या मनांत या पृथ्वीवर प्रेमलक्षणयुक्त भक्ति वृद्धिंगत करावयाची आहे, याकरितां त्यानें तुला छायारूपानें भूलोकीं आणिलें आहे. पूर्वी, कृत, त्रेता आणि द्वापर ह्या युगांमध्यें, तुझी दासी जी मुक्ति आणि दास जे ज्ञान व वैराग्य, त्यांसह तूं मोठ्या आनंदानें येथें यथेच्छ वास करीत होतीस; पण जेव्हां कलियुगास आरंभ झाला, तेव्हां ती तूं आपली दासी वैकुंठास पाठवून दिलीस. कारण, येथें पाखंडरूप रोगानें ती अगदीं क्षीण झाली. आतां, ज्ञान-वैराग्यांना तूं आपले पुत्र मानून आपल्यापाशीं ठेविलें आहेस, पण त्यांना येथें सुख लागत नाहीं, म्हणून तुला वाईट वाटतें; पण त्याविषयीं तूं काळजी करूं नको. मी त्यांजबद्दल कांहीं तरी विचार तुला सांगतों; आणि दुसरें असेंही वचन देतों कीं, जरी हें कलियुग अत्यंत वाईट आहे, तरी मी तुझी घरोघर स्थापना करीन, व ह्या तुझ्या दोघां पुत्रांना चैतन्य यावें म्हणून होईल तितका उपाय करीन. हे भक्ति, हें मजकडून घडलें नाहीं, तर मी श्रीहरीचा दासच नव्हें, हें माझें वचन तूं सत्य मान." ऋषिवर्यहो, याप्रमाणें मीं तिला आश्वासन दिल्यावर ती म्हणाली, "हे साधो, आपल्या वचनानें मला तर पूर्ण धैर्य आलें, पण ह्या दोघांना आपण एकदा जागृत करण्याचा प्रयत्न करा." मुनीहो, त्या वेळीं, वेदांत आणि गीता यांचा त्यांच्या कानाशीं मोठमोठ्यानें घोष करून मीं त्याना हांका मारिल्या; तेव्हां ते थोडेसे जागृत होऊन उठून बसल्यासारखे झाले, पण मोठ्यानें जांभई देऊन पुनः भूमीवर पडले! तें पाहून मला मोठी चिंता पडली, आणि त्यांना जागृत करण्याचें वचन मजकडून कसें पूर्ण होईल, हें संकट पुढें उभें राहिलें! तेव्हां 'हे भगवन्, हे जगदीश्वर, माझें वचन सत्य होण्यास तूंच आतां कांहीं तरी उपाय सुचीव!' असा मीं ईश्वराचा अनन्यभावानें धावा केला; इतक्यांत एक मोठा चमत्कार घडून आला! तो असा कीं, "हे नारदा! तूं चिंता करूं नको; ज्ञान आणि वैराग्य यांना सावध करण्याचा तुझा प्रयत्न सफल होईल; मात्र तो प्रयत्न, माझे परम भक्त जे साधुपुरुष, ते तुला सांगतील." अशी आकाशवाणी माझ्या कानीं आली. तेव्हां मला मोठा विस्मय झाला, आणि त्या साधुपुरुषांच्या भेटीची मला उत्कट इच्छा होऊन मी त्यांच्या शोधार्थ तेथून निघालों. अशा प्रकारें हिंडत हिंडत व जो जो भेटेल त्यास विचारीत विचारीत, शेवटीं मी या बदरिकाश्रमांत प्राप्त झालों. इतकें केलें तरी कोठेंही त्या साधुपुरुषांचा शोध लागेना; तेव्हां, त्या पुरुषांचें दर्शन होऊन, मीं कोणता प्रयत्न करावा हें ते मला सांगत तोंपर्यंत तेथेंच तप करीत बसावें, असा मीं आपल्या मनाचा निश्चय केला. सनत्कुमारहो, माझ्या चिंतेचें मुख्य कारण तें हेंच होय.

सूत म्हणतातः—शौनक मुने, याप्रमाणें, आपण कां चिंताग्रस्त आहों हें सांगितल्यानंतर, भगवान नारदांना वाटलें कीं, कोटि सूर्यांप्रमाणें तेजस्वी असे हेच पुरुष कदाचित् आपणास सदुपाय सांगणारे असतील; ह्यास्तव आपण त्यांना विचारावें कीं, आकाशवाणीनें जें सांगितलें, त्याचा अर्थ काय? शौनकादिकहो, असा विचार करून नारदांनीं सनत्कुमारांस प्रश्न केला असतां त्यांनीं उत्तर दिलें.

सनत्कुमार म्हणालेः—नारदा, तुजसारख्या भगवद्भक्ताला या गोष्टीचें एवढें गूढ वाटावयास नको. आकाशवाणीनें जें तुला सांगितलें, त्याचा अर्थ 'ज्ञानयोगाचें आचरण.' बाबारे, द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ वगैरे पुष्कळ प्रकारचे यज्ञ आहेत खरे; पण त्या सर्वांत या ज्ञानयज्ञाची योग्यता फार मोठी आहे. इतर यज्ञ कष्टसाध्य व नश्वरफलदायी आहेत; पण या ज्ञान-

यज्ञाच्या योगानें अक्षय सुखाची प्राप्ति होते. नारदा, हा यज्ञ, भगवंताच्या कथांचें श्रवण व पठन केल्यानें घडतो; याकरितां, ज्यांत भगवद्गुणांचें ओतप्रोत वर्णन आहे, त्या श्रीमद्भागवताचा तूं सप्ताह कर, म्हणजे त्या योगानें भक्ति, ज्ञान आणि वैराग्य यांचा उत्कर्ष होईल.

नारद म्हणाले:—सनत्कुमारहो, आपण सांगितलें तें मोठ्या आनंदानें करण्यास मी तयार आहें; पण तो सप्ताह मीं कोणत्या विधीनें करावा, तें आपण कृपा करून सांगा; त्याचप्रमाणें, त्या शुकशास्त्राचा—श्रीमद्भागवताचा—महिमा काय आहे, तेंही सांगण्याची कृपा करा. आपण सर्वज्ञ आहां, तेव्हां आपणांस कोणतीच गोष्ट अशक्य नाहीं.

सनत्कुमार म्हणाले:—नारदा, येथें जवळच गंगाद्वाराच्या समीप आनंद नामक एक मोठें रम्य स्थळ आहे. तेथें अनेक ऋषि, देव, सिद्ध इत्यादि वास करितात. त्या ठिकाणी सिंह, व्याघ्र, गाई, सर्प, मुंगुसें वगैरे जन्मतःच एकमेकांचा द्वेष करणारे अनेक जातींचे प्राणी सुद्धां परस्परांतील द्वेषभाव विसरून आनंदानें एकत्र राहतात. त्या ठिकाणीं तूं श्रीमद्भागवताचा सप्ताह श्रवण कर. तेथें सप्ताह होऊं लागला, म्हणजे, ज्यांच्याकरितां तुला एवढी कळकळ वाटत आहे, तीं भक्ति, ज्ञान व वैराग्य हीं अनायासेंच त्या ठिकाणीं येतील, आणि सप्ताहश्रवणानें पुष्ट होतील.

सूत म्हणतात—ऋषीहो, याप्रमाणें सनत्कुमारांनीं सांगितल्यावर लागलीच त्यांच्यासह मुनिश्रेष्ठ नारद त्या स्थलीं गेले; तेथें गेल्यावर, ज्ञानयज्ञाची दीक्षा धारण करून स्वतः सनत्कुमारांनीं भागवत सांगितलें. तो समारंभ फारच अवर्णनीय झाला. अनेक मोठमोठे ऋषि आपापल्या शिष्यांसह तेथें आले होते; त्याचप्रमाणें चतुर्वेद, आगमोक्त महामंत्र, पंचरात्रादि तंत्रें, पुराणें, शास्त्रें, नद्या, सरोवरें, क्षेत्रें, वनें, उपवनें, दिशा, देव, गंधर्व, दानव, पर्वत, वृक्ष हे मूर्तिमंत आले होते. सप्ताहाच्या आरंभीं स्वर्गांतून पुष्पवृष्टि झाली, व मंगलवाद्यांच्या नादानें आकाश दुमदुमून गेलें. नंतर प्रथमतः त्या सनत्कुमारांनीं 'श्रीमद्भागवताचें माहात्म्य' सर्वांस सांगितलें.

सनत्कुमार म्हणाले:—श्रोतेहो, या शुकशास्त्राचा महिमा अगाध आहे. कोणत्याही कालीं याचें पठन किंवा श्रवण केलें, तरी तें कल्याणप्रदच आहे. यांत श्रीशुकाचार्य आणि परीक्षित राजा यांचा संवाद असून, तो ऐकल्याच्या योगें अनंत जन्मींचीं पापें भस्म होतात; व इहलोकींचीं सुखें प्राप्त होऊन अंतीं शाश्वत असा मोक्ष प्राप्त होतो. श्रोत्यांनो, श्रीमद्भागवत हा एक कल्पवृक्ष आहे. यास बारा शाखा (स्कंध) असून, अठरा हजार अमृतोपम मधुर फळें (श्लोक) लगटलेलीं आहेत. मनुष्याला या वृक्षाच्या एका फळाचा जरी लाभ झाला, तरी तो महाभाग्यवान समजला पाहिजे. ज्यानें जन्मजन्मांतरीं महापुण्य केलें असेल, त्यालाच हा लाभ होतो. याकरितां, तुम्ही निश्चळ अंतःकरणानें या श्रीमद्भागवताचें श्रवण करा. या कलियुगांत मनुष्याचें आयुष्य क्षणभंगुर असून बुद्धि अगदींच अशाश्वत असल्यामुळें विशेष नियमाचें धारण होणें अशक्य आहे; याकरितां, सात दिवसांत ह्या ग्रंथाचें श्रवण करावें, हें योग्य आहे. अशाश्वत स्थितींत क्षणाचाही भरवसा धरणें योग्य नव्हे; परंतु, जग हें शाश्वत आहे, अशा भावनेनें ज्याप्रमाणें सर्व व्यवहार चाललेला आहे, त्याप्रमाणेंच या थोड्या अवधीविषयीं मानावें. या कृत्यास माघ मास अत्युत्कृष्ट धरिला आहे. ह्या सर्व महिन्यांत श्रीमद्भागवताचें पारायण केलें तरी चालतें. यज्ञ, व्रत, जप, तप, तीर्थ, योग, ध्यान ह्या सर्वांहून श्रीमद्भागवताचा सप्ताह श्रवण करण्याचें श्रेय अधिक आहे. श्री-

कृष्ण प्रभु जेव्हां निजधामास जाऊं लागला, तेव्हां त्याचा अत्यंत प्रेमळ भक्त जो उद्धव, त्यानें त्याची विनवणी केली कीं, “ भगवंता, तूं आतां जातोस खरा, पण तुझ्या मागें या सृष्टीची स्थिति काय होणार ? आतां कलियुग प्राप्त झाल्यामुळें लोक अत्यंत दुराचारी होतील, मोक्षप्राप्तीचीं साधनें कोठेंही राहणार नाहींत, व त्यामुळें सर्वांना अधोगतीस जावें लागेल ! याकरितां, तूं जाण्यापूर्वी या अरिष्टाच्या निरसनाचें कांहीं तरी चांगलें साधन करून ठेव. ” श्रोतेहो, तेव्हां भगवंतानें आपल्या त्या भक्ताला ज्ञान होण्याकरितां त्यांतील एकादशस्कंध सांगून म्हटलें, “ बा उद्धवा, तूं कांहींएक चिंता करूं नको ! जे माझे भक्त आहेत, त्यांच्याकरितां मी आपलें तेज श्रीमद्भागवतांत ठेवितों, म्हणजे त्याच्या श्रवणानें त्यांना मुक्ति सुसाध्य होईल, आणि त्या पुण्यानें भूमीचा भारही हलका होईल. ” श्रोत्यांनो, असें सांगून भगवान कृष्ण परमात्मा अंतर्धान पावला. याकरितां, श्रोतेहो, आतां तुम्ही श्रीमद्भागवतकथेचें एकाग्र चित्तानें श्रवण करा. हें श्रीमद्भागवत म्हणजे प्रत्यक्ष कृष्णमूर्तिच होय. याचें सेवन केलें असतां अंतःकरणांत भक्ति उत्पन्न होते, आणि त्या योगानें ज्ञान प्राप्त होऊन संसारांतील आसक्ति सुटते; व पुढें अनायासेंच वैराग्य प्राप्त होऊन प्राणी मोक्षपदास पावतो !

**सूत म्हणतातः**—शौनक मुने, याप्रमाणें प्रथम भागवताचें माहात्म्य सांगून, नंतर त्या सनत्कुमारांनीं तेथें सात दिवसांत सर्व भागवताचें पारायण केलें. त्या वेळीं जो चमत्कार घडला, तो फारच अपूर्व होय. निश्चेष्टित झालेले ज्ञानवैराग्य हे सप्ताहश्रवणानें तेजःपुंज झाले, व त्यामुळें भक्तीलाही आनंद होऊन त्या आनंदभरांत ती तिघेंही, “ श्रीकृष्ण श्रीकृष्ण हरे मुरारे । गोविंद गोविंद रथांगपाणे ॥ ” अशा शब्दांचा घोष करीत मोठ्या प्रेमानें नाचूं लागलीं. हा प्रकार पाहून तेथें असलेल्या श्रोतृसमुदायाला मोठा चमत्कार वाटला. ते म्हणाले, “ अहो, हें काय आश्चर्य ! येवढ्या थोरल्या या समाजांत ही स्त्री अशी भीडमर्यादा सोडून नाचूं लागली हें काय ! ” तेव्हां सनत्कुमारांनीं त्या मंडळीस सांगितलें कीं, “ अहो, ही स्त्री म्हणजे परमेश्वरास अत्यंत प्रिय असलेली भक्ति होय. जेथें हरिकथा चालली आहे, तेथें हिला भीड कशाची ? भक्ति जर अशा ठिकाणीं येऊन विहार करणार नाहीं, तर परमेश्वराला कीर्तन हें मुळींच प्रिय होणार नाहीं. ” शौनका, याप्रमाणें सनत्कुमारांनीं सर्वांना सांगितलें आणि नंतर ते भक्तीला म्हणाले, “ हे भक्ति, जेथें जेथें भगवत्कीर्तन चाललें असेल, तेथें तेथें त्वां अवश्य येत जावें, आणि विष्णुभक्तांच्या अंतःकरणांत स्वैर संचार करीत जावा. म्हणजे ते देहभाव विसरून विष्णुरूपीं तन्मय होतील, व त्यामुळें त्यांना सायुज्य प्राप्त होईल. ” शौनका, सनत्कुमारांचें हें भाषण ऐकतांच तेथें असलेल्या सर्व श्रोत्यांच्या अंतःकरणांत भक्तीनें तत्काल प्रवेश केला, व त्यामुळें सर्वांचीं अंतःकरणें हरिरूपीं जडलीं. तेव्हां, ज्याची अनंतकोटि सूर्यांप्रमाणें प्रभा पडली आहे, तसा भगवान श्रीकृष्ण परमात्मा तेथें एकाएकीं प्रकट झाला. मग तेव्हांचा तो आनंद काय पुसावा ? हरिनामाच्या गर्जनेनें व मंगलवाद्यांच्या दुमदुमाटानें आकाश दणाणून गेलें; देव आपापल्या स्त्रियांसह विमानांत बसून पुष्पवृष्टि करूं लागले; आणि तेथें जमलेल्या श्रोत्रगणांस तर आपल्या देहाची स्मृतिच राहिली नाहीं ! असा तो अपूर्व देखावा पाहून नारदांचा हर्ष तर गगनांत मावेना ! केवळ भागवतसप्ताहाचें एवढें हें माहात्म्य पाहून त्यांस मोठें आश्चर्य वाटलें, व त्यांनीं सनत्कुमारांस आणखी प्रार्थिलें.

**नारद म्हणालेः**—मुनीश्वरहो, आपण केलेल्या भागवतसप्ताहाचा प्रभाव मी आज पाहिला.

खरोखरच कलियुगांत मनुष्यांना ईश्वरप्राप्तीचें साधन यासारखें दुसरें कोणतेंही नाहीं. लोककल्याणाच्या हेतूनें आपण जो हा मार्ग मला दाखविला, त्याचें वर्णन करावें तितकें थोडेंच. आतां, ह्या सप्ताहाच्या योगानें कोणकोणतीं मनुष्यें पावन होतात, तें मला कृपा करून सांगा.

सनत्कुमार म्हणाले:—बा नारदा, भागवताच्या सप्ताहश्रवणानें सर्व प्रकारचे पातकी पावन होतात. अमुक एका प्रकारचा पातकी यामुळें पवित्र होत नाहीं, असें मुळींच नाहीं. सदा असद्वर्तनी म्हणजे क्रूरकर्मी, कपटी, असत्यवादी, मातृद्रोही, पितृद्रोही, धर्मभ्रष्ट, महाहिंसक, निर्दय, परद्रव्यापहारक, व्यभिचारी, अमंगळ व पंचमहापातकी, असे झाडून सारे या सप्ताहाच्या योगानें पावन होतात. मात्र, त्यांनीं मननपूर्वक याचें श्रवण केलें पाहिजे. याविषयीं एक फार पुरातन गोष्ट आहे, ती तुला सांगतों.

पूर्वी तुंगभद्रा नदीच्या तिरीं एक नगर होतें. या नगरांतील सर्व लोक सदाचरणी असत. यांत आत्मदेव या नांवाचा एक ब्राह्मण महाविद्वान असून अत्यंत श्रीमान असा होता. त्याची धुंधुली नामें पत्नी होती. ती सत्कुलोत्पन्न असून त्याप्रमाणेंच सुंदरही होती; पण स्वभावानें फार कजाग होती. तथापि तीं उभयतां स्त्रीपुरुषें मोठ्या आनंदांत कालक्रमणा करीत असत; परंतु संततीच्या अभावामुळें आत्मदेवास फार दुःख होई. संततीकरितां त्यानें पुष्कळ दानधर्म केला, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं एके वेळीं तो आपल्या घराचा त्याग करून वनांत जाण्याकरितां निघाला. पुढें दोन प्रहर झाले असतां त्याला उन्हाचा प्रखर ताप सहन होईनासा होऊन तो तृषेनें अत्यंत व्याकुळ झाला. तेव्हां जवळच एक तलाव होता, तेथें जाऊन त्यानें जल प्राशन केलें, आणि तो तेथेंच जरा विश्रांतीस बसला. थोडा वेळ गेल्यावर तेथें एक संन्यासी आला. त्यानें आत्मदेवाची खिन्न मुद्रा पाहून म्हटलें कीं, "ब्राह्मणा! तूं असा दुःखी कां दिसतोस?" तेव्हां आत्मदेव म्हणाला, मुने, मला संतति नाहीं, हेंच माझ्या दुःखाचें कारण होय. पण दुसरें माझ्या प्रारब्धाचें मला असें आश्चर्य वाटतें कीं, माझ्या घरीं मीं एक गाय पाळली आहे, तीही वांझ निघाली; आणि माझ्या घरांत एक वृक्ष आहे, त्याला सुद्धां फल येत नाहीं! तेव्हां आतां काय करावें, हें कांहीं मला सुचत नाहीं, व त्यामुळें मी गृहत्याग करून या वनांत आलों आहें." नारदा, अशी आपल्या कर्माची कहाणी त्या यतीस सांगून आत्मदेवानें त्याचे घट्ट पाय धरिले, व तो ढळढळां रडूं लागला! तेव्हां त्या संन्याशास त्याची दया आली, आणि त्यानें त्याच्या कपाळींचें ब्रह्मलिखित वाचून पाहिलें, तों त्यास सप्तजन्मांतरींही संतान नाहीं, असें ब्रह्मदेवानें स्पष्ट लिहिलेलें त्यास आढळलें. त्यावरून संन्याशानें त्यास म्हटलें, "ब्राह्मणा, तूं व्यर्थ शोक कशाला करितोस! तुझ्या कपाळीं संतान मुळींच नाहीं. शिवाय दुसरें असें आहे कीं, ह्या संसारांत कांहीं अर्थ नाहीं. पहा सगर राजाला साठ हजार मुलगे होते; पण शेवटीं त्यांचा नाश झाल्यामुळें त्याला दुःखच ना भोगावें लागलें? अंग राजाचीही त्याच्या वेन नामक पुत्राच्या दुष्टपणामुळें तीच स्थिति झाली. व शेवटीं त्याला सर्वस्व सोडून वनांतरीं जाणेंच भाग पडलें! याकरितां, बाबारे, संततीची आशा करणें तूं सोडून दे. संसार हा दुःखमयच आहे. ह्यास्तव संन्यास ग्रहण करून आत्मसाधन करणें हेंच अत्युत्तम होय." नारदा, अशा प्रकारचा पुष्कळ उपदेश त्या संन्याशानें आत्मदेवास केला, पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. तो म्हणाला, "यतिमहाराज, आपण किती जरी सांगितलें, तरी पुत्रपौत्रादिकांनीं युक्त अशा गृहस्थाश्रमापेक्षां मला कशांतच सुख वाटत नाहीं;

म्हणून, माझ्या प्रारब्धीं नसलें तरी आपण मला पुत्रसंतान द्यावें. नाहींपेक्षां मी येथेंच आपल्या चरणांपाशीं प्राणत्याग करितों !" तेव्हां यतीनें त्यास फिरून म्हटलें, "बाबारे, जें प्रारब्धीं नसेल, तें आग्रहानें प्राप्त करून घेण्यांत हंशील नाहीं; त्यापासून अनर्थ मात्र ओढवतो. पहा–चित्रकेतु राजाच्या नशीबीं संतान नव्हतें, तें त्यानें अंगिरा ऋषींपासून बळेंच प्राप्त करून घेतलें; पण त्याचा परिणाम असा झाला कीं, तेंच त्याच्या दुःखाला कारण झालें ! याकरितां तू हा हट्ट सोडून दे. कारण, अशा हट्टानें प्राप्त करून घेतलेल्या संततीपासून तुला सुख होणार नाहीं." नारदा, त्या यतीनें असें परोपरी सांगितलें, तरी तो आपला आग्रह सोडीना. तेव्हां शेवटीं यतीनें त्यास एक फळ दिलें आणि सांगितलें कीं, "तुझा आग्रहच आहे, तर तुला मी संतति देतों. मीं दिलेलें हें फळ तुम्हीं उभयतांनीं भक्षण करावें, म्हणजे तुम्हांस सुपुत्र प्राप्त होईल. मात्र, तुझ्या पत्नीनें सत्यवृत्तीनें व शुचिर्भूतपणानें वागून आणि रोज फक्त एक वेळच भात जेवून एक वर्षपर्यंत राहिलें पाहिजे." नारदा, याप्रमाणें सांगून तो संन्याशी तेथून निघून गेला, व इकडे आत्मदेवही तें फळ घेऊन घरीं आला. नंतर तें फळ त्यानें आपल्या स्त्रीजवळ दिलें, आणि झालेली सर्व हकीकत तीस सांगितली. नारदा, आत्मदेवाची स्त्री फार कजाग होती हें सांगितलेंच आहे. तिनें मोठा चमत्कार केला ! तें फळ तिच्या स्वाधीन करून तिचा पति कांहीं कामानिमित्त बाहेर गेला असतां ती तें हातीं घेऊन आपल्या मैत्रिणीकडे गेली, आणि म्हणूं लागली कीं, "पतीनें हें काय विघ्न घरांत आणिलें आहे पहा ! मीं जर हें भक्षण केलें तर म्हणे मला पुत्र होईल ! अहो, हवा आहे कोणाला तो पुत्र ! हें फळ खाल्ल्यावर मी गरोदर झालें, म्हणजे त्या यातना आणि तें दुःख सोसावें कोणीं ? त्या गर्भाच्या योगानें माझें उदर स्थूल होईल, मग मला अन्न जाणार नाहीं, व त्यामुळें मी शक्तिहीन होईन; आणि अशा प्रकारें मी दुर्बळ झालें, म्हणजे माझ्या घरांतील सर्व द्रव्य माझी दुष्ट नणंद लुटून नेईल ! बरें, इतकेंही करून वेळेवर मी नीटपणें प्रसूत वगैरे झालें, तर सर्व ठीक; नाहींतर शुकासारखा जर तो गर्भ बारा वर्षें पोटांतच राहिला, तर मग मीं काय करावें? म्हणून, गडे, मी आतां हें फळ मुळीं खातच नाहीं !"

असो. नारदा, त्या स्त्रीनें तें फळ खरोखरीच खाल्लें नाहीं, आणि पतीनें विचारिलें तेव्हां "खाल्लें" असें सांगितलें ! पुढें एके दिवशीं तिची बहीण तिजकडे आली, तेव्हां तिला तिनें झालेला हा सर्व वृत्तांत सांगितला. त्यावरून तिच्या बहिणीनें तिला एक युक्ति सांगितली. ती म्हणाली, "हें बघ ताई, जर तुझी तें फळ खाण्याची इच्छा नाहीं, तर तें तूं आपल्या गाईला घाल, आणि तू गर्भारपणाचा लटकाच आव आणून बैस; घरांतून कोठेंही बाहेर जाऊं नको. मी हल्लीं गरोदर आहेच; प्रसूत झालें, म्हणजे तें मूल तुला आणून देईन. आतां माझा पति मला असें करूं देणार नाहीं, याकरितां तूं त्याला आधींच कांहीं द्रव्य देऊन ठेव म्हणजे झालें ! पुढें तें मूल मोठें होईपर्यंत मी रोजच्या रोज येऊन त्यास पाजीत जाईन, म्हणजे सर्व कांहीं ठीक जमेल !"

नारदा, असा त्या उभयतां बहिणींमध्यें विचार होऊन तसेंच करावयाचें ठरलें, व त्याप्रमाणें पुढें त्या धुंधुलीनें हुबेहूब केलेंही ! कांहीं कालानंतर तिची बहीण प्रसूत झाल्यावर तिनें आपलें मूल गुप्त रीतीनें तिच्याजवळ आणून दिलें; आणि धुंधुलीनें, आपण सुखानें प्रसूत झाल्याबद्दल बाहेर पतीस कळविलें. पुत्रप्राप्तीचें वर्तमान ऐकून आत्मदेवास मोठा आनंद झाला. त्यानें त्या पुत्राचे जातकर्म वगैरे सर्व संस्कार

धियुक्त करून पुष्कळ दानधर्मही केला. र धुंधुलीनें त्या पुत्राचें नांव धुंधुकारी असें केलें. इतका प्रकार होत आहे, तों इकडे ती गाही प्रसूत झाली, आणि तिला एक अत्यंत वान व महातेजस्वी असा मनुष्यरूपी पुत्र झाला. ला पाहून आत्मदेवास मोठा आनंद झाला, व गरांतील लोकांनाही मोठें आश्चर्य वाटलें; आणि ते णूं लागले कीं, आत्मदेवाचा खरा भाग्योदय ला; अहो, त्याच्या घरच्या गाईला सुद्धां देवा-रखाच पुत्र झाला! त्या समयीं ते सर्व मोठया तुकानें तें बालक पहावयास येऊं लागले. त्मदेवानें त्या पुत्राचे सुद्धां आपल्या पुत्राप्रमाणें विधि केले; व त्याचे कर्ण गाईप्रमाणें लांब ते, म्हणून त्याचें नांव त्यानें गोकर्ण असें केलें. पुढें ते गोकर्ण आणि धुंधुकारी हे घेही मोठे झाले, तों दोघांच्या स्वभावांत अग-च विरोध दृष्टीस पडूं लागला. गोकर्ण हा स्वभा-नें शांत,सदाचरणी व वैराग्यसंपन्न असा निघाला; णि धुंधुकारी हा दुष्ट, दुराचारी व स्त्रीलंपट पाला. पण्यांगनांच्या संगतीस लागून त्यानें तील सर्व द्रव्य उधळून टाकिलें, व दिवशीं तर प्रत्यक्ष मातापितरांनाच त्यानें च्छ ताडन करून घरांत होतें नव्हतें तवढें वेश्यांच्या भरीस नेऊन घातलें! तेव्हां मग त्मदेवाच्या हृदयांत उजेड पडला, व संन्याशा-ा शब्दांची आठवण होऊन तो म्हणाला, देवा, कुपुत्र असण्यापेक्षां निर्वंश झालेला ! " नारदा, असें म्हणून आत्मदेव फार आ-श करूं लागला; त्या वेळीं गोकर्ण पुढें आला णि त्यानें त्याचें सांत्वन केलें.

गोकर्ण म्हणाला:—तात, आपण व्यर्थ दुःख करितां ? या संसारांत सर्व असाच प्रकार . माझा पुत्र, माझी स्त्री, माझे मित्र, माझें माझें द्रव्य हा सर्व मोह आहे. गृहस्थाश्रमी वास हीं नसलीं तरी दुःख देतात, व असलीं तरी दुःखच देतात! एवंच हीं सर्व दुःखमूलक आहेत; यांपासून सुखाची आशा करणें व्यर्थ आहे. खरें सुख ज्यास पाहिजे असेल, त्यानें संसारांत आसक्त न होतां विरक्तच झालें पाहिजे. याकारितां, आपण व्यर्थ शोक करूं नका. आपण सौख्याचीच इच्छा करीत असाल, तर सर्वस्वाचा त्याग करून वनांत जा, आणि तेथें एकांत-वासाचा अंगीकार करून हरीचें ध्यान करा; म्हणजे खऱ्या सुखाची आपणांस प्राप्ति होईल.

सनत्कुमार म्हणाले:—नारदा, याप्रमाणें जेव्हां गोकर्णानें अनेक प्रकारें उपदेश केला, तेव्हां त्या आत्मदेवाच्या अंतःकरणांत प्रकाश पडला; व तो तत्क्षणीं सर्वसंगपरित्याग करून अरण्यांत चालता झाला. पुढें त्यानें नित्य श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधाचा पाठ करण्याचा नियम ठेविला, व त्यामुळें त्यास थोडक्याच कालांत कृष्णदर्शन होऊन तो अत्युच्च पदास जाऊन पोहोंचला. असो.

नारदा, गोकर्णाच्या उपदेशानें पिता आत्मदेव वनांत निघून गेल्यानंतर धुंधुकारीनें आपल्या माते-चे फारच हाल केले. एके दिवशीं तर द्रव्यासाठीं त्यानें धुंधुलीस इतकें मारिलें कीं, त्या दुःखानें तिनें तत्काल विहिरींत उडी टाकून जीव दिला! पुढें, आपणास कोणीच विचारिता राहिला नाहीं असें पाहून, त्यानें आपल्या घरांतच वेश्या आ-णून ठेविल्या, आणि त्यांच्या संतोषाकारितां अन-न्वित कृत्यें करून तो द्रव्यसंपादन करूं लागला. एके दिवशीं त्यानें बरेंच द्रव्य चोरून आणिलें, आणि तें त्या वेश्यांना दिलें. तें पाहून त्यांच्या मनांत विचार आला कीं, हा नित्य चोरी करून असें विपुल द्रव्य आणितो, त्या अर्थी एखादे दिवशीं या फंदांत हा तर मरेलच, पण आमचेही याजबरोबर प्राण जातील. त्यापेक्षां आतां यालाच ठार मारून आपण कोठें तरी निघून जावें, हा उत्तम मार्ग! शेवटीं त्यांनी तोच विचार निश्चित केला, आणि एके रात्रीं

त्याच्या गळ्यास फांस लावून त्या त्यास मारूं लागल्या. त्यांनीं बराच वेळ त्यास मारण्याचा प्रयत्न केला, तरी जेव्हां त्याचा प्राण लवकर जाईना व तो ओरडूं लागला, तेव्हां त्या दुष्ट वेश्यांनीं त्याच्या तोंडांत झळझळीत निखारे कोंबले, आणि त्याचा प्राण घेतला! नारदा, जारिणी स्त्रिया मोठ्या क्रूर असतात. विचारवंत पुरुषांनीं त्यांच्या मधुर भाषणास कधींही लुब्ध होऊं नये. त्या जें प्रेम दाखवितात, तें केवळ वरपांगी असतें. त्यांचें दर्शन पुरुषांना आनंददायक वाटतें, पण त्यांचें सख्य प्राणाची हानि करतें! असो. त्या वेश्यांनीं त्या धुंधुकारीस मारून खड्डयांत गाडून टाकिलें; आणि कोणी विचारावयास आलें असतां, तो परदेशीं गेला आहे असें त्या सांगूं लागल्या. पुढें थोडक्याच कालांत त्या वेश्या तें नगर सोडून दुसरे ठिकाणीं गेल्या. इकडे धुंधुकारी मरण पावल्यानंतर पिशाचजन्मास गेला, आणि 'हा दैवा, हा दैवा! आतां काय करूं!' अशा प्रकारें आक्रंदत दशदिशा सैरावैरां भ्रमण करूं लागला. इकडे गोकर्ण हा तीर्थाटन करीत हिंडत असतां सहज एके ठिकाणीं त्याला धुंधुकारी मरण पावल्याची वार्ता कळली, तेव्हां त्यानें त्याच्या मुक्तिप्रीत्यर्थ गयेस श्राद्ध केलें. त्याचप्रमाणें, तो ज्या ज्या तीर्थाच्या ठिकाणीं जाई, तेथें तेथें त्याचें श्राद्ध करी. पुढें कांहीं दिवसांनीं तो आपल्या घरीं आला, आणि रात्रीं अंगणांतच निजला. तेव्हां, आपला बंधु गोकर्ण येथें आला आहे असें पाहून, धुंधुकारी हा त्यास नानाप्रकारचीं भयंकर रूपें दाखवून भेवडावूं लागला. तो प्रकार पाहून गोकर्णास वाटलें कीं, हा कोणी दुर्गतीला पोहोंचलेला प्राणी असावा. म्हणून त्यानें त्यास विचारिलें कीं, "हे पिशाचा, तूं कोण आहेस व तुझी अशी स्थिति कशानें झाली, हें मला सांग." धुंधुकारीनें त्यास कांहींच उत्तर दिलें नाहीं. तो फक्त मोठमोठ्यानें रडूं लागला, आणि हातांनीं व नेत्रांनीं कांहीं खुणा करूं लागला. तेव्हां गोकर्णानें ओंजळींत पाणी घेतलें, आणि तें अभिमंत्रित करून त्याच्या अंगावर फेंकलें. त्यामुळें त्याचीं सर्व पापें भस्म झालीं, आणि मग तो प्रेतरूपी धुंधुकारी बोलूं लागला. त्यानें आपली सविस्तर हकीकत गोकर्णास सांगितली, आणि त्याची प्रार्थना करून त्यास म्हटलें, "हे बंधो गोकर्णा, मला या यातनांतून आतां तूं मुक्त कर. माझ्यानें हें दुःख सहन करवत नाहीं." नारदा, असें हें त्याचें भाषण ऐकून व हा आपला बंधु धुंधुकारी आहे असें जाणून गोकर्णास मोठें आश्चर्य वाटलें. तो मनांत म्हणाला: याच्या मुक्तीकरितां मीं प्रत्येक क्षेत्राच्या ठिकाणीं श्राद्ध केलें, तरी हा अद्याप मुक्त झाला नाहीं, तेव्हां आतां करावें तरी काय? शेवटीं त्यानें आपल्या पिशाचरूपी बंधूस सांगितलें कीं, 'आतां तूं जा. मी थोडा विचार करितों, आणि तुझ्या मुक्तीकरितां काय करावें, तें ठरवितों. तूं काळजी करूं नको.' हें ऐकून तो धुंधुकारी तेथून निघून गेला. नंतर थोड्या वेळानें उजाडलें, तों गोकर्ण आल्याची वार्ता गांवांत कर्णोपकर्णीं झाली; तेव्हां त्याच्या दर्शनाकरितां तेथील मोठमोठे विद्वान लोकही येऊं लागले. त्या वेळीं, त्या योगनिष्ठ, ब्रह्मनिष्ठ व वेदांती लोकांमध्यें त्यानें रात्रीचा प्रश्न काढिला; तरी तेथेंही, धुंकारीच्या मुक्त्यर्थ काय उपाय करावा, याचा निर्णय होईना. शेवटीं सर्वांच्या मतानें असें ठरलें कीं, या कामांत सूर्य सांगेल त्याप्रमाणें करावें. त्यावरून गोकर्णानें तत्काल सूर्याची प्रार्थना केली, आणि त्यास या संबंधानें विचारिलें; तेव्हां त्याच्या कानीं असा ध्वनि पडला कीं, "गोकर्णा, तुझ्या बंधूची मुक्तता व्हावी अशी तुझी इच्छा असेल, तर त्यास एकच उपाय आहे; आणि तो श्रीमद्भागवताचा सप्ताह करणें हा होय.' नारदा, हे शब्द तेथें असलेल्या सर्व लोकांनींही ऐकिले. असो. नंतर गोकर्णानें लगेच सप्ताह करण्याचा

निश्चय केला. गोकर्ण हा भागवताचा सप्ताह करणार आहे, ही वार्ता कळतांच लोकांच्या झुंडीच्या झुंडी तेथें आल्या. नारदा, तो सप्ताह देवांनाही ऐकण्यासारखा होता. असो. नंतर गोकर्ण आसनारूढ होऊन सप्ताह करूं लागला, तेव्हां त्या ठिकाणीं तो पिशाचरूपी धुंधुकारीही आला; आणि बसावयास स्थान पहात असतां, तेथेंच असलेल्या एका वेळूच्या मुळाशीं एक छिद्र त्यास दिसलें, त्यांत तो जाऊन बसला. गोकर्णानें वैष्णव ब्राह्मणास मुख्य श्रोता करून, भागवताचें व्याख्यान करण्यास प्रथमस्कंधापासून आरंभ केला. नारदा, पुढें तेथें एक मोठा चमत्कार झाला, तो पाहून तेथें जमलेल्या लोकांना फारच आश्चर्य वाटलें! सायंकाळीं जेव्हां पुराण आटोपलें, तेव्हां, ज्या वेळूच्या मुळाशीं धुंधुकारी बसला होता, त्या सप्तकांडात्मक वेळूच्या एका पेऱ्यांत मोठा कडकडाट होऊन तें पेरें ताडकन फुटलें! तेव्हां, हें काय असावें, याची कोणास कल्पना होईना. पुढें प्रत्येक दिवशीं असाच प्रकार होत होता, व दररोज त्या वेळूचें एक एक पेरें फुटत होतें. शेवटीं सातव्या दिवशीं सायंकाळीं नित्याप्रमाणें त्या वेळूचें राहिलेलें एक पेरें फुटलें, तेव्हां आपलें पिशाचरूप टाकून देऊन दिव्य रूप धारण केलेला तो धुंधुकारी त्यांतून निघाला; आणि त्यानें गोकर्णाच्या चरणीं लोटांगण घालून म्हटलें, “ बंधो, तूं खचीत धन्य आहेस. तुझ्या योगानें मला हें मुक्तिदायक भागवत ऐकावयास मिळालें, व त्यामुळेंच मी आज पावन झालों. खरोखर या भागवतसप्ताहाचें माहात्म्य अत्यंत श्रेष्ठ आहे. ” नारदा, नंतर लागलीच तेथें देदीप्यमान असें एक विमान आलें, आणि त्यांत बसून तो धुंधुकारी सर्वांदेखत वैकुंठलोकीं चालला. नारदा, विष्णुदूत जेव्हां धुंधुकारीला एकट्यालाच विमानांत बसवून घेऊन चालले, तेव्हां गोकर्णानें त्यास विचारिलें कीं, देवदूतांनो, या एवढ्या समाजांतून तुम्ही एकट्या धुंधुकारीलाच तेवढें कां घेऊन चालला? त्यानें जसा भागवतसप्ताह ऐकिला, तसा याही सर्वांनीं ऐकिला आहे! तें ऐकून विष्णुदूत म्हणाले, “ बा गोकर्णा, या सर्वांनींच भागवतसप्ताह ऐकिला, हें तूं म्हटलेंस तें खरें; पण या धुंधुकारीनें जसें त्याचें मननपूर्वक श्रवण केलें, तसें यांत कोणींच केलें नाहीं, व त्यामुळें यांपैकीं कोणासही आम्हांला नेतां येत नाहीं. ” हें भाषण ऐकून त्या सर्वांनीं गोकर्णास पुनः सप्ताह करण्याविषयीं प्रार्थना केली; तेव्हां गोकर्णानें श्रावणमासीं फिरून श्रीमद्भागवताचा सप्ताह केला असतां सर्वजणांनीं मननपूर्वक त्याचें श्रवण केलें; त्या वेळीं प्रत्यक्ष श्रीहरि हा आपल्या बरोबर पुष्कळ विमानें घेऊन भक्तांसह तेथें आला, आणि तो सर्व श्रोत्यांना स्वस्वरूप करून त्या विमानांत बसवून घेऊन गेला!

श्रीमत्सनत्कुमार म्हणाले:—नारदा, याप्रमाणें भागवतसप्ताहाचें माहात्म्य मीं तुला सांगितलें. जे लोक याचें मनन करतील, त्यांना पुनः गर्भवास प्राप्त होणार नाहीं मोठमोठ्या तपस्व्यांना सुद्धां जें फल प्राप्त होणें दुर्लभ, तें कलियुगांत भागवतश्रवणानें प्राप्त होतें.

नारद म्हणाले:—मुनिश्रेष्ठहो, आपल्या कृपेनें मी आज कृतकार्य झालों. लोककल्याणाच्या इच्छेनें आपण मला जें सांगितलें तें योग्यच आहे; पण कलियुगांत लोक अज्ञान आहेत, याकरितां त्यांनीं हा सप्ताह कोणत्या विधीनें करावा तें आपण सांगा, म्हणजे लोकांवर मोठे उपकार होतील. ईशसेवा करण्यास कोणताही काळ शुभ आहे, हें आपण मला सांगितलेंच आहे; पण जे लोक आकुंचित बुद्धीचे, संशयवृत्तीचे व कर्मठ आहेत, त्यांनीं केव्हां व कशा प्रकारें हा सप्ताह करावा, तें निवेदन करा.

भगवान सनत्कुमार म्हणाले:—हे भक्तश्रेष्ठा नारदा, या कलियुगांत मनुष्याचें आयुष्य क्षण-

भंगुर आहे; तेव्हां अशा अशाश्वत स्थितींत सत्कर्म करण्याचें कालावधीवर टाकणें हितकर नाहीं. त्यांतून तुझी इच्छा आहे, तर तुला सांगतों कीं, आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष आणि माघ हे महिने या कृत्यास उक्त होत. या महिन्यांत कुयोग असलेले दिवस सप्ताहप्रारंभास वर्ज करावे. आपले सर्व आप्तसुहृद व इष्टमित्र जसे लग्नकार्यांत आपण बोलावतों, तसे ते आपण सप्ताह ऐकण्याकरितां बोलवावे. विद्वान व सत्पात्र ब्राह्मणांस बोलावून त्यांचें चांगलें आदरातिथ्य करावें. त्यांना उत्तम आसनें द्यावीं. वक्त्याकरितां, त्याचें मुख उत्तरेकडे अथवा पूर्वेकडे होईल, असें आसन मांडावें. वक्ताही चांगला विद्वान, बहुश्रुत, वेदांतशास्त्राचें संशोधन करणारा व अज्ञानांचें समाधान करण्यामध्यें कुशल असा ब्राह्मण असावा. त्याचप्रमाणें, त्यास साहाय्य करणाराही एक त्याच्यासारखाच ज्ञानी ब्राह्मण असावा. वक्त्यानें सप्ताहास आरंभ करण्याच्या पूर्वदिवशीं, उचित असा क्षौर करवावा. नंतर प्रथम दिवशीं स्नानसंध्यादिक नित्यकर्म केल्यावर, प्रथमतः विघ्ननिवारक गणपतीचें पूजन करावें; नंतर तेथेंच मंडल करून श्रीहरीची स्थापना करावी; व षोडशोपचारानें त्याची पूजा करून प्रदक्षिणा केल्यानंतर नमस्कार करून प्रार्थना करावी कीं, "हे करुणानिधे भगवंता, ह्या जन्ममरणरूप सागरांत मी बुडत आहें, व कर्मरूप नक्रानें माझें शरीर धरलें आहे, तर यांतून मला सोडीव, आणि माझा उद्धार कर." नंतर धूपदीपादिकेंकरून पूजा समर्पण केल्यानंतर भगवंतापुढें श्रीफळ ठेवावें, आणि प्रसन्नांतःकरणानें त्याची स्तुति करावी. ती अशी कीं, "श्रीमद्भागवत म्हणजे तूं साक्षात् श्रीकृष्णच होस. या भवसागरांतून मुक्त होण्याकरितां मीं तुझा अवलंब केला आहे. भगवंता, तूं माझे मनोरथ पूर्ण कर. हा दास तुला अनन्यभावानें शरण आहे." नारदा, वक्त्याचें हें सर्व कृत्य आटोपल्यानंतर, यजमानानें, वक्ता परमेश्वर आहे, अशी भावना धरून त्याचें पूजन करावें; आणि त्यास यथाशक्ति वस्त्रालंकारादि समर्पण करून त्याची पूजा करावी, व हात जोडून त्याची प्रार्थना करावी कीं, "आपण सर्वज्ञ–केवळ शुकरूप आहां; हें श्रीमद्भागवत आम्हांस सांगून आमचें अज्ञान दूर करावें." नंतर विघ्ननिवारणार्थ पांच ब्राह्मणांस 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' या द्वादशाक्षरी मंत्राचा जप करण्यास सांगावें; आणि वस्त्रालंकारादि अर्पण करून त्यांचेंही पूजन करावें. नंतर चित्त शुद्ध करून पुराणश्रवणास बसावें. वक्त्याचें मुख उत्तरेकडे असेल, तर सर्व श्रोत्यांनीं पूर्वाभिमुख बसावें; व वक्ता पूर्वाभिमुख असेल, तर श्रोत्यांनीं उत्तरेकडे मुख करून बसावें. नारदा, आतां, श्रोत्यांनीं आणि वक्त्यानें कोणत्या नियमांचें आचरण करावें, तें सांगतों. भागवतसप्ताह संपूर्ण होईपर्यंत त्यांनीं ब्रह्मचर्यव्रतानें असावें; शय्येवर शयन करूं नये; शुचिर्भूत राहावें; आणि सामर्थ्य असेल तर उपोषण करावें, नाहींपेक्षां एकभुक्त रहावें. याप्रमाणें आचरण ठेवून सप्ताह संपूर्ण झाला म्हणजे त्याचें उद्यापन करावें. त्या दिवशीं वक्त्याची व ग्रंथाची पूजा करावी. नंतर वक्त्यानें सर्वांस प्रसाद व तुळशीमाला द्याव्या. नंतर यथाशक्ति दानधर्म, ब्राह्मणभोजन वगैरे करावें. ज्यांनीं हा सप्ताह निष्कामबुद्धीनें केला असेल, त्यांनीं उद्यापन केलें नाहीं तरी चालेल. ते केवळ श्रवणानेंच कृतार्थ होतात.

सनत्कुमार पुढें म्हणालेः—नारदा, तुझ्या इच्छेप्रमाणें हें सर्व तुला सांगितलें. आणखी कांहीं जाणण्याची तुझी इच्छा असेल तर ती सांग.

नारद म्हणालेः—हे तपोधनहो, माझ्या सर्व इच्छा आतां तृप्त झाल्या. आपल्या कृपाप्रसादानें

मला आज श्रीकृष्णाची प्राप्ति झाली, हा आपला मजवर मोठा अनुग्रह होय.

सूत म्हणतात:—शौनका, याप्रमाणें भक्तशिरोमणि नारद भाषण करीत आहेत, तों व्यासपुत्र श्रीशुकाचार्य हे मुखानें भागवताचा पाठ करीत करीत तेथें आले. तेव्हां सर्वांना परमानंद झाला, आणि त्यांनीं त्यांचा जयजयकार केला, व त्यांस श्रेष्ठासनावर बसवून त्यांची पूजा केली. नंतर भगवान शुकाचार्यांनीं बोलण्यास प्रारंभ केला.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—हे भगवद्भक्त रसिक जनहो, ह्या भागवत-कथाकल्पतरूच्या अमृतफलांतील परमानंदरूप रस तुम्ही यथास्थित प्राशन करा. हें माझ्या मुखापासून शिष्यपरंपरेनें येत येत अभंग असें खालीं आलेलें आहे. हें चतुर्विध पुरुषार्थांचें साधन असून मोक्षप्रद आहे. कारण, यांत सर्व फल देणारा असा ईश्वराराधनरूप धर्म सांगितला आहे. याच्या श्रवणापासून त्रिविध तापांचा नाश होऊन ब्रह्मज्ञान प्राप्त होतें. हें श्रीमद्भागवत सर्व पुराणांत श्रेष्ठ असून, ह्याचें भक्तीनें श्रवण अथवा पठन करणाराचे सर्व मनोरथ पूर्ण होऊन अंतीं त्यास मोक्ष प्राप्त होतो !

सूत म्हणतात:–शौनका, याप्रमाणें श्रीशुकाचार्य भाषण करीत असतां तेथें पुनः श्रीकृष्ण भगवान आपल्या भक्तांसह प्रकट झाले ! तेव्हां सर्वांनीं त्यांची मनोभावानें षोडशोपचारें पूजा केली, व ते सर्व आनंदानें 'कृष्ण कृष्ण जय कृष्ण कृष्ण जय' करीत नाचूं लागले! तें कीर्तन पाहण्याकरितां सर्व देव तेथें जमले, इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष श्रीशंकरही भवानीसह तेथें आले ! त्या प्रसंगाचें काय वर्णन करावें ? तें भजन अपूर्वच होय. त्यांत प्रल्हाद टाळ वाजविणारा व उद्धव झांज वाजविणारा होता ! नारद वीणा वाजवीत असून अर्जुन हा अनेक रागरागिण्यांमध्यें सुस्वर गायन करीत होता. सनत्कुमार त्या भजनांत जयजयकार शब्द करीत होते; श्रीशुकाचार्य निरूपण सांगत होते; व भक्ति, ज्ञान आणि वैराग्य हीं तेथें नृत्य करीत होतीं ! शौनका, हें आपल्या भक्तांचें अद्भुत प्रेम पाहून भगवान श्रीकृष्ण प्रसन्न झाला, आणि त्यांना 'वर मागा, वर मागा' असें म्हणाला. तेव्हां त्या सर्वांनीं परमेश्वरापुढें हात जोडून वर मागितला कीं, "हे परमेश्वरा, आतां आम्हांस तूं एवढेंच दे कीं, जेथें जेथें ही तुझी सप्ताहकथा होईल, तेथें तेथें तूं प्रकट होऊन सर्वांचे मनोरथ पूर्ण कर. स्वतः आम्हांस तर तुझ्या सान्निध्यावांचून दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नाहीं." तेव्हां 'तथास्तु' म्हणून तो परमपुरुष भगवान अंतर्धान पावला.

श्रीहरीनें 'तथास्तु' म्हटल्याबरोबर सर्वांनीं त्यास साष्टांग नमस्कार केला, व नारदानें श्रीशुकाचार्यादि तपस्व्यांस नमस्कार केल्यानंतर ते सर्व आपापल्या स्थानीं निघून गेले; आणि श्रीशुकाचार्यांनीं जातांना भक्ति, ज्ञान आणि वैराग्य यांची श्रीमद्भागवताच्या ठिकाणीं स्थापना केली. शौनका, याप्रमाणें, सनत्कुमारांनीं ज्या कारणानें श्रीमद्भागवतसप्ताहाचें माहात्म्य नारदांना सांगितलें, तें कारण मीं तुम्हांस कथन केलें. तसेंच, या सप्ताहापासून नारदांस काय अनुभव आला, तोही सांगितला. यावरून तुमच्या लक्षांत येईल कीं, ज्यांना ईश्वराच्या मायेनें मोह पाडिला आहे, व जे संसारसर्पानें ग्रस्त झालेले आहेत, त्यांच्यावरचें मोहपटल दूर होऊन, अशाश्वत व दुःखमय अशा ह्या संसारतापापासून त्यांची निवृत्ति होण्यास भागवतकथाश्रवणासारखें या कलियुगांत सुलभ असें अन्य साधन कोणतेंच नाहीं !

शौनक म्हणाले:—हे सर्वज्ञ सूता, तूं आम्हांस भागवतश्रवणाचें माहात्म्य सांगितलेंस, तें ऐकून, श्रीमद्भागवत ऐकण्याविषयीं आमचीं मनें अत्यंत

उत्सुक झालों आहेत; तर आतां कृपा करून अत्यंत पुण्यकारक व मुक्तिदायक असें तें शुकशास्त्र आम्हांस सांग. तुझ्या दर्शनानें आम्ही आज धन्य झालों आहों.

सूत म्हणाले:—शौनकादिकहो, आपण वेदवेत्ते, तपस्वी व तत्त्वज्ञानी असे आहां. आपणांस अवगत नाहीं अशी एकही वस्तु जगांत असूं शकणार नाहीं; तथापि लोककल्याणाच्या इच्छेनें आपण माझ्या मुखानें श्रीमद्भागवत श्रवण करण्याची जी उत्कंठा दाखविली, ती योग्यच आहे. साधूंचे अवतार केवळ जगाच्या कल्याणाकरितांच होत. ईश्वरच स्वतः तीं रूपें धारण करितो; आणि त्या मिषानें, अज्ञान लोकांस उदाहरण मिळावें याकरितां स्वतः सर्व कर्में करून दाखवितो. कर्ता करविता सर्व कांहीं तोच होय. सर्व प्राण्यांस तोच बुद्धि देणारा आहे. त्याच्या कथा सांगण्याचें सामर्थ्य मला त्यानेंच यावें. माझा त्या जगच्चालक परमेश्वराला नमस्कार असो!





॥ श्रीगणेशाय नमः ॥

# श्रीमद्भागवत.

## प्रथमस्कंध.

### अध्याय पहिला.

—:०:—

#### मंगलाचरण.

**भगवद्ध्यान**

भगवान वेदव्यास मुनि, आपले मनाची स्वस्थता होऊन शाश्वत अशा शांतिसुखाची प्राप्ति व्हावयासाठीं, मुख्यत्वेंकरून ज्यांत परमेश्वराचे गुणानुवाद व लीलाचरित्र हीं पुनःपुनः वर्णिलीं आहेत अशा श्रीमद्भागवत नामक पुराणास प्रारंभ करितांना त्याची निर्विघ्नपणें परिसमाप्ति व्हावी म्हणून आरंभीं मंगलाचरण करितातः—

ज्यापासून अखिल विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं होतात; जो स्थावरजंगमादि सर्व वस्तूंमध्यें अंतर्बाह्य व्याप्त असून मुख्य स्वरूपानें त्यांहून अगदीं निराळा व अलिप्त आहे; जो स्वतःसिद्ध ज्ञानवान असून इंद्रादिक देवांस देखील अगोचर आहे; ज्याच्या केवळ इच्छेवरूनच वेद हे आदिकवि ब्रह्मदेव ह्यास मनानें उपलब्ध झाले; तेज, जल व मृत्तिका ह्यांचा एकमेकांच्या ठिकाणीं होणारा भास वस्तुतः असत्य असतांही अधिष्ठानाच्या सत्यतेमुळें जसा खरा वाटतो, तशी सत्त्व, रज व तम ह्या गुणत्रयीपासून उत्पन्न झालेली ही सृष्टि वस्तुतः असत्य असतांही, तिच्या ठिकाणीं ज्याची व्याप्ति असल्यामुळें ती सत्य भासते; आणि जो स्वतःसिद्ध ज्ञानस्वरूप असल्या कारणानें अज्ञानजन्य मायेपासून नेहमीं अलिप्त आहे, अशा सच्चिदानंद परमात्म्याचें मी व माझे शिष्य मिळून ध्यान करितों.

**विषयनिर्देश.**

बदरिकाश्रमवासी महामुनि श्रीनारायणानें निवेदन केलेल्या ह्या श्रीमद्भागवत ग्रंथामध्यें ज्यांनीं कामक्रोधादिक षड्रिपूंस जिंकून टाकिलें आहे व भूतदया करणें हा ज्यांचा स्वभावच बनला आहे अशा सत्पुरुषांच्या निष्काम व श्रेष्ठ धर्माचें विवेचन केलें आहे. ह्या ग्रंथामध्यें आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक अशा त्रिविध तापांचा उच्छेद करणारा श्रेष्ठ व कल्याणकारक विषय वर्णिला आहे. ह्याच विषयावर दुसरीं शास्त्रें आहेत खरीं, परंतु त्यांची योग्यता ह्या भागवत

शास्त्राइतकी नाहीं; जे पुण्यशील पुरुष ह्या भागवत शास्त्राचें श्रवण करतील, त्यांच्या मनामध्यें श्रवण केल्याबरोबर तत्काल जशी ईश्वराची मूर्ति दृढ प्रतिबिंबित होईल, तशी ती इतर शास्त्रांपासून होणार नाहीं.

### उद्दिष्ट फल.

हे रसज्ञहो, सर्व पुरुषार्थ प्राप्त करून देणाऱ्या वेदरूप कल्पवृक्षाचें हें भागवत नामक फल नारदापासून मला मिळालें. हें परमानंदरूप मधुर रसानें परिपूर्ण असून शुकमुखांतून ह्या पृथ्वीवर प्राप्त झालें आहे. ह्यास्तव, मार्मिक व श्रद्धावान श्रोत्यांनीं ह्यांतील रस नित्य सेवन करून जन्ममरणाच्या फेऱ्यांतून उत्तीर्ण व्हावें.

### ग्रंथारंभ.

पूर्वी परम पवित्र अशा नैमिष† नामक क्षेत्रामध्यें, आपल्याला भगवत्स्वरूपाची प्राप्ति व्हावी म्हणून शौनकादि ऋषींनीं एक सहस्र वर्षेपर्यंत चालणारें एक सत्र आरंभिलें असतां, त्यांनीं एके दिवशीं सकाळीं नित्य नियमाप्रमाणें अग्नीला आहुति वगैरे दिल्यावर व्यासांचा शिष्य सूत तेथें आला. तेव्हां त्याचा आदरसत्कार करून शौनकादिकांनीं त्याला सुखासनावर बसविलें आणि म्हटलें:—

हे पुण्यवान सूता, इतिहास, पुराणें आणि धर्मशास्त्रें ह्या सर्वांचें त्वां पूर्ण अध्ययन केलेलें आहे; इतकेंच नव्हे, तर त्यांचें निरूपणही केलेलें आहे; तसेंच, वेदवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असे भगवान बादरायण व्यास ह्यांना आणि दुसऱ्या महाज्ञानी मुनिजनांना जें अवगत होतें, तें सर्व त्यांच्या कृपेनें तुला विदित आहे; कारण, प्रेमळ शिष्य भेटल्यावर गुरु कोणतेंही ज्ञान गुप्त ठेवीत नाहींत. हे सूता, त्या सगळ्या ज्ञानापैकीं, मनुष्यांना अत्यंत कल्याणकारक असें जें कांहीं तुझ्या मतानें निश्चित ठरलें असेल तें आम्हांस सांगण्याची कृपा कर. तुझ्याशिवाय इतरांना हा निश्चय करतां येणें शक्य नाहीं; कारण, ह्या कलियुगामध्यें लोक बहुतकरून अल्पायुषी, आळशी, बुद्धीनें मंद, भाग्यानें हीन आणि रोगानें ग्रस्त झालेले आहेत; तसेंच, शास्त्रग्रंथांतून जीं अनेक कर्में करावयाला सांगितलेलीं आहेत, त्यांतील सद्य फलदायक अशीं कर्में कोणतीं हें जाणण्याचें सामर्थ्य सर्वांनाच असतें असें नाहीं; म्हणून, हे साधो, ज्याच्या योगानें अंतरात्मा सुप्रसन्न होईल असें जें कांहीं सार असेल, तें पूर्ण विचारानें काढून आम्हांला सांग. तुझ्या वचनावर आमची पूर्ण श्रद्धा आहे. हे सूता, त्याचप्रमाणें, वसुदेव आणि देवकी यांच्या उदरीं भगवान श्रीकृष्ण कोणत्या उद्देशानें जन्मास आले हें तुला माहित आहे, आणि तें जाणण्याची आम्हांला इच्छा आहे; तर तेंही आम्हांला सांगण्याची कृपा कर. त्या श्रीकृष्णाविषयीं प्रश्न आम्ही विचारतों ह्याचें कारण असें कीं, त्याचा महिमाच फार विलक्षण आहे. त्याचा इहलोकींचा जन्म सर्व प्राण्यांच्या कल्याणाकरितां आणि अभ्युदयाकरितां आहे ह्यांत संदेह नाहीं. ह्या भयंकर संसारामध्यें पडलेल्या कोणींही दीन मनुष्यानें जर त्या भगवंताचें नांव घेतलें, तर तो ह्या संसारबंधनापासून तत्काळ मुक्त होतो. फार काय? प्रत्यक्ष भय देखील त्या भगवंताच्या नामा-

† नैमिषारण्य—ह्या अरण्यांत भगवंतानें एका निमिषांत दैत्यांचा संहार केला म्हणून ह्यास नैमिषारण्य असें म्हणतात. ह्यास नैमिशारण्य असेंही दुसरें नांव आहे. हें नांव पडण्याचें कारण असें कीं, येथें ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेल्या मनोमय चक्राची नेमि म्हणजे धांव एकदम शीर्ण म्हणजे कुंठित झाली. ह्याबद्दल अशी कथा आहे कीं, पूर्वी ऋषींनीं "तपश्चर्येस उत्तम स्थल कोणतें?" असा ब्रह्मदेवास प्रश्न केला असतां ब्रह्मदेवानें त्यांस सांगितलें कीं, "मी आतां एक मनोमय चक्र निर्माण करितों, त्याची गति जेथें कुंठित होईल, तें स्थल तपश्चर्येस योग्य असें समजावें." नंतर ब्रह्मदेवानें एक मनोमय चक्र उत्पन्न करून सोडून दिलें. तें ह्या अरण्यांत कुंठित झालें. हें स्थल नर्मदेच्या उत्तरेस व कुरुदेशाच्या पश्चिमेस आहे.

का भीत असतें ! हे सूता, भागीरथी त्रैलोक्यास पावन करणारी खरी, पण तिची पुष्कळ दिवस सेवा करावी तेव्हां ती लोकांना पावन करिते; परंतु त्या श्रीकृष्णाचें सामर्थ्य असें लोकोत्तर आहे कीं, त्याच्या पायांचा आश्रय करून शांत झालेल्या मुनींचा समागम घडतांच मनुष्य तत्काळ पावन होतो. तेव्हां ज्याचीं मंगलकारक कृत्यें महान महान साधूंच्या स्तुतीस पात्र आहेत अशा त्या भगवंताचें कलिसंबंधी पातक हरण करणारें यश ऐकण्याला कोणता मुमुक्षु जन उत्सुक होणार नाहीं बरें? सहज लीलेनें निरनिराळे अवतार धारण करणाऱ्या त्या भगवंताच्या ज्या उदार कृत्यांचें मुनिजनांनीं वर्णन केलेलें आहे, तीं कृत्यें तूं आम्हां श्रद्धालु जनांना वर्णन करून सांग. त्याचप्रमाणें, आपल्या मायेच्या योगानें स्वेच्छेनुरूप नानाप्रकारच्या लीला करणाऱ्या त्या श्रीहरीच्या कल्याणकारक अशा अवतारकथाही आम्हांला सांग. सूता, त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न प्रभूचे गुणानुवाद कितीही ऐकिले तरी त्यापासून आमची कधींही तृप्ति होत नाहीं. कारण, मर्मज्ञ व रसिक श्रोत्यांच्या मनाला, ते गुणानुवाद जों जों ऐकावे तों तों अधिकाधिकच गोड लागत जातात. ह्यास्तव, हे सूता, ज्यानें आपलें खरें स्वरूप गूढ ठेवून बाहेरून दिसण्याला मात्र मनुष्याचें रूप धारण केलें, त्या श्रीकृष्णानें बलरामासहवर्तमान अवतीर्ण होऊन मनुष्यांना कधींही करितां यावयाचीं नाहींत अशीं शौर्याचीं जीं अनेक कृत्यें केलीं तीं आम्हांला सांग. हल्लीं ह्या भूतलावर कलि प्राप्त झाला आहे असें जाणून आम्हीं सर्वजणांनीं ह्या नैमिष नामक वैष्णव क्षेत्रामध्यें एक दीर्घ सत्र करण्याला आरंभ केला आहे, ह्यामुळें श्रीहरीच्या कथा ऐकण्यास आम्हांला पुष्कळ वेळ आहे. हे सूता, हा दुस्तर कलि पुरुषाचें सत्त्व हरण करून टाकणारा असल्यामुळें त्याच्या पाशांतून पार पडणें हें काम फार कठिण आहे खरें, तथापि त्यांतून सुटून जावें अशी आमची उत्कट इच्छा आहे; ह्यास्तव, समुद्र तरून जाऊं इच्छिणाऱ्या लोकांना जसा एखादा कुशल कर्णधार मिळावा, तसा ह्या प्रसंगीं सुदैवानें तूं आम्हांला मिळालास हें फार चांगलें झालें. तर आम्हा केलेल्या ह्या प्रश्नांचीं त्वां उत्तरें द्यावीं. त्याचप्रमाणें, ब्राह्मणांचे हित करणारा आणि धर्माचा संरक्षक असा तो योगीश्वर श्रीकृष्ण निजधामाला गेला असतां, हल्लीं त्याच्या पाठीमागें धर्म हा स्वसंरक्षणासाठीं कोणाला शरण गेला आहे हेंही आम्हांला सांगण्याची कृपा व्हावी.

## अध्याय दुसरा.

### गुरुवंदन.

व्यास म्हणतातः—ह्याप्रमाणें त्या ब्राह्मणांचा मंगलकारक प्रश्न श्रवण करून रोमहर्षणाचा पुत्र उग्रश्रवा नामक सूत ह्याला फार आनंद झाला; आणि ब्राह्मणांनीं विचारलेल्या प्रश्नांबद्दल त्यानें गौरव प्रदर्शित करून त्यांचीं उत्तरें देण्यास प्रारंभ केला.

सूत म्हणतातः—व्यासांचा मुलगा श्रीशुकाचार्य हा सर्वसंगपरित्याग करून व देहादिकांचा अभिमान सोडून आश्रमांतून वनांत जाऊं लागला असतां, आतां आपला आणि आपल्या मुलाचा वियोग होणार अशी व्यासांच्या मनांत भीति उत्पन्न होऊन ते 'हे पुत्रा, हे पुत्रा,' अशा जेव्हां उच्च स्वरानें हांका मारूं लागले, तेव्हां त्या हांकांना जवळच्या झाडांनींच 'ओ' म्हणून प्रत्युत्तर दिलें! आणि त्या योगें, सर्व भूतांच्या ठिकाणीं एकच तत्त्व भरून राहिलेलें आहे, ह्यास्तव माझा विरह केव्हांही संभवत नाहीं, असें श्रीशुकाचार्यांनीं सुचविलें! अशा प्रकारें सर्व भूतांच्या अंतर्यामीं वास करणारा जो महामुनि शुकाचार्य, त्याला माझा नमस्कार असो.

संसारसागरांत पडलेल्या लोकांची करुणा

येऊन, शुकाचार्यांनीं, सर्व पुराणांमधील उत्कृष्ट असें हें भागवत पुराण सांगितलें आहे. ह्याचा महिमा मोठा अतर्क्य आहे. ह्या एका पुराणामध्यें सगळ्या वेदांचें सार आलेलें आहे. संसाररूपी गाढ अंधकारांतून बाहेर पडण्याची इच्छा करणाऱ्या जनांना भागवत पुराण हें स्वच्छ वाट दाखविणारा एक प्रत्यक्ष दीपच होय. ह्याच्या साहाय्यानें मुमुक्षु पुरुषांस अध्यात्मविद्या अनायासें प्राप्त होईल. त्या मुनिश्रेष्ठ व्यासपुत्र शुकाचार्यांना मी शरण जातों.

सकल पुरुषांमध्यें श्रेष्ठ असे बदरिकाश्रमवासी भगवान नरनारायण, वाग्देवता सरस्वती आणि व्यास यांना नमस्कार करून आतां मी ह्या भागवत नामक ग्रंथाचें व्याख्यान करण्याला प्रारंभ करितों

हे ऋषिजनहो, श्रीकृष्णाविषयींचे प्रश्न तुम्हीं मला विचारिले, हें फार चांगलें केलें; कारण, ह्यांपासून लोकांचें चित्त शुद्ध होऊन त्यांचें कल्याणच होणार आहे.

### श्रेष्ठ धर्म कोणता ?

ब्राह्मणहो, ज्याच्या योगानें अंतरात्मा सुप्रसन्न करणारी, निष्काम व अढळ अशी भक्ति श्रीकृष्णाच्या ठिकाणीं उत्पन्न होईल, तोच श्रेष्ठ धर्म होय. भगवान वासुदेवाच्या ठिकाणीं भक्ति ठेविली असतां तिच्यापासून लवकरच वैराग्य आणि परमेश्वरविषयक अहेतुक ज्ञान उत्पन्न होतें. लोकांनीं धर्म म्हणून एखादी चांगली गोष्ट केली—परतु त्या धर्माचरणापासून परमेश्वराच्या कथांविषयीं जर त्यांना आसक्ति उत्पन्न झाली नाहीं, तर तो निवळ श्रम होय;—तो खरा धर्म नव्हे. अर्थशास्त्रादिक लौकिक शास्त्रांमध्यें असें सांगितलें आहे कीं, धर्मानें अर्थ साधावा, व अर्थापासून काम परिपूर्ण करून घ्यावा, म्हणजे अशा प्रकारें परिपूर्ण केलेल्या कामापासून सुख प्राप्त होईल. परंतु हें मत बरोबर नाहीं. धर्म हा मोक्षाला साधनीभूत आहे; ह्याकरितां कांचनादि द्रव्यरूप क्षुद्र अर्थ हें धर्माचें फळ नव्हे. धर्माचें फळ मोक्ष आहे. त्याचप्रमाणें, अर्थ हा धर्मासाठीं आहे, कामासाठीं नव्हे; द्रव्याचा उपयोग धर्म वाढविण्यासाठींच झाला पाहिजे; सुखोपभोग करण्यासाठीं त्याचा उपयोग करणें योग्य नाहीं.

### काम्य वस्तूंचा उपयोग व जीविताचा मुख्य हेतु

आतां, संसारांतील काम्य वस्तु तरी ज्या मिळवावयाच्या, त्या कशासाठीं ? तर त्यांच्या योगानें केवळ प्राणधारण व्हावें म्हणून;—इंद्रियांची हौस पुरी करण्याकरितां त्यांचा संग्रह करावयाचा नाहीं. प्राणांचें रक्षण करून जिवंत तरी कशाला रहावयाचें ? तर, जिवंत असल्यावांचून तत्त्वज्ञान प्राप्त करून घेणें संभवत नाहीं, एवढ्याचसाठीं जिवंत रहावयाचें. अनेक यज्ञयागादिक कर्मे करावीं हा जिवंत राहण्याचा हेतु होय असें कित्येक मानितात; परंतु तसें नव्हे. निष्काम कर्मे करून चित्तशुद्धीच्या द्वारें तत्त्वज्ञान मिळविणें हाच जीविताचा मुख्य हेतु होय.

### तत्त्वाचें लक्षण व भक्तीचें माहात्म्य.

आतां, पूर्वी केलेल्या विवेचनावरून, तत्त्व म्हणजे काय हा प्रश्न उत्पन्न होतो. ह्या जगांत परमेश्वरावांचून दुसरें कांहीं नाहीं, सर्व परमेश्वरच आहे, असे जें अद्वैतज्ञान, त्यालाच ज्ञानी लोक तत्त्व असें म्हणतात; व या अद्वैतज्ञानालाच कोणी ब्रह्म, परमात्मा व भगवान असेंही नांव देतात. श्रद्धायुक्त मुनिजनांना त्या भगवंताचें दर्शन आपल्या अंतरात्म्याच्या ठिकाणींच होऊं शकतें; पण तें त्यांना केव्हां होतें ? तर, त्यांचें अंतःकरण निष्काम कर्मांनीं शुद्ध होऊन ज्ञान आणि वैराग्य ह्यांनीं युक्त होतें, आणि वेदांतश्रवणानें दृढ झालेली भक्ति त्यांच्या अंतःकरणांत वास करूं लागते तेव्हां. म्हणून, हे ब्राह्मणश्रेष्ठहो, लोकांना त्यांच्या त्यांच्या वर्णाश्रमाप्रमाणें जो धर्म लावून दिलेला आहे, त्याच्या योगानें जर भगवान

श्रीहरीवर आपली भक्ति बसेल, तरच त्या धर्माचें आचरण आपल्या हातून यथासांग झालें असें म्हणतां येईल. ह्यास्तव प्रत्येकानें आपलीं वर्णाश्रमविहित कर्में करून सदासर्वदा एकाग्र चित्तानें त्या भगवान श्रीकृष्णाच्या कथा ऐकत राहावें, त्याच्या गुणांचें आपण स्वत: वर्णन करीत असावें, व त्याचें ध्यान आणि पूजन ह्यांत सदैव निमग्न व्हावें. भगवंताचें सदोदीत ध्यान करून त्या योगानें सुज्ञ लोकांनीं आपलीं संसारबंधनें तोडून टाकिलीं आहेत; असा ज्या भगवंताचा महिमा, त्याच्या कथांच्या ठिकाणीं कोणाला आसक्ति उत्पन्न होणार नाहीं बरें? ब्राह्मणहो, गंगादि तीर्थांचें सेवन करून निष्पाप व्हावें, सत्पुरुषांची शुश्रूषा करावी, आणि वेदादिकांवर श्रद्धा व धर्मनिष्ठा वाढवावी, म्हणजे त्या सगळ्यांच्या योगानें भगवान वासुदेवाच्या कथांविषयीं आपल्या मनामध्यें प्रीति उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. अशा रीतीनें प्रेम उत्पन्न होऊन सर्व लोक श्रीकृष्णाच्या कथा ऐकण्यामध्यें निमग्न झाले असतां, जो सज्जनांचा मित्र, आणि ज्याचें नामश्रवण आणि नामसंकीर्तन पुण्यकारक असा भगवान श्रीकृष्ण आपल्या भक्तांच्या अंत:करणामध्यें उभा राहून कामक्रोधादिक दुष्ट शत्रूंचा समूळ उच्छेद करितो. भगवंताची आपण अनन्यभावानें नित्य सेवा केल्याच्या योगानें आपल्या मनांतील पापवासना बहुतेक नष्टप्राय झाल्या म्हणजे, उत्तमश्लोक जो भगवान त्याच्या ठिकाणीं आपली भक्ति दृढ होते; अशी दृढभक्ति मनामध्यें बाणली म्हणजे तमोगुण आणि त्यापासून उत्पन्न होणारे काम, लोभ आदिकरून षड्विकार हे सर्व आपल्या मनांतून गळून पडतात; आणि मग ह्या दोषांपासून शुद्ध झालेलें आपलें मन सत्त्वगुणाला प्राप्त होऊन अत्यंत सुप्रसन्न होतें. ह्याप्रमाणें भगवद्भक्तीच्या योगानें ज्याचें मन सुप्रसन्न झालें आहे, त्याला सर्वसंगपरित्याग करावा असें वाट लागतें; व त्याप्रमाणें त्यानें केल्यानंतर त्याला आत्मतत्त्वाचें ज्ञान उत्पन्न होतें. अशा ज्ञानस्थितीला तो प्राप्त झाला म्हणजे व आत्म्याच्या ठिकाणीं त्याला ईश्वराचें दर्शन झालें म्हणजे त्याची अहंकाररूपी हृदयग्रंथि तुटून जाते; त्याचे ईश्वरविषयक सर्व संशय नष्ट होतात; आणि त्याच्या संचितादि कर्मांचा क्षय होतो. ह्यास्तव, हे ब्राह्मणहो, बुद्धिमान पुरुष मोठ्या आनंदानें भगवान वासुदेवाची अहर्निश भक्ति करितात.

### परपुरुष व त्रिगुणात्मक प्रकृति.

सत्त्व, रज आणि तम हे तीन प्रकृतीचे गुण होत. सांख्य ज्याला परपुरुष असें म्हणतात, तो परमात्मा वास्तविक पाहतां त्या गुणांपासून अगदीं अलिप्त आहे; परंतु प्रकृतीच्या ह्या तीन गुणांशीं युक्त होऊन तो ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय ह्या गोष्टी घडवून आणितो; आणि त्यामुळें त्या एकाच परमात्म्याला विष्णु, ब्रह्मदेव आणि शंकर अशीं तीन निरनिराळीं नांवें मिळालेलीं आहेत. तरी पण, ह्या तिघांपैकीं जो सत्त्वगुणमय भगवान विष्णु, त्याच्यापासूनच लोकांचें पुष्कळ कल्याण होतें. जड लांकडापेक्षां त्यांतून निघणारा व पुढें मेघरूप बनणारा धूर श्रेष्ठ होय; व त्या धुरापेक्षां, तिन्ही वेदांत सांगितलेलीं यज्ञयागादिक कार्यें ज्याच्या योगानें साध्य होतात तो अग्नि श्रेष्ठ होय; ह्याचप्रमाणें, तमोगुणापेक्षां रजोगुण व रजोगुणापेक्षां सत्त्वगुण श्रेष्ठ होय; कारण, ह्या सत्त्वगुणाच्या योगानें ब्रह्मसाक्षात्कार उत्पन्न होऊं शकतो. सत्त्व, रज आणि तम ह्यांमध्यें जसा सत्त्वगुण श्रेष्ठ, तसा विष्णु, विरिंचि आणि शंकर ह्यांमध्यें सत्त्वगुणात्मक भगवान विष्णु हाच श्रेष्ठ होय.

### अधोक्षजाचीच भक्ति श्रेष्ठ.

त्याच भगवान अधोक्षजाची पूर्वींचे मुनि भक्ति करीत असत; कारण, विशुद्धसत्त्व जे आहेत, तेच मोक्ष देण्याला समर्थ आहेत; इतर जे तमोगुणी आणि रजोगुणी, त्यांच्यामध्यें हें

सामर्थ्य नाहीं. म्हणूनच, ज्यांचीं अक्राळविक्राळ रूपें आहेत अशा रजोगुणी आणि तमोगुणी भूतपतींना सोडून निर्मत्सर स्वभावाचे मुमुक्षु जन हे शांत अशा नारायणाच्या मूर्तीवरच आपली भक्ति ठेवितात.

**इतर उपास्यें व उपासक.**

आतां, जे रजोगुणी आणि तमोगुणी लोक असतात, ते आपल्यासारख्याच राजस आणि तामस प्रकृतीच्या देवतांची भक्ति करीत असतात. ज्यांना संपत्ति पाहिजे असते ते पितरांची आराधना करितात; ऐश्वर्याची इच्छा करणारे पुरुष भूतांना वश करून घेतात; आणि संततीसाठीं उत्सुक झालेले लोक प्रजापतींचें पूजन करीत असतात;† परंतु सर्व शास्त्रांचें तात्पर्य पाहूं गेलें असतां, सत्त्वगुणमय अशा वासुदेवाचीच भक्ति करणें योग्य दिसतें.

**वासुदेवमाहात्म्य.**

सगळे वेद हे वासुदेवपरच आहेत; सगळ्या यज्ञयागादिकांचें देखील तात्पर्य पाहिलें तर वासुदेवाच्या गुणांचा उत्कर्ष स्थापित करावयाचा हेंच होय; अष्टांगयुक्त योग हा वासुदेवप्राप्तीसाठींच आहे; आणि संध्योपासनादिक क्रिया देखील वासुदेवाच्या प्रीत्यर्थच होत. तत्त्वज्ञान वासुदेवासाठीं; तपश्चर्या वासुदेवासाठीं; दानधर्म वासुदेवासाठीं; आणि परलोकींचें गमन हेंही वासुदेवासाठींच होय. ह्याच भगवान वासुदेवानें हें सर्व जग आरंभीं निर्माण केलें.

**भगवंताचें सगुण व निर्गुण स्वरूप.**

हा विश्वव्यापक भगवान स्वतः गुणातीत आहे; परंतु व्यक्त आणि अव्यक्त अशा उभय स्वरूपाच्या त्रिगुणात्मक मायेचा आश्रय करून त्यानें या सृष्टीची उत्पत्ति केली आहे; व ह्या सृष्टींतील नानाविध पदार्थ उत्पन्न करून त्यानें आपण स्वतः त्यांच्यामध्यें प्रवेश केला आहे. आतां, त्या त्रिगुणात्मक वस्तूंमध्यें परमेश्वरानें प्रवेश केल्यामुळें तोही स्वतः त्रिविध गुणांच्या उपाधींनीं युक्त झालेला आहे असें दिसतें; परंतु तो वास्तविक तसा नसून उलट स्वतः निर्गुण आहे. खरें पाहिलें असतां अग्नि हा येथून तेथून एकच; परंतु तो ज्याप्रमाणें निरनिराळ्या लांकडांत उद्भवला असतां निरनिराळ्या आकाराचा भासतो, त्याप्रमाणेंच परमात्मा हा वास्तविक एकच आहे—परंतु अनेक भूतांच्या ठिकाणीं त्यानें प्रवेश केलेला असल्यामुळें तो निरनिराळा आहे असा भास होतो. परमेश्वर स्वतः हीं सर्व भूतें उत्पन्न करून त्यांच्यामध्यें प्रवेश करितो, व स्थूल पंचमहाभूतें, सूक्ष्म पंचतन्मात्रा, दहा इंद्रियें आणि मन हे जे सत्त्व, रज आणि तम ह्यांचे परिणाम, त्यांच्या योगानें तो त्या त्या भूतांच्या ठिकाणीं वास करून त्यांच्याच गुणांचा उपभोग घेत असतो. इतर गुणांचा नाश करून सत्त्वगुणानें सर्व लोकांचें संरक्षण करावें अशी ह्याच जगदुत्पादक परमेश्वराची इच्छा असते, व म्हणूनच त्यानें तिर्यग्जातीमध्यें वराहादिकांचे, मनुष्यांमध्यें रामकृष्णादिकांचे, आणि देवांमध्यें इंद्रादिकांचे अवतार घेतलेले आहेत.

# अध्याय तिसरा.

—:०:—

## परमेश्वराचे अवतार.

सूत म्हणतातः—ऋषीहो, भगवंतानीं निरनिराळे अवतार घेतल्याचें सांगितलें; त्यांपैकीं प्रथम अवताराचें वर्णन करितों. ह्या जगताची उत्पत्ति करावी अशी प्रथमतः परमेश्वराला इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां त्यानें महापुरुषाचें रूप धारण केलें. त्याचें नांव विराटपुरुष. तें रूप महत्तत्त्व, अहंकार आणि पंचतन्मात्रा ह्यांच्यापासून उत्पन्न झालेलें असून पांच महाभूतें, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें आणि मन अशा सोळा कलांनीं युक्त आहे. सृष्टीच्या

† स्कंध २ अध्याय ३ पहा.

पूर्वी प्रलयकाळीं हें सर्व जग जलमय होतें. त्या जलसमुद्रांत योगनिद्रेमध्यें प्रवेश करून भगवंतांनीं शयन केलें असतां, ज्याच्या नाभिकमलापासून दक्षादि सर्व प्रजापतींमध्यें श्रेष्ठ असा जो ब्रह्मदेव तो उत्पन्न झाला; व ज्याच्या निरनिराळ्या अवयवांपासून निरनिराळीं चतुर्दश भुवनें † उत्पन्न झालीं, तें भगवंताचें स्वरूप विशुद्ध, तत्त्वमय आणि उत्कृष्ट असें आहे. ह्यास विराटस्वरूप असें म्हणतात. पूर्ण ज्ञानवान योगी लोक परमेराचें हें स्वरूप पाहतात. त्याला हजारों पाय, मांड्या, बाहु आणि तोंडें असल्यामुळें तें अद्भुत दिसतें. त्याला हजारों डोकीं, कान, डोळे आणि नाकें असतात, व हजारों मुकुट, वस्त्रें आणि कुंडलें यांनीं तें रूप सुशोभित झालेलें असतें. मत्स्यादिक जे अनेक अवतार झालेले आहेत, त्या सगळ्या अवतारांचें हें विराटरूपच मूळ होय; ह्यांतच सर्व अवतार अखेरीस लय पावतात. ह्या रूपाचा कधींही नाश होत नाहीं. ह्याच रूपाच्या थोडथोड्या अंशापासून देव, मनुष्यें वगैरे सर्व उत्पन्न होतात. त्याच विराट-पुरुष परमेश्वरानें सनत्कुमाराचा अवतार घेतला. त्या अवतारांत त्यानें दुसऱ्यांनीं पाळण्याला कठिण व सर्वकाळीं अबाधित अशा ब्रह्मचर्यव्रताचें पालन केलें. परमेश्वर सतःसिद्ध व पूर्ण असल्यामुळें त्याला ह्या ब्रह्मचर्यव्रताची अवश्यकता होती असें नाहीं; परंतु लोकशिक्षणासाठीं त्यानें हें व्रत पाळिलें. नंतर, एकदा पृथ्वी रसातळाला गेली असतां तिला वर उचलून ह्या जगाचें संरक्षण करण्यासाठीं भगवान नारायणानें वराहाचा दुसरा अवतार घेतला. त्याच नारायणानें देवर्षि नारदाचा तिसरा अवतार घेतला, व त्या अवतारामध्यें पंचरात्रागम नामक वैष्णव तंत्राचें प्रतिपादन केलें. ह्या पंचरात्रागम तंत्रामध्यें सांगितल्याप्रमाणें वागल्यानें आपलीं कर्में आपल्यास मोक्षाला नेण्यास साधनीभूत होतात. धर्म आणि त्याची पत्नी कला ह्यांच्या वंशामध्यें भगवंतांनीं नारायणाचा चौथा अवतार घेतला; व त्या अवतारामध्यें, पूर्ण शांति मिळण्यास साधन अशी दुर्घट तपश्चर्या केली. कपिल नामक सिद्धेश्वराचा पांचवा अवतार झाला. कालगतीनें सांख्यशास्त्राचा लोप होत चाललेला होता; त्याचें ह्या अवतारांत पुनरुज्जीवन करून, चतुर्विंशति तत्त्वात्मक सांख्यशास्त्राविषयींचा निर्णय कपिल महामुनींनीं आपल्या आसुरि नामक शिष्याला सांगितला. परमेश्वरासारखा आपल्याला पुत्र व्हावा म्हणून अत्रि ऋषींची पत्नी अनसूया हिनें वर मागितला होता, त्याप्रमाणें तिच्या उदरीं दत्तात्रेय ह्या नांवाचा पुत्र झाला; हा सहावा अवतार होय. ह्या अवतारामध्यें भगवंतांनीं अलर्क, प्रऱ्हाद इत्यादिकांना आत्मविद्येचा उपदेश केला. रुचि ह्या नांवाच्या ऋषीपासून आकूतीच्या उदरीं यज्ञ नांवाचा पुत्र झाला; हा सातवा अवतार होय. ह्यानें यज्ञयागादि कर्में निर्माण करून यमादिक सुरगणांसहवर्तमान स्वायंभुव मन्वंतरांतील प्राणिमात्राचें संरक्षण केलें. नाभि राजापासून मरुदेवीच्या उदरीं परमेश्वरानें आठवा ऋषभ अवतार घेतला. त्या अवतारामध्यें त्यानें ब्रह्मविद्येमध्यें रत झालेल्या लोकांना परमहंसाश्रमाचा मार्ग दाखविला. हा आश्रम सर्व आश्रमांहून श्रेष्ठ आहे. ऋषींनीं प्रार्थना केल्यावरून भगवंतांनीं पृथु राजाचा नववा अवतार घेतला. त्या अवतारांत त्यांनीं पृथ्वीपासून नानाप्रकारच्या औषधींचें दोहन केलें, त्यामुळें हा अवतार सर्वांमध्यें श्रेष्ठ म्हणून मानला जात आहे. चाक्षुष मन्वंतराच्या अखेरीस प्रलय झाला, त्या वेळीं परमेश्वरानें मत्स्याचें रूप धारण करून पृथ्वीरूप नौकेमध्यें

† चतुर्दश भुवनें—अतल, वितल, सुतल, तलातल, रसातल, महातल, पाताल, भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, सत्यं.

वैवस्वत मनूला बसविलें, व त्या प्रलयकाळांत त्याचें संरक्षण केलें; हा दहावा अवतार होय. पूर्वी देव आणि दैत्य हे समुद्रमंथन करीत असतां, त्यांनीं केलेली रवी जो मंदर पर्वत तो पाताळामध्यें जाऊं लागला, त्या वेळीं भगवंतांनीं कूर्मरूप धारण करून आपल्या पाठीवर तो पर्वत उचलून धरिला; हा अकरावा अवतार होय. समुद्राचें मंथन चाललें असतां भगवंतांनीं धन्वंतरीचें रूप धारण केलें आणि देवांस अमृतकलश आणून दिला; तो बारावा अवतार होय. मोहिनीचें रूप धारण करून त्या योगानें भगवंतांनीं दैत्यांच्या मनांत मोह उत्पन्न केला व देवांकडून अमृताचें प्राशन करविलें; हा तेरावा अवतार होय. बुरूड ज्याप्रमाणें लव्हाळा चिरतो, त्याप्रमाणें भगवंतांनीं नृसिंहाचें रूप घेऊन अतिबलवान अशा हिरण्यकशिपूचें हृदय आपल्या नखांनीं फाडिलें; हा चौदावा अवतार होय. पंधराव्या अवतारामध्यें भगवंतांनीं वामनरूप धारण केलें, व बलि राजाचा यज्ञ चालला होता तेथें जाऊन तीन पावलें जमीन मागून त्या मिषानें त्या दानशूर बलीपासून लोकत्रय परत हिसकावून घेतलें; आणि इंद्रास दिलें. क्षत्रिय ब्राह्मणांचा द्वेष करितात असें पाहून क्रोधाविष्ट झालेल्या भगवंतांनीं सोळाव्या परशुराम अवतारामध्यें एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली. सतराव्या अवतारामध्यें परशुरामापासून सत्यवतीच्या उदरीं व्यास ह्या नांवानें भगवान उत्पन्न झाले, व आपल्या भोंवतालचे सर्व लोक अल्पबुद्धीचे झालेले आहेत असें पाहून, त्यांना ज्ञान होण्यासाठीं त्यांनीं वेदाच्या शाखा केल्या. नंतर, वेदांचे हेतु सिद्धीस नेण्याच्या इच्छेनें अष्टादश पुराणें वगैरे निर्माण करून, अल्पमतींकरितां त्यांनीं वेदार्थ सुलभ करून ठेविला. भगवंतांनीं राजकुलांत रामचंद्राचा अवतार धारण केला, व त्या वेळीं समुद्रावर सेतु बांधणें वगैरे अनेक पराक्रमाचीं कृत्यें केलीं; हा अठरावा अवतार होय. एकोणिसाव्या आणि विसाव्या अवतारीं भगवंतांनीं यदुकुळीं जन्म घेऊन बलराम व कृष्ण अशीं नांवें धारण केलीं. ह्या अवतारांत भगवंतांनीं पृथ्वीचा भार हरण केला. पुढें कलियुग प्राप्त झालें असें पाहून, देवांचा द्वेष करून अंगांत योग्यता नसतां वेदमार्गानें चालण्याविषयीं इच्छा करणाऱ्या लोकांच्या बुद्धीमध्यें भ्रम उत्पन्न करण्यासाठीं, मगध देशामध्यें जिनपुत्र बुद्ध या नांवानें भगवान अवतार घेणार आहेत. बुद्धावतारानंतर, कलियुग संपत येण्याच्या सुमारास, जेव्हां बहुतेक राजे चोरांप्रमाणें प्रजेला लुटण्याचा धंदा करूं लागतील, त्या वेळीं यशो नामक ब्राह्मणाच्या उदरीं भगवान विष्णु कल्कि नामक अवतार धारण करणार आहेत. ज्याप्रमाणें एखाद्या प्रचंड सरोवरापासून अनेक पाट वहात असतात, त्याप्रमाणें सत्त्वगुणाचा निधि जो श्रीहरि त्याचे अवतार असंख्य आहेत. त्या सगळ्यांचें वर्णन करणें शक्य नाहीं. वसिष्ठादिकांसारखे ऋषि, स्वायंभुवादिक मनु, इंद्रादिक देव, प्रियव्रतादिक मनूंचे पुत्र, व प्रजापति हेही सर्व त्या श्रीहरीचे अंशावतारच होत. हे सर्व अवतार त्या परमात्म्याचे अंशभूत आहेत; परंतु भगवान श्रीकृष्ण हा मात्र पूर्णावतारच आहे. इंद्रशत्रु जे दैत्य, त्यांच्याकडून जेव्हां जेव्हां लोकांना पीडा होऊं लागते, तेव्हां तेव्हां भगवंताचे हे सर्व अवतार होऊन लोकांचें संरक्षण करितात. हें जें भगवंताच्या अवतारांसंबंधींचें रहस्य वर्णन केलें आहे, त्याचें जो कोणी मनुष्य लक्ष्यपूर्वक सकाळीं आणि संध्याकाळीं भक्तिपूर्वक पठण करील, तो सर्व दुःखांतून मुक्त झाल्यावांचून कधींही राहणार नाहीं.

### परमात्म्याचें स्वरूप.

परमात्मा वास्तविक पाहतां केवळ चिदात्मक आहे, व त्याला कोणतेंही रूप नाहीं. असें असतां, त्याला पृथक् पृथक् अवतारामध्यें पृथक् पृथक्

रूपें प्राप्त झाल्याबद्दल वर्णन केलें आहे. हीं रूपें, महत्तत्त्व, अहंकार, पंचतन्मात्रा इत्यादि जे प्रकृतीचे विकार त्यांच्या योगानें परमात्म्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाल्यासारखीं भासतात; हीं खरीं नव्हत. हा केवळ आरोप आहे. सर्वद्रष्टा परमात्मा रूपादिहीन असल्यामुळें कधींही दृग्गोचर होणारा नाहीं; तरी पण तो आपल्याला दृश्य होतो अशा प्रकारचा त्या द्रष्ट्यावर मंदबुद्धीचे लोक आरोप करितात. वास्तविक मेघ हे वायूच्या आवरणावर असतात; तरी पण ते आकाशांत आहेत असा आपण उगीच आरोप करितों; अथवा वास्तविक सुगंध हा पुष्पपरागांच्या योगानें येत असतो; तरी पण वायु सुगंधित आहे असा खोटा आरोप आपण वायूवर करितों; त्याचप्रमाणें, आत्म्यावर दृश्यत्वाचा केलेला आरोपही मिथ्याच होय. ऋषीहो, ह्याप्रमाणें परमात्मस्वरूपाचें वर्णन झालें. आतां

## जीवात्म्याचें स्वरूप

काय तें सांगतों. आतां वर्णन केलेल्या ईश्वरस्वरूपाहून म्हणजे परमात्मस्वरूपाहून जीवाचें स्वरूप भिन्न आहे. जीव सूक्ष्म असतो. तसेंच, अनादि कालापासून सत्त्व, रज आणि तम ह्या गुणांची आणि जीवात्म्याची संगति सुटलेली नसते. त्या गुणांनीं तो सदैव युक्तच असतो; परंतु परमेश्वराचें दर्शन किंवा नामश्रवण झालें असतां तो जीवात्मा ह्या गुणबंधनापासून मुक्त होण्यासारखा असतो. ह्याला परमेश्वराचें प्रत्यक्ष ज्ञान कधींही झालेलें नसल्यामुळें, हा जीव फिरून फिरून जन्माला येत असतो आणि मरण पावत असतो. असें जीवाचें स्वरूप आहे.

## जीवाचा संसारमोक्ष.

ह्या जीवाच्या पाठीमागें जें संसारबंधन लागलें आहे, त्यांतून मुक्त होण्याला त्याला ब्रह्मज्ञान हेंच एक साधन आहे. वस्तुतः जीवात्मा व परमात्मा हे एकच आहेत; परंतु मायेच्या योगानें ह्या जीवात्म्याच्या ठिकाणीं एक व्यक्त ( स्थूलदेह ) आणि दुसरें अव्यक्त ( लिंगदेह ) अशीं दोन रूपें उत्पन्न झालीं आहेत; परंतु तें सर्व मिथ्या आहे असा यथार्थज्ञानानें बोध होऊन त्या मिथ्याज्ञानाचा उच्छेद झाला म्हणजे जें आपल्याला ज्ञान होतें, तेंच ब्रह्मज्ञान होय. त्याच्याच योगानें जीव ह्या संसारबंधनापासून मुक्त होतो. ही भगवंतानें उत्पन्न केलेली माया ज्या वेळेला नाश पावते, व तिच्यापासून हा जीव सुटतो, तेव्हांच तो परब्रह्माच्या ठिकाणीं लीन होतो. अशा रीतीनें जीवाला संसारमोक्ष प्राप्त होत असतो. म्हणून, तो प्राप्त होण्यासाठीं मोठमोठे कवि उपनिषदादिकांतून प्रतिपादिलेल्या भगवंताच्या अवतारांच्या आणि पराक्रमाच्या कथा वर्णन करीत असतात. वास्तविक पाहतां सर्वव्यापी परमात्म्याला जन्मही नाहीं, आणि तो कांहीं कृत्येंही करीत नाहीं; तरी पण, जीवांचा उद्धार व्हावा म्हणून कवींनीं त्याच्या जन्माचें आणि कर्माचें वर्णन केलें आहे.

## परमात्म्याची अनासक्ति.

त्या परमात्म्याच्या ठिकाणीं जें अकर्तृत्व आहे म्हणून सांगितलें आहे, तें, तो कांहीं कर्म करीत नाहीं म्हणून नव्हे;—तर त्याची फलाच्या ठिकाणीं आसक्ति असत नाहीं म्हणून होय. ज्याच्या लीला कधींही निष्फल होत नाहींत असा तो भगवान हें जग उत्पन्न करितो, त्याचें रक्षण करितो, आणि त्याचा नाशही करितो; परंतु तो त्यामध्यें कधींही आसक्त होत नाहीं. तो सर्व भूतांच्या अंतर्यामीं प्रवेश करून रहात असतो, तरी पण नेहमीं तो आपल्याच तंत्रानें वागतो. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध आणि संकल्पविकल्पादिक क्रिया हीं जीं सहा इंद्रियांचीं सहा कर्मे, त्यांचा प्रकाशक असा हा परमेश्वर या शरीरामध्यें प्रवेश करीत असतो; परंतु त्याच्यापासून उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखांनीं मात्र तो बद्ध होत नाहीं.

कारण श्रोत्र, त्वक्, चक्षु, रसना, घ्राण व मन ह्या सहा इंद्रियांचा तो परमेश्वर अधिपति ( साक्षी ) आहे.

**भगवन्माहात्म्याचा ज्ञाता कोण ?**

ज्याप्रमाणें नाट्यकलेंतील अनभिज्ञ मनुष्य एखाद्या नटानें केलेल्या अभिनयाचें मर्म जाणूं शकत नाहीं, त्याप्रमाणें, कुबुद्धीचा कोणीही मनुष्य, वेदादिकांच्या वचनांस अनुसरून नामरूपादिक सर्व प्रपंच केवळ आपल्या मनानेंच उत्पन्न करणाऱ्या परमेश्वराच्या लीला कधींही पूर्णपणें जाणूं शकत नाहीं. आतां, कुबुद्धीच्या मनुष्याला परमात्म्याच्या लीला समजणार नाहींत तर त्या कोणाला समजतील ? अशी शंका उत्पन्न झाली असतां उत्तर हेंच कीं, मायेचा त्याग करून व सदोदीत भगवंताचें सेवन करून, त्याच्या चरणकमलाच्या गंधाचा जो नेहमीं आस्वाद घेत राहील, त्यालाच त्या अपारवीर्य भगवान रथांगपाणीच्या माहात्म्याचें ज्ञान होऊं शकतें.

**भागवतवर्णन,**

सूत म्हणतात:—ऋषिजनहो, तुम्ही तशांपैकींच आहां. तुम्ही मोठे धन्य आहां; कारण, सर्व त्रैलोक्याचा पति जो वासुदेव, त्याच्या ठिकाणीं तुम्ही अशा रीतीनें एकनिष्ठपणानें श्रद्धा ठेवितां. ह्या निष्ठेचें फळ असें आहे कीं, जे कोणी अशी निष्ठा ठेवितील त्यांना पुनर्जन्माच्या भयंकर यातना मुळींच सोसाव्या लागणार नाहींत.

भागवत नामक पुराण हें भगवान व्यासांनीं रचिलेलें आहे. ह्यांत वेदाचें मुख्य सार वर्णिलें असल्यामुळें ह्याची योग्यता वेदाच्या बरोबरीची आहे. ह्यामध्यें, उत्तमश्लोक जो भगवान श्रीकृष्ण, त्याच्या चरित्राचें वर्णन केलेलें आहे. अर्थात् हें सर्व मंगलांचें आगर आहे. हें फार मोठें असून ह्याचें अध्ययन केलें असतां हें सर्वांना धन्यता देणारें आहे. हें भगवान व्यासांनीं लोकांना मोक्षप्राप्ति व्हावी म्हणून रचिलें; व सर्व ज्ञानीजनांमध्यें श्रेष्ठ असा जो आपला मुलगा शुक, त्याला तें प्रथम शिकविलें. पुढें एकदा कांहं कारणानें मोठमोठ्या ऋषींसहवर्तमान महाः परीक्षित् राजा उपवासव्रताचा अंगीकार करून गंगेच्या कांठीं बसला असतां, सर्व वेद आणि इतिहास ह्यांचें मंथन करून काढलेलें सारभूर असें हें श्रीमद्भागवत शुकाचार्यांनीं त्याला कथन केलें. महातेजस्वी विप्रर्षि शुकाचार्य परीक्षित राजास भागवत सांगत असतांना मीही तेथें बसलों होतों. त्या वेळीं शुकाचार्यांच्या कृपेनें मलाही भागवताचें ज्ञान झालें. तेव्हां आतां तें मी यथामति तुम्हांला सांगतों. भगवान श्रीकृष्ण हे निजधाम जें वैकुंठभुवन तेथें गेले. हल्लीं कलियुगाचा प्रारंभकाल आहे. धर्म, ज्ञान वगैरे गोष्टींचाही ह्या वेळीं चोहोंकडे लोप झाला असून, कलियुगाच्या प्राबल्यामुळें सर्वत्र अज्ञानांधकार पसरला आहे. अशा स्थितींत लोकांना धर्ममार्ग दाखविण्यासाठीं ह्या भागवतरूपी सूर्याचा प्रस्तुत उदय झाला आहे, हें फार चांगलें होय.

# अध्याय चौथा.

—:०:-

## शौनकांची आशंका.

ह्याप्रमाणें सूतानें भाषण केलें असतां, दीर्घ सत्राला प्रारंभ करून बसलेल्या त्या ऋषींपैकीं वयानें व ज्ञानानें वृद्ध, सर्वांमध्यें श्रेष्ठ आणि ऋग्वेदामध्यें निष्णात अशा शौनक ऋषींनीं आदरपूर्वक सूताला प्रश्न केला.

शौनक म्हणाले:—हे महाभाग्यवंता सूता, तूं सर्व वक्त्यांमध्यें श्रेष्ठ आहेस. तेव्हां जी पुण्यकारक भागवतकथा भगवान शुकाचार्यांनीं सांगितली, ती त्वां आम्हांला सांगावी. ही कथा कोणत्या युगामध्यें, कोणत्या ठिकाणीं आणि कोणत्या हेतूनें उत्पन्न झाली, व कोणती गोष्ट मनांत आणून भगवान कृष्णद्वैपायन मुनींनीं ही भागवतसंहिता रचिली, तें निवेदन

कर. सूता, तूं म्हणालास कीं, व्यासपुत्र शुकाचार्य ह्यांनीं ही कथा परीक्षित् राजाला सांगितली; पण हें संभवावें कसें ? ह्याबद्दल शंका उत्पन्न होते; कारण, तो व्यासपुत्र शुकाचार्य महायोगी होता. सर्व भूतांच्या ठिकाणीं त्याची दृष्टि सारखी होती. त्याच्या मनांतून भेदबुद्धि पूर्णपणें निघून गेलेली होती. भगवान श्रीहरीच्या ठिकाणीं त्याचें मन तन्मय झालेलें होतें. अज्ञानादिक दोषरूपी निद्रा त्याच्या डोळ्यांपासून उडून गेलेली होती. त्याचें खरें स्वरूप झांकलेलें होतें; आणि तो बाहेरून वेड्यासारखा दिसत असे. शुकाचार्यांची भेददृष्टि पूर्णपणें नाहीशी झाली होती ह्याच्याबद्दल अशी एक आख्यायिका आहे कीं, शुकाचार्य विरक्त होऊन व वस्त्रादिकांचाही त्याग करून अरण्यांत जात असतां, त्यांना समजाविण्याकरितां व्यास ऋषि त्यांच्या मागून जाऊं लागले. व्यास अर्थातच नग्न नव्हते. मार्गांत एके ठिकाणीं अप्सरा नग्न होऊन जलक्रीडा करीत होत्या. तेथून शुकाचार्य नग्नावस्थेमध्येंच गेले, परंतु त्या अप्सरा शुकाचार्यांना लाजल्या नाहींत; पण जेव्हां व्यास त्यांच्या जवळून जाऊं लागले, तेव्हां, ते जरी नग्न नव्हते, तरीही त्यांना पाहून अप्सरांनीं लाजून आपापलीं वस्त्रें परिधान केलीं. तें पाहून व्यासांनीं मोठ्या आश्चर्यानें त्या अप्सरांना त्याचें कारण विचारलें; तेव्हां त्यांनीं असें सांगितलें कीं, "हे व्यासा, तुझ्या पुत्राच्या दृष्टीला भेद मुळींच उरला नाहीं. स्त्री आणि पुरुष हा भेद त्याला नाहीं, म्हणून त्याला आम्ही लाजलों नाहीं; परंतु हा भेद तुझ्या ठिकाणीं अजून जागृत आहे, म्हणून आम्ही तुला लाजलों."

शौनक म्हणतातः—सूता, अशा प्रकारचा विरक्त जो शुक, तो कुरुजांगळ देशामध्यें येऊन हस्तिनापुर नगरामध्यें एखाद्या वेड्याप्रमाणें, मुक्याप्रमाणें किंवा मूर्खाप्रमाणें फिरत असतां, हा शुकच आहे असें तेथील पौरजनांनीं तरी कसें ओळखिलें कोण जाणे! किंवा कदाचित एक वेळ पौरजनांनाही त्याची ओळख पटली असेल; परंतु पांडवांच्या कुलांतील महान राजर्षि जो परीक्षित, त्याची आणि ह्या मुनीची गांठ पडली आणि दोघांचा संवाद झाला ह्याविषयीं तर आम्हांस फारच शंका येते! त्यांतूनही, तो संवाद असला तसला नव्हे; तर त्यामध्यें भगवान श्रीहरीविषयींच्या गोष्टींचें वर्णन आहे. तेव्हां सुखांत निमग्न असलेल्या राजाचा आणि वेड्याप्रमाणें वागणाऱ्या ऋषीचा भगवत्कथेसंबंधानें संवाद व्हावा, ही गोष्ट कशी घडून आली असेल ती असो!

ह्या उभयतांचा संवाद आणखीही एका कारणामुळ अशक्य वाटतो. तें कारण हें कीं, शुकाचार्य गृहस्थाश्रमी लोकांच्या घरीं भिक्षेच्या मिषानें त्यांचीं घरें पवित्र करण्याकरितां जात असत हें खरें; तरी पण, गाईचें दूध काढण्याला जितका वेळ लागेल तितका वेळपर्यंत मात्र ते तेथें उभे रहात;—त्यापेक्षां जास्त कालपर्यंत ते कोठेंही थांबत नसत. तेव्हां, त्यांनीं एवढें मोठें भागवत सांगितलें कसें अशी शंका उत्पन्न होते.

परीक्षिताविषयीं प्रश्न.

शौनक आणखी म्हणतातः—त्याचप्रमाणें, सूता, अभिमन्यूचा मुलगा परीक्षित् राजा हा सर्व भगवद्भक्तांमध्यें श्रेष्ठ होता असें म्हणतात. तर, ऐकणारांच्या मनांत अतिशय आश्चर्य उत्पन्न करणारी अशी त्याच्या जन्माची कथा आणि त्यानें केलेलीं कृत्यें हीं तूं आम्हांला सांग. तो पांडवांच्या कुलाचा मान वाढविणारा परीक्षित् राजा एवढा मोठा चक्रवर्ती असतांही, आपली सर्व संपत्ति टाकून देऊन गंगेच्या कांठीं कोणत्या कारणानें उपवास करीत बसला होता? आपलें कल्याण व्हावें म्हणून द्रव्याच्या राशी पुढें ओतून शत्रु देखील ज्याच्या पादपीठाजवळ नाक घांशीत, असा तो शूर परीक्षित् राजा आपली

संपत्ति आणि आपले प्राण सोडून देण्याला कसा सिद्ध झाला बरें? उत्तमश्लोक जो भगवान, त्याच्या सेवेमध्यें निमग्न असलेले पुरुष दुसऱ्याच्या कल्याणासाठीं, वैभवासाठीं आणि उत्कर्षासाठींच जिवंत राहतात. ते स्वतःसाठीं जिवंत रहात नाहींत; आणि तीच गोष्ट परीक्षिताची होती. त्याच्या आश्रयावर दुसरे किती तरी लोक अवलंबून असत. असा दुसऱ्यांच्या उपयोगीं पडणारा आपला देह सोडून देण्याला परीक्षित् राजा कोणत्या कारणामुळें उद्युक्त झाला, व त्याला इतकी विरागस्थिति कां उत्पन्न झाली, हें सगळें तूं आम्हांला सांग. वेद खेरीजकरून बाकी पुराणादिक विषयांमध्यें तूं पूर्ण निष्णात आहेस हें मला माहीत आहे; म्हणून मीं तुला हे प्रश्न विचारिले आहेत; तर त्यांचीं तूं उत्तरें सांग.

सूत म्हणतातः—कृत, त्रेता, द्वापर आणि कलि ह्या चार युगांच्या दोन चौकड्या संपून तिसऱ्या चौकडीस प्रारंभ झाल्यावर, द्वापर युगाच्या समाप्तीची वेळ जवळ आली त्या सुमारास, श्रीहरीच्या अंशानें पराशरापासून सत्यवतीच्या उदरीं व्यास या नांवाचा एक महाज्ञानी पुरुष जन्मास आला.

### कालकृत स्थितिभेद.

तो व्यास एके दिवशीं सरस्वती नदीच्या कांठीं स्नानसंध्यादि कर्म करून सूर्योदयानंतर एकांतामध्यें बसला असतां, त्या त्रिकालज्ञ ऋषीनें असें मनांत आणिलें कीं, कालाची गति स्पष्टपणें कोणाच्या नजरेस एकदम येत नसल्यामुळें, हळूहळू फेरफार होत होत, पूर्वी निरनिराळ्या युगांकरितां निरनिराळे वर्णाश्रम धर्म सांगितलेले होते त्या सगळ्यांचा संकर होऊन गेलेला आहे. पंचमहाभूतांपासून बनलेलीं जीं शरिरें, त्यांच्याही शक्तीचा त्या काळगतीमुळेंच ऱ्हास होत चाललेला आहे, व सर्व लोक श्रद्धाहीन, निःसत्त्व, अल्पायुषी आणि हतभाग्य असे झालेले आहेत. ऋषीहो, ही झालेली स्थिति आपल्या दिव्य दृष्टीनें पाहून सर्व वर्णाश्रमधर्म काय उपाय केल्यानें सुव्यवस्थित रीतीनें चालतील ह्याविषयीं—ज्याचा विचार कधींही निष्फल व्हावयाचा नाहीं असा—तो महामुनि विचार करूं लागला.

### वेदाचे भाग

नंतर, होता, अध्वर्यु, उद्गाता आणि ब्रह्मा असे चार प्रकारचे ऋत्विज ज्यांमध्यें लागतात अशा प्रकारचीं अग्निष्टोमादिक वैदिक कर्में लोकांना पावन करण्याला उत्तम साधनें होतील असें जाणून, त्या अग्निष्टोमादिक यज्ञांची परंपरा सर्वत्र वाढत जावी ह्या हेतूनें, पूर्वी अविभक्त असलेल्या वेदाचे व्यासांनीं ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद असे चार भाग केले. हे चार वेद व सर्व वेदांचा मुख्यांश ज्यांत वर्णिला आहे असे इतिहास आणि पुराणें ह्यांस व्यासांनीं पांचवा वेद म्हणून कल्पिलें. ऋग्वेदाची प्रवृत्ति पैल नामक ऋषीनें केली; सामवेदाची प्रवृत्ति जैमिनीनें केली; वैशंपायन हा यजुर्वेदाचा अत्यंत निष्णात असा प्रवर्तक झाला; सुमंतु नामक उग्र ऋषि हा अथर्ववेदाचा प्रवर्तक झाला; व इतिहास आणि पुराणें ह्यांची प्रवृत्ति माझा पिता रोमहर्षण ह्यानें केली. त्या पैल, जैमिनी, वैशंपायन व सुमंतु ऋषींनीं आपापल्या वेदांचे अनेक प्रकारांनीं पोटविभाग केले, व त्या निरनिराळ्या पोटविभागांची प्रवृत्ति त्यांचे शिष्य, उपशिष्य आणि त्या उपशिष्यांचे शिष्य ह्या सर्वांनीं केली. अशा रीतीनें त्या त्या वेदांच्या अनेक शाखा व उपशाखा कल्पिल्या गेल्या. पूर्वीचे वेद मंदबुद्धीच्या लोकांना समजण्याला व लक्षांत ठेवण्याला अवघड जाऊं लागले असें पाहून, दीन जनांवर कृपा करणाऱ्या भगवान व्यासांनीं ते मंदबुद्धीच्या लोकांनाही पठण करितां येतील अशा रीतीनें त्यांचे विभाग केले.

### महाभारत

ह्याप्रमाणें व्यासांनीं सर्वांना वेद सुलभ करून

ठेविले; परंतु स्त्रिया, क्षुद्र आणि कांहीं ब्राह्मणांपैकींच अधम लोक ह्यांना वेदाचा अधिकार नसल्यामुळें, त्यांस ह्यापासून कांहीं लाभ होणार नाहीं ही गोष्ट मनांत आणून, ह्या मूढ लोकांचें कल्याण करण्याच्या हेतूनें व्यासांनीं कृपाळु होऊन महाभारत नांवाचा ग्रंथ केला.

### व्यासांची असंतुष्ट स्थिति.

ह्याप्रमाणें सर्व प्रकारांनीं लोकांचें सदोदीत कल्याण करण्याविषयीं व्यासांची एकसारखी खटपट चालली होती, पण इतकें करूनही त्यांच्या मनाला समाधान वाटलें नाहीं. आपण लोकांच्या कल्याणासाठीं अजून पुरेसें कांहीं केलें नाहीं असें त्यांच्या मनाला वाटत असे. अशा प्रकारच्या असंतुष्ट स्थितीमध्यें त्यांचें मन असतां, एके वेळीं ते सरस्वतीच्या पवित्र तीरावर एकांतामध्यें बसले होते, तेव्हां त्यांच्या मनामध्यें असे विचार आले:—वेदांत सांगितलेलें व्रत धारण करून निष्कपट अंतःकरणानें वेद, गुरु आणि अग्नि ह्यांचा मी नेहमीं सन्मान करीत आलों, व वेदाच्या सर्व आज्ञाही मीं आजपर्यंत पाळल्या; तसेंच, महाभारत हा ग्रंथ रचून, त्याच्या द्वारानें, वेदामध्यें ज्या ज्या कांहीं गोष्टी आहेत त्या त्या सर्व मीं प्रकाशित केल्या; आणि त्या योगें स्त्रिया, शूद्र वगैरे—ज्यांना वेदाचा अधिकार नाहीं त्यांना देखील धर्माचें ज्ञान सहज रीतीनें प्राप्त होईल असें केलें; तरी पण माझ्या आत्म्याचें प्रयोजन सिद्धीस गेलें असें मला वाटत नाहीं, तें कां बरें ? अथवा, वास्तविक भागवतधर्म परमहंसजनांना व परमेश्वरालाही प्रिय असतां मीं त्याचें निरूपण केलें नाहीं, ह्या कारणामुळें तर माझ्या मनामध्यें असमाधान उत्पन्न होत नसेल ना ?

### नारदांचें आगमन.

ह्याप्रमाणें, आपल्या हातून आपलें कर्तव्य पूर्णपणें सिद्धीस गेलें नाहीं असें वाटून व्यास मुनि खिन्न होऊन बसले असतां, पूर्वीं वर्णन केलेल्या सरस्वती नदीच्या तीरावरील त्यांच्या आश्रमामध्यें नारद मुनि आले. नारद आले आहेत असें पाहतांच व्यास उठून उभे राहिले, व देव देखील ज्यांचें पूजन करितात अशा त्या नारदांचें त्यांनीं सत्कारपूर्वक यथाविधि पूजन केलें.

## अध्याय पांचवा.

—:०:—

### व्यासनारदसंवाद.

पूजन वगैरे झाल्यानंतर नारद स्वस्थपणानें आसनावर स्थित झाले, व व्यास त्यांच्या जवळ बसले. त्या वेळीं, ज्यांची कीर्ति चोहोंकडे पसरली आहे असे ते ब्रह्मवीणा धारण करणारे देवर्षि नारद किंचित् हास्य करून विप्रर्षि जे व्यास त्यांस म्हणाले:—

### कुशलप्रश्न.

हे भाग्यवंता पराशरपुत्रा व्यासा, तुझ्या शरिराला कुशल आहे ना ? त्याचप्रमाणें, जें कृत्य करण्यासाठीं तूं अवतार घेतला आहेस, तें आपल्या हातून शेवटास गेलें अशी बुद्धि उत्पन्न होऊन तिच्या योगानें तुझ्या मनाला समाधान वाटत आहे ना ? बा व्यासा, फार मोठें आणि अद्भुत असें जें कांहीं जाणण्याला योग्य होतें, त्या सर्वांचें तुला ज्ञान प्राप्त झालेलें आहे. कारण, चारही पुरुषार्थांनीं पूर्णपणें भरलेला असा महाभारतासारखा ग्रंथ तूं केला आहेस. शिवाय, जें अनाद्यनंत ब्रह्म, त्याचें तूं अध्ययन व मननही केलें आहेस. तरी पण, हे मुने, आपल्या अवताराचें साफल्य झालें नाहीं असें वाटून तूं आपल्या मनामध्यें दुःख करीत आहेस असें दिसतें. तर ह्याचें कारण काय बरें ?

### नारदांची प्रार्थना.

व्यास ह्मणतातः—अहो नारद मुने, आपण जें म्हणतां तें सर्व मीं केलें आहे खरें; तरी पण माझा अंतरात्मा संतुष्ट होत नाहीं. देवर्षे, आपण

ब्रह्मदेवाचे पुत्र आहां आणि आपलें ज्ञान अगाध आहे; म्हणून, मला जो हा असंतोष वाटत आहे त्याचें सूक्ष्म कारण काय असावें हें मला सांगा. जो या सर्व सृष्टीचा ईश, त्रिगुणांशीं ज्याचा मुळींच संपर्क नाहीं, आणि जो केवळ आपल्या मनानेंच हें विश्व उत्पन्न करून त्याचें पालन आणि नाश करितो, अशा त्या पुराणपुरुष भगवंताची आपण उपासना केलेली आहे; त्यामुळें, सर्व रहस्य जाणण्याचें आपल्याला सामर्थ्य आहे. तेव्हां माझ्या या असंतोषाचें कारण काय असावें तें आपण कृपा करून सांगा. तसेंच, सूर्याप्रमाणें आपल्या गतीला तिन्ही लोकांमध्यें कोठेंही आडकाठी नाहीं; व वायु ज्याप्रमाणें सर्व प्राण्यांच्या शरिरामध्यें संचार करीत असतो, त्याप्रमाणें, अंतःसंचार करून निरनिराळ्या लोकांच्या मनामध्यें काय चाललें आहे हेंही जाणण्याचें आपल्याला सामर्थ्य आहे. तेव्हां माझ्या ह्या असंतोषाचें खरें कारण जाणण्याची शक्ति आपल्यामध्यें आहे ह्यांत शंका नाहीं. परब्रह्मप्राप्तीसंबधानें जें जें कांहीं धर्माचरण किंवा व्रताचरण करावयाचें, तें सर्व मीं यथासांग रीतीनें केलें असतांही माझ्या मनाला समाधान वाटत नाहीं. तर माझ्यामध्यें काय न्यून आहे हें जाणून, चांगल्या प्रकारें ह्या गोष्टीचा उलगडा करून मला सांगा.

### व्यासांच्या असंतोषाचें कारण.

नारद म्हणाले:—व्यासा, तुझा आत्मा संतुष्ट होत नाहीं ह्याचें कारण असें आहे कीं, भगवंताच्या निष्कलंक यशाचें तूं यथास्थितपणें वर्णन केलें नाहींस. ज्यामध्यें भगवंताच्या यशाचें प्रतिपादन केलेलें आहे असें शास्त्र तुझ्या हातून करण्याचें राहून गेलें आहे, असें मला वाटतें. हे मुनिश्रेष्ठा, धर्म आदिकरून चार पुरुषार्थांचें जसें तूं वर्णन केलें आहेस, तसें वासुदेवाच्या माहात्म्याचें वर्णन तूं केलें नाहींस.

### श्रेष्ठ काव्य कोणतें?

बाबारे, एखादें काव्य फार सुंदर साधलेलें आहे, व त्यांतील शब्दही मनामध्यें चमत्कार उत्पन्न करणारे आहेत; परंतु त्यांत, सर्व जगाला पावन करणाऱ्या अशा श्रीहरीच्या यशाचें वर्णन कोठेंही नसेल, तर तें काकतीर्थ होय, असें सर्व लोक मानितात;—निर्मळ अशा मानस सरोवरामध्यें वास करणारे हंस पक्षी अशा ठिकाणीं मुळींच रममाण होत नाहींत. अज्ञ लोक अशा काव्यामध्यें जरी आनंद मानीत असले, तरी शुद्धब्रह्माच्या ठिकाणीं संलग्न असलेले आणि परमहंसवृत्तीनें राहणारे ज्ञाते पुरुष असल्या काव्यांवर मुळींच प्रीति करीत नाहींत; तेव्हां, चांगले शब्द जुळाविलेले असले म्हणजे सर्वप्रकारीनें तें काव्य चांगलें झालें असें मुळींच नाहीं. ज्या काव्यांतील प्रत्येक श्लोकामध्यें परमेश्वराच्या गुणांचें वर्णन केलेलें आहे, त्या काव्यांतील शब्द परस्परांशीं कितीही असंबद्ध असले तरी त्या काव्यांपासून सकल लोकांच्या पातकांचा नाश होत असतो. साधुजन असल्याच काव्यांचें श्रवण करितात; ते असलींच काव्यें गातात; आणि असल्याच काव्यांचें कीर्तन करितात.

### भगवन्नामाची अवश्यकता.

श्रीहरीच्या नामावांचून असलेलें काव्य किंवा शास्त्र हें व्यर्थ आहे ह्यांत कांहीं मोठें नवल नाहीं; कारण, कर्मावर आसक्ति न ठेवितां, व विषयादिकांच्या पापानें दूषित न होतां संपादन केलेलें जें ज्ञान असतें, त्या ज्ञानामध्येंही जर भगवंताच्या भक्तीचें मिश्रण नसेल, तर तें चांगलें शोभत नाहीं: मग निरंतर दुःखरूप असणारीं सकाम व निष्काम कर्में परमेश्वरास अर्पण न करितां केल्यास तीं कशीं सुखप्रद होतील बरें? त्या कर्म करणाऱ्या किंवा त्या ज्ञानी पुरुषाला जें फळ पाहिजे असतें, तें, त्याच्या मनांत भगवद्भक्ति नसल्यामुळें, त्याला कधींही मिळत

नाहीं; म्हणून, हे भाग्यवंता व्यासा, सकल बंधनांपासून मुक्त होण्याकरितां त्या महापराक्रमी भगवंताचें चरित्र तूं यथायोग्य रीतीनें वर्णन कर, म्हणजे तुझ्या मनाला समाधान वाटेल. तुला ही गोष्ट करण्याला अवघड आहे असें मुळींच नाहीं; कारण, तुझें ज्ञान फार मोठें आहे. तुझी कीर्ति फार निर्मळ आहे, सत्यावर तुझी आसक्ति आहे व अनेक वेदव्रतांचें तूं पालन केलें आहेस.

**व्यासांचा पूर्वीचा क्रम व त्याचा परिणाम.**

आजपर्यंत तुझी दृष्टि कांहीं निराळीच होती; व त्यामुळें, भगवन्नामाव्यतिरिक्त, वर्णाश्रमधर्म, पुरुषार्थचतुष्टय वगैरे दुसऱ्याच गोष्टींची तूं स्तुति करीत बसलास, त्यामुळें तुझ्या मनाची अशी स्थिति होऊन तुला शांतता मुळींच मिळूं शकली नाहीं. परमेश्वरानें उत्पन्न केलेल्या ह्या नामरूपादिक प्रपंचांत गोंधळून गेलेल्या तुझ्या मनाला, एखाद्या वादळांत सांपडलेल्या नौकेप्रमाणें, कोठेंही आणि कधींही शांतता मिळालेली नाहीं; म्हणून, असले ग्रंथ केल्यापासून तुला कांहीं उपयोग झाला नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्यापासून इतरांसही अपाय झालेला आहे. तो कसा म्हणशील तर ऐक: ह्या प्रवृत्तिमार्गाकडे मनुष्याचा स्वाभाविकपणेंच कल असतो; परंतु प्रवृत्तिमार्ग आणि निवृत्तिमार्ग या दोहोंची तुलना करून पाहिली असतां प्रवृत्तिमार्गच त्याज्य होय असें ठरतें; पण, व्यासा, असें असूनही, प्रवृत्तिमार्ग हाच धर्म आहे व त्याचेंच तुम्ही आचरण करा असें तूं लोकांना सांगितलेंस ही तुझ्या हातून मोठी चूक झाली. तूं प्रवृत्तिमार्गाचा पाठ घालून दिला आहेस तरी देखील जो कोणी ज्ञानी पुरुष आहे तो त्यांतूनही निवृत्तिमार्गाकडे वळून त्या अनादि, अनंत आणि सर्वव्यापी अशा परमेश्वराच्या प्राप्तीचें सुख काय आहे ह्याचा अनुभव घेईल; परंतु जो अज्ञानी असल्यामुळें देहादिकांनाच आत्मा म्हणून मानीत आहे, व रज आणि तम ह्या गुणांच्या तावडींत सांपडून जो प्रवृत्तिमार्गामध्येंच भटकत चाललेला आहे, त्याला त्या सुखाचा अनुभव कसा मिळणार? त्याला तो लाभ होण्याला भक्तीशिवाय दुसरें साधन नाहीं; म्हणून, हे व्यासा, आतां तूं त्या विश्वव्यापी परमेश्वराच्या चरित्राचें वर्णन कर; कारण,

**भगवद्भक्तीचा महिमा**

इतका कांहीं विलक्षण आहे कीं, प्रवृत्तिमार्गातील धर्माचरणापेक्षांही भगवद्भक्तीपासूनच प्राण्यांचें जास्त कल्याण होतें. प्रवृत्तिमार्गाला विहित असा जो आपला धर्म, तो सोडून देऊन कोणी पुरुष भगवान श्रीहरीच्या चरणकमलांची भक्ति करूं लागला; परंतु दुर्दैवानें ती भक्ति शेवटास न जातां तो मध्येंच पतन पावला, तरी देखील त्याचें कधींही अकल्याण न होतां फिरून तो दुसऱ्या जन्मामध्यें चांगल्या कुळांत जन्माला येतो, व तेथें त्याची भक्ति परिपूर्णतेला पोहोंचते. आतां, प्रवृत्तिमार्गातील स्वधर्माप्रमाणें चालणाऱ्या लोकांची गोष्ट घेतली, तर त्या लोकांना अशा प्रकारचा कोणताही लाभ होत नाहीं, ह्यावरून भक्तीचेंच माहात्म्य जास्त आहे हें उघड सिद्ध होतें. म्हणून, विवेकी मनुष्यानें प्रवृत्तिमार्ग सोडून देऊन ह्या निवृत्तीच्या भक्तिमार्गाकडेच वळलें पाहिजे, व भक्तीपासून उत्पन्न होणारें जें सुख तेंच प्राप्त करून घेण्यासाठीं सुजाण माणसानें खटपट केली पाहिजे.

**भक्तिसुखाचें स्वरूप.**

हें सुख असें आहे कीं, प्रवृत्तीच्या मार्गांत सांपडून स्वर्गादि लोकांमध्यें भ्रमण करणाऱ्या प्राण्यांना देखील तें कधीं प्राप्त होत नाहीं. प्रत्येकानें असलें हें सुख मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे; इतर सुख मिळविण्याचा प्रयत्न करावा लागत नाहीं; कारण, पूर्वकर्माच्या योगानें ज्याप्रमाणें आपण कांहींएक न करितांही आपल्याला दुःख प्राप्त होतें, त्याप्रमाणें सुखही आपल्याला मिळालेंच पाहिजे;—त्याच्यासाठीं खटपट नको.

ज्याची गति दुर्ज्ञेय आहे असा जो काल, तो आपण कोठेंही असलों तरी आपले पूर्वसंचितानुरूप सुखदुःख आपल्यापुढें आणून ठेवितो. आतां, जे प्रवृत्तिमार्गामध्यें असतात त्यांनीं कितीही धर्माचरण केलें तरी ते संसारबंधनापासून कधींही मुक्त होत नाहींत; परंतु मुकुंदचरणांचें सेवन करणाऱ्या मनुष्याची गोष्ट तशी नाहीं. मुकुंदाची उपासना करणारा मनुष्य संसारबंधनांनीं कधींही बांधिला जात नाहीं. भगवत्पादारविंदांतील रसाचें माधुर्य ज्याला एकदा समजलें, तो अंतःकरणामध्यें मुकुंदाच्या चरणसरोजांतील रसस्वादनाचें सुख अनुभवीत असतां, तें सुख टाकून यावें असें त्याला कधीं तरी वाटणार आहे काय?

व्यासा, अशा ह्या मुकुंदाचें यथार्थ स्वरूप समजून घेणें अवश्य आहे. तर, हें जें दृश्यमान विश्व आहे तोच भगवान मुकुंद होय, असें कोणास वाटेल; परंतु वास्तविक प्रकार तसा नाहीं. तो ह्या विश्वापासून भिन्न आहे; कारण, ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि नाश ह्या सर्व गोष्टी त्याच्यापासून उद्भवत असतात. तेव्हां अर्थात् तो ह्या विश्वापासून निराळा असलाच पाहिजे. व्यासा, ह्या सर्व गोष्टी तुला माहीत नाहींत असें नाहीं; तरी पण मी तुला त्यांचें दिग्दर्शन केलें आहे. हे महाज्ञानी व्यासा, तूं प्रत्यक्ष परमात्माच आहेस; आणि त्या दृष्टीनें तूं जरी स्वतः जन्मरहित आहेस, तरी जगाच्या कल्याणासाठीं तूं हा अवतार घेतलेला आहेस हें तूं लक्ष्यांत आण, व तो तुझा जगाचें कल्याण करण्याचा हेतु शेवटास जाण्यासाठीं तूं परमेश्वराच्या लीलांचें वर्णन कर.

आतां, भगवंताच्या लीलांचें वर्णन केल्यानें जगाचें कल्याण कसें होईल असें तूं म्हणशील, तर त्याचें उत्तर असें आहे कीं, तपश्चर्या, शास्त्रश्रवण, यज्ञयाग, ज्ञान, दान ह्या सगळ्यांचीं जीं इतर कांहीं फळें असतील, तीं सर्व विनाशी आहेत असें समजावें. उत्तमश्लोक जो भगवान, त्याच्या गुणांचें वर्णन करणें हेंच काय तें त्या सर्व तपश्चर्यादिकांचें अविनाशी फल होय असें सुज्ञांचें मत आहे. तेव्हां जगाचें कल्याण तपश्चर्येनें वगैरे होणारें नसून एका भगवद्भक्तीनेंच होणारें आहे, म्हणून त्या भगवंताच्या गुणांचें तूं वर्णन कर. हे महामुने, भगवद्भक्तीचें सामर्थ्य तुझ्या मनांत बिंबण्याकरितां मी आपलें पूर्वजन्मचरित्र सांगतों तें सावधानपणें ऐक.

### नारदांचें पूर्वजन्मचरित्र.

मी पूर्वजन्मीं एका दासीचा मुलगा होतों, व ती दासी कोणी वेदवित् साधूंच्या पदरीं होती. ते साधु इतर ऋतूंमध्यें बाहेर दूरदेशीं प्रवास करीत असत, व वर्षाकाल आला म्हणजे सगळे एकत्र रहात असत. मी बाल्यावस्थेमध्यें असतांनाच माझ्या आईनें मला त्यांच्या सेवेस अर्पण केलें. त्या वेळीं मी लहान बालक होतों तरी, लहान मुलांच्या अंगामध्यें जो चंचलपणा असतो तो माझ्या ठिकाणीं मुळींच नव्हता. प्राझी प्रकृति शांत होती. खेळण्याच्या वस्तूंकडे माझें लक्ष नसे, मी फार अल्प भाषण करीत असें, आणि गुरुजनांची सेवा करून नेहमीं त्यांच्या मर्जीप्रमाणें वागत असें. अशी माझी वृत्ति पाहून, ते साधुजन समदृष्टि होते तरी माझ्यावर विशेष ममता करूंलागले. त्या भगवद्भक्तांनीं आपलें उच्छिष्ट खाण्याविषयीं मला अनुज्ञा दिली म्हणजे तें एक वेळ खाऊन मी रहात असें. त्याच्या योगानें माझें सर्व पाप नाश पावलें, व अशा रीतीनें माझी वृत्ति चालू राहिल्यामुळें माझें अंतःकरणही अत्यंत शुद्ध झालें. त्या परमहंस साधुजनांचा भगवत्कथा श्रवण करण्याचा वगैरे जो धर्म, त्या धर्माचीच मला गोडी लागली. अशा रीतीनें त्यांच्यापाशीं मी रहात असतां, ते प्रत्येक दिवशीं श्रीकृष्णाच्या मनोहर कथांचें कीर्तन करीत असत, तें त्यांच्या कृपेनें मला ऐकावयाला सांपडे. तें मी प्रत्येक वेळीं मोठ्या श्रद्धेनें ऐकत असें. व्यासा, असें करितां

करितां, त्या परममंगलकीर्ति श्रीकृष्णाच्या ठिकाणीं माझी भक्ति जडून गेली. नंतर माझें मन तेथें स्थिर झालें, व माझे हातून भगवंताची अखंड उपासना होऊं लागली. त्या उपासनेमुळें मला आत्मज्ञान होऊन असें वाटूं लागलें कीं, मी वास्तविक परब्रह्मस्वरूपच आहें, दुसरा कोणी नाहीं; जो हा व्यक्ताव्यक्त प्रपंच माझ्याभोंवतीं दिसत आहे, तो केवळ मायेमुळें उत्पन्न झालेला आहे; वास्तविक तो सर्व मिथ्या आहे आणि मी ब्रह्मस्वरूप आहें. असो. ह्याप्रमाणें वर्षा आणि शरद् ह्या दोन ऋतूंतील चार महिनेपर्यंत ते महात्मे मुनि श्रीहरीच्या यशाचें संकीर्तन करीत असतां, मी तें प्रत्येक दिवशीं ऐकत असें. त्या योगानें माझ्या मनामध्यें भगवद्भक्ति उत्पन्न झाली; व तिच्यामुळें माझ्या अंतःकरणांतील रजोगुण आणि तमोगुण हे सर्व लयाला गेले. अशा रीतीनें भगवच्चरणीं माझी प्रीति जडली, मी नम्र झालों, व माझें पाप नाहींसें झालें. मी लहान वयाचा होतों तरी माझें अंतःकरण श्रद्धायुक्त होतें, व माझी चित्तवृत्ति शांत होती. ह्यामुळें मी सदोदित साधुजनांच्या सेवेंत तत्पर असें; असो. दीनांवर दया करणाऱ्या त्या साधूंनीं, चातुर्मास्यानंतर बाहेर दूर देशीं जातेवेळीं, साक्षात् भगवंतांनीं सांगितलेल्या आणि अतिशय गुह्य असलेल्या अशा ज्ञानाचा मला उपदेश केला. त्या उपदेशाच्या योगानें, सर्व सृष्टीचा कर्ता भगवान वासुदेव ह्याच्या मायेचें सामर्थ्य मला कळून आलें. जे कोणी ब्रह्मपदाला जाऊन पोहोंचतात, ते ह्या मायेचें सामर्थ्य जाणतात म्हणूनच, ही गोष्ट माझ्या हृदयांत ठसली. व्यासा, तापत्रयानें भरलेला जो हा संसार, त्याचा नाश करण्याला हें ज्ञानच उत्तम औषध होय. आतां, आपण जें कर्म करितों तें जर ब्रह्मस्वरूपी भगवान नारायणाच्या ठिकाणीं अर्पण केलें, तर त्यापासून तापत्रय चुकविणारें हें ज्ञान उत्पन्न होतें. आतां, कर्मे म्हटलीं म्हणजे तीं मनुष्याला ह्या संसारामध्यें जास्त जखडून टाकणारीं असावयाचीं, तेव्हां त्यांच्यापासून ह्या संसारांतील तापत्रयाचा नाश कसा व्हावा अशी कदाचित् तुला शंका येईल; परंतु ह्यावर असा दृष्टांत आहे कीं, एखादा पदार्थ खाल्ल्याच्या योगानें मनुष्याच्या शरीरामध्यें रोग उत्पन्न होतो; परंतु तोच पदार्थ कमी जास्त प्रमाणानें आणि दुसऱ्या कांहीं अनुपानाशीं मिसळून दिला असतां त्याच्याचपासून त्या रोगाचा नाश होतो. त्याचप्रमाणें, मनुष्यांचीं सर्व कर्में त्यांना संसारामध्यें बद्ध करण्याला कारणीभूत होतात हें खरें; तरी पण तीं कर्में जर आपण परब्रह्माच्या ठिकाणीं निष्काम बुद्धीनें अर्पण केलीं, तर अनेक जन्मांतील संचित जें दुष्कर्म त्याचा नाश करण्याला तींच कर्मे समर्थ होतात. तात्पर्य, नुसतें कर्म मनुष्याला संसारांत घालतें; परंतु ब्रह्मार्पण केलेलें कर्म मनुष्याच्या मनामध्यें प्रथम भक्ति आणि नंतर ज्ञान उत्पन्न करून त्याला संसारबंधनापासून मुक्त करितें. आतां, असें ज्ञान उत्पन्न झाल्यानंतर भगवंताच्या आज्ञेप्रमाणें जरी कोणी कांहीं कर्में करूं लागले, तरी ते श्रीकृष्णाचे गुण आणि नामें ह्यांचें वारंवार स्मरण आणि वर्णन करीत असतात.

नमो भगवते तुभ्यं । वासुदेवाय धीमहि ॥
प्रद्युम्नायानिरुद्धाय । नमः संकर्षणायच ॥ १ ॥

'तुला भगवंताला नमस्कार असो, आम्ही वासुदेवाचें ध्यान करितों, प्रद्युम्न, अनिरुद्ध आणि संकर्षण ह्यांना आमचा नमस्कार असो;' अशा प्रकारचे नाममंत्र म्हणून भगवन्नामाचें संकीर्तन करीत करीत जो कोणी नारायणस्वरूपी यज्ञपुरुषाचें आराधन करितो, तो मनुष्य उत्तम ज्ञानी होतो. व्यासा, भगवंताचीं नामें व रूपें हीं केवळ उपासनेकरितां मंत्रांमध्यें वर्णिलेलीं असतात; वास्तविक त्याला कांहींएक नाहीं. मी पूर्वोक्त

नियमाप्रमाणें वागत असलेला पाहून भगवंतानें ज्ञान, ऐश्वर्य व भक्ति ह्या गोष्टी मला अनुकूल करून दिल्या. हे बहुश्रुत व्यासा, विद्वान लोकांनीं कितीही ज्ञान संपादन केलें, तरी त्यांना आणखी कांहीं तरी जाणण्याची इच्छा असतेच. ती इच्छा अवांतर साधनांनीं कधींही तृप्त होण्यासारखी नसते. केवळ परमेश्वराच्या गुणवर्णनानेंच ती पूर्णतेला पोहोंचते. ह्यास्तव भगवंताच्या लीलांचें तूं वर्णन कर, म्हणजे तुझ्या चित्ताला समाधान वाटेल. वारंवार अनेक प्रकारच्या संकटांनीं पीडिलेल्या लोकांना त्या संकटांपासून आपली सुटका करून घेण्याला भगवद्‌गुणवर्णन आणि भगवन्नामसंकीर्तन ह्यांवांचून अन्य मार्गच नाहीं, हें पूर्णपणें ध्यानांत धर.

# अध्याय सहावा.

—:०:०—

## व्यास व नारद ह्यांचा आणखी संवाद.

सूत म्हणतातः—ह्याप्रमाणें देवर्षि नारदांच्या जन्माविषयींची आणि कर्माविषयींची हकीगत ऐकून सत्यवतीचे पुत्र भगवान व्यास ह्यांनीं नारद मुनींना फिरून प्रश्न विचारले.

व्यास म्हणालेः—हे ब्रह्मपुत्रा, ज्यांनीं तुम्हांला ज्ञानाचा उपदेश केला, ते भिक्षु पुढें बाहेर दूर देशीं निघून गेले असें आपण सांगितलें; परंतु त्या वेळीं तर आपण अगदीं बाल्यावस्थेंत होतां. तेव्हां त्यांनीं सोडून दिल्यावर पुढें आपण काय केलें बरें? हे देवर्षे, आपलें बाकीचें वय आपण कोणत्या रीतीनें घालविलें, व आपला मरणकाल प्राप्त झाला असतां आपण कोणत्या प्रकारें वर्तन केलें, हें मला सांगा. तसेंच, काल हा सर्व गोष्टींचा विध्वंस करणारा असतां, पूर्वीच्या युगांतील जन्माची स्मृति आपल्याला आहे हेंही एक आश्चर्यच होय. तर या सर्व गोष्टींचा खुलासा आपण करावा.

### नारदांचें पूर्वजन्मचरित्र.

( पुढें चालू. )

नारद म्हणालेः—मला ज्ञानाचा उपदेश करणारे ते भिक्षु देशांतराला निघून गेले, त्या वेळीं माझी आई इतर संसारी लोकांप्रमाणें संसारामध्यें पूर्ण आसक्त होती. तिला मी एकुलता एकच मुलगा होतों, व मलाही तिच्याशिवाय दुसऱ्या कोणाचा आधार नव्हता. त्यामुळें ती माझ्यावर अतिशयच प्रेम करीत असे. ती माझें योगक्षेम चालविण्याची इच्छा करी, परंतु त्या दीन अबलेची इच्छा परमेश्वराच्या अवकृपेमुळें जागच्या जागीं राही. कारण, मनुष्य हें केवळ कळसूत्री बाहुलें होय. त्यास परमेश्वर जसें ठेवील तसें राहणें भाग आहे. असो. व्यासा, मी तर त्या वेळीं पांच वर्षांचा लहान मुलगा होतों. दिशा, देश, काल इत्यादिकांचें मला कांहींच ज्ञान नव्हतें. अशा स्थितींत, माझी आई ज्या ब्राह्मणाच्या घरीं रहात होती, त्याच्याच घरीं मीही राहिलों. एके वेळीं रात्रीं, ती घराच्या बाहेर गाईचें दूध काढण्याकरितां गेली असतां, एका सापाला तिच्या पायाचा ढका लागला. तेव्हां आयुष्य भरल्यामुळें, व मृत्यूनेंच त्या सर्पाला तेथें पाठविल्यामुळें, त्याच्या दंशानें माझी आई मरण पावली. मुने, मोहपाश तुटून जावे ही गोष्ट भगवद्भक्तांना इष्टच असते. माझी आई मरण पावली असें पाहून, हा माझ्यावर एक अनुग्रहच झाला असें मी मानिलें, व मी उत्तर दिशेकडे निघून गेलों.

वाटेनें मला मोठमोठे देश व शहरें लागलीं; गवळ्यांच्या वाड्या, खेडेगांवें, पट्टनें, पुष्पवाटिका, वनें, उपवनें इत्यादि अनेक माझ्या पाहण्यांत आलीं; कित्येक ठिकाणीं निरनिराळ्या रंगांच्या हरताळ वगैरे गैरिक धातूंनीं चित्रविचित्र झालेले पर्वत होते; कोठें हत्तींनीं मोडून टाकिलेले भूर्जवृक्ष दिसत होते; कोठें कोठें स्वच्छ जलानें भर-

केलीं सरोवरें आढळलीं, व कोठें कोठें देवगणांच्या स्नानाला योग्य अशा सुंदर पुष्करिणीही आढळल्या. त्यांमध्यें मधुर शब्द करणारे पक्षी बसलेले होते, व भ्रमर गुंजारव करीत इकडून तिकडे फिरत होते, त्यामुळें त्यांना फारच शोभा आलेली होती. अशा प्रकारच्या मार्गानें मी एकटाच पुष्कळ लांब जातां जातां अखेरीस मला एक मोठें घोर अरण्य लागलें. गवत, कळकीचीं बेटें, दर्भ इत्यादिकांनीं तें अरण्य अगदीं निबिड झालेलें होतें. त्यामध्यें साप, घुबडें आणि भालु हीं संचार करीत असल्यामुळें तें फारच भयंकर दिसत होतें. त्या वेळीं माझीं सर्व गात्रें थकून गेलेलीं होतीं, व मला अतिशय तहान आणि भूक लागलेली होती; म्हणून, त्या अरण्यांतील एका नदीच्या डोहामध्यें स्नानसंध्यादिक कर्मे करून मीं जलप्राशन केलें. त्याच्या योगानें माझ्या सर्व श्रमांचा परिहार झाला. नंतर त्या निर्जन अरण्यामध्यें एका पिंपळाच्या झाडाखालीं मी बसलों; व त्या परमहंस साधूंनीं सांगितल्याप्रमाणें सर्व विषयांपासून आपलें मन आवरून घेऊन, माझ्या अंतःकरणामध्यें वास करीत असलेल्या परमेश्वराचें मी ध्यान करूं लागलों.

अशा रीतीनें मी भगवंताच्या चरणकमलांचें ध्यान करूं लागलों असतां, भक्तीच्या योगानें माझें अंतःकरण अतिशय सद्गदित झालें; माझ्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले; आणि अशा स्थितीमध्यें मी असतांना हळू हळू माझ्या हृदयामध्यें भगवान श्रीहरीची मूर्ति प्रकट झाली. श्रीहरीचें दर्शन झाल्याबरोबर मला अतिशय सुख झालें, व अत्यंत प्रेमाच्या योगानें माझ्या सर्व अंगावर रोमांच उभे राहिले. मी आनंदसागरांत अगदीं बुडून गेलों, आणि मला दुसरें कांहीं दिसेनासें झालें; इतक्यांत तें मनोहर आणि सुखावह असें भगवंताचें रूप एकाएकीं माझ्या हृदयांतून अदृश्य झालें, आणि माझें मन फार खिन्न होऊन मी दुःखाच्या आवेशानें एकदम उठलों. तें स्वरूप मीं एकदा पाहिलें होतें, तरी तेवढयानें माझी तृप्ति होईना; म्हणून तें फिरून दृष्टीस पडावें ह्या इच्छेनें मी अंतःकरणाच्या ठिकाणीं मन एकाग्र करून तें स्वरूप पाहण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न केला; परंतु तें माझ्या दृष्टीस पडेना. अशा रीतीनें त्या स्वरूपाच्या दर्शनासाठीं मी त्या अरण्यामध्यें प्रयत्न करीत असतां, मनुष्यवाणीनें ज्याचें पूर्ण वर्णन कधींही करितां यावयाचें नाहीं असा तो भगवान श्रीहरि, श्रीआकाशवाणीच्या योगानें गंभीर आणि मधुर अशा शब्दांनीं माझ्या मनांतील शोकाचें शमन करून मला म्हणाला:—

"बाबारे, ह्या शूद्र जन्मामध्यें तुला माझें दर्शन होणें नाहीं; कारण, ज्यांचीं पातकें भोगाच्या योगानें क्षीण झालेलीं नसतात, त्यांना माझें एकाग्र चिंतन करितां येत नाहीं; आणि त्यामुळें अशा लोकांना माझें दर्शन होणें फार दूरापास्त आहे. तर मग एकदा तरी मला आपण दर्शन कां दिलें, असें तूं विचारशील, तर त्याचें उत्तर असें आहे कीं, एकदा जें मीं तुला दर्शन दिलें, तें, आतां फिरून मी भगवंताला कधीं पाहीन अशी तुला उत्कंठा उत्पन्न व्हावी या हेतूनें दिलें. अशी उत्कंठा माझ्या भक्ताला लागली म्हणजे, ह्या संसारांत ज्या अनेक कामना असतात, त्या सर्वांचा तो हळू हळू त्याग करतो. त्या परमहंस साधूंची तूं अल्पकालपर्यंत सेवा केल्यामुळें माझ्या ठिकाणीं तुझी भक्ति दृढ जडलेली आहे. त्यामुळें, ह्या हीन अशा शूद्र योनीचा त्याग केल्यानंतर तूं पुढल्या जन्मीं माझा परम भक्त होशील. तुझी जी ही माझ्यावर भक्ति जडलेली आहे, ती तुझ्या मनांतून कधींही नाहींशी होणार नाहीं; आणि ह्या सृष्टीचा प्रलय झाला किंवा फिरून हिची उत्पत्ति झाली, तरी माझ्या कृपेनें तुझी पूर्वजन्मादिकांची स्मृति कधींही विलयाला जाणार नाहीं."

एवढें बोलून, सर्व जगावर स्वामित्व चालवि-

णान्या परमात्म्यानें आपलें भाषण पुरें केलें. त्या भगवंताला दृष्टांतादिकांनींच जाणावयाचें असेल तर, त्याला आकाशाचा दृष्टांत लागू पडण्यासारखा आहे. कारण, तो आकाशाप्रमाणें सर्वगामी आहे; व आकाशाप्रमाणेंच दुर्ज्ञेय आहे. असो. त्या सर्वशक्तिमान भगवंताला, त्यानें माझ्यावर अशा रीतीनें कृपा केल्यावर, मीं आपलें मस्तक वांकवून प्रणाम केला; आणि मग सर्व प्रकारची लाज सोडून व लोभ, मद, मत्सर ह्यांचा त्याग करून, संतुष्ट अंतःकरणानें त्या अनंताच्या नामाचा गजर करीत आणि त्याच्या गुह्य व कल्याणकारक लीलांचें स्मरण करीत मी आपल्या मरणकालाची वाट पहात सर्व पृथ्वीभर पर्यटन करूं लागलों. व्यासा, अंतःकरण निर्मल करून कोणत्याही वस्तूवर आसक्ति न ठेवितां मी श्रीकृष्णाची भक्ति करीत असतां, एके समयीं माझ्या अंतकालाची वेळ प्राप्त झाली व मला मरण आलें. त्या निर्दोष अशा भगवंताच्या मूर्तीचें मी सदोदीत ध्यान करीत असल्याकारणानें, माझीं जीं पूर्वसंचित कर्में, तीं सर्व दग्ध होऊन गेलेलीं होतीं. त्यामुळें, मला मरण येतांक्षणींच तो माझा पंचमहाभूतांपासून बनलेला देह गळून गेला, व मी संसारयातनांपासून मुक्त झालों. अशा रीतीनें मुक्त झाल्यानंतर, कल्पांताच्या समयीं ह्या उत्पन्न केलेल्या सकल सृष्टीचा प्रलय करून क्षीरसमुद्राच्या जलामध्यें भगवंतांनीं शयन केलें असतां, आणि ब्रह्मदेव शयन करण्याचे बेतांत असतां, ब्रह्मदेवाच्या श्वासाबरोबर मीं त्याच्या पोटामध्यें प्रवेश केला. पुढें सहस्र महायुगें लोटल्यानंतर ब्रह्मदेव फिरून ही सृष्टि उत्पन्न करूं लागला, त्या वेळीं त्याच्या प्राणांपासून मरीचि आदिकरून ऋषि आणि मी जन्मास आलों.

हे ब्रह्मर्षे, तेव्हांपासून मीं आपलीं ब्रह्मचर्यादिक व्रतें अस्खलित रीतीनें पालन करीत तिन्ही लोकांमध्यें आंतबाहेर सर्वत्र पर्यटन करीत असतों. माझ्या गतीला त्या महाविष्णूच्या अनुग्रहानें कोठेंही प्रतिबंध नाहीं. स्वतःसिद्ध नादब्रह्मानें शोभणारी व भगवंतानें अर्पण केलेली अशी ही वीणा वाजवीत आणि श्रीहरीची कथा गात मी सर्वत्र भ्रमण करीत असतों. मी भगवंताच्या कथा सदोदीत गात असल्यामुळें, ज्याच्या चरणांपासून सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ अशी प्रत्यक्ष गंगा नदी वहात आहे, तो पुण्यकीर्ति भगवान मला पाहिजे तेव्हां जणूं काय मी बोलावल्याप्रमाणेंच माझ्या अंतःकरणामध्यें आविर्भूत होऊन मला प्रत्यक्ष दर्शन देतो. ह्या जगामध्यें भगवद्दर्शनाचा लाभ प्राप्त व्हावा अशा इच्छेनें झटत असतां ज्यांच्या मनाला निरंतर क्लेश होतात, असे लोक पुष्कळ आहेत; त्यांना ह्या भवसागरांतून पार तरून जाण्याला अतिशय उत्तम नौका म्हटली तर भगवंताच्या गुणांचें वर्णन करणें हीच होय: ह्याशिवाय दुसरा उपाय नाहीं. काम आणि लोभ ह्यांनीं पीडिलेल्या मनुष्यांच्या अंतरात्म्याला मुकुंदाच्या सेवेनें जशी शांति वाटते, तशी योगमार्गांत सांगितलेल्या यमनियमादि साधनांनीं कधीं वाटत नाहीं; ह्याकरितां, हा भवसिंधु पार तरून जाण्याला भगवंताची सेवा हेंच उत्तम साधन होय. हे निष्कलंक व्यासा, माझें जन्म आणि माझें चरित्र ह्यांबद्दल तूं मला प्रश्न विचारिले होतेस, व तुझ्या मनाला समाधान वाटत नाहीं तें कशानें वाटेल हेंही तूं मला विचारिलें होतेस, त्या सर्वांचीं उत्तरें मीं तुला दिलीं आहेत.

सूत म्हणतातः—ऋषीहो, ह्याप्रमाणें निवेदन केल्यानंतर भगवान नारद मुनि हे व्यासांचा निरोप घेऊन ब्रह्मवीणा वाजवीत तेथून यादृच्छिक मार्गानें निघून गेले. ऋषीहो, शार्ङ्गधर जो श्रीकृष्ण, त्याची कीर्ति मधुर वाणीनें गाणारे आणि दुःखग्रस्त झालेल्या ह्या जगाला वीणानादानें रंजविणारे ते देवर्षि नारद मुनि खरोखर फार धन्य होत!

# अध्याय सातवा.

—:०:—

## भागवतसंहितेची रचना व अध्यापन.

शौनक विचारितातः—हे सूता, नारद मुनि निघून गेल्यानंतर पुढें भगवान व्यासांनीं काय केलें तें आम्हांस सांगा.

सूत सांगतातः—ब्राह्मणहो, अत्यंत पावन अशी जी सरस्वती नदी, तिच्या पश्चिमतटाकावर व्यासांचा आश्रम होता. ह्याला 'शम्याप्रास' असें म्हणतात. तें स्थल इतकें पवित्र आहे कीं, त्या ठिकाणीं ऋषि यज्ञयागादि क्रिया करितात. त्याच्या सभोंवार बोरींच्या झाडांची फार गर्दी आहे. व्यास त्या आपल्या आश्रमामध्यें संध्यादिक कर्में आटोपून नारदांनीं सांगितलेल्या तत्त्वांचा पुष्कळ वेळपर्यंत विचार करीत असतां त्यांचा समाधि लागला. त्यामुळें, रागद्वेषादि सर्व दोषांपासून मुक्त असें तें व्यासांचें मन भक्तीच्या योगेंकरून भगवान श्रीहरीच्या ठिकाणीं उत्तम रीतीनें स्थिर झालें असतां, भगवान परमात्मा आणि त्याची माया ह्यांचें व्यासांना दर्शन झालें. ऋषीहो, वास्तविक पाहतां जीवात्मा हा परमात्माच आहे; परंतु ह्या मायेचा प्रभाव असा विलक्षण आहे कीं, तिच्या योगानें तो जीवात्मा मोहित होऊन जातो, आणि वास्तविक निर्गुण असतांही आपण सत्त्व, रज आणि तम ह्या गुणांनीं युक्त आहों असें मानूं लागतो, व त्यामुळें मायेपासून उद्भवणारे जे जन्ममरणादि अनर्थ तेही त्याला भोगावे लागतात. ब्राह्मणहो, श्रीकृष्णाच्या ठिकाणीं भक्ति ठेवल्याच्या योगानें ह्या अनर्थांचा उपशम होऊं शकतो, हें भगवान व्यासांना त्या समाधीमध्यें कळून आलें; आणि त्यांनीं अज्ञजनांच्या उद्धाराकरितां ही भागवतसंहिता रचिली. ह्या

### भागवताचा महिमा

असा आहे कीं, हें ऐकल्यापासून, परमपुरुष जो षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान श्रीकृष्ण त्याच्या ठिकाणीं दृढ भक्ति उत्पन्न होते, व त्या योगानें मनुष्यांचे शोक, मोह, भय इत्यादि विकार नाश पावतात. अशा प्रकारची भागवतसंहिता करून व तिचा अनुक्रम लावून, निवृत्तिमार्गामध्यें निमग्न झालेल्या आपल्या शुक नामक पुत्राला व्यासांनीं ती शिकविली.

शौनक विचारतातः—हे सूता, शुकाचार्य तर सर्वच गोष्टींपासून निवृत्त झालेले होते, व त्यांची सर्वच गोष्टींबद्दल उदासीन बुद्धि असून ते केवळ परब्रह्मामध्यें रत झालेले होते. असें असतां

### शुकांना श्रीमद्भागवत शिकण्याचें कारण

काय? एवढ्या मोठ्या भागवतसंहितेचा अभ्यास त्यांनीं कोणत्या हेतूनें केला? सूत सांगतातः—हे शौनका, भगवान श्रीहरीचे गुण असेच आहेत कीं, परब्रह्माच्या ठिकाणीं लीन झालेले आणि सर्वसंगपरित्याग करून मुक्त झालेले असे मोठमोठे मुनि देखील त्या त्रिविक्रमाच्या ठिकाणीं निष्काम भक्ति करीत असतात. ह्यास्तव, भगवान बादरायणाचे पुत्र शुकाचार्य ह्यांचेंही लक्ष श्रीहरीच्या गुणांनीं वेधून गेलें, व श्रीमहाविष्णूच्या भक्तांना सदोदित प्रिय असणाऱ्या अशा ह्या भागवत पुराणाचें त्यांनीं अध्ययन केलें. [हें भागवत पुराण व्यासांनीं कोणत्या युगांत, कोणत्या ठिकाणीं आणि कोणत्या हेतूनें केलें असा जो शौनकांनीं पूर्वीं (चौथ्या अध्यायांत) प्रश्न विचारिला होता, त्याचें येथपर्यंत विस्तारानें उत्तर सांगण्यांत आलें. आतां, शौनकांनीं दुसरा जो एक प्रश्न परीक्षित राजाबद्दल विचारला होता, तो सांगण्याचा उपक्रम करून] सूत म्हणतातः—ऋषीहो, राजर्षि परीक्षिताचें जन्म, त्याचीं कृत्यें आणि त्याचें निधन ह्या सर्व गोष्टी समजण्याकरितां पांडवांच्या स्वर्गारोहणादिकांचा वृत्तांत आतां मी तुम्हांला सांगतों. हा वृत्तांतही असाच आहे कीं, ह्यामध्यें श्रीकृष्णाच्या कथा सहज रीतीनें येतील.

### अश्वत्थाम्याचें निंद्य कर्म.

कौरवपांडवांचें युद्ध चाललें असतां, भीष्म, द्रोण इत्यादि योद्धे, वीरांना उचित अशा स्वर्गलोकीं गेल्यानंतर, भीमसेनानें गदेच्या प्रहारानें दुर्योधनाचीही मांडी भग्न केली. त्या वेळीं, आपला स्वामी जो दुर्योधन त्याचें आपण कांहीं तरी प्रिय करून उतराई व्हावें अशी इच्छा मनामध्यें आणून, अश्वत्थाम्यानें द्रौपदीचे मुलगे निजले असतां त्यांच्या मस्तकांचें छेदन केलें. हें त्याचें नीच कर्म पाहून दुर्योधनही हळहळला, व ह्या कर्माबद्दल अद्याप सर्व लोक अश्वत्थाम्याची हेलना करितात; असो. द्रौपदीला आपले मुलगे मारले गेले हा वृत्तांत जेव्हां कळला, तेव्हां तिला दुःख झालें तें काय सांगावें? त्या वेळीं

### द्रौपदीचें सांत्वन

करण्यासाठीं अर्जुन तिला म्हणाला:—द्रौपदी, मी आपल्या गांडीव धनुष्याला बाण लावून त्यांच्या योगानें त्या ब्राह्मणाधम अश्वत्थाम्याचें शिर छेदन करून तें येथें आणितों, व तुझ्या शोकाचें परिमार्जन करितों. दुष्टाच्या त्या शिरावर पाय देऊन तूं पुत्रांच्या मरणाबद्दल स्नान कर." ह्याप्रमाणें आपल्या प्रियेचें सांत्वन करून व अंगामध्यें कवच घालून अर्जुनानें हातामध्यें भयंकर गांडीव धनुष्य धारण केलें, आणि मारुतीला ध्वजस्तंभीं बसवून व आपला मित्र श्रीकृष्ण ह्याला सारथ्य करण्याला सांगून तो रथांत बसून द्रोणपुत्र अश्वत्थामा ह्याच्या अंगावर धावून गेला.

### अश्वत्थाम्याची त्रेधा.

अर्जुन आपल्यावर धावून येत आहे असें अश्वत्थाम्यानें दुरून पाहतांच त्याचें मन अत्यंत भयभीत होऊन गेलें. आतां कांहीं तरी करून आपले प्राण वांचविले पाहिजेत असें मनांत आणून, रथांत बसून जितक्या दूरवर जातां येण्यासारखें होतें तेथवर तो पळत गेला; परंतु अखेरीस त्याच्या रथाचे घोडे थकले, व त्याला स्वसंरक्षणाचा कांहींएक मार्ग उरला नाही. त्या वेळीं, आतां ब्रह्मास्त्र सोडलें तरच आपले प्राण वांचतील असें अश्वत्थाम्याला वाटलें. तेव्हां आचमन करून आणि एकाग्र चित्त करून त्यानें तें अस्त्र पांडवांवर फेंकलें. शौनका, तें अस्त्र त्यानें फेंकलें खरें; परंतु तें परत कसें घ्यावें हें त्याला माहीत नव्हतें; ह्यासाठीं त्यानें तें सोडायाचें नव्हतें; परंतु त्याच्या प्राणावरच संकट गुदरल्यामुळें त्याला तसें करणें भाग पडलें. त्या वेळीं त्या ब्रह्मास्त्रापासून उत्पन्न झालेलें प्रचंड तेज चोहींकडे पसरलें, तेव्हां अर्जुनानें

### श्रीकृष्णाची प्रार्थना

केली: "हे महाभागा कृष्णा, तूं भक्तांवर आलेल्या संकटांचें हरण करणारा आहेस. तसेंच, ह्या संसारांत त्रिविध तापांनीं दग्ध होणाऱ्या लोकांच्या दुःखाचा नाश करण्यालाही तूंच एक समर्थ आहेस. तूं आदिपुरुप आहेस. तूं साक्षात् ईश्वर आहेस. तूं प्रकृतीहून निराळा आहेस. आपल्या चिच्छक्तीच्या योगानें मायेचा विनाश करून तूं आपल्या निर्गुण आत्मस्वरूपामध्यें सदोदीत रत असतोस! इतर लोकांना मायेचा नाश करितां येत नाहीं. ज्यांचीं मनें मायेनें मोहित झालेलीं असतात, अशा लोकांचें कल्याण होणें दूरापास्त असतें; परंतु आपल्या सामर्थ्याच्या योगेंकरून अशाही लोकांचें कल्याण करण्याची तुझी इच्छा असते. त्याचप्रमाणें, पृथ्वीचा भार हरण करण्यासाठीं तूं हा अवतार धारण केला आहेस, व जे तुला अनन्यभावेंकरून शरण आले आहेत, त्यांना अनेकवार ध्यान करितां यावें म्हणून तूं हें कृष्णरूप धारण केलें आहेस. असो. हे भगवंता श्रीकृष्णा, हें अतिशय भयंकर तेज सर्व बाजूंनीं पसरत चाललें आहे, हें काय असावें, आणि हें कोठून उत्पन्न झालें आहे हें मला कांहींच समजत नाहीं; तेव्हां हें काय आहे तें मला सांग."

### श्रीकृष्णाची अर्जुनाला आज्ञा.

श्रीकृष्ण भगवान म्हणतात:—बा अर्जुना, द्रोणपुत्र अश्वत्थामा ह्यानें सोडलेलें हें ब्रह्मास्त्र आहे. त्यानें हें ब्रह्मास्त्र सोडलें आहे खरें, परंतु हें परत घेण्याचें सामर्थ्य त्याच्यामध्यें नाहीं; वास्तविक पहातां त्यानें हें अस्त्र टाकूं नये; परंतु त्याच्या प्राणावर प्रसंग येऊन गुदरल्यामुळें त्यानें हें टाकलें आहे. ह्या ब्रह्मास्त्राचा प्रतिकार करण्याला समर्थ असें दुसरें कोणतेंही अस्त्र नाहीं. तेव्हां, हे अस्त्रज्ञ अर्जुना, त्या ब्रह्मास्त्रापासून उत्पन्न झालेलें हें तेज तूं आपल्या ब्रह्मास्त्राच्या तेजानें लयाला ने.

### पार्थकृत अस्त्रप्रयोग व उपसंहार.

सूत म्हणतात:—ह्याप्रमाणें भगवंताचें भाषण ऐकून, शत्रूंना जिंकण्यामध्यें तत्पर अशा त्या अर्जुनानें प्रथमत: आचमन केलें, आणि नंतर श्रीकृष्णाला प्रदक्षिणा घालून अश्वत्थाम्याच्या त्या ब्रह्मास्त्रावर आपल्या ब्रह्मास्त्राची योजना केली. तेव्हां तीं दोन्ही तेजें, एकीकडून सूर्याचें तेज आणि दुसरीकडून अग्नीचें तेज यावें त्याप्रमाणें येऊन एकमेकांवर आदळून अधिकाधिकच वाढत चाललीं; आणि त्यामुळें त्या प्रसंगीं स्वर्ग, पृथ्वी आणि आकाश हीं सर्व त्या तेजांनीं अगदीं भरून गेलीं. अश्वत्थामा आणि अर्जुन या दोघांनीं टाकलेल्या ब्रह्मास्त्रांचें एकत्र झालेलें तें अतिशय मोठें तेज तिन्ही लोकांना जाळीत सुटलेलें पाहून, त्याच्या योगानें होरपळलेल्या सर्व लोकांना हा प्रलयकालचाच अग्नि पेट घेत आहे कीं काय असें वाटलें. सर्व प्राण्यांचा नाश होत आहे आणि तिन्ही लोक दग्ध होत आहेत असें पाहून, व त्या दोन्ही अस्त्रांचा उपसंहार व्हावा असें श्रीवासुदेवाच्याही मनामध्यें आहे असें जाणून, अर्जुनानें त्यांचें निग्रहण केलें; आणि मोठ्या क्रोधानें अश्वत्थाम्याला लागलीच पकडून, एखाद्या पशूप्रमाणें दोरीनें बांधिलें, व त्यास आपल्या शिबिरामध्यें नेण्याचें मनांत आणिलें; परंतु हें पाहून श्रीकृष्णाला अतिशय राग आला, आणि त्यानें

### अर्जुनास बोध

केला: "अर्जुना, केवळ निरपराधी लहान लहान बालकें रात्रीं निजलीं असतां ज्यानें त्यांचा वध केला, अशा ह्या ब्राह्मणाधमाला तूं मारलेंच पाहिजे. पार्था, तूं ह्या बालहत्या करणाऱ्या अश्वत्थाम्याला जिवंत ठेवूं नको. कारण, मद्यादिकानें मदांध झालेला, विस्मरणशील, पिशाचांनीं ग्रासलेला, निद्रिस्त, बाल, स्त्री, ज्ञानशून्य, शरणागत आणि भयानें युद्ध टाकून पळूं लागलेला इतक्या प्रकारच्या शत्रूला धर्म जाणणारे लोक मारीत नाहींत. असें असतां ह्या दुरात्म्यानें त्या बालकांचा निष्ठुरपणानें वध केला, ह्यास्तव ह्यास योग्य शासन झालेंच पाहिजे. बा अर्जुना, जो दुष्ट खल दुसऱ्यांचा प्राणघात करून आपले प्राण वांचवितो, त्याचा वध करणें म्हणजे त्याचें कल्याण करण्यासारखें आहे; कारण, त्याचा वध हें त्याच्या दोषाबद्दल त्याला शासनच होय, आणि तें शासन मिळालें म्हणजे तो त्या दोषापासून मुक्त होतो; परंतु शासनानें त्याचें पातक धुऊन न जातां तें तसेंच राहिलें, तर त्याच्या योगानें तो पुरुष अधोगतीला जातो. ह्यास्तव, अश्वत्थाम्याला वधरूपी शासन करून त्याच्या अधोगतीचा प्रतिकार करणें हें सर्वथैव इष्ट होय. शिवाय, ज्यानें त्या निरपराधी अर्भकांची हत्या केली, त्याचें डोकें घेऊन येण्याविषयीं माझ्या समक्ष तूं द्रौपदीपाशीं प्रतिज्ञाही केली आहेस. आणखी, हा आततायी† असल्यामुळें ह्याचा वध करण्याला कांहींएक प्रत्यवाय नाहीं. तसेंच, लहान मुलांचा वध करून आपल्या कुळाला काळोखी लावणाऱ्या ह्या अश्वत्थाम्यानें, आपला राजा जो

† अग्निदो गरदश्चैव शस्त्रोन्मत्तो धनापहः ।
क्षेत्रदारापहर्ताच षडेते ह्याततायिनः ॥

दुर्योधन, त्याचेंही हें कर्म करून प्रिय केलें असें नाहीं. तेव्हां अशा ह्या महापातकी अश्वत्थाम्याचा तूं अवश्य वध कर."

**अर्जुन अश्वत्थाम्यास शिबिरास नेतो.**

सूत म्हणतातः—अश्वत्थाम्याचा वध करण्याविषयीं श्रीकृष्ण अर्जुनाला सांगत होता, ह्यांत अर्जुनानें अश्वत्थाम्याला मारावें हा त्याचा हेतु होता असें नाहीं; तर अर्जुनाच्या मनामध्यें धर्मबुद्धि किती जागृत आहे ह्याची परीक्षा पाहण्याचाच केवळ श्रीकृष्णाचा हेतु होता. असो. श्रीकृष्णानें जरी मोठ्या आग्रहानें सांगितलें, व अश्वत्थाम्यानें जरी प्रत्यक्ष पुत्रांची हत्या केली होती, तरी तो गुरुबंधु असल्यामुळें त्याला मारावें अशी त्या महात्म्याला बुद्धि होईना. नंतर, अश्वत्थाम्याला घेऊन श्रीगोविंदासह तो अर्जुन शिबिरास परत आला, व आपले पुत्र मारले गेले म्हणून शोक करीत बसलेल्या द्रौपदीसमोर त्याला नेऊन, 'हा पहा मीं अश्वत्थामा बांधून आणिला आहे' असें त्यानें तिला सांगितलें. तेव्हां अश्वत्थाम्याला पशूप्रमाणें बांधलें होतें, व कृतकर्माबद्दल लज्जा वाटून अश्वत्थाम्यानें आपलें तोंड खालीं घातलें होतें. अशा प्रकारच्या दुःस्थितीमध्यें त्या गुरुपुत्राला पाहून कोमल अंतःकरणाच्या द्रौपदीस करुणा उत्पन्न झाली; आणि तिनें उठून त्यास नमस्कार केला. नंतर ती महासाध्वी द्रौपदी म्हणालीः—

**द्रौपदीचे थोर विचार.**

अहो, ह्याला सोडा; कारण, हा ब्राह्मण असल्यामुळें बंधनाला योग्य नाहीं. हा तुम्हांला वंद्य होय. हा तुमचा गुरुच आहे. रहस्यांसहवर्तमान धनुर्वेद, आणि अस्त्राक्षेप व अस्त्रोपसंहार ह्यांविषयींच्या ज्ञानासहवर्तमान ब्रह्मास्त्रादिक सर्व अस्त्रें ज्याच्या कृपेमुळें तुम्हांला प्राप्त झालीं, तो हा पुत्ररूपानें प्रत्यक्ष भगवान द्रोणाचार्यच आपल्यापुढें उभा आहे. शिवाय, तुमची गुरुपत्नी जी कृपी तीही अजून जिवंत आहे. ती पतिव्रता असल्यामुळें तिनें सहगमन करावें हें खरें, परंतु तिला अश्वत्थाम्यासारखा वीर पुत्र असल्याकारणानें सहगमन न करतां ती अजून जिवंत राहिली आहे; तेव्हां अश्वत्थाम्याच्या दुःखानें तिला अत्यंत दुःख होईल. म्हणून, हे धर्मज्ञ महाभागा, जें गुरूचें कुल तुम्हांला सदोदीत पूज्य आणि वंद्य, त्याचें तुमच्या हातून अकल्याण घडावें ही गोष्ट उचित नाहीं. पुत्रमरणाचें दुःख कसें असतें ह्याचा अनुभव मला आला आहे. तेव्हां तें दुःसह दुःख अश्वत्थाम्याच्या आईला कधींही होऊं नये अशी माझी इच्छा आहे. अरेरे! पुत्रमरणामुळें आर्त होऊन मी ज्याप्रमाणें एकसारखी रडत आहें, त्याप्रमाणें अश्वत्थाम्याच्या आईला रडण्याचा प्रसंग कधींही न येवो! ज्या अपरिपक्व विचाराच्या क्षत्रियांनीं ब्राह्मणांच्या कुलाला दुखः दिलें, त्या क्षत्रियांचीं कुलें शोकानें व्याप्त होऊन समूळ दग्ध झालेलीं आहेत!

**अश्वत्थाम्याच्या वधाविषयीं मतभेद.**

सूत म्हणतातः—धर्म, न्याय, करुणा इत्यादिकांनीं भरलेलें व निष्कपट अंतःकरणानें आणि निःपक्षपात बुद्धीनें केलेलें हें भाषण धर्मराज, नकुल, सहदेव, सात्यकि, अर्जुन आणि श्रीकृष्ण ह्यांना व इतर स्त्रीपुरुषांना फार आवडलें, व त्या सर्वांनीं द्रौपदीचें मनासून अभिनंदन केलें; परंतु भीमास मात्र तें रुचलें नाहीं. उलट त्यास फार क्रोध आला व त्या क्रोधावेशांतच तो ह्मणालाः—"आपल्या राजाचा किंवा आपला स्वतःचा कांहींएक अर्थ न साधितां ज्यानें निजलेल्या बालकांना विनाकारण मारिलें, त्या ह्या अश्वत्थाम्याचा वध करणें हेंच श्रेयस्कर आहे." ह्याप्रमाणें भीमानें उच्चारिलेले शब्द आणि पूर्वी द्रौपदीनें केलेलें भाषण हीं दोन्हीही ऐकून भगवान चतुर्भुज श्रीकृष्णानें अर्जुनाच्या तोंडाकडे पाहिलें, व किंचित् हास्य करून म्हटलेंः—अर्जुना, ब्राह्मणा-

त्याचा वध करूं नये असें मींच सांगितलें आहे; व एखादा ब्राह्मण जर आततायी असेल, तर त्याचा वध केला पाहिजे, ही सुद्धां माझीच आज्ञा आहे. अशा रीतीनें, ह्याला मार आणि मारूं नको ह्या दोन्ही गोष्टी मींच तुला सांगितल्या आहेत. ह्या माझ्या दोन्ही आज्ञांचें तूं पालन कर. त्याचप्रमाणें, आपल्या प्रियेचें सांत्वन करतेवेळीं तूं तिच्यापाशीं जी प्रतिज्ञा केली आहेस, तीही तुला खरी केली पाहिजे. सारांश, भीमसेन, पांचाली आणि मी ह्या सर्वांना प्रिय वाटण्यासारखी जी गोष्ट असेल ती तूं आतां कर.

अश्वत्थाम्यास शासन.

सूत म्हणतातः—श्रीहरीच्या ह्या भाषणांतील इद्गत काय आहे हें जाणून, अर्जुनानें आपल्या तरवारीनें अश्वत्थाम्याच्या मस्तकांतील मणि काढून घेतला; व त्याच्या डोकीचे पाट काढिले. नंतर, त्यानें ज्या दोऱ्यांनीं त्याला बांधिलें होतें त्या सोडून टाकून त्याला मोकळें केलें. अश्वत्थामा पूर्वी फार तेजस्वी होता, परंतु मणि काढून घेतल्यामुळें व शिवाय बालहत्येच्या पातकामुळें त्याचा पूर्वीची सर्व प्रभा त्या वेळीं नाश पावली; नंतर अशा स्थितीमध्यें त्याला शिबिरामधून घालवून दिलें. असो. कोणा ब्राह्मणानें कांहीं घोर अपराध केला असतां, त्या अपराधाबद्दल त्याला देहांत प्रायश्चित्ताची शिक्षा योग्य असतांही त्याचा वध करूं नये,—त्याचें वपन करावें, त्याच्यापाशीं द्रव्य असेल तें हरण करून घ्यावें, आणि त्याला हद्दपार करावें हाच त्याचा वध होय. ब्राह्मणाचा दैहिक वध कधींही करूं नये असें शास्त्रच आहे.

## अध्याय आठवा.

-:०:-

### श्रीकृष्णाचीं हस्तिनापुरांतील कृत्यें.

सूत म्हणतातः—द्रौपदीसहवर्तमान सर्व पांडव पुत्रशोकानें अतिशय दुःखित झाले होते, तरी तें दुःख बाजूला ठेवून, आपल्या

मृत बांधवादिकांचे और्ध्वदेहिक

करण्याला ते प्रवृत्त झाले. त्यांचे जे बंधुजन मरण पावले होते, ते, आपल्याला तिलांजलि कधीं मिळेल अशी वाट पहात होते. त्यांना उदक देण्याकरितां, स्त्रियांना पुढें घालून, श्रीकृष्णासहवर्तमान ते गंगेच्या तीरीं गेले. तेथें तिलोदक दिल्यानंतर व फिरून पुष्कळ वेळपर्यंत विलाप केल्यानंतर, श्रीहरीच्या चरणकमलांतील रजःकणांनीं पवित्र झालेल्या अशा त्या जलामध्यें त्या सर्वांनीं स्नानें केलीं. तेथेंच तीरावर, आपला सखा जो संजय त्याच्यासहवर्तमान कौरवाधिपति राजा धृतराष्ट्र बसला होता. त्याच्या जवळच पुत्रशोकानें दुःखित झालेली गांधारी, कुंती आणि द्रौपदी ह्याही होत्या. त्या सर्वांचे आप्तजन युद्धामध्यें मारले गेल्यामुळें त्यांना अतिशय दुःख होत होतें, परंतु श्रीकृष्णानें आणि त्याच्या बरोबर असलेल्या ऋषींनीं, ह्या जगामध्यें कालाची गति अशीच विचित्र आहे, तेथें मनुष्याचा कांहींएक उपाय चालत नाहीं, अशा प्रकारच्या गोष्टी सांगून त्या सगळ्यांचें सांत्वन केलें.

सूत पुढें सांगतातः—ऋषीहो, श्रीकृष्णांनीं हस्तिनापुरामध्यें येऊन अनेक गोष्टी केल्याः धर्मराजाचें राज्य कपटद्यूत करून कौरवांनीं हरण केलें होतें, तें श्रीकृष्णांनीं धर्मराजास परत मिळवून दिलें; दुर्योधनादिक दुरात्म्यांचें आयुष्य द्रौपदीचे केश ओढल्यामुळें आधींच क्षीण झालेलें होतें, परंतु केवळ निमित्तमात्र होऊन भगवान श्रीकृष्णांनीं त्या सगळ्यांचा संहार केला; धर्मराजाकडून तीन अश्वमेध यज्ञ यथासांग करविले; आणि इंद्राप्रमाणें धर्मराजाचें पवित्र यश दाही दिशांमध्यें प्रसृत केलें. नंतर द्वारकेला परत जाण्याविषयीं श्रीकृष्णांनीं निश्चय करून पांडवांचा निरोप घेतला, व व्यासादिक ऋषींची

पूजा केली. तेव्हां त्यांनीही उलट श्रीकृष्णाची पूजा केली, आणि नंतर सात्यकि व उद्धव ह्यांना बरोबर घेऊन श्रीकृष्ण द्वारकेला जाण्यास निघाले.

**उत्तरेची श्रीकृष्णास प्रार्थना.**

त्या वेळीं, ते रथांत पाय ठेवीताहेत तोंच, अभिमन्यूची पत्नी उत्तरा ही भयानें विव्हल होऊन आपल्याकडे धावत येत आहे असें श्रीकृष्णाला दिसून आलें. इतक्यांत उत्तरा जवळ येऊन म्हणाली: "हे श्रीकृष्णा, तूं मोठा योगी आहेस, तू देवांचाही देव आहेस, आणि ह्या जगाचा स्वामी आहेस; तेव्हां तूं माझें संरक्षण कर. ह्या जगामध्यें सर्वच मृत्युवश आहेत, तेव्हां यांत कोण कोणाला सोडवूं शकणार आहे ? ह्यास्तव मला तुझ्यावांचून दुसऱ्या कोणापासूनही अभय मिळणें शक्य नाहीं. भगवंता, हा तप्त झालेला लोहबाण माझ्या अंगावर येत आहे, त्याच्या योगानें पाहिजे तर माझा देह जळून दग्ध होवो; परंतु माझ्या गर्भाचा मात्र नाश होऊं नये, एवढेंच माझें मागणें आहे."

**उत्तरागर्भरक्षण.**

सूत म्हणतात:-ब्राह्मणहो, उत्तरेचें भाषण श्रवण करून भक्तवत्सल भगवंतांनीं विचार केला, तेव्हां त्यांना कळून आलें कीं, निष्पांडवी पृथ्वी करण्यासाठीं अश्वत्थाम्यानें हें अस्त्र टाकलें आहे. ज्याप्रमाणें उत्तरेच्या अंगावर एक बाण जात होता, त्याप्रमाणेंच पांच पांडवांवरही महादेदीप्यमान असे पांच बाण जात होते. ते बाण आपल्यावर येत आहेत असें पाहून, त्यांचा नाश करण्याकरितां पांचही पांडवांनीं आपापल्या हातांमध्यें अस्त्र घेतलीं. ऋषीहो, अनन्यभावानें आपल्यावरच भक्ति ठेवणाऱ्या त्या पांडवांवर आलेलें हें संकट पाहून, आपलें उत्कृष्ट अस्त्र जें सुदर्शन त्याच्या योगानें श्रीकृष्णानें आपल्या परमभक्त पांडवांचें संरक्षण केलें. ह्याप्रमाणें पांडवांचें संरक्षण केल्यानंतर, उत्तरेच्या गर्भामध्यें जो पांडववंशाचा तंतु होता त्याचें संरक्षण करण्याकरितां आपल्या मायेच्या योगानें तिच्या गर्भामध्यें शिरून भगवंतांनीं त्या गर्भाचें आच्छादन केलें. सर्व प्राण्यांच्या अंतःकरणामध्यें राहणारा प्रत्यक्ष भगवान योगेश्वरच तो ! त्याला हें करणें काय अशक्य होतें ! तसेंच, अश्वत्थाम्यानें जें ब्रह्मशिर नांवाचें अस्त्र फेंकलें होतें, तेंही आपलें कार्य केल्यावांचून कधींही माघारें फिरणारें नव्हतें, व त्याच्यावर कांहीं उपायही चालण्यासारखा नव्हता; तरी पण विष्णूच्या तेजाची आणि त्याची गांठ पडल्याबरोबर त्या ब्रह्मास्त्रतेजाचें कांहींएक चालेनासें होऊन तें शांत झालें ! ब्राह्मणहो, हें असें कसें झालें ह्याबद्दल कोणालाही आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं; कारण, जो आपल्या मायेच्या योगेंकरून हें जग उत्पन्न करितो, सुरक्षित ठेवितो आणि लयाला नेतो, त्या भगवान अच्युताच्या सर्वच कृति आश्चर्यमय आहेत, मग ह्याच गोष्टीचें मोठेसें नवल तें काय ? असो. मग फिरून श्रीकृष्ण द्वारकेला जाण्याकरितां निघाले. त्या वेळीं पांडव आणि द्रौपदी ह्यांसहवर्तमान कुंतीनें भगवान श्रीकृष्णाची स्तुति केली.

**कुंतीकृत श्रीकृष्णस्तुति.**

कुंती म्हणाली:—हे भगवंता, मी तुला नमस्कार करितें. तूं आदिपुरुष आहेस; तूं साक्षात् परमेश्वर आहेस; तूं प्रकृतीहून पर आहेस; तूं सर्व भूतांच्या ठिकाणीं अंतर्बाह्य भरलेला आहेस; तरी पण तूं सर्वांना अलक्ष्यच आहेस. हे अधोक्षजा, मी मर्त्य आणि अज्ञ आहें, व तुझें खरें स्वरूप मायेच्या पडद्यानें आच्छादिलेलें असल्यामुळें मला तें ओळखतां येत नाहीं. तें मलाच समजत नाहीं असें नव्हे; तर निष्पाप अंतःकरणाचे जे मोठमोठे परमहंस मुनि आहेत, त्यांना देखील तें कळत नाहीं. तर मग तें आम्हां स्त्रियांना कसें कळेल, व आमची तुझ्या ठिकाणीं दृढ भक्ति कशी जडेल !

सूत म्हणतात:—आतां, जर स्त्रियांच्या हातून

ह्याप्रमाणें भगवंताची भक्ति होणार नाहीं, तर अर्थात् त्यांना भगवंताचें ज्ञानही होऊं शकणार नाहीं; व तें ज्ञान नसलें म्हणजे मोक्षही नाहींच; अशा रीतीनें, स्त्रियांना मोक्ष नाहीं असें ठरेल; परंतु वास्तविक तसें नाहीं. स्त्रियांनींही भगवंताची भक्ति केली असतां त्यापासून त्यांना भगवत्साक्षात्कार होतो, व त्या योगानें त्यांना मोक्ष प्राप्त होतो, ही गोष्ट सूचित करण्यासाठीं कुंती श्रीकृष्णाची स्तुति करिते.

कुंती म्हणते:—हे कृष्णा, वासुदेवा, देवकीनंदना, नंदकुमारा, गोविंदा, तुला माझा नमस्कार असो. ज्याच्या नाभीमधून कमल उत्पन्न झालें आहे, ज्याच्या गळ्यामध्यें कमलांच्या माळा आहेत, ज्याचे नेत्र कमलांप्रमाणें सुंदर आहेत, आणि ज्याचे चरण कमलांप्रमाणें कोमल आहेत, असा जो तूं त्या तुज भगवंताला माझा नमस्कार असो.

हे हृषीकेशा, त्या दुष्ट कंसानें पुष्कळ दिवसपर्यंत कोंडून ठेवलेल्या, आणि म्हणूनच अतिशय दुःखामध्यें दिवस काढीत असलेल्या देवकीला तूं संकटांतून सोडविलेंस; त्याचप्रमाणें, पुत्रांसहवर्तमान मलाही तूं वारंवार अनेक संकटांपासून मुक्त केलेंस. तीं संकटें एक का दोन सांगावीं ? भीमाला कौरवांनीं कालकूट विष दिलें होतें; लाक्षागृहामध्यें आम्हांला जाळून मारण्याचा त्यांचा विचार होता; हिडिंब, बक, किर्मीर इत्यादि राक्षस आम्हांला खावयाला आले होते; राजसभेमध्यें दुर्योधनादि दुष्टांनीं द्रौपदीचीं वस्त्रें हरण करून तिची अब्रू घेण्याचा प्रसंग आणिला होता; अरण्यवासांत राहण्याचें संकट आमच्यावर गुदरलें होतें; हें भयंकर युद्ध चाललें असतां, त्यांत कोणाही महारथी योद्धयाच्या अस्त्रानें प्राण जाण्याची पांडवांना भीति होती; आणि अश्वत्थाम्यानें जें हें अखेरीस ब्रह्मास्त्र सोडिलें होतें, त्यापासून तर सर्वांचाच उच्छेद झाला होता; परंतु, श्रीकृष्णा, ह्या सगळ्या संकटांतून तूं आमचें संरक्षण केलेंस; तेव्हां, हे जगत्पते, आमची हीच इच्छा आहे कीं, आमच्यावर वारंवार आणि ठिकठिकाणीं संकटेंच यावीं; कां कीं, त्यांतून आम्हांला सोडविण्याकरितां तूं येऊन त्या योगानें आम्हांला तुझें दर्शन घडतें; आणि तुझ्या दर्शनाचा महिमा असाच आहे कीं, तें झाल असतां पुनर्जन्माचें दर्शन फिरून कधींही होत नाहीं. उत्तम कुळांत जन्म, पुष्कळ ऐश्वर्य, चांगली विद्या आणि विपुल संपत्ति हीं जर मनुष्याला प्राप्त झालीं, तर त्यांच्या योगानें त्याचा अभिमान मात्र वृद्धिंगत होतो; आणि त्या अभिमानामुळें तो तुझें नामस्मरण करण्याला प्रवृत्त होत नाहीं; परंतु जे निर्धन असून संकटांत सापडलेले असतात, त्यांना मात्र तुझें स्मरण होतें; म्हणून आमच्यावर संकटेंच यावीं अशी माझी इच्छा आहे. अकिंचन लोकच ज्याला जाणतात, ज्याच्यापासून सत्त्व, रज आणि तम ह्या तीन गुणांचे परिणाम परावर्तन पावलेले आहेत, जो आपल्या ठिकाणींच रममाण होतो, जो शांत आहे, आणि जो मोक्ष देण्याला समर्थ आहे अशा तुज भगवंताला माझा नमस्कार असो. जरी तुला स्वतःला आदि नाहीं आणि अंतही नाहीं, तरी तूं ह्या जगाचा संहार करणारा प्रत्यक्ष काळच आहेस असें मला वाटतें. ह्या भूमंडलावरील प्राण्यांमध्यें आपसांत जरी कलह चालले असले, तरी तूं सर्वांच्या ठिकाणीं सारख्याच रीतीनें वागत असतोस. तुझ्याबद्दल लोकांच्या मनामध्यें मात्र निरनिराळ्या कल्पना असतात. तूं सर्वांच्या ठिकाणीं सारखा असतांही त्यांना वाटतें कीं अमुकावर तुझी प्रीति आहे आणि अमुकावर तुझा क्रोध आहे; परंतु वास्तविक पाहतां तुला कोणी प्रियही नाहीं आणि द्वेष्यही नाहीं. असें असतां, हे अवतार घेऊन तूं मनुष्यकृतीचें अनुकरण करूं इच्छितोस, ह्यांत

तुझा काय हेतु असतो हें कोणालाही समजत नाहीं. हे विश्वात्मन, वास्तविक तूं जन्मरहित आहेस. तरी पण पशु, मनुष्य, देव, जलचर इत्यादि योनींमध्यें तूं जन्म घेतोस; तसेंच, तूं वास्तविक अकर्ता आहेस, तरी पण त्या त्या योनींत जन्म घेऊन तदनुरूप तूं कर्में करितोस, हें केवळ अनुकरण होय. देवा, लहानपणीं तूं दह्याचें मडकें फोडून त्यांतून लोणी चोरून घेतलेंस, ह्या अपराधाबद्दल तुला बांधून ठेवण्यासाठीं यशोदेनें आपल्या हातांत दावें घेतलें, त्या वेळीं तुझ्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले व त्यामुळें तुझ्या डोळ्यांत घातलेलें काजळ चोहोंकडे पसरलें, आणि तुझे डोळे कावरेबावरे झाले. तूं आपलें तोंड खालीं घातलेंस; आणि जणूं काय तुला अत्यंत भीति वाटली आहे अशा रीतीनें तूं त्या वेळीं उभा राहिलास. तें पाहून मलाही मोह उत्पन्न झाला. हे श्रीकृष्णा, प्रत्यक्ष भय देखील ज्याला भितें, त्या तूं भयभीत झाल्याचा आविर्भाव दाखविलास, हें मनुष्यकृतीचें अनुकरण नव्हे तर काय? असें अनुकरण करण्यांत तुझा काय हेतु असेल हें कोणालाही कळत नाहीं. ह्याबद्दल निरनिराळ्या लोकांचे निरनिराळे तर्क आहेत: मलयपर्वताची चोहोंकडे प्रख्याति होण्यासाठीं ज्याप्रमाणें चंदनाचा वृक्ष त्यावर उगवतो, त्याप्रमाणें, पुण्यश्लोक यदूची कीर्ति दिगंतरीं प्रसृत करण्यासाठीं त्याच्या कुलामध्यें जन्मरहित अशा त्वां भगवंतानें जन्म घेतला, असें कोणी म्हणतात. दुसरे कोणी असें म्हणतात कीं, देवांनीं प्रार्थना केल्यावरून, ह्या जगाचें कल्याण करण्याकरितां आणि दैत्यांचा वध करण्याकरितां, वसुदेवापासून देवकीच्या उदरामध्यें, तूं जन्मरहित असूनही जन्म घेतलेंस. समुद्रांतून चालत असलेल्या एखाद्या नौकेला तिच्यामधील अतिशय सामानामुळें भार होऊन ती जशी बुडण्याच्या बेतांत येते, त्याप्रमाणें दुष्ट लोकांच्या भारानें हूं पृथ्वीही अगदीं बुडून जाण्याच्या बेतांत आलेली होती; तव्हां ब्रह्मदेवानें प्रार्थना केल्यावरून तो भूमिभार हरण करण्यासाठीं तूं हा अवतार घेतलास, असें आणखी कित्येक पंडितांचें मत आहे; व कित्येक असेंही म्हणतात कीं, माया, वासना आणि पूर्वार्जित कर्में ह्यांच्या योगानें ह्या संसारामध्यें मनुष्यांस अतिशय क्लेश होत असतात, ते त्याचे क्लेश भक्तीच्या योगानें नाहींतसे व्हावे म्हणून, श्रवण करण्याला आणि स्मरण करण्याला योग्य अशीं कृत्यें करण्याकरितां तूं हें मनुष्य रूप धारण केलेंस. हे प्रभो, जे कोणी वारंवार तुझ्या कृत्यांचें श्रवण करितात, गायन करितात, कीर्तन करितात आणि अभिनंदन करितात, त्यानाच तुझ्या चरणकमलाचें तत्काळ दर्शन होतें; आणि तें दर्शन झालें म्हणजे ह्या संसाररूपी नदीचा प्रवाह एकदम आटून जातो. हे भक्तवत्सला, तुझ्या चरणकमलांवांचून आमचें संरक्षण करण्याला दुसरें कोणीच नाहीं, आणि त्यांतूनही ह्या युद्धामुळें पुष्कळ राजांचा आमच्यावर रोष झालेला आहे. ह्याकरितां, अशा प्रसंगीं तर आम्हांला तुझ्या संरक्षणाची अतिशयच अपेक्षा आहे; परंतु अशा वेळीं तूं आज आम्हांला सोडून जावयाला निघाला आहेस, तेव्हां ह्याला काय म्हणावें? कीर्तीनें आणि बलानें पांडव आज कितीही मोठे असले, व इतर यादवांचें त्यांना कितीही साहाय्य असलें, तरी पण जर तूं त्यांना सोडून जाशील, तर मग पांडवांची काय योग्यता राहणार आहे? सर्व इंद्रियांचा धनी जो आत्मा, तो शरीरांतून निघून गेला असतां त्या इंद्रियांची जी अवस्था होते तीच आमची होणार! दुसरें काय? हे गदाधरा, ध्वजांकुशादिक अनेक लक्षणांनीं युक्त अशीं जीं तुझीं पावलें, तीं जिकडे तिकडे उमटल्यामुळें आतां जशी ही हस्तिनापुरांतील भूमि सुंदर दिसत आहे, तशी ती तूं येथून गेल्यावर दिसणार नाहीं; ह्यासाठीं तूं जाऊं नको. हे आसपासचे

सुसंपन्न देश, ह्या परिपक्क झालेल्या ओषधी, ह्या लता, हीं अरण्यें, हे पर्वत, ह्या नद्या, हे समुद्र ह्या सर्वांवर तुझी कृपादृष्टि पडत होती, म्हणून हीं सगळीं वृद्धिंगत होत होतीं; परंतु आतां तूं गेलास म्हणजे ह्यांना सुद्धां वाईट वाटेल. तथापि, हे विश्वेश्वरा, हे विश्वात्मन्, हे विश्वमूर्ते, आतां जर तूं जाणारच असशील, तर निदान माझी एवढी तरी प्रार्थना ऐक: ती हीच कीं, पांडव आणि यादव ह्यांच्या ठिकाणीं माझें मन स्नेहपाशानें बद्ध झालेलें आहे, तो स्नेहपाश तूं तोडून टाक; आणि, हे मधुपते, ज्याप्रमाणें गंगेचा ओघ समुद्राकडे वळतो, त्याप्रमाणें माझ्या मनाचा ओढा अनन्यभावेंकरून सदोदीत तुजकडे वळो, म्हणजे मी कृतार्थ होईन! हे श्रीकृष्णा, हे पार्थसख्या, ह्या पृथ्वीवरील लोकांना कंटकांप्रमाणें दुःख देणाऱ्या राजांचे वंश त्वां जाळून भस्म केले आहेत. तुझ्या पराक्रमाचें वर्णन देव सुद्धां करीत आहेत. हे गोविंदा, गाई, ब्राह्मण आणि देव ह्यांचें दुःख हरण करण्याकरितांच तुझा अवतार आहे. हे योगेश्वरा, तुला माझा नमस्कार असो.

सूत म्हणतात:—अशा मधुर शब्दांनी श्रीकृष्णाच्या सर्व पराक्रमांचें वर्णन करून कुंतीनें त्याची स्तुती केली. ती ऐकून श्रीकृष्णानें आपल्या योगमायेच्या योगानें सर्वांस मोहित करण्यासाठीं किंचित् मंदहास्य केलें. नंतर, 'तुझी जी इच्छा आहे ती परिपूर्ण होईल' असें कुंतीला सांगून यदुकुलावतंस भगवान श्रीकृष्णानें तिचा निरोप घेतला. पुढें श्रीकृष्ण हस्तिनापुरामध्यें परत आले, व त्यांनी द्रौपदी आदिकरून स्त्रियांचा निरोप घेतला. नंतर ते द्वारकेला जाण्याकरितां निघाले, परंतु पुनः धर्मराजानें त्यांस राहण्याविषयी प्रेमपूर्वक अतिशय आग्रह केल्यामुळें, पांडवांच्या वात्सल्यास्तव ते तेथें राहिले.

**गोत्रवधामुळें धर्मास उत्पन्न झालेला खेद.**

सूत म्हणतात:—ऋषीहो, पुढें, आपल्या हातून आपले पुष्कळ ज्ञातिबांधव मारले गेल्यामुळें त्यांच्या वधाचें पाप आपल्याला लागलें असें वाटून धर्मराज मनामध्यें अतिशय खिन्न होऊन बसला. परमेश्वराची काय इच्छा आहे हें जाणणाऱ्या व्यासादिक मुनींनीं आणि प्रत्यक्ष श्रीकृष्णानेंही, मागील इतिहासांतील अनेक गोष्टी सांगून धर्मराजाची पुष्कळ समजूत केली; परंतु कांहीं केल्यानें त्याचें समाधान होईना. स्नेहाच्या योगानें धर्मराजाचें मन मोहित झालेलें होतें, व त्याची दृष्टि अकुंचित झालेली होती; त्यामुळें, आपण आपल्या ज्ञातीचा वध केला आहे ही गोष्ट सदासर्वदा त्याच्या मनामध्यें घोळत असे. अशा स्थितींत असतां धर्मराजाच्या मनांत असे विचार आले:—हा माझा देह केवळ दुसऱ्यांच्यासाठीं आहे; मी मरण पावलों म्हणजे कोल्हीं आणि कुत्रीं ह्याला फाडून खातील; असल्या ह्या निरर्थक देहासाठीं मीं अनेक अक्षौहिणी सैन्याचा वध केला; अरेरे! अज्ञानामुळें ह्या धर्माच्या हातून हें केवढें दुष्कृत्य घडलें पहा! लहान मुलें, ब्राह्मण, इष्टमित्र, पितृस्थानीय, बंधु, गुरु ह्या सर्वांचा ज्यानें वध केला, त्या मला नरकच प्राप्त झाला पाहिजे! कोट्यवधि वर्षे लोटलीं तरी त्या नरकापासून माझी मुक्तता होणें फार कठिण आहे. 'आपल्या प्रजेचें योग्य रीतीनें पालन करणाऱ्या राजांनीं युद्धामध्यें आपल्या शत्रूंचा वध केला तर त्यापासून त्यांना पातक लागत नाहीं; इतकेंच नव्हे, तर उलट असें करणें हा धर्मच आहे;' असा जरी शास्त्रार्थ असला, तरी त्यापासून माझ्या मनाचें समाधान होत नाहीं. मीं कित्येक स्त्रियांचे पति मारून त्यांना वैधव्यदशेमध्यें लोटण्यास कारणीभूत झालों हें पातक फार भयंकर होय! आतां मीं कितीही अश्वमेध केले, तरी त्यांच्या योगानें माझी ह्या पातकापासून सुटका होणें कधींही शक्य नाहीं. ज्याप्रमाणें चिखलानें मलिन झालेलें

भांडें चिखलानेंच धुतलें तर तें स्वच्छ होत नाहीं, अथवा सुराप्राशनाचा दोष सुरेनें दूर होत नाहीं, त्याप्रमाणें, मीं जी प्राणिहत्या केली तिचें पालक, ज्यामध्यें फिरून दुसरी हत्या करावी लागते अशा यज्ञाच्या योगानें कधींही नाहींसें होणार नाहीं!

## अध्याय नववा.

—:०:—

### धर्मादिकांचें भीष्मसन्निध गमन.

सूत म्हणतात:—ऋषीहो, अशा प्रकारें, आपल्या हातून प्राणिहत्या झाल्याबद्दल धर्मराजाच्या मनामध्यें अतिशय अस्वस्थता उत्पन्न झाली होती; त्याकरितां, एकंदर सर्व धर्मांचें रहस्य काय आहे हें आपण समजून घ्यावें म्हणून, कुरुक्षेत्रामध्यें ज्या ठिकाणीं पितामह भीष्म शरपंजरीं पडले होते, त्या ठिकाणीं तो गेला. तेव्हां त्याचे बंधुही आपल्या रथांना उत्तम घोडे जोडून आणि ते रथ सुवर्णाच्या भूषणांनीं अलंकृत करून त्यांत बसून त्याच्या पाठीमागून चालले. त्याचप्रमाणें व्यास, धौम्य इत्यादि ऋषि आणि अर्जुनासहवर्तमान भगवान श्रीकृष्णही आपल्या रथामध्यें बसून तिकडेच गेले. धर्मराज पुढें चालला होता, आणि बाकीची मंडळी त्याच्या मागून चालली होती. त्या वेळीं, यक्षांच्या परिवारानें युक्त असलेल्या कुबेराप्रमाणें धर्मराज दिसत होता. याप्रमाणें ती सर्व मंडळी रणभूमीवर शरपंजरीं पडलेल्या त्या भीष्माचार्यांजवळ जाऊन पोहोंचली. तेव्हां त्यांना पाहून हा भीष्म नसून आकाशांतून पृथ्वीवर पतन पावलेला कोणी तरी देवच असावा असें सर्वांना वाटलें. नंतर श्रीकृष्णासहवर्तमान सर्व पांडवांनीं भीष्माचार्यांस प्रणाम केला. त्या ठिकाणीं, भरतकुलांतील श्रेष्ठ अशा त्या भीष्माचार्यांचें दर्शन घेण्याकरितां अनेक ब्रह्मर्षि, देवर्षि आणि राजर्षि प्राप्त झाले होते. पर्वत, नारद, धौम्य, व्यास, बृहदश्व, भरद्वाज, परशुराम, वसिष्ठ, इंद्रप्रमद, गृत्समद, असित, कक्षीवान, गौतम, अत्रि, विश्वामित्र, सुदर्शन, शुक्र, कश्यप, अंगिरा इत्यादि अनेक ऋषि आपापल्या शिष्यांसहवर्तमान तेथें आले होते. भीष्माचार्य हे पूर्ण धर्मज्ञ होते. कोणत्या स्थलीं व कोणत्या कालीं काय करावें हें त्यांना पूर्ण अवगत होतें. तेव्हां हे सर्व ऋषि वगैरे आलेले पाहून त्यांनीं त्या सर्वांचें मनानें स्वागत केलें. त्या वेळीं, वस्तुतः शरीररहित असूनही ज्यानें केवळ मायेनें शरीर धारण केलें होतें, परंतु वास्तविक जो सकलांच्या अंतःकरणामध्येंच वास करीत असतो असा तो जगदीश्वर कृष्णही जवळच बसलेला होता; त्याचें यथार्थ सामर्थ्य जाणणाऱ्या भीष्माचार्यांनीं त्याची मनानेंच पूजा केली. तेथें विनयानें आणि प्रेमानें मान खालीं घालून पांडवही जवळच बसलेले होते, त्यांच्याकडे पाहून भीष्माचार्यांच्या डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागले, व त्या योगानें त्यांच्या डोळ्यांना कांहींएक दिसेनासें झालें. अशा स्थितींत भीष्माचार्य सर्व पांडवांना उद्देशून धर्मराजाशीं बोलूं लागले.

#### कालसामर्थ्य.

भीष्म म्हणाले:—हे धर्मनंदना, विप्रांच्या आशीर्वादानें, धर्माच्या आज्ञेप्रमाणें, आणि श्रीकृष्णाच्या साहाय्यानें तुम्ही वागत असतांही तुम्हांला कष्ट सोसावे लागले ही मोठी दुःखाची व अन्यायाची गोष्ट आहे. महापराक्रमी पांडु राजा तुम्ही लहान असतांनाच निवर्तला, व तुमच्यासाठीं तुमची माता जी कुंती तिला पुष्कळ क्लेश सोसावे लागले. तुमच्यावर जीं हीं संकटें आलीं, तीं सर्व कालाच्या अवकृपेमुळेंच आलीं असें म्हणावें लागतें; म्हणून तेथें कांहीं उपाय नाहीं. ह्या जगांतील सगळेच लोक कालाच्या स्वाधीन आहेत. मेघसमुदायाला ज्याप्रमाणें वायु जिकडे नेईल तिकडे जावें लागतें, त्याचप्रमाणें, मनुष्यांना काल

जसा ठेवील तसें रहावें लागतें. तसें जर नसतें तर तुमच्यावर संकटें कां आलीं असतीं ? धर्मराजासारखा नीतिमान राजा, वृकोदरासारखा गदाधर योद्धा, अर्जुनासारखा अस्त्रविद्येमध्यें निपुण असलेला साहाय्यकारी, गांडीवासारखें धनुष्य आणि श्रीकृष्णासारखा मित्र हीं जेथें आहेत, तेथें देखील जर संकटें येतात, तर काल हाच बलवान असला पाहिजे, दुसरें काय ? राजा, ह्या श्रीकृष्णाचें चरित्र फार अगाध आहे. तें कोणासच उमजत नाहीं. ब्रह्मादि तत्त्वज्ञानी पुरुष देखील ह्याच्या कृत्यांचें ज्ञान प्राप्त करून घेण्यास उद्युक्त झाले असतां त्यांस मोह पडतो. बाबारे, सुखदुःखादि सर्व साधनें परमेश्वराधीन आहेत, हें तत्त्व पूर्णपणें लक्षांत बाळगून धर्माचरणानें प्रजेचें उत्तम प्रकारें पालन कर. हे कुरुकुलनंदना धर्मराजा, ह्या

### श्रीकृष्णाचें खरें स्वरूप

कसें आहे तें तुला मुळींच उमगलें नाहीं. हा सर्वेश्वर भगवान श्रीकृष्ण प्रत्यक्ष परब्रह्म होय. ह्यानें यादवकुळांत अवतार घेऊन आपल्या मायेच्या योगानें सर्वांस अगदीं मोहित करून सोडिलें आहे, त्यामुळें ह्याचें खरें स्वरूप कोणासच ओळखितां येत नाहीं. धर्मराजा, ह्या श्रीकृष्णाचें परम गूढ चरित्र भगवान शंकर, देवर्षि नारद आणि साक्षात् विष्णूचा अवतार असा जो भगवान कपिल महामुनि ह्यांनाच काय तें ठाऊक आहे. तुझे ठायीं ह्याचें खरें स्वरूप ओळखण्याचें ज्ञान नाहीं; म्हणून तूं ह्याला आपला मामेभाऊ, आपला मित्र, आपला कारभारी, विश्वासू दूत, अर्जुनाचा सारथी असें समजतोस, पण हा सर्वांतर्यामीं वास करणारा असून राग-लोभ, शोक-मोह, सुख-दुःख, मान-अपमान इत्यादि अज्ञानमूलक विकारांपासून अलिप्त असल्यामुळें, ह्याच्या बुद्धीला वैषम्य उत्पन्न होण्याचा मुळींच संभव नाहीं; तथापि, हे धर्मराजा, ह्याची अनन्यभावानें भक्ति करणारे जे पुरुष आहेत, त्यांजविषयीं हा फार दयाळु आहे ह्याचें प्रत्यक्ष उदाहरण मीच होय. माझा अंतकाल अगदीं समीप आला आहे असें जाणून भगवान श्रीकृष्ण मला दर्शन देण्याकरितां आपण होऊन येथें प्राप्त झाला आहे. जो योगी आपल्या अंतकालाचे समयीं भक्तियुक्त अंतःकरणानें हरिनामाचें स्मरण व भजन करितो, आणि परमेश्वराच्या ठिकाणीं आपलें लक्ष लावितो, तो कर्मबंध आणि विषयवासना ह्यांपासून मुक्त होतो. राजा, मुखावर प्रसन्न हास्याची झांक असून कमलनयन आरक्त असल्यामुळें ज्याचें मुख फार शोभायमान दिसत आहे, व योगी लोक केवळ ज्याच्या स्मरणानेंच मुक्त होतात, तो हा प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्ण मजजवळ आहे, हें माझें धन्य भाग्य! जोंपर्यंत हे प्राण या देहांतून निघून गेले नाहींत, तोंपर्यंत त्याची मजवर अशीच कृपादृष्टि असो !

सूत म्हणतातः—ऋषीहो, शरपंजरीं पडलेल्या त्या भीष्माचार्यांचें हें वचन श्रवण केल्यानंतर, धर्मराजानें त्यांस धर्मसंबंधी अनेक प्रश्न केले. तेव्हां त्या बहुश्रुत भीष्माचार्यांनीं, मनुष्याचे साधारणधर्म, वर्णाश्रमधर्म, निवृत्ति आणि प्रवृत्ति या दोन मार्गांचे लक्षणरूपधर्म, दानधर्म, स्त्रीधर्म, राजधर्म, भागवतधर्म व मोक्षधर्म हे सर्व तेथें जमलेल्या ऋषि आदिकरून सर्व मंडळीमध्यें धर्मराजास स्पष्टपणें समजतील अशा रीतीनें थोडक्यांत सांगितले. तसेंच धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ कोणीं, केव्हां, कसे व कोठें आचरावे हेंही सर्व अनेक आख्यानें आणि इतिहास ह्यांच्या आधारासह धर्मराजास कथन केलें.

### भीष्माचार्यांचें निर्याण.

सूत म्हणतातः—ऋषीहो, ह्याप्रमाणें भीष्माचार्यांचें धर्मव्याख्यान चाललें असतां उत्तरायण काल प्राप्त झाला. ब्राह्मणहो, योगीजनांच्या इच्छेस येईल तेव्हां त्यांस देहत्याग करितां येतो; भीष्मा-

चार्य हे महायोगी असल्यामुळें इच्छामरणी होते. देहत्याग करण्यास इष्ट असा जो उत्तरायणकाळ तो प्राप्त झाला असें पाहून त्यांना देहत्यागाची इच्छा उत्पन्न झाली. लागलीच त्या आतिरथी भीष्माचार्यांनीं आपले नेत्र त्या पीतांबरधारी चतुर्भुज श्रीकृष्णाच्या ठिकाणीं निश्चल केले; अतिशुद्ध धारणेच्या योगानें त्यांचें चित्त निष्पाप झालें होतें. युद्धांत झालेल्या शस्त्रप्रहारांच्या योगानें त्यांस अति क्लेश झाले होते; तसेंच, इतक्या वार्धक्यावस्थेमध्यें युद्धकर्मांत अति दक्षता ठेविल्यामुळें त्यांस श्रमही फार झाले होते; परंतु ह्या वेळीं भक्तवत्सल श्रीगोपालकृष्णाच्या कृपाकटाक्षानें, युद्धांतील श्रम आणि क्लेश ह्यांचें पूर्णपणें निवारण झालें. ऋषीहो, मनुष्यांच्या इंद्रियांचे अनेक प्रकारचे व्यापार अव्याहत चाललेले असतात, त्यांस भ्रमणवृत्ति असें म्हणतात; श्रीकृष्णाच्या कृपाकटाक्षानेंच भीष्माचार्यांच्या नानाविध भ्रमणवृत्तींचा नाश झाला; आणि आपल्या देहत्यागसमयीं त्या जगदुद्धारक श्रीकृष्णाची ते सद्गदित वाणीनें स्तुति करूं लागले.

### भीष्मकृत श्रीकृष्णस्तुति.

भीष्म म्हणाले:—नानाप्रकारच्या साधनांनीं माझी मनोधारणा एकाग्र आणि निष्काम झाली आहे, ती मी ह्या सर्वव्यापी यदुवंशावतारी श्रीकृष्णाचे ठिकाणीं समर्पण करितों. भगवान श्रीकृष्ण हा नेहमीं परमानंदांत मग्न असतो. त्रिगुणात्मक सृष्टीची परंपरा उत्पन्न होण्याचें कारण माया होय. कधीं कधीं क्रीडा करण्याकरितां भगवान श्रीकृष्ण त्या मायेचा अंगीकार करितो; तथापि त्या योगानें ह्याचें स्वरूप आच्छादिलें जात नाहीं. ह्याचें स्वरूपसौंदर्य त्रैलोक्यांत अनुपम आहे. ह्याचा वर्ण तमालवृक्षाप्रमाणें श्याम असून ह्याच्या पीतांबराची प्रभा सूर्याप्रमाणें आहे. सांप्रत हा पार्थाचा सारथी आहे. कुरळ केशांच्या योगानें ह्याचें मुखकमल फार शोभायमान दिसत आहे; अशा ह्या श्रीकृष्णाचे चरणीं माझी निष्काम प्रीति जडो.

युद्धाच्या समयीं उडालेल्या अश्वचरणरजांनीं ज्याचे विखुरलेले केश किंचित् शुभ्र दिसत होते; सारथ्यश्रमामुळें आलेले घर्मबिंदु भक्तवात्सल्याचें दिग्दर्शनच करीत होते; व त्या घर्मबिंदूंच्या योगानें ज्याचें मुख फारच शोभायमान दिसत होतें; तसेंच, माझ्या तीक्ष्ण शर-प्रहारांच्या योगानें ज्याच्या अंगांतील कवचाचा भंग होऊन ज्याची त्वचा देखील फाटून गेली, अशा ह्या श्रीकृष्णाचे स्वरूपीं माझें चित्त सदोदीत स्थिर असो.

'दोन्ही सैन्यांमध्यें माझा रथ नेऊन उभा कर' असें आपला मित्र जो अर्जुन त्याचें वाक्य श्रवण करितांच ज्यानें सैन्याच्या मध्यभागीं रथ आणून उभा केला, व हा कर्ण, हा द्रोण, हा शल्य असें अर्जुनास दाखविण्याचे मिषानें त्यांकडे ज्यानें आपली कालदृष्टि वळवून त्या सर्वांचें आयुष्य हरण केलें, त्या ह्या पार्थमित्र श्रीकृष्णाचे ठिकाणीं माझें निरंतर प्रेम असो.

युद्धाचे वेळीं समोर उभे असलेले द्रोणादि गुरुजन व दुर्योधनादि आप्त आणि इष्टजन ह्या सर्वांस पाहून, आपण ह्यांचा वध केला तर ह्याचें वधरूप पातक आपणास लागेल ही आत्मकर्तृत्वाची अज्ञानमूलक बुद्धि हृदयांतरीं उद्भवल्यामुळें जो कर्तव्यपराङ्मुख झाला होता, त्या पार्थाचें अज्ञान ज्यानें आत्मविद्याविवेचनात्मक भगवद्गीतेचा उपदेश करून घालविलें, त्या श्रीकृष्णाचे परमानंदस्वरूपीं माझें मन सदैव रममाण असो.

'मी हातांत शस्त्र न धरितां अर्जुनाचें साह्य करीन,' अशी ह्या श्रीकृष्णाची प्रतिज्ञा; आणि 'तुजकडून शस्त्र धरवीन' ही माझी प्रतिज्ञा; असें असतांही, केवळ भक्ताची प्रतिज्ञा खरी करण्याकरितांच ह्यानें रथाखालीं उडी घेतली आणि रथचक्र हातीं घेऊन, रागावलेला सिंह असा

हत्तीवर धावून जातो, तसा हा माझ्या अंगावर धावून आला; आणि त्या वेळीं क्रोधाच्या आवेशांत हा चालत असतां ही सर्व पृथ्वी कंपायमान झाली; व ह्याच्या अंगावरील उत्तरीय वस्त्र खालीं पडलें; अशा रीतीनें हा मजवर धावून येत असतां, मीं क्षात्रधर्माला अनुसरून ह्याजवर प्रखर बाणांचा प्रहार केला, त्या योगानें ह्याचें कवच फुटून सर्व शरीर रक्तानें भिजलें. त्या समयीं, स्नेहपाशानें बद्ध होऊन अर्जुन ह्यास मागें ओढीत असतां ह्यानें त्यास झिडकारून हा माझ्या वधार्थ सन्मुख आला; तेव्हां सर्व लोकांस असें वाटलें कीं, हा अर्जुनाचा पक्षपाती आहे; परंतु वस्तुतः तशी गोष्ट नसून, केवळ माझी प्रतिज्ञा खरी करण्याकरितां आणि मजवर अनुग्रह करण्याकरितांच ह्यानें तसें आचरण केलें; असा जो हा भक्तवत्सल परमात्मा श्रीकृष्ण, त्याचे ठिकाणीं मला गति मिळो.

युद्धसमयीं अर्जुनाच्या रथाचें हा निरपेक्ष बुद्धीनें स्वतःच्या कुटुंबासारखें रक्षण करीत असतां ह्याच्या हातांत चाबूक आणि घोड्याचे लगाम होते, त्या वेळीं ह्याचें स्वरूप काय हो रमणीय दिसत होतें! अहो, भारतीयुद्धांत जे जे वीर मरण पावले, त्यांना मरणसमयीं ह्याचें दर्शन घडल्यामुळें सरूपता मुक्ति मिळाली! असा महासमर्थ जो हा श्रीकृष्ण त्याचे ठिकाणीं, मरणोन्मुख झालेला जो मी, त्या माझी प्रेमयुक्त भक्ति जडो.

उत्तम स्वरूप, मधुर आणि मंद असें हास्य, अनेक प्रकारचे विलास, आणि प्रणययुक्त नेत्रकटाक्ष इत्यादिकांनीं मोहित होऊन ज्या गोपी गोवर्धनोद्धारणादि ह्याच्याच लीलांचें अनुकरण करूं लागल्या, आणि त्या आनंदांत तल्लीन होत्सात्या ज्या ह्याच्या स्वरूपीं मिळाल्या, त्या ह्या श्रीकृष्णाचे ठिकाणीं माझें सदैव प्रेम असो.

युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांत ह्याच्या स्वरूपानें आश्चर्यचकित होऊन, मुनिजनांनीं 'काय हें ह्याचें रूप' 'केवढा हा ह्याचा प्रभाव' असें म्हणून ज्याची स्तुति केली व ज्यास अग्रपूजेचा मान दिला, तोच हा जगदात्मा मजजवळ प्रत्यक्ष आहे; तस्मात् केवढा मी भाग्यवान! जो सर्व भूतें स्वतः निर्माण करून त्यांच्या अंतरीं वास करितो, आणि सूर्य एकच असतांही जसा प्रत्येकाच्या दृष्टीस निरनिराळा दिसतो, तसा जो एक असूनही प्रत्येकाच्या दृष्टीस निरनिराळा भासतो, त्या ह्या जन्मरहित भगवान श्रीकृष्णाचे ठिकाणीं भेद आणि मोह ह्यांनीं रहित झालेला मी ऐक्य पावलों आहें.

## भीष्मांचें देहावसान.

सूत म्हणतात:—ऋषीहो, ह्याप्रमाणें त्या भीष्माचार्यांनीं आपल्या सर्व वृत्ति श्रीकृष्णस्वरूपीं लीन केल्या, तेव्हां त्यांच्या प्राणांचा त्यांचे अंतरींच लय झाला. भीष्माचार्य सर्व उपाधींपासून अलिप्त अशा परब्रह्मस्वरूपीं मिळालेले पाहून, तेथें असलेले व्यासादि सर्व ऋषि आणि इतर मंडळी स्तब्ध झाली, देव पुष्पवृष्टि करूं लागले, आणि सर्व त्या भीष्माचार्यांच्या स्तुतींत निमग्न झाले. भीष्माचार्यांचें देहावसान झालेलें पाहून धर्मराजास फार दुःख झालें. पुढें त्यानें भीष्माचार्यांचें और्ध्वदेहिक यथाविधि केलें. नंतर नारदादिकांनीं सप्रेम अंतःकरणानें श्रीकृष्णाची स्तुति केली, आणि श्रीकृष्णचरणीं मन लावून ते आपआपल्या स्थानीं निघून गेले. धर्मराजही श्रीकृष्णास बरोबर घेऊन हस्तिनापुरांत आले व दुःखित झालेली गांधारी आणि धृतराष्ट्र ह्या उभयतांचें त्यांनीं सांत्वन केलें. नंतर श्रीकृष्ण आणि धृतराष्ट्र ह्यांनीं अनुमोदन दिल्यावर, वाडवडिलांपासून चालत आलेल्या सिंहासनावर बसून धर्मराज यथान्याय राज्य चालवूं लागले.

# अध्याय दहावा.

—:०:—

## धर्मराजाची राजरीति.

शौनक म्हणाले:—सूता, राज्यलोभानें दुर्योधनादिक दुष्ट हे पांडवांशीं अन्यायानें युद्ध करण्यास प्रवृत्त झाले होते, त्यांचा वध करून सर्व राज्यलक्ष्मी पांडवांनीं आपल्या हस्तगत करून घेतल्यानंतर, धार्मिकांमध्यें श्रेष्ठ अशा त्या अजातशत्रु धर्मराजानें आपल्या महापराक्रमी बंधूंसहवर्तमान राज्यशकट कशा प्रकारें चालविला, व त्यानें पुढें काय केलें, तें आम्हांला सांग.

सूत म्हणतात:—हे शौनका, कलहरूप वणव्यानें कुरुवंशरूपी कळकांचें अरण्य पार जळून भस्म होण्याच्या बेतांत होतें; पण भक्तसंरक्षक प्रभु श्रीकृष्णानें ब्रह्मास्त्रापासून उत्तरेच्या गर्भाचें रक्षण करून त्याचा थोडा अंकुर अवशिष्ट ठेविला, आणि त्यानें धर्मराजाची राज्यावर स्थापना केली. भीष्माचार्यांनीं व श्रीकृष्णांनीं 'हें जग ईश्वराधीन आहे, स्वतंत्र नाहीं' असा धर्मराजास उपदेश केला होताच. तें तत्त्व पूर्णपणें लक्षांत ठेवून, आपल्या बंधूंच्या साहाय्यानें, इंद्र जसें स्वर्गाचें रक्षण करितो, तसें धर्मराजानें समुद्रवलयांकित पृथ्वीचें रक्षण करून राज्य चालविलें. शौनका, सद्धर्मप्रतिपालक धर्मराजा राज्य करीत असतां प्रजाजनांना दुःख कसलें तें माहीत देखील नव्हतें. त्यांना आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक हे ताप कधींही झाले नाहींत. नद्या, समुद्र, पर्वत इत्यादिकांपासून तदनुरूप इष्ट वस्तूंचा भरपूर पुरवठा होई, व वेळच्या वेळीं पर्जन्यवृष्टि झाल्यामुळें धान्याची व गोरसाची समृद्धि सर्वत्र असे, आणि सर्व प्रजा संतुष्ट असल्यामुळें धर्मराजाला एकही शत्रु नव्हता. अशा प्रकारें धर्मानें निष्कलंक राज्य केलें.

### श्रीकृष्णाचें द्वारकेस परत जाणें.

सूत म्हणतात:—आपल्या भक्तांचें आणि बहिणीचें (सुभद्रेचें) प्रिय करण्याकरितां, व आप्तस्वकीयांच्या नाशामुळें उत्पन्न झालेला त्यांचा शोक घालविण्याकरितां, भगवान श्रीकृष्ण हस्तिनापुरांतच कांहीं महिने राहिले; आणि आपल्या सहवासानें व आपल्या कृपेनें पांडवांना सुख देऊन नंतर द्वारकेस जाण्यास निघाले. तेव्हां भगवंतांनीं धर्मराजास आलिंगन दिलें, व नमस्कार करून जाण्याविषयीं त्याची आज्ञा घेतली. त्या वेळीं भीमानें आणि अर्जुनानें भगवंतांस प्रेमानें आलिंगिलें, व नकुळ आणि सहदेव ह्यांनीं श्रीकृष्णाला नमस्कार केला.

नंतर सर्वजण भगवंताला पोहोंचविण्याकरितां रथारूढ होऊन सिद्ध झाले. सुभद्रा, द्रौपदी, उत्तरा, गांधारी, कुंती, धृतराष्ट्र, धौम्य ऋषि, युयुत्सु, कृपाचार्य, नकुळ, सहदेव, भीमसेन आदिकरून सर्वांस श्रीकृष्ण परमात्मा जाणार म्हणून अत्यंत दुःख झालें. शौनका, पांडवांना श्रीकृष्णाच्या विरहानें दुःख होणें साहजिकच होतें; कारण, त्याच्या यशाचें साधूंनीं केलेलें नुसतें वर्णन एकवेळ ऐकिलें असतां मनुष्यांची संसारावरील आसक्ति सुटून तो त्या भगवद्यशांत रंगून जातो, त्या परमात्म्याचा त्यांना कित्येक दिवसपर्यंत प्रत्यक्ष सहवास घडला होता. शेवटीं पांडवांच्या मनाला तो दुःखावेग सहन न होऊन तीं त्यांचीं मनें कृष्णाबरोबर जाण्यास निघालीं. तो देवकीनंदन गोपालकृष्ण घरांतून बाहेर निघाला, तेव्हां द्रौपदी आदिकरून स्त्रियांचे नेत्र अश्रूंनीं भरून आले; पण त्यांनीं त्या वेळीं अमंगलाचा निरोध करण्यासाठीं म्हणून ते तसेच आवरून धरिले. असो. भगवान श्रीकृष्णाची स्वारी द्वारकेस निघाली, तेव्हांच्या त्या थाटाचें काय वर्णन करावें? तो समारंभ साजरा करण्याकरितां हस्तिनापुरांतील सर्व लोक आपापलीं कामें

सोडून त्याजबरोबर निघाले. पूर्णपणें शृंगारलेल्या त्या हस्तिनापुराच्या रस्त्यांतून भगवंताची स्वारी जात असतां, नानाप्रकारच्या वाद्यांनीं तें नगर दुमदुमून गेलें. त्या वेळीं श्रीकृष्णाच्या मस्तकावर अर्जुनानें मौक्तिकमालांनीं मंडित असें छत्र धरिलें होतें, आणि उद्धव व सात्यकि हे चवऱ्या वारीत होते. राजवाड्याच्या गच्चांवर कौरवस्त्रिया श्रीकृष्णाला पहाण्याच्या इच्छेनें आल्या असून, त्यांनीं मोठ्या प्रेमानें त्याचें दर्शन घेतलें आणि त्याजवर पुष्पवृष्टि केली. इतर नागरिक स्त्रियाही भगवंताच्या दर्शनाकरितां उत्सुकतेनें जमल्या होत्या. ज्यांच्या ज्यांच्या दारापुढून स्वारी पुढें जाई, त्यांना त्यांना आपला प्राणच निघून जात आहे असें वाटे. निर्गुण असून भक्तकार्याकरितां सगुणरूप धारण केलेल्या त्या परमेश्वरास चोहींकडून सर्व ब्राह्मण आशीर्वाद देत होते.

### हस्तिनापुरवासी स्त्रियांचा श्रीकृष्णाविषयींचा झालेला संवाद.

सूत म्हणतातः—त्या प्रसंगीं, ज्यांचीं अंतःकरणें कृष्ण परमात्म्याच्या ठिकाणीं लागलेलीं होतीं, अशा स्त्रियांमध्यें जो संवाद झाला तो फारच मनोहर आहे. तो त्या स्त्रियांचा संवाद श्रुतींनाही मान्य असल्यामुळें मी तो तुम्हांस सांगतों.

त्यांपैकीं एक स्त्री इतर स्त्रियांस म्हणाली:—सख्यांनो, सत्त्व, रज आणि तम हे त्रिगुण अस्तित्वांत येण्याचे पूर्वी जो उपाधिरहित परमात्मा असतो, आणि प्रलयकालीं गुणत्रयाचा ईश्वराच्या स्वरूपीं लय झाला म्हणजे त्या वेळींही जो स्वानंदस्वरूपीं रममाण असून अवशिष्ट राहतो, तोच हा श्रीकृष्ण साक्षात् परब्रह्म पुराणपुरुष होय; तेव्हां ह्याच्या ठिकाणीं जें तेज आहे आणि ह्याचा जो महिमा गातात, त्याचें मोठेंसें नवल तें काय! नामरूपरहित जीवात्म्याच्या ठिकाणीं नांवें आणि रूपें उत्पन्न करण्यासाठीं हा सर्वज्ञ परमेश्वर मायेस आश्रय देतो, आणि तिला आपल्या काळशक्तीनें प्रेरणा देऊन तिजकडून आपलेच अंशभूत असे जीव देहरूपानें निर्माण करवितो. इंद्रियांचा आणि प्राणवायूचा निग्रह करणारे जे योगी, त्यांस त्यांच्या निर्मळ भक्तीच्या योगानें ह्या लोकींच ज्याचें दर्शन घडतें, तोच हा परब्रह्म श्रीकृष्ण आमच्या दृष्टीस पडला, हें केवढें आमचें महद्भाग्य! आणि, सख्यांनो, खरें पाहिलें तर ह्याच्या सेवेच्या योगानें जशी शुद्धबुद्धि प्राप्त होते, तशी योगादि साधनांनीं सुद्धां होत नाहीं. वेदांत आणि शास्त्रांत परमेश्वराचें असें वर्णन केलेलें आहे कीं, ईश्वर एकच आहे; तोच आपल्या लीलेनें ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय करितो; परंतु त्यांत मुळींच लिप्त होत नाहीं. अहो, ह्या वेदगुह्याचें निरूपण करणारे जे श्रेष्ठ लोक, त्यांनीं ज्याच्या कथा वारंवार गाइल्या आहेत, तोच हा भगवान श्रीकृष्ण परमात्मा होय. ज्या कालीं प्रजापालक राजे अधर्मरत होऊन प्रजापालनादि आपलीं मुख्य कर्तव्यें विसरून केवळ आपलें स्वतःचेंच पोषण करूं लागतात, त्या कालीं हा श्रीकृष्ण भगवान लोकपालनासाठीं नानाप्रकारचे शुद्धसत्त्वमय अवतार घेतो; आणि सत्यप्रतिज्ञा, भक्तवात्सल्य इत्यादि गोष्टींविषयींचें आपलें ब्रीद खरें करून दाखवितो. सख्यांनो, ह्या भगवंतानें यादवकुलांत अवतार घेऊन त्याचा सन्मान केला, तेव्हां त्याची महती केवढी समजावी बरें? तसेंच, ह्याचा मथुरापुरींत वास झाल्यामुळें ती नगरी अत्यंत पवित्र झाली ह्यांत वानवा नाहीं. अहो, ह्या सर्व पृथ्वीस पावन करणाऱ्या द्वारकेचें यश स्वर्गापेक्षांही जास्त पसरलें आहे. कारण, त्या द्वारकेंतील लोकांस भक्तकैवारी जो श्रीकृष्ण त्याचें नित्य दर्शन घडतें. सखींहो, रुक्मिणीसत्यभामादि ह्याच्या स्त्रियांनीं पूर्वजन्मीं व्रत, तप, पुण्य, दान इत्यादिकांच्या योगें फार चांगल्या रीतीनें परमेश्वर पूजिला होता.

कारण, जें अधरामृत प्राशन करण्याकरितां पूर्वी गोपी अत्यंत मोहित झाल्या होत्या, तें ह्या श्रीकृष्णाचें अधरामृत त्यांस नित्य प्राशन करण्यास मिळतें! अहो, ह्या श्रीकृष्णानें स्वयंवरप्रसंगीं आपला पराक्रम आणि तेज ह्यांच्या योगानें चैद्यमागधादिकांचा पराभव करून हरण करून आणिलेली रुक्मिणी, तसेंच सत्यभामा, जांबवती इत्यादि अष्टनायिका, आणि भौमासुरवधप्रसंगीं सोडवून आणिलेल्या इतर सहस्रावधि स्त्रिया ह्यांनींच काय ती ह्या अमंगळ आणि परतंत्र अशा स्त्रीदेहास शोभा आणिली. कारण, परब्रह्मरूप श्रीकृष्ण त्यांचें नित्य प्रिय करितो, आणि मधुर भाषणाच्या योगानें त्यांस नित्य आनंदवीत असून नेहमीं त्यांच्या जवळ राहतो.

सूत म्हणतातः—ऋषीहो, ह्याप्रमाणें त्या नागरिक स्त्रिया एकमेकींशीं संवाद करीत असतां, तो श्रीहरि आपल्या मंद आणि मधुर हास्याच्या योगानें त्यांचा सत्कार करीत करीत नगराबाहेर जाऊन पोहोंचला. त्या समयीं, मार्गांत भय उत्पन्न होईल ह्या भीतीनें, धर्मराजानें त्याजबरोबर चतुरंग सैन्य दिलें. नंतर, आपल्या विरहानें अति खिन्न झालेल्या त्या पांडवांचें श्रीकृष्णानें सांत्वन केलें, आणि ते फार दूरपर्यंत पोहोंचवावयास आले असें पाहून त्यांस निरोप देऊन मागें परतविलें. नंतर उद्धवादि यादवांसह तो श्रीकृष्ण द्वारकेस गेला. मार्गांत त्यास जांगल, पांचाल, मरु वगैरे बरेच देश लागले. त्या प्रत्येक देशच्या लोकांनीं श्रीकृष्णाचें स्वागत करून त्यास नजरनजराणे अर्पण केले. ह्याप्रमाणें सर्वांस भेट देत देत श्रीकृष्णाची स्वारी सायंकाळचे सुमारास द्वारका नगरींत येऊन पोहोंचली.

## अध्याय अकरावा.

—:०:—

### द्वारकाप्रवेश.

सूत म्हणतातः—ऋषीहो, श्रीकृष्ण द्वारकेंत पोहोंचतांच त्यानें आपला पांचजन्य नांवाचा शंख वाजविला; त्याबरोबर द्वारकेंतील आबालवृद्धांस श्रीकृष्ण आल्याचें समजून परमानंद झाला, आणि ते सर्व त्यास सामोरे निघाले. हे शौनका, श्रीकृष्णानें आपल्या दोन्ही हस्तांत तो शंख धरून वाजविला, त्या वेळीं त्याच्या आरक्त ओष्ठांची प्रभा त्या शंखावर पडली होती; त्यामुळें, जणुं काय लाल कमलसमूहावर बसून हा पांढरा शुभ्र राजहंसच उच्च स्वरानें शब्द करीत आहे कीं काय, असा भास होत होता! द्वारकेंतून जे लोक सामोरे आले होते, ते श्रीकृष्णाच्या जवळ येतांच त्यांनीं मोठ्या आदरानें त्याची भेट घेतली, आणि त्याशीं अतिप्रेमानें बोलून त्यास नजरनजराणे दिले. त्या प्रभूला ते नजराणे म्हणजे 'सूर्याला जसा दीप' त्याप्रमाणेंच होत. शौनका, नंतर त्या नगरवासी जनांनीं

#### श्रीकृष्णाची स्तुति

केली. ते म्हणाले, "हे नाथा, ब्रह्मदेव, इंद्र व सनत्कुमार देखील तुझ्या चरणांचें वंदन करितात. मोक्षेच्छु लोकांस तुझे चरण हेंच उत्तम आश्रयस्थान आहे. तुझ्या चरणकमलांचें सामर्थ्य इतकें लोकोत्तर आहे कीं, त्यांवर प्रत्यक्ष काळाची देखील सत्ता चालत नाहीं. प्रभो, तुझ्या चरणकमलांस आम्हीं सदैव नम्र आहों. तुझ्या चरणसेवनानेंच आम्ही कृतकार्य झालों. आमचे इष्टमित्र, गणगोत, मातापितरें इत्यादि सर्व कांहीं तूंच आहेस. तूं नेहमीं आमच्यावर सुप्रसन्न असावेंस, व ह्यांतच आमचें कल्याण आहे. प्रभो, तुझें दर्शन देवादिकांसही दुर्लभ असतां, तूं स्मितहास्य करून आमच्याकडे सप्रेमदृष्टीनें अवलोकन करितोस हें आमचें महद्भाग्य होय. हे कमलनयना, तूं जेव्हां आपल्या सुहृज्जनांस भेटण्याकरितां मथुरेस अथवा हस्तिनापुरास जातोस, तेव्हां आम्हांस एक एक पळ म्हणजे युगासारखें वाटतें."

ह्याप्रमाणें प्रजाजनांची ती वाणी श्रवण करून श्रीकृष्णानें त्यांजकडे कृपादृष्टीनें अवलोकन केलें; आणि नंतर द्वारका नगरींत प्रवेश केला. नाग जसे भोगावती नगरीचें रक्षण करितात, तशी मधु, भोज, दाशार्ह, अर्ह, अंधक, कुकुर, आणि वृष्णि ह्यांनीं रक्षण केलेली ती द्वारका फारच सुशोभित दिसत होती. त्या नगरीमध्यें सर्व ऋतूंत फलें आणि पुष्पें देणारे वृक्ष, तशीच उत्तम उत्तम उपवनें, क्रीडावनें, मोठमोठे तलाव इत्यादि असल्यामुळें तिला अत्यंत रमणीयता आलेली होती. ऋषीहो,

श्रीकृष्णाच्या स्वागतोत्सवाचें वर्णन

किती करावें? द्वारकावासी जनांनीं घरोघर गुड्या, तोरणें, चित्रविचित्र ध्वज उभारिले होते; ध्वजपटांच्या योगानें आकाश इतकें आच्छादित झालें होतें कीं, सूर्याचें किरण सुद्धां येण्यास मार्ग उरला नव्हता! राजमार्ग, बाजारचे रस्ते, बारीकसारीक वाटा, आणि घरांतील अगणें देखील अगदीं स्वच्छ करून त्यांवर चंदन, कुंकुम इत्यादिकांचे सडे घातले होते आणि फुलें, रांगोळ्या, अक्षता, दूर्वा, पल्लव इत्यादिकांनीं स्वस्तिकें व नानाविध रचना करून सर्वत्र अपूर्व शोभा आणिली होती. प्रत्येकानें आपल्या दारांत फळें, फुलें, ऊस, उदकाचे भरलेले कलश, पूजासाहित्य इत्यादि मंगल वस्तु ठेविल्या होत्या. श्रीकृष्ण आल्याची वर्दी पोहोंचतांच उग्रसेन, वसुदेव, अक्रूर, बलराम, प्रद्युम्न, सांब वगैरे मंडळीस अत्यानंद झाला व त्यास सामोरे जाण्याविषयीं त्यांची अगदीं धांदल उडाली. ते लगबगीनें एक शृंगारलेला हत्ती पुढें करून हातांत फळें, फुलें इत्यादि मंगल पदार्थ घेतलेल्या वेदघोष करणाऱ्या ब्राह्मणांस बरोबर घेऊन मोठ्या हर्षानें रथारूढ होऊन त्यास सामोरे गेले. त्या समयीं, ज्यांच्या कानांतील कुंडलांची प्रभा गालांवर पडली आहे, अशा अनेक वारांगना गाड्या, मेणे इत्यादिकांत बसून निघाल्या; तसेंच कुशल नट, नर्तक, सूत, मागध, बंदीजन, आणि उत्तम उत्तम गवई कृष्णलीला गात श्रीकृष्णास सामोरे निघाले.

त्या सर्वांची भेट घेऊन श्रीकृष्णानें त्यांचा यथायोग्य सत्कार केला. त्यानें कोणास वंदन, कोणास आलिंगन, कोणास करस्पर्श, कोणास हास्य, कोणास सप्रेम अवलोकन आणि कोणास इच्छित वरदान इत्यादिकांनीं वसुदेवापासून तों अगदीं अंत्यजापर्यंत सर्वांची यथायोग्य रीतीनें भेट घेऊन त्यांस आनंदित केलें. नंतर गर्गाचार्यांनीं व वसुदेवादि गुरुजनांनीं दिलेले आशीर्वाद नम्रपणें ग्रहण करून बंदीजन स्तुति करीत असतां, श्रीकृष्ण द्वारकेच्या राजवाड्यांत प्रविष्ट झाले. शौनका, श्रीकृष्ण राजमार्गांतून जात असतां त्यांस पाहण्याकरितां मोठमोठ्या श्रीमान गृहस्थांच्या स्त्रिया आपआपल्या वाड्यांच्या गच्चयांवर उभ्या राहिलेल्या होत्या. द्वारकावासी जनांना श्रीकृष्णदर्शन नित्य घडे, तथापि कितीही डोळे भरून पाहिलें तरी त्यांची त्याच्या दर्शनाविषयींची लालसा मुळींच कमी होत नसे; कारण लक्ष्मीचा ज्याच्या वक्षःस्थलीं वास, ज्याचें सौंदर्य म्हटलें म्हणजे मदनाहून श्रेष्ठ, ज्याच्या बाहूंच्या ठिकाणीं इंद्रादिक लोकपालांचें वास्तव्य, आणि ज्याचे चरणकमल म्हणजे भक्तांचें प्रत्यक्ष आश्रयस्थानच, अशा त्या श्रीकृष्णस्वरूपाचें वारंवार दर्शन घेतलें तरी तृप्ति होणार कशी? वर सूर्यबिंब, दोन्ही बाजूंस दोन पूर्णचंद्र, सभोंवतीं शुभ्र तारांगण, मध्यभागाचे ठायीं जवळ जवळ अशीं दोन इंद्रधनुष्यें, आणि आसमंतात् अचल विद्युल्लता अशी अघटित घटना घडून आली तर मेघ ज्याप्रमाणें शोभेल, त्याप्रमाणेंच, मस्तकीं देदीप्यमान छत्र, दोन्ही बाजूंस पूर्णचंद्रासारखीं दोन चामरें, तारांगणासारखी पुष्पवृष्टि, इंद्रधनुष्यांसारख्या कठांत धारण केलेल्या दोन वनमाला, आणि विजेसारखा पीतांबर ह्यांनीं

तो श्यामसुंदर श्रीकृष्ण शोभला! नंतर श्रीकृष्ण पितृगृहांत जाऊन आपल्या मातांस नम्रपणें वंदन करिता झाला. त्या वेळीं त्याच्या देवकी-प्रभृति सातही मातांनीं त्यास आलिंगन देऊन त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें; व अंकावर घेऊन प्रेमपान्ह्यानें व आनंदाश्रूंनीं त्यास स्नान घातलें.

**श्रीकृष्णाचा अंतःपुरप्रवेश.**

ऋषीहो, नंतर श्रीकृष्णांनीं आपल्या मंदिरांत प्रवेश केला. त्यांत निरनिराळे सोळा हजार एकशें आठ महाल होते. रुक्मिणी आदिकरून श्रीकृष्णाच्या सर्व स्त्रियांनीं, पति परदेशीं असतां धारण केलेल्या पतिव्रताधर्मनियमांचा †त्याग केला, आणि उत्साहयुक्त होऊन त्या सर्वजणी लगबगीनें उठून उभ्या राहिल्या. त्यांच्या मुखांवर आणि नेत्रांचे ठिकाणीं आनंद व लज्जा ह्यांचीं चिन्हें पूर्णपणें व्यक्त होत होतीं. त्या स्त्रियांचे मनोधर्म फार गंभीर होते. श्रीकृष्ण प्रवासांत असतां त्यास त्या अंतःकरणानेंच आलिंगन देत असत; आतां तो मंदिरांत आला, त्या वेळीं प्रथम त्यास केवळ लज्जायुक्त नेत्रकटाक्षांनींच त्यांनीं आलिंगिलें; आणि शेवटीं तो अगदीं समीप आल्यावर त्यास मोठ्या प्रेमानें प्रत्यक्ष आलिंगन दिलें. त्या समयीं नेत्रांत आलेले आनंदाश्रु त्यांनीं खालीं न पडूं देण्याविषयीं पुष्कळ यत्न केला, परंतु श्रीकृष्णदर्शनानें त्या अतिमोहित झाल्यामुळें त्यांस ते आवरले नाहींत! श्रीकृष्ण जरी त्या स्त्रियांचे समीप अगदीं एकांतांत होता, तरी त्यांस त्याचे चरणकमल मुळींच सोडावेतसे वाटेना. नवी वस्तु जितकी प्रिय वाटते, त्याहींपेक्षां श्रीकृष्णाचे चरण त्यांना जास्त प्रिय वाटत. उघडच आहे कीं, चंचलस्वभावाची जी लक्ष्मी, तिलाही ज्याच्या चरणकमलांचा वियोग सहन होत नाहीं, त्या चरणांस कोणती स्त्री सोडील बरें? ऋषीहो, पृथ्वीला दुष्ट राजांचा व त्यांच्या कोट्यवधि सैनिकांचा फार भार झाला होता, म्हणून त्या सर्वांचें श्रीकृष्णानें आपआपसांत वैमनस्य उत्पन्न करविलें, व स्वतः शस्त्ररहित राहून एकमेकांकरवीं एकमेकांचा नाश केला आणि नंतर, वायु जसा घर्षणाच्या योगानें वेळूमध्यें अग्नि उत्पन्न करवून ते सर्व जळून गेले म्हणजे स्वतः शांत होतो, तसा तो श्रीकृष्ण शांत झाला. तो प्राकृत जनांसारखा आपल्या रुक्मिणी वगैरे स्त्रियांसमवेत रममाण झाला खरा परंतु तो त्यांच्या अधीन मुळींच झाला नाहीं. ब्राह्मणहो, तरुण कामिनींचें सामर्थ्य मोठें अगाध असतें! मदनास दग्ध करून टाकणाऱ्या शंकरालाही त्यांनीं आपल्या सुंदर नेत्रकटाक्षांनीं व सलील हास्यानें पिनाक धनुष्य फेंकून देण्यास लाविलें; परंतु श्रीकृष्णाच्या मनास किंचित् सुद्धां विकार त्यांस उत्पन्न करवला नाहीं. परमात्म्याचा अवतार जो श्रीकृष्ण, तो खरोखर संगरहित असून केवळ लीलेनेंच विषयी पुरुषांसारखें वर्तन करितो; त्याचें खरें तत्त्व न ओळखणारा पुरुष, तो विषयासक्त आहे असें म्हणतो; परंतु बुद्धीला आनंद किंवा दुःख वाटलें तरी आत्म्यावर जसा कांहीं त्याचा परिणाम होत नाहीं, तसाच, प्रकृतीला कांहीं झालें तरी परमात्म्यावर त्याचा कांहीं परिणाम होत नाहीं. अहंकाराच्या वृत्ति जशा परमेश्वर आपल्या स्वाधीन आहे असें अज्ञानानें मानितात, तशाच श्रीकृष्णाच्या सर्व स्त्रिया, तो आपणांस वश असून विषयलंपट आहे असें मानीत.

---

† क्रीडां शरीरसंस्कारं समाजोत्सवदर्शनम् ॥
हास्यं परगृहे यानं त्यजेत् प्रोषितभर्तृका ॥
(याज्ञवल्क्यः)

(ज्या स्त्रीचा पति देशांतरीं गेला असेल, तिनें, क्रीडा करणें, शरीरसंस्कार (न्हाणें माखणें) करणें, उत्सवादि अवलोकन करणें, हंसणें आणि दुसऱ्याच्या घरीं जाणें ह्या गोष्टी करूं नयेत.)

# अध्याय बारावा.

—:०:—

## परीक्षिताचें चरित्र.

शौनक म्हणाले:—सूता, अश्वत्थाम्यानें हताश होऊन पांडवकुलाचा सर्वस्वी नाश व्हावा ह्या हेतूनें ब्रह्मास्त्र सोडिलें; त्या वेळीं तें अस्त्र, परीक्षित उत्तरेच्या गर्भांत होता तेथें गेलें; व तें त्या गर्भाचा नाश करीत असतां भगवान श्रीकृष्णांनीं त्या गर्भस्थ परीक्षिताचें रक्षण केलें, येथपर्यंत वृत्तांत आम्हीं ऐकिला. आतां, त्या महाभाग्यवान परीक्षिताचें जनन कोणत्या प्रकारें झालें, त्यानें कोणकोणतीं कृत्यें केलीं, शुकाचार्यांनीं त्यास ब्रह्मोपदेश केव्हां केला, त्याचा देह कसा विसर्जन झाला, आणि देहविसर्जनानंतर तो परलोकास कसा गेला, हा सर्व वृत्तांत तूं आम्हांस कृपा करून सांग.

सूत म्हणतात:—ऋषींहो, धर्मराजाचें चित्त श्रीकृष्णसेवेच्या योगानें सर्व विषयांपासून निवृत्त झालें होतें. त्यानें प्रजेचें पुत्रवत् पालन केलें. श्रीकृष्णसेवेंत अंतःकरण तल्लीन झाल्यामुळें धर्मराजास स्त्री, बंधु, राज्यवैभव, यज्ञयाग इत्यादि कोणतेही विषय प्रिय वाटले नाहींत. भुकेलेल्या मनुष्यास ज्याप्रमाणें केवळ अन्नाशिवाय दुसरें कांहींही प्रिय वाटत नाहीं, त्याप्रमाणें धर्मराजास श्रीकृष्णभक्तीशिवाय इतर कोणतेही विषय प्रिय वाटले नाहींत; असो. आतां

### परीक्षिताचें जन्मवृत्त

सांगतों, तें ऐका: परीक्षित हा गर्भांत ब्रह्मास्त्रानें होरपळून जाऊं लागला, त्या वेळीं तेथें त्याला एका अलौकिक पुरुषाचें दर्शन झालें. त्याचें शरीर अंगुष्ठाएवढें असून देदीप्यमान होतें; सुवर्णासारखा तेजस्वी मुकुट त्याच्या मस्तकीं झळकत होता; त्याचा वर्ण श्याम असून त्यानें विद्युल्लतेसारखीं वस्त्रें परिधान केलीं होतीं; त्यास चार आजानुबाहु होते; प्रकाशमान कुंडलांच्या योगानें तो फार शोभायमान दिसत होता; आणि त्याचे नेत्र आरक्त असून त्याच्या हातांत गदा होती. अशा प्रकारचा तो पुरुष आपल्या सभोंवतीं फिरत असून वरचेवर गदेच्या योगानें त्या ब्रह्मास्त्राचें तेज क्षीण करीत आहे, असें त्या गर्भस्थ परीक्षिताच्या दृष्टीस पडलें. तेव्हां हा कोण असावा, असा त्या दहा महिन्यांच्या गर्भस्थ बालकास विचार पडला, आणि तो त्या भगवत्स्वरूपाकडे पहात असतां, तो धर्मरक्षक आणि सर्वव्यापी भगवान त्या ब्रह्मास्त्राचें तेज नष्ट करून तेथेंच गुप्त झाला. नंतर सुलग्नकालीं, पांडुराजाच्या वंशाचा आधार असा तो परीक्षित जन्म पावला. त्या वेळीं धर्मराजास फार संतोष झाला; त्यानें कृपाचार्य, धौम्य इत्यादि श्रेष्ठ ब्राह्मणांकरवीं पुण्याहवाचन करवून त्याचा जातकर्मसंस्कार केला; व पुत्रोत्सवानिमित्त ब्राह्मणांस हत्ती, घोडे, गाई, सुवर्ण, भूमि इत्यादि दानें दिलीं. तेव्हां संतुष्ट झालेले ते ब्राह्मण त्या विनयशील धर्मराजास म्हणाले, "धर्मराजा, कुरुवंशाचा केवळ आधार असा हा बालक दैवबलानें नष्ट होत असतां, श्रीविष्णूचा अवतार जो श्रीकृष्ण त्यानें ह्याचें रक्षण करून तुमच्यावर अनुग्रह केला, म्हणून ह्याचें विष्णुरात ( विष्णूनें दिलेला ) हें नांव प्रसिद्ध होईल; आणि हा महाभगवद्भक्त होऊन ह्याची कीर्ति दिगंत गाजेल."

धर्मराज म्हणाला:—हे ब्राह्मणश्रेष्ठहो, हा बालक आपल्या वंशांत झालेल्या थोर पुरुषांप्रमाणें उदार मनाचा आणि पवित्र कीर्तिमान असा होईल काय? धर्मराजाचा हा प्रश्न श्रवण करितांच त्या ब्राह्मणांनीं

### परीक्षिताचें जातक

वर्तवून तें धर्मराजास सांगितलें: ब्राह्मण म्हणाले, "हे कुंतीपुत्रा, हा पुत्र मनुपुत्र इक्ष्वाकूसारखा प्रजासंरक्षक, दाशरथि रामचंद्राप्रमाणें ब्रह्मण्य व सत्यप्रतिज्ञ, शिबि राजासारखा दाता, व शरणागत-

पालक आणि दुष्यंतपुत्र भरतासारखा यज्ञ करून कीर्ति वाढविणारा होईल; हा सहस्रार्जुनाप्रमाणें आणि पार्थाप्रमाणें धनुर्धारी, अग्नीसारखा महान् तेजस्वी, समुद्राप्रमाणें गंभीर आणि सिंहासारखा पराक्रमी होईल; तसेंच हा हिमालयासारखा साधूंना आश्रय देणारा, पृथ्वीसारखा सहनशील, ब्रह्मदेवासारखा समदृष्टि, आणि शंकराप्रमाणें प्रसाद करणारा होईल; त्याचप्रमाणें हा श्रीहरीसारखा सद्गुणनिधान, रंतिदेवासारखा उदार आणि ययाति राजासारखा धार्मिक होईल; हा बळि राजासारखा धैर्यवान व प्रल्हादासारखा सदाचरणी होईल; हा पुष्कळ अश्वमेध करून गुरुजनांची निरंतर सेवा करील; हा निंद्य आचरण करणारास शासन करणारा होईल; आणि पृथ्वी व धर्म ह्यांच्या कैवारानें कलीचा निग्रह करील. ऋषिपुत्राच्या शापानें तक्षकापासून आपणांस मृत्यु येणार हें श्रवण करून हा सर्वसंगपरित्याग करून श्रीहरीस शरण जाईल; आणि, हे राजा, हा शुकाचार्यापासून ज्ञान संपादन करून आपल्या देहाचा गंगेंत त्याग करील, व उत्तम अशा श्रीविष्णुपदास प्राप्त होईल." ऋषीहो, ह्याप्रमाणें त्या विद्वान ब्राह्मणांनीं जातक वर्तविलें. नंतर धर्मराजानें केलेली पूजा ग्रहण करून ते सर्व ब्राह्मण आपआपल्या आश्रमास निघून गेले. ऋषीहो, आतां त्यास

**परीक्षित हें नांव मिळण्याचें कारण**

सांगतों: गर्भांत ज्यानें रक्षण केलें, तो ह्या लोकांत आहे किंवा नाहीं ह्याचें तो बालक प्रत्येकाच्या मुखाकडे पाहून परीक्षण करी; म्हणून त्याचें नांव "परीक्षित" असें पडलें, व ह्याच नांवानें तो प्रसिद्धीस आला. दिवसानुदिवस तो बालक शुक्लपक्षांतील चंद्रकलेप्रमाणें धर्मराजाच्या आनंदास वृद्धिंगत करीत मोठा होत चालला.

**धर्मराजाचा अश्वमेध यज्ञ.**

सूत सांगतात:—पुढें, ज्ञातिवधाचें पाप क्षालन करण्याकरितां अश्वमेध यज्ञ करावा असें धर्मराजास वाटलें; परंतु खजिन्यांत द्रव्य शिलक नव्हतें, आणि कर व दंड ह्या साधनांनीं द्रव्य मिळवावें ही गोष्ट धर्मराजास रुचेना; तेव्हां तो मोठ्या चिंतेंत पडला. तें जाणून श्रीकृष्णानें प्रेरणा केल्यावरून भीमार्जुनादिक बंधु उत्तर दिशेकडे गेले. त्यांनीं तेथें जाऊन, पूर्वी त्या ठिकाणीं मरुत राजानें यज्ञ केला होता, तेव्हां ब्राह्मणांनीं सुवर्णपात्रादि द्रव्य टाकून दिलें होतें तें सर्व आणिलें. त्या द्रव्यानें यज्ञसामुग्री संपादन करून धर्मराजानें तीन अश्वमेध यज्ञ केले, व त्या योगानें भगवंतास संतुष्ट केलें. धर्मराजानें यज्ञाकरितां श्रीकृष्णास मुद्दाम बोलावून आणिलें होतें, व ब्राह्मणांच्या साहाय्यानें श्रीकृष्णानेंच धर्मराजाकडून हे तीन अश्वमेध यज्ञ करविले होते. नंतर तो परमात्मा पांडवांच्या प्रेमास्तव पुष्कळ दिवस हस्तिनापुरांत राहिला; व पुढें धर्म, भीम, नकुल, सहदेव, द्रौपदी इत्यादि सर्वांचा त्यानें निरोप घेतला, आणि अर्जुनास बरोबर घेऊन यादवांसह तो द्वारकेस परत गेला.

## अध्याय तेरावा.

### तीर्थयात्रेनंतर विदुराचें हस्तिनापुरीं आगमन.

सूत म्हणतात:—ऋषीहो, विदुराचा तीर्थयात्रा करण्याचा मुख्य हेतु, जीवात्म्याची शेवट गति कशा प्रकारें होते हें कळावें हा असल्यामुळें, जेव्हां त्या मैत्रेय ऋषींपासून, श्रीकृष्ण हीच आपली अखेर गति आहे असें त्याला ज्ञान झालें, तेव्हां तो तीर्थयात्रा सोडून देऊन परत हस्तिनापुरांत आला. विदुरानें मैत्रेयास कर्मयोगादिकांच्या ज्ञानाविषयीं जे प्रश्न विचारले होते, त्यांपैकीं तीन चार प्रश्नांच्या उत्तरांनीच विदुराच्या मनांत इंद्रियचालक परमात्म्याविषयीं

दृढभक्ति उत्पन्न झाली, व आणखी उत्तरें ऐकण्याची त्यास अवश्यकता वाटली नाहीं. आपला आप्त विदुर तीर्थयात्रा करून परत आला असें ऐकतांच धर्मराज, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव, धृतराष्ट्र, युयुत्सु, संजय, कृपाचार्य, व कुंती, गांधारी, सुभद्रा, उत्तरा, द्रोणाचार्याची स्त्री कृपी, आणि तशाच इतर राजस्त्रिया व दुसऱ्या स्त्रिया आपापल्या मुलांबाळांसुद्धां मोठ्या आनंदानें त्यास सामोऱ्या गेल्या. त्या वेळीं, शरिरांतून निघून गेलेला प्राणच परत आला असें त्यांस वाटलें. नंतर विधिपूर्वक भेटी होऊन नमस्कार वगैरे झाले. त्या वेळीं, फार दिवस विरह झाल्यामुळें सद्गदित होऊन त्यांच्या नेत्रावाटे प्रेमाश्रूंचे पूर वाहूं लागले. नंतर धर्मराजानें विदुरास आसनावर बसवून त्याची पूजा केली.

पुढें भोजनादिक होऊन स्वस्थपणा मिळाल्यावर, धृतराष्ट्रादि सर्वजण बसले असतां धर्मराजानें विदुरास म्हटलें, "विषभक्षण, लाक्षागृहदाह इत्यादि अनेक प्रसंगांतून मातेसह आम्हांस आपण सोडविलें, व आपल्या कृपाछत्राखालीं वाढविलें, ती सर्व आठवण आपणांस आहे ना? हे श्रेष्ठा, आपण भूमंडलावर फिरत असतां आपली दिनचर्या कोणत्या प्रकारें चालविली? आपण पृथ्वीवरील कोणतीं कोणतीं तीर्थें करून आलां? आपल्यासारख्या महात्म्यांच्या ठिकाणीं श्रीकृष्ण परमात्मा वास करीत असल्यामुळें आपण स्वतः तीर्थें आहां. तीर्थांना पावनत्व प्राप्त होतें तें आपल्यासारख्यांमुळेंच. हे साधो, आमचें हित करणारे यादव श्रीकृष्णासहित खुशाल आहेत ना? आपली व त्यांची गांठ पडली होती काय? आपण त्यांच्याबद्दल कांहीं वर्तमान ऐकिलें आहे काय?"

धर्मराजाचे हे प्रश्न ऐकून, जें जें वर्तमान जसजसें घडून आलें होतें, तसतशा क्रमानें तें सर्व विदुरानें त्यास निवेदन केलें; मात्र यादवकुलाचा नाश झाल्याबद्दलचें वर्तमान त्यानें सांगितलें नाहीं. उघडच आहे कीं, जो दुःखकारक प्रसंग आपोआप घडून येतो, तो मनुष्यास सहन करण्यास फार जड जातो. ह्याकरितां, यादवकुलाच्या नाशाचें वर्तमान पांडवांस सहन होणार नाहीं, व त्यांस दुःख झालें म्हणजे तें आपणांस पाहवणार नाहीं असें मनांत आणून, तेवढी गोष्ट मात्र विदुरानें वगळली, व बाकीची हकीगत सांगितली. पुढें कांहीं कालपर्यंत विदुर तेथेंच राहिला. पांडव त्याच्या सेवेला तत्पर असल्यामुळें त्यास देवांप्रमाणें सुख झालें. आपला ज्येष्ठ बंधु धृतराष्ट्र ह्यास त्यानें ब्रह्मज्ञानाचा उपदेश चालविला. विदुराचा हा नित्यक्रम पाहून सर्वांच्या ठिकाणीं त्याविषयीं अधिकाधिकच प्रेम वाढत चाललें. आतां, विदुर हा शूद्र असूनही त्यानें ब्रह्मज्ञानाचा उपदेश कसा केला असें म्हणाल, तर ऐका: ऋषीहो, विदुर हा केवळ लौकिकदृष्टीनें शूद्र होता; परंतु वास्तविक हा यमधर्माचा अवतार होय. मांडव्य* ऋषी-

* मांडव्य ऋषि हे आपल्या आश्रमद्वारासंनिध असलेल्या वृक्षाजवळ तपश्चर्या करीत होते. एके दिवशीं कांहीं चोर चोरी करून त्या ठिकाणीं आले, आणि तें द्रव्य त्या आश्रमांत टाकून आपण स्वतःही त्या ठिकाणीं लपून बसले. मागून, राजसेवक त्यांचा सुगावा काढीत येत होते तेही तेथें येऊन पोहोंचले; आणि "चोर कोणीकडे गेले" म्हणून त्यांनीं ऋषींस विचारलें. तथापि ऋषींनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हां ते तो आश्रम शोधूं लागले, तों ते चोर आणि तें द्रव्य हीं दोन्ही त्यांना तेथें सांपडलीं. अर्थात् त्यांनीं मांडव्य ऋषींसह त्या सर्व चोरांस बांधून राजापुढें नेऊन उभें केलें. तेव्हां राजानें त्या सर्वांस सुळीं देण्याविषयीं आज्ञा केली. त्याप्रमाणें ह्यांनाही सुळी देण्यांत आलें; पण आपल्या तपःसामर्थ्यानें हे तसेच जिवंत राहिले. पुढें राजाला वस्तुस्थिति कळून आल्यावर त्यानें ह्यांना सुळावरून उतरवून ह्यांची क्षमा मागितली. नंतर हे यमधर्माकडे जाऊन त्यास पुसूं लागले कीं, "माझ्या कोणत्या कर्मामुळें मला हें दुःख भोगावें लागलें तें सांग!" यमधर्मानें

नें यमास 'तूं शूद्र होशील' असा शाप दिल्यावरून तो विदुररूपानें शंभर वर्षेपर्यंत भूतलीं राहिला होता. ह्या अवधींत अर्यमा नामक पितरानें यमाचा अधिकार चालविला होता; असो.

धर्मराजास राज्य मिळालें; अखिल संपत्ति प्राप्त झाली; परीक्षितासारखा विनयसपन्न व पराक्रमी नातू वंशीचा नांवलौकिक वाढविण्यासारखा मोठा झाला; तसेंच, भीमार्जुनादिक बंधु इंद्रादिक लोकपालांप्रमाणें आपापलीं कामें तत्परतेनें करीत होते, तें सर्व पाहून धर्मराजास फार आनंद झाला, आणि त्याचे आप्त गृहसौख्यांत निमग्न होऊन परमेश्वरास विसरून गेले. ह्याप्रमाणें बहुत दिवस चाललें असतां अकस्मात् फार भयंकर काल समीप येऊन ठेपला, तेव्हां विदुरानें धृतराष्ट्रास उपदेश केला.

## विदुराचा धृतराष्ट्रास उपदेश

विदुर म्हणाला:—राजा, मोठा कठिण काल प्राप्त झाला आहे. ह्याकरितां, आतां हा मायामोह लवकर सोडून दे. राजा, आतां, येणाऱ्या प्रसंगापासून केव्हांही व कोणाकडूनही सुटका होणार नाहीं. काळ हा सर्वांचा नियंता आहे. आपणां सर्वांस निमूटपणें त्याच्या स्वाधीन झालें पाहिजे. एकदा त्याच्या तडाक्यांत सांपडल्यावर, प्रत्यक्ष शरिरांत राहणारे जे पंचप्राण त्यांचाही जर क्षणांत वियोग होतो, तर धन, पुत्र इत्यादिकांची काय कथा? राजा, आतां त्वां गृहत्याग करावा हेंच उचित. पहा—मातापिता, भाऊबंद, पुत्रपौत्र, आप्त, सुहृद्, इष्ट, मित्र वगैरे सर्व मरून गेले; तुझें वयही होऊन गेलें; शरीर वार्धक्यानें जर्जर झालें; तुला राहण्याला तुझ्या हक्काची जागा सुद्धां नाहीं; आणि इतकें असूनही परक्याच्या घराचा आश्रय करून तूं राहूं इच्छितोस, तेव्हां तुला काय म्हणावें? अरेरे! केवढीहो प्राण्याला जगण्याची हांव! राजा, असल्या क्षुद्र आशेमुळेंच पांडवांनीं दिलेलें अन्न तूं कुत्र्याप्रमाणें खातोस! राजा, पांडव तुला मोठ्या ममतेनें अन्न देत असतील नाहीं बरें! अरे, पांडवादिकांस तुम्हीं किती दुःख दिलें! त्यांना जाळून तर टाकण्याचा तुम्हीं प्रयत्न केला! विष तर चारलें! द्रौपदीला भरसभेंत आणून तिची विटंबना करण्यास चुकलां नाहीं! त्यांस घरदार नाहींसें करून सोडिलें! आणि इतकें केल्यावरही आतां तूं त्यांच्या अन्नावर उदरपूर्ति करावीसना? राजा, इतक्या नीच वृत्तीनें शरीर राखिलेंस तरी तें किती कालपर्यंत राहील ह्याचा विचार कर. तुझी इच्छा नसतांही वार्धक्यामुळें जीर्ण वस्त्राप्रमाणें तें केव्हां तरी नष्ट होईल इकडे लक्ष दे. जो कोणी हळूहळू आपल्या आप्तइष्टांस न कळूं देतां संसारांतून निवृत्त होऊन धनपुत्रादिकांचा मोह सोडून देतो, व ह्या क्षणभंगुर देहाचा त्याग करितो, त्यालाच थोर म्हणतात. राजा, संसारापासून शाश्वतसुखाची आशा करणें व्यर्थ आहे ही गोष्ट कित्येकांस स्वतःच्या ज्ञानानें कळते, व कित्येकांस ही कळण्यास सत्पुरुषांच्या उपदेशाची अवश्यकता असते; कशाही प्रकारें कळो, ती कळल्यावर जो कोणी संसारास कंटाळतो, व आत्मज्ञानांत निमग्न होऊन अंतर्यामी परमात्म्याचें ध्यान करीत सर्वसंगपरित्याग करून घरांतून निघून जातो, तो सर्व पुरुषांत श्रेष्ठ होय. ह्याकरितां, राजा, तूं आतां उत्तर दिशेस प्रयाण कर. हा तुझा बेत इतर कोणास कळूं देऊं नको.

उत्तर केलें, "बालपणीं आपण पतगाच्या पुच्छामध्यें एकदा कांटा टोंचला होता, त्याचें हें फल होय." हें ऐकून मांडव्य ऋषीस फार राग आला, आणि ते म्हणाले, "बाराव्या वर्षापर्यंत बालकानें कांहीं केलें तरी तो दोष होत नाहीं; कारण तावत्कालपर्यंत त्याला धर्मशास्त्र माहित नसतें. असें असतां ज्या अर्थी तूं मला हा भयंकर दंड केला आहेस, त्या अर्थी तुला मर्त्यलोकीं शूद्रयोनीमध्यें जन्म घडेल."

भार. आदि. अ. १०७।८

ते तुला अनेक प्रकारांनीं मोडा घालतील. येथून पुढें प्राप्त होणारा काळ धैर्य, दया इत्यादि मनुष्यांच्या गुणांचा ऱ्हास करील. मग तुझ्या हातून शाश्वतसुखाचा प्रयत्न होणें कठिण आहे. ह्याकरितां अगदीं विलंब करूं नको.

### धृतराष्ट्र व गांधारी ह्यांचा गृहत्याग.

ह्याप्रमाणें विदुराचा बोध श्रवण करून धृतराष्ट्रानें मनाचा मोठा निग्रह केला, व आप्तांविषयीं मायापाश तोडून टाकून तो विदुराबरोबर घरांतून बाहेर पडला. त्याच्याबरोबर त्याची परमपतिव्रता स्त्री गांधारीही बाहेर पडली. त्या सर्वांनीं हिमाचलाची वाट धरली. शूरांस ज्याप्रमाणें युद्धभूमीकडे जाण्याचा मोठा हर्ष होतो, त्याप्रमाणें त्यांस तपोभूमीकडे जाण्याविषयीं मोठा हर्ष झाला.

### धर्मराजास खेद.

इकडे धर्मराजानें प्रातःकालीं संध्यावंदन व नित्यहोम करून आणि तीळ, गाई, भूमि व सुवर्ण हीं दानें ब्राह्मणांस नित्यनियमाप्रमाणें देऊन वडिलांस नमस्कार करण्यासाठीं अंतर्गृहांत जाऊन पाहिलें, तों तेथें विदुर, धृतराष्ट्र व गांधारी ह्यांपैकीं कोणीच त्याच्या दृष्टीस पडलें नाहीं; तेथें संजय मात्र होता. त्यास धर्मराजानें मोठ्या खेदानें विचारिलें, "संजया, बाबा कोठें गेले रे! अरे, ते फार वृद्ध व अंध आहेत! अरेरे, गांधारी आईही येथें नाहीं! तिच्यासारखी पुत्रदुःखानें विव्हल झालेली स्त्री ह्या जगांत कोणीच रे नाहीं! अरे, विदुर काकाही गेले काय! हाय हाय! माझ्या मूर्खपणामुळें माझ्या हातून कांहीं अपराध झाल्याकारणानें धृतराष्ट्र व गांधारी ह्यांनीं गंगेंत प्राणत्याग तर केला नाहीं ना? पंडु राजा मरण पावल्यावर धृतराष्ट्र व विदुर ह्यांनीं मोठ्या ममतेनें आम्हांस लहानाचें मोठे केलें, अनेक संकटांतून सोडविलें आणि आतां ते कोठें नाहींतसे झाले बरें!"

सूत म्हणतातः—ऋषीहो, संजय व धृतराष्ट्र ह्यांचा केवढा तरी स्नेह म्हणून सांगावा! संजयास धृतराष्ट्राचा वियोग कधींच माहीत नव्हता. ह्यास्तव, अकस्मात् झालेल्या त्या वियोगजन्य दुःखामुळें त्याचेंही हृदय विदीर्ण होऊन गेलें होतें, म्हणून त्याच्यानें धर्मराजास तत्काळ उत्तर देववलें नाहीं. नंतर दुःखांचा वेग कांहींसा कमी झाल्यावर त्यानें नेत्रांतील अश्रु पुशिले, व विवेकानें मन आवरून धरून, अंतर्यामीं धृतराष्ट्राचें स्मरण करीत करीत तो धर्मराजास म्हणाला, "हे कुळदीपका धर्मा, तुझ्या उभयतां चुलत्यांनीं व गांधारीनें काय विचार केला आहे हें मला समजलें नाहीं. ते महात्मे मला न कळवितां कोठें तरी निघून गेले हे खास!" असें म्हणून संजय फिरून शोकाकुल झाला.

### नारद मुनींचा धर्मराजास बोध.

ह्याप्रमाणें उभयतां शोक करीत असता भगवान नारद मुनि तुंबुरूसहवर्तमान तेथें प्राप्त झाले. धर्मराज शोकभरानें व्याप्त असल्यामुळें त्याच्यानें त्यांचें पूजन करवलें नाहीं; म्हणून त्यांचा केवळ उत्थापनानेंच सत्कार करून तो त्यांस म्हणालाः "भगवन्, आपली ह्या वेळीं भेट झाली हें आमचें मोठें भाग्य होय. मुने, विदुर व धृतराष्ट्र आणि पुत्रशोकानें दीन झालेली गांधारी हीं येथून कोठें गेलीं हें समजत नाहीं. त्यांच्या वियोगामुळें माझें मन अपार शोकसागरांत बुडून गेलें आहे. ह्यांतून परतीरास लावण्यास आपल्यावांचून दुसरा कोणीही समर्थ नाहीं. ह्याकरितां आपण कृपा करून तीं कोठें गेलीं आहेत हें सांगा." हें ऐकून नारद म्हणतातः—बा धर्मा, हें सर्व जग परमेश्वराच्या अधीन आहे. ह्याकरितां, धृतराष्ट्रादिकांविषयींच काय, पण कोणाविषयींही तूं शोक करूं नको. पहा—इंद्रादि लोकपालांसहवर्तमान चतुर्दश लोक ज्या ईश्वरानें नेमून दिलेलीं कामें करितात, तोच ईश्वर प्राणिमात्राचा संयोग

व वियोग घडवितो. नाकांत वेसण घालून दाव्यानें बांधलेले बैल ज्याप्रमाणें आपल्या धन्याचीं ओझीं निमूटपणें वाहतात, त्याचप्रमाणें, वर्णाश्रमधर्मांनीं बद्ध झालेले सर्व लोक परमेश्वरानें नेमून दिलेलीं अनेक कामें निमूटपणें करीत असतात. बुद्धिबळादि खेळांमध्यें त्यांतील उपकरणांचा संयोग अथवा वियोग जसा खेळणाराच्या मर्जीप्रमाणें होतो, तसा मनुष्यांचा संयोग किंवा वियोग जगन्नियंत्याच्या मर्जीप्रमाणें होतो. ह्याकरितां, राजा, तुला शोक करणें अगदीं योग्य नाहीं. तुझें जर असें म्हणणें असेल कीं, हे सर्व प्राणी नित्य आहेत; ह्यांचा नाश कधींही होणें नाहीं; अथवा ते देही असल्यामुळें नाशवंत आहेत; किंवा सर्वच ब्रह्मस्वरूपी असल्यामुळें ते ध्रुव किंवा अध्रुव आहेत असें दोन्हीं प्रकारेंही म्हणतां येत नाहीं; तर कोणत्याही दृष्टीनें पाहिलें असतां जीवांविषयीं शोक करणें तुला उचित नाहीं. शोकाला अज्ञानमूलक स्नेह हाच कारण आहे. ह्याकरितां, अनाथ व दीन झालेलीं धृतराष्ट्र व गांधारी हीं माझ्यावांचून कशीं जगतील ही भ्रांति टाकून दे. ही भ्रांति तुझ्या अज्ञानाचा परिणाम होय. अरे, हें जड शरीर सर्वथा पराधीन व पंगु आहे. पूर्वसंचितास अनुसरून ह्याचें जन्म होतें; त्यास अनुसरूनच कांहीं कालपर्यंत ह्याचें ह्या लोकीं वास्तव्य घडतें; व सत्त्व, रज आणि तम ह्या गुणांस अनुसरून ह्याचीं सर्व ऐहिक कृत्यें घडून येतात. असल्या ह्या पराधीन व क्षुद्र देहाच्यानें दुसऱ्याचें रक्षण कसें करवेल? हें पहा—अजगरानें गिळलेल्या मनुष्यानें दुसऱ्यास वांचवीन असें म्हणणें म्हणजे निवळ मूर्खपणा नव्हे काय? राजा, प्राणी दुसऱ्याचें रक्षण करितात असें म्हणण्यापेक्षां, स्वतःच्या रक्षणाकरितां दुसऱ्याचा नाश करितात असें म्हणणें विशेष प्रशस्त होय. पहा—हस्तरहित जे पश्वादिक प्राणी, ते हस्तयुक्त मनुष्यादिकांचें जीवन आहेत; चरणरहित जीं तृणादिक, तीं गाई वगैरे चतुष्पाद प्राण्यांचें जीवन आहेत; कृमिकिटकादि क्षुद्र जंतु पक्ष्यादिकांचें जीवन आहेत; एवंच जीवच जीवांच्या उपजीविकेस कारण आहेत. ह्यास्तव, राजा, अखिल प्राणिकोटींत व वस्तुसमुदायांत द्वैत मानण्यापेक्षां अद्वैतच मानणें अधिक श्रेयस्कर होय. हस्तपादादिकांनीं रहित व सहित असें हें स्थावरजंगमात्मक जग स्वतः भगवन्मय आहे. तो भगवान मायेमुळें सर्वांच्या अंतर्यामीं भोक्त्याच्या स्वरूपानें व बाहेर भोग्य विषयांच्या रूपानें भासतो. राजा, तोच हा षड्गुणैश्वर्यसंपन्न प्रभु सांप्रतकालीं ह्या भूमीवर दुष्टांच्या नाशाकरितां अवतीर्ण झाला आहे. त्यानें आपलें कृत्य बहुतेक संपविलें आहे. यादवकुलाचा क्षय करून टाकण्याचें मात्र कृत्य अवशिष्ट राहिलें आहे. तेंही तो आतां लवकरच करील. तर, हे धर्मा, जोंपर्यंत श्रीकृष्ण भूतलीं आहे, तोंपर्यंत तुम्हीं येथें रहावें हें चांगलें. राजा, धृतराष्ट्र आपली स्त्री गांधारी व भ्राता विदुर ह्यांसह हिमाचलाच्या दक्षिणेस ऋषींच्या आश्रमास गेला आहे. तेथें सप्तस्रोत नांवाचें एक तीर्थ आहे. कारण, त्या स्थलीं परमपवित्र भागीरथीचे सात ऋषींच्या तृप्तीकरितां सात प्रवाह झाले आहेत. त्या तीर्थाचे ठिकाणीं धृतराष्ट्र तिन्ही कालीं स्नान करून, व यथाविधि होमहवनादि कर्मे करून राहिला आहे. तो केवळ उदक सेवन करितो. त्याची चित्तवृत्ति शांत झाली असून त्याच्या सर्व वासना नष्ट झाल्या आहेत. त्यानें आसन साध्य करून व प्राणांचा निरोध करून त्वचा, चक्षु, श्रोत्र, जिव्हा, घ्राण व मन हीं सहा इंद्रियें अंतर्मुख केलीं आहेत, आणि श्रीहरीच्या चिंतनानें सत्त्व, रज व तम हे झाडून टाकिले आहेत. राजा, धृतराष्ट्राची सांप्रतची स्थिति अगदीं निराळ्या प्रकारची झाली आहे. अहंकाराला आश्रय देणारें जें मन, त्याचा त्यानें

बुद्धीशीं योग केला असून, त्या बुद्धीचा, सर्वसाक्षी जें ब्रह्म त्यांत मोक्ष केला आहे; ह्यामुळें, ज्याप्रमाणें घटांतील आकाशाचा महाकाशाशीं योग व्हावा, त्याप्रमाणें त्यानें आपल्या जीवाचा ब्रह्माशीं योग करून टाकिला आहे. आतां त्याला मायेपासून होणारे कोणतेही विकार भोगावे लागणार नाहींत. पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें ह्यांचा निरोध केला असल्यामुळें व आहारादिक वर्ज्य केल्यामुळें, तो आतां चलनवलन न पावतां वृक्षाच्या खोडाप्रमाणें अचल राहिला आहे. धर्मा, सर्वसंगपरित्याग करणाऱ्या त्या ज्ञानी पुरुषाला आतां विघ्न करूं नको. तो आजपासून पांचवे दिवशीं देह ठेवील; आणि तो देह योगाग्नीनें स्वतःच दग्ध होईल. दक्षिण, गार्हपत्य आणि आहवनीय ह्या तीन अग्नींच्या योगानें पर्णकुटिका व धृतराष्ट्राचा देह जळूं लागलेला पाहून, बाहेर असणारी साध्वी गांधारी त्या अग्नींत प्रवेश करील. हे कुरुश्रेष्ठा, धृतराष्ट्र व गांधारी ह्यांचें तें आश्चर्यजनक निर्याण पाहून, बंधूस सद्गति मिळाल्याबद्दल विदुरास आनंद होईल, व त्याच्या मरणामुळें कांहींसा शोकही होईल, आणि अखेरीस तो तेथून दुसऱ्या तीर्थास गमन करील.

ह्याप्रमाणें बोलून तुंबुरूसहवर्तमान नारद मुनि स्वर्गास गेले, व त्यांच्या भाषणाचें मनन करून धर्मराजानें शोकाचा त्याग केला.

# अध्याय चौदावा.

—:०:—

## धर्मराजाचें औदासिन्य.

सूत म्हणतातः—ऋषीहो, पुढें, यादवांना भेटावें व श्रीकृष्ण परमात्म्याचें दर्शन घेऊन त्याचें कुशल आणावें म्हणून धर्मराजानें अर्जुनास द्वारकेस पाठविलें. तो तिकडे जाऊन पुष्कळ काल लोटला तरी परत आला नाहीं; तेव्हां धर्मराजास फार काळजी उत्पन्न झाली. इतक्यांत

**हस्तिनापुरांत भयंकर उत्पात**

होऊं लागले. ऋतूंचे धर्म पालटले; लोकांची बुद्धि भ्रष्ट झाली; षड्रिपु अनावर झाले; असत्य माजलें; व्यवहारांत सर्वत्र अप्रामाणिकपणा दिसूं लागला; मित्र मित्रांस ठकवूं लागले; आणि आईबाप, आप्तसोयरे, नवराबायको हीं आपसांत कलह करूं लागलीं! असा भयंकर बदल झालेला पाहून धर्मानें भीमास म्हटलें, "भीमा, अर्जुनाला द्वारकेस जाऊन सात महिने झाले तरी तो अजून माघारा येत नाहीं ह्यावरून नारद मुनींनीं सांगितलेला भयंकर काल तर आला नाहीं ना? अरे, असें असेल तर भगवान श्रीकृष्ण आपलें अवतारकृत्य संपवून आपला देह विसर्जन करतील. पहा—आपणांस सर्व लक्ष्मी, राज्य, स्त्रिया, प्राण, कुल, प्रजा, जय व यज्ञयागादिक हीं श्रीकृष्णाच्याच कृपेनें प्राप्त झालीं. भीमा, विजा पडणें, धरणीकंप होणें, वामनेत्र स्फुरण पावणें हीं सर्व चिन्हें ठीक नाहींत. अरे, आतां आपल्या बुद्धीस अत्यंत मोह उत्पन्न करणारें महाभय लवकरच प्राप्त होणार ह्यांत संशय नाहीं. पहा, वाम मांड्या, नेत्र, बाहु हे वारंवार स्फुरण पावत आहेत; व ऊर थरथर कांपत आहे! ह्या सर्व अरिष्टांचें फल लवकरच मिळणार हें खचीत. बाबारे, दुश्चिन्हें एक का दोन म्हणून सांगूं! ही पहा भालू—मुखावाटे अग्नि ओकत असून सूर्योदय होतांना त्याकडे पाहून दीर्घस्वर काढीत आहे! हें पहा कुत्रें माझ्याकडे पाहून एकसारखें रडूं लागलें! गाई वगैरे कधीं डाव्या जाणें चांगलें नाहीं, त्या आज डाव्या चालल्या आहेत! हीं पहा गर्दभें मला उजवीं जात आहेत! भीमा, घोडे नेत्रांतून अश्रु ढाळीत आहेत तें पाहिलेंस का? अरे, हा कर्कश शब्द करणारा कपोत म्हणजे मृत्यूचा दूतच समज. ह्या वेळीं घुबडें जागीं असून किती हृदयभेदक शब्द करिताहेत! बाबा, ह्या सर्वांची इच्छा सर्वत्र शून्याकार

व्हावा अशीच दिसते ! आतां सभोंवतीं नजर टाक. चोहोंकडे दिशा कशा धुंद झाल्या आहेत! सूर्यास खळीं पडलेलीं अवलोकन कर ! पर्वत पहा कसे हालत आहेत ! हा पहा धरणीकंप झाला ! आकाशांत अभ्र तर मुळींच दिसत नाहींत; पण मेघगर्जना व विद्युत्पात कसे जोरानें चालले आहेत पहा ! वारा पहा किती सोसाटयानें वहात आहे ! धुळीनें सर्वत्र अंधकार पडला ! आकाशांतून रक्ताचा वर्षाव सुरू झाला ! अरे ! हा सर्व प्रकार पाहून माझी तर छाती फाटून गेली बाबा ! भीमा, सूर्य किती निस्तेज झाला पहा ! अरे ! आकाशांत ग्रह आपसांत भांडूं लागले ! हाय हाय ! पृथ्वी व आकाश हीं पेटलीं असून त्यांत प्राणिमात्राचा जळून फडशा होत आहे असें भासतें ! ह्या पहा लहान मोठ्या सर्व नद्या क्षुब्ध झाल्या ! सरोवरेंही उसळूं लागलीं ! घृतानें अग्नि पेट घेत नाहीं असें कधीं झालें होतें काय ? आज त्याचा अनुभव पहा ! हें सर्व पाहून मन कसें बरें उद्विग्न होणार नाहीं ! अरे, असा हा भयंकर काळ आतां काय काय करणार नाहीं ! हीं पहा वासरें स्तनपान करीतनाशीं झालीं ! गाई पान्हा सोडीतनाशा झाल्या ! गोठयांतील गाई व बैल डोळ्यांत अश्रु आणून रडत आहेत! अरे, हे गाईबैल रडत आहेत असें नव्हे, तर गाई व बैल ह्या रूपानें येथें नांदणाऱ्या देवताच रडत आहेत ! भीमा, ह्याप्रमाणेंच हे सर्व देश, नगरें, गांवें, वनें, उपवनें खाणी इत्यादिकांची स्थिति मनांत आण ! ह्या सर्वांतील आनंदाचा अंश नाहींसा झाला ! आतां ह्यांपासून सुखाचें नांवही नको ! आतां ह्यांपासून नानाप्रकारचीं दुःखें मात्र होतील ! भीमा, हे भयंकर उत्पात पाहून ध्वजवज्रांकुशांनीं मंडित अशीं श्रीकृष्णचरणारविंदें ह्या भूतळावरून नाहींतशीं झालीं व त्यामुळें ही पृथ्वी सौभाग्यहीन झाली असें मला वाटतें !"

### अर्जुनाचें द्वारकेतून आगमन.

सूत सांगतातः—ऋषीहो, अशा प्रकारें त्या उत्पातांच्या योगानें धर्मराजाचें मन अतिशयच विव्हल होऊन तो मोठ्या विचारांत पडला आहे, इतक्यांत अर्जुन द्वारकेतून परत आला. तो येतांच सर्व आप्त स्नेही एकदम जमा झाले. ह्या वेळीं अर्जुनाची चर्या पूर्वीप्रमाणें प्रसन्न दिसली नाहीं. अर्जुनानें येतांच धर्मराजाच्या चरणीं मस्तक ठेविलें. त्यास दुःखाचें इतकें कांहीं भरतें आलें होतें कीं, तें सांगतां पुरवत नाहीं. त्याच्या नेत्रावाटे अश्रुधारा चालल्या; तें पाहून धर्मराजाचें मन पराकाष्ठेचें खिन्न होऊन त्यास भगवान नारद मुनींच्या शब्दांची आठवण झाली, व द्वारकेंतील स्थितीविषयीं त्याचें मन अत्यंत साशंक झालें, तेव्हां त्यानें मोठा धीर करून

### अर्जुनास प्रश्न

करण्यास आरंभ केला. धर्मराज म्हणाला, "अर्जुना, मधु, भोज, दाशार्ह, अर्ह, सात्वत, अंधक आणि वृष्णि ह्या कुळांतील आपले आप्त द्वारकेमध्यें खुशाल आहेत ना? अरे, आपले परमपूज्य शूर नांवाचे आजोबा खुशाल आहेतना ? आणि वसुदेव मामा आपल्या कनिष्ठ बंधूसहवर्तमान सुखी आहेतना? तसेंच, देवकी आदिकरून वसुदेवाच्या सात स्त्रिया आपल्या सुनांसहवर्तमान खुशाल आहेतना? अर्जुना, कुपुत्र जो कंस, त्याच्या योगानें अतिशय दुःखी झालेला राजा उग्रसेन अजून जिवंत आहे काय? तसेंच, उग्रसेनाचा बंधु देवक, तसाच हृदीक व हृदीकाचा पुत्र कृतवर्मा, आणि अक्रूर, जयंत, गद, सारण व शत्रुजित्प्रभृति कृष्णभ्राते हे सर्व खुशाल आहेतना ? अरे, यादवांचा प्रभु बलराम खुशाल आहेतना ? सर्व यादवांमध्यें महारथी जो प्रद्युम्न, तो सुखरूप आहेना? महावेगवान जो भगवान अनिरुद्ध, तो आनंदांत आहेना? सुषेण, चारुदेष्ण, तसाच जांबवतीचा पुत्र सांब व दुसरेही ऋषभादिक कृष्णाचे मुलगे आपल्या

मुलांबाळांसह सुखरूप आहेतना? तसेंच श्रुतदेव, उद्धव इत्यादिक श्रीकृष्णाचे सेवक, आणि बलराम व श्रीकृष्ण ह्यांच्या बाहुबलाचा आश्रय करणारे नंदसुनंदप्रभृति प्रमुख यादव खुशाल आहेतना? अर्जुना, त्यांचें आम्हांवर पूर्ववत प्रेम आहेना? ते आमचें स्मरण करितात काय? अरे, गोब्राह्मणांचा प्रतिपालक षड्गुणैश्वर्यसंपन्न प्रभु भक्तवत्सल श्रीकृष्ण हा सुधर्मा नामक सभेमध्यें यादवांसहित सुखानें बसतोना? अर्जुना, लोकांचें कल्याण व उत्कर्ष होण्यासाठीं यदुकुलरूप समुद्रामध्यें शेषशायी नारायणानेंच आपलें वास्तव्य केलें आहे. पार्था, यादवांस जो इतका मान मिळतो, व त्यांस जी एवढी शक्ति प्राप्त झाली आहे, ती सर्व त्या आदिपुरुषाच्या कृपेचेंच फल होय. सत्यभामा आदिकरून सोळा सहस्र स्त्रिया ह्या युद्धांत देवांदिकांस जिंकून इंद्राणीनें उपभोग करण्यास योग्य अशा पारिजातकादिक वस्तु हरण करून आणितात, हा सर्व त्या भगवंताच्या चरणसेवेचाच प्रभाव होय. अर्जुना, सुधर्मा सभा ही मूळची देवांची; तिच्यामध्यें देवांवांचून दुसरे कोणी पाऊलही ठेवण्यास समर्थ नाहींत; परंतु श्रीकृष्णाच्या प्रसादाचें फळ पहा केवढें तें!–प्रस्तुत ह्या सभेंत यादव खुशाल बसताहेत! बरें असो.

"अर्जुना, तूं बोलत कां नाहींस? तुझी प्रकृति तर अस्वस्थ नाहींना? अरे, तूं इतका निस्तेज कां बरें दिसतोस? यादवांकडून तुझा योग्य आदर झाला नाहीं कीं काय? किंवा तुझी त्यांनीं मानखंडना केली? अर्जुना, तूं इतके दिवस द्वारकेंत कां राहिला होतास? अरे, तुला कोणी कठोर शब्द बोललें कीं काय? किंवा याचकांनीं आशेनें मागितलेली एखादी वस्तु त्यांस देतों म्हणून कबूल करून तूं दिली नाहींस, असें झालें कीं काय? अथवा ब्राह्मण, बालक, गाय, वृद्ध, रोगी, स्त्री किंवा कोणी प्राणी तुला शरण आला असतां तुझ्याकडून त्याचा अव्हेर तर झाला नाहींना? तूं अगम्य स्त्रीशीं गमन तर केलें नाहींसना? अथवा गमन करण्यास योग्य अशा स्त्रीचा तूं अनादर केलास? तुझा कोणी समान वीरानें किंवा क्षुद्र वीरानें पराभव तर केला नाहींना? किंवा आपल्याबरोबर भोजन करण्यास योग्य अशा वडील माणसास किंवा मुलास बरोबर न घेतां त्वां भोजन केलेंस? अर्जुना, तुझ्या हातून कांहीं दुराचरण तर झालें नाहींना? अर्जुना, तूं बोलत नाहींस ह्यावरून मला वाटतें कीं, आपला प्रिय बंधु श्रीकृष्ण–ज्याचा आपणांस पूर्ण आश्रय, व ज्याच्या ध्यानामध्यें तूं सदा निमग्न असतोस, त्या भगवंतानें आपला त्याग तर केला नाहींना? अर्जुना, तुला दुःख होण्याचें कोणतें कारण घडलें तें सांग! अशी म्लानता तुला विनाकारण कधींही उत्पन्न होणार नाहीं."

# अध्याय पंधरावा.

—:०:—

## श्रीकृष्ण निजधाम गमन वृत्त.

सूत म्हणतातः—ऋषीहो, श्रीकृष्णाच्या वियोगानें दुःखित झालेलें अर्जुनाचें अत्यंत उदासीन असें तें रूप पाहून, आतांच सांगितल्याप्रमाणें धर्मराजानें त्यास नानाविध प्रश्न केले; परंतु अर्जुन शोकभरानें अगदीं व्याप्त असल्यामुळें त्याच्यानें धर्मराजास मुळींच उत्तर देववलें नाहीं. नंतर कांहीं वेळानें, नेत्रांतून वहात असलेले अश्रु मोठ्या कष्टानें पुशीत पुशीत, श्रीकृष्णवियोगानें सोत्कंठ झालेला आणि श्रीकृष्णाच्या एकेक कृत्याचें स्मरण करीत असलेला तो अर्जुन, अडखळत अडखळत धर्माशीं बोलूं लागला.

### अर्जुनाचे उद्गार.

अर्जुन म्हणालाः—हे महाराजा, श्रीकृष्णानें मला फसविलें! तो सर्वशक्तिमान दयाघन प्रभु मला सोडून एकटाच निजधामास निघून गेला! माझ्या बाहूंमध्यें देवादिकांचाही पराभव करण्याचें

जें सामर्थ्य होतें, तें सर्व त्यानें हरण केलें! राजा, अत्यंत प्रिय असा जो पित्याचा देह, तो देखील प्राणरहित झाला असतां लागलीच त्यास 'प्रेत' ही अमंगळ संज्ञा प्राप्त होते, व तो त्याज्य होतो; तद्वत्च, श्रीकृष्णरहित झालेला हा सर्व लोक मला त्या मृत शरिराप्रमाणें त्याज्य दिसत आहे. धर्मराजा, मला त्या दीनबंधूचा वियोग मुळींच सहन होत नाहीं. राजा,

श्रीकृष्णाच्या उपकारांचें वर्णन

किती करावें! केवळ श्रीकृष्णाच्या आश्रयानेंच धनुष्य उचलून द्रुपदराजसभेंतील काममदोन्मत्त राजांचा गर्व मीं हरण केला, आणि मत्स्ययंत्र-भेदाचा कठिण पण जिंकून द्रौपदीची प्राप्ति करून घेतली. श्रीकृष्णाच्या आश्रयानेंच अमरां-सहित इंद्राचा मोठ्या आवेशानें पराभव करून त्याच्या समक्ष त्याचें खांडव नांवाचें वन मीं अग्नीस अर्पण केलें; आणि त्या प्रसंगीं मीं मयासुराचें अग्नीपासून रक्षण केलें, म्हणून त्यानें अप्रतिम अशी एक मायिक सभा आपणांस निर्माण करून दिली. त्याचप्रमाणें, श्रीकृष्णसान्निध्यामुळेंच तुझ्या राजसूय यज्ञांत दशदिशांकडून सर्व राजांनीं करभार आणून दिला. राजा, दहा हजार हत्तींचें बल धारण करणाऱ्या आर्य भीमानें श्रीकृष्णाच्या आश्रयानेंच महापराक्रमी जरासंधाचा वध केला व महाभैरवाच्या यज्ञांत बलि देण्याकरितां म्हणून जरासंधानें बंदींत टाकिलेल्या राजांची त्यानें मुक्तता केली; आणि नंतर ते राजे नानाप्रकारचे नजराणे घेऊन तुझ्या राजसूय यज्ञास आले. राजा, तुझ्या राजसूय यज्ञांत ज्यांना अवभृत स्नान घडलें असे ते द्रौपदीचे केश दुःशासनानें आकर्षण करून तो तिची विटंबना करण्यास उद्युक्त झाला असतां, भक्तसंरक्षक प्रभु श्रीकृष्णानेंच तिच्या अब्रूचें संरक्षण केलें; आणि ती श्रीकृष्णास नमस्कार करीत असतां तिच्या नेत्रांतून स्रवत असलेले दुःखाश्रु त्याच्या चरणांवर पडले, म्हणून तिच्या कैवारानें दुःशासनादि दुष्टांचा वध करून श्रीकृष्णानें त्या दुरात्म्यांच्या स्त्रिया केश-विहीन केल्या. राजा, आपण वनवासांत असतां आपलें सत्त्व हरण करण्याकरितां दुर्योधनानें दुर्वास ऋषींना आपल्या दहा हजार शिष्यांसह भोजनार्थ धाडिलें होतें; त्या वेळीं भक्तसंकटनिवा-रक प्रभु श्रीकृष्णानें आपल्या येथील केवळ भाजीच्या पानानें संतुष्ट होऊन त्या ऋषींस तृप्त केलें, आणि त्या संकटांतून आपलें रक्षण केलें! राजा, श्रीकृष्णाच्या आश्रयानेंच मीं शंकरास द्वंद्व-युद्धांत चकित करून सोडिलें, व त्या उमामहे-श्वरापासून पाशुपतास्त्र मिळविलें; सर्व लोकपाळां-नींही आपापलीं अस्त्रें दिलीं; व इंद्राच्या अर्ध्या आसनावर बसण्याचा ह्या माझ्या देहास मान मिळाला, हें सर्व श्रीकृष्णकृपेचेंच फल होय. राजा, श्रीकृष्णाच्या आश्रयानेंच मला गांडीव धनुष्य मिळून माझ्या बाहूंत अद्भुत सामर्थ्य आलें. श्रीकृष्णाच्या आश्रयानेंच मीं मोठमोठ्या योद्ध्यां-चा पराभव करण्यास समर्थ होतों; व म्हणूनच मीं स्वर्गलोकीं असतां, इंद्रादि देव, हे त्यांचे शत्रु निवातकवचादि दैत्य ह्यांच्या वधासाठीं माझें साहाय्य मागत असत. राजा, श्रीकृष्णाच्याच आश्रयानें भीष्मद्रोणांसारख्या मोठमोठ्या जलच-रांनीं युक्त असा कौरवसेनासमुद्र मी एकटाच तरून गेलों. राजा, श्रीकृष्णाच्या आश्रयानेंच मी विराट राजाच्या गाई कौरवांपासून सोडविल्या, व मोहनास्त्राच्या प्रयोगानें सर्वांस मोहित करून त्यांचीं मुकुटादि भूषणें हरण केलीं आणि त्यांस लाजविलें. धर्मा, माझें सारथ्य करून श्रीकृष्णानें-च कौरवसेनेंतील भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य इत्या-दि महावीरांचीं आयुष्यें आपल्या कालदृष्टीनें हरण केलीं. भारतीयुद्धप्रसंगीं तूं मला श्रीकृष्णाच्या स्वाधीन केल्यामुळें, हिरण्यकशिपूप्रभृति दैत्यांनीं टाकिलेलीं शस्त्रास्त्रें जशीं प्रल्हादास शिवलीं देखील नाहींत, त्याप्रमाणें, त्या श्रीकृष्णा-

च्या प्रभावानेंच भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य, सुशर्मा, जयद्रथ, अश्वत्थामा इत्यादि महावीरांनीं मजवर टाकिलेलीं जीं अमोघ अस्त्रें, त्यांनीं मला स्पर्श देखील केला नाहीं. जयद्रथवधाचे दिवशीं उदक न मिळाल्यामुळें माझ्या रथाचे घोडे अगदीं थकून गेले; त्या वेळीं बाणानें भूमीतील उदक वर आणून तृषा शांत करावी म्हणून मी रथाखालीं उतरलों असतां, श्रीकृष्णाच्याच प्रेरणेनें कोणीं एकानेंही मजवर प्रहार केला नाहीं. राजा, ब्रह्मादि देव सर्वांस वंद्य असतां ते देखील मोक्षप्राप्त्यर्थ श्रीकृष्णाच्या चरणांचें सेवन करितात; अशा त्या श्रीकृष्णास मीं सारथ्यकर्म करावयास लाविलें, तेव्हां केवढा मी मंदबुद्धि ! धिक्कार असो मला ! राजा, श्रीकृष्णाचीं विनोदयुक्त भाषणें आणि त्यानें मला " हे पार्था, हे सख्या, हे कुरुकुलनन्दना " इत्यादि दिलेलीं संबोधनात्मक नांवें ह्यांची वरचेवर आठवण होऊन माझें मन अतिशय खिन्न होत आहे. शयन, भोजन इत्यादि कोणत्याही वेळीं श्रीकृष्णाचा व माझा वियोग होत नसे. एखादे वेळीं त्यानें माझ्या अधीं भोजन केलें, तर " मित्रा, तू सत्यवक्ता असून चांगलेच आचरण करितोस " असा मी त्याचा तिरस्कार करीं; परंतु, राजा, थोर ते थोरच ! त्यानें माझ्या तिरस्काराकडे बिलकुल लक्ष पोंहोंचवूं नये. उलट, मित्र जसे मित्राचे अथवा पिता जसे पुत्राचे अपराध सहन करितो, त्याप्रमाणेंच, कुत्सितबुद्धीनें मी जे जे अपराध करीं, ते ते तो निमूटपणें सहन करीत असे. राजा, भीष्मादि महावीरांचा ज्यानें पराभव केला तो अर्जुन मीच; परंतु आतां श्रीकृष्णाशीं वियोग पावल्यामुळें माझें सर्व सामर्थ्य नष्ट झालें. माझें पूर्वापर अनुसंधान आणि अस्त्रमंत्रांचें ज्ञान अगदीं नाहींसें झालें. सांप्रत त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. आतांच श्रीकृष्णाचा अवशिष्ट परिवार—त्याच्या सोळा हजार स्त्रिया—सुरक्षित रीतीनें मी इकडे घेऊन येत असतां, वाटेंत यःकश्चित् गवळ्यांनीं माझा एखाद्या स्त्रीप्रमाणें पराभव केला ! भारतीयुद्धांत सर्व राजे माझ्या गांडीव धनुष्यापुढें मोठ्या आदरानें मान वांकवीत; पण आतां तेंच गांडीव धनुष्य, बाण, रथ, घोडे इत्यादि सर्व आणि स्वतः मी श्रीकृष्णवियोगामुळें नकली वस्तूप्रमाणें किंवा खाऱ्या जमिनींत पेरलेल्या धान्याप्रमाणें अगदीं व्यर्थ झालों आहें. हे नरश्रेष्ठ, तूं ज्या स्वकीयांचा कुशल समाचार मला विचारलास, ते तुझे स्वकीय यादव ब्रह्मशापामुळें वारुणीपानानें उन्मत्त आणि क्षुब्ध होऊन एकमेकांशीं शत्रुभावानें भांडूं लागले, आणि लव्हाळ्यांच्या खुंटांनीं एकमेकांस प्रहार करून मरण पावले. त्यांपैकीं चारपांचजण मात्र जिवंत उरले आहेत. राजा, प्राणी एकमेकांचें संरक्षण करितात अथवा एकमेकांस मारतात, हें सर्व त्या परमेश्वराचें चरित्र असावें. कारण, जलामध्यें वास करणारे मोठमोठे प्राणी लहान प्राण्यांस भक्षण करितात; मनुष्यांमध्यें जे बलिष्ठ असतात, ते दुर्बलांचा वध करितात; आणि सारख्या बलाचे जे असतात ते परस्परांचा संहार करितात. महाबलिष्ठ असे जे यादव आणि पांडव, त्यांजकडून श्रीकृष्णानें इतरांचा नाश करविला; आणि ते समबळ यादव आपआपसांत लढून मेले. राजा, देश, काल, वर्तमान ह्यांच्या ठिकाणीं कसें आचरण करावें तें श्रीकृष्णानें मला सांगितलें आहे; माझें मन त्याच्या उपदेशांत गुंतलें आहे, म्हणून माझ्यानें आतां जास्त बोलवत नाहीं.

### पांडवांचें महाप्रस्थान.

सूत म्हणतातः—ऋषीहो, अर्जुनाची श्रीकृष्णाचे ठायीं अति दृढ भक्ति होती. तो श्रीकृष्णाचें चिंतन करीत असल्यामुळें त्याचें मन शांत आणि निर्मळ झालें. श्रीकृष्णाच्या निरंतर स्मरणानें अर्जुनाच्या ठिकाणीं असलेले कामक्रोधादि दुष्ट विषय पार नाहींतसे झाले; आणि युद्धारंभीं

जें गीताज्ञान भगवंतांनीं त्यास उपदेशिलें होतें, व जें विषयोपभोगांच्या आसक्तीनें आच्छादित झालें होतें, त्याचा फिरून उदय झाला; त्या योगानें अर्जुनाला, मी स्वतःच ब्रह्म आहें, असें ज्ञान प्राप्त झालें, व त्याच्या ठिकाणीं असलेलें अज्ञान समूळ नाहींसें झालें. अर्थातच सत्व, रज, तम हे गुण, त्यांचें कार्य लिंगशरीर, आणि लिंगशरिराचें कार्य स्थूलदेहाची उत्पत्ति हीं सर्व नाश पावलीं. त्या योगानें त्याच्या अंतःकरणांतील द्वैतभाव नष्ट होऊन तो शोकरहित झाला. असो.

ह्याप्रमाणें तें सर्व वृत्त ऐकून, श्रीकृष्ण ज्या मार्गानें गेले त्याच मार्गानें जाण्याचा धर्मराजानें निश्चय केला. अर्जुनाचें भाषण ऐकून कुंतीनेंही आपलें अंतःकरण इंद्रियांना अगोचर अशा श्रीकृष्णाचे ठिकाणीं अनन्यभावानें स्थापन करून देह विसर्जन केला.

अशा प्रकारें, जन्ममरणातीत श्रीकृष्णानें, कांट्यानें कांटा काढावा त्याप्रमाणें यादवतनु धारण करून पृथ्वीला भारभूत अशा दुष्टांचा वध केला, व शेवटीं त्या यादवतनूचाही नाश करविला. कारण, यादवदेह व इतरांचे देह हे दोन्हीही श्रीकृष्णाला सारखेच होते. नट जसा नानाप्रकारचीं सोंगें घेऊन इष्ट कार्य संपतांच त्या सोंगांचा त्याग करितो, त्याप्रमाणेंच, भगवंतानें श्रीकृष्णस्वरूप धारण केलें; व भूभारहरणास्तव दुष्टनिर्दालनाचें इष्ट कार्य संपतांच त्या स्वरूपाचा त्याग करून निजधामास गमन केलें. ज्या दिवशीं भगवंतानें हा लोक सोडला, त्याच दिवशीं अज्ञ लोकांस अधर्माकडे वळविणारा कलि पृथ्वीवर चोहोंकडे प्रवृत्त झाला. हें पाहून, धर्मराजानें सर्वगुणसंपन्न असा आपला नातू जो परीक्षित त्याला समुद्रवलयांकित पृथ्वीच्या सार्वभौम राज्यपदावर अभिषिक्त केलें, व तसेंच मथुरा नगरींत जाऊन अनिरुद्धाचा पुत्र वज्र ह्यास शूरसेन देशाच्या राज्यासनावर बसविलें. नंतर त्यानें प्राजापत्या नांवाची इष्टि करून गार्हपत्यादि अग्नित्रयाचा आपले ठिकाणीं समारोप केला; व अलंकारवस्त्रादिकांचा तेथेंच त्याग करून तो निर्मल व निरहंकार असा होऊन सर्वबंधरहित व निरुपाधिक अशा अवस्थेमध्यें लीन झाला. नंतर वाणी आदिकरून सर्व इंद्रियें, मन इत्यादिकांचा क्रमाक्रमानें लय करून केवळ ब्रह्मरूप होऊन राहिलेला तो अजातशत्रु धर्मराज, आपल्या भीमादि बंधूंचीही अपेक्षा न ठेवतां, जिकडे संसाररहित झालेले पूर्वींचे महात्मे गेले अशा उत्तर दिशेस निघून गेला. हें पाहून त्याची भार्या द्रौपदी व बंधु भीम, अर्जुन, नकुल, सहदेव हीं सर्व त्याच्याचप्रमाणें सर्वसंगपरित्याग करून त्याच्या मागोमाग उत्तर दिशेस निघून गेलीं. नंतर तेथें ते कृतकार्य झालेले पांडव व द्रौपदी ह्यांनीं भगवान श्रीकृष्णाच्या चरणकमलांचें ध्यान करीत करीत देहाचें विसर्जन करून उत्तम गति मिळविली. विदुरही प्रभास क्षेत्रीं देह ठेवून परमात्मपदाला जाऊन पोहोंचला. असो. ऋषीहो, पांडवांच्या महाप्रस्थानाची ही कथा अत्यंत कल्याणकारक व पवित्र आहे. जो पुरुष श्रद्धापूर्वक व आदरानें ह्या कथेचें श्रवण करील, त्याची भगवत्पदीं दृढ भक्ति जडून तो सायुज्य मिळवील.

## अध्याय सोळावा.

—:०:—

### परीक्षिताचा राज्यकारभार.

सूत म्हणतातः—शौनका, पांडवांनीं महाप्रस्थान केल्यानंतर परीक्षित राजा धौम्य कृपादि ब्राह्मणश्रेष्ठांच्या अनुरोधानें पृथ्वीचें उत्तम प्रकारें रक्षण करूं लागला. तो महान भगवद्भक्त होता, व त्याच्या ठिकाणीं धैर्य, औदार्य वगैरे सद्गुण मूर्तिमंत वास करीत होते. त्यानें आपली मातुलकन्या जी इरावती—उत्तराची मुलगी—तिजशीं

विवाह केला. तिजपासून त्याला जनमेजयादि चार पुत्र झाले. नंतर त्यानें कृपाचार्यांस आचार्यत्व देऊन भागिरथीच्या तटाकीं तीन अश्वमेध यज्ञ केले. त्या यज्ञांमध्यें त्यानें ब्राह्मणांस पुष्कळ दक्षणा दिली. त्या यज्ञांमध्यें आपआपला हविर्भाग घेण्यास देव प्रत्यक्ष आले होते!

एके समयीं तो राजा दिग्विजयाकरितां निघाला असतां, मार्गांत शूद्ररूप धारण केलेला आणि राजचिन्हांनीं युक्त असा कलि, एक गाय आणि वृषभ ह्यांस लत्ताप्रहार करीत आहे असें त्यास आढळलें, तेव्हां त्यानें त्या कलीचा निग्रह (बंदोबस्त) केला.

शौनक म्हणाले:—हे सूता, त्या वेळीं त्या कलीचा वधच करणें इष्ट होतें. असें असतां परीक्षितानें त्याचा केवळ निग्रहच कां केला, हें आम्हांस सांग. कारण, तो अति नीच पुरुष शूद्ररूपानें राजचिन्हें धारण करून गाय आणि वृषभ ह्यांस व्यथेनें ताडन करीत असल्यामुळें त्यास देहांत शासन अवश्य होतें. सूता, ह्या कलिनिग्रहाच्या वृत्तांतांत जर कृष्णलीलांचें अथवा भगवद्भक्तांचें वर्णन असेल, तर तो सर्व आम्हांस सांग. कारण, केवळ वृथा वल्गना करण्यांतच आयुष्याचा काळ घालविला तर त्याचा काय उपयोग? हे सूता, आम्हांस ह्या वेळीं मरणाची भीति नाहीं. का तर, क्षुद्रायुषी व मरणाधीन अशीं जीं हीं मनुष्यें, ता ह्या आमच्या सत्रांत मुळींच मरण पावणार नाहींत. आम्हीं पूर्वींच येथें मृत्यूला बोलावून आणिलें आहे, व त्याजपासून असें कबूल करून घेतलें आहे कीं, ह्या सत्रांत त्यानें फक्त पशूंचीच हिंसा करावी; मनुष्यांची हिंसा करूं नये. म्हणून ह्या सत्रांत कोणालाही मृत्यूचें भय नाहीं. ह्या मनुष्यलोकीं सर्वांनीं निर्भय अंतःकरणानें हरिकथामृताचेंच यथेच्छ प्राशन करावें ह्या हेतूनें आम्हीं मृत्यूला येथें स्वस्थ बसवून घेतलें आहे. हे सूता, मनुष्याची शक्ति आधींच तुच्छ, तशांत त्यास ज्ञान कमी, बरें, आयुष्य तरी पुष्कळ असेल तर तीही गोष्ट नाहीं, व त्या क्षुद्र आयुष्यापैकीं निमे (रात्रीचा) भाग निद्रेंत जातो; ह्यास्तव आयुष्याचा अवशिष्ट भाग (दिवस) त्यानें भगवद्भक्तीमध्यें घालवून देहाचें सार्थक्य करावें हेंच इष्ट होय. परंतु मूर्ख पुरुष त्या अल्प भागाचा विनियोग व्यर्थ कर्में करण्यांत करितो, तेव्हां काय म्हणावें बरें?

### परीक्षिताचा दिग्विजय.

सूत म्हणतात:—हे शौनका, हस्तिनापुरांत शूर आणि धर्मज्ञ असा परीक्षित राजा राज्य करीत असतां एके समयीं त्यास अशी बातमी लागली कीं, आपल्या राज्यांत कलीचा प्रवेश झाला. ती वार्ता अप्रिय तर खरीच; परंतु तो शूर असल्यामुळें, युद्धप्रसंग येणार ह्या विचारानें त्यास किंचित् आनंदही झाला. त्यानें आपला रथ सर्व साहित्यासह सिद्ध करविला, आणि हातांत धनुष्यबाण घेऊन व रथावर आरूढ होऊन आपल्या चतुरंग सेनेसहवर्तमान तो दिग्विजयाकरितां बाहेर निघाला. तो भद्राश्व, भारत, केतुमाल, उत्तरकुरुदेश, व किंपुरुषादिक खंडांच्या राजापासून करभार घेत चालला. वाटेंत त्याला त्याच्या भरतादि थोर थोर पूर्वजांचें माहात्म्य व यश ह्यांचें वर्णन ठिकठिकाणच्या लोकांकडून ऐकावयास मिळालें; आणि अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रापासून श्रीकृष्णानें आपलें संरक्षण केलें तें वृत्त, यादव व पांडव ह्यांचा अकृत्रिम स्नेह, त्यांची भगवंताच्या ठिकाणीं असलेली अचल भक्ति इत्यादि अनेक गोष्टी ऐकून तो फार संतुष्ट झाला; आणि त्यानें त्या त्या ठिकाणच्या लोकांना वस्त्रें, भूषणें, अलंकार वगैरे देऊन त्यांस तोषित केलें. तसेंच, जगद्वंद्य जो श्रीकृष्ण तो केवळ भक्तियोगामुळ आपले पूर्वज पांडव ह्यांच्या येथें सारथ्य, सभापतित्व, सेवा, मैत्री, दूतपणा इत्यादि लहानमोठीं कामें करण्यास सदैव तत्पर असे,

इतकेंच नव्हे, तर अहोरात्र हातांत शस्त्र घेऊन पहारा सुद्धां करी, हें ऐकून त्यास फार आश्चर्य वाटलें, आणि त्याची श्रीकृष्णाचे ठायीं अधिकच प्रीति जडली. शौनका, ह्याप्रमाणें तो धर्मज्ञ राजा आपल्या पूर्वजांच्या वर्तनास अनुसरून वागत असतां, लौकरच जो एक चमत्कारिक प्रसंग घडून आला, तो तुला सांगतों.

## धर्म व पृथ्वी ह्यांचा संवाद.

एके वेळीं साक्षात् धर्म हा बैलाचें रूप घेऊन एका पायानें लंगडत लंगडत हिंडत होता; तों गाईचें रूप घेऊन केविलवाण्या मुद्रेनें रडत असलेली पृथ्वी त्याच्या दृष्टीस पडली. तें पाहून धर्म तिला म्हणाला: " हे कल्याणी, तुझ्या मुखाकडे पाहून मला असें वाटतें कीं, तुला कांहीं तरी दुःख होत असावें. माते, तें दुःख कोणतें बरें? तुझा एखादा बंधु दूर गेल्यामुळें का तूं शोक करितेस? किंवा माझे तीन पाय जाऊन बाकी एकच राहिला आहे, व तो सुद्धां लंगडा आहे हें पाहून तुला इतकें दुःख वाटतें? अथवा, ह्यापुढें तुझा उपभोग शूद्र राजे घेतील म्हणून स्वतःविषयीं तर तूं शोक करीत नाहींस ना? ह्यापुढें यज्ञादि वैदिक क्रिया लुप्तप्राय होतील, व त्यामुळें कदाचित् देवांना हविर्भाग मिळणार नाहींत म्हणून का तूं शोक करितेस? किंवा, कदाचित् इंद्रानें वृष्टि न केल्यास दुष्काळानें प्रजा दुःखित होतील, म्हणून तर तूं दुःख करीत नाहींस ना? अथवा, हे पृथ्वी, ह्यापुढें कलि प्रवृत्त झाल्यामुळें पति आपल्या स्त्रियांचें किंवा पुत्र आपल्या मातांचें अथवा आईबाप आपल्या बाळकांचें नीट संगोपन करणार नाहींत, किंवा ती त्यांस फार छळतील म्हणून तुला वाईट वाटतें? अगर, ब्राह्मण कुमार्गरत होऊन वाग्देवीचा दुरुपयोग करतील किंवा लोभामुळें हीन कुलोत्पन्न राजांची सेवा करतील म्हणून तर तूं शोक करीत नाहींसना? किंवा, ह्यापुढील राजे अधर्मी आणि दुष्ट होऊन देश उध्वस्त पाडितील, अथवा मनुष्यें भक्ष्याभक्ष्यांचा व पेयापेयांचा विधिनिषेध न बाळगितां आहार, निद्रा व मैथुन ह्यांच्यामध्यें गुंग होऊन राहतील म्हणून तुला दुःख होतें काय? माते, तुला झालेला भार नाहींसा करण्याकरितां भगवंतानें श्रीकृष्णावतार घेऊन दुष्टांचें निर्दालन केलें, तो भगवान आतां निजधामास गेला म्हणून त्याच्या लीलांचें स्मरण झाल्यामुळें तूं रुदन करीत आहेस काय? हे वसुधरे, तुझें भाग्य फार थोर. तुझ्या भाग्याचें देवादिकही वर्णन करितात; असें असतां, तूं दुःखी आहेस ह्याचें कारण काय तें मला सांग."

हें धर्माचें बोलणें ऐकून पृथ्वी म्हणाली, "धर्मा, हें तूं मला काय विचारतोस? तुला तें सर्व ठाऊकच आहे; पण तुझी जर मजपासूनच ऐकावयाची इच्छा असेल, तर मी तुला सांगतें: धर्मा, श्रीकृष्णाच्या आश्रयानें तूं तप, शौच, दया आणि सत्य ह्या चार पायांनीं नांदत होतास. सत्य, शौच, दया, क्षमा, दान, संतोष, सरळ स्वभाव, मानसिक स्थैर्य, इंद्रियनिग्रह, स्वधर्माचरण, मनाचें समत्व, सहनशीलता, लाभाविषयीं देखील औदासिन्य, शास्त्रविचार, आत्मनात्मविवेक, निरिच्छता, ऐश्वर्य, शौर्य, प्रताप, बल, स्मरण, स्वातंत्र्य, नैपुण्य, सौंदर्य, धैर्य, नाजुकपणा, प्रौढपणा नम्रता, सुस्वभाव, मनाची शक्ति, दशेंद्रियांची शक्ति, भोगाधिष्ठानत्व, गांभीर्य, निश्चळपणा, वेदादिकांच्या ठिकाणीं विश्वास, कीर्ति, मान आणि गर्वाभाव हे सर्व गुण व थोर पुरुषांच्या अंगीं असणारे दीनवत्सल्यादिक गुण ज्या भगवंताच्या ठिकाणीं ओतप्रोत भरलेले असून कधींही नाश पावत नाहींत असा तो सर्वगुणनिधि लक्ष्मीपति भगवान श्रीकृष्ण निजधामास गेल्यामुळ सर्व लोकांच्या ठायीं दुष्ट कलि प्रवृत्त झाला आहे, असें पाहून मी शोक करितें. धर्मा, श्रीकृष्णाच्या वियोगानें मला स्वतःबद्दल आणि तुझ्या-

बद्दल मात्र फार वाईट वाटतें असें समजूं नको; तर देव, ऋषि, पितर, साधु, ब्राह्मणादि सर्व वर्ण व आश्रम ह्या सर्वांबद्दलच मला फार दुःख होत आहे! धर्मा, श्रीकृष्णाचा विरह फारच दुःसह आहे! बाबा, त्या भगवंताचें भाग्य काय वर्णन करावें? ज्या लक्ष्मीची कृपा आपल्यावर व्हावी म्हणून ब्रह्मादिक देवही तपश्चर्या करितात, ती लक्ष्मी सुद्धां आपलें कमलवन सोडून ज्या भगवंताच्या चरणाची सेवा करिते, त्या भगवंताच्या पद्म, वज्र, अंकुश, ध्वज इत्यादिकांनीं युक्त अशा चरणकमलांनीं मला शोभा आली होती, व अखिल संपत्तीनें परिपूर्ण होऊन मी सर्व त्रैलोक्यांत गाजत होतें; परंतु त्या ऐश्वर्याचा नाशकाल प्राप्त झाला, तेव्हां मी गर्वाधीन झालें, व त्यामुळें त्या प्रभूनें माझा त्याग केला. धर्मा, ज्यानें मजला भारभूत झालेले असुरवंशांतील राजे मारून माझा भार हलका केला; व तुला परिपूर्ण दशेस आणण्याकरितां चारही पावलें पुनः प्राप्त करून दिलीं, आणि यदुवंशांत जन्म घेऊन अनेक आनंदजनक लीला केल्या, त्याच्या चरणकमलांचा वियोग मला कसा सहन होईल बरें?"

अशा प्रकारचें त्या उभयतांचें भाषण पूर्ववाहिनी सरस्वतीच्या कांठीं चाललें असतां तेथें परीक्षित राजा प्राप्त झाला.

## अध्याय सतरावा.

—:०:—

### परीक्षिताचें कलि, धर्म व पृथ्वी ह्यांस उद्देशून भाषण.

सूत म्हणतातः—ऋषीहो, त्या सरस्वती नदीच्या कांठीं जेथ वृषभरूपी धर्म व गोरूपी पृथ्वी ह्या दोघांचा संवाद चालला होता, तेथें तो परीक्षित आला; तों त्यांच्या जवळ एक राजचिन्हालंकृत शूद्र उभा असून, तो त्या उभयतांस निर्दयपणानें ताडन करीत आहे, असें त्यानें पाहिलें. त्या वृषभाचा रंग पांढरा शुभ्र होता. तो एकाच पायावर उभा असून त्या शूद्राच्या माराच्या भयानें थरथर कांपत होता, व मूत्रोत्सर्ग करीत होता. तशीच ती गाय( पृथ्वी )त्या शूद्राच्या लत्ताप्रहारानें अगदीं दीन होऊन गेली होती. ती वत्सरहित ( धान्यादिकांनीं रहित ) झाली असून तिच्या नेत्रांतून एकसारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. ती शरीरानें अगदीं कृश झाली असून तृणाची ( यज्ञांची ) अपेक्षा करीत होती.

अशी त्या दोघांची स्थिति पाहून परीक्षितानें आपलें चाप सज्ज केलें, आणि मोठ्या आवेशानें तो त्या शूद्रास म्हणाला, " रे दुष्टा, मी ह्या लोकांचें रक्षण करीत असतां ह्या दुर्बलांस ताडण करणारा तूं कोण आहेस? अरे, तुझा वेष राजाचा आहे, पण कृति खरोखरी शूद्राची आहे. अरे, महाधनुर्धर पार्थ आणि भगवान श्रीकृष्ण हे भूलोकांतून निघून गेल्यामुळें तूं निरपराधी प्राण्यांचा गुप्तपणें छल करूं लागलास काय?"

असें बोलल्यानंतर त्यानें वृषभाकडे पाहिलें आणि म्हटलें, " हे वृषभा, श्रेष्ठ अशा पौरवकुलांतील पुरुषांनीं रक्षण केलेल्या ह्या पृथ्वीचे ठिकाणीं तुजवांचून कोणीही दुःखी प्राणी आढळणार नाहीं! तुझा वर्ण कमलकंदाप्रमाणें शुभ्र असून तुझे तीन पाय तुटले आहेत; व तुझा जो एक पाय अवशिष्ट आहे, त्या पायानेंही तूं लंगडत लंगडत चालत आहेस; ह्यावरून, तूं कोणी तरी देव असावास. तुझी ही दुःखद स्थिति पाहून माझ्या मनास फार खेद होत आहे. हे कामधेनुपुत्रा, आतां तूं शोक करूं नको. इतःपर या शूद्रापासून तुला भय प्राप्त होणार नाहीं."

नंतर त्या परीक्षित राजानें त्या गाईकडे पाहून म्हटलेंः—हे धेनु माते, तूंही रडूं नको. जोंपर्यंत हा परीक्षित जिवंत आहे, तोंपर्यंत ह्याच्या

राज्यांतील यःकश्चित् प्राण्याला देखील हा दुःख होऊं देणार नाहीं. तुमचा छळ करणाऱ्या ह्या दुष्टाचा मी आतांच वध करितों. ज्या राजाच्या राज्यांतील निरपराधी प्रजांना दुष्ट लोकांपासून त्रास होतो, त्याची कीर्ति, आयुष्य, ऐश्वर्य इत्यादिकांचा नाश होऊन अंतीं त्यास नरक प्राप्त होतो.

नंतर पुनः राजानें वृषभास विचारिलें:—हे वृषभा, तुझे तीन पाय कोणीं तोडले? असा पांडुकुलाच्या कीर्तीला कलंक लावणारा कोण आहे, त्याचें नांव मला सांग. निरपराधी जनास दुःख देणाराला मी चांगलेंच शासन करीन; मग तो प्रत्यक्ष देव जरी असला तरी हरकत नाहीं. संपत्कालीं अधर्माचरण करणारांस शासन करून धार्मिक जनांचें निरंतर पालन करणें हेंच राजाचें मुख्य कर्तव्य होय.

### धर्माचें परीक्षितास उत्तर.

सूत म्हणतात:—ऋषीहो, परीक्षिताचें हें भाषण ऐकून वृषभरूपी धर्म म्हणाला, "भयभीत जनांस अभय देणारें हें तुझें भाषण श्रीकृष्णभक्त पांडवकुलाला योग्यच आहे. हे श्रेष्ठ पुरुषा, आम्हां प्राण्यांस कोणापासून दुःख प्राप्त होतें तें मुळींच समजत नाहीं. नानाप्रकारच्या वितंडवादांच्या योगानें आम्हां प्राण्यांस मोह पडून जातो. कित्येक पंडितंमन्य पुरुष आपल्या पोकळ वाक्पांडित्यानें अज्ञानी जनांवर आपलें वर्चस्व स्थापन करितात, आणि असें म्हणतात कीं, आत्म्याला जीं सुखदुःखें प्राप्त होतात त्याचें कारण आत्माच होय; दुसरे कांहीं लोक म्हणतात कीं, सुखदुःखांस ग्रहादि कारण आहेत; कांहीं, कर्माच्या योगानें सुखदुःखें प्राप्त होतात असें म्हणतात; कोणी स्वभावालाच प्राधान्य देतात; आणि कोणी अतर्क्य अशा परमेश्वराचीच ही लीला आहे असें प्रतिपादन करितात. तेव्हां, राजा, ह्या सर्व गोष्टींचा तूंच आपल्या मनाशीं विचार कर."

### कलीचा निग्रह.

सूत म्हणतात:—शौनका, ह्याप्रमाणें वृषभरूप घेतलेल्या त्या धर्माचें तें भाषण ऐकून राजास फार आश्चर्य वाटलें; आणि तो आपल्याशीं विचार करूं लागला असतां, त्या वृषभाचें खरें स्वरूप त्याच्या लक्षांत आलें. तेव्हां परीक्षित राजा म्हणाला, "हे धर्मज्ञा वृषभा, तुझ्या भाषणावरून तुला सर्व कांहीं कळत आहेसें दिसतें; पण शास्त्राच्या निर्बंधामुळें तू निश्चयात्मक कांहींच सांगत नाहींस, ह्यावरून तू मूर्तिमंत धर्मच असावास असें वाटतें; कारण, अधर्माचरणी मनुष्य आणि त्याचा नामोच्चार करणारा हे दोघेही अधोगतीस जातात, असें शास्त्रवचन आहे. कदाचित् भगवन्माया अतर्क्य आहे म्हणून तूं निश्चयानें अमुकच पीडा देणारा आहे असें सांगत नसशील. धर्मा, तप, शौच, दया आणि सत्य हे तुझे चार पाय प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं अनुक्रमें विस्मय, कुसंगति आणि मद ह्या अधर्मांच्या योगानें पहिले तीन केवळ नामशेष झाले आहेत. प्रस्तुत तुझा एक सत्य नामक पाय मात्र उरला आहे. हे धर्मा, तेवढ्यानेंच कां होईना, मनुष्यांस कसें तरी तुझें साधन करितां येतें; परंतु हा दुष्ट कलि त्याचाही नाश करण्याची इच्छा धरून असत्य भाषणाकडे लोकांची प्रवृत्ति करीत आहे. ह्या पृथ्वीकरितां भगवंतानें अवतार धारण करून दुष्टांचा नाश केला आणि हिचा भार हरण केला; श्रीकृष्णाच्या पदकमलस्पर्शानें ही पुनीत असे, आणि त्याच्या उमटलेल्या पावलांच्या योगानें ही सुशोभित दिसे; ती ही गोरूपधारिणी साध्वी, आपला श्रीकृष्णानें त्याग केल्यामुळें व ह्यापुढें होणारे राजे शूद्र आणि अधर्माचरणी होतील म्हणून, फार दुःखित झाली आहे."

शौनका, ह्याप्रमाणें भाषण करून परीक्षित राजानें कलीचा नाश करण्याकरितां आपलें शस्त्र उचलिलें. हें पाहून तो कलि फार भयभीत

झाला, आणि धारण केलेल्या त्या राजचिन्हांचा त्याग करून तो परीक्षितास नम्रपणें शरण आला. तेव्हां शरणागताचें रक्षण करणाऱ्या त्या राजानें त्याचा वध न करितां किंचित् हास्य केलें, आणि त्या

कलीस आज्ञा

करून म्हटलें, "हे कले, ज्यापेक्षां तूं हात जोडून मला शरण आलास, त्यापेक्षां तुला अभय आहे. पार्थाच्या वंशांत उत्पन्न झालेल्या आम्हां राजेलोकांपासून शरणागतास किमपि भय प्राप्त होणार नाहीं; परंतु तूं अधर्माचा बंधु आहेस म्हणून माझे राज्यांत कोठेंही कोणत्याही रूपानें त्वां हिंडूं नये. तूं राजदेहांत प्रवेश करतांक्षणीं तुझ्या मागोमाग लोभ, असत्य, चौर्य, दुर्जनत्व, त्याग, अलक्ष्मी, कपट, कलह आणि ढोंग या अधर्मसमुदायाचा चोहींकडे प्रसार होतो, व त्या योगानें प्रजाही धर्मभ्रष्ट होते. म्हणून ह्या ब्रह्मावर्त देशांत तं संचार करूं नको. कारण, एथें सत्य व धर्म हे वास करितात, आणि ब्राह्मणादि चार वर्ण आप-आपल्या धर्माप्रमाणें वागून अनेक यज्ञांच्या योगानें यज्ञनारायणाचें आराधन करतात, आणि त्या यज्ञप्रभावानें भगवान यज्ञनारायण प्रसन्न होऊन त्यांचे मनोरथ पूर्ण करितो."

कलीस वास्तव्य करण्यास स्थलें.

सूत म्हणतातः—हें राजाचें भाषण ऐकून कलि म्हणाला, "राजा, तूं आज्ञा करशील तेथें मी राहीन; परंतु जेथें जेथें मी जातों. तेथें तेथें हातांत धनुष्यबाण घेऊन माझा वध करण्यास तयार असलेला तूं मला दिसतोस. ह्यास्तव, हे राजा, मला राहण्यास निर्भय अशीं स्थलें तूंच नेमून दे. तेथें स्वस्थ मनानें मी राहीन."

ऋषीहो, अशी कलीची प्रार्थना ऐकून, जेथें असत्य, मद, काम व क्रूरत्व या चार रूपांनीं अधर्म राहतो अशा अनुक्रमें द्यूत, मद्यपान, स्त्रीसंग व हिंसा ह्या चार ठिकाणीं राहण्यास राजानें त्याला परवानगी दिली, व पुनः कलीनें मागितल्यावरून सुवर्ण हें एक पांचवें स्थान त्यास दिलें. सुवर्णाच्या संगतीनें अनृत, मद, काम, क्रूरत्व, आणि पांचवें वैर अशीं अधर्माचीं सर्व कारणें उत्पन्न होतात. असो. ऋषीहो, कल्याणेच्छु पुरुषानें सुवर्णादि पांच पदार्थांचा उपभोग आसक्ति ठेवून कधींही करूं नये. आपल्या वागणुकीनें दुसऱ्यांस उत्तम वर्तणुकीचा कित्ता घालून देणारा लोकरक्षक राजा, गुरु इत्यादिकांनीं तर त्याच्यावर कधींच आसक्ति ठेवूं नये. असो. नंतर राजानें पुनः त्या वृषभाचे नष्ट झालेले तीन चरण तप, शौच व दया हे जोडले: म्हणजे पृथ्वीवर तप, शुद्धि व दया हे धर्म चालू केले, आणि पृथ्वीचें समाधान करून तिचा उत्तरोत्तर उत्कर्ष होईल अशी व्यवस्था केली.

सूत म्हणतातः—ऋषीहो, तो महाभाग्यवान व महाकीर्तिमान सार्वभौम राजा परीक्षित नुकताच हस्तिनापुरांत समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य करीत होता; आणि तो राज्य करीत असतांनाच तुम्ही ह्या क्षेत्रांत सहस्र संवत्सरात्मक सत्र करण्याकरितां यज्ञदीक्षा घेऊन स्वस्थ अंतःकरणानें बसलां आहां.

# अध्याय अठरावा.

—:०:—

## विप्रशापवृत्त.

सूत म्हणतातः— ऋषीहो, परीक्षित राजा मोठा भगवद्भक्त होता. तो मातेच्या उदरांत असतां अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रानें दग्ध होऊं लागला तेव्हां श्रीकृष्णानें त्याचें संरक्षण केलें, हें तुम्हांस मी पूर्वी सांगितलेंच आहे. त्या राजर्षीला एके प्रसंगा ब्राह्मणानें क्रोधयुक्त होऊन 'तक्षकाच्या दंशानें तूं मरशील' असा शाप दिला, तरी तो डगमगला नाहीं. त्यानें आपलें लक्ष श्रीकृष्णाच्या भजनीं लाविलें; आणि सर्वसंगपरित्याग करून व श्रीशुकाचार्यांस शरण जाऊन परमे-

श्वराच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान करून घेतलें; आणि गंगेमध्यें आपल्या देहाचा सुखानें त्याग केला. ऋषीहो, ज्यांनीं आपलें लक्ष भगवच्चरणीं लाविलें, व जे श्रीकृष्णकथामृत पिऊन तृप्त झाले, त्यांना मरण आलें असतां ह्या नश्वर देहाविषयीं यत्किंचितही मोह उत्पन्न होत नाहीं; असो. ब्राह्मणहो, भगवान श्रीकृष्ण निजधामास गेल्याबरोबर अधर्मोत्पादक कलि जरी भूमीवर संचार करूं लागला, तरी जोंपर्यंत महापराक्रमी परीक्षित राजा ह्या पृथ्वीचें पालन करीत होता, तोंपर्यंत तो नीच आपली सत्ता चालविण्यास मुळींच समर्थ झाला नाहीं.

### कलीचा वध न करण्याचें कारण.

परीक्षितास त्या कलीचा वध करणें अशक्य होतें असें नाहीं; पण त्यानें असा विचार केला कीं, हा नुसता जिवंत असला म्हणून ह्याच्या हातून काय होणार आहे? पुण्यवान पुरुषाकडे नुसतें ढुंकून बघण्याचें देखील ह्याचें सामर्थ्य नाहीं; पापकर्मरत पुरुषावर मात्र काय तो ह्याचा प्रभाव चालावयाचा. मग असेना का हा जिवंत बापडा! ह्या कलियुगांत पुण्यकर्में नुसतीं मनांत आणिलीं तरी तीं फलद्रूप होतात, आणि पापकर्में प्रत्यक्ष केल्यावांचून फलप्रद होत नाहीत; असें जर आहे, तर हा काय करणार आहे? असा विचार करून परीक्षित त्याच्या वाटेस मुळींच गेला नाहीं. ऋषीहो, तुमच्या इच्छेप्रमाणें हें परीक्षिताचें पुण्यप्रद आख्यान मीं तुम्हांस सांगितलें आहे. खरें स्वहित साधावयाचें अशी ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं ह्या अशा कथांच्या द्वारें भगवंताचें यश नित्य श्रवण करावें. वेद आणि शास्त्रें देखील ह्या गोष्टींचा महिमा वर्णन करितात.

### ऋषींची सूतास विनंती.

ऋषि म्हणतातः—हे शांत पुरुषा सूता, तूं दीर्घायु हो. भगवद्यशोरूपी अमृत पाजून तूं आम्हांस अमर करीत आहेस, हा तुझा आम्हांवर फार मोठा उपकार होय. सूता, कर्ममार्गांत यत्किंचितही वैगुण्य आलें असतां, त्या कर्मापासून फलप्राप्ति होत नाहीं; आणि त्यांत वैगुण्य उत्पन्न होण्याचा संभव तर फार असतो. ह्याकरितां, आमच्या ह्या यज्ञकर्मांत न्यून न पडूं देण्याविषयीं आम्ही इतके दक्ष आहों कीं, यज्ञधूम्राच्या योगानें आमचीं शरीरें अगदीं पिंगट होऊन आमचे प्राण व्याकुळ झाले आहेत. अशा प्रसंगीं तूं आम्हांस श्रीकृष्णकथासवाची प्राप्ति करून देऊन उत्तेजन देत आहेस, हें उत्तम होय. तूं सांगितलेल्या ईशकथा श्रवण केल्यामुळें आमची बुद्धि अशी जिज्ञासु झाली आहे कीं, इतउत्तर आमच्या आयुष्यांतील प्रत्येक क्षण विष्णुभक्तांच्या सहवासांत जावा, असें आम्हांस वाटतें. साधुसमागमापेक्षां स्वर्ग किंवा मोक्ष देखील आम्हांस जास्त वाटत नाहीं. मग मृत्युग्रस्त मनुष्यांचीं राज्यें आणि त्यांचें नश्वर ऐश्वर्य ह्यांचा काय पाड? सूता, सर्वश्रेष्ठ ब्रह्मादि देवांस ज्याचा आधार, त्या परमेश्वराच्या लीला श्रवण करण्याविषयीं मनुष्याची उत्कंठा सदोदीत अधिकाधिक वाढणें साहजिक आहे! परमेश्वराचे गुणांचा अंत प्रत्यक्ष शंकरासारख्या महान योग्यांना देखील लागला नाहीं. म्हणून, कोणी कितीही वर्णन केलें, तरी परमेश्वराचें चरित्र नवें नवेंच वाटतें, व श्रोत्यांची तृप्ति होत नाहीं. सूता, तूं ज्ञानसंपन्न व महाभगवद्भक्त आहेस; तर आम्हांला त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराच्या आणखी अनेक लीला कथन कर. त्या ऐकण्याविषयीं आम्ही अगदीं आतुर झालों आहों. सूता, पुढें त्या परीक्षित राजास श्रीशुकाचार्यांनीं जें भागवत नामक पुराण सांगितलें, व ज्याच्या श्रवणानें त्या राजर्षीस भगवच्चरणारविंदांचा अखंड समागम घडला, तेंही आम्हांस सविस्तर सांग.

### सूतांचें गौरवपर उत्तर.

सूत म्हणतातः—ऋषीहो, आपण थोर आहां. मी हीन† जातीचा असून आपण मला बहुमान देतां, हें माझें भाग्य होय. आपणांसारख्या महात्म्यांची सेवा करण्याचा प्रसंग प्राप्त झाला, ह्यामुळें माझ्या जन्माचें आज साफल्य झालें असें मला वाटतें. थोर पुरुषांबरोबर सभेमध्यें बसून संभाषण करण्याचा योग आला असतां हीनकुलांत उत्पन्न झाल्याचे सर्व दोष नाहींतसे होतात मग त्यांतून तो संवाद जर भगवत्कथापर असेल, तर त्यापेक्षां अधिक कल्याण तें कशांत असणार? तो भगवान अपरिमित शक्तिमान आहे. त्याच्या गुणांचा व स्वरूपाचा अंत नाहीं; व म्हणून त्यास अनंत ही संज्ञा प्राप्त झालेली आहे. भगवद्गुणांची बरोबरीही कोणास करितां येणार नाहीं, मग त्यावर ताण करण्याची गोष्ट तर कशाला पाहिजे? ऋषीहो, ब्रह्मादिक देव जिच्या केवळ कृपाकटाक्षाची इच्छा करीत असतां जी त्यांचा धिक्कार करिते, अशी साक्षात् लक्ष्मी ज्या भगवंताच्या चरणधूलीचें सेवन करिते, तरी जो तिच्याकडे साभिलाष मुद्रेनें अवलोकन करीत नाहीं, त्या षड्गुणैश्वर्य प्रभूच्या अनंतत्वाचें समर्थन करण्यास आणखी प्रमाण सांगण्याची काय अवश्यकता आहे बरें? ऋषीहो, त्या परमपावन भगवंताचें माहात्म्य काय वर्णन करावें? त्याच्या चरणाचें तीर्थ आपल्यास पवित्र करील म्हणून प्रत्यक्ष शंकरही त्याचें सिंचन आपल्या मस्तकावर करितात; व विचारी पुरुष आपल्या इंद्रियांचा निग्रह करून स्वतःच्या शरिरादिकांवरील आसक्ति एकदम सोडितात; आणि सप्रेम अंतःकरणानें आपलें सर्व लक्ष नारायणाच्या चरणीं लावून परमहंसपदाची प्राप्ति करून घेतात. ऋषीहो, आपण केवळ प्रतिसूर्य असून ज्या अर्थी भगवत्कथांविषयीं मला प्रश्न करितां, त्या अर्थी मी आपल्या ज्ञानाप्रमाणें आपल्यास त्या सांगतों. परंतु परमेश्वराच्या गुणांचें वर्णन करण्यास मी खरोखर असमर्थ आहें; पण आकाशाचें आक्रमण करण्यास पक्षी असमर्थ असतांही तो जसा आपल्या शक्तीप्रमाणें तें करितो, तसा मी शक्त्यनुसार आपल्यापुढें भगवद्गुणांचें वर्णन करितों.

### परीक्षिताची मृगया.

ऋषीहो, एके वेळीं परीक्षित राजा मृगयेकरितां वनांत गेला असतां उन्हाच्या तापानें आणि हिंडण्याच्या श्रमानें अगदीं व्याकुळ झाला, व त्यास अत्यंत तृषा लागली. त्यानें पाण्याकरितां सर्व वन धुंडाळिलें, पण त्याला तें कोठेंही आढळलें नाहीं. शेवटीं तो एका ऋषीच्या आश्रमांत आला, तों तेथें शमीक नामक एक महात्मे ऋषि नेत्र झांकून ध्यानस्थ बसले आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यांच्या जटा अस्ताव्यस्त पसरल्यामुळें व त्यांच्या देहावर मृगाजिनाचें आवरण असल्यामुळें त्यांचें स्वरूप आच्छादित झालेलें होतें. त्यांनीं आपलीं इंद्रियें, मन व बुद्धि ह्यांना त्यांच्या त्यांच्या विषयांपासून आवरून धरून त्यांच्या वृत्ति अंतर्मुख केल्या होत्या; व जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति ह्या तीनही अवस्थांच्या पलीकडील जी तूर्यावस्था, त्या अवस्थेस पोहोंचून ते ब्रह्मसुखाच्या अनुभवांत निमग्न झाले होते. अशा प्रकारें त्यांची वृत्ति परब्रह्मस्वरूपांत लीन झाली असतां, तृषाक्रांत झालेला तो परीक्षित राजा त्यांजवळ गेला, आणि त्यांजपाशीं पाणी मागूं लागला. ऋषीहो, ह्या त्याच्या याचनेचा उपयोग किती झाला असेल ह्याची कल्पना आपणच करा. तेथें सर्व कांहीं व्यर्थ होतें; पण त्या तृषाक्रांत राजाला त्याच्या विचारशक्तीनें मुळींच सोडिलें असल्यामुळें, ते ऋषि समाधिस्थ असून ह्या नश्वर जगांतील मिथ्या व्यवहारापासून अगदीं निवृत्त झाले असतील, अशी कल्पनाही त्याच्या

† सूत हा क्षत्रिय जातीचा पुरुष आणि ब्राह्मण जातीची स्त्री ह्यांजपासून झालेला होता.

मनांत आली नाहीं; व त्याला तें त्यांचें सर्व ढोंग वाटलें. आपला आदरसत्कार करावा लागेल म्हणून ह्या ब्राह्मणानें समाधीचें मिष केलें आहे अशी त्याची कल्पना झाली, आणि आपल्यास ह्यानें नुसतें तृणासन सुद्धां बसावयास दिलें नाहीं असें मनांत येऊन त्या राजाला मोठा क्रोध उत्पन्न झाला. जो परीक्षित ब्राह्मण पाहिल्याबरोबर त्याच्या चरणाचें तीर्थ आपल्यास कधीं मिळेल ह्याविषयीं उत्सुक असावयाचा, त्या पुण्यश्लोक राजाला ह्या वेळीं ब्राह्मणाविषयीं क्रोधबुद्धि उत्पन्न झाली, तेव्हां केवढें हें आश्चर्य! असो. क्षुधा व तृषा ह्यांनीं व्याप्त झालेल्या त्या राजानें विचारशून्य होऊन, धनुष्याच्या टोंकानें तेथें मरून पडलेला एक साप उचलून त्या समाधिस्थ ऋषींच्या गळ्यांत अडकाविला, आणि त्या क्रोधावेशांतच तो आपल्या नगरास निघून गेला. असें करण्यांत त्याचा उद्देश—हा ब्राह्मण खरोखरीच समाधिस्थ आहे, किंवा आमच्याबद्दल बेपर्वाई धरून त्यानें हें ढोंग केलें आहे हें पहावें, असा होता; असो. राजा आपल्या नगरास निघून गेला, व तो साप तसाच त्या शमीक मुनींच्या गळ्यांत लोंबत राहिला!

इकडे असें झालें कीं, शमीक ऋषींचा श्रृंगी नामक पुत्र आपल्या सोबत्यांना बरोबर घेऊन आश्रमाच्या बाहेर जरा लांब खेळावयास गेला होता. तो तेथें आनंदानें खेळत असतां, आश्रमांत त्या राजानें केलेलें हें कृत्य पाहिलेला एक मुलगा तेथें गेला, आणि त्यानें आश्रमांत घडलेला सर्व वृत्तांत त्या श्रृंगीला सांगितला. तें वर्तमान ऐकून श्रृंगी क्रोधानें लाल झाला, आणि आपल्या खेळगड्यांना उद्देशून मोठ्या आवेशानें म्हणाला, "मित्रहो, ऐश्वर्यानें उन्मत्त झालेले हे राजे किती तरी अनन्वित कृत्यें करूं लागले! ह्यांनीं बाळे भक्षण करणाऱ्या कावळ्यांप्रमाणें किंवा द्वाररक्षक कुत्र्यांप्रमाणें आपल्या योग्यतेनुरूप वागावयाचें सोडून, हे आपल्या अधिकाराचें अतिक्रमण करूं लागले हें ठीक नाहीं. अहो, क्षत्रियांची योग्यता म्हटली म्हणजे त्यांनीं ब्राह्मणांचें रक्षण करावें. असें असतां आतां त्यांचा शास्ता श्रीकृष्ण निजधामास गेला म्हणून ते आपल्या मर्यादांचें उल्लंघन करूं लागले काय? कांहीं हरकत नाहीं. आतां त्यांच्या अपराधाबद्दल मी त्यांना योग्य शासन करितों. पहा माझा पराक्रम!" अशा प्रकारचें क्रोधयुक्त भाषण करून त्यानें कौशिकी नदीच्या उदकाचें आचमन केलें, आणि

### परिक्षित राजास शाप

दिला: "ज्या अर्थी ह्या नराधमानें माझ्या पित्याच्या गळ्यांत मृत सर्प घातला आहे, त्या अर्थी ह्या कुलांगारास आजपासून सातवे दिवशीं तक्षक दंश करील!" ऋषींहो, ह्याप्रमाणें शाप देऊन तो बालक आपल्या आश्रमास आला, व आपल्या पित्याच्या गळ्यांत मृत सर्पाचें वेटोळें अजून तसेंच आहे असें पाहतांच मोठमोठ्यानें रडूं लागला. त्याच्या रडण्याच्या गोंधळानें ऋषींचा समाधि भग्न झाला; आणि त्यांनीं हळूहळू नेत्र उघडले. तों कंठांत मृत सर्प असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. तो त्यांनीं काढून टाकिला आणि मोठ्या शांतपणानें श्रृंगीस विचारिलें, "बाळा, कां रडतोस? तुझी कोणीं खोडी केली कीं काय?" तेव्हां त्यानें झालेला सर्व वृत्तांत पित्यास सांगितला.

पुत्राचें तें भाषण ऐकून ऋषींस फार वाईट वाटलें. त्यांनीं, पुत्रानें राजास शासन केलें म्हणून त्याचा गौरव तर केला नाहींच; पण उलट ते त्यास म्हणाले, "अरे मूर्खशिरोमणे, हें तूं काय केलेंस? अरे, क्षुल्लक अपराधाकरितां केवढा हा दंड! मूर्खा, ज्याच्या पराक्रमामुळें सर्व प्रजा सुखानें नांदत आहेत, आणि आपआपलीं कर्में निर्भयपणें करीत आहेत, त्या धर्मनिष्ठ राजाला तूं यःकश्चित मनुष्याप्रमाणें समजलास काय? अरे, राजा म्हणजे प्रत्यक्ष चक्रपाणि विष्णु होय.

तो जर ह्या पृथ्वीचें पालन करण्यास नसेल, तर बकरीं रक्षण करण्यास धनगर नसल्यामुळें त्या बकऱ्यांची जी स्थिति होते, तशी स्थिति सर्व प्रजाजनांची होईल. तुझ्या शापानें राजा नष्ट झाल्यामुळें, ह्यापुढें पृथ्वीवर जीं जीं पापें घडतील, तीं ती सर्व विनाकारण आपल्या शिरावर पडतील. कां तर, तशी स्थिति येण्यास कारण आपण झालों. पृथ्वी अराजक झाली असतां जिकडे तिकडे चोरवडा माजेल, आणि सज्जनांना नानाप्रकारच्या विपत्ति भोगाव्या लागतील. असा काल प्राप्त झाला म्हणजे मनुष्यें आपआपल्या वर्णाश्रमधर्मांप्रमाणें चालतनाशीं होतात. सर्व लोक आहार, निद्रा आणि मैथुन ह्याच व्यासंगांत निमग्न होतात. जातींचा व रीतींचा विचार रहात नाहीं. अरे मतिमंदा, परीक्षित म्हणजे सूर्यासारखा तेजस्वी, कीर्तिमान व महाभगवद्भक्त असून, तो अश्वमेध करणारा असल्यामुळें राजर्षींमध्यें अतिश्रेष्ठ होय. क्षुधा, तृषा आणि श्रम ह्यांनीं व्याप्त असल्यामुळें त्याजकडून जरी यदाकदाचित् अपराध घडला असला, तरी तो आमच्या शापास पात्र नव्हे !"

ऋषीहो, अशा अनेक प्रकारें त्या शृंगीला ते शमीक ऋषि बोलले, आणि मुलाकडून घडलेल्या पापाच्या निवृत्तीसाठीं त्यांनीं भगवंताची प्रार्थना केली: ते म्हणाले, "हे भगवन्, तूं सर्वांतरात्मा आहेस. ह्या अप्रबुद्ध बालकानें तुझ्या निष्पाप भक्ताला शाप देऊन तुझा अपराध केला आहे, त्याची तूं क्षमा कर. कारण, तुझ्या भक्तांची वंचना केली, त्यांचा तिरस्कार केला, त्यांना शाप दिला, त्यांचा अपमान केला, किंवा त्यांना ताडण केलें, तथापि ते अंगीं प्रतिकार करण्याचें सामर्थ्य असूनही उलट शस्त्र धरीत नाहींत." ह्याप्रमाणें त्यांनीं ईश्वराची प्रार्थना केली. राजानें केलेल्या अपराधाबद्दल त्यांना मुळींच वाईट न वाटतां, उलट राजाचाच अपराध आपल्या पुत्रानें केला म्हणून फार दुःख झालें.

सूत म्हणतातः—ऋषीहो, साधु कोणाला म्हणावें हें लक्षांत धरा. दुसऱ्यांनीं दुःख दिलें तरी जे दुःखित होत नाहींत, आणि दुसऱ्यांनीं सुख दिलें तरी जे हर्ष पावत नाहींत, तर जे सदोदित स्वानंदामध्यें निमग्न असतात, तेच साधु होत.

## अध्याय एकोणिसावा.

—:०:—

### परीक्षितास पश्चात्ताप.

सूत म्हणतातः—शौनका, त्या सार्वभौम परीक्षित राजाला आपल्या त्या निंद्य कृत्याविषयीं फार पश्चात्ताप होऊं लागला. तो आपल्याशींच म्हणाला:—म्यां अप्रबुद्धानें त्या निरपराधी ब्राह्मणाचा व्यर्थ अवमान केला! भस्माच्छादित अग्नीप्रमाणें त्या ब्राह्मणाचें उग्र तेज झांकलेलें आहे. मीं हा त्या ऋषींचा अपराध केला नसून प्रत्यक्ष परमेश्वराचाच अपराध केला आहे. परमेश्वरा, मी असा कधींही कोणाचा अवमान करणार नाहीं. माझ्या अपराधानें त्या ब्राह्मणाचा क्रोधाग्नि भडकून गेला असेल. आतां तो क्रोधाग्नि माझें हें सर्व राज्य, सैन्य, भांडार वगैरे एकदम दग्ध करून टाको; म्हणजे फिरून देव, गाई, ब्राह्मण ह्यांविषयीं मला दुर्बुद्धि उत्पन्न व्हावयास नको.

#### शापकथन.

ह्याप्रमाणें परीक्षित राजा चिंताग्रस्त असतां शमीक ऋषींकडून एक शिष्य त्याजकडे आला, व त्यानें राजास सांगितलें कीं, "तुला 'आजपासून सातवे दिवशीं तक्षकदंश होऊन मरण येईल' असा शाप झाला आहे." तें ऐकून राजास एक प्रकारचें समाधान वाटलें कीं, ह्या शापापासून तरी आपल्या विषयासक्त मनास वैराग्य उत्पन्न होईल. ऋषीहो, राज्यासनावर आरूढ असतांना जे जे नानाविध विलास भो-

गावयाचे, ते सर्व भोगून परीक्षित राजाचें मन पूर्णपणें तृप्त झालें होतें. ह्यास्तव इहलोक व परलोक हे दोन्हीही हितावह नाहींत असें त्यास आधींच वाटत असे. म्हणून ह्या वेळीं त्यानें एकदम सर्वांचे ठिकाणची आसक्ति सोडून देऊन श्रीकृष्णचरणांचेंच एकनिष्ठपणें ध्यान करावयाचा दृढ निश्चय केला, व मरणकालपर्यंत अनशन व्रताचा संकल्प करून तो श्रीगंगातटाकीं आला. शौनका, त्या परमपावन गंगेचें माहात्म्य काय सांगावें ? श्रीकृष्णाच्या चरणरजांनीं आणि त्याच्या चरणांवरील तुलसींनीं अतिपवित्र झालेल्या, व सर्व लोकांस आणि लोकपालांस अंतर्बाह्य पावन करणाऱ्या त्या गंगेचें सेवन कोणता मरणोन्मुख पुरुष करणार नाहीं बरें ? असो.

ह्याप्रमाणें तो राजर्षि अनशन व्रताचा संकल्प करून श्रीकृष्णचरणांचें ध्यान करीत बसला असतां, अनेक महान् महान् तपोनिधि ऋषि आपआपल्या शिष्यांसह तेथें आले. कदाचित् कोणी म्हणेल कीं, ते तीर्थस्नानास प्राप्त झाले असतील; पण, शौनका, ते साधुजन स्वतःच तीर्थस्वरूपी असून तीर्थयात्रेच्या मिषानें उलट तीर्थांसच पावन करितात. शौनका, तेथें जे ऋषि आले होते, त्यांपैकीं कांहींचीं नांवें मी तुला सांगतों: अत्रि, अरिष्टनेमि, अंगिरा, आर्ष्टिषेण, अगस्त्य, और्व, इध्मवाह, इंद्रप्रमद, उतथ्य, कवष, गौतम, च्यवन, देवल, नारद, पराशर, परशुराम, पिप्पलाद, भारद्वाज, भृगु, भगवान् वेदव्यास, मेधातिथि, मैत्रेय, वसिष्ठ, विश्वामित्र, शरद्वान हे व ह्यांशिवाय अनेक मोठमोठे देवर्षि, ब्रह्मर्षि, राजर्षि, अरुणादिक कांडर्षि व अनेक ऋषींच्या गोत्रांत उत्पन्न झालेले दुसरेही पुष्कळ ऋषि आपआपल्या शिष्यांसह तेथें प्राप्त झाले. परीक्षितानें त्या सर्वांचें आदरपूर्वक पूजन केलें, आणि त्या सर्वांस साष्टांग नमस्कार केला. नंतर ते सर्व ऋषि आसनांवर बसले. तेव्हां परीक्षित उभा राहिला, आणि हात जोडून प्रायोपवेशन करून बसण्याबद्दलचा आपला निश्चय त्यानें सर्वांस नम्रपणें कळविला; व त्यांचें अनुमोदन मिळावें म्हणून अत्यंत लीन होऊन त्यानें त्या

**ऋषींची प्रार्थना**

केली असतां सर्वांनीं त्यास अनुकूल मत दिलें. तेव्हां तो म्हणाला, "ऋषीहो, उच्छिष्ट, मल, मूत्र आणि पादप्रक्षालनाचें पाणी हीं दूर टाकावीं असें स्मृतिकार म्हणतात. आम्हीं क्षत्रियांनीं तर त्यांच्याहीपेक्षां दूर असावें, इतकें आमचें कुल नीच आहे; तथापि आपणांसारख्या साधुजनांनीं आम्हांवर अनुग्रह केला, ह्यास्तव आम्ही पुरुवंशीय क्षत्रिय धन्य आहों. मतिमंद व नेहमीं संसारांत गढून जाऊन ब्राह्मणांची हेलना करणाऱ्या ह्या मज पापबुद्धीचे ठिकाणीं वैराग्य उद्भवून आत्मानात्मविवेक उत्पन्न व्हावा ह्या हेतूनें, स्थावरजंगमात्मक जगन्नियंत्या परमेश्वरानें ब्राह्मणाकडून मला शाप देवविला आहे. अशा प्रकारचा शाप झाला असतां जो पुरुष संसारांत आसक्त राहील, त्याचा तत्काळ समूळ नाश होईल ह्यांत संदेह नाहीं. मी ईश्वराचे ठिकाणीं लक्ष लावून श्रीगंगा आणि ब्राह्मण ह्यांस साक्ष ठेवून तुम्हांस शरण आलों आहें. मला मिळालेल्या ब्रह्मशापानें प्रेरित झालेला तो तक्षक आतां खुशाल येऊन मला दंश करू द्या. तुम्ही त्याला मुळींच प्रतिबंध करू नका. श्रीकृष्णाच्या कथा मात्र यथेच्छ चालू द्या. मी ज्या जन्मास जाईन, त्या जन्मांत माझें श्रीभगवंताचे ठिकाणीं प्रेम असो. त्याचप्रमाणें सज्जनांशीं मैत्री आणि भगवद्भक्तांचा दृढ समागम मला प्राप्त व्हावा, म्हणूनच मी तुम्हांस शरण आलों आहें." ह्याप्रमाणें बोलून त्या राजानें आपल्या जनमेजय नामक पुत्रावर राज्यकारभार सोंपविला; आणि आपण निरशन व्रताचा संकल्प करून भागीरथीच्या तटाकीं पूर्वाभिमुख दर्भ हांतरून त्यावर बसला. त्याचा तो निश्चय पाहून

स्वर्गामध्यें सर्व देवांस देखील संतोष वाटला. ते पुष्पवृष्टि करूं लागले आणि दुंदुभि वाजवूं लागले. त्या वेळीं, लोकांवर कृपा करणें हेंच ज्यांचें ब्रीद अशा त्या तेथें जमलेल्या ऋषींनीं

### परीक्षिताचें अभिनंदन

केलें आणि म्हटलें, "हे राजर्षिश्रेष्ठा, प्रायोपवेशन करून श्रीकृष्णाचिंतन करीत बसणें हें तुम्हां भगवद्भक्तांस योग्यच आहे. कारण, युधिष्ठिरादिक तुझ्या पूर्वजांनीं भगवत्प्राप्त्यर्थ सार्वभौमपदाचा सुद्धां त्याग केला हें प्रसिद्धच आहे." ह्याप्रमाणें भाषण करून त्या ऋषींनीं विचार केला कीं, हा राजा देहविसर्जन करून परलोकास जाईपावेतों आपण सर्व येथेंच राहूं. हा महाभगवद्भक्त असल्यामुळें शोकरहित अशा उत्तम लोकास गमन करील.

हें ऋषींचें भाषण ऐकून परीक्षित म्हणाला, "हे परमपूज्य ऋषीहो, आपण प्रत्यक्ष वेदमूर्ति असून मज दीनावर अनुग्रह करण्याकरितां येथें आलां आहां. ह्या आपल्या उपकृतीबद्दल मी काय उतराई होऊं? जगावर उपकार करण्याचेंच आपलें ब्रीद आहे. ह्याशिवाय कोणताही पुरुषार्थ आपणांस साध्य करावयाचा नाहीं. म्हणून मी तुम्हांस मोठ्या आशेनें प्रश्न करितों कीं, सर्व लोकांनीं आणि त्यांतही मरणोन्मुख पुरुषांनीं निष्पाप अशा कोणत्या कर्माचें आचरण करावें? मुनिश्रेष्ठहो, आपण एकमतानें ह्याचा विचार करून माझें समाधान करा."

### परीक्षित व शुकाचार्य ह्यांची भेट.

त्या समयीं ते सर्व ऋषि योग, तप, दान, याग इत्यादिकांविषयीं आपसांत वादविवाद करीत असतां, भगवान व्यासपुत्र शुकाचार्य अकस्मात् तेथें प्राप्त झाले. ते नेहमीं अमुक एक विशिष्ट हेतु मनांत न धरितां पृथ्वीपर्यटन करीत असत. ते वर्णाश्रमादिकांची चिन्हें मुळींच धारण करीत नसत. ह्यामुळें, त्यांचा वर्ण किंवा आश्रम ओळखण्यास मुळींच साधन नव्हतें. ते आत्मानंदांत तल्लीन असल्यामुळें त्यांस वस्त्रांची देखील शुद्ध नव्हती. ते दिगंबर होते, त्यामुळें त्यांची चेष्टा करण्याकरितां त्यांच्या सभोंवतीं बायकामुलांचा बराच मोठा घोळका जमला होता. त्यांचें वय सोळा वर्षांचें दिसत असून हात, पाय इत्यादि सर्व अवयव सुकुमार दिसत होते. त्यांचे नेत्र सुंदर असून विस्तृत होते; नाक सरळ आणि उंच असें होतें; दोन्ही कर्ण चेहऱ्यास शोभण्यासारखे असून भोंवयांच्या योगानें मुख फारच सुशोभित दिसत होतें; त्यांच्या कंठावर शंखगत त्रिवलीप्रमाणें त्रिवळी होती; त्यांचें मानेचें गर्दन अगदीं मांसांत रुतून गेलें होतें; त्यांचें वक्षस्थल विशाल होतें; नाभि खोल होती; पोटावर तीन वळ्या पडल्या होत्या, त्यामुळें तें सुंदर दिसत होतें; त्यांचे केश कुरळे असून साऱ्या मस्तकावर विखुरलेले असे होते; त्यांचे बाहु दीर्घ होते; ते निरंतर यौवनावस्थेमध्यें असत; त्यांची अंगकांति सुंदर आणि हास्य मनोहर असल्यामुळें, त्यांजकडे पाहून स्त्रियांचें चित्त फारच चंचल होत असे. त्यांचा प्रभाव जरी गुप्त होता, तरी ऋषींस त्यांचें ज्ञान असल्यामुळें, परीक्षितासह ते सर्व उठून उभे राहिले, आणि सर्वांनीं त्या योगीश्वरांचा सत्कार केला. परीक्षितानें मस्तक नम्र करून नमनरूपानेंच त्यांची पूजा केली. आणि मी आपणांस शरण आलों आहें, असें म्हणून त्यानें त्यांच्या पायांवर मस्तक ठेविलें. ह्याप्रमाणें शुकाचार्यांचा सत्कार झालेला पाहून त्यांची चेष्टा करणारी मंडळी भयभीत होऊन पळून गेली. नंतर ते महाज्ञानी भगवान शुकाचार्य महासनावर स्थित झाले असतां सर्व ऋषींनीं त्यांची पूजा केली. शौनका, त्या वेळीं राजर्षि आणि ब्रह्मर्षि ह्यांनीं वेष्टित असलेले ते शुकाचार्य, ग्रहतारादिकांच्या योगानें चंद्र जसा शोभतो तसे शोभूं लागले.

**परीक्षिताची शुकाचार्यांस प्रार्थना.**

शुकाचार्यांची मति शांत आणि शास्त्रादिकांचे ठायीं अगदीं अकुंठित अशी होती; तेव्हां त्या महाभगवद्भक्त राजानें त्यांस नम्रपणें विनंती केली कीं, " हे ब्रह्मनिष्ठा, आपण येथें येण्याची कृपा करून अधम अशा आम्हां क्षत्रियांस पावन केल्यामुळें आम्ही साधुसेवेस योग्य झालों. केवळ आपल्या स्मरणमात्रेंकरूनच गृहस्थादिकांचीं पापें नष्ट होतात. मग ज्यांना आपलें दर्शन, पूजन किंवा स्पर्श वगैरे घडेल, ते शुद्ध होतील ह्यांत काय आश्चर्य ? योगिश्रेष्ठा, विष्णूच्या सान्निध्यानें जसे असुर तत्काल नष्ट होतात, तशीं आपल्या समागमानें सर्व पापें नष्ट होतात. पांडवांचा सहाकारी आणि आतेभाऊ जो भगवान श्रीकृष्ण, तो आज बंधुत्वाच्या नात्यानें मजवर प्रसन्न झाला आहेसें वाटतें. कारण, आपली गति कोणासही कळावयाजोगी नसून आज आपलें प्रत्यक्ष दर्शन मला झालें. एखाद्या दरिद्र्याला कल्पवृक्षाची किंवा कामधेनूची प्राप्ति व्हावी, त्याप्रमाणें, मी मरणोन्मुख झालों असतां मला आपलें दर्शन झालें. आपण योग्यांचे परमगुरु आहां. माझी एवढी इच्छा पूर्ण करावी: मरणोन्मुख मनुष्यानें सर्व प्रकारें मोक्षप्राप्तीचें कोणतें साधन करावें ? हे प्रभो, पुरुषानें काय श्रवण करावें ? कोणता मंत्र जपावा ? कशाचें स्मरण करावें ? कोणतें कर्म अगत्य करावें ? कोणाची सेवा अवश्य करावी ? मुने, हें सर्व मला सांगावें. अथवा अन्यपक्षीं, अमुक अमुक कर्में करूं नयेत, इत्यादि जें कांहीं सांगण्यासारखें असेल तें सर्व सांगावें. गाईचें दूध काढण्यास जितका काळ लागतो, तितका वेळ सुद्धां गृहस्थाश्रम्यांचे घरीं आपलें वास्तव्य होत नाहीं. म्हणून विलंब न लावतां माझें आताच समाधान करावें. "

सूत म्हणतात:—शौनका, ह्याप्रमाणें त्या राजाचें विनययुक्त भाषण ऐकून व्यासनंदन भगवान शुकाचार्यांनीं भाषण करण्यास प्रारंभ केला.



# श्रीमद्भागवत.

## द्वितीयस्कंध.

### अध्याय पहिला.

—:०:—

### मोक्षसाधनविचार.

शुकाचार्य म्हणाले:—राजा, तूं विचारिलेले प्रश्न फार महत्त्वाचे आहेत. कारण, मनुष्यांनीं काय श्रवण करावें, कशाचा जप करावा, इत्यादि प्रश्न ज्ञानोपत्तीला कारणीभूत असून लोकांना हितकर असे आहेत, व ते आत्मज्ञानसंपन्न पुरुषांसही मान्य आहेत. राजा, आत्मतत्त्वाविषयीं ज्ञान नसल्यामुळे प्रपंचांत आसक्त राहून गृहस्थधर्म आचरण करीत असतां साहजिकपणें ज्यांकडून पंचसूनादि† दोष घडून येतात, अशा पुरुषांस श्रवण किंवा मनन करण्यास योग्य अशीं अनेक शास्त्रं आहेत. ह्या प्रापंचिक लोकांचें अर्धें आयुष्य निद्रा आणि रतिसुख ह्यांमध्यें, व अर्धें संसारांत उदरनिर्वाहाच्या खटपटींत व्यर्थ जातें. अपत्यें, स्त्री, आईबाप इत्यादि आप्तस्वकीयांच्या मरणाचा अनुभव येत असूनही, हा संसार मिथ्या आहे हें त्याला उमजत नाहीं. राजा, ह्या जगामध्यें सर्वव्यापक, सर्वशक्तिमान आणि तिन्ही कालीं अबाधित व शाश्वत रूपानें वास करणारा एक श्रीहरि मात्र होय. ह्याकरितां, मोक्षाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें त्या परमेश्वराचीं चरित्रें श्रवण करावीं, त्याच्या नांवाचें कीर्तन करावें, व त्याचेंच ध्यान करावें. आत्मानात्मविचार, अष्टांगयोगसाधन आणि स्वधर्मनिष्ठा ह्यांच्या योगानें अंतकालीं जीवास ईश्वराची स्मृति होते; आणि अंतकालीं ईश्वराचें स्मरण होणें हेंच मनुष्यजन्माचें साफल्य होय. विधिनिषेधरहित झालेले आणि निर्गुण ब्रह्माचे ठायीं रत असलेले परमहंस सुद्धां ईश्वराचीं चरित्रें श्रवण आणि वर्णन करण्यांत निमग्न असतात.

राजा, ब्रह्मज्ञान प्राप्त करून देणारें भागवत नामक पुराण द्वापरयुगाच्या शेवटीं माझा पिता जो व्यास त्याजपासून मी शिकलों. तूं पूर्ण ईश्वरभक्त आहेस; म्हणून, ज्या भागवताविषयीं दृढ विश्वास धरणाऱ्या पुरुषास ईश्वराचे ठिकाणीं निष्काम प्रीति प्राप्त होते, तें भागवत पुराण मी तुला सांगतों. मी निर्गुण ब्रह्माचे ठिकाणीं नेहमीं रत असतांही, त्या भागवतांत सांगितलेल्या भगवंताच्या कथांचे ठायीं माझें अंतःकरण नेहमीं

† दळण, कांडण, पाणी भरणें, चूल पेटविणें व झाडसारव करणें हे व्यवहार करीत असतां सहज जे जीवहानिदोष घडतात, त्यांस पंचसूनादोष म्हणतात.

रममाण असतें. हें ईश्वराचें नामसंकीर्तन मोक्षाची इच्छा करणाऱ्या लोकांस लवकर मोक्ष मिळण्यास आणि योगीजनांस अनायासें ज्ञानप्राप्ति होण्यास साधन आहे, व तें विषयेच्छु पुरुषांचे मनोरथ पुरविणारें असून हा भवसमुद्र तरून जाण्यासही उत्तम साधन आहे, असा सर्व वेदशास्त्रांचा सिद्धांत आहे. राजा, तुझें आयुष्य थोडें राहिलें आहे, यास्तव ह्या अल्पकालांत आपल्या हातून मोक्षसाधन कसें होईल, ही चिंता तुला उत्पन्न झाली असेल; परंतु अशी चिंता करण्याचें कारण नाहीं. हें पहा—आयुष्याचा उपयोग कसा करावा हें ज्ञान नसणाऱ्या पुरुषांच्या हजारों वर्षे आयुष्यापेक्षां, आयुष्याचा खरा उपयोग जाणणाऱ्या पुरुषाचें दोन घटिका आयुष्य देखील मोक्षप्राप्तीस पुरे आहे; म्हणून साधक पुरुषानें ज्ञान संपादण्याचा यत्न करावा, हें सर्वथा इष्ट होय. ह्याविषयीं तुला एक उदाहरण सांगतों.

पूर्वी खट्वांग नामक एक राजा होऊन गेला. त्याला, आपलें आयुष्य अवघें दोन घटिकाच उरलें आहे असें समजतांच त्यानें सर्वसंगपरित्याग केला, आणि तेवढ्या अल्प अवधींतही आत्मज्ञान संपादन करून तो श्रीहरिपदास मिळाला. हे कुरुकुलोत्पन्ना परीक्षित राजा, तुला तर अजून सात दिवस आयुष्य आहे. म्हणून ह्या अवकाशांत परलोकप्राप्तीचें साधन तूं करून घे. राजा,

**मृत्यु समीप आला असतां काय करावें**

तें सांगतों: प्रथम मृत्यूचें भय सोडावें; नंतर देह व तत्संबंधी पुत्रकलत्रादिकांवर असलेली माया वैराग्यरूपी शस्त्रानें तोडून टाकावी; व ती माया फिरून उद्भवू नये म्हणून गृहादिकांचा परित्याग करून ब्रह्मचर्यादि व्रतांचें आचरण करावें; यमनियमादि योगांचें साधन करून पुण्यतीर्थांचीं स्नानें करावीं; ब्रह्मस्वरूपाचें बीज जो सर्व मंत्रांत श्रेष्ठ शुद्ध ॐकार मंत्र त्याचा जप करून, प्राणायामाच्या योगानें मनाची एकाग्रता करावी; नंतर निश्चयात्मक बुद्धीच्या योगानें मनाचें आकलन करून सर्व इंद्रियें विषयांपासून सोडवून अंतर्मुख करावीं, आणि शुद्ध भगवत्स्वरूपीं चित्त लावावें; नंतर ध्यानांत आणिलेल्या मूर्तीवरून आपलें चित्त यत्किंचितही ढळूं न देतां त्या मूर्तीच्या सर्व अवयवांचें ध्यान करावें; त्या वेळीं इतर कोणत्याही वस्तूचें स्मरण होऊं देऊं नये; कदाचित् रज आणि तम ह्या गुणांच्या दोषानें मन चळूं लागलें, तर त्या दोषांचा नाश करणारी जी दृढ धारणा तिच्या योगानें पुनः भगवत्स्वरूपीं लक्ष लावावें; त्या धारणेच्या योगानें, परमेश्वर पूर्ण सुखाचें स्थान होय, असें अनुभवास येतें; व लौकरच त्या भगवत्स्वरूपीं सप्रेम भक्ति जडते.

हें ऐकून राजा म्हणालाः—हे ब्रह्मनिष्ठ मुने, रज आणि तम ह्यांच्या दोषांचा परिहार करणारी ती धारणा कोणत्या स्वरूपाचे ठायीं कशी करावयाची तें मला सांगावें.

शुकाचार्य म्हणालेः—साधकानें एका आसनावर पुष्कळ वेळ सुखानें बसण्याचा प्रथम अभ्यास करावा; नंतर प्राणायामाच्या योगानें पुष्कळ वेळपर्यंत श्वासस्तंभन करण्यास शिकावें; माया-मोह व अहंकार ह्यांचा त्याग करून विषयप्रवृत्तीपासून इंद्रियांचें आकलन करावें. अशा रीतीनें ध्यानधारणा केल्यानंतर भगवंताच्या स्थूल देहाचे ठायीं मन लावावें. तो स्थूल देह जगांतील सर्व वस्तूंपेक्षांही मोठा असून त्याच्या ठिकाणीं हें त्रिगुणात्मक स्थावरजंगम संपूर्ण विश्व दिसून येतें. हे राजा, पृथ्वी, उदक, तेज, वायु, आकाश, अहंकार आणि महत्तत्त्व ह्या सात आवरणांनीं वेष्टित ब्रह्मांडरूपी शरीरांत विराट् नामक भगवान परमपुरुष वास करितो, तोच ध्यानधारणेचा विषय होय.

**विराट्स्वरूपाचें वर्णन.**

ह्या विराट्स्वरूप पुरुषाचे तळवे म्हणजे पाताल लोक होय. रसातल ह्या त्याच्या टांचा

आणि चवडे होत. महातल घोंटे होत. सुतल हे गुडघे असून अतल व वितल ह्या मांडया होत. महीतळ हा त्याच्या कमरेचा पुढील भाग असून आकाश हा त्याचा नाभिप्रांत होय. स्वर्लोक हें त्याचें वक्षःस्थळ असून महर्लोक ही त्याची मान, जनर्लोक हें त्याचें मुख, व तपोलोक हें त्या परमेश्वराचें कपाळ होय. सत्यलोक हीं त्या आदिपुरुषाचीं अनंत मस्तकें होत. तेजस्वी इंद्रादिक देव हे त्या विराट्पुरुषाचे बाहु असून दिशा हे त्याचे कान, व शब्द हें श्रोत्रेंद्रिय आहे. अश्विनीकुमार ह्या त्या परमपुरुषाच्या नाकपुड्या असून गंध हें त्याचें घ्राणेंद्रिय होय. प्रदीप्त अग्नि हें त्याचें मुख आहे. अंतरिक्ष लोक हे त्याचे नेत्रगोलक असून सूर्य हा त्याचें चक्षुरिंद्रिय आहे. रात्र आणि दिवस ह्या त्या परमपुरुषाच्या नेत्राच्या पापण्या आहेत. त्याच्या भोंवयांचा विस्तार ब्रह्मपद आहे. उदक हें त्या ईश्वराची टाळू असून जिव्हा त्याचे सर्व रस आहेत. सर्व वेद हीं त्या अनंताचीं मस्तकें असून यम ह्या त्याच्या दाढा होत. पुत्रादिकाचे ठिकाणीं जी प्रीति, ते त्याचे दांत होत. लोकांना मोह उत्पन्न करणारी जी माया, तेंच त्या भगवंताचें हास्य होय. अनंत काळीं घडणारी सृष्टि हच त्याचे नेत्रकटाक्ष होत. लज्जा हा त्याचा वरचा ओंठ असून लोभ हा अधरोष्ठ होय. धर्म हे त्याचे स्तन व अधर्म हा त्याचा पृष्ठभाग होय. तसेंच, दक्ष प्रजापति हा त्याचें उपस्थेंद्रिय आहे. सूर्य आणि वरुण हे त्याचे वृषण होत. सर्व समुद्र त्याच्या कुशी व सर्व पर्वत हे त्याच्या अस्थींचे समुदाय होत. सर्व नद्या ह्या विश्वरूपी परमेश्वराच्या शरिरांतील नाड्या होत. वृक्ष हे त्याच्या शरिरावरील रोम होत. अनंतशक्तिमान असा जो वायु, ते त्याचे श्वासोछ्वास होत. काळ ही त्याची गति आहे. सत्व, रज व तम ह्या गुणांपासून होणारीं सर्व कार्यें ही त्या परमेश्वराची क्रीडा होय. मेघ हे त्या ईश्वराच्या मस्तकावरील केश आहेत. दोन संध्याकाळ हीं त्याचीं वस्त्रें असून माया हें त्याचें हृदय, व चंद्रमा हें त्याचें मन आहे. राजा, हें मनच नानाप्रकारच्या विकारांचें भांडार आहे. महत्तत्व हें त्या पुरुषाचें चित्त मानिलें आहे. रुद्र हाच त्याचें अंतःकरण आहे. घोडा, खेचर, उंट, हत्ती वगैरे त्याच्या नखांचे स्थानीं मानिले आहेत. हरिणादि इतर सर्व पशु त्या परमेश्वराच्या कटिभागाचे स्थानीं मानिले आहेत. सर्व पक्षी हें त्याचें उत्तम शिल्पकौशल्य होय मनु हा त्याची बुद्धि असून पुरुष हा त्याचें राहण्याचें स्थल होय. गंधर्व, चारण, विद्याधर व अप्सरा हे त्याचे मधुर स्वर होत. दैत्यांच्या समुदायांतील श्रेष्ठ जो प्रल्हाद, ती त्या भगवंताची स्मरणशक्ति आहे. ब्राह्मण हें त्याचें मुख आहे. क्षत्रिय हे त्याचे बाहु, वैश्य ह्या त्याच्या मांडया आणि शूद्र हे त्याचे चरण होत. यज्ञप्रयोग हें त्या पुरुषाचें कर्म होय. हे राजा, ही जी विराट्स्वरूप परमेश्वराची शरीरावयवरचना मी तुला सांगितली, इचे ठिकाणीं आपल्या बुद्धीच्या साहाय्यानें मनाची धारणा करावी. कारण, ह्या स्वरूपाशिवाय जगांत कांहींही वस्तुमात्र राहूं शकत नाहीं. राजा, जसा जीव हा एकच असून स्वप्न पहातो त्या वेळीं स्वप्नांत अनेक जीवांस मनानेंच उत्पन्न करून त्यांच्या त्यांच्या इंद्रियांनीं सर्व व्यवहारांचा अनुभव घेतो. तसाच हा सर्वांतर्यामी ईश्वर सर्वांच्या बुद्धिवृत्तिद्वारा सर्व विषयांचा अनुभव घेतो. त्या सत्यस्वरूप व आनंदनिधि परमेश्वराचें एकाग्रचित्तानें स्मरण करावें; त्यावांचून दुसऱ्या वस्तूवर प्रेम कधींही ठेवूं नये. कारण, इतर वस्तूवर प्रेम ठेविल्यानें जन्ममरणरूपी भवसमुद्रांत पडावें लागतें.

# अध्याय दुसरा.

—:०:—

शुकाचार्य म्हणाले:—राजा, पूर्वकल्पाच्या शेवटीं जेव्हां सृष्टिप्रलय झाला, तेव्हां ब्रह्मदेवही भगवंताच्या उदरांत लीन झाला; आणि तेव्हां पासून सांप्रतच्या कल्पास प्रारंभ होई तोंपर्यंत तो तेथेंच राहिला होता नंतर ह्या कल्पास आरंभ होण्याच्या संधिकालीं तो जागा होऊन भगवंताच्या नाभिकमलांतून वर आला; तेव्हां लागलीच सृष्टि उत्पन्न करण्याविषयीं भगवंतांनीं त्यास आज्ञा केली. राजा, ब्रह्मदेव स्वयंभू खरा; पण प्रलयकाळच्या महानिद्रेमुळें, आपण पूर्वी सृष्टि कशी करीत होतों ह्याचें स्मरण त्यास होईना: तेव्हां त्याला एक उत्तम विचार सुचला. आणि त्यानें श्रीभगवंताच्या ठिकाणीं आपल्या मनाची धारणा केली. तेव्हां त्या योगानें त्यास पुनः सृष्टि करण्याचें ज्ञान उत्पन्न झालें. व नंतर त्यानें पूर्वकल्पांतील सृष्टीप्रमाणें नव्या सृष्टीची रचना केली. राजा, ईश्वराची निरपेक्ष भक्ति करणें हा मार्ग अत्यंत श्रेष्ठ होय. वेदांत कर्ममार्ग वर्णिला आहे, पण त्यापासून जीं फलें प्राप्त होतात तीं नश्वर असतात. म्हणून त्या

### कर्मफलांची निंदा

करणेंच इष्ट होय. कारण, त्यांची स्तुति केली तर मुमुक्षु जनांची कर्माचरणाकडे प्रवृत्ति होईल: आणि असें झालें म्हणजे वैराग्य उत्पन्न न होऊन त्यांस ईश्वरप्राप्तीचा मार्ग बंद होईल. कर्ममार्गानें चालणाऱ्या पुरुषास जीं फलें प्राप्त होतात म्हणून वेदांमध्यें वर्णिलें आहे, त्यांस स्वर्गलोक, पितृलोक इत्यादि मोठमोठीं आणि मोहक नांवें दिलेलीं असल्यामुळें मनुष्यास मोह पडतो, आणि तो फलांच्या इच्छेनें कर्माचरण करूं लागतो; पण शेवटीं, तीं फल केवळ मनोराज्येंच होत ! राजा, ही जी त्याची निराशा होते, तिजसंबंधीं आश्चर्य वाटावयास नको; हें असें होणारच ! कारण' जितक्या म्हणून उपभोग्य वस्तु आहेत, त्या कधीं ना कधीं तरी नष्ट होणारच; मग त्यांना हवीं तितकीं मोठमोठीं नांवें दिलीं, तरी त्या शाश्वत होणार आहत कीं काय ? ह्याकरितां, साधकानें ह्या मोह पाडणाऱ्या कर्मफलांविषयीं अगदीं निरिच्छ असलें पाहिजे. अवश्यकतेपेक्षां ह्यांशीं जास्त संबंध ठेवितां उपयोगीं नाहीं. आत्मप्राप्ति करून घेण्याकरितां शरिराचें अस्तित्व असणें अवश्यक आहे; म्हणून केवळ शरिराच्या संरक्षणापुरताच त्या उपभोग्य वस्तूंचा उपयोग करून घ्यावा; ह्यापलीकडे, ह्या नश्वर शरिरास सुखप्राप्ति होण्याकरितां नानाप्रकारचे प्रयत्न करूं नये. राजा, मोक्षेच्छु पुरुषाला शरीरसंरक्षणाकारेतां यत्न करणेंच भाग पडावें अशी कांहीं परमेश्वराची इच्छा नाहीं, व त्याची व्यवस्थाही तशी दिसून येत नाहीं. शरिराच्या रक्षणास अवश्यक तेवढें साहित्य त्याला श्रमावांचून मिळावें अशी योजना करून, त्यासंबंधीं सर्व साधनें परमेश्वरानें सिद्ध करून ठेविलीं आहेत. पहा—मनुष्याला राहण्याकरितां व निजण्याकरितां त्यानें भूमि तयार करून ठेविली आहे; उशाला घेण्याकरितां त्याला हात दिले आहेत; नेसण्याकरितां किंवा पांघरण्याकरितां दिशा अथवा झाडांच्या साली आहेत; पाणी पिण्यास ज्याची त्याला स्वतःची ओंजळ आहे; पाणी सांठविण्यास नद्या आहेत; क्षुधाशांतीकरितां झाडाचीं फळें. मुळ, साली, पाला हीं आहेतच; आणि इतकें असूनही, 'जो मला अनन्यभावानें शरण येईल, त्याच्या योगक्षेमाचा भार सर्वस्वी मी वाहीन,' अशी परमेश्वराची प्रतिज्ञा‡ आहे. मग, मोक्षेच्छु पुरुषास शरीरसंरक्षणाचा कोणता त्रास उरला आहे ! व मग त्यास

‡अनन्याश्चिंतयन्तो मां ये जनाः पर्युपासते ॥
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥
भगवद्गीता, अ० ९ श्लो० २२.

द्रव्यमदांध लोकांचें आर्जव करण्याचें तरी प्रयोजन काय! राजा, विरक्त पुरुषास शरीरसंरक्षणाविषयीं यत्न करावयाची अवश्यकता नाहीं. आतां

**विरक्त पुरुषाचें आचरण**

कसें असावें तें सांगतो: जन्ममरणरूप संसार प्राप्त होण्यास अज्ञान हेंच कारण होय; म्हणून प्रथमतः त्याचा नाश होण्याकरितां, विरक्त पुरुषानें भगवत्स्वरूपाविषयीं निश्चित बुद्धि धारण करावी; आणि आपल्या चित्तामध्ये स्वतःसिद्ध असणारा जो प्रिय आत्मा, त्याचें प्रसन्न अंतःकरणानें भजन करावें, म्हणजे त्याचें अज्ञान नष्ट होतें. मनुष्यास, विषयांच्या चिंतनामुळें, तापत्रयानें ओतप्रोत भरलेल्या ह्या संसारात पडावें लागतें; ह्याकरितां, विषयांकडे प्रवृत्ति करणाऱ्या कर्ममार्गाच्या फंदांत विरक्त पुरुषानें पडूं नये.

**परमेश्वराच्या सगुण रूपाचें ध्यान.**

राजा, विरक्त पुरुषानें, आपल्या हृदयाकाशांत टीचभर उंचीची भगवन्मूर्ति आहे अशी मनाची धारणा करावी. ती मूर्ति चतुर्भुज असून तिच्या हातांत शंख, चक्र, गदा व पद्म हीं आयुधें आहेत; व प्रफुल्लित नेत्रकमलांच्या योगानें तिचें मुख सुप्रसन्न दिसत आहे असें ध्यान करावें. त्या मूर्तीच्या कमरेला मेखला व पीतांबर, मस्तकावर देदीप्यमान किरीट, कानांत मकराकार कुंडलें, बोटांत बहुमोल अंगठ्या, बाहूंवर रत्नखचित बाहुभूषणें, कंठांत कौस्तुभ मणि आणि टवटवीत व घवघवीत वनमाला, पायांत नूपुरें आणि हृदयाच्या ठिकाणीं श्रीवत्सलांछन आहे, असें मनांत आणावें; मस्तकावरील नील कुंतलांनीं शोभणारी ती श्यामसुंदर मूर्ति आपल्यावर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें आपल्याकडे प्रसन्न मुद्रेनें अवलोकन करीत आहे असें पहावें; व असें पहातां पहातां अंतःकरणाची वृत्ति तेथेंच पूर्णपणें स्थिर करावी. नंतर त्या समग्र मूर्तीकडे पूर्ण लक्ष लागलें म्हणजे पायापासून मस्तकापर्यंत सारखें तिला न्याहाळीत बसावें, व शेवटीं ती मूर्ति मनामध्यें दृढ करून, तें आनंदमय झालेलें मन बुद्धीच्या योगानें त्या मूर्तीच्या चरणीं लीन करावें. ह्याप्रमाणें परमेश्वराच्या ठिकाणीं भक्तियोग दृढ होईपर्यंत साधकानें नित्यनैमित्तिक कर्मांच्या शेवटीं विराट्स्वरूपाचें ध्यान करीत जावें, म्हणजे हें विश्व ईश्वरमय आहे, व ह्यांत दिसणाऱ्या वस्तु मिथ्या आहेत, असा बुद्धीचा निश्चय होईल. राजा, मनुष्यदेहाला मरण हें केव्हां तरी येणारच हें निश्चित असल्यामुळें, त्यानें ह्या अशाश्वत देहाला क्षणिक सुखाची प्राप्ति करून घेण्याकरितां व्यर्थ यातायात करूं नये. हे राजर्षिश्रेष्ठा, आतां,

**देहत्यागसमयीं योग्यानें काय करावें**

तें ऐक: देहत्याग करण्याला पुण्यक्षेत्र किंवा उत्तम कालच पाहिजे, असली शंका योग्यानें मनांत देखील आणूं नये. कारण, योगसाधनानें त्यास सर्व सिद्धि प्राप्त होतात असा सिद्धांत आहे. म्हणून योग्यानें देहावसानकालीं आपल्या इंद्रियांचा मनानें निग्रह करावा, आणि स्थिर व सुखकर अशा आसनावर बसून प्राणांचा निरोध करावा. नंतर बुद्धीच्या योगानें मनाचें आकलन करावें, व त्या योगानें संकल्पविकल्पात्मक मनाचा बुद्धीच्या ठिकाणीं लय करावा; नंतर क्षेत्रज्ञ जो जीव त्या जीवाच्या ठिकाणीं बुद्धीचा लय करावा. त्या जीवाचा शुद्ध परमात्म्याच्या ठिकाणीं लय करून, मीच तो आत्मा आहें, असें जाणावें व तेथेंच सुखरूप व्हावें, आणि विधिनिषेधरूप सर्व कर्मे सोडून द्यावीं. कारण, विरक्त पुरुषाला त्याहून दुसरें कांहीं देखील प्राप्त करून घ्यावयाचें उरत नाहीं. कालाचा तडाखा मोठा अनिवार आहे. त्याचा प्रभाव देवांवर देखील चालतो; पण परमात्मस्वरूपीं त्याची गति कुंठित होते. कारण, जेथें गुण किंवा अहंकार हे असतात, तेथेंच त्याचा प्रभाव चालणार!

गुण किंवा अहंकार हे आत्म्याच्या ठिकाणीं मुळींच नाहींत. आत्मा निर्गुण, निरहंकार आणि निरुपाधिक असा आहे. ह्या आत्मस्वरूपाला केवळ आम्हीच श्रेष्ठ म्हणतों असें नाहीं;—महान् महान् योगी देखील आत्म्यालाच श्रेष्ठत्व देतात, आणि अहंताममतादिकांचा त्याग करून त्या भगवंतालाच अनन्यभावानें शरण जातात. म्हणून ब्रह्मस्थितीला पोहोंचलेल्या निरिच्छ योग्यानें सर्व कर्मांचा त्याग करून आपल्या देहाचें विसर्जन करावें. राजा, देहत्यागसमयीं योग्यानें काय करावें तें तुला सांगितलें. आतां,

**योग्यानें देहत्याग कसा करावा**

तें सांगतों: प्राणायामाच्या योगानें प्राणवायु स्वाधीन ठेवणाऱ्या त्या योग्यानें आसनावर बसावें. डाव्या पायाच्या टांचेनें आपलें गुदद्वार दाबून धरून तें बंद करावें. नंतर तो वायु तेथून मूलाधारादि सहा चक्रांवर चढवीत चढवीत न्यावा. त्याचा प्रकार असा: तो प्रथम अपानद्वाराच्या वरच्या बाजूनें मूलाधारचक्र असतें त्यावर चढवावा; नंतर लिंगस्थानीं असलेल्या स्वाधिष्ठान नामक चक्रावर चढवावा; तेथून मणिपूर नामक चक्रावर चढवून तेथून हृदयांतील अनाहतचक्रावर चढवावा, व उदान वायूच्या गतीनें त्याला कंठाच्या मुळाशीं जें विशुद्धचक्र आहे तेथें न्यावा; नंतर, तेथून त्या विशुद्धचक्राचें अग्र टाळूच्या मुळाजवळ आहे, त्या मार्गानें मोठ्या सावधगिरीनें हळू हळू चढवीत चढवीत भुंवयांच्या मध्यें आज्ञाचक्र आहे तेथें आणावा, व अर्धा मुहूर्तपर्यंत तेथें स्थिर करावा. राजा, विशुद्धचक्रावरून आज्ञाचक्रावर तो वायु येईपर्यंत योग्यानें फारच जपलें पाहिजे. कारण, तेथून त्याला बाहेर पडण्यास दोन कान, दोन डोळे, दोन नाकपुड्या व तोंड अशीं सात द्वारें आहेत; असो. पुढें आज्ञाचक्रावर अर्धा मुहूर्तपर्यंत स्थिर राहिल्यानंतर, जर तो योगी निष्काम असेल तर त्यानें अकुंठित ज्ञानदृष्टीनें परब्रह्मस्वरूपीं लक्ष ठेवावें, आणि मनासह इंद्रियांचा व शरीराचा त्याग करावा, व ब्रह्मरंध्राचा छेद करून परब्रह्मस्वरूप व्हावें. अथवा, जर त्या योग्याला ब्रह्मलोकास, किंवा ज्या ठिकाणीं अणिमादि अष्टसिद्धि आहेत अशा सिद्धांच्या क्रीडास्थानीं जाण्याची इच्छा असेल, किंवा सत्त्वादि गुणस्वरूप ब्रह्मांडांत फिरण्याची इच्छा असेल, तर देहत्याग करतेवेळीं मन व सूक्ष्मेंद्रियें ह्यांचा त्याग न करितां, त्यांना बरोबर घेऊन इच्छित स्थळीं गमन करावें. राजा, आपला लिंगदेह बरोबर घेऊन योग्याला त्रैलोक्यांत आणि त्याच्या बाहेरही फिरतां येतें. कारण, त्याचा तो सूक्ष्म देह वायुमय असतो; त्यामुळें, जेथपर्यंत वायूची गति आहे, तेथपर्यंत त्याला फिरतां येतें. हें सामर्थ्य यज्ञयागादि कर्मांच्या योगानें प्राप्त होत नाहीं. ह्या गतीचे अधिकारी फक्त भगवंताची उपासना करणारे लोक, सर्वभूतीं परमेश्वर आहे अशा भावनेचे लोक, आणि अष्टांग व समाधि हे योग जाणणारे ज्ञानी इतकेच आहेत; इतर कोणीही नाहींत. राजा, असा योगी आपल्या तेजोमय सुषुम्ना नाडीरूप ब्रह्मप्राप्तीच्या मार्गानें आकाशांतून गमन करीत करीत प्रथम वैश्वानर नामक अग्निलोकास जातो. नंतर तो अग्निलोकाच्या वरच्या भागीं श्रीहरीच्या शिशुमार (ध्रुव) नामक ज्योतिश्चक्रावर आरोहण करितो; तें ध्रुवचक्र म्हणजे प्रत्यक्ष विष्णूचें चक्र होय. सूर्यासुद्धां सर्व ब्रह्मांडाला ह्याचा आधार आहे. योगी जेव्हां ह्याचें उल्लंघन करून जातो, तेव्हां तो एकटाच असतो. ह्या चक्रापलीकडे स्वर्गांतील लोकांची सुद्धां गति नाहीं. नंतर, महाकल्पपर्यंत राहणारे ब्रह्मज्ञानी भृग्वादि ऋषि जेथें ब्रह्मानंदांत रममाण असतात, त्या महर्लोकीं तो जातो. हें स्थान सर्व लोकांस पूज्य आहे. कर्ममार्गानें स्वर्गास गेलेल्या लोकांची गति ह्या स्थलीं होत नाहीं. त्यांनीं ह्या स्थलाला नम-

स्कार मात्र करावा, इतकेंच! ब्रह्मदेवाचा दिवस संपला म्हणजे त्याच्या सृष्टीचा प्रलय होतो. हा नित्यप्रलय होय. ह्या प्रलयाच्या वेळा शेषाच्या मुखांतून उत्पन्न झालेल्या अग्नीच्या योगानें जेव्हां त्रैलोक्य जळूं लागतें, तेव्हां त्याची धग ह्या महर्लोकास लागते; त्यामुळे तेथील सर्व योगी ब्रह्मदेव राहतो त्या सत्यलोकीं निघून जातात. तें स्थान ब्रह्मदेवाच्या आयुष्याइतकें म्हणजे दोन परार्ध वर्षेपर्यंत टिकणारें आहे. त्या ठिकाणीं सिद्धांचीं उत्तम उत्तम अनेक विमानें आहेत. तेथें वास करणाऱ्यांना शोक, जरा, मरण हीं मुळींच नसतात. ज्या लोकांना भगवंताच्या ध्यानाचा मार्ग माहित नसल्यामुळे अनंत दुःखें भोगावीं लागतात, त्यांबद्दल मात्र त्यांना वाईट वाटतें; हेंच काय तें त्यांना दुःख असतें.

### ब्रह्मलोकीं जाणाऱ्यांच्या तीन प्रकारच्या गति.

शुकाचार्य म्हणाले:—राजा, पुष्कळ पुण्यकर्माच्या योगानें जे ह्या ब्रह्मलोकीं जातात, ते दुसऱ्या कल्पामध्यें मोठे अधिकारी होतात; हिरण्यगर्भादिकांच्या उपासनेनें जे ह्या लोकीं जातात. ते ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतात; आणि जे भगवदुपासक येथें आलेले असतात. ते इच्छेस येईल तेव्हां ब्रह्मांडाचा भेद करून विष्णुलोकास जातात. राजा, आतां,

### भगवद्भक्तांचा ब्रह्मांडभेदप्रकार

तुला सांगतों, ऐक: प्रथमतः ते ब्रह्मलोकीं असणारे योगी आपल्या सूक्ष्म शरिराच्या योगानें पृथ्वीरूप आवरणास मिळतात. ब्रह्मांडाचा भेद आपल्याच्यानें कसा होईल, ही शंका त्यांच्या मनास शिवत देखील नाहीं. ते पृथ्वीरूपांतून त्याजवळच असलेल्या उदकावरणांत मिसळतात. नंतर ते उदकावरणांतून तेजांत लीन होतात व पुढें तेथून वायुरूपास जातात. ह्याप्रमाणें एका आवरणांतून दुसऱ्या आवरणांत त्या त्या आवरणांतील भोग भोगीत सावकाशपणें प्रत्येक आवरणाशीं ऐक्य पावून ते आकाशांत मिळून जातात. आकाश हें परमात्म्याच्या बृहन्मूर्तींपैकीं एक मूर्ति आहे, असें उपनिषदांत वगैरे पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. नंतर ते योगी त्या आकाशावरणांत राहून, इंद्रियांचे विषय जीं सूक्ष्म भूतें त्यांचें उल्लंघन करितात; तें असें: ते नासिकेंद्रियाच्या योगानें गंधाला मिळतात; जिव्हेच्या योगानें रसाला मिळतात; दृष्टीच्या योगानें रूपाला मिळतात; त्वचेच्या योगानें स्पर्शाला मिळतात. कर्णेंद्रियाच्या योगानें शब्दाला मिळतात; आणि वाक्, पाणि, पाद, पायु व उपस्थ या कर्मेंद्रियांच्या योगानें त्या त्या इंद्रियांच्या क्रियांस मिळतात. अशा रीतीनें ते योगी सूक्ष्म भूतें व महाभूतें उल्लंघून अहंकार तत्त्वाला जाऊन मिळतात. तो अहंकार तीन प्रकारचा आहे: सात्त्विक, राजस आणि तामस. त्यांतील तामस अहंकारामध्यें पंचमहाभूतें व इंद्रियें ह्यांचा लय होतो; राजस अहंकारामध्यें दहा इंद्रियें मिळून जातात; आणि सात्त्विक अहंकारामध्यें मनाचा व देवतांचा लय होतो. इतकें झाल्यानंतर, ते योगी अहंकारासुद्धां लयरूप गतीनें महत्तत्त्वाला जाऊन मिळतात; तेथून प्रकृतिरूप आवरणांत जातात; आणि शेवटीं ईश्वरपदास प्राप्त होतात. राजा, जे योगी ह्या पदास प्राप्त होतात, त्यांस फिरून कधींही जन्ममरणरूप संसार प्राप्त होत नाहीं; असो. ह्याप्रमाणें, राजा, काय श्रवण करावें, ह्या तुझ्या प्रश्नाचें उत्तर मीं तुला सांगितलें. हे दोन्ही मार्ग म्हणजे 'सद्योमुक्ति व क्रममुक्ति' मीच प्रतिपादन करितों असें नाहीं; तर वेदांनींही ह्यांचें वर्णन केलें आहे. पूर्वी ब्रह्मदेवानें भगवान वासुदेवाची आराधना करून त्यास प्रश्न केला असतां भगवंतानें हेच दोन मार्ग सांगितले. राजा, संसारी पुरुषास मोक्षप्राप्ति होण्यास तपोयोगादि अनेक मार्ग आहेत; परंतु भागवतधर्माचें

श्रवण आणि कीर्तन करण्यानें सप्रेम भक्तियोग प्राप्त होतो. म्हणून ह्यापेक्षां सुलभ आणि सुगम असा दुसरा कोणताही मार्ग नाहीं. ब्रह्मदेवानें सुद्धां जेव्हां पूर्वी एकाग्र अंतःकरणानें वेदांचा तीन वेळां विचार केला, तेव्हां हाच सिद्धांत ठरविला कीं, ज्या योगानें आत्मस्वरूप भगवंताच्या ठिकाणी प्रीति जडेल, तोच मार्ग उत्तम होय. राजा, आतां तूं कदाचित् असें म्हणशील कीं, भगवंताच्या स्वरूपाचा जर अनुभव येत नाहीं, तर त्याच्या स्वरूपावर प्रीति कशी जडेल? तर ह्याचेंही उत्तर तुला सांगतों: राजा, इतर मनुष्यें जशीं दिसतात, तसा तो स्पष्टपणें दिसत नाहीं ही गोष्ट खरी; पण त्याचा अनुभव येत नाहीं, हें म्हणणें मात्र शोभणार नाहीं. कारण, प्रत्येक व्यवहाराशीं त्याचा संबंध आहे. माझ्या मनांत अमुक गोष्ट आली किंवा माझ्या बुद्धीनें अमुक गोष्ट ग्राह्य आहे, असें जो म्हणतो, तो कोण? ह्यावर तूं कदाचित् असें म्हणशील कीं, तो जीव आहे; तर मग, माझ्या जीवाला सुख झालें किंवा दुःख झालें, असें कोण म्हणतो? अर्थात् मन, बुद्धि किंवा जीव ह्यांखेरीज कोणी तरी एक निराळा चालक आहे, हें सिद्ध होतें. मग, कोणी तरी निराळा चालक आहे असें कळणें म्हणजे त्याचा अनुभव येणें नव्हे काय? असा अनुभव आला म्हणजे मग त्यावर प्रीति जडण्यास काय प्रत्यवाय आहे? राजा, म्हणून तूं हें पूर्णपणें ध्यानांत ठेव कीं, कोणत्याही स्थितीत व कोणत्याही कालीं त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराच्या गुणांचें कीर्तन व श्रवण करणें, हाच उत्तम मार्ग होय. हें भागवतामृत साधूंना फार प्रिय आहे. तें आपल्या कर्णरूप ओंजळींत सांठवून जे प्राशन करतात, त्या पुरुषांचें विषयांनीं मलिन झालेलें चित्त पवित्र आणि शुद्ध होतें, आणि त्या योगानें ते संसारयातनांपासून मुक्त होऊन चरणकमलांजवळ जातात.

# अध्याय तिसरा.

—:०:—

## उपासनावर्णन.

शुकाचार्य म्हणाले:—राजा, मरणोन्मुख विवेकी मनुष्यानें कोणतें आचरण करावें, हें मीं तुला सांगितलें. त्यावर कदाचित् तूं अशी शंका घेशील कीं, असें आहे तर मग सर्व लोक त्या विराट्पुरुष भगवंताची उपासना कां करीत नाहींत? पुष्कळ लोक कर्ममार्गाचेंच आचरण करितात हें कसें? तर तेंही तुला सांगतों: बाबारे, विषयांतच अंतःकरण रममाण झाल्यामुळे जे केवळ पुच्छविषाणहीन पशु बनलेले असतात, त्यांना हा विचार उद्भवणार कसा? ज्यांना विषयादिकांतील नश्वर सुखाचें ज्ञान यथार्थ झालें असतें, ते कर्ममार्गाचें आचरण करीत नाहींत; व ज्यांस तें ज्ञान झालें नसतें, ते मात्र कर्मांत तल्लीन होतात. राजा, निरनिराळ्या नश्वर सुखांकरितां निरनिराळ्या देवतांची आराधना करावी लागते. ब्रह्मतेज प्राप्त करून घ्यावयाचें असल्यास ब्रह्मदेवाची; इंद्रियें सुदृढ असण्याकरितां इंद्राची; संततीकरितां प्रजापतींची; ऐश्वर्याकरितां दुर्गादेवीची; तेजस्वितेकरितां अग्नीची; द्रव्याकरितां अष्टवसूंची; लोकांवर आपला दाब असावा व आपलें सामर्थ्य सर्वांनीं वर्णन करावें अशी इच्छा असल्यास एकादशरुद्रांची; खाण्यापिण्याच्या उत्तम पदार्थांची इच्छा असल्यास अदितीची; स्वर्गाची इच्छा असल्यास द्वादशआदित्यांची; राज्यप्राप्तीची इच्छा असल्यास विश्वेदेवांची; प्रजेची आपल्यावर मोठी प्रीति असावी किंवा तिला आपला मोठा धाक असावा असें एखाद्या राजास वाटल्यास, त्यानें साध्यदेवांची; दीर्घायुष्याकरितां अश्विनीकुमारांची; प्रतिष्ठेकरितां लोकमातांची (पृथ्वीची व आकाशाची); स्वरूपाकरितां गंधर्वांची; स्त्रीकरितां उर्वशीची;

सर्वाधिपत्याकारितां ब्रह्मदेवाची; यज्ञप्राप्तीकरितां यज्ञपति भगवान विष्णूची; द्रव्यसंग्रहाकरितां वरुणाची; विद्याप्राप्तीकरितां शंकराची; उभयतां पतिपत्नींची प्रीति असावी अशी इच्छा असल्यास पार्वतीची; धर्माची इच्छा असल्यास पापनाशक श्रीविष्णूची; वंशवृद्धीकरितां पितरांची; बाधा नष्ट होण्याकरितां यक्षांची; बलप्राप्तीकरितां मरुद्गणांची; राजपदवीकरितां मनूंची; शत्रुनाशाकरितां राक्षसांची; व अनेक भोगांकरितां चंद्राची उपासना करावी लागते. राजा, निरिच्छ मनुष्यास श्रीपरमेश्वराशिवाय कोणाचीही उपासना करावयास नको. बुद्धिमान पुरुषानें—त्यास कांहीं अपेक्षा असो वा नसो—एकनिष्ठ भक्तियोगानें श्रीपरमेश्वराचेंच आराधन करावें. संसाराच्या निवृत्तीकरितां मनुष्याला भगवद्भजनाशिवाय गत्यंतरच नाहीं. परमेश्वराच्या आराधनानें साधुसमागम घडतो, व त्या साधुसमागमापासून भगवंतावर अचल भक्ति जडते, हाच परमेश्वराच्या उपासनेपासून प्राप्त होणारा पुरुषार्थ होय. ज्यांचें श्रवण केलें असतां ज्ञान प्राप्त होऊन कामक्रोधादि विकार मावळतात, विषयांचे ठायीं वैराग्य उत्पन्न होतें, चित्त शुद्ध होऊन मोक्षसाधनाचा मार्ग जो भक्तियोग तो प्राप्त होतो, व अंतःकरण अत्यानंदभरित होतें, अशा त्या हरिकथांवर कोणाची बरें भक्ति जडणार नाहीं ?

### हरिभक्तीवांचून शरीरादिकांचें वैयर्थ्य

शौनक म्हणाले:—सूता, शुकाचार्यांनीं हें सर्व उपासनाकर्म सांगितल्यानंतर परीक्षितानें आणखी काय प्रश्न केला? हे सूता, भगवद्भक्त एके ठिकाणीं जमले असतां तेथें हरिकथेचीच चर्चा चालावयाची. भगवत्कथा फार आनंददायक असून चित्तास शांति उत्पन्न करणाऱ्या होत. त्या हरिकथांचेंच वर्णन नेहमीं ज्यांच्या संवादांत येतें, तो त्या उभयतांचा संवाद ऐकण्याविषयीं आम्हांस फार आतुरता उत्पन्न झाली आहे. हरिकथा ऐकावयास मिळाव्या एवढ्याच सद्धेतूनें मी हा प्रश्न विचारितों. कारण, भगवत्कथाश्रवणांत जो काळ जातो, तोच सार्थकीं लागतो; त्या व्यतिरिक्त जेवढा म्हणून अयुष्याचा काळ जाईल तो व्यर्थ आहे. बहुत कालपर्यंत वांचणें, श्वासोच्छ्वासादि क्रिया करणें, आणि आहार, निद्रा व मैथुन ह्यांतच निमग्न होऊन राहणें म्हणजे कांहीं आयुष्याचें खरें साफल्य नव्हे; हेंच जर खरें साफल्य असेल, तर मग, बहुत कालपर्यंत वांचणारे वृक्ष, श्वासोच्छ्वास करणारे लोहारादिकांचे भाते, आणि आहार मैथुनादिकांतच गर्क असणारे इतर पशु ह्यांत आणि मनुष्यांत भेद तो काय ? ज्यानें श्रीहरीचें नामसंकीर्तन कधींही श्रवण केलें नसेल, तो पुरुष श्वानसूकरादिकांहून देखील निंद्य होय. कारण, त्या पशूंमध्यें सुद्धां आहारमैथुनादिकांविषयीं नियम असून शिवाय ते लोकांच्या उपयोगीं तरी पडतात; परंतु मनुष्यास तसे कांहीं नियम नसून हा यत्किंचित् देखील कोणाच्या उपयोगीं पडत नाहीं ! सूता, जो मनुष्य परमेश्वराचे गुणानुवाद श्रवण करीत नाहीं, त्याचे कान म्हणजे भिंतीस असलेल्या बिळांसारखेच होत; मस्तकावर मौल्यवान् मुकुट किंवा इतर भूषणें घालून तें सुशोभित केलें, पण जर ते मस्तक परमेश्वरापुढें नम्र होत नाहीं तर तें मस्तक म्हणजे निवळ ओझें होय; जी जिव्हा परमेश्वराचें नामस्मरण करीत नाहीं, ती जिव्हा म्हणजे बेडकाच्या जिव्हेप्रमाणें व्यर्थ बडबड करणारी होय; हातांत कंकणें घालून जरी ते सुशोभित केले, तरी जर ते हात परमेश्वराचें पूजन करीत नसतील तर ते केवळ प्रेतवत् होत; मनुष्याचे नेत्र जर परमेश्वराचें दर्शन घेत नसतील, तर ते नेत्र मोराच्या पिसाऱ्यावरील नेत्रांप्रमाणें व्यर्थ असून केवळ शोभेकरितां होत; मनुष्याचे चरण जर तीर्थयात्रा करीत नसतील, किंवा विष्णुमूर्तीचें दर्शन घेण्यास जात नसतील,

तर ते चरण केवळ झाडांप्रमाणें होत. ज्या मनुष्याचें शरीर भगवद्भक्तांच्या चरणधूलीनें कधींही पुनीत झालें नसेल, त्याचें शरीर प्रेतासारखें होय; तसेंच ज्या पुरुषानें यावज्जन्म श्रीविष्णुपदावरील तुलसींचें अवघ्राण केलें नसेल, तो जिवंत असून मेल्यासारखाच होय! ईश्वराच्या नामोच्चरणानें अथवा कथाश्रवणानें ज्याचें चित्त द्रवत नाहीं, तो केवळ दगड असून त्याचें अंतःकरणही दगडाप्रमाणेंच कठिण होय असें समजावें. सूता, आम्हांस इष्ट असलेल्या विषयांचीच तूं चर्चा करीत आहेस; तर आतां, त्या महाभगवद्भक्त परीक्षितानें ब्रह्मनिष्ठ अशा शुकाचार्यांस कोणता प्रश्न केला, आणि शुकाचार्यांनीं त्यास काय उत्तर दिलें, तें सर्व आम्हांस निवेदन कर.

## अध्याय चौथा.

—:०:—

### परीक्षिताची शुकाचार्यांस पृच्छा.

सूत म्हणतातः— ऋषीहो, शुकाचार्यांचें तें आत्मतत्त्वबोधक भाषण ऐकून परीक्षित राजानें आपलें चित्त श्रीकृष्णचरणारविंदीं आसक्त करून सर्व राज्य, अपार ऐश्वर्य, सुंदर आणि सुशील भार्या, आज्ञाधारक पुत्र, आणि स्वतःचें शरीर ह्या सर्वांवरील ममता पार सोडून दिली. आपला मृत्यु आतां अगदीं समीप आला आहे असें जाणून त्या महात्म्यानें तत्क्षणींच आपल्या त्रैवर्गिक* कर्मांचा त्याग केला; आणि आपलें लक्ष ईश्वराकडे लावून व दृढ प्रेमामुळें ईश्वरभक्तींतच तल्लीन होऊन, ईश्वराच्या लीला ऐकण्याविषयीं उत्सुक होत्साता तुम्हीं मला भगवंताच्या लीला वर्णन करण्याविषयीं ज्याप्रमाणें सांगितलें, त्याप्रमाणेंच परीक्षितानेंही शुकाचार्यांस प्रश्न केले; तो म्हणाला, "ब्रह्मनिष्ठ मुने, आपण सर्वज्ञ आहां. मी विचारितों तें कृपा करून मला सांगा. आपल्या मुखानें हरिगुणवर्णन होऊं लागलें, म्हणजे माझें अज्ञान नष्ट होतें. मुनिवर्या, ह्या पृथ्वीची रचना कोणी व कशा प्रकारानें केली, हें जाणण्याची मला पुनः इच्छा झाली आहे; कारण, नुसत्या तर्कानें त्याविषयींचें ज्ञान होत नाहीं. तो सर्वव्यापक परमेश्वर हें अवाढव्य जग कसें उत्पन्न करितो हें समजण्याची मला जितकी उत्कंठा आहे, तितकीच, तो ह्याचा नाश कसा करितो हें समजण्याबद्दलही आहे. महाराज, अनंतशक्ति ईश्वर स्वतः क्रीडा करीत असतां कोणत्या स्थावरजंगम सृष्टीची उत्पत्ति करितो तें मला सांगा. ब्रह्मदेव आदिकरून जीं त्याचीं रूपें, त्यांसह क्रीडा करीत असतां तो हें जग कसें निर्माण करितो, आणि तो ह्याचें पालन कोणत्या प्रकारें करितो, हेंही सांगा. मला वाटतें, त्या सर्वदुःखनिवारक षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराची लीला मोठमोठ्यांनाही समजत नसेल; कारण ती फार आश्चर्यकारक आहे. हा परमेश्वर आपण स्वतः एकच असून निरनिराळे अनेक अवतार घेतो, आणि पुष्कळ कर्में करण्याच्या इच्छेनें मायेच्या गुणाचा स्वीकार करितो; पण, महाराज, तो सर्व गुणांचा एकदम स्वीकार करितो, किंवा क्रमाक्रमानें करितो? मुनिवर्य, आपलें ज्ञान अगाध आहे. आपण शब्दब्रह्मामध्यें ( वेदामध्यें ) आणि परब्रह्मामध्येंही ( भगवंताच्या सच्चिन्मय रूपाच्या प्रत्यक्ष ज्ञानामध्येंही ) निष्णात आहां. ह्यास्तव, आपण माझ्या ह्या शंकेचें निवारण करावें." शौनका, ह्याप्रमाणें त्या राजाचे प्रश्न ऐकून, त्यांचीं उत्तरें देण्यापूर्वीं भगवान शुकाचार्यांनीं परमेश्वराचें भक्तिपूर्वक स्मरण व स्तुति केली.

---

* धर्म, अर्थ व काम ह्यांसंबंधीं जीं कर्में करावयाचीं तीं.

## शुकाचार्यांनीं केलेली परमेश्वराची स्तुति.

शुकाचार्य उवाच—

नमः परस्मै पुरुषाय भूयसेऽसदुद्भवस्थाननिरोधलीलया ।
गृहीतशक्तित्रितयाय देहिनामंतर्भवायानुपलक्ष्यवर्त्मने ॥
भूयो नमः सद्वृजिनच्छिदेऽसतामसंभवायाऽखिलसत्त्वमूर्तये ।
पुंसां पुनः पारमहंस्य आश्रमे व्यवस्थितानामनुमृग्यदाशुषे ॥
नमो नमस्तेऽस्त्वृषभाय सात्वतां विदूरकाष्ठाय मुहुः कुयोगिनाम् ।
निरस्तसाम्यातिशयेन राधसा स्वधामनि ब्रह्मणि रंस्यते नमः ॥
यत्कीर्तनं यत्स्मरणं यदीक्षणं यद्वंदनं यच्छ्रवणं यदर्हणम् ।
लोकस्य सद्यो विधुनोति कल्मषं तस्मै सुभद्रश्रवसे नमो नमः ॥
विचक्षणा यच्चरणोपसादनात् संगं व्युदस्योभयतोऽतरात्मनः ।
विंदंति हि ब्रह्मगतिं गतक्लमास्तस्मै सुभद्रश्रवसे नमो नमः ॥
तपस्विनो दानपरा यशस्विनो मनस्विनो मंत्रविदः सुमंगलाः ।
क्षेमं न विंदंति विना यदर्पणं तस्मै सुभद्रश्रवसे नमो नमः ॥
किरातहूणांध्रपुलिंदपुल्कसा आभीरकंका यवनाः खसादयः ॥
येऽन्ये च पापा यदुपाश्रयाश्रयाः शुद्ध्यंति तस्मै प्रभविष्णवे नमः ॥
स एष आत्मात्मवतामधीश्वरस्त्रयीमयो धर्ममयस्तपोमयः ।
गतव्यलीकैरजशंकरादिभिर्वितर्क्यलिंगो भगवान् प्रसीदताम् ॥
श्रियः पतिर्यज्ञपतिः प्रजापतिर्धियां पतिर्लोकपतिर्धरापतिः ।
पतिर्गतिश्चांधकवृष्णिसात्वतां प्रसीदतां मे भगवान्सतां पतिः ॥
यदंघ्र्यनुध्यानसमाधिधौतया धियाऽनुपश्यंति हि तत्त्वमात्मनः ।
वदंति चैतत्कवयो यथारुचं स मे मुकुंदो भगवान्प्रसीदताम् ॥
प्रचोदिता येन पुरा सरस्वती वितन्वताऽजस्य सतीं स्मृतिं हृदि ।
स्वलक्षणा प्रादुरभूत्किलाऽस्यतः स मे ऋषीणामृषभः प्रसीदताम् ॥
भूतैर्महद्भिर्य इमाः पुरो विभुर्निर्माय शेते यदमूषु पूरुषः ।
भुंक्ते गुणान्षोडश षोडशात्मकः सोऽलंकृषीष्ट भगवान्वचांसि मे ॥

शुकाचार्य म्हणाले:—जो ह्या स्थावरजंगमात्मक विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं करण्याकरितां रज, सत्त्व व तम ह्या तीन गुणांचा स्वीकार करून ब्रह्मा, विष्णु व महेश हीं रूपें धारण करतो, व जो सर्वांच्या अंतर्यामीं असून कोणालाही ओळखितां येत नाहीं, अशा त्या सर्वशक्तिमान पुरुषोत्तमाला माझा नमस्कार असो! जो दुष्टांचा नाश करितो व साधूंचें रक्षण करितो,

आणि जो परमहंस आश्रमांतील जनांना आत्मज्ञान करून देतो, त्या सर्वेश्वराला मी अनन्यभावें शरण आहें. जो सद्भक्तांना आपल्या सच्चिदानंद स्वरूपाचें यथार्थ ज्ञान करून देतो, व अभक्तांना आपल्या स्वरूपाचें लेशही ज्ञान करून देत नाहीं, ज्याच्या ऐश्वर्याची बरोबरीही कोणास करितां येत नाहीं, व जो सदासर्वकाल चिदानंदांत मग्न असतो, अशा त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न प्रभूला माझा नमस्कार असो! ज्याचें कीर्तन, स्मरण, दर्शन, वंदन किंवा पूजन केलें असतां मनुष्याचें पाप तत्काल नाहींसें होतें, त्या मंगलमूर्ति परमेश्वराला माझा नमस्कार असो! आत्मानात्मविवेकज्ञानसंपन्न असे सत्पुरुष ज्याच्या चरणसेवेनें भोगेच्छारहित होऊन अक्षय्य अशा मोक्षपदास जातात, त्या परात्पर पुरुषाला माझा नमस्कार असो! ज्या पुण्यकीर्ति परमेश्वराला आपलीं कर्मे अर्पण केल्यावांचून जपी, तपी, संन्यासी, मंत्रवेत्ते, दानशूर व सदाचरणी पुरुष मोक्षसुख मिळवूं शकत नाहींत, त्या अद्भुतकीर्ति परमेश्वरास माझा नमस्कार असो! ज्याच्या भक्तांच्या आश्रयानें अत्यंत नीच जातींतील किरात, हूण, आंध्र, पुलिंद, पुल्कस, आभीर, कंक, यवन, खस वगैरे अमंगल आचरणाचे लोक देखील शुद्ध होतात, त्या सर्वशक्ति परमेश्वराला माझा नमस्कार असो! आत्मज्ञानी पुरुष ज्याची उपासना करितात, ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद हीं ज्याचीं स्वरूपें आहेत, जो केवळ धर्माची व तपाची मूर्ति, आणि ब्रह्मदेव, शंकर इत्यादिक श्रेष्ठ भक्तांना देखील ज्याच्या स्वरूपाकडे पाहिलें असतां आश्चर्य वाटतें, तो जगदात्मा परमपुरुष मजला प्रसन्न होवो! जो यज्ञाचें आणि प्रजेचें रक्षण करणारा, वृद्धीचा प्रवर्तक, अंधक, वृष्णि, सात्वत वगैरे यादवकुळांचा अधिपति व मोक्षदाता असा श्रीलक्ष्मीपति, त्या भक्तसंरक्षकाला माझा नमस्कार असो! ज्याच्या चरणकमलीं चित्ताचा लय करून सगुणोपासक ज्यास सगुण आहे असें मानितात, व निर्गुणोपासक ज्यास निर्गुण असें समजतात, आणि आत्मतत्त्वाचें ज्ञान प्राप्त करून घेतात, तो परमात्मा मला प्रसन्न होवो. ज्यानें ब्रह्मदेवाला सृष्टि करण्याचें ज्ञान प्रथम दिलें, ज्यानें ब्रह्मदेवाच्या अंतःकरणांत वेदवाणीची स्मृति उत्पन्न केली,—व नंतर पुढें ती वेदरूपी सरस्वती आपल्या शिक्षादि उत्तम लक्षणांसहित ब्रह्मदेवाच्या मुखांतून बाहेर पडली— असा जो महाप्रभावशाली परमेश्वर, तो मला प्रसन्न होवो! जो परमपुरुष पंचमहाभूतांच्या योगानें नानाप्रकारचीं शरीरें उत्पन्न करितो, व त्यांत पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, पंचप्राण व मन ह्या सोळा तत्त्वांचा आपणच प्रेरक होऊन राहतो, आणि शब्दस्पर्शादि विषयांचा आपणच उपभोग घेतो, तो परमेश्वर, श्रोत्यांना प्रेम उत्पन्न करण्याकरितां शृंगार, करुणा, वीर, वत्सल, शोक इत्यादि रस, तसेच उत्तम उत्तम अलंकार ह्यांनी माझ्या वाणीस अलंकृत करो.

ऋषीहो, ह्याप्रमाणें शुकाचार्यांनीं ईश्वराची स्तुति व प्रार्थना करून नंतर आपला पिता आणि गुरु भगवान वेदव्यास ह्यांस नमस्कार केला, आणि म्हटलें:—ज्याच्या मुखकमलांतील ज्ञानरूपी मकरंद सेवन केल्यामुळें अनेक लोक मोक्षपदास गेले, त्या अपरिमित तेजस्वी व्यासांना माझा नमस्कार असो! नंतर शुकाचार्य परीक्षितास म्हणाले:—राजा, तूं जो सांप्रत मला प्रश्न केला आहेस, असाच पूर्वी नारदांनीं ब्रह्मदेवास केला असतां, ब्रह्मदेवानें प्रत्यक्ष भगवान नारायणापासून श्रवण केलेलें भागवत पुराण नारदांस कथन केलें, तें आतां मी तुला सांगतों.

## अध्याय पांचवा.

—:०:—

### नारदांची ब्रह्मदेवाला पृच्छा.

शुकाचार्य म्हणाले:—हे परीक्षित राजा, नारदांनीं ब्रह्मदेवाला प्रश्न केले, ते असे: " ब्रह्मदेवा, सर्व भूतांची उत्पत्ति करणार आपणच आहां. म्हणून आपल्यापाशीं माझी इतकीच विनंती आहे कीं, ज्याच्या योगानें आत्मस्वरूपाचें खरें ज्ञान होईल, असा कांहीं तरी उपाय आपण मला सांगा. तसेंच, ज्याच्या योगानें हें जगत् प्रकाशमान होतें, ज्याचा ह्याला आधार आहे, जो ह्याला उत्पन्न करितो, ज्याच्या स्वरूपीं हें लय पावतें, ज्याच्या स्वाधीन हें राहतें, व ज्याच्या अस्तित्वामुळें ह्यास हें विशिष्ट रूप प्राप्त झालें आहे, त्याचें वास्तविक स्वरूप कोणतें, तें सर्व कळावें अशी मला फार उत्कंठा झाली आहे. ब्रह्मदेवा, आपल्यास भूत, भविष्य आणि वर्तमान ह्या तिन्ही काळांचें ज्ञान आहे. ह्या जगाचे आपण प्रभु आहां. एखाद्यानें आंवळा हातांत घेतला असतां त्याला जसें त्याचें सर्व स्वरूप दिसून येतें, तसें हें सर्व जग आपल्या आपल्यास अगाध ज्ञानामुळें दिसतें. आपण आपल्या इच्छामात्रेंकरून पंचमहाभूतें उत्पन्न करितां, व त्यांच्या योगानें देवमनुष्यादिकांना निर्माण करून ह्या जगाची रचना करितां. ब्रह्मदेवा, असें हें ज्ञान आपल्यास कोणापासून प्राप्त झालें ? ही विश्वोत्पादक प्रचंड शक्ति आपणांस कोणीं दिली ? असा तुमचा धनी तरी कोण आहे ? त्याचें स्वरूप मला कृपा करून सांगा. कोळी जसा आपल्याच तंतुरूप शक्तीच्या आधारानें जाळें पसरितो, तसे आपण स्वतःच आपल्या शक्तीनें हें विश्व उत्पन्न करितां; कोळी जसा त्या जाळ्याच्या मध्यें बसून त्याचें रक्षण करितो, तसे आपण ह्या जगाच्या अंतरीं राहून त्याचें रक्षण करितां; आणि कोळी जसा आपण पसरलेलें जाळें आपल्या उदरांत आटोपून घेतो, तसे आपणही ह्या विश्वाचा पसारा आपल्या उदरांत आटोपून घेतां. ह्यावरून मला तर असें वाटतें कीं, ह्या सर्व जगाचे चालक आपणच आहां. पण हें जर खरें म्हणावें, तर एकाग्र अंतःकरणानें आपण जी घोर तपश्चर्या केली ती कोणाची ? एकदा जरी मला वाटतें कीं आपल्याहून श्रेष्ठ कोणी नाहीं; तरी, आपण तपश्चर्या केली ही गोष्ट आठवली म्हणजे त्याविषयीं शंका येते; आणि फिरून असें वाटतें कीं, आपल्यापेक्षां कोणी तरी श्रेष्ठ पुरुष आहे, व त्याच्याच कृपेनें आपल्याकडून हे सर्व प्रकार घडतात. ह्याकरितां हें काय गूढ आहे तें मला सांगा." राजा, असें हें नारदांचें भाषण ऐकून भगवान ब्रह्मदेवानें

### नारदांचें समाधान

केलें: ब्रह्मदेव म्हणाले:—वत्सा नारदा, लोकहिताच्या बुद्धीनें तूं जे मला प्रश्न विचारिलेस, ते तुझ्या स्वभावाला अनुसरूनच आहेत. ह्या तुझ्या शंकांच्या उत्तरांपासून अज्ञ जनांचें हित होणार आहे; इतकेंच नव्हे, तर ह्यांचीं उत्तरें देण्याची संधि आल्यामुळें भगवंताच्या गुणवर्णनाकडे माझी प्रवृत्ति होऊन मला फार आनंद होत आहे. बाळा, तुला मी माझ्या शक्तीप्रमाणें सर्व वास्तविक स्थिति सांगतों. ऐक: हें पहा,—तूं जें म्हणालास कीं जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय तुम्हीच करितां; तर ही गोष्ट कांही सर्वथैव खोटी नव्हे. कारण, तितकें सामर्थ्य माझ्या अंगीं आहे; पण मजपेक्षां कोणी श्रेष्ठ नाहीं असा जो तुझा समज आहे, तो मात्र खरा नाहीं. ह्यास कारण—तुझें परमात्म्याविषयींचें अज्ञान हें होय. नारदा, अग्नि, सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्रें, तारा हीं भगवंताच्या तेजानें प्रकाशित झालेल्या वस्तूसच जशीं प्रकाशित करितात, तसा मीही त्यानें आपल्याच प्रभावानें उत्पन्न केलेल्या ह्या जगास उत्पन्न करितों. ज्या भगवंताच्या अजिंक्य माये-

मुळें मोह पडून तुझ्यासारखे पुरुष मलाच सृष्टिकर्ता असें म्हणतात, त्या भगवान वासुदेवाला माझा नमस्कार असो! नारदा, ही त्या भगवंताची माया आम्हांसारख्यांना देखील मोहवश करून आमच्या मनांत मीपणा उत्पन्न करिते, पण त्या परमेश्वराच्या दृष्टीसमोर तिला उभें देखील राहवत नाहीं! मग ती आपला प्रभाव त्याजवर चालवील ही गोष्टच नको! ती पक्कें जाणून आहे कीं, आपली गडबड तेथें यत्किंचित्‌ही चालणार नाहीं. नारदा, वास्तविक पहातां, पंचमहाभूतें, जन्मास निमित्त असलेलें पूर्वसंचित कर्म, त्याचा क्षोभक काल,त्याच्या परिणामाचा हेतु स्वभाव, आणि ह्या सर्वांचा भोक्ता जीव ह्यांपैकीं कोणीही वासुदेवाहून वेगळे नाहींत; सर्व ईश्वररूपच आहेत. कां कीं, तोच सर्वांना कारण होय. वेद, देव, स्वर्गादि लोक, अग्निष्टोमादि यज्ञ, अष्टांगयोग, तप, अपरोक्षज्ञान व मोक्षरूप गति हीं सर्व नारायणपरच आहेत. ह्या सर्वांची उत्पत्ति करणारा तोच आहे, व मलाही त्यानेंच उत्पन्न केलें. मला सृष्टि उत्पन्न करण्याचें ज्ञान देणारा तोच परमेश्वर होय. तो ह्या ब्रह्मांडाचा साक्षी व आदिकारण असून त्याला कोणताही विकार नाहीं. प्राणिमात्राचा आत्माही तोच होय.

नारदा, आतां, जीव आणि ईश्वर हे कोठून कसे भिन्न झाले तें सांगतों, ऐक: परमेश्वर निर्गुण होय; पण जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं करण्याकरितां रज, सत्त्व आणि तम ह्या मायेच्या गुणांचा त्यानें स्वीकार केला. पुढें पंचमहाभूतें, देवता व इंद्रियें हीं उत्पन्न झालीं; हा त्या गुणांचाच प्रभाव होय. वास्तविक पाहतां, मी व माझें हा अभिमान धरणारा जीव भगवंताचा अंश असल्यामुळें स्वतंत्र आहे; परंतु तो मायेच्या घोटाळ्यांत सांपडतो, म्हणून हे गुण त्याला बद्ध करून टाकितात, व तो ईश्वरापासून भिन्न होतो. नारदा, ईश्वराचें रूप इंद्रियांना समजण्यासारखें नाहीं. भक्त व ज्ञानी पुरुष ह्यांना मात्र त्याचें अनुमान करितां येतें. तें अनुमान करण्यास त्यांना गुण हेंच साधन आहे. कारण, ते गुण जड असतांही जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं कार्यें करू शकतात; ह्यावरून,त्यांचा कोणी तरी प्रवर्तक असला पाहिजे हें सिद्ध होतें. ह्या प्रमाणांनीं भक्त ज्याचें स्वरूप जाणतात, तोच ईश्वर माझाही नियंता आहे. त्या मायाचालक प्रभूला आपण बहुरूप व्हावें अशी जेव्हां इच्छा झाली, तेव्हां काल, कर्म आणि स्वभाव हीं सहजगत्याच त्याच्या आत्मस्वरूपीं प्राप्त झालीं. त्या सहज प्राप्त झालेल्या त्रयीचा परमेश्वरानें स्वीकार केला असतां, त्या त्रयीपासून तीन कार्यें उत्पन्न झालीं. कालापासून सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांत न्यूनाधिक्य होऊं लागलें, स्वभावापासून भिन्न भिन्न अवस्था होऊं लागल्या व त्यांचीं रूपांतरें झालीं, आणि कर्मापासून महत्तत्त्व उत्पन्न झालें. हें महत्तत्त्व त्रिगुणात्मक खरें, परंतु ह्यांत रज व सत्त्व ह्या दोन गुणांचेच अंश अधिक आहेत. ह्यापासून, ज्यामध्यें तमोगुण ज्यास्त अंशानें आहे असा अहंकार उत्पन्न झाला. पंचमहाभूतें, देवता, इंद्रियें आणि मन हीं त्या अहंकाराचींच कार्यें होत. ह्या अहंकाराचेही पुढें सात्त्विक, राजस आणि तामस असे तीन भेद झाले. त्यांत सात्त्विक अहंकारास देवता, राजस अहंकारास इंद्रियें, आणि तामस अहंकारास पंचमहाभूतें उत्पन्न करण्याचें सामर्थ्य आहे.

### तामस अहंकारापासून झालेली सृष्टि.

( पंचमहाभूतांची उत्पत्ति. )

ब्रह्मदेव म्हणाले:—नारदा, काल, कर्म आणि स्वभाव ह्यांजमुळें तामस अहंकारांत विकार उत्पन्न होऊन त्यापासून आकाश उत्पन्न झालें. शब्द हें आकाशाचें सूक्ष्म रूप व गुण होय. द्रष्टा आणि दृश्य हे ह्या शब्दापासूनच समजून येतात. उदाहरणार्थ—एखाद्या भिंतीच्या आडून ‘ हा हत्ती ’

असे शब्द आपल्या कानीं आले, म्हणजे त्या शब्दांच्या योगानें आपणांस असें ज्ञान होतें कीं, भिंतीआड कोणी तरी मनुष्य उभा असून एखादा हत्ती त्याच्या नजरेस आला आहे; म्हणजे द्रष्टा (मनुष्य) आणि दृश्य (हत्ती) ह्या दोहोंचेंही आपणांस ह्या शब्दाच्या योगानें ज्ञान झालें. नंतर त्याच कारणानें तेंआकाशही विकार पावूं लागलें असतां, त्यापासून वायु उत्पन्न झाला. स्पर्श हें वायूचें सूक्ष्म स्वरूप आणि गुण होय. ह्या वायूचें आकाश हें कारण असल्यामुळें त्याचा गुण जो शब्द तो ह्यांतही आला. नंतर, पूर्वोक्त कारणानेंच तो वायुही विकार पावून त्यापासून तेज उत्पन्न झालें. रूप हें तेजाचें सूक्ष्म स्वरूप आणि गुण होय. पहिल्या दोन भूतांचे गुण जे शब्द आणि स्पर्श तेही अंशानें ह्या तेजांत आले. नंतर त्याच कारणानें तेजांतही विकार उत्पन्न होऊन त्यापासून जल उत्पन्न झालें. रस हें जलाचें सूक्ष्म स्वरूप आणि गुण होय. पूर्वोक्त तीन भूतांचे गुण जे शब्द, स्पर्श व रूप, तेही ह्यांत कार्यकारणसंबंधानें आले. नंतर जलांतही विकार उत्पन्न होऊन त्यापासून पृथ्वी उत्पन्न झाली. गंध हें हिचें सूक्ष्म स्वरूप व गुण होय. पूर्वीच्या चारही भूतांचे गुण हिजमध्यें आले. ह्याप्रमाणें, जसजसे अधिकाधिक विकार होऊं लागले, तसतशीं महाभूतें आकाशापासून पृथ्वीपर्यंत वाढत जाऊन त्यांचे गुणही तसेच वाढत गेले.

**सात्त्विक अहंकारापासून झालेली सृष्टि.**

(देवतांची उत्पत्ति.)

ब्रह्मदेव म्हणाले:—सात्त्विक अहंकारापासून प्रथम मन उत्पन्न झालें. ह्या मनाची देवता चंद्र होय. तोही ह्याच वेळीं उत्पन्न झाला. त्याचप्रमाणें, श्रोत्राची देवता दिशा, त्वचेची देवता वायु, नेत्रांची देवता सूर्य, जिव्हेची देवता वरुण, नासिकाची देवता अश्विनीकुमार, मुखाची देवता अग्नि, हस्ताची देवता इंद्र, पायाची देवता उपेंद्र, गुदाची देवता मित्र, आणि शिश्नाची देवता ब्रह्मदेव ह्या सर्व देवता सात्त्विक अहंकारापासून उत्पन्न झाल्या.

**राजस अहंकारापासून झालेली सृष्टि.**

(इंद्रियांची उत्पत्ति.)

ब्रह्मदेव म्हणाले:—राजस अहंकारापासून श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिक, मुख, हस्त, पाद, गुद व शिश्न हीं इंद्रियें उत्पन्न झालीं. नारदा, तूं ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आहेस. पंचमहाभूतें, इंद्रियें व मन आणि सत्त्वादि तीन गुण हीं जेव्हां परस्पर एकत्र झालीं नव्हतीं, तेव्हां सुखदुःखादि भोग भोगण्याचें साधन जें हें शरीर, तें उत्पन्न करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं नव्हतें. नंतर भगवंताच्या शक्तीनें जेव्हां त्यांस प्रेरणा केली, तेव्हां तीं परस्पराशीं मिळालीं, आणि नंतर कांहीं तत्त्वांचा जास्त व कांहींचा कमी असे भाग ग्रहण करून समष्टि (समुदाय) व व्यष्टि (अवयव) असें दोन प्रकारचें हें पिंडब्रह्मांडात्मक शरीर त्यांनीं उत्पन्न केलें. हें शरीर हजारों वर्षेपर्यंत उदकांत तसेंच निर्जीव राहिलें. पुढें काल, कर्म व स्वभाव ह्यांस अनुसरून तें परमात्म्यानें सजीव केलें. नंतर, ज्याला अनंत पाय, मांड्या, बाहु, नेत्र, मुखें व मस्तकें आहेत, असा तो परमात्मा त्या ब्रह्मांडाचा भेद करून त्यांतून पुरुषरूपानें बाहेर आला. विद्वान लोक ह्या परमेश्वराच्या ठिकाणीं ब्रह्मांडांतील चौदाही लोकांची कल्पना करितात. त्यांत कमरेपासून खालीं अतल, वितल, सुतल, महातल, तलातल, रसातल व पाताल हे सात लोक आहेत असें समजतात; व कमरेपासून वर भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनर्लोक, तपोलोक आणि सत्यलोक हे सात लोक आहेत असें समजतात. ह्या विराट्पुरुषाच्या मुखापासून ब्राह्मण उत्पन्न झाले; बाहूंपासून क्षत्रियांची उत्पत्ति झाली; मांड्यांपासून वैश्य उत्पन्न झाले; व पायांपासून शूद्र झाले. या विराट्स्वरूप ईश्व-

राच्या पायांपासून कमरेपर्यंत भूर्लोकासह सप्तपातालांची कल्पना करून बेंबीपासून भुवर्लोक झाला असें मानिलें आहे. त्याचप्रमाणें, हृदयापासून स्वर्लोक, वक्षस्थलापासून महर्लोक, कंठापासून जनर्लोक, ओष्ठापासून तपोलोक व मस्तकापासून सत्यलोक उत्पन्न झाला अशी कल्पना आहे. आतां, वैकुंठलोक जो आहे, तो मात्र ह्यांपैकीं नव्हे; तर तो स्वतंत्र असून नित्य आहे. भगवंताच्या कमरेच्या खालच्या भागापासून अतल, मांड्यांपासून वितल, गुडघ्यांपासून सुतल, पोटऱ्यांपासून तलातल, घोट्यांपासून महातल, पावलांच्या पुढच्या भागांपासून रसातल, व पावलांच्या तळव्यांपासून पाताळ उत्पन्न झालें अशी कल्पना केली आहे. ह्याप्रमाणें तो पुरुष विश्वरूप आहे. आतां, उपासनेसाठीं कोणी त्याच्या ठिकाणीं तीनच लोकांची कल्पना करितात, ती अशी: त्या पुरुषाच्या पायांच्या ठिकाणीं भूर्लोक, नाभीच्या ठिकाणीं भुवर्लोक, व मस्तकाच्या ठिकाणीं स्वर्लोक आहे असें धरितात.

## अध्याय सहावा.

—:०:—

### नारद व ब्रह्मदेव ह्यांचा संवाद.

( विराट्पुरुषाचें आणखी वर्णन. )

ब्रह्मदेव म्हणाले:–नारदा, विराट्पुरुषाच्या मुखापासून वाणी व वाणीची देवता अग्नि हीं उत्पन्न झालीं. त्वचा, अस्थि, स्नायु, मेद, मज्जा, रुधिर व मांस ह्या सप्तधातूंपासून गायत्री, उष्णिक्, अनुष्टुप्, बृहती, पंक्ति, त्रिष्टुप् व जगती हे सात छंद उत्पन्न झाले. विराट्पुरुषाच्या जिव्हेपासून हव्य[1], कव्य[2] व अमृत[3] हीं अन्नें; गोड, आंबट, खारट तिखट, कडु व तुरट हे सहा रस; रसनेंद्रिय; आणि त्याची देवता वरुण हीं उत्पन्न झालीं. त्या विराट्पुरुषाच्या नाकपुड्यांपासून सर्वांचे प्राण व त्यांचा अधिपति वायु हे उत्पन्न झाले. त्याच्या घ्राणेंद्रियापासून अश्विनीकुमार, ओषधि व सर्व प्रकारचा सुगंध उत्पन्न झाला. त्याच्या नेत्रेंद्रियापासून रूप आणि तेज हीं उत्पन्न झालीं. नेत्रगोलक म्हणजे बुबुळें ह्यांपासून सूर्य व स्वर्ग हे उत्पन्न झाले. कानांच्या पाळींपासून दिशा व सर्व तीर्थें उत्पन्न झालीं. त्याच्या श्रोत्रेंद्रियापासून आकाश व शब्द हीं उत्पन्न झालीं. त्याच्या शरीरापासून सर्व वस्तूंतील तत्त्वें व त्यांची शोभा उत्पन्न झाली. त्याच्या त्वचेपासून स्पर्श, वायु व सर्व यज्ञ उत्पन्न झाले. त्या विराट्पुरुषाच्या रोमांपासून सर्व वृक्षांची, किंवा ज्यांच्या योगानें यज्ञांची उत्तम प्रकारें सिद्धता होते त्या वनस्पतींची उत्पत्ति झाली. मस्तकावरील केशांपासून मेघ, मुखावरील केशांपासून विद्युल्लता, आणि नखांपासून पाषाण व लोखंड उत्पन्न झालें. बाहूंपासून इंद्रादि लोकपाल व राजे उत्पन्न झाले. चरणन्यासापासून भूर्लोक, अंतरिक्षलोक व स्वर्गलोक हे उत्पन्न झाले. नारदा, त्या विराट्पुरुषाच्या पादविक्षेपापासून क्षेम व भयनाश हीं होतात. कारण, भगवंताचे चरण हें सर्व इच्छा पूर्ण होण्याचें स्थान होय. त्या विराट्पुरुषाच्या उपस्थाधिष्ठानापासून उदक, रेत, पर्जन्य आणि त्या इंद्रियाची देवता प्रजापति हीं उत्पन्न झालीं; व उपस्थेंद्रियापासून, स्त्रीसंभोगात्मक जो सुखानुभव तो उत्पन्न झाला. त्याच्या गुदेंद्रियापासून यम व मित्र हे उत्पन्न झाले, व गुदाधिष्ठानापासून मलत्याग, हिंसा, दारिद्र्य, मृत्यु आणि नरक हीं उत्पन्न झालीं. त्या विराट्स्वरूप ईश्वराच्या पृष्ठभागापासून पराभव, अधर्म, पाप व अज्ञान उत्पन्न झालें. त्याच्या नाड्यांपासून शोणभद्रादि नद, व नर्मदा, गोमती वगैरे नद्या उत्पन्न झाल्या. त्याच्या अस्थीं-

१ देवांना अर्पण करावयाचें अन्न.

२ पितरांना अर्पण करावयाचें अन्न.

३ देव व पितर ह्यांना अर्पण करून राहिलेलें अन्न, किंवा यज्ञशेष अन्न.

पासून पर्वत उत्पन्न झाले. उदरापासून माया, अन्नादिकांचे रस, समुद्र व सर्व भूतांचा प्रलय हीं उत्पन्न झालीं. हृदयापासून मन उत्पन्न झालें. चित्तापासून धर्म, मी ( ब्रह्मदेव ), तूं ( नारद ), सनकादिक ऋषि, शंकर, विज्ञान व उत्तम सत्त्व उत्पन्न झालें. ह्याप्रमाणें मी, तूं, शंकर, तुझे वडील बंधु सनकादिक ऋषि, देव, दैत्य, मनुष्यें, पशु, पक्षी, सर्प, गंधर्व, अप्सरा, यक्ष, राक्षस, भूतगण, पितर, सिद्ध, विद्याधर, चारण व वृक्ष, त्याचप्रमाणें ग्रह, नक्षत्रें, धूमकेतु, तारे, विजा, मेघ इत्यादि पूर्वी उत्पन्न झालेलें, प्रस्तुत असलेलें व पुढें उत्पन्न होणारें हें सर्व जग त्या नारायणाचेंच स्वरूप होय. तो भगवान हें सर्व जग व्यापूनही आणखी उरला आहे. सूर्य जसा आपल्या मंडलाला प्रकाशित करून त्याच्या बाहेरही प्रकाश पाडतो, त्याप्रमाणें हा विराट्पुरुष आपल्या शरिरास व्यापून बाहेरही व्याप्त आहे. निर्भय अशा मोक्षस्थितीचाही नियंता तोच आहे. त्या स्थितींत कोणत्याही प्रकारचें भय नाहीं. कारण, ईश्वर कर्मफलांपासून अलिप्त असतो, म्हणून त्याला मोक्ष देण्याचें सामर्थ्य आहे. नारदा, ईश्वर प्रपंचामध्यें राहून त्यापासून निराळा राहतो, म्हणून त्याचें माहात्म्य अघटित आहे. भूर्लोकादिक लोक हे त्या विराट्पुरुषाचे अवयव आहेत; म्हणून त्या त्या लोकांच्या आश्रयाला राहणाऱ्या प्राणिमात्राची स्थिति त्या त्या लोकाला अनुरूप असते, असें विद्वानांचें मत आहे. भूर्लोकाला पृथ्वी, भुवर्लोकाला आकाश आणि स्वर्लोकाला स्वर्ग म्हणतात. ह्या तिन्ही लोकांस मिळून त्रैलोक्य असें एक वटनांव आहे. त्रैलोक्य म्हटलें म्हणजे त्यांत ह्या तिन्ही लोकांचा समावेश होतो. ह्या त्रैलोक्याचें महर्लोक हें मस्तक होय. त्या महर्लोकाच्या वरील तीन लोकांत—जनर्लोक, तपोलोक व सत्यलोक ह्यांत—अनुक्रमें अमृत, क्षेम व अभय हीं ठेविलीं आहेत; आणि तेच लोक अनुक्रमें नैष्ठिक ब्रह्मचारी, वानप्रस्थ व यति ह्यांचीं आश्रयस्थानें होत. चौथा जो गृहस्थाश्रमी पुरुष, तो ब्रह्मचर्यासारखीं कडक व्रतें करीत नाहीं, म्हणून त्यास ह्या वरील लोकांत गति नाहीं. त्याला त्रैलोक्याच्या आंतच रहावें लागतें. ही निरानिराळी गति एकाच जीवाला प्राप्त होते. कारण, तो जीव दोन मार्गांनीं *जातो. ते मार्ग म्हणजे एक दक्षिणमार्ग व दुसरा उत्तरमार्ग. दक्षिणमार्गानें जाणाराला कर्मफलभोगाची इच्छा असते, उत्तरमार्गानें जाणाराला त्या भोगाची इच्छा नसते. म्हणून पहिल्या मार्गाला अविद्यामार्ग ( अज्ञानमार्ग ) म्हणतात, आणि दुसऱ्याला विद्यामार्ग ( ज्ञानमार्ग ) म्हणतात. ह्याप्रमाणें ह्या विराट्स्वरूपामध्यें सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टि भरली आहे. नारदा, मी ह्या ईश्वराच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालों, तेव्हां मला त्याची यज्ञरूपानें आराधना करावी अशी इच्छा उत्पन्न झाली; पण मला यज्ञसामुग्री कोठेंच दिसेना. सर्व ईश्वरमयच दिसूं लागलें. मग मी त्या पुरुषाचे अवयव हीच यज्ञसामुग्री आहे अशी कल्पना केली; व यज्ञाकरितां पशु, यज्ञस्तंभ, कुश, यज्ञभूमि, उत्तम काळ, यज्ञपात्रें, तांदूळ वगैरे ओषधि, घृतादिक स्निग्ध द्रव्यें, मधुरादिक रस, चातुर्होत्रादिक कर्में, ज्योतिष्टोमादिक नांवें, स्वाहाकारादिक मंत्र, दक्षिणा, नियम, देवतांचे उद्देश, कर्मपद्धतीचे ग्रंथ, यज्ञ करण्याचा संकल्प, यज्ञानुष्ठानाचा प्रकार, विष्णुक्रमादि गति, देवतांचीं ध्यानें, प्रायश्चित्तें आणि केलेलें कर्म भगवंताला अर्पण करणें हें सर्व साहित्य म्हणजे ईश्वराचे निरनिराळे अवयवच आहेत असें समजून, त्याच्या योगानेंच मीं ईश्वराचें यजन केलें. नंतर, तुझे भाऊ नऊ प्रजापतिही यज्ञ करण्यास सिद्ध झाले, व त्यांनी त्या व्यक्त व अव्यक्तरूपी ईश्वराची आराधना केली. नंतर मनु व इतर ऋषि, तसेंच पितर, देव दैत्य, मनुष्यें ह्यांनीं आप-

आपल्यास योग्य अशा कालीं अनेक यज्ञ करून त्या सर्वव्यापक परमेश्वराचें आराधन केलें. ह्याप्रमाणें, जो स्वतः निर्गुण असून जगाच्या उत्पत्तीच्या वेळीं मायेनें नानाप्रकारच्या गुणांचा स्वीकार करितो, त्या परमेश्वराच्या ठिकाणीं हें जग राहिलें आहे. सृष्टि करण्याविषयींची प्रेरणा त्यानेंच माझ्या मनांत केली, म्हणून त्याच्या आज्ञेप्रमाणें मी ही विविध सृष्टि उत्पन्न करितों; शंकरही त्याच्याच अधीन आहे, व त्याच्याच आज्ञेनें तो ह्या सृष्टीचा संहार करितो; आणि तोच परमेश्वर स्वतः विष्णुरूप घेऊन ह्या जगाचें रक्षण करितो. मायेला आवरून धरण्यासही तोच समर्थ आहे.

नारदा, ह्याप्रमाणें, जें तूं मला विचारिलेंस, तें मीं तुला सांगितलें. ह्यावरून, कार्यकारणरूपीं उत्पन्न होणारें हें जग ईश्वररूपाहून निराळें नाहीं हें तुझ्या लक्षांत येईलच. मी अंतःकरणपूर्वक भगवंताचें आराधन केलें असल्यामुळें, माझी वाणी कधीं असत्य होत नाहीं. नारदा,

### ईश्वरभक्तीचा प्रभाव

फार मोठा आहे. ह्याविषयीं माझ्या स्वतःच्या अनुभवाची एक गोष्ट मी तुला सांगतों, ऐकः मी वेदस्वरूपी, तपोरूपी व सर्व प्रजापतींमध्यें श्रेष्ठ असा जरी आहें, तरी मी जेव्हां उत्पन्न झालों, तेव्हां कोणापासून उत्पन्न झालों हें ज्ञान मला होईना; शेवटीं मी त्या परमेश्वरालाच शरण गेलों असतां, अचिंत्य माहात्म्यानें युक्त असा तो परमेश्वरच माझें उत्पत्तिस्थान आहे हें मला ज्ञान झालें. त्याचें खरें स्वरूप कोणालाही कळत नाहीं; इतकेंच नव्हे, पण त्याच्या मायेनें जी ही सृष्टि उत्पन्न झाली आहे, त्या संपूर्ण सृष्टीचेंही ज्ञान पूर्णतेनें मला, तुला व इतर देवांना होणें शक्य नाहीं. आम्ही फक्त त्याच्या लीलांचें मात्र वर्णन करितों. त्याचें खरें स्वरूप शुद्धज्ञानरूप, नित्य, निर्गुण, निरामय असें असून त्याच्या त्या स्वरूपाचें ज्ञान इतरांना होत नाहीं. जे विचारशील पुरुष आपलीं इंद्रियें व मन हीं जिंकितात, आणि त्यांच्या सर्व वृत्ति ईश्वराच्याच ठिकाणीं लीन करितात, त्यांना मात्र तें होतें. तें तरी असें कीं, ते तत्त्वस्वरूप होऊन जातात; 'तें स्वरूप असें आहे' असें सांगण्यास मागें शिल्लक रहात नाहींत. हा मायाचालक परमेश्वर प्रत्येक कल्पाच्या ठिकाणीं

### निरनिराळे अवतार

घेतो. ह्याचा पहिला अवतार पुरुष होय. काल, स्वभाव व कार्यकारणात्मक प्रकृति हे त्याचे शक्तिरूपी अवतार होत. मन, पंचमहाभूतें, अहंकार, सत्त्वादि गुण, दहा इंद्रियें, ब्रह्मांडदेह, शरीराभिमानी जीव आणि जगांतील स्थावरजंगमात्मक सर्व पदार्थ हे त्याचे कार्यरूप अवतार होत. मी, शंकर व विष्णु हे त्याचे गुणावतार होत. तसेंच दक्षादि प्रजापति, तुजसारखे ईश्वराचे भक्त, इंद्रादि स्वर्गलोकांचे पालक, गरुडादिक पक्षिगणाचे पालक, राजे आदिकरून मनुष्यांचे पालक, पाताळाधिपति, गंधर्व, विद्याधर, चारण, यक्ष, राक्षस, सर्प, नाग, ऋषि, पितर, दैत्य, दानव, प्रेत, पिशाच, भूतें, कूष्मांड, जलचर प्राणी, पशु, पक्षी ह्या सर्व ईश्वराच्याच विभूति होत. ह्या जगांत जें कांहीं म्हणून अद्भुत आहे, तें सर्व ईश्वररूप आहे असें समज. नारदा, त्या महाशक्तिमान परमेश्वरानें जे कांहीं विशेष अवतार घेतले आहेत, ते क्रमानें मी तुला सांगतों. त्या भगवंताचीं तीं कथानकें परमपुण्यप्रद आहेत.

## अध्याय सातवा.

—:०:—

### ईश्वराचे विशेष अवतार.

ब्रह्मदेव म्हणाले:—नारदा, ह्या अनंतशक्ति परमात्म्यानें सर्वयज्ञरूपी वराह अवतार धारण करून, प्रलयकालच्या उदकांत बुडत असलेली पृथ्वी वर काढिली; त्या वेळीं त्यानें आपल्या

तीक्ष्ण दाढांनीं तेथें असलेला उन्मत्त दैत्य हिरण्याक्ष ह्यास फाडून मारिलें.

त्याच नारायणानें रुचि नामक प्रजापतीच्या आकूति नामक पत्नीच्या उदरीं सुयज्ञ नांवाचा अवतार घेतला. ह्या अवतारांत सुयज्ञाला त्याच्या दक्षिणा नामक पत्नीपासून सुयम नांवाचे देव झाले. ह्या वेळीं सुयज्ञानें स्वतःच इंद्र होऊन त्रैलोक्याचीं मोठमोठीं दुःखें हरण केलीं; म्हणून स्वायंभुव मनूनें ह्याला हरि असें म्हटलें आहे.

नारदा, त्या ईश्वरानें कर्दम ऋषीच्या देवहूति नामक पत्नीच्या उदरीं नऊ बहिणींसह कपिल ह्या नांवाचा अवतार घेतला. त्या वेळीं त्यानें आपल्या आईला आत्मज्ञानाचा उपदेश केला. त्या उपदेशाच्या योगानें देवहूति मुक्त झाली.

ह्या भगवंतानें अत्रि ऋषीच्या अनसूया नामक पत्नीच्या उदरीं दत्त नामक अवतार घेतला. त्या वेळीं यदु, हैहय ह्यांना दत्तकृपेनें इहपरलोकींचे भोग व ऐश्वर्य प्राप्त होऊन शेवटीं मुक्ति मिळाली.

नारदा, सृष्टीच्या आरंभीं निरनिराळे लोक उत्पन्न करण्याच्या इच्छेनें मीं अति तीव्र तप केलें; त्या माझ्या तीव्र तपाच्या योगानें भगवान प्रसन्न होऊन आपणच सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार ह्या चार रूपांनीं अवतीर्ण झाला. त्या वेळीं त्या कुमाररूपी परमेश्वरानें अद्वैतमार्गाचें पुनरुज्जीवन केलें. पूर्वकल्पाच्या अंतीं प्रलय झाला, तेव्हां हा मार्ग नष्ट झाला होता. ह्या मार्गाचा उपदेश मुनींना केल्याबरोबर त्यांच्या अंतःकरणांत तें ज्ञान उत्पन्न झालें.

दक्षाची कन्या मूर्ती, जी धर्म ऋषींस दिली होती, तिच्या उदरीं ईश्वरानें नर आणि नारायण असे अवतार घेतले. त्या वेळीं त्या दोघांनीं जें तप केलें, त्याचा प्रभाव अलौकिक होता. कोणीही तपश्चर्या करूं लागल्यास, तो आपलें पद घेईल, असें इंद्राला भय वाटतें; व त्यामुळें ती तपश्चर्या शेवटास न जाऊं देण्याविषयीं तो यत्न करीत असतो. ह्या कामाकरितां तो अत्यंत चतुर आणि सुंदर अशा अप्सरांची योजना करितो; आणि कसलाही एकनिष्ठ तपस्वी असला, तरी ह्या अप्सरा आपल्या शृंगारयुक्त चेष्टांनीं त्याला तपोभ्रष्ट केल्यावांचून सोडीत नाहीत. नारदा, नरनारायणांच्या तपश्चर्येचा भंग करावा ह्या हेतूनें इंद्रानें स्वर्गांतून मदनाच्या केवळ सेनाच अशा अप्सरा पाठविल्या. पण त्या अप्सरा आपल्या तपाचा भंग करण्याकरितां आल्या आहेत असें जाणून, नरनारायणांनीं आपल्या मांडीपासून एक उर्वशी नामक अप्सरा उत्पन्न केली. तिचें स्वरूप अनुपमेय होतें. तिला पाहिल्याबरोबर, स्वर्गाहून आलेल्या त्या अप्सरा आपल्या सौंदर्याविषयीं अभिमान सोडून देऊन अतिशय लज्जित झाल्या; व नरनारायणांच्या तपश्चर्येचा भंग करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं राहिलें नाहीं. नारदा, नरनारायणांच्या शांतीचें काय वर्णन करावें! शंकरासारखे मोठमोठे पुण्यपुरुष क्रोधाच्या योगानें मदनाला जाळून टाकितात, पण त्यांना क्रोधावर कांहीं मात्रा चालवितां येत नाहीं. परंतु तो क्रोध तर नरनारायणांच्या अंतःकरणांत संचार करण्यास भितो, मग त्या क्रोधापेक्षांही क्षुल्लक जो काम, तो त्यांच्या मनांत कसा बरें संचार करील? कधींही करणार नाहीं. नारदा, ईश्वराचें सामर्थ्य अतर्क्य होय. उत्तानपाद राजाच्या ध्रुव नामक मुलाला त्याच्या सापत्न मातेनें उत्तानपाद राजाच्या समक्ष अनेक दुर्भाषणें केलीं; तेव्हां वाग्बाणांनीं दुःखित झालेला तो ध्रुव बाळ तत्काळ वनामध्यें निघून गेला, आणि तेथें त्यानें एकनिष्ठपणें भगवंताची आराधना केली. तेव्हां भगवान त्याला प्रसन्न झाला; आणि ज्या पदाची कश्यपादि सप्तर्षिही स्तुति करितात, तें अढळपद त्यानें त्यास दिलें.

नारदा, ऋषींनीं प्रार्थना केल्यावरून त्या भगवंतानें अधर्मरत वेन राजाच्या मृत शरिराच्या

मांडीपासून पृथु नामक अवतार घेतला. त्या अवतारामध्यें भगवंतानें वेन राजाचें अधोगतीपासून रक्षण केलें, व जगाच्या जीवनासाठीं गोरूप पृथ्वीचें दोहन करून अन्नादि सर्व वस्तु उत्पन्न केल्या.

ईश्वरानें नाभि राजाच्या मेरुदेवी नामक पत्नीच्या उदरीं ऋषभ अवतार घेतला. ह्या ऋषभाची सर्वत्र समदृष्टि होती. त्याची सुखोपभोगांवर यत्किंचित्‌ही आसक्ति नव्हती. तो आत्मस्वरूपांत रममाण असे. लोकांना आपली स्थिति जडासारखी दिसावी म्हणून तो वेड्यासारखा फिरत असे. वास्तविक पहातां त्यानें परमहंसवृत्तीचा अंगीकार केला होता.

नारदा, मीं यज्ञ केला तेव्हां भगवंतानें हयग्रीव नामक अवतार घेतला. त्या वेळीं त्याचा वर्ण सुवर्णासारखा होता. वेद, यज्ञ व सर्व देवता हें त्याचें स्वरूप होय. तो हयग्रीव श्वासोच्छ्वास करूं लागला, तेव्हां त्याच्या नाकपुड्यांतून वेदवाणी उत्पन्न झाली.

महायुगाच्या अंतीं त्या ईश्वरानें मत्स्यावतार घेतला; तो वैवस्वत मनूनें पाहिला होता. तो मत्स्य पृथ्वीचा आधार असल्यामुळें सर्व जीवांचाही आश्रय तोच होता. मी निद्रित असतां माझ्या मुखांतून गळून पडलेल्या वेदांचें त्या भयंकर उदकामध्यें त्या मत्स्यरूप नारायणानेंच रक्षण केलें.

अमृतप्राप्तीकरितां देव आणि दानव समुद्रमंथन करीत असतां रवी म्हणून केलेला मंदराचल जेव्हां बुडूं लागला, तेव्हां तो उचलून धरण्याकरितां भगवंतानें कूर्म अवतार घेतला, व आपल्या पाठीवर त्या पर्वतास सहज धारण केलें. नारदा, त्या परमात्म्याची शक्ति अतर्क्य होय. भगवंताच्या पाठीवर असलेला तो पर्वत सर्व देव आणि दानव गरगर फिरवीत होते, ह्यामुळें त्याच्या पाठीला त्यापासून सुख वाटून त्याला झोंप आली. त्या पर्वताचें घर्षण म्हणजे केवळ एखादा मुलगा पाठ खाजवितो त्याप्रमाणें त्याला वाटत होतें.

नारदा, देवांचें आणि भक्तांचें रक्षण करणें हें भगवंताचें ब्रीद होय. त्यांच्यावर संकट आलें असतां भगवान स्वतः अवतार घेऊन त्यांचें रक्षण करितो. अशा वेळीं जे जे विचार त्याला सुचतात, त्यांची कल्पनाही करितां येत नाहीं. हिरण्यकशिपूनें उग्र तप करून, आपल्याला कोठेंही मरण येऊं नये, असा मजकडून वर मागून घेतला. तेव्हां आतां मरणाची भीतिच राहिली नाहीं असें त्याला वाटूं लागून तो फारच उन्मत्त झाला. तेव्हां, त्यानें मागितलेल्या वराला व्यत्यय येणार नाहीं, अशा प्रकारचा अवतार भगवंतानें घेतला, व धड मनुष्यही नाहीं आणि धड पशुही नाहीं, असें नृसिंहरूप धारण करून दिवस व रात्र ह्यांच्या संधिकालीं त्या गदा पडताळून अंगावर धावून येणाऱ्या महाभयंकर व क्रूर दैत्याला आपल्या मांडीवर नखांनीं फाडून मारिलें. नारदा, हिरण्यकशिपुला मारिलें तेव्हां सर्व देवांना समाधान झालें.

एके वेळीं असा चमत्कार झाला कीं, एका सरोवरामध्यें गजेंद्र पाणी पिण्यास गेला असतां, त्याला एका प्रचंड नक्रानें धरिलें. गजेंद्रानें पुष्कळ खटपट केली; पण नक्रापासून सुटका करून घेण्यास तो समर्थ झाला नाहीं. शेवटीं त्यानें त्या सरोवरांतील एक कमल आपल्या सोंडेंत घेऊन तें प्रेमपूर्वक भगवंताला अर्पण केलें, आणि तो मोठया आर्तस्वरानें, 'हे परमेश्वरा, भक्तवत्सला, दयाघना, पतितोद्धारणा,' अशा नांवांनीं त्याला आळवूं लागला. तेव्हां भगवान प्रसन्न होऊन गरुडावर बसून खालीं आले, आणि आपल्या चक्रानें त्या नक्राचें मुख फाडून त्यांनीं गजेंद्राला मुक्त केलें, व नक्राचा उद्धार केला.

अदितीच्या उदरीं भगवंतानें देवांकरितां वाम-

नाचा अवतार घेतला. वामन हा अदितीच्या सर्व पुत्रांमध्यें कनिष्ठ खरा, परंतु त्याचा पराक्रम श्रेष्ठ होता. धर्ममार्गानें वर्तन करणाऱ्या पुरुषाचें ऐश्वर्य याचनेवांचून अन्य उपायांनीं हरण करणें अप्रशस्त होय असें मनांत आणून, त्या वामनमूर्ति परमात्म्यानें बलिराजापासून त्रिपाद भूमि मागून घेतली. बलिराजानें, आपला गुरु शुक्राचार्य नको नको म्हणत असतांही त्या बटुरूप भगवंताच्या हस्तावर त्रिपाद भूमि देण्याचें उदक सोडिलें. त्या वेळीं भगवंतानें आपल्या दोन पावलांतच सर्व पृथ्वी आणि आकाश हीं व्यापून टाकिलीं; तेव्हां तिसऱ्या पावलापुरती पृथ्वी देण्यास बळीला मुळींच साधन राहिलें नाहीं. शेवटीं त्या सत्यवचनी धार्मिक बलिराजानें आपला देह भगवंताला अर्पण केला. नंतर भगवंतांनीं त्याला पाताळांत दडपून बळीनें घेतलेलें इंद्रपद फिरून देवांना मिळवून दिलें. नारदा, बलि मोठा सत्यप्रतिज्ञ होता. त्यानें त्रिविक्रमाचे चरण क्षालन करून त्यांचें तीर्थ आपल्या मस्तकीं धारण केलें, व भगवंताची इच्छा पूर्ण करून आपणास ईशकृपेस पात्र करून घेतलें.

नारदा, तुझ्याही भक्तीनें परमेश्वर संतुष्ट झाला म्हणून त्यानें हंसरूप घेऊन तुला उत्तम भक्तियोगाचा उपदेश केला, आणि आत्मतत्त्वाचा प्रकाशक जो भागवत नामक ज्ञानमार्ग तो तुला सांगितला. तो आत्मतत्त्वबोधक मार्ग ईश्वराला शरण आलेल्या लोकांना मात्र यथास्थितपणें कळून येतो.

नारदा, तो ईश्वर प्रत्येक मन्वंतरामध्यें स्वतः अवतार घेऊन मनुवंशाचें पालन करितो, आणि जे दुष्ट राजे उत्पन्न होतील त्यांचा नाश करितो.

तो सुकीर्तिमान भगवान स्वतः धन्वंतरीचा अवतार घेऊन सांप्रत वर्तत आहे. महान महान रोग्यांचे रोग केवळ त्याच्या नामस्मरणानेंच हरण होतात. दैत्यांनीं धन्वंतरीचा यज्ञांतील हविर्भाग बंद केला होता, तो त्यानें आपल्या पराक्रमानें पुनः मिळविला व हल्लीं तो ह्या जगांत वैद्यशास्त्र प्रवृत्त करीत आहे.

नारदा, पृथ्वीवर क्षत्रिय अधर्मरत होत्साते ब्राह्मणांचा छल करून नरकाचें साधन करीत आहेत, म्हणून भगवंतानें परशुराम अवतार घेतला आहे. आतां तो त्या सर्व दुष्ट क्षत्रियांचा एकवीस वेळां अगदीं निःपात करील. नारदा, माझ्यासारख्या भक्तांवर अनुग्रह करण्याकरितां तो मायेचा नियंता नेहमीं तत्पर असतो.

पुढें तो इक्ष्वाकुवंशांत रामचंद्राचा अवतार घेईल, आणि पित्याची आज्ञा पालन करण्याकरितां आपली पत्नी सीता आणि धाकटा बंधु लक्ष्मण ह्यांस बरोबर घेऊन वनवासास गमन करील पुढें रावण रामचंद्राशीं विरोध करूं लागेल, आणि सीतेला हरण करून घेऊन जाईल. नारदा, रावणाला ह्या नीचपणाबद्दल अत्यंत यातना भोगाव्या लागतील. पूर्वीं शंकरानें त्रिपुरासुराचीं पुरें जाळून टाकिलीं, त्याप्रमाणें रामचंद्रालाही रावणाची लंका जाळून टाकावी अशी इच्छा उत्पन्न होईल; आणि तो दक्षिणसमुद्राच्या तीराला जाऊन त्या समुद्राजवळ पलीकडे जाण्यास मार्ग मागेल; पण समुद्र मार्ग देण्यास पहिल्यानें कबूल होणार नाहीं. शेवटीं रामचंद्र त्याला बाण मारून वाट करूं लागेल, त्या वेळीं तो घाबरून त्याला शरण येईल; सीतेला रावणानें दूर नेऊन ठेविल्यामुळें क्रोधानें व विरहानें रामचंद्राचे नेत्र लाल होतील, व तीच क्रोधदृष्टि समुद्रावर पडून तो सर्व समुद्र तप्त होऊन त्यांतील जलचरें तळमळूं लागतील; व त्यामुळें समुद्र रामचंद्राला वाट मिळण्याचा उपाय सांगेल. नंतर वानरसेनेकडून सेतु बांधवून रामचंद्र त्या वानरसेनेसह पलीकडे जाईल, व देवांनाही जिंकिल्यामुळें गर्विष्ठ झालेल्या त्या रावणाचा गर्व आणि प्राण हीं हरण करील.

पृथ्वीवर दैत्यांची सेना फार प्रबळ झाल्यामुळें तिला फार त्रास होऊं लागेल. तेव्हां तिचे क्लेश दूर करण्याकरितां भगवान आपल्या अंशरूप बलरामासह श्रीकृष्णाचा पूर्ण अवतार घेईल. त्यांत बलरामाचा वर्ण गौर आणि श्रीकृष्णाचा वर्ण काळा असेल. त्याच्या मनांतील कर्तव्य कोणासही कळणार नाहीं. त्या अवतारांत तो अनेक अमानुष कृत्यें करील. तो लहान बालक असतांनाच पूतना नामक एका राक्षसीच्या अंगावर प्यावयास लागून पितां पितां तिचे प्राण देखील पिऊन टाकील. तीन महिन्यांच्या वयाचा असतांनाच शकटासुराला सहज पायाचा धक्का लावून उलथून पाडील. तसेंच, तो रांगत असतां, त्याच्या द्वाडपणामुळें त्याची माता त्याला उखळीशीं बांधून ठेवील. नंतर, माता पलीकडे गेली असें पाहून तो त्या उखळीसुद्धां रांगत जाऊन अर्जुन नामक दोन गगनचुंबित वृक्षांच्या मध्यें ती उखळी अडकवून त्या वृक्षांना सहज उलथून पाडील. त्याचप्रमाणें गोकुळांतील गाई, वृषभ व गोपाल हे कालिया डोहांतील उदक प्राशन केल्यामुळें मृत होतील. पण त्यांवर केवळ कृपादृष्टि फिरवून तो त्यांना जिवंत करील; व त्या यमुनेच्या डोहांतील उदक शुद्ध करण्याच्या हेतूनें त्या विषोदकांत उडी टाकून, त्यांत असलेल्या भयंकर कालिया नामक सर्पाचें मर्दन करील, व त्याला शरण आणून तेथून काढून लावील. नंतर त्याच रात्रीं यमुनातटाकीं गुंजाटवी नामक वनांत नंदादि व्रजवासी निजले असतां एकाएकीं तें वन चोहींकडून पेटेल, व त्यामुळें सर्वांची बहुतेक अंतकालचीच वेळ येईल; पण त्या वेळीं बलराम आणि कृष्ण त्या सर्वांना डोळे मिटण्यास सांगतील. आणि त्या अग्नीचें स्वतःच प्राशन करून त्यांना त्या संकटांतून मुक्त करतील. ह्या कृष्णाला, त्याची माता यशोदा, हा खोड्या करितो म्हणून दाव्यानें बांधूं लागेल; पण कितीही दात्रीं लाविलीं तरी तीं त्याला पुरणार नाहींत. पुढें तो जांभई देईल व आपल्या मुखांत आपल्या मातेला चतुर्दश भुवनें दाखवील; व आपण तिचा मुलगा आहों हें जें तिचें अज्ञान, तें दूर करील. वरुणाच्या पाशांत नंद सांपडला असतां त्यास भगवान कृष्ण सोडवील. सर्व गोपाल आनंदानें खेळत असतां मयासुराचा पुत्र व्योमासुर हा त्यांच्यासारखेंच रूप घेऊन त्यांच्यांत मिसळेल, आणि त्यांस फसवून एका कृत्रिम गुहेंत कोंडून ठेवील. त्या वेळीं त्यांची गोपालकृष्ण सुटका करील. गोकुलवासी जनांना तो कृष्ण वैकुंठास घेऊन जाईल. वैकुंठलोकाच्या प्राप्तीकरितां त्यांना कांहीं करावें लागणार नाहीं. ते बुद्धीनें अगदीं मंद असतील. संसारांतील कामें करणें, खाणें, पिणें आणि झोंप घेणें ह्यांपेक्षां दुसरें परमार्थप्राप्तीचें साधन म्हणजे काय असतें तें त्यांना माहीत देखील असणार नाहीं; पण कृष्णदर्शनानेंच, मोठमोठ्या तपस्व्यांनाही जें स्थल पाहण्यास दुर्लभ, तें त्यांना सहज प्राप्त होईल. प्रतिवर्षी इंद्राच्या प्रीत्यर्थ एक यज्ञ करण्याची चाल गोकुलांत असेल; पण कृष्णाच्या सांगण्यावरून एके वर्षी तो न करितां गोपाळ गोवर्धनाचीच पूजा करतील. त्यामुळें इंद्राला राग येऊन तो गोकुलाला बुडवून टाकावें ह्या उद्देशानें भयंकर वृष्टि करील. त्या वेळीं कृष्ण केवळ सात वर्षांचा असून गोपालांचें व गाईंचें रक्षण व्हावें म्हणून गोवर्धन पर्वत आपल्या हातावर सात दिवसपर्यंत सहज उचलून धरील; तरी त्याला मुळींच श्रम होणार नाहींत,—एखादें फूल आपण उचलतों, त्याप्रमाणें पर्वत त्याला हलका वाटेल. पुढें एकदा शरदृतूंत स्वच्छ चांदणें पडलें असतां, गोपींना बरोबर घेऊन श्रीकृष्ण वृंदावनांत रासक्रीडा खेळेल. त्या रंगांत गुंग असतां शंखचूड ह्या नांवाचा एक कुबेराचा सेवक त्यांतील कांहीं गोपींना चोरून नेऊं लागेल, इतक्यांत श्रीकृष्ण त्याचा शिरच्छेद करील. प्रलंब,

धेनुकासुर, बक, केशी, वृषभासुर, चाणूर, कुवलयापीड नांवाचा हत्ती, कंस, कालयवन, भौमासूर, पौंड्रक, शाल्व, द्विविद वानर, बल्वल, दंतवक्र, नग्नजित राजाचे सात बैल, शंबरासुर, विदूरथ, रुक्मी, कांबोज, मत्स्य, कुरु, कैकय, सृंजय इत्यादिक युद्ध करण्यास प्राप्त होतील. तेव्हां बलराम, भीम, अर्जुन, प्रद्युम्न इत्यादिकांस पुढें करून श्रीकृष्ण परमात्मा त्यांस मारील, व त्या सर्वांस वैकुंठलोक प्राप्त होईल.

उत्तरोत्तर कालाच्या प्रभावानें लोक मंदबुद्धि निपजतील, व त्यांचें आयुष्यही कमी कमी होत जाईल. तेव्हां आपण केलेले वेद त्या वेळच्या स्थितींतील लोकांना दुर्बोध आहेत असें जाणून सत्यवतीच्या उदरीं भगवान व्यासरूपानें प्रकट होतील, आणि वेदरूप वृक्षाचे शाखारूपी निरनिराळे भाग करतील.

पुढें कांहीं दिवसांनीं मयासुरानें उत्पन्न केलेल्या अदृश्य आणि वेगवान अशा तीन नगरींत बसून लोकांचा घात करणारे व देवांचा द्वेष करणारे दैत्य वैदिक धर्माचें आचरण करूं लागतील; पण त्या ढोंगी दुष्टांचें कृत्य ओळखून त्यांची पाखांडमार्गाकडे प्रवृत्ति करण्याकरितां भगवान बुद्धावतार घेईल, आणि पाखांडधर्माचा प्रसार करील.

पुढें ज्या वेळीं कोणाच्याही घरीं हरिकीर्तन होणार नाहीं, ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तीनही वर्ण पाखंडी होतील, व शूद्र राजे राज्य करूं लागतील, आणि स्वाहाकार, स्वधाकार व वषट्कार हे शब्दही कोठें ऐकूं येणार नाहींत, तेव्हां कलियुगाच्या शेवटीं कलीचें शासन करण्याकरितां तो भगवान कल्कि अवतार घेईल आणि कलीचा नाश करील.

नारदा, ह्या सृष्टीच्या घडामोडी करणाऱ्या ईश्वराच्या विभूति अनेक आहेत. त्यांपैकीं तपश्चर्या, मी व मरीच्यादिक नऊ प्रजापति हे सृष्टीची उत्पत्ति करितात; धर्म, विष्णु, स्वायंभुवादिक चौदा मनु, इंद्रादि देव, पृथु इत्यादिक सार्वभौम राजे हे ह्या सृष्टीचें पालन करितात; आणि अधर्म, शंकर, सर्प, असुरादिक हे ह्या सृष्टीचा संहार करितात. ह्या सर्व त्या भगवंताच्याच विभूति होत.

ह्या पृथ्वीच्या परिमाणूंचीही कोणी गणती करूं शकेल; पण ईश्वराच्या पराक्रमांची गणना कोणीही करूं शकणार नाहीं. पहा—वामनावतारीं भगवंतानें आपल्या तीन पावलांनीं सर्व ब्रह्मांडाचें आक्रमण केलें, तेव्हां मायावरणासुद्धां सर्व त्रैलोक्य थरथर कापूं लागलें; तरी त्यानें त्या सर्वांस जागच्या जागीं सांवरून धरून त्रिपाद भूमि मोजून घेतली! नारदा, भगवंताचे पराक्रम अद्भुत आहेत, त्याच्या पराक्रमांचा अंत मला व तुझे वडील बंधु मरीच्यादिक ऋषि ह्यांनाही लागत नाहींत; मग इतरांना कोठून लागेल? आदिदेव शेष आपल्या सहस्र मुखांनीं ईश्वराच्या गुणांचें सतत वर्णन करीत आहे; तरी अद्याप त्याच्या गुणांचें एकवारही वर्णन झालें नाहीं.

नारदा, भगवन्माया दुस्तर आहे. जे लोक आपलें शरीर हें केवळ कोल्ह्याकुत्र्यांचें भक्ष्य आहे असें समजून सर्व लक्ष परमेश्वराकडे लावितात, आणि त्याची चरणसेवा करणें ह्यापेक्षां दुसरें कांहींच कर्तव्य नाहीं असें समजतात, त्यांजवर भगवान दया करितो. भगवंतानें दया केलेले लोक मात्र हरीची दुस्तर माया तरून जातात. नारदा, ही माया तरून जाणें तर कठिणच आहे, पण तिचें नुसतें ज्ञान सुद्धां सर्वांना होत नाहीं. मी, सनकादिक मानसपुत्र, शंकर, दैत्यश्रेष्ठ प्रल्हाद, स्वायंभुव मनु, त्याची पत्नी शतरूपा, त्याचे प्रियव्रतादिक पुत्र, प्राचीनबर्हि राजा, ऋभु, ध्रुव, इक्ष्वाकु, पुरूरवा, मुचकुंद, जनक, गाधि, रघु, अंबरीष, सगर, गय, ययाति, मांधाता, अलर्क, शतधन्वा, अनु, रंतिदेव, भीष्माचार्य, बलि, अमू-

तरय, दिलीप, सौभरि, उतंक, शिबि, देवल, पिप्पलाद, सारस्वत ऋषि, उद्धव, पराशर, भूरिषेण, बिभीषण, हनुमान, श्रीशुकाचार्य, पांडव, आर्ष्टिषेण, विदुर, श्रुतदेव इत्यादिक मात्र त्याची ही माया जाणणारे होत. ईश्वराची माया तरून जाण्यास उपाय म्हटला म्हणजे फक्त त्याची निःसीम सेवा करणें हाच होय. मग तो सेवा करणारा अमुक जातीचाच असला पाहिजे हा विधिनिषेध नाहीं. स्त्रिया, शूद्र, हूण, भिल्ल इत्यादि पापजातीचे लोक. तसेच पशुपक्ष्यादिक जीव देखील ईश्वराच्या भक्तीनें तरून जातात; मग शास्त्रज्ञ किंवा वेदज्ञ पुरुष भगवन्माया तरून जातील ह्यांत संशय काय आहे? मननशील पुरुष ज्याला ब्रह्म म्हणतात, तें त्या परमपुरुषाचें स्वरूप होय. तें नित्य, सुखरूप, शोकरहित, शांत, निर्भय, भेदरहित, शुद्ध, ज्ञानैकरस, निर्विषय असें आहे. त्याच्या स्वरूपाचा बोध करण्यास वेदही असमर्थ आहेत. त्या स्वरूपीं कर्मांच्या फळांचा संबंध होत नाहीं. सर्व दोषांचें उत्पत्तिस्थान जी माया, ती त्या स्वरूपापुढें येण्यास लाजते. त्या ईश्वराच्या स्वरूपीं ज्याचें मन लागलें, त्यास कांहींच कर्तव्य उरत नाहीं. मेघ स्वाधीन असल्यामुळें इंद्राला जसें विहीर खणण्याचें कारण पडत नाहीं, किंवा एखादा मजूर श्रीमंत झाला असतां, पूर्वी काम करण्याकरितां वापरीत असलेल्या हत्यारांशीं जसें कांहीं त्याचें कर्तव्य रहात नाहीं, त्याप्रमाणें, यतीनें आपलें लक्ष परमेश्वराकडे लावून तो तत्स्वरूप झाला, म्हणजे त्याला त्या स्वरूपास पोहोंचण्यास साधनभूत झालेलें जें शरीर, त्याचीही गरज उरत नाहीं; मग इतर कर्तव्य कोठून उरणार? अनेक कर्मांचीं फळें देणारा तोच भगवान होय. वर्णाश्रम आणि त्यांचे धर्म त्याजपासूनच उत्पन्न झाले. देहादिकांस उत्पन्न करणारीं पंचमहाभूतेंही त्यानेंच उत्पन्न केलीं. हें सर्व नाश पावणारें आहे; पण जीव नित्य आहे. तो आपल्या खऱ्या स्वरूपास विसरून ह्या अनित्य वस्तूंशीं रममाण होतो, म्हणून त्याला आपल्या कर्मांचीं फळें भोगावीं लागतात; पण तेंच त्यानें आत्मस्वरूप जाणिलें, म्हणजे त्याला कांहीं कर्तव्य उरत नाहीं. नारदा, ह्याप्रमाणें, त्या विश्वपालक भगवंताची लीला मीं तुला संक्षेपानें सांगितली आहे. हेंच मला भगवंतानें सांगितलें. आतां तूं ह्या भागवत ज्ञानाचा विस्तार कर, आणि ज्याच्या योगानें लोकांची श्रद्धा वाढून त्यांची ईश्वराविषयीं भक्ति दृढ होईल, असें ह्याचें वर्णन कर. जो ह्या ईश्वराच्या मायेचें वर्णन करितो किंवा ऐकतो, किंवा कोणी वर्णन करण्यास प्रवृत्त झाल्यास त्याला अनुमोदन देतो, त्याची बुद्धि ह्या मायेच्या योगानें मोह पावत नाहीं.

## अध्याय आठवा.

---:o:---

### परीक्षिताचे शुकाचार्यांस प्रश्न.

राजा परीक्षित म्हणालाः—ब्रह्मनिष्ठ मुने, ब्रह्मदेवानें नारद मुनींना त्या निर्गुण परमेश्वराच्या गुणांचें वर्णन विस्तारानें करण्याविषयीं आज्ञा दिली म्हणून आपण सांगितलें; पण तो ईश्वर जर निर्गुण आहे, तर त्या निर्गुणाचे गुण नारदांनीं तरी वर्णन कसे केले? मला तर त्याचें फारच आश्चर्य वाटत आहे. म्हणून, मला वाटतें, तें आश्चर्यकारक वर्णन ज्यांना ज्यांना प्रत्यक्ष नारदांनीं सांगितलें असेल, त्यांना त्यांना तो आपल्याला परमेश्वरच भेटला असें वाटलें असेल! महाराज, आपण सर्वज्ञ आहां. ईश्वराचीं चरित्रें कल्याणप्रद असतात. ह्याकरितां, त्याच्या लीला मला आपण ऐकविल्या म्हणजे माझ्या मनाची संसारावरील सर्व आसक्ति सुटेल, आणि मी आपलें मन श्रीकृष्णचरणीं लावून ह्या नश्वर देहाचा त्याग करीन. ईश्वराच्या लीला जो मनुष्य

नित्य आस्थेनें श्रवण करितो, त्याचीं सर्व पापें दूर होतात. पर्जन्यकालीं गढूळ झालेलें उदक जसें शरत्काल आला असतां निर्मल होतें, तसें संसाराच्या संगतीनें गढूळ झालेलें पुरुषाचें मन कृष्णकथांच्या श्रवणानें निर्मल होतें. हरिकथांच्या श्रवणाचें सुख विशेषच आहे. प्रवासामध्यें कष्ट पावलेला मनुष्य घरीं आला म्हणजे जसा तो फिरून प्रवासाची इच्छा करीत नाहीं, तसा संसारांतील दुःखें अनुभवलेला मनुष्य हरिकथारूप मंदिरांत सुख पावला म्हणजे फिरून संसाराची इच्छा करीत नाहीं. कारण, त्या हरिकथांच्या श्रवणानें त्याचीं सर्व पापें जळून जातात; मग तो ह्या पापमूलक संसाराची इच्छा कशाला करील? भगवद्भक्ताला क्रोध, लोभ, प्रीति, द्वेष ह्यांपासून कधींच क्लेश होत नाहींत. शुक मुने, जीवाचा पंचमहाभूतांशीं कांहीं संबंध नसतां, त्यांच्या योगानें ह्या जीवाला हा देह कां प्राप्त होतो? ह्याला कर्म वगैरे कांहीं कारण आहे कीं काय? शिवाय दुसरी अशी एक शंका येते कीं, ह्या लौकिक पुरुषाला जसे हस्तपादादि अवयव असतात, तसे भगवंतालाही असतात म्हणून आपण सांगितलें; तेव्हां मनुष्यापेक्षां ईश्वरांत अधिक तें काय आहे? बरें, त्यांत अधिक कांहीं नाहीं असें म्हणावें, तर तशीही मनाची खातरी होत नाहीं. कारण, त्याच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेला ब्रह्मदेव सर्व भूतांना उत्पन्न करितो; हें सामर्थ्य कांहीं ह्या लौकिक पुरुषाच्या अंगांत नाहीं. ह्यावरून जीवांत आणि परमेश्वरांत कांहीं फरक आहे हें खास. मुनिवर्य, ब्रह्मदेव हा ईश्वराच्या प्रत्यक्ष नाभिकमलापासून उत्पन्न झाला असतांही त्याच्या स्वरूपाचें ज्ञान होण्याकरितां त्याला उग्र तपश्चर्या करावी लागली, हें काय? असा तो मायाचालक परमेश्वर आहे तरी कोणत्या स्वरूपाचा? भगवन्, आपण पहिल्यानें असें सांगितलें कीं, त्या परमपुरुषाच्या अवयवांपासून सर्व लोक आणि लोकपाल उत्पन्न झाले, आणि फिरून असें सांगितलें कीं, सर्व लोक आणि लोकपाल ह्यांच्या योगानें त्या पुरुषाच्या अवयवांची कल्पना केलेली आहे; तेव्हां ह्या परस्पर विरुद्ध अशा गोष्टी संभवतील कशा? कार्य आणि कारण एकच कसें होईल? मुनिश्रेष्ठा, महाकल्प कशाला म्हणतात? अवांतर कल्पांचा काल किती असतो? भूत, भविष्य आणि वर्तमान हे शब्द कशाचे वाचक आहेत? मनुष्यें, पितर, देव आदिकरून देहधारी लोकांच्या आयुष्याचें प्रमाण काय आहे? लहान किंवा मोठी अशी जी कालाची प्रवृत्ति दिसते, तिचें कारण काय? कर्माच्या योगानें ज्या गति जीवांना प्राप्त होतात, त्या कशा आणि किती प्रकारच्या आहेत? सत्त्वरजादि गुणांचा देवमनुष्यादिरूप परिणाम प्राप्त व्हावा अशी जर जीवाला इच्छा असेल, तर कोणकोणतीं कर्मे केलीं असतां तीं स्वरूपें प्राप्त होण्यास तो अधिकारी होतो? पृथ्वी, पाताल, दशदिशा, आकाश, स्वर्ग, नवग्रह, नक्षत्रें, पर्वत, नद्या, समुद्र आणि द्वीपें ह्यांची व ह्यांच्या ठिकाणीं राहणाऱ्या प्राण्यांची उत्पत्ति कशी झाली? तसेंच, ब्रह्मांडाच्या आंतील व बाहेरील रचनेचें प्रमाण कसें आहे? मुने, साधूंचीं चरित्रें व वर्णाश्रमांचीं स्वरूपें आणि त्यांचे धर्म कसे आहेत, तें सर्व मला सांगा. युगें, युगांतील कालमान, प्रत्येक युगांतील धर्म, व त्यांत विशेषेंकरून मनुष्यमात्राचे धर्म आणि त्यांची वर्णाश्रमव्यवस्था कशी आहे, तें मला सांगा. त्याप्रमाणेंच, निरनिराळ्या व्यवसायांच्या योगानें उपजीविका करणाऱ्या लोकांचा व प्रजापालन करणाऱ्या राजांचा धर्म कोणता, हेंही सांगा. महाराज, संकटप्रसंगीं मनुष्यानें आपल्या धर्माचें रक्षण कशा प्रकारें करावें? प्रकृति वगैरे तत्त्वांची संख्या किती आहे? त्यांचीं स्वरूपें कोणतीं? त्या तत्त्वांचीं कार्यें कोणतीं? ईश्वराच्या पूजेचा विधि कसा आहे? अष्टांगयोगसाधनाचा प्रकार

कोणता? अणिमादि सिद्धींच्या योगानें योगी ज्या अर्चिरादि मार्गानें जातात, तो मार्ग कोणता? त्याच्या सूक्ष्म शरिराचा लय कसा होतो? ऋग्वेदादि वेद, आयुर्वेदादि उपवेद, धर्मशास्त्रें, इतिहास आणि पुराणें ह्यांचीं स्वरूपें कशीं आहेत? सर्व भूतांची उत्पत्ति व स्थिति आणि त्यांचा ब्रह्मदेवाच्या प्रतिदिवशीं होणारा प्रलय आणि ब्रह्मदेवाच्या शंभर वर्षांनंतर होणारा महाप्रलय, हे कसे होतात? वैदिक कर्मं, विहिरी, तळाव व देवालयें बांधणें, अग्निहोत्रादि कर्मे करणें, तसेंच, धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ ह्या सर्वांचे विधि मला सांगा. प्रलयकालीं ह्या सर्वांचा नाश झाल्यावर पुन: त्यांची सृष्टि, पाखंडमताची उत्पत्ति, जीवाचे बंधमोक्ष, व त्याचें बंधमोक्षांहून निराळ्या स्वरूपानें राहणें, हें कसें होतें? तो षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान आपल्या मायेनें उत्पन्न केलेल्या सृष्टींत क्रीडा करितो, ह्याचें कारण काय? तो सर्वव्यापक परमेश्वर आपल्या मायेला दूर ठेवून स्वत: केवळ साक्षी म्हणजे उदासीन कसा राहतो? मुने, ह्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें आपण द्यावीं. मी आपल्याला शरण आहें. ईश्वरापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवाला ह्यासंबंधी जी माहिती आहे, ती सर्व आपल्यास आहे. कारण, हें ज्ञान ब्रह्मदेवापासून नारद मुनींना प्राप्त झाल्यावर त्यांनीं तें व्यासांना सांगितलें, व व्यासांनीं आपणांस सांगितलें आहे. आपल्याखेरीज इतर जे जन आहेत, ते गतानुगतिक म्हणजे पूर्वजांनीं केलें तसेंच पुढें करणारे आहेत. त्यांस त्यांतील खरें तत्त्व काय आहे तें माहीत नाहीं. प्रभो, ब्राह्मणाच्या शापामुळें मला मरण तर येणार आहेच, व त्या वेळीं मला काय यातना होणार असतील त्या होवोत; पण ह्या वेळेस म्हणाल तर, मी जरी उपोषित आहें, तरी आपल्या मुखांतून ईश्वराच्या लीला ऐकत असल्यामुळें, मला त्या उपवासाबद्दल कांहींच वाटत नाहीं.

सूत म्हणतात:—ऋषिहो, भगवंताच्या कथा ऐकण्याविषयीं उत्सुक होऊन परीक्षितानें केलेले प्रश्न ऐकतांच शुकाचार्यांना अतिशय आनंद झाला; व त्या सर्वज्ञ मुनींनीं मोठ्या प्रेमानें ब्रह्मदेवानें नारदास सांगितलेलें भागवत नामक पुराण राजाला सांगितलें.

# अध्याय नववा.

—:०:—

## भगवन्मायावर्णन.

शुकाचार्य म्हणाले:—राजा, स्वप्नामध्यें पाहिलेल्या पदार्थांपैकीं एकाही पदार्थाचा खरोखरीचा संबंध जसा तो मनुष्य जागा झाला असतां त्याला घडत नाहीं, तसा, देहाभिमानस्थितींत अनुभवलेला शरिराचा आणि इतर पदार्थांचा संबंध, तो जीव आत्मस्थितीस पोहोंचला असत त्याला घडत नाहीं. स्वप्नांतील पदार्थ वास्तविक खोटे असूनही ते खरे आहेत असें ज्या स्थितींत मनुष्याला वाटतें, त्या स्थितीस जसें मनुष्याचें अज्ञान कारण आहे, तसें, देहस्थितींतील अनुभव खरे आहेत असें ज्या स्थितींत जीवाला वाटतें, ती प्राप्त होण्याला कारण ईश्वराची माया होय. निजलेला मनुष्य वास्तविक आपण एकटा असून, स्वप्नामध्यें दिसत असलेले पदार्थ आणि मनुष्यपश्वादिक प्राणी तो आपणच स्वत: होतो, आणि त्यांच्या रूपानें अनेक प्रकारचे व्यवहार करितो व ते आपणच पाहतो; तसा, आत्मा आपण एकटाच असून सृष्टींतील दिसत असलेले पदार्थ आणि मनुष्यपश्वादिक प्राणी तो आपणच स्वत: होतो, आणि त्यांच्या रूपानें अनेक प्रकारचे व्यवहार करितो व ते आपणच पाहतो. वस्तुत: तो सर्व आभास होय. स्वप्नस्थितींत गुंग असलेला मनुष्य आपणच उत्पन्न केलेल्या इतर जीवांबरोबर 'मी' 'तूं' असा अहंकार धरितो, आणि स्वप्नांतल्या पदार्थांना 'माझे' व 'तुझे'

असें मानितो; तसा, देहाभिमानस्थितींत गुंग असलेला जीव इतरांशीं ' मी ' ' तूं ' असा अहंकार धरितो, आणि ऐहिक पदार्थांना ' माझें ' व ' तुझें ' असें मानितो. भ्रममय स्वप्नसृष्टीहून मनुष्य जसा निराळा असतो, तसा मायामय सृष्टीहून परमेश्वर निराळा आहे. जागृतावस्था प्राप्त झाल्यावर ज्याप्रमाणें मनुष्याचा स्वप्नभ्रम दूर होतो, त्याप्रमाणेंच ज्ञानावस्था प्राप्त झाली म्हणजे जीवाचा मायाभ्रम दूर होतो; आणि मनुष्य स्वप्नरहित होऊन जसा आपल्या खऱ्या स्थितींत शांत राहतो, तसा जीव मायारहित होऊन आपल्या खऱ्या ( सच्चिन्मय ) स्थितींत शांत राहतो.

राजा, आतां तुझी जी शंका आहे कीं, जीवाप्रमाणें ईश्वरालाही देहाचा संबंध आहे, तर मग त्याची भक्ति केली असतां मोक्ष कसा प्राप्त होतो, तिचें उत्तर सांगतों, ऐक. दोघांनाही जरी देहाचा संबंध आहे, तरी ते त्यांचे देह मात्र निरनिराळ्या प्रकारचे आहेत. जीवाचा देह अज्ञानरूप व मिथ्या आहे, आणि ईश्वराचा देह ज्ञानरूप व सत्य आहे; ह्याच कारणानें ईश्वराच्या भक्तीपासून मोक्षरूप शाश्वत फल मिळतें. राजा, हें तत्त्व कळावें अशी जर इच्छा असेल, तर आत्मस्वरूपाचें ज्ञान प्राप्त करून घेण्याची योग्यता येण्याकरितां जें साधन परमेश्वरानें ब्रह्मदेवाला सांगितलें, तेंच साधन सर्वांत श्रेष्ठ आहे. तें साधन म्हणजे ईश्वराचें तप हें होय. ईश्वराच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला; तेव्हां आपण सृष्टि करावी अशी त्याला इच्छा उत्पन्न झाली; पण ती कशी करावी हें कांहीं त्याला सुचेना. तो आपल्या आसनावर अगदीं सचिंत बसला. ह्याप्रमाणें ब्रह्मदेव चिंतेंत असतां एकाएकीं उदकामध्यें 'तप तप' असा ध्वनि त्याला ऐकू आला. राजा, तो ध्वनि ऐकिल्याबरोबर ब्रह्मदेव चपापून उठला आणि हा ध्वनि करणारा कोणी तरी आसपास असेल म्हणून तो इकडे तिकडे पाहूं लागला; पण त्याला कोठेंच कोणी दिसेना. तेव्हां निराश होऊन तो आपल्या आसनावर येऊन बसला. आणि त्या ऐकिलेल्या शब्दांविषयीं विचार करूं लागला. तरी त्यांबद्दल त्याला कांहीं कल्पना होईना. शेवटीं त्याचा असा निश्चय झाला कीं, ज्या अर्थीं सृष्टि कशी करावी ह्या विवंचनेंत मी असतां, ' तप तंप ' हा ध्वनि माझ्या कानावर आला, त्या अर्थीं तप करणें हाच उत्तम मार्ग होय. असा विचार करून त्यानें तप करण्यास आरंभ केला. त्या महातपस्वी ब्रह्मदेवानें आपल्या देहांतील वायु, मन, पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें ह्यांस स्वाधीन करून घेऊन, एकाग्र चित्तानें देवांचीं हजार वर्षेपर्यंत उग्र तप केलें. त्या त्याच्या तपानें भगवान प्रसन्न झाला, आणि त्यानें ब्रह्मदेवाला आपलें राहण्याचें स्थान जो श्रेष्ठ

वैकुंठलोक

तो दाखविला. राजा, त्या लोकीं अज्ञान, भय हीं मुळींच नाहींत. सत्पुरुष त्याची स्तुति करितात. सत्त्वगुणावांचून इतर गुणांची गति त्या स्थलीं मुळींच होत नाहीं. तेथें माया, रागलोभादि विकार व प्रत्यक्ष काळ यांचा प्रभाव चालत नाहीं. ज्यांना देव आणि दैत्य सुद्धां पूज्य मानतात, असे जयविजयादि विष्णूचे पार्षदगण तेथें राहतात. त्यांचीं रूपें अगदीं भगवान महाविष्णूसारखींच आहेत. त्यांचा वर्ण श्याम असून सतेज आहे. त्यांचे नेत्र कमलांसारखे तेजःपुंज असून वस्त्रें व अंगकांति दिव्य आहे. त्यांना चार बाहु असून त्यांच्या शरीरांवरील रत्नखचित अलंकारांची प्रभा सर्वत्र पसरलेली असते. आकाश जसें मेघपंक्ति व विद्युल्लता ह्यांच्या योगानें शोभतें, तसा तो वैकुंठलोक महान महान भगवद्भक्त व उत्तम स्त्रिया ह्यांच्या झळकणाऱ्या विमानांच्या ओळींनीं शोभतो. सर्व लोक जिची स्तुति करितात, ती मूर्तिमंत लक्ष्मी तेथें श्रीविष्णूच्या चरणांची सेवा करून त्याच्या लीलांचें गायन करीत असते.

राजा, अशा त्या वैकुंठलोकीं ब्रह्मदेव गेल्यानंतर, तेथें त्यानें भक्तरक्षक यज्ञपति

नारायणाची मूर्ति

अवलोकन केली. ती मूर्ति चतुर्भुज असून भक्तांवर अनुग्रह करण्याविषयीं उत्सुक अशी होती. सभोंवतीं सुनंद, नंद, प्रबल, अर्हण इत्यादि पार्षदश्रेष्ठ उभे असून भगवत्सेवेमध्यें तत्पर होते. भगवंताची दृष्टि मोहक, मुख हास्ययुक्त व नेत्र आरक्त असून, मस्तकावरील किरीट व कानांतील कुंडलें फारच देदीप्यमान दिसत होतीं. कासेस पीतांबर असून वक्षस्थलावर लक्ष्मीचें चिन्ह शोभत होतें. राजा, तो प्रभु एका उच्च सिंहासनावर विराजमान असून त्याच्या सन्निधभागीं प्रकृति, पुरुष, महत्तत्त्व, अहंकार, एकादश इंद्रियें, पंचमहाभूतें व पंचसूक्ष्मभूतें विद्यमान होतीं, व इतर स्थलीं अशाश्वत असणारीं सर्व प्रकारचीं ऐश्वर्यें तेथें शाश्वत असतांही तो सच्चिदानंदरूप परमात्मा आत्मस्वरूपांत रममाण होता. राजा, त्या ईश्वराच्या दर्शनानें ब्रह्मदेवाचें अंतःकरण आनंदसागरांत पोहूं लागलें. त्याच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले व नेत्रांवाटे आनंदाश्रूंचे पूर वाहूं लागले. त्यानें भक्तियुक्त अंतःकरणानें त्या ईश्वराच्या चरणकमलांस नमस्कार केला. आपल्याविषयीं ब्रह्मदेवाची निष्ठा आणि भक्ति पूर्ण आहे असें पाहून परमेश्वर त्याला प्रसन्न झाला, आणि त्याचा हात धरून त्याला म्हणालाः—

" ब्रह्मदेवा, सकाम भक्तांना मी प्रसन्न होणें अत्यंत कठिण आहे; पण सृष्टि करावी ह्या हेतूनें तूं जें तप केलेंस, त्यानें मी संतुष्ट झालों आहें; तुझें कल्याण असो. आतां तुझ्या इच्छेस येईल तो वर मजपासून मागून घे. 'तप, तप,' हे शब्द ऐकून तूं त्याचें उत्तम आचरण केलेंस, व त्या तपश्चर्येच्या बळानेंच जरी तुला माझें दर्शन झालें, तरी तो माझ्या इच्छेचाच प्रभाव होय. कारण, सृष्टि कशी करावी हें जेव्हां तुला समजेना, तेव्हां 'तप, तप' असें मींच तुला सांगितलें. ब्रह्मदे[illegible] तप म्हणजे माझ्या अंतरंगांतील प्रत्यक्ष शरी[illegible] होय, व माझें आत्मरूपही तेंच आहे. ह्या तपा[illegible]च्याच योगानें मी विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं करितों."

हें ऐकून ब्रह्मदेव म्हणालाः—भगवन्, तूं प्राणिमात्राचा आश्रय असून त्याच्या बुद्धीचा चालक ही तूंच आहेस. तेव्हां माझ्या मनांतील कर्तव्य तूं जाणतच आहेस. तथापि माझें एक मागणें आहे तेवढें मला दे. देवा, तूं रूपरहित असून वि[illegible] रचनेसाठीं जीं स्थूल आणि सूक्ष्म रूपें धारण करितोस, त्या दोन्ही रूपांचें ज्ञान मला प्राप्त करून दे. कोळी जसा आपणच तंतु उत्पन्न करून त्यांचें जाळें पसरितो, आपणच त्यामध्ये राहून त्याचें रक्षण करितो, आणि शेवटीं आपणच तें भक्षण करून टाकितो, त्याप्रमाणें, तूं आपल्या मायेच्या योगानें अनेक शक्तींनीं युक्त असें जग उत्पन्न करितोस, त्यामध्यें राहून त्याचें रक्षण करितास, आणि शेवटीं त्याचा नाश करितोस. ह्या गोष्टींचें गूढ मला कळत नाहीं. तेव्हां त्यांचें परिपूर्ण ज्ञान होईल अशी मला बुद्धि दे. देवा, तूं जो मार्ग मला सांगशील, त्याच मार्गानें मी सृष्टीची उत्पत्ति करीन; परंतु अहंकारादिकांच्या सहवासानें मला बंध प्राप्त होऊं नये ह्याविषयीं मात्र तुझा मजवर अनुग्रह पाहिजे समर्था, तूं मजला मित्राप्रमाणें सलगीनें वागविलेंस, त्या अर्थीं मी तुझ्या इच्छेप्रमाणें सृष्टीची रचना करीन; पण त्या वेळीं, मी तुजप्रमाणेंच स्वतंत्र आहें, असा अभिमान मला प्राप्त होऊं नये.

हें ऐकून भगवान म्हणालेः—ब्रह्मदेवा, वेदादिकांत सांगितलेलें माझें अति गूढ ज्ञान ब्रह्मानुभव, भक्तियोग व त्याचें साधन ह्यांसह मी तुला सांगतों, तें तूं ग्रहण कर. माझें स्वरूप

केवढें आहे, माझी सत्ता कशी आहे, व माझे अवतार, गुण आणि कर्में हीं कसकशीं आहेत, यांचें ज्ञान माझ्या अनुग्रहानें तुला प्राप्त होवो.

शुकाचार्य म्हणाले:—राजा, असें बोलून भगवतानीं चार श्लोकांत ब्रह्मदेवास भागवताचा उपदेश केला.

## चतुःश्लोकी भागवत.

श्री भगवानुवाच—

अहमेवासमेवाग्रे नान्यद्यत्सदसत्परम् ।
पश्चादहं यदेतच्च योऽवशिष्येत सोऽस्म्यहम् ॥
ऋतेऽर्थं यत्प्रतीयेत न प्रतीयेत चात्मनि ।
तद्विद्यादात्मनो मायां यथाऽऽभासो यथा तमः ॥
यथा महांति भूतानि भूतेषूच्चावचेष्वनु- ।
प्रविष्टान्यप्रविष्टानि तथा तेषु न तेष्वहम् ॥
एतावदेव जिज्ञास्यं तत्त्वजिज्ञासुनाऽऽत्मनः ।
अन्वयव्यतिरेकाभ्यां यत्स्यात्सर्वत्र सर्वदा ॥

श्रीभगवान म्हणाले:—' ब्रह्मदेवा, सृष्टीच्या पूर्वी मीच होतों. स्थूल आणि सूक्ष्म व ह्या दोहोंचं कारण जी प्रकृति, त्यांपैकीं कांहींही माझ्याहून निराळें नव्हतें. सृष्टि झाल्यावर मीच आहें. सर्व जग हें माझेंच स्वरूप होय. पुढें सृष्टीचा प्रलय झाल्यावर अवशिष्ट जो राहील तोही मीच. आकाशांत चंद्र एकच असतां, पित्तादि विकारामुळें जसा एखाद्याला ते दोन किंवा त्याहून अधिक आहेत असा भास होतो, अथवा अंतरिक्षांत राहु हा विद्यमान असतां जसा तो कृष्णवर्णामुळे दृग्गोचर होत नाहीं, तसा आत्मा एकच असतां मायाविकारामुळें त्याच्या ठिकाणीं अनेकत्व भासतें; आणि हा सर्वत्र व्याप्त असतां मायेच्या अस्तित्वामुळें तो दृग्गोचर होत नाहीं. पंचमहाभूतें हीं त्यांच्यापासूनच उत्पन्न झालेल्या लहान मोठ्या कार्यांमध्यें प्रविष्ट असतात, तरी तीं भूतें कार्ये नव्हत; तर, तीं कार्यांच्या पूर्वीच असल्यामुळें त्या कार्यांचीं कारणें आहेत; तसा मी जरी मजपासूनच उत्पन्न झालेल्या त्या सृष्टीमध्यें प्रविष्ट झालेला असतों, तरी मी सृष्टि नव्हें; तर, मी त्या सृष्टिरूप कार्याच्या पूर्वीच असल्यामुळें मी तिचें कारण आहें. माती हें घटाचें कारण असल्यामुळें ती अन्वयरूपानें घटांत असते, पण ती व्यतिरेकरूपानें घटाहून निराळी आहे; तसा आत्मा सर्वांस कारण असल्यामुळें त्याचा सर्व कार्यांत अन्वय आहे; पण त्याचा त्या कार्यांत व्यतिरेकही आहे. अशा अन्वयव्यतिरेकांनीं जें सर्व ठिकाणीं सर्वकाल भरलें आहे, तें आत्मस्वरूप होय. आत्म्याचें तत्त्व जाणण्याची इच्छा करणारानें जें जाणावयाचें, तें हेंच.

ब्रह्मदेवा, आतां, अहंकारानें बद्ध होऊं नये अशी जी तुझी इच्छा आहे, त्यास उपाय इतकाच कीं, हा मी तुला केलेला उपदेश नीट लक्षांत ठेव; म्हणजे तेणेंकरून, तूं कितीही कल्पांत कितीही प्रकारची सृष्टि करीत राहिलास, तरी ' मी सृष्टीचा कर्ता ' हा अभिमान तुला होणार नाहीं.

शुकाचार्य म्हणाले:—राजा, ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाला उपदेश करून भगवंतानें आपलें स्वरूप गुप्त केलें. नंतर पूर्वकल्पप्रमाणें ब्रह्मदेवानें हें जग उत्पन्न केलें. तो प्रजांचा अधिपति व धर्मपालक ब्रह्मदेव प्रजेचें कल्याण व्हावें ह्याच इच्छेनें एके वेळीं यमनियमांचें अनुष्ठान करण्यास बसला असतां, त्याचा पुत्र जो महाभगवद्भक्त नारद, त्यानें त्याची चांगली शुश्रूषा करून त्यास प्रसन्न करून घेतलें. तेव्हां नारदानें, आतां जो प्रश्न तूं मला विचारलास तोच प्रश्न ब्रह्मदेवास विचारला. पुत्राच्या त्या प्रश्नानें ब्रह्मदेवाला संतोष झाला, आणि त्यानें ईश्वरापासून पूर्वी श्रवण केलेलें दहा लक्षणांनीं युक्त असें भागवत नामक पुराण त्याला सांगितलें. तेंच पुराण नारद मुनींनीं व्यासांना सांगितलें. व्यास मुनि सरस्वतीच्या तीरावर परब्रह्माचें ध्यान करीत बसले होते. तेथें नारदांची व त्यांची भेट झाली. त्या वेळीं व्यासांचें अपरिमित तेज पाहून हें वेदतुल्य पुराण नारदांनीं त्यांना उपदेशिलें. राजा, विराटस्वरूपी पुरुषापासून हें जग कसें उत्पन्न झालें, असा जो तूं प्रश्न केला आहेस, व इतरही जे तुझे प्रश्न आहेत, त्या सर्वांचीं सविस्तर उत्तरें मी तुला सांगतों.

# अध्याय दहावा.

—:०:—

## भागवतांतील विषय.

शुकाचार्य म्हणाले:—राजा, ह्या भागवतामध्यें एकंदर दहा विषय आहेत. सर्ग, विसर्ग, स्थान, पोषण, ऊति, मन्वंतरें, ईशकथा, निरोध, मुक्ति आणि आश्रय हीं त्यांचीं नांवें होत. दहाजणांच्या कुटुंबांत जसा एखादाच मुख्य आणि सर्वांचा आधार असतो, तसा ह्यांतही सर्वांचा मुख्य आणि आधार असा एकच विषय आहे;—तो दहावा आश्रय हा होय. विशेष कारणाकरितां वर्णन करण्याचा प्रसंग आला असतां ज्याप्रमाणें कुटुंबांतील मुख्याचेंच वर्णन करण्याचा प्रघात आहे, त्याप्रमाणें, विशेष प्रसंगीं ह्या आश्रयाचेंच वर्णन होतें. पण सांगोपांग वर्णन करण्याकरितां ज्याप्रमाणें कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीचें निरनिराळें वर्णन आधीं सांगून, त्या सर्वांचें अस्तित्व ज्याच्यावर अवलंबून असतें त्याचें वर्णन मागून करितात, त्याप्रमाणें, आश्रयाचें खरें ज्ञान होण्याकरितां, त्याच्या आश्रयभूत असलेल्या नऊ विषयांचें वर्णन आधीं करून नंतर शेवटीं आश्रयाचें वर्णन करितात. हें वर्णन करण्याचे प्रकार दोन आहेत: (१) प्रत्यक्ष श्रुतीनें व (२) अप्रत्यक्ष—आख्यानोपाख्यानांनीं. राजा, आतां मी तुला त्या दहाव्या विषयाचें (आश्रयाचें) खरें ज्ञान व्हावें म्हणून आधीं पहिल्यापासून सर्व विषयांचें निरनिराळें वर्णन सांगतों, ऐक.

(१) सर्ग—सत्त्व, रज आणि तम ह्या तीन गुणांच्या न्यूनाधिक मिश्रणानें आकाशादि पंचमहाभूतें, त्यांचे शब्दादिक पांच विषय, मनासहित अकरा इंद्रियें, महत्तत्त्व व अहंकार ह्यांची विराट्रूपानें जी उत्पत्ति झाली, त्या सृष्टीला सर्ग असें म्हणतात.

(२) विसर्ग—विराट्पुरुषानें भूतादिकांच्या योगानें जी स्थावरजंगमात्मक सृष्टि केली, तिला विसर्ग असें म्हणतात.

(३) स्थान—उत्पन्न केलेल्या सृष्टीची मर्यादा पालन करून परमेश्वर जो तिचा उत्कर्ष करितो, त्याला स्थान असें म्हणतात.

(४) पोषण—आपल्या भक्तांवर परमेश्वर जो अनुग्रह करितो, त्याला पोषण असें म्हणतात.

(५) ऊति—पुण्यकर्म किंवा पापकर्म ह्यांपासून होणाऱ्या ज्या वासना, त्यांस ऊति म्हणतात.

(६) मन्वन्तरें—परमेश्वराच्या कृपेस पात्र झालेले जे मन्वन्तराधिपति, त्यांच्या धर्माला मन्वन्तरें असें म्हणतात.

(७) ईशकथा—ईश्वरानें व त्याच्या भक्तांनीं जीं चरित्रें केलीं, त्या चरित्रांचीं जीं वर्णनें, त्यांस ईशकथा असें म्हणतात.

(८) निरोध—परमेश्वरानें योगनिद्रेचा स्वीकार केल्यानंतर आत्मा (जीव) आपल्या शक्तीसह (इंद्रियें व अंतःकरण ह्यांसुद्धां) लीन होतो, त्या स्थितीला निरोध असें म्हणतात.

(९) मुक्ति—मी कर्ता, मी भोक्ता हा जीवाचा अभिमान सुटल्यानंतर त्याला जी स्थिति प्राप्त होते, [illegible] मुक्ति असें म्हणतात.

([illegible]) आश्रय—पंचमहाभूतादिकांच्या उत्पन्[illegible]ठ्यापर्यंत सर्व क्रिया ज्याच्या [illegible], [illegible] परमात्म्यास आश्रय असें [illegible] त्या [illegible] नऊही विषयांचा आश्रय [illegible] शास्त्रें मुख्यत्वें ह्याचेंच वर्णन [illegible] सर्वांचा आश्रय आहे, असें [illegible] आहे, परंतु तें मत खरें नाहीं. कारण, [illegible] जीव, आधिदैविक जीव व आ[illegible] जे तीन प्रकार, ते त्याचें पार[illegible] दर्शवितात. पहा—चक्षुरादिक इंद्रियांचा प्रेरक जो हा आध्यात्मिक जीव, अथवा त्या इंद्रियांचा देवतारूपी जो हा आधिदैविक जीव, किंवा आध्यात्मिक आणि आधिदैविक जीव, हे दोघे एकच असतां त्यांचा ज्या ठिकाणीं वियोग होतो असा जो हा आधिभौतिक जीव, ह्यांपैकीं एक जर नसेल, तर नुसत्या दोहोंचा मुळींच उपयोग नाहीं. म्हणून ह्यांत स्वतंत्र कोणीच नाहीं; ह्याकरितां ह्यांपैकीं कोणालाही आश्रय म्हणतां येत नाहीं. तर जो ह्या आध्यात्मिकादि तिघांसही आपल्या ज्ञानानुभवानें जाणतो, तोच परमात्मा सर्वांचा खरा आश्रय होय. त्याला दुसऱ्याच्या आश्रयाची अवश्यकता नाहीं.

**नारायण हें नांव पडण्याचें कारण.**

हा परमात्मा विराट्पुरुष ब्रह्मांडाचा भेद करून जेव्हां आपण निराळा झाला, तेव्हां त्याला आपल्याकरितां एखादें उत्तम स्थान असावें अशी इच्छा झाली. म्हणून त्यानें आपल्यासारखें शुद्ध आणि स्वच्छ असें उदक उत्पन्न केलें, व आपणच उत्पन्न केलेल्या त्या उदकांत हजारों वर्षेंपर्यंत तो राहिला. ह्याच वेळीं त्याला नारायण हें नांव पडलें. त्याचें कारण—नरापासून ज्याची उत्पत्ति झाली तें नार (उदक); तें नार ज्यानें आपलें अयन (वसतिस्थान) केलें, तो नारायण; असो.

ह्या नारायणाचें सामर्थ्य अपूर्व होय. द्रव्य, काल, कर्म, स्वभाव, जीव ह्या सर्वांचें अस्तित्व त्याच्या इच्छेवर असतें. त्याची इच्छा नसली म्हणजे हे नसल्यासारखेच होत. तो समर्थ परमेश्वर आपल्या योगरूपी शय्येवरून उठला, आणि त्याला इच्छा उत्पन्न झाली कीं, आपण निरनिराळीं रूपें घ्यावीं; म्हणून त्यानें मायेच्या योगानें आपल्या प्रकाशमय वीर्याचे तीन भाग केले. तें तिन्ही प्रकारचें वीर्य अत्यंत तेजस्वी असून त्यास अध्यात्म, अधिदैव आणि अधिभूत ह्या संज्ञा आहेत. तो पुरुष आपल्या क्रियाशक्तीच्या योगानें शरिरांतील आकाशांत नानाप्रकारचे व्यापार करीत असतां, सह (मनाची शक्ति), ओज (इंद्रियशक्ति), आणि बल (शरिराची शक्ति) हीं उत्पन्न झालीं; नंतर त्यापासून सूत्रात्मा प्राण झाला. हा प्राण शरिरांतील राजा होय. राजा आपल्या स्थानावर असला म्हणजे ज्याप्रमाणें त्याचे सेवक त्याची आज्ञा मानण्यास तत्पर असतात, त्याप्रमाणें शरिरांतील प्राण आहे तोंपर्यंत इंद्रियें चलनवलन करीत असतात. राजा स्थानभ्रष्ट झाला कीं प्रजा जशी निर्जीव होते, तसा प्राण शरीरभ्रष्ट झाला कीं शरीर निर्जीव होतें. असो.

**ईश्वराचें स्थूल स्वरूप.**

त्या विराट्रूपी प्रभूच्या शरिरामध्यें प्राणवायु संचार करूं लागला, त्याबरोबर त्याला क्षुधा व तृषा उत्पन्न झाली. तेव्हां विराट्पुरुषास प्रथम

मुख उत्पन्न झालें. मुखापासून तालुस्थान उत्पन्न झालें, व त्यांत रसनेंद्रिय झालें. नंतर जिव्हेला समजणारे नानाप्रकारचे रस उत्पन्न झाले. नंतर त्या प्रभूला बोलण्याची इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां त्याच्या मुखापासून वाणी हें इंद्रिय व त्या इंद्रियाची देवता अग्नि हीं उत्पन्न झालीं. नंतर त्या दोहोंपासून त्यांचा विषय जें भाषण तें उत्पन्न झालें. तो विराट्पुरुष पाण्यांत कोंडलेला होता म्हणून त्याची शक्ति वाढल्यामुळें त्याच्या शरिरांत प्राणवायु जोरानें खेळूं लागला. तेव्हां त्या जोरानें त्याला दोन नाकपुड्या उत्पन्न झाल्या. तेथें वायु नामक गंधवाह देवता उत्पन्न झाली. नंतर त्या पुरुषाला वास घेण्याची इच्छा उत्पन्न झाली असतां, गंधरूपी विषय आणि घ्राणेंद्रिय हीं उत्पन्न झालीं. त्या वेळेपर्यंत ब्रह्मांड अंधकारमय होतें; पण त्या पुरुषाला आपला देह व इतर वस्तु पाहण्याची इच्छा झाली, तेव्हां त्याला नेत्रगोल झाले, व तेथें सूर्य ही देवता, चक्षु हें इंद्रिय, आणि रूप हा विषय उत्पन्न झाला. नंतर. वेदांनीं केलेला उपदेश आपल्याला ऐकूं यावा असें त्या भगवंताला वाटलें, तेव्हां त्याला कान, कानांच्या देवता दिशा व श्रोतेंद्रिय हीं उत्पन्न झालीं; व त्यापासून शब्द विषयाचें ग्रहण करण्याची शक्ति झाली. मृदुत्व, काठिण्य, लघुत्व, गुरुत्व, किंचित् उष्णता, शीतलता इत्यादि जे पदार्थांचे गुण, ते समजावे अशी इच्छा उत्पन्न झाली असतां त्याला त्वचा उत्पन्न झाली, व तेथें रोम आणि वृक्ष झाले. त्या त्वचेच्या ठिकाणीं वायु आंतबाहेर व्यापून राहिला असल्यामुळें तिच्या योगानें तो स्पर्श विषयाचें ग्रहण करितो. पुढें त्या विराट्पुरुषास नानाप्रकारचीं कर्मे करण्याची इच्छा उत्पन्न झाली, तेव्हां त्याला हात उत्पन्न झाले. त्या हातांच्या ठिकाणीं बल (इंद्रिय) व त्याची देवता (इंद्र) आणि त्या दोहोंच्या आश्रयानें देणें व घेणें विषय उत्पन्न झाला. पुढें त्या पुरुषास चोहींकडे गमन करण्याची इच्छा झाली, तेव्हां त्यास पाय उत्पन्न झाले. त्यांची देवता स्वतः विष्णु झाला. त्या पायांच्या गमनरूप क्रियेच्या योगानें लोक दर्भसमिधादि होमद्रव्यें मिळवितात. पुढें त्या विराट्पुरुषाला रतिसुखाची आणि अपत्यप्राप्तीची इच्छा झाली, त्या समयीं त्यास शिश्न उत्पन्न झालें. तेथें उपस्थ हें इंद्रिय आणि प्रजापति ही देवता उत्पन्न झाली, व त्या दोघांच्या आश्रयानें रतिसुख [illegible] झाला. नंतर त्या विराट्पुरुषाला, [illegible] अन्नांतील निःसत्त्व भागाचा [illegible] करण्याची इ[illegible] उत्पन्न झाली असतां, त्यास गुदद्वार [illegible] त्यास पायु हें इंद्रिय आणि मित्र [illegible] उत्पन्न झाली. नंतर त्या विराट्पुरुषाला [illegible] देहांतून दुसऱ्या देहांत जाण्याची इच्छा झाली, तेव्हां त्यास नाभिद्वार उत्पन्न झालें. तेथें अपान आणि मृत्यु हे उत्पन्न झाले. प्राण आणि अपान ह्या दोन वायूंचा संबंध नाभिस्थानीं असतो; तो संबंध तुटला कीं त्याला मृत्यु म्हणतात. नंतर विराट्पुरुषाला अन्नपानादिकांचा संग्रह करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्या कालीं त्यास अन्नाशय, आंतडीं व नाड्या हीं उत्पन्न झालीं. त्यांत नाड्यांच्या देवता नद्या आणि आंतड्यांची देवता समुद्र हीं उत्पन्न झालीं. त्या अन्नपानादिकांच्या योगानें मनाला संतोष आणि शरिराला पुष्टता प्राप्त होते. नंतर त्या विराट्पुरुषास आपल्या मायेचें चिंतन करण्याची इच्छा झाली, तेव्हां त्यास हृदय उत्पन्न झालें. तेथें मन हें इंद्रिय आणि चंद्र ही देवता उत्पन्न झाली. संकल्प व इच्छा हे त्या हृदयाचे विषय होत. त्या विराटपुरुषाच्या देहामध्यें त्वचा, चर्म, मांस, मज्जा, मेद, रक्त

१ यद्यपि अतिउष्णताही इंद्रियाचा ( त्वगिंद्रियाचा ) विषय आहे, तथापि त्याची ( जिघृक्षा ) इच्छा होत नाहीं; आणि म्हणूनच ह्या ठिकाणीं "किंचित् उष्णता" असें म्हटलें आहे.

आणि अस्थि हीं पृथ्वी, उदक आणि तेज ह्यांपासून उत्पन्न झालेलीं आहेत. आकाश, उदक आणि वायु ह्यांपासून प्राण उत्पन्न झाला. श्रोत्रादिक इंद्रियें हीं नेहमीं आपआपल्या शब्दादिक विषयांकडेच आकर्षिलेलीं असतात. ते शब्दादिक गुण अहंकारापासून उत्पन्न झालेले आहेत. हा अहंकार पंचमहाभूतांचेंही उत्पत्तिस्थान होय. मन हें कामक्रोधादिक विकारांचा आधार होय. तें स्वतः संकल्पविकल्पात्मक असल्यामुळें, त्यास त्याज्याज्या ज्याबद्दल निश्चय करितां येत नाहीं. त्याबद्दलचा निश्चय करणें हें बुद्धीचें कार्य असतें. ही बुद्धि कोणत्याही गोष्टीचा निश्चय करते; पण त्यामुळें, तिनें निश्चयानें ठरविलेलें [illegible] उत्तम असेलच, असा [illegible] नियम नाहीं. राजा, ह्याप्रमाणें ईश्वराचें हें [illegible]ळ स्वरूप तुला सांगितलें. हें स्वरूप पृथ्वी, उद[illegible], [illegible] वायु, आकाश, अहंकार, महत्तत्त्व आणि [illegible] हीं आठ आवरणांनीं वेष्टित आहे. भगवंताचें ह्याहून दुसरें एक सूक्ष्म रूप आहे. तें इंद्रियांस न दिसणारें, अस्पष्ट, निराकार, उत्पत्तिस्थितिलयशून्य असें केवळ एकरूप आहे.

हीं दोन्ही रूपें मायेपासून उत्पन्न झालीं असल्यामुळें, ज्ञानी पुरुष ह्या दोहोंसही सत्य मानीत नाहींत. हीं रूपें म्हणजे भगवंताची फक्त उपासना करण्याचीं साधनें होत. वस्तुतः तो परमात्मा कर्मरहित असून आपल्या मायेच्या योगानें ब्रह्मदेवाचें स्वरूप धारण करून कर्मयुक्त होतो, व देव, मनुष्य इत्यादिकांचीं नामवाचक, कर्मवाचक आणि रूपवाचक नांवें धारण करितो. राजा, दक्षादि प्रजापति, स्वायंभुवादि मनु, ऋषि, पितृगण, सिद्ध, चारण, गंधर्व, किन्नर, विद्याधर, असुर, गुह्यक, अप्सरा, पशु, हत्ती, सर्प, नाग, उरग, मातृगण, राक्षस, भूत, प्रेत, पिशाच, विनायक, कूष्मांड, उन्माद आणि वेताळ ह्या नांवाचे सर्व गण, यातुधान, ग्रह, पक्षी, वृक्ष, पर्वत, जरायुज, अंडज, स्वेदज, जलचर, स्थलचर नभश्चर इत्यादि सर्व स्वरूपें तो भगवान स्वतः आपल्या मायेच्या योगानें घेतो. राजा, ह्या ज्या उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशा तीन गति आहेत, त्या पुण्य, पुण्यपापमिश्रण आणि पाप ह्यांच्या योगानें प्राप्त होतात. त्यांत देवांची सात्त्विक म्हणजे उत्तम, मनुष्यांची राजस म्हणजे मध्यम, आणि नरकांतील जीवांची तामस म्हणजे कनिष्ठ गति समजावी. ह्या प्रत्येक गतींतही तीन तीन भेद आहेत कारण, प्रत्येक गुणामध्यें दुसऱ्या दोन गुणांचें मिश्रण झालें म्हणजे त्यापासून एक निराळ्याच प्रकारचा स्वभाव उत्पन्न होतो. राजा, तो जगत्पालक परमेश्वर तिर्यक्, मनुष्य अथवा देव ह्या योनींमध्यें अवतार घेतो, व धर्मस्वरूपानें जगाचें रक्षण करितो. वायु जसा उग्ररूप धरून आपणच रक्षण केलेल्या मेघांचा नाश करितो, त्याप्रमाणेंच तो परमेश्वर काळ, अग्नि, रुद्र इत्यादि रूपें धारण करून आपणच रक्षण केलेल्या सृष्टीचा संहार करितो. वेदामध्येंही त्याचें वर्णन ह्याप्रमाणेंच केलें आहे; परंतु ज्ञानी पुरुष त्यास केवळ अशा रूपानें चिंतीत नाहींत. कारण, हें कर्तृत्व वास्तविक त्याचें नव्हे; ईश्वराच्या ठिकाणीं जगाच्या कर्तृत्वाचा आरोप मायेच्या गुणांनीं आलेला आहे. श्रुतिही ह्याच पक्षाचें समर्थन करितात. राजा, ब्रह्मदेवाचा अंतावधि महाकल्प व त्याचा एक दिवस म्हणजे नित्यकल्प ह्यांचें संक्षिप्त वर्णन मीं तुला सांगितलें. आतां कालाचें सूक्ष्म व स्थूल मान, कल्पाचें लक्षण, त्याचे अवांतर प्रकार आणि मन्वंतरादि विभाग हें सर्व मी तुला विस्तारानें सांगेन. त्यामध्यें पाद्म नामक कल्पाचा सविस्तर वृत्तांत येईल.

शौनक म्हणाले:—सूता, त्वां पूर्वी सांगितलें कीं, विदुर आपल्या सर्वैश्वर्यसंपन्न गृहाचा त्याग करून वनांत गेला, आणि तीर्थयात्रेच्या निमित्तानें फिरत असतां मैत्रेयांची व त्याची गांठ

पडली; तर ती कोठें? व त्या समयीं त्या उभयतांचा जो अध्यात्मज्ञानविषयक संवाद झाला, तो कोणता? हे शांत पुरुषा, विदुरानें जे प्रश्न केले व त्यांस मैत्रेयांनीं जीं ज्ञानविषयक उत्तरें दिलीं, तीं सर्व आम्हांस सांग. तसेंच, विदुरास आपलें घर सोडून जाण्यास काय कारण झालें व तो घरीं परत कधीं आला, तें सर्व आम्हांस निवेदन कर.

सूत म्हणतात:—ऋषीहो, तुम्ही जो प्रश्न विचारिला, तसाच पूर्वी परीक्षितानें शुकाचार्यांस विचारिला होता. त्या वेळीं शुकांनीं जें उत्तर दिलें, तेंच क्रमशः मी तुम्हांला सांगतों.



# श्रीमद्भागवत.

## तृतीयस्कंध.

### अध्याय पहिला.

—:०:—

#### विदुरानें गृहत्याग करण्याचीं कारणें.

शुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, विदुर आपल्या गृहाचा त्याग करून वनांत गेला त्या वेळीं, आतां तूं जसा मला प्रश्न विचारिलास, तसाच प्रश्न त्यानेंही मैत्रेय ऋषींस विचारिला होता. राजा, विदुराच्या घराचें माहात्म्य काय वर्णन करावें? प्रत्यक्ष जगन्नायक श्रीकृष्ण हा पांडवांकडून कौरवांकडे सामानिमित्त शिष्टाई करण्यास हस्तिनापुरीं आला असतां, तो दुर्योधनाकडे न जातां आपण होऊन विदुराच्या घरीं गेला: इतकें तें घर त्याला आपलेंसें वाटत होतें!

परीक्षित राजा म्हणाला:—अहो आचार्य, विदुराची व मैत्रेय ऋषीची गांठ कशी व कोठें पडली, आणि त्या उभयतांचें संभाषण काय झालें, हें कृपा करून मला सांगा. महाराज, विदुरासारख्या निर्मलांत:करणाच्या पुरुषाचा प्रश्न व त्यावर मैत्रेयांसारख्या श्रेष्ठ महर्षींचें उत्तर हीं दोन्ही शुष्क असण्याचा संभवच नाहीं.

सूत म्हणतात:—ऋषीहो, जे ज्ञानी असतात, त्यांस जिज्ञासूनें प्रश्न केला असतां आल्हाद वाटणें साहजिकच आहे. त्या नृपश्रेष्ठाचा हा प्रश्न ऐकून शुकाचार्यांस फार संतोष झाला, व त्यांनीं त्याचें उत्तर देण्यास आरंभ केला.

शुकाचार्य म्हणाले:—राजा, विदुरानें आपल्या गृहाचा त्याग केला, त्याचीं अनेक कारणें होतीं: ज्याचे केवळ चर्मचक्षुच नव्हत, तर ज्ञानचक्षुही नष्ट झाले होते, त्या धृतराष्ट्रानें कुमार्गरत अशा आपल्या पुत्रांचें अन्यायानें पालन करून, आपला कनिष्ठ बंधु जो पांडु त्याच्या मरणामुळें अनाथ व दीन झालेल्या त्याच्या पुत्रांस लाक्षागृहांत कोंडून जाळण्याचा प्रयत्न केला. तसेंच, त्या सन्मार्गवर्ती पांडवांची पत्नी म्हणजे धृतराष्ट्राची प्रत्यक्ष स्नुषा द्रौपदी ही रजस्वला असल्यामुळें एकाम्बरा असतांही ज्या वेळीं दुर्योधनाच्या आज्ञेवरून दुष्ट दु:शासनानें तिची वेणी धरून भरसभेंत तिला फरफर ओढीत आणिलें, त्या वेळीं अति दीन होऊन ती एकसारखी अश्रु ढाळीत असतांही, धृतराष्ट्रानें आपल्या पुत्रांच्या त्या दुष्कृतीचें निवारण केलें नाहीं! त्याप्रमाणेंच, धर्मराज हा अत्यंत सरळ स्वभावाचा असून दुर्योधनानें त्याला कपटद्यूतानें जिंकिलें; व तो अजातशत्रु राजर्षि, प्रतिज्ञेप्रमाणें आपली वनवासाचीं तेरा वर्षें संपवून घरीं परत आल्यानंतर आपल्या राज्याचा योग्य भाग मागूं लागला, परंतु धृतराष्ट्रानें आपल्या पुत्रांच्या मोहास्तव तो त्यास दिला नाहीं. राजा, विनाशकाल समीप आला म्हणजे विपरीत बुद्धि प्राप्त होते म्हणून जें म्हणतात, तें अगदीं अक्षरश: खरें आहे. सामनिमित्त आलेल्या भगवान श्रीकृष्णाचीं अमृततुल्य अशीं बोधपर वचनें ज्या अर्थीं त्यास रुचलीं नाहीत, त्या अर्थीं पुण्याचा लेश सुद्धां त्याच्या पदरीं उरला नव्हता हेंच खरें! परीक्षिता, विदु-

राची योग्यता म्हणजे कांहीं सामान्य नव्हती. पांडवांना राज्यभाग देण्याच्या बाबतींत दुष्टबुद्धि धृतराष्ट्रानें त्याची मसलत विचारली असतां विदुरानें धृतराष्ट्रास जो उपदेश केला, त्याचें महत्त्व एवढें आहे कीं, 'विदुरनीति' ह्या नांवानें तो उपदेश अजरामर होऊन राहिला आहे. राजा,

### विदुराच्या उपदेशाचा तात्पर्यार्थ

मी तुला सांगतों: विदुर म्हणाला, "राजा धृतराष्ट्रा, धर्मराज आपला योग्य भाग मागत असतां तो तूं त्याला द्यावास हें उचित होय. त्या श्रेष्ठ पुरुषानें तुझे अनंत अपराध सहन केले आहेत. तसेंच, डंवचलेला सर्प जसा क्रोधानें फुस्कारे टाकीत दंश करण्याची संधि पहात असतो, तसा तुमच्या अन्यायाचरणानें संतप्त झालेला भीम आपल्या अर्जुनादि बंधूंसहवर्तमान कौरवांच्या नाशाकरितां उत्सुक होत्साता योग्य संधीची वाट पहात आहे. त्याच्या त्या क्रोधरूपी प्रज्वलित अग्निकुंडांत तुझ्या पुत्रादिकांची केव्हां आहुति पडेल ह्याचा नियम नाहीं. शिवाय, पांडवांना द्वारकावासी भगवान श्रीकृष्णाचा आश्रय आहे. राजा, हा श्रीकृष्ण म्हणजे प्रत्यक्ष परब्रह्म होय. देव, ब्राह्मण ह्यांना दुष्ट लोकांकडून अति ताप होऊं लागल्यामुळें त्यांच्या दुःखनिवारणार्थ भगवंतानें हा अवतार धारण केला आहे. त्यानें आजपर्यंत अनेक दुष्ट राक्षसांचा व राजांचा वध करून पृथ्वीचा भार हरण केला आहे; आणि देव, ब्राह्मण ह्यांस संतुष्ट केलें आहे. धृतराष्ट्रा, तूं आजपर्यंत ज्याचें उत्तम प्रकारें लालनपालन केलेंस, तो हा तुझा प्रियपुत्र दुर्योधन केवळ तुझा कुलक्षय करण्याकरितां मूर्तिमान दोषच तुझ्या घरांत अवतरला आहे! ह्यास्तव, सर्वांच्या कल्याणाकरितां तूं ह्याचा एकदम त्याग कर, व धर्मराजाचा न्याय्य भाग त्यास दे. असें न केलेंस तर, कृष्णद्वेषरूपी स्वतःच्या दुराचरणानेंच हा दुर्योधन जसा नष्टप्राय झाला आहे, तसा तूंही होऊन नाश पावशील."

शुकाचार्य म्हणाले:—राजा, विदुरानें जो इतक्या कळकळीनें सदुपदेश केला, तो कर्ण, दुःशासन, शकुनि इत्यादिकांस मुळींच रुचला नाहीं. त्यांनीं त्याचा उपहासपूर्वक धिक्कार केला. दुर्योधन तर क्रोधानें अगदीं संतप्त झाला. त्याचे नेत्र आरक्त झाले, व ओंठ थरथर कांपूं लागले. अशा स्थितींतच तो म्हणाला, "अहो, ह्या कुटिल दासीपुत्राला येथें कोणी बोलाविलें! हा कृतघ्न आमचेंच अन्न खाऊन आमच्या प्रतिस्पर्ध्यांचें साहाय्य करूं पहात आहे! ह्या नीचाला आतांच्या आतां नगराबाहेर घालवून द्या." राजा परीक्षिता, शल्याप्रमाणें अंतःकरण विदीर्ण करणारे हे वाग्बाण लागतांच विदुर तसाच उठला, व हें सर्व ईशचरित्र आहे असें मानून त्यानें राजद्वारांतच आपल्या हातांतील धनुष्य ठेविलें, व तो तीर्थयात्रा करण्याकरितां निघून गेला. राजा, कौरवांच्या पूर्वपुण्याईमुळेंच त्यांस विदुरासारखें रत्न लाभलें होतें; परंतु पुण्यांश क्षीण होतांच त्यांना विपरीत बुद्धि होऊन त्यांनीं त्याचा अव्हेर केला; असो.

### विदुराची तीर्थयात्रा.

इकडे विदुर जो निघाला, तो तीर्थाटन करीत करीत भगवन्मूर्तींचीं दर्शनें घेत चालला. मार्गांत जा सरोवरें, नद्या, तीर्थें, तशींच अटव्यरण्यें, कुंजउपवनें लागतील, त्या प्रत्येक ठिकाणीं स्नान करून ती शोभा पहात पहात पुढें जावें, असा त्यानें नित्यक्रम ठेविला. राजा परीक्षिता, त्या प्रवासांत, प्रतितीर्थीं स्नान करणें, पवित्र अन्नाचें नियमितपणें सेवन करणें, वल्कलें व मौनव्रत धारण करून राहणें, आणि भूमीवर शयन करणें अशी त्याची दिनचर्या होती; त्यामुळें त्यास कोणींही ओळखिलें नाहीं. अशा रीतीनें फिरतां फिरतां विदुर प्रभासक्षेत्रीं आला. राजा, तो प्रभा-

सक्षेत्रीं येई तोंपर्यंत जो काळ लोटला, त्या अवधींत भारतीयुद्ध समाप्त होऊन धर्मराज निष्कंटक असें एकछत्री राज्य चालवूं लागला होता. प्रभासक्षेत्रीं आल्यावर विदुरास कौरवांच्या नाशाचें वर्तमान समजलें. त्या कालीं त्यास फार दुःख झालें. तेव्हां तो तसाच तेथून निघाला, व सरस्वती नदीच्या उगमाकडे चालला. वाटेनें त्यास त्रित, शुक, मनु, पृथु, अग्नि, सुदास, श्राद्धदेव, असित, वायु, गो व गुह हीं पुण्यक्षेत्रें लागलीं. त्यानें त्या प्रत्येक ठिकाणीं स्नान करून, त्या त्या प्रदेशीं अनेक ऋषींनीं व देवांनीं स्थापन केलेल्या विष्णुमूर्तींचीं दर्शनें घेतलीं. राजा, त्या विष्णुमंदिरांवर जीं सुदर्शनाचीं वगैरे चिन्हें होतीं, तीं पाहून विदुरास क्षणोक्षणीं भगवंताचें स्मरण होई. ह्याप्रमाणें तो सौराष्ट्र, सौवीर, मत्स्य, कुरु, जांगल इत्यादि प्रदेश पहात पहात यमुनेच्या तीरास आला; तों तेथें श्रीकृष्णाचा परमभक्त उद्धव ह्याची गांठ पडली. राजा, उद्धव हा नीतिशास्त्रांत अतिनिपुण असून प्रत्यक्ष बृहस्पतीचा शिष्य आणि श्रीकृष्णाचा तर केवळ प्राणच होता. तेव्हां तो भेटतांक्षणींच विदुरानें त्यास सप्रेम आलिंगन दिलें, व आपल्या आप्तेष्टांचें कुशल विचारिलें.

### विदुराचे उद्धवास प्रश्न.

विदुर म्हणाला:—उद्धवा, ब्रह्मदेवानें प्रार्थना केल्यामुळें भूभार हरण करून सर्व लोकांस सुखी करण्याकरितां परमात्म्यानें राम–कृष्ण अवतार घेतले आहेत, ते उभयतां आपल्या द्वारका नगरींत सुखानें वास्तव्य करीत आहेतना? आमचा सन्मान्य व जिवलग मित्र वसुदेव खुशाल आहेना? उद्धवा, वसुदेवाचें औदार्य काय वर्णन करावें! त्यानें केवळ आपल्या बहिणींसच नव्हे, तर त्यांच्या नवऱ्यांनाही इच्छित वस्तु देऊन संतुष्ट केलें. उद्धवा, जो पूर्वजन्मींचा मदन असून, ह्या जन्मीं ब्राह्मणांच्या आराधनेनें श्रीकृष्णास रुक्मिणीच्या ठिकाणीं प्राप्त झाला आहे, तो यादवांचा सेनापति वीर प्रद्युम्न सुखी आहेना! सात्वत, वृष्णि, दाशार्ह, भोज ह्या प्रसिद्ध कुलांचा अधिपति उग्रसेन–ज्याला श्रीकृष्णानें स्वतः राज्याशा सोडून सिंहासनावर बसविलें–त्याचें कुशल आहेना? उद्धवा, अनेक व्रतांच्या व नियमादिकांच्या योगानें जो जांबवतीच्या उदरीं जन्मास आला, व जो पूर्वजन्मीं स्वामी कार्तिकेय होता, तो श्रीकृष्णाची केवळ अपरप्रतिमाच असा सांब सुखरूप आहेना? त्याप्रमाणेंच, अर्जुनापासून ज्यास रहस्यांसह धनुर्वेदाची प्राप्ति झाली, आणि मोठमोठ्या योग्यांनाही दुर्लभ जें ब्रह्मज्ञान, तें श्रीकृष्णसेवेनें ज्यास अनायासें मिळालें, त्या सात्यकीचें क्षेम आहेना? उद्धवा, अक्रूराचें श्रीकृष्णाच्या ठिकाणीं अलौकिक प्रेम आहे;—इतकें कीं, श्रीकृष्णाला मथुरेस नेण्याकरितां तो गोकुळांत आला असतां, श्रीकृष्णाचीं पावलें धुळींत उमटलेलीं पाहून त्याचें लौकिकभान सुटून गेलें व तो त्या धुळींत गडबडां लोळूं लागला!—बा सौम्या, त्या अक्रूराचेंही कुशल आहेना? उद्धवा, ऋक्, यजु व साम ह्या वेदत्रयीमध्यें वर्णन केलेल्या विस्ताररूप यज्ञफळासारखें जिनें आपल्या उदरांत भगवान विष्णूचा अवतार जो श्रीकृष्ण त्यास धारण केलें, व म्हणून जिला देवमाता अदिति हिचें व वेदत्रयीचें साम्य प्राप्त झालें आहे, ती देवकी सुखी आहेना? विद्वान लोक ज्याला शब्दाचें[1] कारण मानितात, तो भगवान अनिरुद्ध क्षेम आहेना? त्याप्रमाणेंच, श्रीकृष्णाच्या ठिकाणीं दृढ प्रेम ठेवून त्यास अनुसरून वागणारे चारुदेष्ण, भानु, गद व हृदी-

१ अंतःकरणाचीं विभागरूप तत्त्वें चित्त, अहंकार, बुद्धि व मन हीं चार असून, ह्यांच्या देवता अनुक्रमें वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध ह्या होत. कोणत्याही विषयाची प्रथम मनाच्या ठिकाणीं प्रवृत्ति झाल्याशिवाय शब्दस्फूर्ति होत नाहीं, म्हणून अनिरुद्धास शब्दाचें कारण म्हटलें आहे

कादि मंडळी सुखानें नांदत आहेतना? उद्धवा, ज्याच्या राज्यैश्वर्याकडे पाहून व ज्यास अनेक ठिकाणीं मिळालेल्या जयांचें स्मरण होऊन दुर्योधनास फार संताप उत्पन्न झाला, तो धर्मराज, धर्ममर्यादांचें उत्तम पालन करून अर्जुन व श्रीकृष्ण ह्यांसह सुखानें राज्य करीत आहेना? उद्धवा, गदायुद्धांत अति प्रवीण असून ज्यास दहा हजार हत्तींचें बळ आहे, व युद्धसमयीं क्रोधाविष्ट होऊन रणांगणावर संचार करूं लागला असतां ज्याच्या पायांच्या आघातानें पृथ्वी कंपायमान होते, त्या शूर भीमानें आपल्या क्रोधरूप अग्निकुंडांत शत्रूंची आहुति देऊन आपल्या क्रोधाचा उपशम केलाना? सर्व रथ्यांमध्यें श्रेष्ठ असा जो गांडीवधारी धनुर्धर पार्थ, त्यानें युद्धामध्यें आपल्या सर्व शत्रूंचा नाश केलाना? बा उद्धवा, त्या महापराक्रमी वीरानें त्या किरातवेषधारी शंकरास सुद्धां आपल्या युद्धकौशल्यानें आश्चर्यभरित करून सोडिलें; व त्याचा प्रसाद जोडिला! उद्धवा, पापण्या जशा नेत्रांचें संरक्षण करितात, तसे धर्म, भीम व अर्जुन हे ज्यांचें रक्षण करितात, ते उभयतां माद्रीपुत्र नकुल व सहदेव, शत्रूपासून आपलें राज्य घेऊन आनंदानें कालक्रमण करीत आहेतना? रथामध्यें बसून, कोणाचेंही साहाय्य न घेतां केवळ धनुष्याच्या बळावर ज्यानें चारही दिशा जिंकिल्या, त्या नृपश्रेष्ठ पांडुराजाची पत्नी कुंती—जी त्या राजर्षीच्या पश्चात् केवळ लहान मुलांकरितांच जिवंत राहिली, व सांप्रत जिची ग्रहदशा दूर झाली आहे, ती—हस्तिनापुरीं सुखानें वास करीत आहेना? उद्धवा, आपल्या मृत भावाच्या पुत्रांचें यथायोग्य संगोपन न करितां, त्यांविषयीं द्रोह धारण करणारा धृतराष्ट्र व्यर्थ अधोगतीला जाणार ह्याबद्दल, आणि त्यानें मी हितबुद्धि सांगत असतां मला आपल्या दुष्ट पुत्रांच्या नादानें हस्तिनापुरांतून काढून लावलें ह्याबद्दल फार वाईट वाटतें. सारांश, धृतराष्ट्राला जशी आपल्या मृत भावाबद्दल आस्था नाहीं, तशी मजविषयींही नाहीं; म्हणून, मनुष्यरूप धारण करून लोकांच्या दृष्टीला मोह पाडणाऱ्या श्रीकृष्णाच्या सत्स्वरूपास त्याच्याच कृपाप्रसादानें ओळखून, मी गुप्तपणें पृथ्वीच्या पाठीवर संचार करितों. उद्धवा, ज्यांची दृष्टि सामान्य आहे, त्यांस ह्या जगांतील सर्व व्यवहार म्हणजे केवळ घोंटाळे आहेतसें वाटून फार आश्चर्य होतें; पण आत्मज्ञानामुळें मला त्यांचें कांहींच वाटत नाहीं. शिवाय, मला तर असें वाटतें कीं, विद्या, धन व थोर कुलीं जन्म ह्यांनीं उन्मत्त होऊन कुमार्गाचरण करणाऱ्या राजांचा भार पृथ्वीस असह्य झाला, व सत्पुरुषांस फारच पीडा होऊं लागली, म्हणून तो भूभार हरण करून आपणांस शरण आलेल्या सज्जनांचें दुःख हरण करावें, एवढ्याच हेतूनें श्रीकृष्णानें कौरवांचे सर्व अपराध सहन करून त्यांचें तत्काळ शासन न करितां, भारतीयुद्धमिषानें सर्व दुष्टांचें एकदम निर्दालन केलें. भगवंताचे अवतार दुष्टांचा नाश करून साधूंस सुख देण्याकरितांच असतात. तो स्वतः जन्मरहित असून अवतार घेतो, ह्याचें कारण हेंच कीं, त्या योगानें सामान्य जनांची सदाचरणाकडे प्रवृत्ति व्हावी; असें जर नसेल, तर त्रिगुणातीत अशा आत्मस्वरूपाच्या आनंदांत निमग्न असलेल्या पुरुषास देहादि उपाधि धारण करून कर्माचरणाची उठाठेव करण्याचें प्रयोजन काय! ह्याकरितां, मित्रा उद्धवा, वेदाच्या आज्ञा एकनिष्ठपणें पालन करणाऱ्या लोकांचें व शरणागतांचें रक्षण करून त्यांचें कल्याण करण्याकरितां ज्या श्रीकृष्णानें यदुकुलांत अवतार धारण केला आहे, त्याचें सर्व वृत्त मला निवेदन कर.

# अध्याय दुसरा.

—:०:—

## उद्धवाचीं विदुरास उत्तरें.

शुकाचार्य म्हणाले:—राजा, विदुरानें ह्याप्रमाणें प्रश्न केले असतां उद्धवाचा कंठ भरून आला, व श्रीकृष्णमूर्तीचें स्मरण होऊन प्रेमातिशयामुळें त्याच्या नेत्रांतून एकसारखा अश्रूंचा प्रवाह सुरू झाला; आणि त्यामुळें त्याच्यानें विदुरास एकदम उत्तर देववलें नाहीं. राजा, उद्धवाची श्रीकृष्णाचे ठिकाणीं अकृत्रिम प्रीति होती. लहानपणीं पांच वर्षांचा असतां एके दिवशीं खेळतांना त्यानें श्रीकृष्णपूजा आरंभिली, इतक्यांत त्याच्या मातेनें त्यास सकाळच्या भोजनास हांक मारिली; त्या कालीं श्रीकृष्णपूजन सोडून तो उठला नाहीं! इतकी ज्याची बालपणापासूनच श्रीकृष्णाचे ठिकाणीं निष्ठा, त्याचें सर्व आयुष्य श्रीकृष्णसेवेंत गेल्यानंतर, विदुरानें श्रीकृष्णाविषयीं प्रश्न केला असतां त्याचा कंठ दाटून यावा, व श्रीकृष्णस्मरणामुळें सद्गदित होऊन त्याच्या मुखांतून एक अक्षरही निघूं नये ह्यांत नवल तें काय! असो. भगवच्चरणामृताचें सेवन करितांना सर्व देहभाव विसरून उद्धव त्या आनंदांतच तल्लीन झाला, त्याच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले, व तो आपले नेत्र मिटून तटस्थ बसला. तेव्हां उद्धवाच्या अगाध भक्तीचें विदुरास फारच कौतुक वाटलें, व तो कृतार्थ झाला असा निश्चय होऊन त्याची उद्धवाविषयीं आदरबुद्धि फारच वाढली. अशा स्थितींत कांहीं वेळ गेल्यानंतर उद्धव पूर्वस्थितीवर आला, व नेत्र उघडून विस्मयाच्या भरांत विदुराशीं बोलूं लागला.

उद्धव म्हणाला:—विदुरा, कालगतीला वश होत्साता श्रीकृष्ण निजधामास गेल्यामुळें, सूर्यास्तानंतर अंधकारमय झालेल्या पृथ्वीप्रमाणें त्या सौभाग्यहीन झालेल्या द्वारकेंतील लोकांचें कुशल म्यां काय सांगावें! बा विदुरा, मला हा सर्व भूलोक भाग्यहीन दिसत आहे; त्यांत यादव तर फारच. कारण, श्रीकृष्णाचा नेहमीं सहवास घडूनही त्यांस त्याच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें नाहीं! क्षीरसमुद्रांत जेव्हां चंद्र होता, तेव्हां हा आमच्याचपैकीं एक सुंदर प्राणी आहेसें तेथील जलचरांस वाटलें; पण चंद्राचें खरें स्वरूप जसें त्यांस कळलें नाहीं, तसेंच हें झालें! वस्तुतः यादव म्हणजे अज्ञानी होते अशांतला प्रकार नव्हे. ते समंजस व प्रौढ विचाराचे असून श्रीकृष्ण व ते नेहमीं मौजेनें रहात; तरी सुद्धां त्यांस त्याची ओळख न पटून, हा आम्हांपैकींच एक श्रेष्ठ यादव आहे, इतकेंच तें मानीत. दुसरे जे शिशुपालादि राजे होते, ते तर नेहमीं कृष्णाचा द्वेष व निंदा करीत; पण त्या त्यांच्या आचरणानें माझ्या बुद्धीस मुळींच मोह पडला नाहीं. कारण त्यांची योग्यता मी पूर्णपणें जाणून होतों. विदुरा, ज्या लोकांच्या हातून तपाचरण घडलें नाहीं, त्यांस सगुणरूपानें दर्शन देण्याकरितां भगवंतानें हा अवतार घेतला, व त्या अनुपम स्वरूपाचें दर्शन घेण्याची लोकांची लालसा कमी झाली नसतांही त्यानें आपलें तें स्वरूप ह्या लोकांतून गुप्त केलें; आणि त्या योगें त्यानें लोकांच्या चित्तवृत्ति हरण करून नेल्या! तें स्वरूप योगमायेचें बळ दाखविणारें, भूलोकीं मनुष्यासारख्या लीला करण्यास योग्य, प्रत्यक्ष श्रीकृष्णासही आश्चर्य उत्पन्न करणारें, सौंदर्य व ऐश्वर्य ह्यांची केवळ खाणच, आणि कौस्तुभादि अलंकारांस सुद्धां शोभा आणणारें असें होतें! धर्मराजाच्या राजसूय यज्ञांत दृष्टीस आनंद देणारें भगवंताचें तें स्वरूप पाहून त्रिभुवनांतील सर्व लोकांस वाटलें कीं, ही मूर्ति निर्माण करण्यामध्यें विधात्याचें सर्व चातुर्य संपलें! विदुरा, श्रीकृष्णाच्या दर्शनाविषयीं गोकुलवासी स्त्रिया फार उत्सुक असत; व श्रीकृष्णही हास्य, लीला, सप्रेम अवलोकन

इत्यादिकांच्या योगानें त्यांचा सत्कार करी; आणि तो वनांत जाऊं लागला असतां त्या इतक्या भांबावून जात कीं, श्रीकृष्णस्वरूपीं निश्चल दृष्टि लागल्यामुळें त्यांच्या हातांतील कामें जशींचीं तशींच रहात! विदुरा, ईश्वर जन्मरहित असूनही तो अवतार घेतो ह्याचें कारण असें कीं, परमात्म्याचीं रूपें शांत व अशांत अशा दोन प्रकारचीं आहेत; देव आणि साधुजन हीं त्याचीं पहिल्या प्रकारचीं रूपें असून दैत्यादि दुष्ट पुरुष हीं त्याचीं दुसऱ्या प्रकारचीं रूपें होत; जेव्हां दुष्टांकडून देवादिकांस पीडा होते, तेव्हां त्यांची दया येऊन, त्यांच्या दुःखाचा परिहार करण्याकरितां भगवान प्रकृतीशीं युक्त होऊन अवतार धारण करितो. घर्षणाच्या योगानें उत्पन्न झालेला अग्नि काष्ठादिकांत स्पष्ट दिसतो, परंतु तो तसा दिसण्यापूर्वी अस्तित्वांत नसतो, असें मात्र म्हणतां येणार नाहीं; तो पंचमहाभूतात्मक असल्यामुळें सर्व जग व्यापून असतोच—अर्थात् त्याचें दृश्य स्वरूप कांहीं नवें नाहीं; त्याचप्रमाणें, सर्व जग व्यापून राहणारा जो परमेश्वर, त्यानें जरी दृश्य स्वरूप धारण केलें, तरी त्याचें नवीन जन्म झालें असें मुळींच म्हणतां येत नाहीं—तो जन्मरहितच आहे हें उघड होय. विदुरा, श्रीकृष्ण हा जन्मरहित असूनही त्यानें वसुदेवाच्या घरीं जन्मास आल्याचें मिष केलें. तसेंच, तो अनंतवीर्य प्रभु कंसादिकांच्या भयानें गोकुळांत जाऊन राहिला; व कालयवनास भ्याल्याचें मिष करून पळून गेला ह्या गोष्टींचें स्मरण झालें म्हणजे मला दुःख होतें. अरेरे! तो मथुरेंत आल्यावर वसुदेव व देवकी ह्यांस नमस्कार करून म्हणाला कीं, 'कंसाच्या भयामुळें आम्ही गोकुळांत जाऊन राहिलों, ह्या कारणानें आम्हांकडून तुमची सेवा झाली नाहीं, ह्याबद्दल वाईट वाटूं देऊं नका!' विदुरा, कृष्णाचें हें दीनासारखें भाषण ऐकून मला अनिर्वाच्य खेद होत आहे! विदुरा, ह्या-वरून कदाचित् तूं असें म्हणशील कीं, असें ज्याचें दीनासारखें वर्तन, त्यास सर्वेश्वर कसें म्हणावें? तर नसें मात्र नव्हे हो! कारण, भुंवई किंचित् वक्र करून ज्यानें आपल्या लीलेनेंच पृथ्वीचा भार हरण केला, तो ईश्वर नव्हे, असें कसें म्हणतां येईल? व त्याच्या पादारविंदीं दंग झालेला जीव त्यापासून कसा विमुख होईल बरें? श्रीकृष्णाचें ईश्वरत्व उदाहरणें अथवा प्रमाणें देऊन सिद्ध करण्याची मुळींच गरज नाहीं. कारण, तें सर्वांच्या निदर्शनास आलेंच आहे. पहा—धर्माच्या राजसूय यज्ञांत श्रीकृष्णाचा द्वेष करणाऱ्या शिशुपालालाही उत्तम गति मिळाली! विदुरा, ती गति म्हणजे सामान्य नव्हे. मोठमोठे योगी सुद्धां जिच्या प्राप्तीकरितां योगादि तीव्र नियमांचें आचरण करितात, ती ती होय. आपल्या मित्रांच्या उपयोगीं पडणारे पुष्कळ असतात, परंतु आपल्या शत्रूंवर उपकार करणारे विरळा. तेव्हां शत्रूंवरही उपकार करणाऱ्या अशा त्या लोकोत्तर श्रीकृष्णाचा विरह कोणास सहन होईल! भारतीयुद्धांत जे जे वीर मरण पावले, ते ते सर्व मुक्त झाले. कां कीं, अर्जुनाच्या शस्त्रप्रहारानें त्यांचे देह पवित्र झाले असून, मरणसमयीं त्यांस प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णाचें दर्शन घडलें! बा विदुरा, ज्या श्रीकृष्णाची एवढी अलौकिक थोरवी, तो कांहीं प्रसंगीं फार दीनपणानें वागला ह्याबद्दल मला अतिशय वाईट वाटतें. त्या श्रीकृष्णाविषयीं तात्त्विक विचार केला असतां, त्याचें महत्त्व केवळ अवर्णनीय होय, अशी खातरी होते. सर्व त्रिभुवन धुंडाळिलें तरी ज्याच्या बरोबरीचा पुरुष सांपडावयाचा नाहीं; जो त्रैलोक्याचा स्वामी, परमानंदसुखाचा उपभोग घेत असल्यामुळें ज्याचे सर्व मनोरथ पूर्ण झालेले होते, आणि इंद्रादि लोकपाल सुद्धां आपलीं मस्तकें नम्र करून त्यांवरील मुकुटांनीं ज्याच्या चरणांचें पूजन करीत, तो परमभाग्यवंत भगवान श्रीकृष्ण हा उग्रसेन राजापुढें सेवका-

सारखा उभा राहून ललकारणी देत असे, ह्याचें मला अत्यंत वाईट वाटतें. विदुरा, अशा रीतीनें श्रीकृष्ण सेवकासारखा वागला, ह्यावरून उग्रसेनावर त्याची मोठीच कृपा होती असें दिसून येतें. अरे, श्रीकृष्णाचा स्वभाव किती दयाळु होता म्हणून सांगूं! एकदा, त्याचा प्राण घेण्याच्या उद्देशानें आपल्या स्तनांत विष भरून पूतना राक्षसीनें त्यास तें पाजिलें. परंतु त्या अपराधाबद्दल तिला शासन न करितां, यशोदेला उचित जी सद्गति तीच तिला श्रीकृष्णानें दिली. तेव्हां, विदुरा, अशा भगवंताव्यतिरिक्त आपण दुसऱ्या कोणास शरण जावें? ज्यांनीं श्रीकृष्णाची भक्ति केली, तेच मात्र उद्धरून गेले असें नव्हे; तर ज्यांनीं श्रीकृष्णाचा द्वेष करून अहर्निश विरोध मांडिला, तेही युद्धामध्यें श्रीकृष्णमूर्तीच्या दर्शनानें मोक्षपदास प्राप्त झाले. विदुरा, श्रीकृष्ण निजधामास गेल्याचा सविस्तर वृत्तांत मी तुला सांगणार आहें; पण त्यापूर्वी त्याचें जन्मादि वृत्त संक्षेपानें सांगतों, तें चित्त देऊन ऐक.

## श्रीकृष्णाचें संक्षिप्त चरित्र.

उद्धव म्हणाला:—हे कुरुश्रेष्ठा, श्रीकृष्ण हा मथुरेमध्यें कंसाच्या कारागृहांत जन्मास आला. पृथ्वीचा भार हरण करून तिचें कल्याण करण्याकरितां अवतार घेण्याविषयीं ब्रह्मदेवानें भगवंताची प्रार्थना केल्यावरून भगवंतानें हा अवतार वसुदेव देवकीच्या उदरीं घेतला. कंसानें पूर्वीचीं सर्व मुलें मारून टाकिलीं, त्याप्रमाणें तो ह्याचाही घात करील, असें भय वाटून वसुदेवानें त्यास गोकुळांत पोहोंचविलें. त्या ठिकाणीं गेल्यावर, आपलें तेज प्रकट न करितां बलरामासह तो अकरा वर्षेपर्यंत तेथें राहिला. तो सर्वव्यापी श्रीकृष्ण गोपाळांसह यमुनेच्या तीरावरील उपवनांत क्रीडा करीत असतां, पक्ष्यांच्या किलबिल आवाजानें तें अगदीं गजबजून गेलेलें असे. त्या उपवनांत संचार करीत असतां, श्रीकृष्णाची मुद्रा पाहून सिंहाच्या छाव्याचा भास होई. उद्धवा, त्याच्या

### बाललीला

फारच मोहक असत. त्या कितीही पाहिल्या तरी गोकुळांतील लोकांस त्या आणखी आणखी पहाव्या, असें वाटे. कधीं कधीं त्यानें रडत असावें, तर कधीं कधीं हंसतच सुटावें; परंतु त्याचें रडणें किंवा हंसणें वास्तविक नसे. तें केवळ मौजेखातर असे. त्याच्या गाई व बैल फार सुंदर दिसत. त्यांचा रंग दुधासारखा पांढरा शुभ्र होता. गाई चारीत वनांत फिरत असतां आपला वेणु वाजवून तो गोपाळांस रंजवीत असे. कंसानें त्याच्या नाशाकरितां पाठविलेल्या मायावी राक्षसांस त्यानें पुष्कळ वेळां इकडून तिकडे फेंकावें व मारून टाकावें, हा त्याचा नेहमींचा क्रम असे. लहान मुलें जशीं आपल्या खेळांतील चित्रांशीं खेळतात, तसा तो अपार सामर्थ्यवान श्रीकृष्ण त्या राक्षसांशीं खेळे व त्यांचा नाश करी. एकदा यमुनेचें विषारी पाणी पिऊन गोपाळ, गाई व वासरें हीं जेथल्या तेथेंच मरून पडलीं; तेव्हां त्यानें यमुनेच्या डोहांत असलेल्या कालिया सर्पाचें दमन करून त्यास तेथून घालवून दिलें; व मरून पडलेल्या गाई, गोपाल व वासरें ह्यांजकडे कृपादृष्टीनें अवलोकन करून त्यांस जिवंत केलें, आणि निर्विष झालेलें यमुनेचें जल त्यांस पुन: पाजिलें. गोकुळांत दर वर्षी इंद्रोत्सव करण्याचा प्रघात असे. एके वर्षी, श्रीकृष्णानें इंद्राचा गर्व परिहार करण्यासाठीं, तो उत्सव न करतां पुष्कळ विद्वान ब्राम्हण बोलावून गोवर्धन व गाई ह्यांची पूजा करविली. त्या प्रसंगीं त्यानें आपल्या ऐश्वर्यानुरूप मोठा समारंभ केला, आणि अशा रीतीनें नंदाच्या धनाचा सद्व्यय करविला. विदुरा, इंद्राचा असा अवमान झाल्यामुळें त्यास फार क्रोध येऊन तो गोकुलावर भयंकर वृष्टि करूं लागला. तें पाहतांच तेथील सर्व लोक घाबरून गेले. तेव्हां श्रीकृष्णानें

गोवर्धन पर्वत उचलून त्याखालीं त्या सर्वांचें रक्षण केलें. विदुरा, अशी त्याची गोकुलावर कृपा होती. एवढा मोठा गोवर्धन पर्वत श्रीकृष्णानें उचलून धरिला, परंतु त्यास श्रम म्हणून मुळींच वाटले नाहींत; जणूं काय त्यानें आपल्या डोक्यावर छत्रीच धरली होती! शरदृतूंतील चांदण्या रात्रींस, आपल्याबरोबर गोपस्त्रियांचा समुदाय घेऊन तो आनंदानें क्रीडा करी. त्या वेळीं त्या स्त्रियांच्या मधुर गायनानें त्यास परम अल्हाद वाटत असे. श्रीकृष्णाशीं क्रीडा करीत असतां, त्याच्या योगानें तो स्त्रीसमाज अनुपम शोभिवंत दिसत असे.

## अध्याय तिसरा.

—:०:—

### श्रीकृष्णाचें संक्षिप्त चरित्र.

( पुढील वृत्तांत. )

उद्धव म्हणालाः—विदुरा, याप्रमाणें गोकुळांत अनेक बाळलीला करून बलरामासह श्रीकृष्ण मथुरेस परत आला. त्याचा परत येण्याचा उद्देश—वसुदेव व देवकी ह्यांस आपल्या सहवासानें सुख द्यावें, हा होता. मथुरेस आल्यावर, श्रीकृष्णानें आपला मुख्य शत्रु जो कंस त्यास सभेमध्यें सिंहासनावरून ओढून खालीं पाडिलें, व मोठ्या पराक्रमानें त्याचा प्राण घेतला. विदुरा, रामकृष्णांची बुद्धि फार तीव्र असून धारणाशक्ति इतकी विलक्षण होती कीं, गुरूनें एकदा पाठ दिला असतां त्यांस तो मुखोद्गत होई. ते सांदीपनि नामक एका ब्राह्मणाजवळ अध्ययन करण्यास राहिले, व थोडक्याच काळांत वेदवेदांगें, धनुर्विद्या इत्यादिकांमध्यें निपुण झाले. नंतर अध्ययन संपवून ते घरीं जाण्यास निघाले असतां, त्यांनीं गुरुदक्षिणेसाठीं गुरूचा मृत पुत्र परत आणून दिला. त्या प्रसंगीं श्रीकृष्णानं पंचजन नामक दैत्याचा वध करून त्याचें उदर विदारण केलें, परंतु तो मुलगा तेथें सांपडला नाहीं; म्हणून त्यानें यमलोकीं जाऊन तेथून त्या मुलास आणिलें. शिवाय, आणखी कांहीं पाहिजे असल्यास मागून घ्यावें, असें त्यानें सांदीपनीस सांगितलें; परंतु सामान्य जनांप्रमाणें तो द्रव्यलोभी नव्हता. वास्तव, श्रीकृष्णासारखा उदार पुरुष वाटेल तें देण्यास सिद्ध असतांही, मला कांहीं सुद्धां नको, असें त्यानें स्पष्ट सांगितलें. नंतर श्रीकृष्णानें रुक्मिणीशीं विवाह केला. रुक्मिणी ही भीष्मक राजाची कन्या होय. ती लक्ष्मीसारखी रूपवती होती; म्हणून तिच्या प्राप्तीसाठीं देशोदेशींचे राजे तिच्या स्वयंवरास आले होते; पण त्यांस न जुमानतां, रुक्मिणी ही लक्ष्मीचा अंश असल्यामुळें तो माझा भाग आहे व तो मलाच मिळाला पाहिजे, असें म्हणून तिच्याशीं गांधर्वविवाह करण्याच्या हेतूनें श्रीकृष्णानें तिचें हरण केलें. विदुरा, नग्नजित नामक कोशल देशचा एक राजा होता. त्यास एक मुलगी होती, तिचें नांव सत्या. ती नग्नजिताची मुलगी, म्हणून तिला नाग्नजिति असेंही म्हणत. त्या राजानें आपल्या पदरीं मोठे बलाढ्य असे सात बैल बाळगिले होते. जो कोणी त्यांस जेरीस आणून वेसण घालील, त्यास ती मुलगी विवाहविधीनें द्यावयाची, असा त्याचा संकल्प होता. तिच्या स्वयंवराकरितां जमलेल्या राजांनीं हा पण जिंकण्याकरितां पुष्कळ खटपट केली, पण व्यर्थ. श्रीकृष्ण हाच त्या कामांत विजयी झाला, आणि त्यास ती मुलगी मिळाली. इतर राजांस वाटलें कीं, आपणांस एक तर मुलगी मिळाली नाहीं; व दुसरें, जें काम आपणांस साध्य झालें नाहीं, त्यांत कृष्णास यश मिळालें; तेव्हां असा हा दोहोंकडून आपला अपमान झाला. म्हणून ते तत्काळ श्रीकृष्णाशीं युद्धास प्रवृत्त झाले. त्या समयीं, आपल्या शरिरावर एकही प्रहार होऊं न देतां, श्रीकृष्णानें त्या सर्वांचा पराभव केला, आणि नाग्नजितीला घेऊन तो द्वारकेस सुखरूप परत आला. एकदा भौमासुरानें देवमाता अ-

दितीचीं कुंडलें हरण करून नेलीं; म्हणून इंद्रानें प्रार्थना केल्यावरून श्रीकृष्ण सत्यभामेसह स्वर्लोकीं गेला, व त्या दैत्याचा वध करून त्यानें देवमातेचीं कुंडलें तिला परत आणून दिलीं. त्या समयीं सत्यभामेला नंदनवन दाखवीत असतां, तिनें पारिजातकाची इच्छा दर्शविल्यावरून श्रीकृष्णानें तो वृक्ष आपल्या बरोबर घेतला. तें वर्तमान इंद्रास कळतांच, आपल्या भार्येच्या सांगण्यावरून तो क्रोधानें सैन्यासह श्रीकृष्णावर धावून आला. विदुरा, ह्याबद्दल तुला आश्चर्य वाटूं देऊं नको. कारण, इंद्र इतका स्त्रीलंपट होता कीं, तो स्त्रियांच्या खेळांतीक केवळ पशु बनून गेला होता; आणि म्हणूनच त्यानें आपल्या मातेचीं कुंडलें परत आणून देणाऱ्या उपकारकर्त्या श्रीकृष्णावर स्वारी केली. विदुरा, अदितीचीं कुंडलें हरण करून नेणारा भौमासुर हा पृथ्वीचा पुत्र होय. पृथ्वीवरील अत्यंत सुंदर अशा सोळा हजार राजकन्या त्यानें आपल्या अंतःपुरांत आणून बंदींत ठेविल्या होत्या. त्या सर्व अविवाहित होत्या. भौमासुर हा मोठा मायावी आणि धिप्पाड राक्षस होता. तो श्रीकृष्णाशीं युद्ध करीत असतां श्रीकृष्णानें आपल्या सुदर्शनानें त्याचा वध केला. त्या वेळीं त्याची माता पृथ्वी हिनें श्रीकृष्णाचें स्तवन केलें, तेव्हां तो प्रसन्न झाला, आणि त्यानें भौमासुराचा पुत्र जो भगदत्त त्यास राज्यावर बसविलें; व त्याच्या राज्यापैकीं थोडासा भाग आपल्या राज्यास जोडिला. नंतर श्रीकृष्ण हा भौमासुरानें बंदींत ठेविलेल्या सोळा हजार राजकन्या अंतःपुरांत ज्या ठिकाणीं होत्या तेथें गेला. दीन जनांचें रक्षण करण्यास सदोदीत तत्पर असणाऱ्या भगवंतास पाहून त्या राजकन्यांस फार आनंद झाला. त्या राजकन्या सप्रेम दृष्टीनें त्याजकडे पाहूं लागल्या, व अंतःकरणांत लज्जित झाल्या. तेव्हां श्रीकृष्णानें त्यांस द्वारकेस आणिलें, आणि अनेक रूपें धारण करून एकाच मुहूर्तावर त्या सर्व कन्यांचें पाणिग्रहण केलें. अशा रीतीनें त्यानें आपल्या मायेचा प्रभाव सर्वांस दाखविला. पुढें श्रीकृष्णास त्या प्रत्येकीपासून दहा दहा मुलगे झाले. ते सर्व कृष्णासारखेच पराक्रमी आणि गुणवान होते. विदुरा, कालयवन, जरासंध, शाल्व इत्यादिकांनीं आपआपलीं प्रचंड सैन्यें बरोबर घेऊन श्रीकृष्णाच्या द्वारका नगरीवर स्वारी केली, तेव्हां मुचकुंद, भीम इत्यादिकांस निमित्तमात्र पुढें करून भगवान श्रीकृष्णानें स्वतःच त्यांचा निःपात केला, आणि आपल्या भक्तांचें महत्त्व वाढविलें. तसेंच शंबरासुर, बल्वल, द्विविद वानर, बाणासुर, मुर, दंतवक्र, शिशुपाल आदिकरून दुष्टांपैकीं कांहींस त्यानें स्वतः मारिलें. व कांहींचा आपल्या पुत्रादिकांकडून निःपात करविला. विदुरा, तुझे पुतणे कौरव आणि पांडव ह्यांच्या तटांत पृथ्वीवरील अनेक राजे येऊन मिळाले होते. त्यांचें सैन्य एवढें मोठें होतें कीं, त्याच्या भारानें पृथ्वी देखील हालूं लागली. हे जे सर्व राजे आपापल्या सैन्यासहित कुरुक्षेत्रीं जमले होते, त्यांचाही श्रीकृष्णानेंच नाश करविला. शेवटीं शकुनि, दुःशासन इत्यादिकांच्या दुष्ट मसलतीप्रमाणें वागून, केवळ स्वतांच्याच नव्हे, तर सर्व राजांच्याही नाशास कारणीभूत झालेला दुर्योधन सुद्धां भीमाच्या गदाप्रहाराच्या योगानें मांडी मोडून पृथ्वीवर पडला; पण इतकें करूनही श्रीकृष्णास संतोष झाला नाहीं. त्यानें विचार केला कीं, "भारतीयुद्धांत भीष्म, द्रोण, कर्ण, अभिमन्यु इत्यादि सर्व वीरांचा जरी निःपात झाला, तरी पृथ्वीचा भार कांहीं फारसा हलका झाला नाहीं. कारण, यादव अजून जिवंत आहेत. त्यांचें सामर्थ्य व संख्या ह्यांपुढें भारतीयुद्धांतील अठरा अक्षौहिणी सैन्य व वीर ह्यांचें कांहींच महत्त्व नाहीं; शिवाय त्यांमध्यें प्रद्युम्न, अनिरुद्ध वगैरे महापराक्रमी वीर माझेच अंशधारी आहेत; त्यांस मारण्याचें इतरांस सामर्थ्य नाहीं. ह्यास्तव, हे सर्व वारुणीपानानें उन्मत्त हो-

ऊन परस्परांशीं शत्रुभावानें भांडू लागतील, तरच ह्यांचा निःपात होईल. ही गोष्ट करावयाचें मीं मनांत आणिलें म्हणजे ती सहज पार पडेल." असा विचार करून भगवंतानें धर्मराजास राज्यासनावर बसवून सर्वांस आनंदित केलें; आणि अशा रीतीनें, सदाचरणी पुरुषांवर कितीही संकटें आलीं तरी शेवटीं त्यांचाच जय कसा होतो, हें सिद्ध करून दाखविलें. विदुरा, पूरुवंश बहुतेक नष्टप्रायच झाला होता, आणि अश्वत्थाम्याच्या ब्रह्मशिर अस्त्राच्या योगानें तर तो समूळच नष्ट होण्याची वेळ आली होती; पण उत्तरेच्या गर्भाचें रक्षण करून भगवंतानें त्याचा तंतु अवशिष्ट ठेविला. नंतर श्रीकृष्णानें धर्मराजाकडून तीन अश्वमेध यज्ञ करविले. धर्मराजही आपल्या बंधूंसहवर्तमान श्रीकृष्णाच्या अनुमतानें वागून राज्यशकट उत्तम प्रकारें हांकूं लागला. स्वतः भगवान श्रीकृष्णही सामान्यलोकव्यवहार आणि वेदोक्त धर्ममार्ग ह्यांस अनुसरून वागत होता. तो नेहमीं प्रकृति आणि पुरुष ह्यांच्या विचारांत निमग्न असे त्यामुळें, जरी ऐहिक विषयांचा उपभोग घेत होता, तरी त्यांत आसक्त होऊन मुळींच राहिला नाहीं. तो नेहमीं हास्यवदन असून त्याची वाणी अमृताप्रमाणें मधुर होती. त्याचें वर्तन निर्दोष असून त्याचा देह म्हणजे लक्ष्मीचें निवासस्थानच होतें. ह्यामुळें, यादवांस, इतर सर्व लोकांस व देवादिकांस त्यानें संतोष दिला, ह्यांत नवल कसचें ! तो ह्याप्रमाणें संसार आणि परमार्थ ह्या दोहोंकडे लक्ष देऊन वागत असल्यामुळें, सर्वदा परमानंदांत निमग्न असे. अशा रीतीनें त्याचा पुष्कळ काल लोटला असतां विषयोपभोग आणि संसार ह्यांविषयीं त्यास वैराग्य उत्पन्न झालें. विदुरा, कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं शक्ति असणाऱ्या प्रत्यक्ष श्रीकृष्णास विषयादिकांचा कंटाळा येऊन त्यांसंबंधी वैराग्य उत्पन्न झालें, मग त्या योगेश्वरास अनुसरून वागणाऱ्या दैवाधीन पुरुषांस विषयादिकांविषयीं कंटाळा येऊन वैराग्य उत्पन्न होईल ह्यांत नवल तें काय? असो. एके प्रसंगीं यादव आणि भोज ह्यांचे मुलगे कांहीं खेळ खेळत असतां, त्यांनीं ऋषिमंडळीस वाईट वाटेल अशा प्रकारचें कांहीं कृत्य केल्यावरून, भगवदिच्छेला जाणणाऱ्या त्या ऋषींनीं 'तुमचा कुलक्षय होईल,' असा त्या मुलांस शाप दिला. पुढें तें वर्तमान यादवांस समजलें. तेव्हां वृष्णि, भोज, सात्वत इत्यादि कुलांतील सर्व यादव रथांत बसून, त्या शापाचें निरसन करण्याकरितां प्रभासतीर्थीं गेले. त्यांनीं त्या तीर्थांत स्नान केलें; आणि देव, ऋषि व पितर ह्यांचें तर्पण करून ब्राह्मणांस सुवर्ण, रथ, घोडे, उत्तम उत्तम गाई, पालख्या, हत्ती इत्यादि दानें दिलीं. त्याप्रमाणेंच पुष्कळ जमिनी दिल्या, आणि दुसऱ्याही अनेक प्रकारांनीं त्या ब्राह्मणांस संतुष्ट केलें; व त्या ब्राह्मणांस यथेष्ट भोजन घालून सर्व यादवांनीं त्यांस साष्टांग नमस्कार घातला.

## अध्याय चौथा.

:o:—

### उद्धवाचीं विदुरास उत्तरें.

( यादवांचा नाश व श्रीकृष्णाचें निर्याण. )

उद्धव म्हणालाः—विदुरा, नंतर यादवांनीं ब्राह्मणांच्या अनुज्ञेनें भोजन करून यथेष्ट मद्य प्राशन केलें. त्या योगानें त्यांच्या मनांत योग्यायोग्य विचार तिळप्रायही उरला नाहीं. त्यांची आपआपसांत कांहीं निमित्तानें बोलाचाली सुरू झाली; आणि ते परस्परांचीं वर्में काढूं लागले असतां शेवटीं हातघाईवर प्रसंग येऊन, त्यांनीं सायंकाळच्या वेळा एकमेकांचे जीव घेतले! कळकावर कळक घासून त्यांपासून उत्पन्न झालेल्या वणव्याच्या योगानें जसें सर्व वन जळून भस्म होतें, तसें तें सर्व यादवकुल आपसांतील कळहाच्या योगानें नष्ट झालें. हा आत्ममायेचा खेळ पाहून श्रीकृष्ण सरस्वती नदीवर गेला, आणि

तिच्या उदकाचें आचमन करून जवळच एक पिंपळाचें झाड होतें त्याखालीं तो बसला. विदुरा, शरणागताचें दुःख दूर करावें हेंच ज्याचें ब्रीद, त्या श्रीकृष्णानें द्वारकेंत असतांनाच मला प्रेमानें सांगितलें होतें कीं, ' उद्धवा, तूं बदरिकाश्रमास जा.' परंतु मला त्याचा वियोग मुळींच सहन होईना. जो माझा जन्माचा स्वामी, त्याचा वियोग मला कसा बरें सहन होईल ? ह्यास्तव, विदुरा, स्वकुलाचा संहार करूं इच्छिणाऱ्या श्रीकृष्णाचें मनोगत जाणत असतांही मी त्या प्रभूच्या मागून प्रभासक्षेत्रीं गेलों, आणि तेथें शोध करीत असतां, भगवंताची मूर्ति सरस्वतीच्या कांठीं माझ्या दृष्टीस पडली. विदुरा, त्या वेळीं श्रीकृष्णाची श्यामसुंदर मूर्ति फारच तेजस्वी दिसत होती; आरक्त आणि प्रसन्न असे त्याचे नेत्र शुद्ध सत्वगुणानें पूर्ण प्रतिबिंबित झालेले असून, चार हात व पीतांबर ह्यांचे योगानें त्याला अनुपम शोभा प्राप्त झाली होती. त्यानें आपला उजवा पाय डाव्या मांडीवर ठेविला असून तो अश्वत्थ वृक्षाला टेंकून बसला होता; त्या वेळीं त्यानें ऐहिक विषयांचा त्याग केला असून, तो आत्मानंदांत रंगून गेला होता. असो. विदुरा, इतक्यांत फिरत फिरत सहजगत्या मैत्रेय मुनि तेथें आले. मैत्रेय हे महाभगवद्भक्त असून व्यासांचे गुरुबंधु व जिवलग मित्र होते. मैत्रेयांचे ठिकाणी श्रीकृष्णाविषयीं फार प्रीति होती. ते तेथें आले आणि प्रेमभावानें मस्तक नम्र करून उभे राहिले. त्या वेळीं स्मित हास्याच्या योगानें माझे सर्व श्रम दूर करून, मैत्रेयांसमक्ष श्रीकृष्ण मला म्हणाला. "उद्धवा, मी तुझ्या अंतर्यामीं वास करीत असल्यामुळें, तुझ्या मनांतील सर्व इष्ट मला समजलें आहे. इतरांस जें दुर्मिळ, तें मी तुला देतों. त्या योगानें तुला माझी प्राप्ति होईल. उद्धवा, पूर्वी तूं अष्टवसूंपैकीं एक वसु होतास; विश्वस्रष्ट्या वसूंच्या सत्रामध्यें माझ्या प्राप्तीसाठीं त्वां यजन केलें होतें. उद्धवा, मी निजधामास जाण्याचे वेळेस तूं एकांतीं अनन्यभावानें माझें दर्शन घेतलेंस, ह्यास्तव तुजवर माझा पूर्ण अनुग्रह आहे; म्हणून आतां तूं जन्ममरणांपासून मुक्त होशील. हें तुझें शेवटलें जन्म होय. पूर्वी पाद्मकल्पांत सृष्टीच्या आरंभीं, माझ्या नाभिकमलावर बसलेल्या ब्रह्मदेवास माझा महिमा व्यक्त करणारें जें ज्ञान मीं सांगितलें, तें तुला सांगतों. ह्यालाच विद्वान लोक 'भागवत' म्हणतात. विदुरा, ह्याप्रमाणें बोलून भगवंतानें आपल्या कृपादृष्टीचा मजवर अनुग्रह केला. त्या समयीं प्रेमानें माझ्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले; कंठ सद्गदित झाला; डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागले; आणि तोंडांतून शब्द निघेनासा झाला. अशा स्थितींत कांहीं वेळ गेल्यानंतर मीं हात जोडिले, आणि म्हटलें, " हे सर्वव्यापका, तुझ्या चरणकमळांचें सेवन करणाऱ्यास धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या चार पुरुषार्थांतून कोणताही पुरुषार्थ दुर्मिळ आहे असें नाहीं. तथापि त्यांपैकीं एकही मला नको. कारण, मी तुझ्या चरणसेवेविषयीं फारच उत्कंठित आहें. हे कृपासागरा, तुला कोणतीही इच्छा नसून तूं अनेक कर्में केलीस; तूं मूळचा जन्मरहित असून जन्म घेतलेंस; स्वतः कालरूप असतां शत्रूच्या भयानें द्वारकेसारख्या किल्ल्यांत दडून राहिलास, व विशेषप्रसंगीं पळूनही गेलास; आणि तूं आत्मस्वरूपी रममाण असूनही हजारों स्त्रियांचें पाणिग्रहण करून गृहस्थाश्रम चालविलास. अशा ज्या परस्पर विरुद्ध गोष्टी तुझ्या ठिकाणीं दृष्टीस पडतात, त्यांच्या योगानें मोठमोठ्यांसही मोह पडतो. सर्वेश्वरा, तूं पूर्णज्ञानसंपन्न असतां कांहीं मसलतीच्या प्रसंगीं मला जवळ बोलावून एखाद्या अप्रबुद्धासारखा मला प्रश्न करीत होतास, हें मनांत येऊन फारच आश्चर्य वाटतें. हे जगन्नायका, आत्मस्वरूपाचा अनुभव प्राप्त करून

देण्यारें जें संपूर्ण ज्ञान तूं ब्रह्मदेवास सांगितलेंस, तें ग्रहण करण्यास मी योग्य आहें असें जर तुला वाटत असेल, तर तें मला लवकर सांग. म्हणजे त्यापासून माझा व इतर मुमुक्षु लोकांचा उद्धार होईल." •

विदुरा, असें माझें हृद्गत जाणून, भगवंतानें आपल्या आत्मस्वरूपाच्या यथार्थ ज्ञानाचा मला उपदेश केला. सर्व लोक भगवंताची चरणसेवा करितात; कां कीं, तो सर्वांचा गुरु आहे. मीही त्याची आराधना करून त्यापासून आत्मस्वरूपाच्या ज्ञानाचा मार्ग शिकलों. नंतर मी त्यास प्रदक्षिणा घालून नमस्कार केला आणि निघालों. विदुरा, ज्या श्रीकृष्णाच्या दर्शनानें मला अत्यंत आल्हाद वाटत असे. त्याच्या वियोगानें मला हल्लीं फार दुःख होत आहे; आतां मी येथून श्रीकृष्णास परमप्रिय अशा बदरिकाश्रमाकडे जातों. तेथें भगवान नरनारायण ऋषि लोकांवर अनुग्रह करण्याकरितां उग्र तपाचरण करीत बसले आहेत. त्यांच्या तपश्चर्येपासून कोणासही उपद्रव होत नसून ते ह्या कल्पाच्या शेवटपर्यंत तेथें वास्तव्य करणार आहेत.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, उद्धवाच्या मुखानें आपल्या स्वकीयांच्या नाशाचें वर्तमान ऐकून विदुरास फार दुःख झालें; पण तो मोठा ज्ञानसंपन्न असल्यामुळें, त्यानें विवेक करून त्या दुःखाचा उपशम केला. पुढें भक्तश्रेष्ठ उद्धव जाण्यास निघाला असतां, कुरुकुलश्रेष्ठ विदुरानें मोठी आशा धरून त्याला विनंती केली कीं, योगेश्वर श्रीकृष्णानें जें आत्मस्वरूपप्रबोधक ज्ञान तुला सांगितलें, तें तूं मला सांग. तुझ्यासारखे विष्णूचे सेवक आपल्या आश्रितांच्या इच्छा पूर्ण करण्यासाठींच ह्या भूमंडलावर फिरत असतात.

हें ऐकून उद्धव म्हणाला:—विदुरा, त्या वेळीं श्रीकृष्णानें तुझें मुद्दाम स्मरण केलें होतें. एवढ्यावरून, त्यानें तुला तत्त्वज्ञानाचा उपदेश केल्यासारखाच आहे. तथापि सर्व प्रकारचे संशय दूर होऊन निश्चित ज्ञानानें बुद्धि उज्वलित व्हावी म्हणून, त्या ज्ञानाचा तुला उपदेश करण्याविषयीं त्यानें माझ्यासमक्ष मैत्रेयांस सांगितलें आहे.

परीक्षिता, श्रीकृष्णाच्या विरहानें उद्धवास फार दुःख झालें होतें; पण विदुराशीं त्याचा जो भगवत्कथाविषयक अमृततुल्य संवाद झाला, त्या योगानें तें दूर झालें. त्यानें ती रात्र यमुनेच्या वाळवंटांत एका क्षणासारखी सुखानें घालवून बदरिकाश्रमाकडे गमन केलें.

परीक्षित म्हणाला:—मुनिवर्य, मोठमोठे यादव ब्राह्मणांच्या शापानें मेले असतां त्यांतून एक उद्धवच कसा जिवंत राहिला? त्रैलोक्याचा स्वामी श्रीकृष्ण देखील परलोकास गेला; असें असतां हा राहिला हें कसें?

शुकाचार्य म्हणाले:—राजा, कालशक्तीचा आश्रय करून ब्रह्मशापाच्या मिषानें भगवंतानें यादवकुलाचा संहार केला; कारण तें त्यास कर्तव्यच होतें. शिवाय, परमेश्वराची इच्छा म्हटली म्हणजे तिजप्रमाणेंच सर्व गोष्टी घडून यावयाच्या;—त्यांत कधींही अंतर पडावयाचें नाहीं. श्रीकृष्णानें वैकुंठास जातेवेळीं असें मनांत आणिलें कीं, मी निजधामास गेलों असतां पाठीमागें लोकांत आत्मज्ञानाचा प्रसार करण्यास एक उद्धव मात्र पात्र आहे. कां कीं, तो आत्मवेत्त्यांचा मुकुटमणि आहे. तो मजहून लेशमात्रही कमी नाहीं. तो विषयासक्त नाहीं. म्हणून लोकांना उपदेश करीत भूमंडलावर राहण्याला तो योग्य आहे. श्रीकृष्णानें असें मनांत आणून उद्धवास बदरिकाश्रमीं जाण्याची आज्ञा केली. त्यापासून वेदांची उत्पत्ति झाली, त्या त्रिभुवनपतीची आज्ञा उद्धवानें शिरसा मान्य केली. तो बदरिकाश्रमीं गेला, आणि त्यानें समाधियोगानें परमेश्वराचें अर्चन केलें. इकडे, श्रीकृष्णाचीं श्लाघ्य कर्मे, धीरांचेंही धैर्य वाढविणारा व इतरांस दुष्कर असा त्यानें

स्वच्छेनें केलेला देहन्यास इत्यादि सर्व उद्धवापासून ऐकून, आणि श्रीकृष्णानें आपलें स्मरण केलें होतें हें मनांत आणून विदुर प्रेमानें विव्हल झाला, व त्यानें फारच शोक केला. नंतर कांहीं दिवसांनीं यमुनातीर सोडून तो गंगातीरीं हरिद्वार एथें मैत्रेय रहात होते, त्या ठिकाणीं गेला.

## अध्याय पांचवा.

—:०:—

### विदुराचे मैत्रेयांस प्रश्न.

शुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, विदुर हा कुरुकुलांत मोठा श्रेष्ठ होता. भगवद्भक्तीच्या योगानें त्याचें अंतःकरण शुद्ध झालें होतें. तो मैत्रेय ऋषींजवळ जाऊन पोहोंचला, आणि त्यांचें सौजन्य व दयादाक्षिण्यादि गुण पाहून संतुष्ट होसाता त्यांस प्रश्न करूं लागला.

विदुर म्हणाला:—मुनिवर्य, ह्या संसारांत सर्व लोक सुखप्राप्तीसाठीं अश्रांत श्रम करितांना दृष्टीस पडतात; पण त्यांपासून सुखप्राप्ति न होतां उलट दुःखाची मात्र वृद्धि होते. मुनिश्रेष्ठा, आपण सर्वज्ञ आहां; तेव्हां ह्या संसारांत मनुष्यांनीं कोणत्या प्रकारचें आचरण ठेवावें, तें कृपा करून मला सांगा. कारण, अधर्माचरणानें श्रीकृष्णापासून पराङ्मुख झालेल्या जनांवर कृपा करण्याकरितांच आपल्यासारखे महाभगवद्भक्त ह्या भूमंडलावर फिरत असतात, असें मला निश्चयात्मक वाटतें; म्हणून, हे ज्ञानसंपन्ना, ज्या मार्गानें भगवंताचें आराधन केलें असतां तो अद्भुतकीर्ति भगवान, भक्तियोगाच्या आचरणानें शुद्ध झालेल्या आमच्या अंतःकरणांत प्रकट होऊन आम्हांस आत्मसाक्षात्काराचें ज्ञान प्राप्त करून देईल, असा कांहीं तरी मार्ग आपण कृपा करून सांगा. ऋषिश्रेष्ठा, सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांनीं युक्त जी माया, त्या मायेचा नियंता भगवान अनेक प्रकारचे अवतार घेऊन कोणतीं कर्में करितो? स्वतः निस्पृह असूनही हें सर्व जग त्यानें कसें उत्पन्न केलें? तसेंच ह्याचें रक्षण तो कोणत्या प्रकारें करितो? प्रलयकालीं योगमायेच्या बलानें ह्या स्थावरजंगमात्मक सृष्टीचा आपल्या हृदयाकाशांत लय करून ह्या जगाच्या सर्व व्यापारांपासून उपरम पावलेला भगवान स्वस्थ चित्तानें त्या मायेंतच विलीन होऊन राहतो, तो कसा? तसाच तो योगेश्वर एकच असतां सृष्टीच्या उत्पत्तिकालीं तिजमध्यें प्रवेश करून विष्णु, ब्रह्मदेव इत्यादि रूपें धारण करितो, तीं कशीं? आणि तो पुण्यश्लोकमुकुटमणि देव, गाई, ब्राह्मण इत्यादिकांचें कल्याण करण्याकरितां अनेक अवतार घेऊन जीं कर्में करतो, तीं कोणतीं? हे महामुने, त्या भगवंतानें, लोकालोक[1] पर्वताच्या बाहेरचे भाग आणि त्या पर्वताच्या आंतले इंद्रादि लोकपालांसह यच्चयावत् प्राणी हे महत्तत्त्वादि निरनिराळ्या तत्त्वांच्या योगानें उत्पन्न केले आहेत, ते कोणत्या प्रकारानें? तसेंच, त्या स्वयंप्रकाश नारायणानें जीवांचे जे स्वभाव, त्यांचीं कर्में व रूपें उत्पन्न केलीं आहेत, तीं कोणतीं? मुने, हें सर्व मला विवरण करून सांगा. महाराज, ब्राह्मणादि श्रेष्ठ वर्ण व शूद्रादि नीच वर्ण ह्या सर्वांचे धर्म व्यासमुखानें मीं अनेक वेळां श्रवण केले आहेत; ते आणखी श्रवण करण्याची मला इच्छा नाहीं. मात्र कृष्णकथामृत तेवढें प्राशन करण्याची मला अतिशय उत्कंठा आहे. कारण, भगवंताचें गुणवर्णन कितीही ऐ-

१ हा लोकालोक पर्वत पृथ्वीच्या सभोंवतीं वर्तुलाकार असून, ह्याचा आंतील भाग म्हणजे ज्यांत आपण राहतों तो प्रकाशित आहे, व बाहेरील अंधकारमय आहे.

अर्वाचीने तु तस्यार्धे चरंति रविरश्मयः।
परार्धे तु तमोनित्यं लोकालोकस्ततः स्मृतः॥
(लिं० पु० अ० ५३.)

लोकालोक पर्वत हा सर्व त्रैलोक्याच्या भोंवतालचा कोटच आहे, असें म्हणलें तरी चालेल.
(श्रीमद्भा० स्कंध ५ अ. २७.)

किलें, तरी तृप्ति न होतां आणखी ऐकावयाची इच्छा राहतेच. त्याचे गुण जो कोणी श्रवण करतो, त्याच्या अंतःकरणांत भगवान सुप्रतिष्ठित होऊन, संसारचक्र प्राप्त होण्यास कारणीभूत असणारी जी विषयासक्ति, तिचा उच्छेद करितो. तेव्हां, आपल्यासारख्या भगवद्भक्तांच्या मुखानें हरिगुण श्रवण करण्यास कोणता पुरुष उत्कंठित होणार नाहीं बरें ? हे विप्रवर्या, व्यासाचा उद्देशही हरिगुणवर्णन करण्याचाच होता; व म्हणूनच त्यांनीं महाभारतामध्यें सर्वांस परिचित अशा प्रापंचिक विषयांचें वर्णन केलें आहे. त्यांत त्यांचा हेतु हा कीं, त्या योगानें तरी ईशचरित्रश्रवणाकडे लोकांची प्रवृत्ति व्हावी. आणि तेणेंकरून संसारांत गुरफटून गेलेल्या पुरुषांचीं दुःखें निवारण व्हावीं. मैत्रेया, इतकें असूनही पूर्वकर्मभोगामुळें ज्यांची हरिकथेच्या ठिकाणीं प्रीति नाहीं व ज्यांना भारताचा इत्यर्थ कळत नाहीं, त्या हतभाग्य लोकांबद्दल मला फार दुःख होतें; कां कीं, त्यांचीं सर्व कर्में व्यर्थ होत असल्याकारणानें त्यांचें सर्व आयुष्य फुकट जात आहे. ह्याकरितां, हे दीनबंधो, भ्रमरमकरंद न्यायानें हरिकथेचें सार मला सांगा. त्या योगानें सर्व जगाचें कल्याण होईल. जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करण्याकरितां प्रथम सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांचा ज्या भगवंतानें स्वीकार केला. त्यानेंच देवब्राह्मणादिकांस सुख देण्याकरितां मनुष्यलोकामध्यें श्रीकृष्णावतार घेतला. ह्यास्तव, मैत्रेया, त्या श्रीकृष्णाचीं अतिपुण्यप्रद आणि मानवी शक्तीच्या बाहेरचीं अशीं चरित्रें मला विस्तारानें सांगा.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—राजा, मैत्रेय हे मोठे योगैश्वर्यसंपन्न होते. लोकांचें कल्याण व्हावें ह्या सद्हेतूनें विदुरानें केलेले प्रश्न श्रवण करून त्यांस फार संतोष वाटला; आणि त्यांनीं पुष्कळ गौरव करून, त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास प्रारंभ केला.

## मैत्रेयांचीं विदुरास उत्तरें.

मैत्रेय म्हणाले:—हे साधुपुरुषा, तुझ्या अंतःकरणांत भगवान अधोक्षजाची दृढ भक्ति बाणली असल्यामुळें, लोकांवर उपकार करण्याच्या बुद्धीनें तूं जे प्रश्न केलेस, ते फारच उत्तम असून, त्या योगानें तुझी कीर्तिही वाढणार आहे. हे व्यासनंदना, तुझ्या ठिकाणीं जी ही लोककल्याणबुद्धि जागृत आहे, त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण, सर्वांच्या दुःखाचा परिहार करणारा भगवान, भक्तियोगानें तुझ्या अंतःकरणांत दृढ प्रतिबिंबित झाला आहे. विदुरा, तूं सामान्य नव्हस. प्राण्यांच्या पापपुण्याचें फल—दुःख व सुख—प्राप्त करून देणारा यम, जो मांडव्य ऋषीच्या शापानें विचित्रवीर्याच्या दासीच्या उदरीं भगवान व्यासापासून जन्मास आला, तोच तूं! सर्वैश्वर्यसंपन्न श्रीकृष्णास व त्याच्या भक्तांस तूं नेहमीं मान्य होतास, म्हणून श्रीकृष्णानें निजधामास जातेवेळीं तुला तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्याविषयीं मला आज्ञा केली आहे. ह्याकरितां, विदुरा, जो परमेश्वर आपल्या योगमायेच्या योगानें जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं करितो, त्याच्या लीला क्रमानें मी तुला सांगतों.

## जगदुत्पत्ति.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वीं भगवान परमेश्वर एकटाच असतो; तोच सर्व जीवांचें स्वरूप आणि स्वामी होय. सृष्टि अस्तित्वांत असतां आत्मा, दृश्य, द्रष्टा या स्वरूपानीं तो दिसत असतो; परंतु तिचा लय होतो, तेव्हां तोच एक अवशिष्ट राहतो. त्या वेळेस मायेचा निरोध झाल्यामुळें तो एकटाच प्रकाशमान आणि सर्व पहाणारा असून त्यास पहावयासच कांहीं उरत नाहीं. म्हणून त्यास वाटत असतें कीं, मी

पृष्ठ ४१ टीप पहा.

असून नसल्यासारखाच आहे. तेव्हां त्याची शक्ति अदृश्य असते, पण चैतन्य मात्र जागृत असतें. ह्या साक्षिरूप भगवंताची जी कार्यकारणरूप शक्ति, तिला 'माया' हें नांव आहे. सर्वव्यापक परमात्मा तिच्या योगानें जग निर्माण करतो. माया ही त्रिगुणात्मक आहे. कालाच्या शक्तीनें त्या मायेच्या गुणांमध्यें वैषम्य उत्पन्न होऊन तींत महासमर्थ व इंद्रियज्ञानातीत परमात्म्यानें आपल्या अंशेंकरून उत्पन्न झालेल्या पुरुषाच्या योगानें चिदाभासरूप आपलें वीर्य स्थापन केलें. नंतर, कालानें प्रेरित झालेल्या मायेपासून महत्तत्त्व उत्पन्न झालें. तें महत्तत्त्व सत्त्वगुणविशिष्ट व ज्ञानस्वरूप आहे, म्हणून तें अज्ञानाचा नाश करितें. महत्तत्त्व हें आपणांत समाविष्ट असणाऱ्या विश्वास प्रकट करितें. ईश्वरानें जग उत्पन्न करण्याकरितां महत्तत्त्वावर जेव्हां दृष्टिपात फेंकला, तेव्हां तें चिदाभास, काल व तीन गुण ह्यांच्या स्वाधीन होऊन विकार पावलें. पुढें विकार पावलेल्या त्या महत्तत्त्वापासून अहंकाररूप तत्त्व उत्पन्न झालें. अधिभूत ( कार्य ), अध्यात्म ( कारण ) व अधिदेव ( कर्ता ) हें त्या अहंकाराचें स्वरूप आहे. कारण, पंचमहाभूतें, दहा इंद्रियें, मन आणि देवता हे विकार त्यापासूनच उत्पन्न होतात. अहंकाराचे तीन प्रकार आहेत: एक सात्त्विक, दुसरा राजस आणि तीसरा तामस. विकार पावलेल्या अहंकाराच्या सात्त्विक प्रकारापासून मन आणि इंद्रियांच्या देवतारूप शक्ति निर्माण झाल्या. त्यांच्या योगानें इंद्रियांस आपापल्या अर्थाचें ग्रहण करितां येतें. राजस अहंकारापासून ज्ञानेंद्रियें आणि कर्मेंद्रियें निर्माण झालीं, व तामस अहंकारापासून शब्दाची उत्पत्ति होऊन त्या शब्दापासून आकाश उत्पन्न झालें. तें आकाश शब्दगुणानें परमात्म्याचें प्रकाशक आहे. काल, माया आणि चिदाभास ह्यांच्या योगानें भगवंताच्या दृष्टिक्षेपाबरोबर आकाशापासून स्पर्श हा गुण उत्पन्न झाला. नंतर तो स्पर्श विकार पावून त्यापासून वायु प्रकट झाला. बलिष्ठ अशा वायूपासून आकाशाच्या साहाय्यानें रूप निर्माण झालें. त्यापासून तेजाची उत्पत्ति झाली. तें तेज लोकांचें प्रकाशक आहे. वायूनें युक्त असें तें तेज ईश्वराच्या अवलोकनानें युक्त होऊन विकार पावलें. त्यापासून रस हा गुण उत्पन्न झाला, आणि त्यापासून उदक निर्माण झालें. ह्या सर्वांस काल, माया आणि चिदाभास ह्यांची अवश्यकता असतेच, हें उघड आहे. तसेंच, तेजानें संबद्ध झालेलें उदक परमात्म्याच्या दृष्टीनें युक्त होऊन विकार पावलें; तेव्हां त्यापासून गंधरूप गुण आणि त्यापासून पृथ्वी निर्माण झाली. येथेंही काल, माया आणि चिदाभास ह्यांचा योग असतोच. आकाशापासून आरंभ करून उत्तरोत्तर जें जें भूत निर्माण झालें, त्या त्यामध्यें त्याच्या पूर्वी उत्पन्न झालेल्या सर्व भूतांचा योग असतो; म्हणून पुढें पुढें एकेक गुण अधिक आहे. जसें, आकाशाचा गुण एक—शब्द; वायूचे गुण दोन—शब्द आणि स्पर्श; तेजाचे गुण तीन—शब्द, स्पर्श आणि रूप; उदकाचे गुण चार—शब्द, स्पर्श, रूप आणि रस; पृथ्वीचे गुण पांच—शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध. हीं जीं तत्त्वें निर्माण झालीं, त्यांच्या अभिमानी देवता हे विष्णूचे अंश होत. त्या उत्पन्न होण्यास काल, माया आणि चिदाभास ह्यांचें साहाय्य लागतें. विदुरा, ह्या ज्या उत्पन्न झालेल्या देवता, त्या सर्व एकमेकींत न मिसळतां परस्परांपासून निरनिराळ्या राहिल्या. त्या योगानें, सृष्टीची उत्पत्ति होण्यास अवश्यक असणारी जी संघशक्ति, तिच्या अभावामुळें ब्रह्मांडाची उत्पत्ति करण्यास त्या असमर्थ अशा होऊन, हात जोडून परमेश्वराची प्रार्थना करूं लागल्या.

## देवतांनीं केलेली परमेश्वराची स्तुति.

देवता म्हणतात—

नमाम ते देव पदारविंदं प्रपन्नतापोपशमातपत्रम् ।
यन्मूलकेता यतयोऽञ्जसोरु संसारदुःखं बहिरुत्क्षिपंति ॥
धातर्यदस्मिन्भव ईश जीवास्तापत्रयेणोपहता न शर्म ।
आत्मँल्लभंते भगवंस्तवांघ्रिच्छायां सविद्यामत आश्रयेम ॥
मार्गंति यत्ते मुखपद्मनीडैश्छंदःसुपर्णैर्ऋषयो विविक्ते ।
यस्याघमर्षोदसरिद्वरायाः पदं पदं तीर्थपदः प्रपन्नाः ॥
यच्छ्रद्धया श्रुतवत्याच भक्त्या संमृज्यमाने हृदयेऽवधाय ।
ज्ञानेन वैराग्यबलेन धीरा व्रजेम तत्तेऽङ्घ्रिसरोजपीठम् ॥
विश्वस्य जन्मस्थितिसंयमार्थे कृतावतारस्य पदांबुजं ते ।
व्रजेम सर्वे शरणं यदीश स्मृतं प्रयच्छत्यभयं स्वपुंसाम् ॥
यत्सानुबंधेऽसति देहगेहे ममाहमित्यूढदुराग्रहाणाम् ।
पुंसां सुदूरं वसतोऽपि पुर्यां भजेम तत्ते भगवन्पदाब्जम् ।
तान्वा असद्वृत्तिभिरक्षिभिर्ये पराहृतांतर्मनसः परेश ।
अथो न पश्यंत्युरुगाय नूनं ये ते पदन्यासविलासलक्ष्म्याः ॥
पानेन ते देव कथासुधायाः प्रवृद्धभक्त्या विशदाशया ये ।
वैराग्यसारं प्रतिलभ्य बोधं यथांऽजसाऽन्वीयुरकुंठधिष्ण्यम् ॥
तथाऽपरे चात्मसमाधियोगबलेन जित्वा प्रकृतिं बलिष्ठाम् ।
त्वामेव धीराः पुरुषं विशंति तेषां श्रमः स्यान्न तु सेवया ते ॥
तत्ते वयं लोकसिसृक्षयाऽऽद्य त्वयाऽनुसृष्टास्त्रिभिरात्मभिः स्म ।
सर्वे वियुक्ताः स्वविहारतंत्रं न शक्नुमस्तत्प्रतिहर्तवे ते ॥
यावद्बलिं तेऽज हराम काले यथा वयं चान्नमदाम यत्र ।
यथो भयेषां त इमे हि लोका बलिं हरंतोऽन्नमदंत्यनूहाः ॥
त्वं नः सुराणामसि सान्वयानां कूटस्थ आद्यः पुरुषः पुराणः ।
त्वं देव शक्त्यां गुणकर्मयोनौ रेतस्त्वजायां कविमादधेऽजः ॥
ततो वयं सत्प्रमुखा यदर्थे बभूविमात्मन्करवाम किं ते ।
त्वं नः स्वचक्षुः परिदेहि शक्त्या देव क्रियार्थे यदनुग्रहाणाम् ॥

'हे देवा, आम्हीं तुझ्या चरणारविंदांस नमस्कार करितों. तुझीं चरणारविंदें शरणागतांचा ताप दूर करण्यास छत्रासारखीं आहेत. योगी त्यांचा आश्रय करून संसारसंबंधी दुःख सहज दूर झुगारून देतात. हे ईश्वरा, तापत्रयामुळें त्रस्त होऊन ह्या संसारांत जीव सुख पावत नाहींत; म्हणून आम्ही ज्ञानदायक अशा तुझ्या चरणांच्या छायेचा आश्रय केला आहे. प्रभो, तुझे चरणच,

सर्व नद्यांत श्रेष्ठ अशा पवित्र गंगेचें उत्पत्तिस्थान होत. देवाधिदेवा, ऋषि एकांतांत बसून वेदविचारांत निमग्न होऊन वेदमार्गानेंच ज्या तुझ्या चरणांचा शोध लावितात, त्या तुझ्या चरणांपुढें आम्ही लीन होत आहों. देवा, आस्तिक्यबुद्धीनें व तुझ्या कथाश्रवणापासून उत्पन्न झालेल्या भक्तीनें निर्मल झालेल्या हृदयांत तुझ्या चरणांची स्थापना केली असतां, ज्ञानानें आणि वैराग्यबलानें लोकांच्या अंतःकरणांत तुजविषयीं यथार्थ ज्ञान उत्पन्न होतें; त्या तुझ्या चरणांस आम्ही शरण आलों आहों. हे प्रभो, जगताची उत्पत्ति, स्थिति आणि लय करण्यासाठीं तूं पृथ्वीवर अवतार घेतोस. तूं आमचा आश्रयदाता आहेस. तुझ्या चरणकमलांचें स्मरण केलें असतां भक्तांस अभय मिळतें, असा तुझ्या चरणांचा महिमा आहे. ह्यास्तव आम्ही तुला नमस्कार करितों हे भगवन्, तूं जरी ह्या शरीरांत राहतोस, तरी तुझीं चरणकमलें लोकांस अत्यंत दुर्लभ अशीं होतात. कारण देह, घरदार, वस्त्रपात्र ह्यांच्या ठिकाणीं 'हीं माझीं' अशी बुद्धि त्यांच्या मनांत दृढ झालेली असते. देवा, तुझ्या त्या दुर्लभ पदांची आम्ही सेवा करितों. हे ईश्वरा, जे तुझ्या लीला गातात, तुझीं चरणकमलें मनांत ठेवून भक्तीनें त्यांचें चिंतन करतात, आणि त्या योगानें आपणांस मोठी शोभा आली असें मानितात, ते तुझे सद्भक्त होत. ते, विषयासक्त व सुखाभिलाषी लोकांच्या दृष्टीसही कधीं पडावयाचे नाहींत; मग त्यांचा समागम होईल अशी आशा करण्याचें प्रयोजन काय? हे देवा, जे लोक तुझें कथारूप अमृत पितात, त्यांची तुझ्याविषयीं भक्ति वाढत जाते; भक्तीनें त्यांचीं अंतःकरणें निर्मळ होतात; त्या योगानें त्यांना विषयांविषयीं विरक्ति उत्पन्न होते, आणि मग ज्ञान उत्पन्न होतें. अशा क्रमानें शेवटीं त्यांस वैकुंठपदाचा लाभ होतो. दुसरे कित्येक लोक समाधिबलानें बलिष्ठ मायेस जिंकितात; आणि त्या योगानें तोच वैकुंठलोक मिळवून तुझी प्राप्ति करून घेतात. परंतु योगबलानें जे तुझी प्राप्ति करून घेतात, त्यांस फार कष्ट सोसावे लागतात; तसे तुझ्या भक्तीनें जे तुझी प्राप्ति करून घेतात, त्यांस कष्ट सोसावे लागत नाहींत, इतकाच फरक आहे. हे ईश्वरा, तूं अनादि असून आम्हां सर्वांचें आदिकारण आहेस. तूं आम्हांला सत्त्व, रज आणि तम ह्या तीन गुणांपासून निर्माण केलें आहेस. तें अशासाठीं कीं, आम्हीं सृष्टि निर्माण करावी. तथापि आम्ही निरनिराळ्या गुणांनीं युक्त आहों, म्हणून एकमेकांपासून भिन्न राहिलों आहों. ह्यामुळें, तुला क्रीडा करण्यास साधन जें ब्रह्मांड, तें उत्पन्न करून देण्यास आम्हांस सामर्थ्य नाहीं; म्हणून आम्हांला ज्ञानदृष्टि दे. हे देवा, आम्हांस वेळोवेळीं सर्व भोग तुला अर्पण करितां यावे, आम्हांस स्वतःला खावयास अन्न मिळावें, तसेंच उत्पन्न केलेल्या जीवांना, तुला व आम्हांलाही बलिप्रदानानें संतुष्ट ठेवून सुखानें भोग भोगितां यावे, अशी योजना कर. आम्हां सर्वांचा तूं निर्विकार असा आदिपुरुष आहेस. तुला पुराणपुरुष ही संज्ञा योग्य आहे. तूं अज असूनही सत्त्व, रज व तम हे गुण, आणि उत्पत्ति वगैरे कर्में ह्यांस कारणीभूत अशा मायेपासून ज्ञानस्वरूप महत्तत्त्व निर्माण केलेंस. हे परमात्मन्, महत्तत्त्वासह आम्ही सर्व ज्याकरितां उत्पन्न झालों आहों, तें तुझें कोणतें काम आम्हीं करावें, तें सांग. सृष्टि निर्माण करावयास सांगशील, तर ती कशी करावी ह्याचें पूर्ण ज्ञान व सामर्थ्य आम्हांस दे.'

## अध्याय सहावा.

—:०.—

### विराट्पुरुषाची उत्पत्ति.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें, आपल्या तत्त्वशक्ति निरनिराळ्या राहिल्या आहेत, व त्यांचें सृष्टिरचना करण्याचें सामर्थ्य त्यांमध्यें जागृत

नाहीं. असें पाहून अद्भुतशक्ति परमेश्वरानें त्यांस क्षुब्ध करणाऱ्या मायाशक्तीसह तेवीस तत्त्वांच्या समुदायांत एकदम प्रवेश केला, आणि क्रियाशक्तीच्या योगानें निरनिराळीं तत्त्वें एकत्र केलीं; तेव्हां त्यांत सृष्टिरचना करण्याचें सामर्थ्य आलें. नंतर ईश्वराच्या प्रेरणेनें त्यांत चलन उत्पन्न झालें, आणि त्यांच्या अंशापासून विराट्पुरुष तयार झाला. त्याच विराट्पुरुषांत स्थावरजंगम विश्व राहतें. सुवर्णासारख्या अंगकांतीचा तो पुरुष हजारों वर्षे पर्यंत अंडकोशातील उदकांत राहिला. त्या पुरुषांतच कल्पांतरींचे लीन झालेले जीव होते. हा विराटपुरुष सर्व जीवांचा आत्मा आणि परमात्म्याचा नारायण नामक पहिला अंशावतार होय. ह्यामध्येंच हा सर्व प्राण्यांचा समुदाय दृष्टीस पडतो. महत्तत्त्वादि तत्त्वांपासून उत्पन्न झालेल्या त्या पुरुषामध्यें ज्ञानशक्ति, कर्मशक्ति व भोक्तृशक्ति ह्या तीन शक्ति होत्या. त्या शक्तींच्या योगानें विराटपुरुषानें आपले अनेक भाग केले, ते असेः—पहिल्या ज्ञानशक्तीच्या योगानें एक भाग हृदय; दुसऱ्या क्रियाशक्तीच्या योगानें दहा प्राण; आणि तिसऱ्या भोक्तृशक्तीच्या योगानें अध्यात्म, अधिदैव व अधिभूत हे तीन भाग असे एकंदर चौदा भाग केले. विदुरा, त्या भागांस ज्या संज्ञा आहेत, त्या तुला सांगतों: पहिल्या भागास हृदय हेंच नांव आहे. दहा प्राण, त्यांचीं नांवें प्राण, अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय हीं होत; अध्यात्म, अधिदैव व अधिभूत हे जे तीन भाग सांगितले, त्यांचा अर्थ अनुक्रमें इंद्रियें, देवता व विषय असा समजावा; असो. सर्व तत्त्वांचें नियमन करणारा जो परमेश्वर, त्यास तत्त्वस्वरूप देवतांनीं केलेली स्तुति आठवली; आणि त्याप्रमाणें, विराट्पुरुषांत अमुक एक योजना करावयाची, असें त्यानें ठरविलें.

विदुरा, आतां, त्या विराट्पुरुषाच्या शरीरावर देवांना राहण्यास योग्य अशीं कोणतीं स्थानें निर्माण झालीं, तें तुला सांगतों: त्याच्या शरीरावर प्रथम मुख निर्माण झालें; त्यांत लोकपाल अग्नीनें आपल्या वाणीरूप शक्तीसह प्रवेश केला; त्या योगानें जीवास बोलतां येतें. मग त्यास तालुस्थान निर्माण झालें; तेथें आपल्या जिव्हारूप शक्तीसह लोकपाल वरुण जाऊन राहिला; त्या जिव्हेच्या योगानें पुरुषास कोणत्याही प्रकारची रुचि समजते. नंतर विराट्पुरुषास नासिका उत्पन्न झाली; तेथ अश्विनीकुमार जाऊन राहिले; त्यांजबरोबर गंध ग्रहण करण्याची शक्ति प्रविष्ट झाली; तीपासून जीवास वास घेतां येतो. मग डोळे निर्माण झाले; त्यांत चक्षुरिंद्रियासहित लोकपाल सूर्यानें प्रवेश केला; त्यापासून पदार्थ पाहतां येतात. मग विराट्पुरुषाच्या शरीराचें आच्छादन करणारी त्वचा निर्माण झाली; तींत वायूनें आपल्या स्पर्शशक्तीसहित म्हणजे त्वगिंद्रियासहवर्तमान प्रवेश केला; त्या इंद्रियाच्या योगानें जीवाला स्पर्शज्ञान होतें. नंतर त्यास कान निर्माण झाले;त्यांत कर्णेंद्रियाच्या शक्तीसहित दिशांनीं प्रवेश केला; त्या योगानें त्यास शब्दज्ञान होतें. त्या पुरुषाच्या त्वचेंत ओषधींनीं रोमरूप शक्तीसहित प्रवेश केला; त्यांच्या योगानें जीवाला अंगावर कंड सुटलेली समजते. त्याला शिश्न उत्पन्न झालें; त्या जागीं प्रजापति रेतरूप शक्तीसह येऊन राहिला; त्यापासून जीवांना संभोगरूप आनंद प्राप्त होतो. तसेंच त्या पुरुषाला गुदद्वार उत्पन्न झालें; तेथें लोकपाल मित्र पायु नांवाच्या इंद्रियशक्तीसह राहिला; त्याच्या योगानें जीवाला मलत्याग करितां येतो. नंतर त्यास हात उत्पन्न झाले; त्यांत स्वर्गाचा अधिपति जो इंद्र, त्यानें, व्यवहार करण्याच्या शक्तीसह प्रवेश केला; त्यांच्या योगानें पुरुषाचा निर्वाह चालतो. मग त्यास पाय उत्पन्न झाले; त्यांत गतिरूप शक्तीसह लोकांचा स्वामी जो विष्णु तो प्रविष्ट झाला; त्याच्या योगानें

पुरुषास जावयाचें असतें तेथें तो जातो. मग त्यास हृदय उत्पन्न झालें; त्यांत चंद्र नें आपल्या मनोरूप शक्तीनें प्रवेश केला; तीमुळें पुरुषास संकल्पविकल्प करितां येतात. त्यास अहंकार उत्पन्न झाला; त्यांत आपल्या कर्मरूप शक्तीसह अहंकारवृत्ति जो रुद्र तो जाऊन राहिला; त्या योगानें पुरुष आपलें कर्तव्यकर्म करितो. नंतर त्या पुरुषास चित्त आणि बुद्धि हीं उत्पन्न झालीं; त्या स्थानीं ब्रह्मदेवानें चेतनशक्तीसह प्रवेश केला; त्या योगानें जीवास निश्चयात्मक ज्ञान उत्पन्न होतें. त्या विराट्पुरुषाच्या मस्तकापासून स्वर्गलोक, पायापासून पृथ्वी, आणि बेंबीपासून आकाश हीं उत्पन्न झालीं. ह्या तीन लोकांत म्हणजे स्वर्गलोक, भूलोक, आणि अंतरिक्षलोक ह्यांत सत्त्व, रज आणि तम ह्या तीन गुणांपासून झालेले देव, मनुष्यें आणि भूतें ( रुद्र, पार्षदांचे गण ) वगैरे दिसून येतात. वृद्धिंगत झालेल्या सत्त्वगुणाच्या योगानें देवांस स्वर्गलोक मिळाला; रजोगुणाच्या आधिक्यामुळें मनुष्यें व त्यांस अनुसरून असणारे गाई वगैरे प्राणी हे पृथ्वीवर राहूं लागले; तिसरा जो तमोगुण त्याच्या आधिक्यामुळें रुद्राच्या सेवकांचे गण भगवंताच्या नाभिरूप आकाशांत राहिले आहेत. हे कुरुकुलश्रेष्ठा, विराट्पुरुषाच्या मुखापासून वेद आणि ब्राह्मण उत्पन्न झाले; ब्राह्मण हे ईश्वराच्या मुखापासून उत्पन्न झाल्यामुळें, सर्व वर्णांमध्यें श्रेष्ठ असे गुरु होत. त्याच्या बाहूंपासून रक्षण करणें ही वृत्ति आणि क्षत्रिय निर्माण झाले; ते चोरांचिलटांच्या उपद्रवापासून इतर वर्णांचें रक्षण करितात. क्षत्रिय हे विष्णूचे अंशधारी आहेत; कां कीं, पालन करणें हें कर्म विष्णूचें आहे. विदुरा, शेतकी वगैरे वृत्ति आणि वैश्य हे विराट्पुरुषाच्या मांड्यांपासून उत्पन्न झाले; ते वैश्य धान्य वगैरे उत्पन्न करून सर्व लोकांचा निर्वाह चालवितात. ईश्वरापासून, धर्माची सिद्धि व्हावी म्हणून सेवाधर्म आणि शूद्र उत्पन्न झाले. त्यांच्या सेवाधर्मानें परमेश्वर संतोष पावतो. हे सर्व वर्ण आपापल्या वृत्तींसह उत्पन्न झाले, व त्यांच्याबरोबरच त्यांच्या उपजीविकेचीं साधनेंही उत्पन्न झालीं. म्हणून ते सर्व लोक आपापल्या धर्मानें परमेश्वराची आराधना करितात. काल, कर्म आणि स्वभाव ह्या शक्तींनीं युक्त जो परमेश्वर, त्याच्या मायेच्या प्रभावानें वृद्धिंगत झालेल्या त्या विराट्स्वरूपाचें वर्णन पूर्णपणें करण्यास कोण समर्थ होईल? तथापि आपल्या बुद्धीप्रमाणें, आणि मीं जसें ऐकिलें आहे त्याप्रमाणें, भगवंताचें यश मी वर्णन करितों; त्यानें, इतर विषयांचें विवेचन केल्यामुळें अपवित्र झालेली माझी वाणी शुद्ध होईल. साधूंचें निश्चयात्मक असें म्हणणें आहे कीं, ईश्वराच्या गुणांचें संकीर्तन करणें, हाच लोकांच्या वाणीला मोठा लाभ होय; आणि विद्वज्जनांनीं वर्णिलेलें ईश्वराचें कथामृत तत्परतेनें पिणें, हाच कर्णेंद्रियाला मुख्य लाभ होय. विदुरा, ब्रह्मदेवानें हजारों वर्षे समाधि लावून ईशचिंतनानें बुद्धि परिपक्व झाल्यानंतर ईश्वराचा महिमा वर्णन केला; पण तो त्यास पूर्णपणें वर्णितां आला नाहीं. कारण, ईश्वर त्याच्याही ज्ञानास अगम्य असा आहे. विदुरा, परमात्म्याची माया ही मोठमोठ्या लोकांस देखील मोहांत पाडिते, ह्यांत नवल तें कशाचें? साक्षात् सर्व लोकांचा अधिपति जो परमात्मा, त्यासही, आपल्या मायेची शक्ति किती आहे, हें तिच्या अनंतत्वामुळें समजत नाहीं; मग इतरांची काय कथा? मन, वाणी, रुद्र आणि सर्व देव हे देखील ज्याची प्राप्ति न होतां त्यापासून परत फिरतात, अशा त्या ईश्वरास माझा नमस्कार असो!

## अध्याय सातवा.

—:०:—

### विदुराचे मैत्रेयांस प्रश्न.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—राजा, व्यासपुत्र

विदुर मोठा ज्ञानसंपन्न होता. मैत्रेय मुनींनीं एवढा वेळ केलेलें भाषण ऐकून त्याची तृप्ति झाली, आणि त्यांच्या अगाध ज्ञानाबद्दल त्यानें मोठी प्रशंसा केली. तथापि त्यास कांहीं संशय उत्पन्न झाले, म्हणून त्यांच्या निराकरणार्थ त्यानें मैत्रेयांस प्रश्न विचारले.

विदुर म्हणाला:—ब्रह्मवर्या, ईश्वर केवळ ज्ञानस्वरूप असून, व सत्त्व, रज आणि तम ह्यांपासून होणाऱ्या विकारांचा परिणाम त्याजवर मुळींच होत नसतांही, त्याच्या ठिकाणीं गुणांचा आरोप करितात, तो कसा? आणि त्यानें अनेक क्रिया केल्या, हें तरी संभवतें कसें? लहान मुलांप्रमाणें तो लीलेनें ह्या सर्व क्रिया करितो म्हणावें, तर तेंही संभवत नाहीं. कारण, असें म्हटलें असतां वस्तुस्थितीशीं विरोध येतो. कसा तो पहा: लहान मुलाची खेळण्याकडे प्रवृत्ति असते ह्याचें कारण—त्याच्या मनांत खेळण्याची प्रबल इच्छा असते, किंवा त्याला एखाद्या खेळाडू मुलाचा सहवास असतो, हें होय. पण ईश्वराची गोष्ट तशी नाहीं. तो नित्य तृप्त असून आपल्याच ठिकाणीं रममाण होऊन राहणारा व अद्वितीय असा आहे. त्याला कोणाचाच सहवास नाहीं. तेव्हां तो खेळेल तरी कोणाबरोबर? महाराज, सत्त्व, रज आणि तम ह्या तीन गुणांनीं बनलेली जी माया, तिच्या योगानें भगवंतानें विश्व उत्पन्न केलें; तिच्या योगानेंच तो विश्वाचें पालन करितो; आणि लयही पण तो तिच्याच योगानें करितो परंतु ह्यावर अशी शंका येते कीं, जीवाचा जर अविद्येशीं संबंध असेल, तरच ह्या गोष्टी संभवतील; आणि जीव तर काल, अवस्था, देश, स्वतः आपण किंवा इतर कोणतेही पदार्थ ह्यांच्या योगानें कधींच ज्ञानभ्रष्ट होत नाहीं. त्याचें ज्ञान कधींही लोपत नसून तो सर्वदा ब्रह्मस्वरूप असतो; तेव्हां त्याला अविद्येचा संबंध घडतो, हें कसें? कालाच्या योगानेंही त्याचें स्वरूप लोपत नाहीं; म्हणजे ज्याप्रमाणें वीज लवते, पण ती क्षणमात्र टिकते, आणि मग तिचा लय होतो, त्याप्रमाणें जीवाचें नाहीं. कां कीं, तो नित्य आहे. अवस्थाभेदानेंही जीवाचें ज्ञान नष्ट होत नाहीं. पहा—कोणतीही गोष्ट नुक्तीच होऊन जाते, तेव्हां तिची आठवण असते, पण कांहीं काळ गेल्यावर ती नाहींशी होते; तसें जीवाचें होत नाहीं. कारण, त्याचें रूप अविकारी आहे. स्वतांच्या योगानें आपल्या स्वरूपाचा लोप जीवास होत नाहीं. स्वप्नांत धारण केलेले भिरनिराळे देह असत्य असतात, म्हणून त्यांचा जसा नाश होतो, तसा जीवाचा होत नाहीं; कारण तो सत्यस्वरूप आहे. दुसऱ्या वस्तूच्या योगानें जीवाचा लोप होत नाहीं. जसें—एक घट घेतला, तर त्याचा अभाव भिन्न जातीच्या वस्तूवर असतो; कां कीं, ती वस्तु तो घट नव्हे; तसें जीवाचें होत नाहीं. कारण, जीव हा एकच आहे. तेथें द्वैत नाहींच. आणखी, जीव हा अनेक शरिरांत राहिलेला असा ईश्वरच होय. मग त्यास भाग्यहीनता व कर्मामुळें क्लेश हे तरी कोठून होणार? हे ज्ञानसंपन्ना मैत्रेया, माझें मन ह्या अज्ञानरूपी संकटांत खेद पावत आहे. त्याला युक्तीनें बाहेर काढण्यास तूं समर्थ आहेस. म्हणून तू हा माझा मोह दूर कर.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, तत्त्व समजावें अशी विदुरास इच्छा होती; ह्यामुळें त्यानें मैत्रेयांस प्रश्न केल्यावर त्यांना मोठी मौज वाटली. कां कीं, त्यांचें अंतःकरण गर्वरहित व भगवन्माहात्म्य वर्णन करण्यास उत्सुक असें होतें. नंतर मैत्रेयांनीं विदुराला उत्तरें देण्यास आरंभ केला.

### मैत्रेयांचीं उत्तरें.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, परमात्मस्वरूप जीव सर्वैश्वर्यसंपन्न असतां तो दीनासारखा दिसतो, किंवा त्यास उपाधीचें बंधन आहे, हा जो वस्तुस्थितीशीं विरोध, तीच ईश्वराची माया होय.

उदाहरणार्थ असें पहा कीं, जीवास स्वप्न पडत असतें, तेव्हां एखाद्या वेळीं आपलें शिर तुटलें आहे, किंवा हस्तपादादिकांस मोठी दुखापत झाली आहे, असा विपर्यास झालेला दिसतो, पण तो खरोखरीचा नसतो; त्याप्रमाणेंच जीवाला बंधन व क्लेश हे केवळ भासतात मात्र, पण त्यास ते खरोखर नाहींत. आतां तूं म्हणशील कीं, जीव आणि ईश्वर हे एकच आहेत, तर जीवाच्या ठिकाणीं जसे बंधमोक्ष भासतात, तसे ते परमेश्वराच्या ठिकाणीं कां भासूं नयेत ? तर ऐक. पाण्यांत चंद्राचें बिंब पडतें; तेव्हां पाणी हाललें म्हणजे तें प्रतिबिंब हालतें आहे असें दिसतें; पण तो कंप आकाशांतील चंद्रास मुळींच नसतो. शिवाय, त्या प्रतिबिंबालाही जें चलन आहेसें दिसतें, तें पाण्यामुळें दिसतें; वस्तुतः तसें नाहीं. त्याप्रमाणें, देहादि उपाधींना साक्षिभूत अशा ह्या जीवास दीनता, बंध हे 'देहाचे' गुण येतात; त्यांचा संबंध ईश्वराकडे मुळींच जात नाहीं. तेच क्लेश, बंधन इत्यादि देहाचे गुण, वैराग्य प्राप्त होऊन परमेश्वराच्या दयेनें अंतःकरणांत भक्ति उत्पन्न झाली असतां इहलोकींच हळूहळू नष्ट होतात. झोंप लागली असतां जसे जीवाचे सर्व क्लेश दूर होतात. तशीं इंद्रियें जेव्हां सर्वांतर्यामी ईश्वराच्या ठिकाणीं दृढ आसक्त होतात, तेव्हां त्यांच्या द्वारा जीवाच्या सर्व दुःखांचा परिहार होतो. विदुरा, लोकांनीं गाइलेल्या श्रीकृष्णाच्या गुणानुवादांचे श्रवण केलें असतां तेवढ्यानेंच संपूर्ण दुःखांची शांति होते; मग त्याच्या चरणकमलांची जी भक्ति आपल्या मनांत उत्पन्न होईल, तिच्या योगानें संपूर्ण तापांचा उपशम झाल्यास नवल तें काय ?

### विदुराचे आणखी प्रश्न.

हें ऐकून विदुर म्हणाला:—मैत्रेया, आपली सुंदर उक्ति ही तरवारीसारखी आहे. तिनें माझ्या मनांतील संशय तोडून टाकिला. ईश्वर स्वतंत्र आहे, आणि जीव परतंत्र आहे, ह्या दोन गोष्टी मला निश्चयानें समजल्या. जीवाला क्लेश आणि बंधन हीं होतात, तीं ईश्वराच्या मायेमुळें होतात, हें जें तुम्हीं सांगितलें, तें मला चांगलें समजलें. जीवाला बंध आणि क्लेश होतात, हें म्हणणें वस्तुतः निराधार आहे. मला जी पूर्वी शंका उत्पन्न झाली, ती माझ्या कोत्या ज्ञानामुळें झाली. जो केवळ अज्ञानी असून संसारांत आसक्त असतो, तो एक सुखी असतो; किंवा जो पूर्ण ज्ञानी असतो, त्यासही सुख होतें. पण जे लोक अधले मधले असतात, म्हणजे धड ज्ञानी नसतात, व अज्ञानीही नसतात, त्यांना दुःखच होतें. आतां, संसार हा भासमान आहे, असा माझा निश्चय झाला; व आपल्या चरणांच्या सेवेनेंकरून तो भासही मी दूर घालवीन. हे मुनिश्रेष्ठा, तुमच्यासारख्यांच्या सेवेनें श्रीकृष्णाच्या चरणांविषयीं अत्यंत प्रेम उत्पन्न होतें, आणि त्या योगानें सर्व संकटें दूर होतात. ज्यांच्या पदरीं पुण्य फार, त्यांसच साधुपुरुषांची सेवा घडते. कां कीं, त्यांच्या मंडळींत, संपूर्ण देवांचा नायक जो श्रीकृष्ण, त्याचें कीर्तन होत असतें. ब्रह्मवर्या, आपल्या संगतीच्या लाभानें मी स्वतांस मोठा धन्य समजतों. सृष्टीच्या आरंभीं परमात्म्यानें महत्तत्त्व, अहंकार इत्यादि तत्त्वें, आणि इंद्रियें, देवता वगैरे क्रमानें उत्पन्न केल्या; आणि त्यांच्या अंशांनीं विराट्देह धारण करून त्यांमध्यें आपण स्वतः प्रवेश केला. त्या विराट्पुरुषास सर्वांचा मूळ पुरुष असें म्हणतात. त्यास हजारों पाय, डोकीं, हात इत्यादि अवयव आहेत. त्या विराट्शरीरांतच हे सर्व लोक एकमेकांस दाटी न करितां मोकळेपणें राहतात; आणि त्या विराट्शरीरांच इंद्रियें, त्यांचे विषय व त्यांच्या देवता ह्या तिहींसह दहा प्रकारचा प्राण राहिला. हें जसें आपण निरूपण केलें, तसें, ज्याच्यापासून ब्राह्मणादि वर्ण उत्पन्न झाले, त्या

ब्रह्मदेव इत्यादि विभूतींचें वर्णन आपण मला सांगा. तसेंच, त्यांपासून त्यांचे मुलगे, नातू, पणतू, गोत्रज इत्यादि प्रकारांनीं ज्या प्रजा उत्पन्न झाल्या, व ज्यांच्या योगानें हें सर्व विश्व व्यापून गेलें आहे, त्यांचेंही वर्णन मला सांगा. मुनिवर्य, सर्व प्रजापतींत श्रेष्ठ जो ब्रह्मदेव, त्यानें कोणकोणते प्रजापति उत्पन्न केले? त्यानें प्रथम कोणती सृष्टि केली? पुढें त्या सृष्टीचे कोणकोणते भेद केले? मनु आणि मन्वंतरांतील मुख्य राजे कोणकोण झाले? मनूंच्या व त्या राजांच्या वंशांत कोणकोण जन्मास आले? व त्यांनीं कायकाय केलें? मुने, हें सर्व सांगा. मैत्रेया, पृथ्वीच्या वर आणि खालीं जे लोक आहेत, त्यांची आणि भूलोकांची रचना व लांबीरुंदीचें प्रमाण किती आहे हेंही मला सांगा. पशु, मनुष्य, देव, सर्प, पांखरें वगैरे जरायुज, स्वेदज, आणि उद्भिज्ज ह्यांच्या सृष्टीचे सर्व विभाग कसे झाले, तेंही मला सांगा. लक्ष्मीपति जो ईश्वर, तो सत्त्व, रज आणि तम ह्यांच्या योगानें ब्रह्मा, विष्णु, शिव इत्यादि अवतार घेऊन विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं करतो, व त्यांना आश्रयही देतो; त्याच्या उदार गुणांचें वर्णन करा. तसेंच वर्ण, आणि आश्रम ह्यांचे विभाग, त्यांचीं रूपें, आचार आणि स्वभाव हे सांगून ऋषींचीं जन्में आणि कर्मे व वेदांचे विभाग हेंही सर्व सांगा. यज्ञांचे निरनिराळे प्रकार, योग, ज्ञान आणि सांख्य ह्यांचे मार्ग, आणि भगवंतानें सांगितलेला तंत्रमार्ग हे सर्व सांगा. महाराज, वेदविरुद्ध जो पाखंडमार्ग त्याचें लक्षण काय? सृष्टीच्या उपक्रमाच्या उलट सर्वांचा पुनः आपापल्या कारणांत लय कसा होतो? गुण आणि कर्मे ह्यांच्या योगानें जीवाला कोणकोणत्या गति मिळतात? धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्यांचे उपाय कोणते आहेत? त्यांचें कोणत्या रीतीनें आचरण केलें असतां एकाचा उपाय दुसऱ्याचे प्राप्तीस अपाय करणार नाहीं? मुने, हें सर्व सांगून उपजीविका, दंडनीति, आणि शास्त्र ह्यांचे प्रकार मला सांगा. श्राद्धाचा विधि कसा आहे? पितरांची उत्पत्ति कोणत्या प्रकारें झाली? ग्रह, नक्षत्रें आणि तारा ह्यांची कालचक्रामध्यें रचना कशी आहे? दान, तप, यज्ञयाग आणि धर्मशाळा, तळाव इत्यादि बांधणें ह्यांचें फळ कोणतें? तसेंच, प्रवासी लोकांचे आणि संकटानें ग्रस्त झालेल्या लोकांचे धर्म कोणते, हें सर्व सांगा. मैत्रेया, धर्माचा पालक जो ईश्वर, तो प्रसन्न होण्यास कशा प्रकारें वर्तन ठेवावें, व कोणत्या पुरुषांवर तो कृपा करितो, तें सर्व सांगा. हे द्विजोत्तमा, आपल्यासारखे जे दीनवत्सल गुरु असतात, ते आपल्या आज्ञाधारक शिष्यांस व पुत्रांस न विचारतांही कल्याणाची गोष्ट सांगतात. मैत्रेया, तत्त्वांचा प्रलय किती प्रकारचा असतो? प्रलयकालीं भगवंताची सेवा कोण करीत असतात? तो प्रभु निजला असतां त्यांत लीन कोण होतात? जीवाचें स्वरूप कोणतें? परमेश्वराचें स्वरूप काय? व त्या दोघांचें ऐक्य कसें होतें? तसेंच, गुरुशिष्यांच्या संवादरूपानें व्यक्त झालेलें उपनिषदांतील ज्ञान कोणतें? मुने, हें सर्व सांगून, पंडितांनीं त्या ज्ञानाचीं जीं जीं साधनें सांगितलीं आहेत, तींही सांगा. दुसऱ्यांनीं सांगितल्यावांचून मनुष्यास ज्ञान, भक्ति आणि वैराग्य ह्यांची प्राप्ति कोठून होणार? मी अज्ञान आहें. कां कीं, अविद्येनें मला अगदीं ग्रासिलें आहे; म्हणून मजविषयीं स्नेहभाव ठेवून, परमेश्वराचीं कार्ये समजावीं ह्या इच्छेनें विचारलेल्या ह्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें मला द्या. मी या संसाराच्या घोंटाळ्यांत सांपडलों आहें. मला अभय द्या. जीवाला अभय दिलें असतां जें पुण्य लागतें, त्या पुण्याच्या सोळाव्या अंशानेंही सर्व वेद, यज्ञ, तप आणि नानाप्रकारचीं दानें हीं पुण्य देण्यास समर्थ होत नाहींत.

शुकाचार्य म्हणाले:—राजा, ह्याप्रमाणें, पुराणांतील विषयांचें ज्ञान व्हावें म्हणून विदुरानें

प्रश्न केले असतां मैत्रेयांस मोठा हर्ष होऊन ईश्वराच्या कथा सांगण्याविषयीं त्यांस प्रेरणा झाली; आणि हंसत हंसत त्यांनी त्यांचीं उत्तरें देण्यास प्रारंभ केला.

## अध्याय आठवा.

—:०:—

### भागवत पुराणाची पूर्वपीठिका.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, पूरुवंशांत साक्षात् यमानें तुझ्या रूपानें जन्म घेतलें असल्यामुळें, तो वंश साधूंना मान्य असा झाला आहे. शिवाय, तूं परमेश्वराचा अनन्य भक्त आहेस. भगवंताच्या चरित्रमालेला तूं क्षणोक्षणीं नवी नवी टवटवी आणितोस! विदुरा, माणसें क्षुद्र अशा सुखासाठीं यत्न करतात, पण त्यांस सुख प्राप्त न होतां उलट मोठें दुःख मात्र सोसावें लागतें. तेव्हां त्याचा उपशम व्हावा म्हणून मी तुला भागवत नामक पुराण सांगतों. हें पुराण साक्षात् शेषानें सनत्कुमारादि ऋषींस सांगितलें. विदुरा, त्या नागराजास संकर्षण हेंही नांव आहे. त्याच्या ज्ञानाची गति ज्यांत होत नाहीं, असा कोणताही विषय नाहीं. एकदा तो नागराज पाताळांत बसला असतां, सनत्कुमारादि ऋषि परमेश्वरविषयक ज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां त्याजकडे गेले. त्या वेळीं तो संकर्षण प्रभु भगवान वासुदेवाच्या चिंतनांत निमग्न झाला होता व त्याची वृत्ति अंतर्मुख झाली होती. भगवद्ध्यानांत तो इतका निमग्न झाला होता, तरी सनत्कुमारादिकांचा उत्कर्ष व्हावा म्हणून त्यानें आपले डोळे किलकिले केले. त्याचें आसन म्हणजे एक कमलपुष्प असून, आपणांस अनुरूप वर मिळावा ह्या हेतूनें मोठमोठ्या नागांच्या कन्या त्याच्या चरणांचें पूजन करीत होत्या. गंगा नदीच्या पवित्र जलानें भिजलेल्या आपल्या जटाजूटांच्या योगानें त्या पादपीठरूप कमलास स्पर्श करून, त्याचा प्रभाव जाणणाऱ्या त्या ऋषींनीं सद्गदवाणीनें संकर्षणाची स्तुति केली. त्या वेळीं त्यांचे कंठ सद्गदित झालेले असल्यामुळें, त्यांच्या तोंडांतून नीटसे शब्दही उमटत नव्हते. विदुरा, त्या नागराजाच्या स्वरूपाचें वर्णन किती करावें! त्याच्या हजार फणांवर हजार मुकुट होते, व त्या मुकुटांवरील रत्नांची प्रभा चोहीकडे फांकली होती. असो. नंतर त्या शेषानें सनत्कुमारांस हें भागवत सांगितलें. सनत्कुमार तें ऐकण्यास योग्यच होते. कारण, त्यांच्या मनाची निवृत्तिमार्गाकडे प्रवृत्ति होती. पुढें नियमनिष्ठ अशा सांख्यायन ऋषींनीं प्रश्न केल्यावरून सनत्कुमारांनीं हें भागवत सांख्यायनांस सांगितलें. सांख्यायन हे परमहंसांच्या धर्मांत निष्णात होते. भगवंताच्या अवतारलीला गाण्याची त्यांस फार आवड होती. म्हणून त्यांनीं, आमचे गुरु जे पराशर त्यांस व बृहस्पतींसही तें सांगितलें. विदुरा, पुलस्त्य ऋषींनीं पराशरास ' तूं मोठा पुराणवक्ता होशील ' असा वर दिला होता. त्याप्रमाणें तो मोठा पुराणवक्ता झाला, व त्या दयाळू पराशरापासून हें श्रेष्ठ पुराण मला मिळालें. तुझा स्वभाव श्रद्धाळू व नम्र आहे, म्हणून मी आतां तें तुला सांगतों.

### सूक्ष्मभूतें, पद्मकोश व ब्रह्मदेव ह्यांची उत्पत्ति.

मैत्रेय म्हणतातः—विदुरा, हें विश्व जेव्हां प्रलयकालच्या उदकांत बुडून गेलें होतें, तेव्हां भगवान नारायण शेषशय्येवर पडून होता. त्याचे डोळे योगनिद्रेनें मिटले होते, तथापि त्याची चैतन्यशक्ति जागृत होती. तो आत्मस्वरूपीं रममाण झाला होता, म्हणून त्याचे एकंदर व्यापार सुटले होते. त्या वेळीं त्यानें सर्व सूक्ष्मभूतें आपल्या शरिरांत लीन करून ठेविलीं होतीं; व आपल्या कालरूप शक्तीला प्रेरणा देऊन, पुनः सृष्टि निर्माण करण्यास योग्य वेळीं तिनें आपणास जा-

१ पृष्ठ ४१ टीप पहा.

गृत करावें अशी व्यवस्था केली होती. अशा प्रकारें, लांकडांतील अग्नीप्रमाणे आपल्या सामर्थ्याचा निरोध करून तो परमात्मा चिच्छक्तीसह त्या उदकांत निद्रित राहिला होता. अशा स्थितींत एक हजार चौकड्यांचा काल निघून गेला. पुढें त्याच्या कालरूप शक्तीनें त्यास सृष्टि करावयास उद्युक्त केलें असतां, आपल्या शरिरांत बीजरूपानें लीन असणाऱ्या लोकांस त्यानें अवलोकन केलें; आणि सृष्टि उत्पन्न करावी ह्या हेतूनें त्या भगवंतानें आपल्या देहांतील सूक्ष्मभूतांकडे पाहिलें. सृष्टि उत्पन्न होण्यास अनुकूल असा काल, व त्याला अनुकूल असणारा सृष्टिकर्ता रजोगुण ह्या दोघांनीं सूक्ष्मभूतांत चलन उत्पन्न केलें. तेव्हां तीं भगवंताच्या देहांतून बाहेर पडूं लागलीं; व त्याच्या नाभींतून कमलाच्या कळयाच्या रूपानें एकाएकीं वर आलीं; कारण, पूर्वकर्माला जागृत करणाऱ्या कालानें त्यांस प्रेरणा दिली होती. त्या पद्मकोशाच्या तेजानें पाण्यावर चोहोंकडे सूर्यप्रकाशासारखा प्रकाश पडला. हा स्वयंभू पद्मकोशच जीवांना त्यांचे भोग्य पदार्थ निर्माण करून देणारा होय. त्यांतच अंतर्यामिरूपानें भगवान विष्णूनें प्रवेश केला. त्या कमलांतून वेदस्वरूप असा ब्रह्मदेव, ज्यास लोक स्वयंभू म्हणतात, तो उत्पन्न झाला. तो कमळावर बसला असतां सृष्टि त्याच्या दृष्टीस पडेना; तो चोहोंकडे अंतरिक्षांत पाहूं लागला; तेव्हां त्याला चार दिशांस चार तोंडें उद्भवलीं. त्या वेळेस प्रलयकालच्या वाऱ्यानें तें उदक उसळत असून त्यावर हजारों तरंग उठत होते. अशा त्या पाण्यामध्यें तें कमल उगवलेलें होतें. आदिदेव जो ब्रह्मदेव तो त्या कमळावर बसला होता, तरी तें कमल काय आहे, ह्याची त्यास कल्पना होईना. तसेंच, लोकतत्त्व काय आहे, व आपण कोण आहों, हेंही त्याच्या लक्षांत येईना. तेव्हां तो आपल्याशींच म्हणतो: "मी जो ह्या कमलावर बसलों आहें, तो कोण? ह्या उदकांत दुसरें कांहींही नसतां हें कमल उगवलें आहे, तेव्हां ह्यास आधारभूत असें कांहीं तरी खालीं असलें पाहिजे." असा विचार करून त्यानें त्या कमलाच्या देठाच्या छिद्रांतून पाण्यांत प्रवेश केला. आपला उत्पन्नकर्ता कोण, ह्या मोहामध्यें पडून तो शोध करीत असतां फारच मोठा काल निघून गेला. विदुरा, काळ हें एक शस्त्रच आहे. त्याच्या योगानें जीवास भय उत्पन्न होतें व आयुष्याचा नाश होतो. ब्रह्मदेवाचा हा गेलेला काल शंभर वर्षांचा होता. इतका कालपर्यंत ब्रह्मदेव त्या कमलाच्या आधाराचा शोध करीत होता; तरी त्यास त्याचा मुळींच शोध लागला नाहीं. शेवटीं तो थकला व परत येऊन आपल्या आसनावर बसला. मग हळूहळू आपलें मन एकाग्र करून व श्वासाचा निरोध करून त्यानें समाधि लाविला. अशा ध्यानस्थितींत आणखी शंभर वर्षें निघून गेलीं. त्या अवकाशांत योगबलानें त्यास ज्ञान उत्पन्न झालें, व शोध करीत असतांही पूर्वी जें सांपडलें नाहीं, तें पद्मकोशाचें आधारभूत ईश्वरस्वरूप त्याला आपल्या हृदयांतरींच दिसूं लागलें. विदुरा, त्या अनुपम रूपाचें काय वर्णन करावें!

## ब्रह्मदेवास दिसलेलें ईश्वरस्वरूप.

मृणालगौरायतशेषभोगपर्यंक एकं पुरुषं शयानम् ।
फणातपत्रायुतमूर्धरत्नद्युभिर्हतध्वांतयुगांततोये ॥
प्रेक्षां क्षिपंतं हरितोपलाद्रेः संध्याभ्रनीवेरुरुरुक्ममूर्ध्नः ।
रत्नोदधारौषधिसौमनस्यवनस्रजो वेणुभुजांघ्रिपांघ्रेः ॥

आयामतो विस्तरतः स्वमानदेहेन लोकत्रयसंग्रहेण ।
विचित्रदिव्याभरणांशुकानां कृतश्रिया ऽपाश्रितवेषदेहम् ॥
पुंसां स्वकामाय विविक्तमार्गैरभ्यर्चितां कामदुघांघ्रिपद्मम् ।
प्रदर्शयंतं कृपया नखेंदुमयूखभिन्नांगुलिचारुपत्रम् ॥
मुखेन लोकार्तिहरस्मितेन परिस्फुरत्कुंडलमंडितेन ।
शोणायितेनाधरबिंबभासा प्रत्यर्हयंतं सुनसेन सुभ्र्वा ॥
कदंबकिंजल्कपिशंगवाससा स्वलंकृतं मेखलया नितंबे ।
हारेण चानंतधनेन वत्स श्रीवत्सवक्षःस्थलवल्लभेन ॥
परार्ध्यकेयूरमणिप्रवेकपर्यस्तदोर्दंडसहस्रशाखम् ।
अव्यक्तमूलं भुवनांघ्रिपेंद्रमहींद्रभोगैरधिवीतवल्शम् ॥
चराचरौको भगवन्महीध्रमहींद्रबंधुं सलिलोपगूढम् ।
किरीटसाहस्रहिरण्यशृंगमाविर्भवत्कौस्तुभरत्नगर्भम् ॥
निवीतमाम्नायमधुव्रतश्रिया स्वकीर्तिमय्या वनमालया हरिम् ।
सूर्येंदुवाय्वग्न्यगमं त्रिधामभिः परिक्रमत्प्राधनिकैर्दुरासदम् ॥

'कमलाच्या तंतूप्रमाणें शुभ्र अशा भव्य शेषशय्येवर तो पुरुष निजला होता. शेषाच्या सहस्र फणा त्याच्या मस्तकावर शोभत होत्या, व मुकुटावरील रत्नांची प्रभा त्या प्रळयकाळच्या जलावर पडल्यामुळें आसपासचा अंधकार नाहींसा झाला होता. एखाद्या पाचेच्या पर्वताला सोन्याचीं अनेक शिखरें असावीं; रत्नें, स्फटिकाप्रमाणें निर्मळ उदकाचे प्रवाह, फुलें व लता हीं त्या पर्वतावर चोहोंकडे दिसावीं; शिखराच्या सभोंवार सायंकाळचे पिंगट व चित्रविचित्र ढग एकत्र व्हावे; तसेंच हात व पाय ह्यांचा आरोप करण्यास, त्यावर वेलींचीं व मोठमोठ्या वृक्षांची गर्दी असावी; अशी घटना घडून आली असतां तो पर्वत जसा शोभेल, त्यापेक्षां किती तरी पटीनें जास्त तो पुरुष रत्नें, मोतीं, तुलसी व फुलें ह्यांचे हार, आणि हात व पाय ह्यांच्या योगानें शोभायमान दिसत होता. विदुरा, त्या पुरुषाचा देह फारच विस्तीर्ण होता;--इतका कीं, स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे तीन लोक त्यांत समाविष्ट झाले होते. त्यानें जीं वस्त्रें व भूषणें धारण केलीं होतीं, त्यांपासून त्यास शोभा येण्याच्या ऐवजीं उलट त्या वस्त्रांभूषणांसच त्याच्या देहामुळें अधिक शोभा आलेली होती. आपले मनोरथ पूर्ण व्हावे म्हणून लोक ज्यांची अनन्यभावानें सेवा करितात, ते त्याचे चरण कमलांप्रमाणें दिसत होते; व त्यांजवर चंद्रकिरणांप्रमाणें नखांची प्रभा पडल्यामुळें प्रफुल्लित झालेलीं तीं चरणकमलें त्यानें भक्तांचे मनोरथ पूर्ण करण्याकरितां किंचित् उचलून धरिलीं होतीं. त्याच्या मुखावर स्मितहास्याची झांक दिसत होती; अधरोष्ठ आरक्त दिसत असून कर्णांमध्यें कुंडलें झळकत होतीं; नासिका सरळ असून रेखलेल्या भुवयांच्या योगानें मुखकमल फारच शोभायमान दिसत होतें; आणि मधुर हास्याच्या योगानें आपल्या भक्तांचें दुःख दूर करीत करीत तो त्यांचा सत्कारच करीत आहे कीं काय असा भास होता होता. त्या पुरुषानें जो पीतांबर धारण केला होता, तो कदंबवृक्षाच्या फुलांच्या केसराप्रमाणें पिंगट रंगाचा

असून त्यावरून कमरपट्टा होता; व त्याच्या वक्षस्थलावर श्रीवत्सलांछन असून, कंठामध्यें धारण केलेला अमोलिक हार त्यावर रुळत होता. विदुरा, जगन्नायकाच्या त्या देहावर

**चंदनवृक्षाचें रूपक**

कल्पिलें, तर तें बरोबर लागू पडतें. उत्तम भूषणांनीं आणि बहुमोल अशा रत्नांनीं भूषित झालेले त्याचे बाहु, फळें व पुष्पें ह्यांनीं भरलेल्या चंदनाच्या सहस्त्रावधि शाखांप्रमाणें दिसत होते; चंदनाचें मूळ अगोचर असतें, अर्थात् तें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं; त्याप्रमाणें, त्या अद्वितीय पुरुषरूपी चंदनाचें मूळ म्हणजे माया किंवा ब्रह्म हीं अस्पष्ट होतीं; चंदनाच्या खांद्या मोठमोठ्या सर्पांनीं वेष्टिलेल्या असतात, तसेच त्याचेही स्कंध नागराजाच्या फणांनीं वेष्टित होते. त्याचप्रमाणें, विदुरा, त्या पुरुषावर एखाद्या मोठ्या

**पर्वताचें रूपक**

कल्पिलें तरी चालेल. वृक्ष, पाषाण, पशु, पक्षी इत्यादि स्थावरजंगम पदार्थांस जसा पर्वत आश्रयभूत असतो, तसा तो पुरुषही स्थावरजंगमात्मक अशा सर्व जगास आश्रयभूत होता; पर्वतावर ज्याप्रमाणें मोठे भुजंग असतात, त्याप्रमाणें ह्याजवरही शेषानें आपल्या फणा उभारिल्या होत्या; मैनाकासारखा एखादा पर्वत जसा पाण्यानें वेष्टित असतो, तसा हाही प्रलयकालच्या उदकानें वेष्टित होता; त्या पुरुषाच्या मस्तकावर असणारे किरीट हींच पर्वताचीं सुवर्णमय शृंगें होत; पर्वतावर जशीं रत्नें असतात, तसा त्याजवरही कौस्तुभ मणि होता. विदुरा, त्या नारायणाच्या गळ्यांत कीर्तिमय वनमाला झळकत असून वेदरूपी भ्रमरांच्या योगानें तिला जास्तच शोभा आलेली होती. त्या पुरुषाचें तेज व सामर्थ्य ह्यांपुढें, सूर्य, अग्नि, वायु व चंद्र हेही निस्तेज दिसत होते; आणि गरज पडली असतां वाटेल त्या ठिकाणीं उत्पन्न होणारीं व संरक्षणार्थ सभोंवतीं फिरणारी अशीं सुदर्शनादि आयुधें त्याजवळ असल्यामुळें तो शत्रूंना अजिंक्य होता.'

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, असें तें रूप ब्रह्मदेवाच्या दृष्टीस पडतांच त्या श्रेष्ठ प्रजापतीस सृष्टि उत्पन्न करण्याचें ज्ञान प्राप्त झालें; आणि भगवंताच्या नाभिरूप सरोवरांतून उद्भवलेलें तें कमल, त्यावर स्थित असलेलें आपलें स्वतःचें रूप, प्रलयकालचें उदक, आकाश, व वायु हीं एवढीं मात्र त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलीं. दुसरें कांहीं देखील त्यास दिसलें नाहीं. ब्रह्मदेव रजोगुणानें व्याप्त होता. त्यास सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा झाली असतां, ज्यांत सर्व सृष्टि बीजरूपानें वास करीत आहे, अशा ह्या वस्तु त्याच्या दृष्टीस पडल्या. तेव्हां तो सृष्टीची उत्पत्ति करण्यास उद्युक्त झाला, आणि ज्याच्या मार्गाचा थांग लागत नाहीं, व जो स्तुतीस पात्र आहे, अशा परमेश्वराची त्यानें अनन्यभावानें स्तुति केली.

# अध्याय नववा.

—:०:—

## ब्रह्मदेवानें केलेली भगवंताची स्तुति.

ब्रह्मोवाच—

**ज्ञातोऽसि मेऽद्य सुचिरान्ननु देहभाजां न ज्ञायते भगवतो गतिरित्यवद्यम्।**
**नान्यत्त्वदस्ति भगवन्नपि तन्न शुद्धं मायागुणव्यतिकराद्यदुरुर्विभासि ॥**

रूपं यदेतदवबोधरसोदयेन शश्वन्निवृत्ततमसः सदनुग्रहाय।
आदौ गृहीतमवतारशतैकबीजं यन्नाभिपद्मभवनादहमाविरासम्॥
नातः परं परम यद्भवतः स्वरूपमानंदमात्रमविकल्पमविद्धवर्चः।
पश्यामि विश्वसृजमेकमविश्वमात्मन् भूतेंद्रियात्मकमदस्त उपाश्रितोऽस्मि॥
तद्वा इदं भुवनमंगल मंगलाय ध्याने स्म नो दर्शितं त उपासकानाम्।
तस्मै नमो भगवतेऽनुविधेम तुभ्यं योऽनादृतो नरकभाग्भिरसत्प्रसंगैः॥
ये तु त्वदीयचरणांबुजकोशगंधं जिघ्रंति कर्णविवरैः श्रुतिवातनीतम्।
भक्त्या गृहीतचरणः परया च तेषां नापैषि नाथ हृदयांबुरुहात्स्वपुंसाम्॥
तावद्भयं द्रविणगेहसुहृन्निमित्तं शोकः स्पृहा परिभवो विपुलश्च लोभः।
तावन्ममेत्यसदवग्रह आर्तिमूलं यावन्न तेऽङ्घ्रिमभयं प्रवृणीत लोकः॥
दैवेन ते हतधियो भवतः प्रसंगात्सर्वाशुभोपशमनाद्विमुखेंद्रिया ये।
कुर्वंति कामसुखलेशलवाय दीना लोभाभिभूतमनसोऽकुशलानि शश्वत्॥
क्षुत्तृट्त्रिधातुभिरिमा मुहुरर्द्यमानाः शीतोष्णवातवर्षैरितरेतराच्च।
कामाग्निनाऽच्युतरुषा च सुदुर्भरेण संपश्यतो मन उरुक्रम सीदते मे॥
यावत्पृथक्त्वमिदमात्मन इंद्रियार्थमायाबलं भगवतो जन ईश पश्येत्।
तावन्न संसृतिरसौ प्रतिसंक्रमेत व्यर्थापि दुःखनिवहं वहती क्रियार्था॥
अह्न्यापृतार्तकरणा निशि निःशयाना नानामनोरथधिया क्षणभग्ननिद्राः।
दैवाहतार्थरचना ऋषयोऽपि देव युष्मत्प्रसंगविमुखा इह संसरंति॥
त्वं भावयोगपरिभावितहृत्सरोज आस्से श्रुतेक्षितपथो ननु नाथ पुंसाम्।
यद्यद्धिया त उरुगाय विभावयंति तत्तद्वपुः प्रणयसे सदनुग्रहाय॥
नातिप्रसीदति तथोपचितोपचारैराराधितः सुरगणैर्हृदि बद्धकामैः।
यत्सर्वभूतदययाऽसदलभ्ययैको नानाजनेष्ववहितः सुहृदंतरात्मा॥
पुंसामतो विविधकर्मभिरध्वराद्यैर्दानेन चोग्रतपसा व्रतचर्यया च।
आराधनं भगवतस्तव सत्क्रियाऽर्थो धर्मोऽर्पितः कर्हिचिद्ध्रियते न यत्र॥
शश्वत्स्वरूपमहसैव निपीतभेदमोहाय बोधधिषणाय नमः परस्मै।
विश्वोद्भवस्थितिलयेषु निमित्तलीलारासाय ते नम इदं चकृमेश्वराय॥
यस्यावतारगुणकर्मविडंबनानि नामानि येऽसुविगमे विवशा गृणंति।
ते नैकजन्मशमलं सहसैव हित्वा संयांत्यपावृतमृतं तमजं प्रपद्ये॥
यो वा अहं च गिरिशश्च विभुः स्वयं च स्थित्युद्भवप्रलयहेतव आत्ममूलम्।
भित्त्वा त्रिपाद्ववृध एक उरुप्ररोहस्तस्मै नमो भगवते भुवनद्रुमाय॥
लोको विकर्मनिरतः कुशले प्रमत्तः कर्मण्ययं त्वदुदिते भवदर्चने स्वे।
यस्तावदस्य बलवानिह जीविताशां सद्यश्छिनत्त्यनिमिषाय नमोऽस्तु तस्मै॥
यस्माद्बिभेम्यहमपि द्विपरार्धधिष्ण्यमध्यासितः सकललोकनमस्कृतं यत्।

तेपे तपो बहुसवो ऽवरुरुत्समानस्तस्मैनमो भगवतेऽधिमखाय तुभ्यम्॥
तिर्यङ्मनुष्यविबुधादिषु जीवयोनिष्वात्मेच्छयात्मकृतसेतुपरीप्सया यः ।
रेमे निरस्तरतिरप्यवरुद्धदेहस्तस्मै नमो भगवते पुरुषोत्तमाय ॥
योऽविद्ययानुपहतोऽपि दशार्धवृत्त्या निद्रामुवाह जठरीकृतलोकयात्रः।
अंतर्जलेऽहिकशिपुस्पर्शानुकूलां भीमोर्मिमालिनि जनस्य सुखं विवृण्वन् ॥
यन्नाभिपद्मभवनादहमासमीड्य लोकत्रयोपकरणो यदनुग्रहेण ।
तस्मै नमस्त उदरस्थभवाय योगनिद्रावसानविकसन्नलिनेक्षणाय ॥
सोयं समस्तजगतां सुहृदेक आत्मा सत्त्वेन यन्मृडयते भगवान्भगेन ।
तेनैव मे दृशमनुस्पृशताद्यथाऽहं स्रक्ष्यामि पूर्ववदिदं प्रणतप्रियोसौ ॥
एष प्रपन्नवरदो रमयात्मशक्त्या यद्यत्करिष्यति गृहीतगुणावतारः ।
तस्मिन्स्वविक्रममिदं सृजतोऽपि चेतो युंजीत कर्मशमलं च यथा विजह्याम् ॥
नाभिन्हृदादह सतोऽम्भसि यस्य पुंसो विज्ञानशक्तिरहमासमनंतशक्तेः ।
रूपं विचित्रमिदमस्य विवृण्वतो मे मारीरिषीष्ट निगमस्य गिरां विसर्गः ॥
सोऽसावदभ्रकरुणो भगवान्विवृद्धप्रेमस्मितेन नयनांबुरुहं विजृंभन् ।
उत्थाय विश्वविजयाय च नो विषादं माध्व्या गिराऽपनयतात्पुरुषः पुराणः ॥

ब्रह्मदेव म्हणाला:—भगवंता, पुष्कळ काळपर्यंत तुझी उपासना केली, तेव्हां मला आज तुझें ज्ञान झालें. प्राण्यांचा हा महादोष आहे कीं, त्यांस तुझें ज्ञान होत नाहीं. तुजवांचून दुसरें कांहीं सुद्धां सत्य नाहीं. जें जें म्हणून सत्य आहे असें भासतें, तें तें वस्तुतः मिथ्या आहे. सत्त्व, रज व तम हे जे मायेचे तीन गुण, त्यांचा आश्रय करून तूंच त्यांत ओतप्रोत भरलेला आहेस. ह्यामुळें हा सर्व पसारा सत्य वाटतो. देवा, तुझ्या ठिकाणीं ज्ञानशक्ति सदैव जागृत असल्यामुळें तेथें अज्ञानाचा मुळींच रिघाव होत नाहीं. भक्तांचीं दुःखें निवारण करण्याकरितां तूं जे जे अवतार घेतोस, त्यांचें मूळ बीज हेंच तुझें रूप होय. भगवंता, तुझें जें रूप भेदरहित, प्रकाशात्मक, आनंदमय, निर्विकार असें आहे, तें, ज्याच्या नाभिकमलापासून मी उत्पन्न झालों, त्या ह्या स्वरूपाहून निराळें असेलसें मला वाटत नाहीं. सर्व सृष्टीला उत्पन्न करून तीपासून अलिप्त असणारें तुझें रूप हेंच. हेंच रूप भूतें, इंद्रियें व मन ह्यांस आश्रयभूत आहे. ईश्वरा, तुझ्या ह्या अद्वितीय स्वरूपाचाच आश्रय करून मी तुला शरण आलों आहें. उपासना करण्याचें मुख्य स्वरूप हेंच होय. आम्हां भक्तांचें कल्याण व्हावें म्हणूनच तूं हें रूप ध्यानांत दाखविलेंस. नास्तिक लोक तुझा अनादर करून तुझ्या अस्तित्वाविषयीं कुतर्क काढून वाद करितात; परंतु त्यांचीं तीं मनें म्हणजे नरकाची वाट दाखविणाऱ्या मशालीच होत; तिकडे यत्किंचित्‌ही लक्ष न देतां, षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा तुझ्या स्वरूपास आम्ही वंदन करितों. प्रभो, वेदरूप वायूनें वाहून आणिलेल्या तुझ्या चरणरूप कमलांच्या सुगंधाचें अर्थात् तुझ्या सुकीर्तिमान चरित्रांचें जे पुरुष प्रेमपुरस्सर सेवन करितात, त्यांची तुझ्या चरणकमलांचे ठायीं दृढभाक्ति जडल्यामुळें, तूं त्यांच्या हृदयांत सदैव वास करितोस. हे ईश्वरा, जोंपर्यंत लोक निर्भय अशा तुझ्या चरणांचा आश्रय करीत नाहीत, तोंपर्यंत द्रव्य, गृह, पुत्र, मित्र इत्यादिकांच्या संबंधानें भय, दुःख, इच्छा, अनादर, मोठा लोभ

आणि खोटा अभिमान हीं मनांत बळावतात, व त्यां-मुळें त्यांस फार पीडा होते. नारायणा, जे मंदबुद्धि लोक लोभानें ग्रस्त होऊन अल्प सुखाच्या इच्छेनें निरंतर काम्य कर्में करितात, त्यांची बुद्धि दुर्दैवानें नष्ट झालेली असते; म्हणून, सर्व संक-टांचा परिहार करणाऱ्या ज्या तुझ्या कथा, त्यां-पासून ते दूर रहातात. हे दीनवत्सला, क्षुधा, तृषा, कफ, वात व पित्त; तसेंच थंडी, वारा, ऊन आणि पाऊस; शिवाय, ज्याची कधींही तृप्ति होत नाहीं, तो कामरूप अग्नि, व क्रोध ह्यां-च्या योगानें अहर्निश पीडिले जाणाऱ्या प्राण्यांस पाहून मला फार वाईट वाटतें. हे ईशा, सत्त्व, रज व तम ह्या गुणांपासून उत्पन्न झालेलीं जीं इंद्रियें व विषय, त्यांनीं भरलेलें हें जग तुझ्याहून भिन्न आहे असें जे मानितात, ते, वस्तुतः मिथ्या-भूत व दुःखदायक अशा ह्या संसारांत गट-काळ्या खात रहातात, व त्यापासून त्यांची नि-वृत्ति होत नाहीं. भगवंता, मोठमोठे विवेकशील पुरुषही जर तुझ्या कथांच्या श्रवणकीर्तनादिकां-पासून विन्मुख होतील, तर त्यांस देखील दुःख प्राप्त झाल्यावांचून रहाणार नाहीं; कारण, दिव-सास ते द्रव्य संपादन करण्यामध्यें गुंतलेले असल्यामुळें थकून रात्रीं झोंपीं जातात, तेव्हां मनांत एकसारखे द्रव्यार्जनाचे विचार चालू राहून तसल्याच प्रकारचीं त्यांस स्वप्नें पडतात; व त्या-मुळें वरचेवर त्यांचा निद्राभंग होतो; आणि इतकें होऊनही त्यांचे मनोरथ म्हणजे नेहमींच सफळ होतात असें नाहीं. कारण, दैव हें त्यांच्या जवळ उभें असतेंच. भगवंता, हीं दुःखें तुझ्या कथांविषयीं पराङ्मुख असणाऱ्या जनांसच होतात. तुझ्या चरित्रांचें श्रवणकीर्तन करणाऱ्या भक्तांना मुळींच होत नाहींत. कारण, तुझ्या कथांच्या योगानें तुझ्या भक्तांचें अंतःकरण शुद्ध होऊन त्यांस तुझ्या प्राप्तीचा मार्ग दिसून येतो; आणि शुद्ध झालेल्या त्यांच्या अंतःकरणांत सदैव वास करून, ते भक्त ज्या ज्या प्रकारचें ध्यान करतील त्या त्या प्रकारचें स्वरूप त्यांवर अनुग्रह करण्याकरितां तूं प्रकट करतोस. हे परमेश्वरा, तूं एकच असून नानाविध पदार्थांमध्यें भरलेला आहेस. सर्वांचा मित्र आणि आत्मा तूंच होस. दुर्जनांस तुझी प्राप्ति होणें कठिण आहे. कारण, त्यांच्या अंतःकरणांत भूतदयेचा लवलेशही नसतो. प्रभो, केवळ भूतदयेच्या योगानें तूं जितके लवकर प्रसन्न होतोस, तितके लवकर, सर्व प्रकारच्या साहित्यांनीं पण सहेतुक बुद्धीनें, देवा-दिकांनींही तुझें पूजन केलें असतां त्यांस देखील तूं प्रसन्न होत नाहींस. तुझ्या सकाम भक्तांपेक्षां निष्काम भक्तांची महती जास्त आहे; म्हणून पुरुषानें यज्ञ, याग, तीव्र तप, दान इत्यादि कर्मांच्या योगें तुला संतुष्ट करावें. कारण, इतर कोणतेही धर्म आचरण केले तरी ते कधीं ना कधीं नष्ट होणारच; परंतु तुझ्या संतोषाकरितां केलेलें धर्माचरण मात्र कधींही नष्ट होत नाहीं. हे भगवंता, तूं आपल्या शुद्धचैतन्य-रूप प्रकाशाच्या योगानें द्वैतरूप अंधकारापासून दूर आहेस. तूं ज्ञानाचें आश्रयस्थान होस. तूं सर्वांत श्रेष्ठ आहेस. तुला माझा नमस्कार असो. ह्या त्रिगुणात्मक जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करणारी जी माया, तिला तुझा आश्रय असून, तिच्या लीला ह्या तुझ्या क्रीडा होत. हे मायाचालका, मी तुला अभिवंदन करितों. हे दीनबंधो, तुझ्या अव-तारकथादिकांच्या श्रवणकीर्तनाचा महिमा फा-रच अगाध आहे. कारण, प्राणोत्क्रमणाच्या स-मयीं मनुष्य अगदीं दीन अवस्थेंत असतांही जर तो तुझ्या चरित्रांचें श्रवण, मनन वगैरे करील, तर त्याचें अनेक जन्मांचें पातक एकदम नष्ट हो-ऊन तो तुझ्या चिन्मय स्वरूपांत मिळून जाईल. हे भगवंता, हा त्रैलोक्यरूप वृक्ष ही तुझी अपर-प्रतिमाच आहे. तुझ्या आश्रयानें राहणारी जी

अचिंत्य माया, ती ह्या विश्वद्रुमाचें मूळ होय. प्रकृतिरूप मुळांतून हा सर्वव्यापक वृक्ष बाहेर पडून त्यास तीन खांद्या निर्माण होतात, व त्यांच्या योगानें ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति व संहार हीं घडतात. मी ब्रह्मदेव, स्वतः तूं विष्णु व तो शंकर ह्या ज्या तुझ्या तीन विभूति, त्याच ह्या उत्पत्ति, स्थिति व संहार करणाऱ्या विश्वतरूच्या खांद्या होत. हे जगन्नायका, ह्या तीन प्रमुख खांद्यांपासून पुढें ल्हान मोठ्या अनेक शाखा, उपशाखा वगैरे जन्मास येऊन हा ब्रह्मांड वृक्ष विस्तृत होतो. हे भक्तपालका, तूं लावून दिलेल्या मार्गानें न जातां जे लोक तुझें अर्चन, वंदन इत्यादि हितकर कर्मे करण्याविषयीं विमुख होऊन भलतींच कर्मे करण्यांत दंग होऊन जातात, ते लोक तुझ्या कालरूप संहारशक्तीच्या तडाक्यांत सांपडून जन्ममरणपरंपरा भोगतात! हे विश्वेश्वरा, ह्या तुझ्या कालात्मक शक्तीला मी नमस्कार करितों. हे अनंता, तुझा प्रभाव काय वर्णन करावा? पहा—माझें स्थान द्विपरार्ध संवत्सरपर्यंत टिकणारें; व म्हणून सर्वांमध्यें मी अत्यंत श्रेष्ठ व पूज्य; परंतु त्या मलाहीं तुझें भय फार वाटतें. तुझ्या प्राप्तीस्तव मीं दुर्घट तपश्चर्या केली, तेव्हां कोठें ह्या तुझ्या मूर्तीचें आज दर्शन घडलें! हे यज्ञनारायणा, तूं मजवर अनुग्रह कर. हे देवाधिदेवा, तूं आत्मानंदांत निमग्न आहेस; तुला विषयमात्राची लेशमात्र इच्छा नाहीं. तथापि तूं आपण घातलेल्या धर्ममर्यादांचें आपण स्वतः पालन करण्याची इच्छा धरितोस, व पशु, पक्षी, मनुष्य, देव इत्यादि योनींमध्यें जन्म धारण करून तूं नानाविध लीला करितोस. तेव्हां तुझें चरित्र किती अपूर्व आहे बरें! हे परमेश्वरा, तम, मोह, महामोह, तामिस्र व अंधतामिस्र अशा पांच वृत्ति धारण करणाऱ्या मायेच्या योगें प्राणी निद्रावश होतात; परंतु तूं त्या पांच वृत्ति धारण करणाऱ्या मायेपासून अगदीं अलिप्त असताही उदरामध्यें सर्व ब्रह्मांडाचा उपसंहार करून निद्रावश झालास, व इतस्ततः उचंबळणाऱ्या लाटांनीं प्रक्षुब्ध झालेल्या प्रलयकालीन उदकांत शेषशय्येवर पडून स्वस्थ झोंप घेतलीस; आणि निद्रासुख अमुक प्रकारें अनुभवावें, हें लोकांस व्यक्त करून दाखविलेंस. हे पुरुषोत्तमा, तूं सर्वथैव वंदनीय आहेस. तुझ्याच नाभिकमलापासून मी उत्पन्न झालों. तुझ्याच अनुग्रहानें मला अखिल त्रिभुवनावर उपकार करण्याची योग्यता प्राप्त झाली. देवा, तुझ्या उदरामध्यें सर्व जग लीन झालें आहे. आतां तुझी योगनिद्रा समाप्त होत असल्यामुळें तुझीं नेत्रकमलें किंचित् किंचित् विकसित होऊं लागलीं आहेत. हे नारायणा, मी तुला नमस्कार करितों. हे भगवंता, तूं सर्व जगाचा हितकर्ता आणि आत्मा असून सर्वांतर्यामीं भरलेला आहेस. तूं शरणागतांचे मनोरथ पूर्ण करणारा आहेस. तुझ्या ज्ञानाच्या आणि ऐश्वर्याच्या योगानें सर्व जगास सुख उत्पन्न होतें. त्या ज्ञानाचा माझ्या बुद्धीशीं संयोग कर; म्हणजे मी हें जग पूर्ववत् निर्माण करण्यास समर्थ होईन. तुझी शक्ति जी लक्ष्मी, तिजसह तूं सगुणावतार घेऊन अनेक प्रकारच्या लीला व अघटित कर्मे करितोस. हे भगवंता, तूं पूर्वींच सृष्टि निर्माण करून ठेविली आहेस. तूं निर्माण केलेल्या त्या सृष्टीचें स्वरूप मी स्पष्ट करीत असतां तुझ्या लीलांचे ठिकाणीं माझें मन रममाण होवो; म्हणजे सृष्टि उत्पन्न करण्याच्या अहंकारापासून आणि तदंगभूत पापापासून मी अलिप्त राहीन. हे भगवंता, तूं ह्या प्रलयकालीन उदकामध्यें निजून राहणारा अनंतशक्ति पुरुष आहेस. तुझ्या नाभिन्हदापासून चित्ताची अभिमानी देवता असा मी उत्पन्न झालों. प्रभो, ह्या सृष्टिकर्मामध्यें दंग होऊन माझें वेदज्ञान नष्ट न होवो. हे पुराणपुरुषा भगवंता, तूं अत्यंत दयाळु आहस. ह्या तुझ्या दयाळुत्वामुळें तूं उठून कम-

ळांसारख्या प्रफुल्लित नेत्रांनीं सप्रेमदृष्टीनें मजकडे अवलोकन कर, आणि मधुर वाणीनें केवळ त्रैलोक्यावर उपकार करण्याकरितां मजशीं बोल, म्हणजे माझा सर्व खेद दूर होईल.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ब्रह्मदेव ज्यापासून उत्पन्न झाला, तें विष्णुस्वरूप ब्रह्मदेवाला तपस्सामर्थ्यानें व समाधियोगबलानें दिसलें. नंतर त्यानें आपल्या मनाच्या आणि वाणीच्या शक्तीप्रमाणें भगवंताचें स्तवन केलें, आणि श्रमित होत्साता तो स्तब्ध बसला. त्या वेळीं भगवंताला असें दिसून आलें कीं, ब्रह्मदेवाला सृष्टि कशी उत्पन्न करावी ह्याचें ज्ञान प्राप्त व्हावें अशी इच्छा आहे. हें प्रलयकालचें उदक पाहून त्याच्या मनांत भीति उत्पन्न झाली आहे, ह्यास्तव तिचें निरसन केलें पाहिजे; असा विचार करून तो मधुर आणि गंभीर वाणीनें ब्रह्मदेवाशीं बोलूं लागला.

### भगवंतांचें भाषण.

भगवान म्हणाले:—हे वेदगर्भा ब्रह्मदेवा, तूं आतां मुळींच आळस न करितां सृष्टि उत्पन्न करण्याच्या मार्गाला लाग. ज्या कारणासाठीं तूं माझी स्तुति केलीस, तें मीं पूर्वींच सिद्ध करून ठेविलें आहे. तूं पुनः तपश्चर्या कर, म्हणजे योगसाधनाच्या योगेंकरून, सर्व लोक तुझ्या ठिकाणींच भरलेले आहेत असें तुला स्पष्ट दिसूं लागेल. ब्रह्मदेवा, तपाच्या योगानें तुझ्या अंतःकरणांत भक्ति उत्पन्न होईल, व त्या योगानें तुझें अंतःकरण शुद्ध आणि शांत होईल. असें झालें म्हणजे तुझ्या स्वतांच्या हृदयांत व सर्व जगांत मीच भरलों आहें व सर्व लोक माझेच ठिकाणीं आहेत, असें तुला दिसून येईल. काष्ठाचे ठिकाणीं जसा अग्नि गुप्तरूपानें वास करितो, तसें, सर्व भूतांचे अंतर्यामीं माझें वास्तव्य आहे. हें जेव्हां प्राण्यास कळून येईल, तेव्हांच त्याचें अज्ञान नष्ट झालें असें समजावें. भूतें, इंद्रियें, गुण व अंतःकरण ह्यांपासून जीवात्मा भिन्न असून तो जीवात्माच परब्रह्मस्वरूप आहे, अशी ज्या वेळीं निश्चयात्मक भावना होईल, तेव्हांच प्राण्यास मोक्षप्राप्ति होईल.

ब्रह्मदेवा, तूं अनेक कर्मविस्तारांमुळें नानाप्रकारच्या प्रजा उत्पन्न केल्यास, तरी माझा तुजवर पूर्ण अनुग्रह असल्यामुळें तुला त्याविषयीं मोह किंवा आसक्ति उत्पन्न होणार नाहीं. तूं त्रिगुणात्मक अशा अनेक प्रजा उत्पन्न केल्यास, तरी तुझें मन सर्वदा माझेच ठिकाणीं रममाण असल्यामुळें, सर्वांस मोह पाडणारा जो रजोगुण, त्याचें तुजवर सामर्थ्य चालणार नाहीं. ब्रह्मदेवा, भूतें, इंद्रियें, गुण, अहंकार इत्यादिकांपासून मी भिन्न आहें, हें प्राण्यास उमगत नाहीं; पण तें तुला उमगलें. तूं ज्या कमलापासून उत्पन्न झालास, त्या कमळाचें मूळ शोधण्याकरितां उदकांत शिरलास; त्या वेळीं, आपणास कोणी आश्रय आहे किंवा नाहीं, असा तुझ्या मनांत जो संशय उत्पन्न झाला, त्याची निवृत्ति करण्याकरितां मी आपलें स्वरूप तुझ्या हृदयांत प्रकट केलें. ब्रह्मदेवा, माझ्या लीलारूप उत्कर्षाचें जें तूं वर्णन केलेंस, तें माझ्या अनुग्रहानेंच. माझ्या अनुग्रहानेंच तुझ्या ठिकाणीं तपाचरण करण्याबद्दल निष्ठा उत्पन्न झाली. मी जरी त्रिगुणात्मक भासतों, तरी वस्तुतः त्यांहून अलिप्त आहे. त्या माझ्या स्वरूपाचें, जग उत्पन्न करण्याच्या इच्छेनें तूं स्तवन केलेंस; तस्मात् मी तुजवर प्रसन्न आहें. तुझें कल्याण असो. जो मनुष्य तूं म्हटलेल्या ह्या स्तोत्रानें नित्य माझें स्तवन करीत जाईल, त्यास मी लवकर प्रसन्न होऊन त्याच्या सर्व कामना पूर्ण करीन. ब्रह्मदेवा, तलावादि जलाशय बांधणें, तपश्चर्या करणें, यज्ञयागादि अनुष्ठानें करणें, दानें देणें, योगसाधन करणें व समाधि लावणें ह्या सर्व गोष्टींचें फल म्हणजे माझी प्रीति संपादन करणें हेंच होय, असें मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांचें मत आहे. ब्रह्मदेवा, प्राण्याला देह, इंद्रियें, स्त्री इत्यादि अतिप्रिय वाटतात. परंतु

हें लक्षांत ठेव कीं, त्या सर्वांचा मी आत्मा आहें, अर्थात् मी सर्वांहून जास्त प्रिय असणें योग्य आहे; म्हणून प्रत्येक मनुष्यानें माझ्या ठिकाणीं प्रीति असू द्यावी. ब्रह्मदेवा, तूं पूर्ण वेदस्वरूप असून सर्व प्राण्यांचा आत्मा आहेस. तूं हें जग अनायासें उत्पन्न कर. तुला पूर्वकल्पांतील ज्ञान आहेच. शिवाय, तुझ्या अंतर्यामीं सर्व प्राण्यांचा आत्मा जो मी, त्या माझा पूर्णपणें वास असल्यामुळें तुला कांहींच अडचण पडणार नाहीं.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें त्या प्रकृतिपुरुषात्मक भगवंतानें ब्रह्मदेवाला सृष्टोत्पत्तीचें ज्ञान सांगितलें, आणि नंतर आपण तेथेंच अंतर्धान पावला.

# अध्याय दहावा.

—:०:—

## कालाची उत्पत्ति व दहा प्रकारच्या सृष्टीचें वर्णन.

विदुर म्हणाला:—मैत्रेय मुने, भगवंतानें आपलें स्वरूप गुप्त केल्यावर त्या आदिस्रष्ट्या ब्रह्मदेवानें आपल्या मनापासून व शरिरापासून कोणत्या व किती प्रकारच्या प्रजा उत्पन्न केल्या ! हे भगवन्, आपण ज्ञानसंपन्न आहां. मीं ज्या गोष्टी आपल्यास विचारल्या आहेत, त्या सर्व यथाक्रम सांगून माझा संशय दूर करा.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, षड्गुणैश्वर्यसंपन्न व अनादि अशा परमेश्वरानें सांगितल्याप्रमाणें ब्रह्मदेवानें नारायणस्वरूपीं आपलें मन लावून 'देवांचीं' शंभर वर्षें तप केलें. ब्रह्मदेव तप करीत असतां एकाएकीं प्रलयकालचा भयंकर वारा सुटला; आणि त्यामुळें, ज्या कमळाकर ब्रह्मदेव बसला होता, तें कमळ आणि ज्या उदकांत तें कमळ उद्भवलें होतें तें उदक हीं थरथर कांपूं लागलीं. ही स्थिति ब्रह्मदेवाच्या लक्षांत आली, तेव्हां त्यानें आपल्या तपस्सामर्थ्यानें तें उदक आणि तो प्रबळ झालेला वायु पिऊन टाकला. ह्यामुळें तो बसला होता तें कमल मोकळें पडलें. त्या मोकळ्या झालेल्या कमलाकडे पाहिल्याबरोबर ब्रह्मदेवाला वाटलें कीं, ह्या कमलापासूनच पूर्वी लीन झालेले लोक मी पुनः उत्पन्न करीन. सृष्टिरूप कर्तव्य करण्याविषयीं ब्रह्मदेवाच्या मनांत परमेश्वरानें पूर्वीच प्रेरणा करून ठेविली होती. त्याप्रमाणें सृष्टि निर्माण करण्याचें त्याच्या मनांत आल्याबरोबर, तो त्या विश्वव्यापी कमलांत शिरला; आणि ज्या कमळापासून त्यास चतुर्दश भुवनेंच काय, परंतु त्याहूनही अधिक भुवनें निर्माण करितां आलीं असतीं, त्या कमलाचे, त्यानें भूः, भुवः व स्वः हे तीन विभाग केले. विदुरा, ब्रह्मदेवाच्या प्रत्येक दिवशीं ज्यांची घडामोड होते, ते हे तीनच लोक शास्त्रानें सांगितले आहेत. हे तीन जीवांचे उपभोग्य लोक होत. स्वर्लोकाच्याही वर आणखी महर्लोक, जनर्लोक, तपोलोक आणि सत्यलोक हे आहेत; पण ते निष्काम कर्म करणाऱ्यांस प्राप्त होणारे आहेत. ते ब्रह्मदेवाच्या प्रत्येक दिवसाच्या प्रळयांत नष्ट होत नाहींत. ते ब्रह्मदेवाच्या दोन परार्ध वर्षेंपर्यंत टिकणारे आहेत. त्रैलोक्य हें काम्यकर्माचें फल आहे. ह्याचा नाश प्रत्येक कल्पांत होतो हें लक्षांत ठेव.

विदुर म्हणाला:—मैत्रेय मुने, परमेश्वराचें एक कालस्वरूप आहे म्हणून जें आपण पूर्वी सांगितलें, तें कसें असतें तें मला सांगा.

मैत्रेय मुनि म्हणाले:—विदुरा, कालाला मूळचें कोणतेंही स्वरूप नाहीं. त्याचप्रमाणें, त्याला आदि आणि अंतही नाहींत. तो काल अमर्याद असा आहे; पण गुणांमध्यें न्यूनाधिक्य झालें म्हणजे त्याच्या योगानें कालाचें स्वरूप लक्षांत येतें. ईश्वरानें त्या कालाकाच निमित्त करून आपल्या स्वरूपीं हें जग निर्माण केलें आहे. पूर्वी हें जग

श्रीविष्णूच्या मायेनें लय पावून ब्रह्मस्वरूप होऊन राहिलें होतें. नंतर तें लीन होऊन राहिलेलेंच जग, ईश्वरानें कालाचें निमित्त पुढें करून निरनिराळें प्रकाशित केलें. त्या कालाचें स्वरूप कोणालाही समजत नाहीं. त्याचें अनुमान त्याच्या कार्यावरून मात्र होतें. तें त्याचें कार्य म्हणजे जग. हें जग पूर्वी जसें होतें तसेंच आतांही आहे, आणि पुढेंही असेंच असणार. हें जगाचें स्वरूप जसें नेहमीं सारखेंच असतें, तसेंच ह्या जगाचें निमित्त–कारण–जो काल त्याचेंही स्वरूप नेहमीं सारखेंच असतें.

ह्या कालाच्याच निमित्तानें प्रकृतीपासून सहा प्रकारची आणि विकृतीपासून तीन प्रकारची अशी नऊ प्रकारची सृष्टि उत्पन्न झाली आहे; आणि प्राकृत व वैकृत ह्या दोहोंपासून आणखी एक दहावा प्रकार उत्पन्न झाला आहे. सनत्कुमारांची गणना ह्या दहाव्या प्रकारच्या सृष्टींत आहे.

तोच भगवान काल सृष्टीच्या तिन्ही प्रकारच्या प्रळयांस निमित्त होय. हे प्रलयाचे तीन प्रकार असे: एक नित्य, दुसरा नैमित्तिक आणि तिसरा प्राकृतिक. ह्यांत नित्यप्रलय जो आहे, तो केवळ कालाच्याच योगानें होतो; नैमित्तिकप्रलय हा शेषमुखांतील अग्नि किंवा प्रलयमेघ ह्यांच्या योगानें होतो; आणि प्राकृतिकप्रलय गुणांच्या योगानें होतो.

विदुरा, आतां तुला पूर्वी जे सृष्टीचे दहा प्रकार सांगितले, त्यांचें सविस्तर वर्णन सांगतों.

पहिल्या प्रकारांत महत्तत्त्वाची उत्पत्ति झाली. हें महत्तत्त्व म्हणजे ईश्वरापासून सत्त्व, रज आणि तम ह्या तीन गुणांमध्यें झालेलें न्यूनाधिक्य होय.

दुसऱ्या प्रकारांत अहंकाराची उत्पत्ति झाली. ह्या अहंकारापासून पंचमहाभूतें, ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें आणि देवता व मन, ( हे पुढले तीन सर्ग ) हीं उत्पन्न झालीं.

तिसऱ्या प्रकारांत पृथ्वी, अप्, तेज, वायु व आकाश हीं पंचमहाभूतें व पंचसूक्ष्मभूतें उत्पन्न झालीं.

चौथ्या प्रकारांत पंचज्ञानेंद्रियें आणि पंचकर्मेंद्रियें हीं उत्पन्न झालीं.

पांचव्या प्रकारांत सात्त्विक अहंकारापासून इंद्रियांच्या अभिमानी देवता झाल्या, व संकल्पविकल्पात्मक मन झालें.

सहाव्या प्रकारांत तामिस्रादिक पांच प्रकारची अविद्या उत्पन्न झाली. जीवांना ह्या अविद्येमुळेंच मोह आणि स्वस्वरूपभ्रंश होतो. विदुरा, पूर्वी जी प्रकृतीपासून सहा प्रकारची सृष्टि होते म्हणून म्हटलें, ती ही तुला सांगितली. हिला प्राकृतसृष्टि म्हणतात.

आतां, विकृतीपासून जी तीन प्रकारची सृष्टि झाली, ती तुला सांगतों.

विदुरा, ह्या तीन प्रकारांपैकीं पहिल्यांत सहा प्रकारची स्थावरसृष्टि उत्पन्न झाली. ते सहा प्रकार असे: ( १ ) ज्यांना पुष्पावांचून फळें येतात, त्या उंबर, वड, पिंपळ वगैरे वनस्पति; (२) एकवार फळें येऊन तीं पिकलीं कीं ज्यांचा नाश होतो, त्या केळी, धान्यें वगैरे ओषधि; ( ३ ) ज्यांना वृक्षाचा किंवा इतर कशाचा तरी आधार लागतो, त्या लता, पान, वेली वगैरे; ( ४ ) त्वक्सार म्हणजे ज्यांची साल कठिण असते व त्या सालीचाच विशेषेंकरून उपयोग होतो त्या वेळू वगैरे; ( ५ ) वीरुध् म्हणजे वेलींच्याच जाति, पण ज्यांना आधारांची गरज लागत नाहीं त्या वेत वगैरे; आणि ( ६ ) द्रुम म्हणजे ज्यांना पहिल्यानें फुलें येऊन नंतर फळें येतात ते आम्रवृक्ष वगैरे. ह्या सहाही प्रकारच्या सृष्टीची गति आणि आहार ऊर्ध्व असतात. त्यांच्यातील चैतन्यशक्ति स्पष्ट नसते. सगळ्यांना अंतर्यामीं स्पर्शज्ञान असतें, व प्रत्येकांचे कांहीं तरी विशेष धर्म असतात. वैकृतिकसृष्टीचा दुसरा प्रकार म्हणजे तिर्यक्सृष्टि होय. तिचे अठ्ठावीस प्रकार आहेत. ह्या सर्वांचें साधारण लक्षण

म्हणजे त्यांस उद्यां काय होणार ह्याचें धोरण नसतें, हें होय. ह्यांना आहार, विश्रांति, भय, मैथुन वगैरे कांहीं नियमित गोष्टींचें मात्र ज्ञान असतें. ह्यांना घ्राणेंद्रियाच्या योगानें वस्तूचें ज्ञान होतें. सुखदुःखांचे परिणाम त्यांच्या मनावर फार वेळ टिकत नाहींत. आतां त्यांचे अठ्ठावीस प्रकार कोणते तें सांगतों: बैल, बकरा, रेडा, हरिण, सूकर, गवा रुरु मेंढा व उंट ह्या दोन खूर असणाऱ्या नऊ जाति आहेत. गाढव, घोडा, खेचर, गौर, शरभ व वनगाय ह्या एकखुरी पशूंच्या सहा जाति आहेत. कुत्रा, कोल्हा, लांडगा, वाघ, मांजर, ससा, साळ, सिंह, वानर, हत्ती, कांसव व घोरपड ह्या पांच नख्यांच्या पशूंच्या बारा जाति आहेत. एकूण स्थलचर प्राण्यांच्या सत्तावीस जाति आणि मगर वगैरे जलचर व कंक, गिधाड वगैरे पक्षी ही एक अठ्ठाविसावी जात, अशा एकंदर अठ्ठावीस जाति तिर्यग्योनींच्या आहेत.

विदुरा, आतां वैकृतिक सृष्टीचा तिसरा प्रकार तुला सांगतों. ह्यांत मनुष्यजात येते. ह्यांचे आहारविहार पृथ्वीवर असतात. त्यांचें लक्षण असें कीं, त्यांच्यामध्यें रजोगुणाचा अंश अधिक असतो. ते कर्में करण्यांत गुंग असतात, व दुःखरूपी संसारांतच सुख मानून राहतात. ह्याप्रमाणें ह्या वैकृतिक सृष्टीचे तीन प्रकार सांगितले. विदुरा, देवसृष्टि ही सुद्धां वैकृतिकच होय. परंतु ती शुद्ध सात्त्विक असल्यामुळें तिची गणना प्राकृतिक सर्गांत करितात. ह्या देवसृष्टीचे ८ भेद आहेत:—( १ ) देव, ( २ ) पितर, ( ३ ) दैत्य, (४) गंधर्व व अप्सरा, ( ५ ) यक्ष व राक्षस, ( ६ ) भूत व पिशाच, ( ७ ) सिद्ध, चारण, विद्याधर आणि ( ८ ) किन्नर व किंपुरुष इत्यादि.

विदुरा, दहावा प्रकार सनत्कुमारांची उत्पत्ति हा होय. हे प्राकृतिक व वैकृतिक ह्या दोन्ही प्रकारच्या सृष्टीच्या मिश्रणापासून झाले आहेत, म्हणून त्यांची गति देवलोकांत आहे आणि मनुष्यलोकांतही आहे. विदुरा, ह्याप्रमाणें, ब्रह्मदेवानें केलेली दहा प्रकारची सृष्टि तुला सांगितली. आतां पुढें वंश आणि मन्वंतरें ह्यांचें वर्णन सांगतों. ईश्वरच रजोगुणानें युक्त होऊन ब्रह्मदेवाचें रूप घेतो, आणि कल्पाकल्पामध्यें सृष्टि उत्पन्न करितो. त्याचा संकल्प कधींही व्यर्थ होत नाहीं.

## अध्याय अकरावा.

—:०:—

### कालमान व आयुर्गणना.

मैत्रेय ऋषि म्हणाले:—विदुरा, पृथ्वी आदिकरून पंचमहाभूतात्मक पदार्थांचे निरनिराळे भाग करून, त्या भागांचे आणखी पुढें कोणत्याही प्रकारें भाग करितां येत नाहींत, इतका जो सूक्ष्म भाग, त्यास परमाणु अशी संज्ञा आहे. हे पुष्कळ परमाणु एकत्र मिळाले म्हणजे मनुष्यांस मूर्त पदार्थांचा भास होतो. जगामध्यें जे अनेक पदार्थ अनेक स्वरूपें धारण करून आहेत, त्या पदार्थांचे गुणधर्म व निरनिराळेपणा एकीकडे ठेवून फक्त परमाणूंच्या समुदायांचा विचार केला, म्हणजे त्या पदार्थांच्या स्थूलस्वरूपाची अटकळ करितां येते. विदुरा, ह्या प्रपंचांतील वस्तुमात्राचें सूक्ष्मरूप म्हणजे त्या त्या वस्तूचा अविभाज्य असा अति सूक्ष्म अंश, व स्थूलरूप म्हणजे त्या त्या वस्तूचा परमाणूंच्या सख्येनें होणारा बोध, हें ध्यानांत आण. यच्चयावत् पदार्थांना आपल्या अधीन ठेवणारा जो काल, तो सुद्धां जगांतील पदार्थांप्रमाणें सूक्ष्म व स्थूल ह्या स्थिति धारण करितो. कालाचा परमाणुदृष्टीनें विचार केला, म्हणजे तो सूक्ष्मकाल समजावा, व पदार्थांनीं भोगलेला जो विशिष्ट काल तो स्थूलकाल समजावा. विदुरा, ह्या कालाच्या परमाणूंवरून कालाची गणती कशी करावयाची, तें ऐक. दोन परमाणु म्हणजे एक अणु समजावा. तीन अणु झाले

म्हणजे एक त्रसरेणु होतो. खिडकीवाटे सूर्याचे किरण घरांत येतात त्यांत पुष्कळ रजःकण उडून आकाशांत जात असलेले दिसतात; त्या रजःकणांतील प्रत्येकास त्रसरेणु अशी संज्ञा आहे. ह्या तीन त्रसरेणूंइतके अंतर चालण्यास सूर्याला जो काल लागतो, त्यास त्रुटि असें म्हणतात. शंभर त्रुटि झाल्या म्हणजे एक वेध होतो. तीन वेध म्हणजे एक लव समजावा. तीन लवांचें एक निमेष होतें. तीन निमेष म्हणजे एक क्षण होय. पांच क्षण म्हणजे एक काष्टा. पंधरा काष्टा म्हणजे एक लघु समजावा. पंधरा लघूंची एक घटिका मानितात. दोन घटिका म्हणजे एक मुहूर्त होतो. सहा अथवा सात घटिकांचा एक प्रहर समजावा. [ प्रहर म्हणजे दिवसाचा किंवा रात्रीचा चौथा भाग. पहांटेचा व सकाळचा एक एक मुहूर्त, आणि संध्याकाळचा व अवशीचा एक एक मुहूर्त, हे सोडून देऊन बाकी दिवस व रात्र ह्यांचें अति लहान व अति मोठें मान घेतलें असतां दिवसाच्या अथवा रात्रीच्या चौथ्या भागाचें म्हणजे प्रहराचें मान ६ अथवा ७ घटकाच येतें. ]

मैत्रेय पुढें सांगतातः—विदुरा, सहा पलें तांब्याचें एक पात्र एक प्रस्थ ( शेर ) पाणी राहण्याजोगें करून त्यास मध्यभागीं चार मासे सोन्याच्या चार अंगुळें लांब केलेल्या समान जाडीच्या तारेनें छिद्र पाडावें. त्या छिद्रांतून पाणी येऊन तें पात्र भरण्यास जो काल लागतो, तो एक घटिका काल समजावा. चार चार प्रहर म्हणजे मनुष्यांचा एक दिवस व एक रात्र होते. पंधरा अहोरात्रांचा एक पक्ष होतो. तो शुक्ल व कृष्ण असा दोन प्रकारचा आहे. शुक्ल व कृष्ण हे दोन पक्ष मिळून एक मास समजावा. मनुष्यांचा मास म्हणजे पितरांचा एक दिवस होय. दोन महिने म्हणजे एक ऋतु. सहा महिने म्हणजे एक अयन. अयनें दोन—एक दक्षिणायन व दुसरें उत्तरायण. दक्षिणायन म्हणजे देवांची रात्र व उत्तरायण म्हणजे त्यांचा दिवस. दोन्ही अयनें मिळून देवांचा एक अहोरात्र समजावा. बारा महिने म्हणजे एक संवत्सर. शंभर संवत्सर ही मनुष्याच्या आयुष्याची मोठी मर्यादा. विदुरा, भगवान सूर्य हा चंद्र, मंगळ इत्यादि ग्रह, अश्विनी, भरणी इत्यादि नक्षत्रें व इतर तारे ह्यांच्या मंडळांवर अधिष्ठित होऊन परमाणूपासून वर्षापर्यंत आपली मानें सांगून नित्य जागरूक अवस्थेंत फेऱ्या करीत आहे. संवत्सर पांच प्रकारचे आहेत. सूर्य, बृहस्पति, सवन म्हणजे यज्ञयागादिक क्रिया, चंद्र, व नक्षत्रें ह्यांच्या गतीवरून संवत्सरांस संवत्सर, परिवत्सर, इडावत्सर, अनुवत्सर व वत्सर अशीं नांवें दिलीं आहेत. सूर्य हाही पंचमहाभूतात्मकच आहे. हा आपल्या काल नामक शक्तीच्या योगानें सर्वत्र बीजांकुरांस चेतना देतो व मनुष्यांचें अज्ञान दूर करून त्यांजकडून यज्ञयागादि कर्में करविण्याकरितां अंतरिक्षांत धाव घेतो; अशा त्या पांच संवत्सर उत्पन्न करणाऱ्या व लोकांस सद्गति प्राप्त करून देणाऱ्या भगवान सूर्यनारायणास मनोभावानें नमस्कार करावा.

ह्यावर विदुरानें विचारलें:—महाराज, देव, पितर व मनुष्यें ह्यांच्या आयुष्याचें मोठें प्रमाण त्यांच्या त्यांच्या मानानें शंभर वर्षे आहे. परंतु जे महात्मे ज्ञानसंपन्न भृग्वादिक ऋषि कल्पाच्या कल्प वास्तव्य करितात, त्यांच्या आयुष्याचें प्रमाण काय बरें महाराज, आपणांस महासमर्थ कालाची गति कळलेली आहे. आपणांसारखे परमज्ञानी व योगसंपन्न जे पुरुष, त्यांस सर्व विश्वाचें ज्ञान असल्यामुळें, तिचें योग्य प्रकारें विवेचन करतां येतें.

मैत्रेय म्हणतातः—विदुरा, युगाच्या आरंभींचा व अखेरचा संधिकाल धरून कृत, त्रेता, द्वापर व काल ह्या चार युगांमध्यें देवांचा बारा हजार

१ पांच गुंजा म्हणजे माष ( मासा ).
सोळा माष म्हणजे कर्ष ( तोळा ).
चार कर्ष म्हणजे पल.

वर्षे होतात, असें सांगितलें आहे. विदुरा, कृत, त्रेता, द्वापर व कलि ह्या युगांचें प्रमाण करितांना, प्रथम अनुक्रमानें चार, तीन, दोन व एक असे सहस्र घ्यावे व त्या प्रत्येक संख्येंत त्यांच्या दुप्पट शेंकडे मिळवावे; म्हणजे ४८०० वर्षांचें कृतयुग, ३६०० वर्षांचें त्रेतायुग, २४०० वर्षांचें द्वापरयुग व १२०० वर्षांचें कलियुग समजावें. प्रत्येक युगाचे शेंकडों वर्षांचे संधिकाल मनांत आणून त्यांच्या दरम्यान सांपडणारा जो काल, त्यास, कालाची गणना करणाऱ्या लोकांनीं 'युग' ही संज्ञा दिली आहे, व ह्या युगकालामध्यें विशेषेंकरून काय काय करावें हें त्यांनीं सांगितलें आहे. विदुरा, कृतयुगामध्यें चतुष्पाद म्हणजे संपूर्ण धर्म मनुष्यांमध्यें रहात असतो; तोच धर्म त्रेतादिक दुसऱ्या युगांमध्यें एक एक पादानें म्हणजे चतुर्थांशानें कमी कमी होत जातो, व त्या ऐवजीं चतुर्थांशानें अधर्म वाढत जातो. त्रैलोक्याच्या बाहेर असणारे ब्रह्मलोकापर्यंत जे लोक, त्या लोकांत राहणाऱ्या पुरुषांचीं देवांच्या मानानें हजार वर्षें झालीं म्हणजे एक दिवस होतो; व तेवढीच रात्र असते. ह्या रात्रींत ब्रह्मदेव निद्रित असतो. रात्र संपल्यावर फिरून सृष्टिक्रम सुरू होतो व ब्रह्मदेवाचा दिवस संपेपर्यंत तो चालू राहतो. ह्या कालामध्यें म्हणजे ब्रह्मदेवाच्या एका दिवसामध्यें चौदा मनु होतात. प्रत्येक मनूचा काल चार युगांच्या एक हजार चौकडया व थोडा अधिक म्हणजे ७१$\frac{६}{१४}$ चौकड्यांइतका असतो. प्रत्येक मन्वंतरांत मनु, त्याच्या वंशांतील राजे, सप्तर्षि, देव, इंद्र व त्याचे अनुयायी जे गंधर्वादिक ते एकदम अधिकारारूढ होतात.

विदुरा, ब्रह्मदेवाचा एका दिवसाचा सृष्टिक्रम हा असा आहे. ह्यामध्यें कर्मानुसार पशु, पक्षी, मनुष्य, पितर, देव ह्यांची उत्पत्ति होते. प्रत्येक मन्वंतरामध्यें ईश्वर सत्त्वगुणानें मनूचा अवतार घेतो, व पराक्रम करून ह्या जगाचें पालन करतो. विदुरा, दिवसाची समाप्ति होतांच तमोगुणाचा स्वीकार करून ब्रह्मदेव आपल्या क्रमाचा उपसंहार करितो, व स्वस्थपणें शयन करितो. त्यानें शयन केलें म्हणजे कालाच्या योगानें सर्व वस्तुमात्र त्यांत प्रवेश करितें. सूर्य, चंद्र आदिकरून ह्याप्रमाणें नष्ट झाले, म्हणजे भू, भुवः आणि स्वः हे तीनही लोक अंतर्धान पावतात. शेषाच्या मुखांतील संकर्षण नांवाच्या अग्नीनें हे दग्ध होऊं लागतात; तेव्हां त्या अग्नीच्या योगानें पीडित झालेले भृग्वादिक ऋषि महर्लोकांतून निघून जनर्लोकीं जातात. इतक्यांत, वादळाच्या वाऱ्यानें ज्याप्रमाणें लाटा उसळतात, त्याप्रमाणें प्रलयकाळाच्या योगानें समुद्र उसळून तत्काळ त्रैलोक्याला बुडवितो. त्या सागराच्या अंतर्भागीं शेषाच्या पाठीवर श्रीभगवन्मूर्ति योगामध्यें समाधि लावून शयन करिते, व त्या परमात्म्याची जनर्लोकवासी मोठमोठे ऋषि स्तुति करीत असतात. विदुरा, दिवस व रात्र ह्यांच्या योगानें केवळ प्राणिमात्राचें आयुष्य घटतें असें समजूं नको; तर प्राणिमात्रास उत्पन्नकर्ता जो ब्रह्मदेव, त्याचें शंभर वर्षांचें आयुष्यही ह्याप्रमाणें दिवस व रात्र ह्यांच्या योगानें बहुतेक संपल्यासारखेंच आहे. कारण, ब्रह्मदेवाच्या आयुष्याचा एक परार्ध म्हणजे पूर्वार्ध संपला असून हल्लीं दुसरा परार्ध सुरू झाला आहे. पहिल्या परार्धाच्या आरंभीं ब्राह्म नांवाचा एक मोठा कल्प ( ब्रह्मदेवाचा दिवस ) होऊन गेला. त्यामध्यें शब्दब्रह्म नांवाचा ब्रह्मदेव झाला. त्या पहिल्या परार्धाच्या शेवटीं पाद्म नांवाचा कल्प झाला. त्यामध्यें श्रीहरीच्या नाभिकमलापासून त्रिभुवनात्मक कमल उत्पन्न झालें. विदुरा, सध्या चालू असलेला वाराह कल्प दुसऱ्या परार्धाच्या आरंभीं झाला. ह्याला वाराह असें नांव पडण्याचें कारण-श्रीविष्णूनें ह्या कल्पांत वराहावतार घेतला हें होय. दोन परार्ध काळ म्हणजे

अनादि, अनंत व निर्विकार अशा जगदात्म्याच्या एका निमेषाइतका आहे. परमाणूपासून द्विपरार्धापर्यंत ज्याची गणती होते असा हा काल देह, गृह इत्यादिकांचा अभिमान बाळगणाऱ्या पुरुषांवर मात्र आपला अधिकार चालवितो. परमात्म्यावर ह्याचा अंमल मुळींच चालत नाहीं. विदुरा, परमात्म्याचें स्वरूप किती व्यापक आहे ह्याचा विचार कर. प्रकृति, महत्तत्त्व, अहंकार व शब्दस्पर्शादिक सूक्ष्मभूतें इत्यादिकांनीं उत्पन्न झालेला, आणि अकरा इंद्रियें व पंचमहाभूतें अशा विकारांनीं युक्त असलेला हा ब्रह्मांडकोश, आंत पन्नास कोटि योजनें विस्तृत असून बाहेरून एकापेक्षां एक दसपट अधिक अशा पृथ्वी आदिकरून सात वेष्टनांनीं वेढिलेला आहे; हा ब्रह्मांडकोश परमात्म्याच्या देहांत एका परमाणूप्रमाणें दिसतो; इतकेंच नव्हे, तर दुसऱ्या कोट्यवधि ब्रह्मांडांच्या राशिही त्याच्यामध्यें परमाणुतुल्यच आहेत. विदुरा, श्रीमहाविष्णु परमात्म्याचें हें स्वरूप माया आदिकरून सर्व कारणांचें कारण आहे. ह्यास महान ऋषींनीं अक्षरब्रह्म असें नांव दिलेलें आहे.

## अध्याय बारावा.

—:०:—

### अविद्यादिक सृष्टि व स्वायंभुव मनु व शतरूपा ह्यांची उत्पत्ति.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें परमेश्वराच्या कालशक्तीचें माहात्म्य मीं तुला सांगितलें. आतां, आपल्या उदरांत असलेल्या वेदांच्या आधारावर ब्रह्मदेवानें कोणत्या प्रकारें सृष्टि निर्माण केली तें तुला सांगतों. हें पहा—ब्रह्मदेवानें जेव्हां सृष्टि करण्यास सुरुवात केली, तेव्हां प्रथमतः त्यानें अविद्येच्या पांच वृत्ति उत्पन्न केल्या. तम, मोह, महामोह, तामिस्र आणि अंधतामिस्र हीं त्यांचीं नांवें होत. स्वतांच्या स्वरूपाचें अज्ञान असणें ही तमवृत्ति होय; देह व इंद्रियें ह्यांवरच मीपणा असणें ही मोहवृत्ति होय; भोगांची इच्छा असणें ही महामोहवृत्ति होय; भोगांच्या इच्छेचा भंग झाला असतां राग येणें ही तामिस्रवृत्ति होय; व त्यांचा सर्वस्वी भंग झाला असतां 'आपण नष्ट झालों' असें मानणें ही अंधतामिस्रवृत्ति होय. ह्या पांच वृत्तींना 'पंचपर्वा अविद्या' असें म्हणतात. ही पंचपर्वा अविद्या नामक पापी सृष्टि पाहून ब्रह्मदेवाला फार वाईट वाटलें. त्यानें ईश्वराचें ध्यान केलें, व मन पवित्र झाल्यावर दुसरी सृष्टि निर्माण केली.

सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार हे ह्या दुसऱ्या सृष्टींतील होत. हे चौघेही ज्ञानी असून नैष्ठिक ब्रह्मचारी होते; व धर्म, अर्थ आणि काम ह्या तिन्ही पुरुषार्थांविषयीं निरपेक्ष असल्यामुळें ते कोणतेंही कर्म करण्याला प्रवृत्त होत नसत. त्यांना ब्रह्मदेवानें प्रजा उत्पन्न करण्याविषयीं आज्ञा केली, पण तसें करण्याची त्यांना मुळींच इच्छा होईना. ते चौघेही मोक्षप्राप्तीच्या धर्माचें आचरण करीत असत. आपल्या पुत्रांनीं आपली आज्ञा मान्य केली नाहीं, म्हणून ब्रह्मदेवाला राग आला. त्यानें तो राग आवरून धरण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला, पण व्यर्थ! शेवटीं त्याचा परिणाम असा झाला कीं, तो त्याचा राग त्याच्या दोन्ही भोंवयांमधून बाहेर पडला, व तत्काळ त्यापासून एक नीललोहित वर्णाचा पुत्र उत्पन्न झाला.

विदुरा, हाच मुलगा देवादिदेव शंकर होय. हा झाल्याबरोबर रडूं लागला, व हट्ट धेऊन बसला कीं, मला नांवें आणि राहण्यास जागा पाहिजे. तेव्हां मुलाची समजूत करण्याकरितां ब्रह्मदेवानें त्याला सांगितलें, "बाळा, रडूं नको, तुला नांवें व राहण्यास जागा देतों बरें. सुरश्रेष्ठा शंकरा, तूं एखाद्या दुःखी मुलाप्रमाणें रडत बसलास, म्हणून लोक तुला रुद्र ( रडवा ) म्हणतील; तरी

मी तुला ह्याशिवाय दुसरीं अकरा नांवें देतों. बाळा, मन्यु, मनु, महानस्, महान्, शिव, ऋतुध्वज, उग्ररतेस्, भव, काल, वामदेव व धृतव्रत हीं तुझीं अकरा नांवें होत; व तुला राहण्याकरितां हृदय, इंद्रियें, प्राण, आकाश, वायु, अग्नि, उदक, पृथ्वी, सूर्य, चंद्र आणि तपश्चर्या हीं स्थलें मीं पूर्वीच सिद्ध करून ठेविलीं आहेत. शंकरा, धी, वृत्ति, उशना, उमा, नियुत्सर्पि, इला, अंबिका, इरावती, सुधा, दीक्षा व रुद्राणी ह्या तुझ्या स्त्रिया होत; ह्याप्रमाणें तुझी सर्व व्यवस्था केली आहे. आतां तूं अनेक प्रजांची उत्पत्ति कर."

विदुरा, ह्याप्रमाणें पित्यानें आज्ञा दिल्यावर नीललोहितानें आपल्या स्वभावासारखी, गुणासारखी आणि रंगासारखी अशी पुष्कळ प्रजा उत्पन्न केली. नंतर रुद्रानें उत्पन्न केलेली प्रजा जिकडे तिकडे पसरली असतां, ती उग्र प्रजा पाहून ब्रह्मदेवाचें मन शंकित झालें; आणि तो रुद्राला म्हणाला, "हे देवाधिदेवा, तूं उत्पन्न केलेली ही प्रजा आपल्या नेत्रांच्या तीक्ष्ण तेजानें मला व दशदिशांना दाह उत्पन्न करीत आहे. ह्याकरितां आतां तूं ही अशी सृष्टि उत्पन्न करूं नको. रुद्रा, सर्व जीवांना सुख देणारें तप तूं आचरण कर. म्हणजे त्याच्या योगानें तुला हें जग पूर्वीप्रमाणें उत्पन्न करितां येईल. रुद्रा, सर्व जीवांचा आधार परमेश्वरच होय. तो पूर्ण तेजोमय असून सर्व प्राण्यांच्या बुद्धिवृत्तींमध्यें राहतो. इंद्रियांना तो अगोचर आहे; पण तपाच्या योगेंकरून पुरुष ईश्वराच्या स्वरूपाला सहज प्राप्त होतो." विदुरा, ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें आज्ञा केली असतां, भगवान रुद्रानें ब्रह्मदेवाला प्रदक्षिणा घातली, आणि त्याचा निरोप घेऊन तो तपश्चर्येसाठीं वनांत गेला.

रुद्र वनांत गेल्यावर ब्रह्मदेव सृष्टीची वृद्धि करण्याविषयीं विचार करूं लागला. सृष्टि करण्याची शक्ति ईश्वरानें त्याला दिलीच होती. तेव्हां त्या योगानें त्यानें सृष्टीची वृद्धि करणारे असे दहा पुत्र उत्पन्न केले. त्यांचीं नांवें मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु, भृगु, वसिष्ठ, दक्ष आणि नारद हीं होत. त्यांत ब्रह्मदेवाच्या मांडीपासून नारद झाला; आंगठ्यापासून दक्ष झाला; प्राणापासून वसिष्ठ; त्वचेपासून भृगु; हस्तापासून क्रतु; नाभीपासून पुलह; दोन्ही कर्णांपासून पुलस्त्य; मुखापासून अंगिरा; नेत्रांपासून अत्रि; आणि मनापासून मरीचि झाला.

विदुरा, ब्रह्मदेवानें एवढी सृष्टि निर्माण केली, तरी आणखी सृष्टि उत्पन्न करावी असें त्यास वाटलें. तेव्हां त्यानें आपल्या दक्षिणस्तनापासून धर्म उत्पन्न केला. हा धर्म साक्षात् नारायणस्वरूप होय. ब्रह्मदेवानें आपल्या पाठीपासून अधर्म उत्पन्न केला. हा अधर्म महाभयंकर व मृत्यु देणारा होय. पुढें त्यानें हृदयापासून काम, भ्रुकुटीपासून क्रोध, अधरोष्ठापासून लोभ, मुखापासून वाणी ( सरस्वती ), शिश्नापासून सप्तसमुद्र, गुदस्थानापासून पापप्रवर्तक असे राक्षस, आणि आपल्या सावलीपासून कर्दम ऋषि निर्माण केला. हा कर्दम देवहूतीचा पति होय. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें मानसिक आणि शारिरिक सृष्टि उत्पन्न केली.

विदुरा, आतां, ब्रह्मदेवास पहिल्या देहाचा त्याग करण्यास काय कारण झालें तें सांगून त्यानें दुसरा देह धारण करून जी सृष्टि उत्पन्न केली ती तुला सांगतों. मदनाचा प्रभाव किती विलक्षण आहे तें पहा! ब्रह्मदेवाच्या मुखापासून जी सरस्वती (वाणी) नांवाची कन्या झाली, ती रूपानें फार सुंदर व मनोहर होती. ती स्वत: कामविकाररहित होती, तरी तिला पाहून ब्रह्मदेवाच्या मनांत कामविकार उत्पन्न झाला. त्याचें तें चिन्ह त्याच्या मरीचि वगैरे मुलांच्या लक्षांत आलें. तेव्हां, आपल्या पित्याची बुद्धि अधर्ममार्गाकडे प्रवृत्त होत आहेसें पाहून, त्या अप्रयोजक गोष्टीचें निवारण करावें ह्या हेतूनें त्यांनीं त्यास विनयपूर्वक बोध केला: ते म्हणाले, "हे तात, आपण समर्थ आहां. कामविकाराचें आकलन

करणें हें आपणांस अवघड आहेसें नाहीं. त्या विकाराचें आकलन करणें सोडून आपण कन्येविषयीं पापवासना धरितां हें काय? आजपर्यंत कोणत्याही पूर्वजांनीं असें कर्म मुळींच केलें नाहीं आणि ह्यापुढें सुद्धां कोणी करणार नाहीं. गुरो, आपल्यासारख्या थोरांना हें कृत्य योग्य नव्हे. कारण, सर्व लोक थोरांचाच कित्ता वळवितात." इतकें बोलून, ब्रह्मदेवास सुबुद्धि देण्याविषयीं त्यांनीं परमेश्वराची प्रार्थना केली. ह्याप्रमाणें, आपल्या दुर्बुद्धीबद्दल प्रत्यक्ष आपल्या मुलांनीं आपली कानउघडणी केलेली पाहून ब्रह्मदेव फार लज्जित झाला, आणि त्यानें तत्काळ आपल्या शरिराचा त्याग केला. ब्रह्मदेवानें त्याग केलेलें तें निंदास्पद शरीर दिशांनीं स्वीकारिलें. तेंच हल्लींचें धुकें होय.

विदुरा, एके कालीं, ब्रह्मदेव हा, पूर्वींच्या कल्पांत आपण सृष्टि उत्पन्न केली तें ज्ञान आपणांस झालें असतां ह्याही वेळीं त्याचप्रमाणें सृष्टि उत्पन्न करण्यास ठीक पडेल, पण तें ज्ञान कसें प्राप्त होईल, असा विचार करीत बसला असतां, त्याच्या मुखांतून वेद, उपवेद, न्याय, यज्ञकर्म, तप, शौच, दया, सत्य व आश्रमधर्म उत्पन्न झाले.

विदुर म्हणालाः—मैत्रेय मुने, ब्रह्मदेवाच्या मुखापासून ह्या सर्वांची उत्पत्ति झाली हें खरें; पण कोणत्या मुखापासून कशाची उत्पत्ति झाली, तें सांगावें.

मैत्रेय म्हणालेः—विदुरा, ब्रह्मदेवाला चार मुखें आहेत. त्यांतील पूर्वेकडील मुखांतून ऋग्वेद, दक्षिणेकडील मुखांतून यजुर्वेद, पश्चिमेकडील मुखांतून सामवेद, आणि उत्तरेकडील मुखांतून अथर्ववेद उत्पन्न झाला. त्याचप्रमाणें, होत्याचें कर्म शस्त्र, अध्वर्यूचें ईज्या, उद्गात्याचें स्तुतिस्तोम व ब्रह्मयाचें प्रायश्चित्त हीं त्याच अनुक्रमानें उत्पन्न झालीं. त्याप्रमाणेंच आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद ( गायनविद्या ) आणि स्थापत्यवेद (कलाकौशल्य) हे चार उपवेद त्याच अनुक्रमानें त्यानें उत्पन्न केले. नंतर त्याचे चारही मुखांतून पांचवा वेद म्हणजे इतिहास व पुराणें हीं उत्पन्न झाली. त्यानें आपल्या पूर्वमुखापासून षोडशी आणि उक्थ हे दोन याग उत्पन्न केले; दक्षिणमुखापासून चयन व अग्निष्टोम, पश्चिममुखापासून आप्तोर्याम व अतिरात्र आणि उत्तरमुखापासून गोसव आणि वाजपेय हे याग उत्पन्न केले. धर्माचे चार चरण म्हणजे विद्या, दान, तप व सत्य आणि वृत्तींसह ब्रह्मचर्यादि चार आश्रम व त्यांचे वर्तनक्रम हे त्यानें आपल्या पूर्वादि मुखांपासून त्याच अनुक्रमानें उत्पन्न केले.

विदुरा, आतां तुला प्रत्येक आश्रमाचे जे चार चार भेद आहेत ते सांगतोंः ब्रह्मचर्य आश्रमाचे सावित्र, प्राजापत्य, ब्राह्म आणि बृहत् असे चार भेद आहेतः उपनयन झाल्यापासून तीन दिवसपर्यंत गायत्र्यध्ययनासाठीं जें धारण करावयाचें, तें सावित्र ब्रह्मचर्य; एक वर्षपर्यंत धारण करावयाचें तें प्राजापत्य; वेदाध्ययन संपेपर्यंत धारण करावयाचें तें ब्राह्म, आणि आमरण धारण करावयाचें तें बृहत् ब्रह्मचर्य होय. गार्हस्थ्यांत चार प्रकार आहेत. ते असेः वार्ता, संचय, शालीन आणि शिलोंछ. अनिषिद्ध अशा कृषिकर्मादिकांनीं उपजीवन करणें हिला वार्तावृत्ति म्हणतात. यजमानाकडून यज्ञादि कर्मे करवून प्रतिग्रहाच्या योगानें द्रव्यसंचय करून त्यावर निर्वाह चालविणें हिला संचयवृत्ति म्हणतात. न मागतां मिळेल त्यावर निर्वाह करून राहणें हिला शालीनवृत्ति (अयाचितवृत्ति) म्हणतात. मालकानें आपलें धान्य नेल्यावर शेतांत अथवा बाजारांत जे दाणे सांडले असतील, ते वेंचून आणून त्यांवर निर्वाह करणें हिला शिलोंछवृत्ति म्हणतात. वानप्रस्थाश्रमामध्यें वैखानस, वालखिल्य, औदुंबर आणि फेनप असे चार प्रकार आहेतः न खणतां अथवा न नांगरतां जे पदार्थ आपोआप उत्पन्न

होतात, त्यांवर निर्वाह करणें ही वैखानसवृत्ति होय. नवें अन्न मिळालें कीं पूर्वीचें असलेलें सर्व अन्न कोणा तरी सत्पात्राला देऊन टाकावयाचें, ही वालखिल्यवृत्ति होय; निजून उठतांच ज्या दिशेकडे दृष्टि जाईल त्याच दिशेला जाऊन फलें व मूलें आणून त्यांवर निर्वाह करणें ही औदुंबरवृत्ति होय; आपोआप गळून पडलेलीं फलें वगैरे खाऊन त्यांवरच निर्वाह करणें ही फेनपवृत्ति होय. संन्यासाश्रमामध्यें कुटीचक, बहूदक, हंस व निष्क्रिय असे चार प्रकार आहेत: आपल्या आश्रमामध्यें विहित कर्मांचें मुख्यत्वेंकरून आचरण करणें ही कुटीचकवृत्ति; अवश्यक असतील तितक्याच कर्मांचें आचरण करून बाकी सर्व वेळ ज्ञानाभ्यासांत घालविणें ही बहूदकवृत्ति; सर्व कर्मांचा त्याग करून केवळ ज्ञानाभ्यास करणेंही हंसवृत्ति; आणि पूर्ण ज्ञानसंपन्न होणें ही निष्क्रियवृत्ति होय. हे सर्व प्रकार उत्तरोत्तर श्रेष्ठ होत.

विदुरा, आन्वीक्षिकी ( आत्मविद्या ), त्रयी ( कर्मविद्या ), वार्ता ( उपजीवनविद्या ) आणि दंडनीति ( राजनीति ) ह्या चार वार्ता, व भूः, भुवः, स्वः आणि भूर्भुवःस्वः ह्या चार व्याहृति अनुक्रमें ब्रह्मदेवाच्या पूर्वादि चार मुखांपासून उत्पन्न झाल्या. त्याच्या हृदयाकाशापासून प्रणव झाला. लवेपासून उष्णिक् छंद, त्वचेपासून गायत्री, मांसापासून त्रिष्टुप्, स्नायूंपासून अनुष्टुप्, अस्थींपासून जगती, मज्जेपासूस पंक्ति व प्राणापासून बृहती हे छंद; आणि जीवापासून क, च, ट, त, प हे पांच वर्णवर्ग उत्पन्न झाले. त्याच्या देहापासून स्वर; इंद्रियांपासून श, ष, स, ह, आणि बलापासून य, र, ल, व हे वर्ण उत्पन्न झाले. त्याच्या क्रीडेपासून निषाद, ऋषभ, गांधार, षड्ज, मध्यम, धैवत आणि पंचम हे सप्तस्वर उत्पन्न झाले.

विदुरा, शद्बब्रह्म हें ब्रह्मदेवाचें शरीर होय. वाणी आणि प्रणव हीं ब्रह्मदेवाचीं व्यक्त आणि अव्यक्त अशीं दोन स्वरूपें होत. सर्वैश्वर्यसंपन्न परमेश्वर त्या ब्रह्मदेवाला अव्यक्त आणि व्यक्त ह्या दोन्ही स्वरूपांनीं प्रत्यक्ष भासमान आहे. विदुरा, हें शद्बब्रह्म म्हणून जें ब्रह्मदेवाचें शरीर तुला सांगितलें, तें ब्रह्मदेवानें म्हणजे नवीन धारण केलें असा मुळींच प्रकार नाहीं. त्यानें निबिडनिहाररूपानें ( धुक्याच्या रूपानें ) जें शरीर पूर्वी टाकिलें म्हणून सांगितलें, त्याहून एक निराळें शरीर त्यानें नंतर धारण केलें, आणि मरीच्यादि प्रजापतींकडून व्हावी तितकी सृष्टि उत्पन्न होत नाहींसें पाहून, तो आणखी जास्त सृष्टि उत्पन्न करण्याच्या विचारास लागला. तो म्हणाला:—मी इतकी खटपट करीत असतां अजून प्रजावृद्धि होत नाहीं हें काय? ह्यांत दैव तर आडवें येत नसेलना?

विदुरा, तो ह्या विचारांत निमग्न असतां त्याचें शरीर एकाएकीं दुभंग झालें. त्यापासून एक मिथुन (जोडपें) उत्पन्न झालें. ब्रह्मदेवाचें शरीर दुभंग झालें, त्या वेळीं लोकांच्या तोंडांतून 'हें काय?' असे आश्चर्यसूचक उद्गार निघाले. कारण, क म्हणजे ब्रह्मदेव ह्मास हें शरीर प्रथम प्राप्त झालें. ह्या दुसऱ्या शरिरास काय हें नांव पडलें; असो. त्या उत्पन्न झालेल्या जोडप्यांत जो पुरुष होता, तो स्वायंभुव मनु. तो सर्व जगाचा अधिपति झाला. स्त्री होती ती शतरूपा. ती स्वायंभुवाची पट्टराणी झाली. ह्यांपासूनच मैथुनजन्य सृष्टीस प्रारंभ झाला, व प्रजावृद्धि होऊं लागली. स्वायंभुवाला शतरूपेच्या ठिकाणीं प्रियव्रत आणि उत्तानपाद हे दोन पुत्र, व आकूति, देवहूति व प्रसूति ह्या तीन कन्या झाल्या. त्यानें आकूति रुचि ऋषीला, देवहूति कर्दमाला, आणि प्रसूति दक्षाला दिली. ह्या तिघींच्या संततीनें हें जग भरलें आहे.

# अध्याय तेरावा.

—:०:—

## वराहावतार.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, परमेश्वराच्या कथा श्रवण करण्यामध्यें विदुराचें अंतःकरण अगदीं तल्लीन झालें असतां त्यानें मैत्रेयांस प्रश्न केला, " मैत्रेय मुने, ब्रह्मदेवाच्या अर्ध्या शरिरापासून स्वायंभुव मनूची उत्पत्ति होऊन ब्रह्मदेवास प्रिय अशा त्या सार्वभौम स्वायंभुव मनूला त्याच्या मनाजोगी बायको शतरूपा ही मिळाल्यानंतर पुढें त्यानें काय केलें बरें ? हे साधुश्रेष्ठा, त्या महाभगवद्भक्त आद्य राजर्षीचें चरित्र मला सांगावें. भगवद्भक्ताचें चरित्र आणि ईश्वराच्या कथा श्रवण करणें हेंच शास्त्रसंपादित ज्ञानाचें फळ होय, असें विद्वानांचें मत आहे. "

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, श्रीकृष्णाचा परमभक्त जो विदुर, त्याचा हा प्रश्न ऐकून मैत्रेयांना फार आनंद झाला, आणि त्यांनीं बोलण्यास आरंभ केला.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, शतरूपेसह स्वायंभुव मनु उत्पन्न झाला, त्या वेळीं स्वायंभुव मनूनें हात जोडून ब्रह्मदेवाची प्रार्थना केली.

स्वायंभुव मनु म्हणाला:—हे भगवन्, तुला आमचा नमस्कार असो. तूं सर्व प्राणिमात्राचा मुख्य उत्पन्नकर्ता व संरक्षक आहेस. आम्ही कोणत्या कर्माचरणाच्या योगानें तुझी शुश्रूषा करावी, कीं ज्या कर्मांच्या यथाशक्ति आचरणानें इहलोकीं आमची कीर्ति होऊन परलोकीं आम्हांस गति मिळेल ? ब्रह्मदेव म्हणाला, "बा मनो, तुझ्या निष्कपट श्रद्धेनें मी प्रसन्न झालों आहें. तुम्हां उभयतांचें कल्याण असो. मनो, पुत्रानें पित्याची आज्ञा मनःपूर्वक व शिरसा वंद्य करणें हीच पित्याची सेवा करणें होय. ह्यानें सर्व अर्थ साध्य होतात. हे सत्पुत्रा, आतां तुला तुझ्या प्रिय भार्येपासून तुझ्या गुणांस योग्य अशी संतति होवो; तूं ह्या पृथ्वीचें धर्मानें पालन करून यज्ञांच्या योगानें यज्ञपुरुषाचें आराधन कर. म्हणजे त्यापासून माझी अत्युत्तम सेवा केल्यासारखें होऊन परमात्माही संतुष्ट होईल. यज्ञरूपी परमेश्वराला संतुष्ट करणें हेंच पुरुषाचें मुख्य कर्तव्य होय. जे पुरुष परमेश्वराला संतुष्ट न करितां अन्य कृत्यांत रममाण होतात, त्यांचे ते श्रम व्यर्थ होत. " मनु म्हणाला, " हे प्रभो, आपली आज्ञा मला शिरसा वंद्य आहे; पण सर्व प्रजांसह मला रहावयास एखादें स्थल दाखवून द्या. कारण, सर्वांचें आश्रयस्थान जी पृथ्वी, ती तर अगाध जलांत बुडून गेली आहे; तेव्हां प्रथम तिला वर काढण्याचा कांहीं तरी विचार करा. "

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ब्रह्मदेवालाही तें मनूचें सांगणें पटलें, आणि तो त्याविषयीं विचार करूं लागला. तो आपल्याशींच म्हणाला: " मी इकडे सृष्टि उत्पन्न करण्यांत गुंतलों असतां ह्या उदकाची वृद्धि होऊन ही पृथ्वी त्यांत बुडून गेली, येथें मी तरी काय करावें ! आतां, ज्या ईश्वरापासून मी उत्पन्न झालों, त्यानेंच कांहीं तरी उपाय करावा. " विदुरा, ह्याप्रमाणें तो विचार करीत असतां त्याच्या नाकपुडींतून एक अंगठ्याएवढें वराहाचें पिलूं बाहेर पडलें. ब्रह्मदेव त्याजकडे 'हें काय ' म्हणून आश्चर्यानें पहात आहे, तों पहातां पहातां तें डुकराचें पोर हत्तीएवढें मोठें झालें. विदुरा, मरीचि आदिकरून प्रजापति, सनत्कुमार, स्वायंभुव मनु वगैरे त्या वेळीं तेथें असलेल्या मंडळीला सुद्धां त्याचें फार आश्चर्य वाटलें, व ते आपआपसांत त्याजविषयीं तर्क करूं लागले. तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला, " हा माझ्या नाकांतून आश्चर्यजनक प्राणी बाहेर पडला, हा आहे तरी कोण ? व इतक्यांत हा एवढा मोठा झाला तरी कसा ? कदाचित् परमेश्वरानेंच हें रूप धारण करून मला मोह पाडण्याचा विचार तर

केला नाहींना?" ह्याप्रमाणें त्या सर्वांचे नानाविध तर्क चालले आहेत, तों वराहरूपी भगवंतानें आपलें शरीर पर्वताएवढें वाढविलें व दाही दिशांना व्यापून सोडणारी भयंकर गर्जना केली. ती गर्जना ऐकून त्यांचा पूर्ण निश्चय झाला कीं, हा सर्वव्यापी परमेश्वरच होय; आणि त्या योगानें त्या सर्वांस आनंद झाला. नंतर जनलोक, तपोलोक व सत्यलोक येथें राहणाऱ्या त्या श्रेष्ठ मुनींनीं वराहरूपी भगवंताची वेदप्रणीत मंत्रांनीं स्तुति केली. तेव्हां भगवान संतुष्ट होऊन त्यानें त्यांस आनंदित करण्याकरितां आणखी एक मोठी गर्जना केली, आणि हत्तीप्रमाणें लीला करीत करीत उदकांत प्रवेश केला. विदुरा, त्या वेळीं तो यज्ञवराह फारच शोभत होता. त्यानें आपलें पुच्छ उभारिलें होतें. त्याच्या मानेवरील केंस थरारत असून कठोर त्वचेवरील केंस ताठ उभे राहिले होते. तो आकाशांत मोठ्या वेगानें आपलें तें प्रचंड शरीर विद्युल्लतेप्रमाणें हालवीत होता. त्याच्या खुरांच्या दणदणाटानें मेघ अस्ताव्यस्त होत होते; आणि त्या पांढऱ्या शुभ्र भयंकर दाढेचें तेज सर्व दिशांना उज्वल करीत होतें. असा तो उग्रस्वरूपी वराह पृथ्वीचा सुगावा लागावा म्हणून हुंगीत हुंगीत जलामध्यें शिरला. परंतु जलामध्यें शिरतांना त्यानें स्तव करणाऱ्या मुनिवर्यांकडे सप्रेम अवलोकन केलें. तो वराह उदकांत शिरला, त्या वेळीं समुद्र अगदीं खवळून त्यांतून मेघगर्जनेप्रमाणें भयंकर ध्वनि निघाला, आणि त्याच्या मोठमोठ्या लाटा उसळूं लागल्या. विदुरा, त्या वेळीं, आपल्या लाटा हेच कोणी हात जोडून तो समुद्र उच्चस्वरानें परमेश्वराची प्रार्थनाच करीत आहे कीं काय, असा भास होत होता! त्या यज्ञस्वरूपी भगवंतानें आपल्या खुरांच्या योगानें समुद्राच्या त्या अपार उदकाचें विदारण केलें; तेव्हां समुद्राच्या तळाशीं असलेली पृथ्वी त्याच्या दृष्टीस पडली. ही पृथ्वी सर्व प्राणिमात्राचा आधार होय. प्रलयकालीं, सर्व जगताबरोबर परमेश्वरानें जिला आपल्या उदरांत धारण केलें होतें, तिला आतां त्या समुद्रांतून बाहेर काढणें हें त्या अद्भुतशक्ति परमेश्वराला कठिण होतें असें नाहीं. त्या वराहरूपी परमेश्वरानें ती पृथ्वी आपल्या दाढेवर सहज धरिली, आणि तो तिला बाहेर काढूं लागला. त्या वेळीं तो आपल्या पराक्रमानें फारच शोभत होता. तो पृथ्वीला घेऊन वर येत असतां त्याला प्रतिबंध करण्याकरितां हिरण्याक्ष नामक एक बलाढ्य दैत्य हातांत प्रचंड गदा घेऊन त्याच्या अंगावर धावला. त्या समयीं भगवंताला फार क्रोध आला, आणि आपल्या सुदर्शनाच्या योगानें त्यानें त्या दुष्टाचा वध केला! तेव्हां, एखादा हत्ती तांबड्या मातीच्या टेंकडीशीं टक्कर खेळून निघाला म्हणजे त्याचें गंडस्थल ज्याप्रमाणें लाल होतें, त्याप्रमाणें, त्या वेळीं हिरण्याक्षाच्या रक्तानें लाल झालेल्या गंडस्थलाच्या आणि मुखाच्या योगानें भगवान शोभत होता. त्यानें सहज लीलेनें आपल्या शुभ्र दंतावर पृथ्वी धारण करून ती वर आणिली. तें पाहून ब्रह्मदेवप्रभृतींना फार आनंद झाला, व त्यांनीं त्याची वेदसूक्तांनीं स्तुति केली.

## ब्रह्मदेवप्रभृतींनीं वराहरूपी परमेश्वराची केलेली स्तुति.

ते म्हणाले:—

**जितं जितं तेऽजित यज्ञभावन त्रयीं तनूं स्वां परिधुन्वते नमः ।**
**यद्रोमगर्तेषु निलिल्युरध्वरास्तस्मै नमः कारणसूकराय ते ॥**

रूपं तवैतन्ननु दुष्कृतात्मनां दुर्दर्शनं देव यदध्वरात्मकम् ।
छंदांसि यस्य त्वचि बर्हि रोमस्वाज्यं दृशि त्वंघ्रिषु चातुर्होत्रम् ॥
स्रुक् तुंड आसीत्स्रुव ईश नासयोरिडोदरे चमसाः कर्णरंध्रे ।
प्राशित्रमास्ये ग्रसने ग्रहास्तु ते यच्चर्वणं ते भगवन्नग्निहोत्रम् ॥
दिक्षाऽनुजन्मोपसदः शिरोधरं त्वं प्रायणीयोदयनीयदंष्ट्रः ।
जिह्वा प्रवर्ग्यस्तव शीर्षकं क्रतोः सभ्यावसथ्यं चितयोऽसवो हि ते ॥
सोमस्तु रेतः सवनान्यवस्थितिः संस्थाविभेदास्तव देव धातवः ।
सत्राणि सर्वाणि शरीरसंधिस्त्वं सर्वयज्ञक्रतुरिष्टिबंधनः ॥
नमो नमस्तेऽखिलमंत्रदेवताद्रव्याय सर्वक्रतवे क्रियात्मने ।
वैराग्यभक्त्यात्मजयाऽनुभावितज्ञानाय विद्यागुरवे नमो नमः ॥
दंष्ट्राग्रकोट्या भगवंस्त्वया धृता विराजते भूधर भूः सभूधरा ।
यथा वनान्निःसरतो दता धृता मतंगजेंद्रस्य सपत्रपद्मिनी ॥
त्रयीमयं रूपमिदं च सौकरं भूमंडलेनाथ दता धृतेन ते ।
चकास्ति शृंगोढघनेन भूयसा कुलाचलेंद्रस्य यथैव विभ्रमः ॥
संस्थापयैनां जगतां सतस्थुषां लोकाय पत्नीमसि मातरं पिता ।
विधेम चास्यै नमसा सह त्वया यस्यां स्वतेजोऽग्निमिवारणावधाः ॥
कः श्रद्दधीतान्यतमस्तव प्रभो रसां गताया भुव उद्विबर्हणम् ।
न विस्मयोऽसौ त्वयि विश्वविस्मये यो माययेदं ससृजेऽतिविस्मयम् ॥
विधुन्वता वेदमयं निजं वपुर्जनस्तपःसत्यनिवासिनो वयम् ।
सटाशिखोद्धूतशिवांबुबिंदुभिर्विमृज्यमाना भृशमीश पाविताः ॥
स वै बत भ्रष्टमतिस्तवैष ते यः कर्मणां पारमपारकर्मणः ।
यद्योगमायागुणयोगमोहितं विश्वं समस्तं भगवन्विधेहि शम् ॥

'हे अपराजिता, तुझा सर्वदा जयजयकार असो. हे यज्ञाधिपते, वेदत्रयीरूप हें तुझें यज्ञ-रणारें वराहशरीर पाहून आम्ही तुला नमस्कार करितों. तुझ्या रोमरंध्रांमध्यें सर्व यज्ञ लीन झाले-ले असून पृथ्वीला वर आणण्याकरितांच हें रूप तूं धारण केलें आहेस. हे आदिवराहा, आमचा तुला नमस्कार असो. प्रभो, ही तुझी यज्ञात्मक मूर्ति खरोखर पातकी पुरुषांच्या कधींही दृष्टीस पडाव-याची नाहीं. देवा, गायत्र्युष्णिकादि सर्व छंद तुझ्या त्वचेच्या ठिकाणीं राहतात. दर्भ हे तुझ्या केसांच्या ठिकाणीं असून दृष्टीच्या ठिकाणीं घृत आहे, व होता, अध्वर्यु, उद्गाता आणि ब्रह्मा ह्या चौघांचीं कर्मे तुझ्या चरणांच्या ठिकाणीं आहेत. ईश्वरा, तुझ्या मुखाच्या अग्रभागाच्या ठिकाणीं जुहू (हंसमुखासारखें) पात्र आहे. नाकपुड्यांचे ठिकाणीं स्रुवा (पळीसारखें) पात्र आहे. उद-राचे ठिकाणीं इडा (हातभर लांब चौकोनी व चपटें) पात्र आहे. कर्णरंध्रांच्या ठिकाणीं चमस (आठ अंगुळें लांब व चौकोनी) पात्रें आहेत. मुखाच्या ठिकाणीं प्राशित्र (गाईच्या कानासारखें) पात्र आहे. कंठच्छिद्राच्या ठिकाणीं बारा ग्रह (उखळासारखीं) पात्रें आहेत. भगवंता, तुझें

चर्वण (रोमंथ) हें अग्निहोत्र होय. हे यज्ञवराहा, यज्ञामध्यें दीक्षा घेण्यासाठीं जी इष्टि करितात, तेच तुझे निरनिराळे अवतार होत. उपसद (ह्या नांवाच्या तीन इष्टि) ही तुझी ग्रीवा होय. प्रायणीय (दीक्षा घेतल्याबरोबर लागलीच जी इष्टि करितात ती) व उदयनीय (यज्ञसमाप्तीच्या वेळीं जी इष्टि करितात ती) ह्या दोन इष्टि तुझ्या दाढा होत. प्रवर्ग्य (जें पात्र तापवून लाल झाल्यावर त्यांत तूप टाकून मग शेळीचें दूध टाकावयाचें असतें, व ज्याला महावीर म्हणतात तें पात्र) ही तुझी जिव्हा होय. सभ्यावसथ्य[1] हें तुझें मस्तक होय, व इष्टकाचयनें (कांहीं कर्मांकरितां विटा मांडणें) हे तुझे प्राण होत. ईश्वरा, सोमरस हें तुझें रेत होय. प्रातःसवनादि तीन सवनें ह्या तुझ्या बाल्यादिक तीन अवस्था होत. अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ, षोडशी, वाजपेय, अतिरात्र व आप्तोर्याम ह्या सप्तसंस्था तुझ्या सप्तधातु होत. द्वादशाहादिक (ज्यांत बारा दिवस दीक्षा असते तीं) सर्व सत्रें हे तुझ्या शरिराचे सांधे होत. एकंदरींत यज्ञ (ज्यांत पशुवध नसतो तो) व क्रतु (ज्यांत पशुवध असतो तो) हें सर्व तुझें स्वरूप होय; व त्यांतील अनुष्ठानें हीं तुझ्या शरिरांतील संधिबंधनें होत. सर्व मंत्र, देवता, आणि घृतादि द्रव्यें हें तुझेंच स्वरूप होय. तूंच सर्वयज्ञस्वरूपी आहेस. तुला आमचे अनेक प्रणिपात असोत. वैराग्य, भक्ति आणि मनस्थैर्य ह्यांच्या योगानें प्राप्त होणारें जें ज्ञान तें तुझेंच स्वरूप होय. तुला आमचे अनेक नमस्कार असोत. हे भूमिधारका ईश्वरा, जसा एखादा मत्त मतंगज आपल्या सोंडेनें पानांसुद्धां कमलिनीला उचलून सहज लीलेनें वर धरितो, तशी, तूं वर आणिलेली पर्वतांसहित ही पृथ्वी तूं धरिली आहेस. हे ईश्वरा, ज्याप्रमाणें एखाद्या महान पर्वताच्या उच्च शिखरावर लोंबत असलेल्या मेघांपासून शोभा यावी, त्याप्रमाणें वेदत्रयीरूप वराहशरिराच्या उग्र दाढेवर धारण केलेल्या ह्या पृथ्वीपासून शोभा येत आहे. भगवंता, आतां तूं ह्या पृथ्वीची अशी स्थापना कर कीं, ज्याच्या योगानें स्थावर व जंगम अशा दोन्हीं प्रकारची सृष्टि हिजवर सुखरूप राहील. ही पृथ्वी सर्व लोकांची माता आणि तूं सर्वांचा पिता आहेस. आम्ही तुला व ह्या पृथ्वीला नमस्कार करितों. देवाधिदेवा, मंत्रानें जसा अरणीमध्यें अग्नि स्थापन करितात, तसें तूं ह्या भूमीच्या ठिकाणीं आपलें तेज स्थापन केलें आहेस. तुला आमचा नमस्कार असो. हे प्रभो, पाताळांत गेलेल्या ह्या पृथ्वीस वर आणण्यास तुजवांचून इतर कोणाचें सामर्थ्य चाललें असतें ! ह्या तुझ्या कृत्याचें आम्हांस मोठें आश्चर्य वाटतें; पण, हे ईश्वरा, तुला मात्र हें कृत्य विशेष आहे असें नाहीं. कारण, ज्यामध्यें ही पृथ्वी अणुरेणुप्रमाणें राहिली आहे, तें हें अतिविस्मयावह ब्रह्मांड तूं आपल्या मायेनें सहज उत्पन्न केलें आहेस. जगदीशा, तूं आपलें वेदमय शरीर थरारविलेंस, त्याच्या योगानें जे तुषार आमच्या अंगावर उडाले, त्यामुळें जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक ह्या तिन्ही लोकीं राहणारे आम्ही अत्यंत पवित्र झालों आहों. परमेश्वरा, तुझ्या गुणांचा अंत नाहीं. तो अंत लावण्याची जो इच्छा करितो, त्याच्या बुद्धीला भ्रंश झाला, असें समजलें पाहिजे. हे भगवंता, हें विश्व तुझ्या योगमायेनें मोह पावलें आहे. तूं ह्याचें कल्याण कर.'

मैत्रेय म्हणालेः—विदुरा, ह्याप्रमाणें ब्रह्मदेवप्रभृतींनीं ईश्वराची स्तुति केली. नंतर तो वराहरूपी परमेश्वर, आपल्या खुरांच्या योगानें खवळलेल्या ह्या

---

१ यज्ञांत, होमरहित अग्नीस सभ्य म्हणतात; व तोच अग्नि होम करण्यास सिद्ध केला म्हणजे त्यास आवसथ्य असें नांव देतात.

उदकांत पृथ्वीची स्थापना करून निजधामास गेला. विदुरा, ईश्वराचीं चरित्रें अगाध आहेत. त्यांचे ठिकाणीं लय लाविलें असतां सर्व दुःखांचा नाश होतो. विदुरा, भगवंताच्या अतिमंगलकारक कथा जो भक्तीनें श्रवण करितो, किंवा दुसऱ्याकडून श्रवण करवितो, त्याच्या अंतर्यामीं भगवान त्वरित प्रकट होतो. बाबारे, अशा प्रकारें प्रत्यक्ष भगवान प्रकट झाला असतां प्राण्याला काय दुर्लभ आहे! तथापि अशाश्वत असे जे विषयोपभोग ते त्याजपाशीं मागणें हें गौण होय. त्यापाशीं, शाश्वत सुख प्राप्त करून देणारी जी भगवद्भक्ति तीच मागणें सर्वथैव इष्ट आहे. कारण, निष्काम भक्ति करणाराला तो सर्व कांहीं देऊन शेवटीं आपल्या पदाचीही प्राप्ति करून देतो. अहो, अशा त्या भगवत्कथामृताचें प्राशन करण्यास कोणता सुज्ञ पुरुष कंटाळेल बरें!

## अध्याय चौदावा.

—:०:—

### हिरण्याक्षाची उत्पत्ति.

( दितीच्या ठिकाणीं गर्भसंभव. )

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परिक्षित राजा, भगवंतानें वराह अवतार घेऊन पृथ्वीचा उद्धार केला ही गोष्ट मैत्रेय मुनींनीं विदुरास सांगितली. पण, त्यावर विदुराला शंका येऊन त्यानें मैत्रेय मुनींना विचारिलें, "ज्ञानसंपन्न मुने, पृथ्वीचा उद्धार करतेवेळीं वराहमूर्ति भगवंतानें दैत्यराज हिरण्याक्षाचा वध केला म्हणून आपण सांगितलें; पण त्या उभयतांमध्यें युद्ध होण्याला कारण काय झालें, तें समजल्यावांचून मनाला समाधान वाटत नाहीं. यास्तव, तो प्रसंग समग्र निवेदन करा."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, हा प्रश्न तूं चांगला विचारलास. कारण, हरिकथा श्रवण करणारा पुरुष मृत्युपाश तोडितो. पहा—ध्रुवबाळ हा नारदानें सांगितलेली श्रीहरीची कथा ऐकून मृत्यूच्या डोक्यावर पाय देऊन विमानांत आरूढ झाला, आणि अत्युच्च अशा विष्णु-पदाप्रत गेला. आता भगवंताचें हिरण्याक्षाशीं युद्ध काय कारणानें झालें म्हणून जसें तूं मला विचारिलेंस, तसेंच सर्व देवांनींहीं ब्रह्मदेवास विचारिलें होतें; त्या वेळीं ब्रह्मदेवानें जें सांगितलें, तेंच मी तुला सांगतों.

विदुरा, दक्षानें आपली कन्या दिति ही मरिचि प्रजापतीचा पुत्र कश्यप ह्यास दिली होती. एके दिवशीं, आपल्या सवतीचीं मुलें पाहून, आपणासही मुलें असावीं असें तिला वाटलें; व ह्यामुळें ती कामपीडित होऊन कश्यप मुनि होमशाळेंत बसले होते तेथें गेली. कश्यप मुनि त्या वेळीं दुधाचा होम करीत बसले होते. त्यांना दिति म्हणाली, "हे सर्वज्ञा, मी अत्यंत कामपीडित झालें आहें हें आपण जाणलेंच असेल. मदोन्मत्त हत्ती ज्याप्रमाणें केळीला पीडा करितो, त्याप्रमाणें हा धनुर्धारी मदन मला अत्यंत पीडा करीत आहे. महाराज, मला अपत्याची इच्छा फार झाली आहे. सवतींचीं मुलें पाहिलीं म्हणजे माझ्या अंगाचा अगदीं तिळपापड होतो. म्हणून आपण मजवर संततीचा अनुग्रह करावा. त्यांत आपलेंही कल्याण आहेच. आपल्यासारख्या पतीपासून स्त्रियांचे ठिकाणीं आपल्यासारखेच पुत्र उत्पन्न होतात, व त्या स्त्रियांची दिगंत कीर्ति होते. ब्रह्मवर्या, माझा पिता जो दक्ष प्रजापति, त्याचें मुख्य कर्तव्य म्हटलें म्हणजे प्रजावृद्धि करणें हें होय. दुहितृवात्सल्यानें त्यानें आम्हांस, तुम्ही कोण पति वरणार, असें विचारिलें असतां, आम्हीं तेराजणींनीं, आपलें आमच्याशीं स्वभावसादृश्य आहेसें पाहून, आपणांसच वरणार असें सांगितलें. त्या वेळीं आम्हां तेराजणींचा त्यानें आपणांशीं विवाह लावून दिला. आम्हां सर्वांचें आपणांवर सारखेंच प्रेम आहे. असें असतां आपण काहींना अपत्यानुग्रह केला आणि काहींना केला

नाहीं, हा विषमभाव कां? प्रिया, आपल्या दर्शनानें मी फारच कामपीडित झालें आहें. आपण माझी इच्छा तृप्त करावी. आपण माझ्या विनंतीचा अव्हेर करणार नाहीं, अशी माझी प्रार्थना आहे."

विदुरा, मदनव्यथेनें दितीचें देहभान जाग्यावर नव्हतें. तेव्हां निदान प्रदोषकाल तरी टाळावा ह्या हेतूनें कश्यप मुनींनीं तिजशीं गौरवाचीं भाषणें करण्यास आरंभ केला: ते म्हणाले, "हे भीरु, तूं इतकी शंकित कां होतेस? तुझ्या सर्व इच्छा पूर्ण करण्यास मी सिद्ध आहें. पत्नीपासूनच पुरुषाला धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ साध्य होतात; असें असतां तुझी इच्छा मी कशी बरें पुरविणार नाहीं? नावाडी ज्याप्रमाणें नौकेच्या साहाय्यानें इतरांसह समुद्र तरून जातो, त्याप्रमाणें गृहस्थाश्रमी पुरुष पत्नीच्या साहाय्यानें स्वतः ह्या दुःखरूप संसाराच्या पार पडतो, आणि इतरांनाही पार पडण्यास मदत करितो. पत्नी ही त्रिविधपुरुषार्थसाधक असें पुरुषाचें अर्धांग होय. तिच्यावर सर्व कर्मांचा भार टाकून पुरुष निश्चिंतपणें आपले व्यवहार चालवीत असतो. इतर आश्रमांतील पुरुषांना इंद्रियांचा जय करणें फार कठिण पडतें, पण आम्ही गृहस्थाश्रमी पुरुष पत्नीच्या साहाय्यानें त्यांचा सहज जय करितों. किल्ल्याचा आश्रय असला म्हणजे जसें शत्रूंस जिंकणें अवघड नाहीं, तसेंच गृहस्थाश्रमी पुरुषांना इंद्रियांचा जय करण्यास कठिण पडत नाहीं. प्रिये, आम्हांसारख्या गृहस्थाश्रमी पुरुषांवर असे तुमचे अनेक उपकार आहेत कीं, त्यांची फेड करण्याकरितां आम्हीं जरी सर्व आयुष्य खर्ची घातलें, तरी त्यांतून उतराई होणें शक्य नाहीं. प्रिये, तुझी इच्छा मी पूर्ण करितों, पण लोकनिंदेच्या भयास्तव दोन घटका दम धर. कारण ही राक्षसवेळ असून ह्या वेळीं श्रीशंकर आपल्या अनुचरांसह नंदीवर बसून इतस्ततः संचार करीत असतात. त्यांची दृष्टि मोठी तीक्ष्ण आहे. त्यांना सर्व कांहीं दिसत असतें. सूर्य, चंद्र व अग्नि हे त्यांचे नेत्र होत. त्यांची वृत्ति मोठी उग्र व भयंकर आहे. ते नेहमी स्मशानांत राहतात. स्मशानांतील वावटळीनें त्यांच्या जटाभारावर धुळीचीं पुटें बसून तो विसकटलेला असतो आणि त्यांची सुवर्णतुल्य देहकांति भस्मावगुंठनानें लुप्तप्राय दिसते, म्हणून त्यांची भीति बाळगून मनाचा निग्रह करणें उचित होय. गडये, तो तुझा आप्त आहे म्हणून ह्या अपराधाची क्षमा करील असें समजूं नको. कारण, त्याला स्व आणि पर हा भेदच ठाऊक नाहीं. त्या शंकराचा प्रभाव फार मोठा आहे. त्यानें उपभोगिलेल्या निर्माल्याची अथवा विभूतीची प्राप्ति करून घेण्यास आम्हांस व्रतादि साधनें करावीं लागतात. प्रिये, आपल्यावरील मायापटल टाकूं इच्छिणारे पुरुष त्या भगवंताचें निर्दोष यश गातात. त्याचें साम्य किंवा त्याजवर वर्चस्व इतर कोणासही करितां येणार नाहीं. साधूंना ज्याच्या स्वरूपीं गति मिळते, त्या भगवान शंकरानें पिशाचवृत्तीचा अंगीकार केला आहे. जे मूर्ख ह्या अशाश्वत देहास वस्त्रें, भूषणें, अलंकार ह्यांनीं भूषवून त्यांतच खरा पुरुषार्थ मानितात, तेच श्रीशंकराच्या ह्या आचरणाची निंदा करितात. त्यानें घालून दिलेल्या धर्ममर्यादांचें पालन ब्रह्मादिक देवही करितात. सर्व जगाची राहटी चालण्यास तोच कारण आहे. माया देखील त्याच्या अंकित राहते. असें असूनही तो भगवान शंकर पिशाचवृत्तीचा अंगीकार करून राहतो, ह्यास काय म्हणावें? थोरांचें चरित्र अतर्क्य असतें ह्यांत संदेह नाहीं!"

असो. विदुरा, ह्याप्रमाणें अनेक प्रकारांनीं कश्यप मुनींनीं दितीस सांगितलें, पण व्यर्थ! तिच्या मनावर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. मदनव्यथेनें ती अ-

गर्दी विचारशून्य झाली होती. अखेरीस तिनें निर्लज्जपणानें त्या ब्रह्मर्षीचा पदर धरिला. तेव्हां निरुपाय होऊन त्यानें आपल्या दैवाला हात लाविला, आणि तिजबरोबर एकांत करण्यास तो प्रवृत्त झाला! नंतर त्या मुनीनें स्नान केलें, आणि प्राणायाम करून मौनव्रत धरिलें; व भर्ग शब्दानें वाच्य अशा निर्मल तेजाचें (सूर्याचें) ध्यान करून, गायत्रीमंत्राचा जप केला. विदुरा, निंद्य कर्म जाणून बुजून केलें, तरी तें मनाला लागल्यावांचून रहात नाहीं. मदनव्यथेनें पीडित झाल्यामुळें दितीनें जरी अविचार केला, तरी त्याबद्दल मागून तिला पश्चात्ताप झाला. ती लज्जेनें अधोमुख करून आपल्या पतीकडे आली, आणि नम्रपणानें म्हणाली:

"महाराज, मीं शंकराचा मोठा अपराध केला आहे. मी त्याला शरण आहें. त्यानें माझ्या गर्भाचा घात करूं नये, एवढीच माझी प्रार्थना आहे; कां कीं, त्याचा क्रोध अनिवार आहे. तो सकाम आणि निष्काम भक्तांना फळ देणारा आहे; तरी दुष्टांस शासन करण्यास तो मागें घेत नाहीं. ज्या वेळीं ह्या पृथ्वीचा संहार करावयाचें त्याच्या मनांत येतें, त्या वेळीं तो आपल्या एका दृष्टिपातानेंच हें जग भस्म करून टाकतो. इतका त्याचा राग भयंकर आहे, तरी तो दयाळूही तसाच आहे. त्यांतून, आम्ही स्त्रिया कोणाच्या क्षमेस पात्र नाहीं? आम्ही दुर्बल आणि अज्ञान आहों. व्याधासारखे क्रूर लोकही आम्हांवर दया करितात. शिवाय. स्त्रियांचा स्वभाव किती हट्टी असतो ह्याची थोडी तरी कल्पना त्या भगवान शंकराला असेलच. कारण त्यालाही स्त्री आहेच. असो; तो पूर्ण दयाळू, सतीचा पति, माझा मेहुणा मला क्षमा करो."

विदुरा, हें भाषण करीत असतां दिति भयानें थरथर कांपत होती. तें पाहून, व ती आपल्या संततीचें इहपरलोकीं कल्याण असावें असें इच्छित आहे असें जाणून, संध्याकाळचें विहित कर्म संपल्यावर कश्यप मुनि तिला म्हणाले, "हे अभद्रे तामसी स्त्रिये, मीं पहिल्यानें तुला सांगितलें असतां तूं माझें ऐकिलें नाहींस. तुजकडून चार दोष घडले आहेत: पहिला—गर्भधारणेच्या वेळीं तुझें अंतःकरण शुद्ध नव्हतें; दुसरा—ती वेळ अमंगल होती; तिसरा—माझ्या आज्ञेचा भंग केलास; आणि चौथा—रुद्राच्या अनुचरांचा अवमान केलास. ह्यामुळें, तुला होणारे दोन्ही पुत्र लोकपाळांसहित त्रैलोक्याला पीडा करणारे आणि नीच असे होतील. ते निरपराधी प्राण्यांस मारूं लागतील, स्त्रियांचा छळ करतील, व साधूंस क्रोध आणितील. त्यामुळें बुद्धिस्थ भगवान विष्णु संतप्त होऊन अवतार घेईल, आणि वज्रधारी इंद्र जसा पर्वताचा नाश करितो, तसा तो तुझ्या पुत्रांचा नाश करील."

दिति म्हणाली:—महाराज, माझे मुलगे साधूंना क्रोध आणितील असें आपण म्हणालां म्हणून मी मागून घेतें कीं, एखाद्या ब्राह्मणाच्या शापानें त्यांस मरण न येतां साक्षात् भगवान विष्णूकडूनच त्यांचा वध व्हावा. कारण, प्राणिमात्राला पीडा देणारा व साधुजनांच्या शापानें दग्ध झालेला प्राणी नरकांत गेला अथवा अन्यत्र जन्मास आला, तरी तेथेंही त्याची कोणी कींव करीत नाहीं.

कश्यप म्हणाले:—हे स्त्रिये, तुला कृतकर्माबद्दल पश्चात्ताप झाला, तूं योग्यायोग्य गोष्टीचा विचार केलास, भगवान विष्णूच्या ठिकाणीं पूज्यबुद्धि ठेविलीस, आणि शंकर व मी ह्यांजबद्दल आदरबुद्धि बाळगिलीस, ह्या चार कारणांच्या योगानें तुझ्या पुत्रास, साधूंसही मान्य असा एक पुत्र होईल. त्याची पवित्र कीर्ति लोक भगवंताच्या बरोबरीनें गातील. निकस सोनें जसें तापवून शुद्ध करून घेतात, त्याप्रमाणें साधक पुरुष तुझ्या नातवाच्या स्वभावासारखा स्वभाव व्हावा

म्हणून निर्वैरभाव आणि समचित्तभाव ह्या उपायांनीं आपल्या अंतःकरणास शुद्ध करून घेतील. तो तुझा नातू मोठा भगवद्भक्त निपजेल, व आपल्या ठिकाणीं त्याची पूर्ण निष्ठा आहे असें पाहून भगवान त्याला प्रसन्न होईल. हें विश्व भगवंताचें स्वरूप होय. तो संतुष्ट झाला असतां हें विश्व संतुष्ट होतें. तुझा नातू देहादिकांवरील अभिमान सोडून, आपल्या हृदयांत भगवंताची मूर्ति स्थापन करील. तो विषयादिकांत लंपट होणार नाहीं. तो मोठा सुशील व सद्गुणांचा केवळ निधिच असेल. दुसऱ्याचें कल्याण झालेलें पाहून त्याला फार आनंद होईल, व दुसऱ्यास दुःखी पाहून त्यासही दुःख होईल. त्याला कधींही शत्रु उत्पन्न होणार नाहीं. तो जगाचे शोक दूर करील. तुझ्या नातवास सर्व जग ईश्वरमय दिसेल.

मैत्रेय म्हणालेः—विदुरा, आपल्या पुत्रास भगवंताच्या हस्तें मरण येईल आणि आपला नातू महाभगवद्भक्त निपजेल, हें ऐकून दितीस परमानंद झाला.

## अध्याय पंधरावा.

—:०:—

### हिरण्याक्षाची उत्पत्ति.

**( सनकादिकांचा जयविजयांस शाप. )**

मैत्रेय म्हणालेः—आपल्या पुत्रांकडून देवादिकांस त्रास उत्पन्न होईल ह्या भयानें दितीनें तें कश्यपाचें उग्र वीर्य शंभर वर्षें आपल्या उदरांत धारण केलें. तिला असें वाटत होतें कीं, आपल्या पुत्रांचा जन्म उशीरां झाला, तर लोकांना होणारा त्रास तितकाच लांबणीवर पडेल; पण ह्या तिच्या विचाराचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. जगाला त्रास देणाऱ्या त्या पुत्रांचा जन्म झाला नव्हता व ते गर्भावस्थेंतच होते, तरी त्यांजपासून जगाला त्रास व्हावयाचा, तो झालाच ! ब्रह्मवीर्यच तें ! त्याचें तेज काय सामान्य असणार ? दितीच्या त्या गर्भाच्या तेजापुढें सूर्य आणि चंद्र ह्यांचें तेज फिकें पडलें. सर्व जगांत अंधकार पडला. त्यामुळें इंद्र, यम आदिकरून सर्व लोकपालांचे पराक्रम चालतनासे झाले. सर्व कर्मे बंद पडल्यामुळें देवांना हविर्भाग मिळेनासा झाला. तेव्हां सर्व देव मिळून ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्यास म्हणाले, “ ब्रह्मदेवा, जे कालाच्या तडाक्यांत सांपडणारे आहेत, त्यांचें ज्ञान जसें कालाच्या प्रभावानें नष्ट होतें, तशी कांहीं तुझी स्थिति नाहीं. कारण कालाचा प्रभाव तुजवर मुळींच चालत नसल्यामुळें तुझें ज्ञान कधींही नष्ट होत नाहीं. देवा, तूं सर्व जाणतच आहेस. ह्या अंधकारापासून आमची स्थिति काय झाली आहे, हें आम्ही आपल्या मुखानें तुला सांगितलें पाहिजे असें नाहीं. देवाधिदेवा जगद्रक्षका, तूं सर्व लोकांचा मुकुटमणि आहेस. सर्व प्राणिमात्राचे हेतु तूं जाणत आहेस. तेव्हां दितीचा गर्भ कां वाढत आहे ह्याचें ज्ञान तुला आहेच. सर्वज्ञा, तुला आमचा नमस्कार असो. मायेच्या योगें रजोगुणाचा स्वीकार करून तूं हें रूप घेतलेंस, आणि ह्या सर्व संसाराचें कारण झालास. हे विश्वोत्पादका, कार्य आणि कारण हीं दोन्ही रूपें तुझींच आहेत. ह्या दोन्ही स्वरूपांच्या योगानें तूं हें विश्व स्वतांच्या ठिकाणीं गोंवून ठेविलें आहेस. जीवांना निरनिराळे देह प्राप्त करून देणारा तूं आहेस. इतकें करूनही कार्यकारणात्मक सृष्टीपासून तूं अलिप्त राहतोस. जेव्हां लोक अनन्यभक्तीनें तुझें चिंतन करितात, आणि प्राणायामाच्या योगानें वायु, इंद्रियें आणि मन हीं स्वाधीन करून घेतात, तेव्हां तूं त्यांना प्रसन्न होतोस. हे प्रभो, तूं ज्याला प्रसन्न होतोस, तो कोठेंही पराभव पावत नाहीं. तुझ्या वेदलक्षण वाणीरूप दावणीनें सर्व

प्रजा बांधल्या गेल्या असून, वेसण घातलेले बैल जसें मालकाचें ओझें पोहोंचवितात, तसे हे सर्व लोक आपआपल्या अधिकारानुसार कर्मे करून तुला व आम्हांस बलि अर्पण करितात. देवा, सर्व जगाचा नियंता तूं आहेस. तुला आमचा नमस्कार असो. हे ब्रह्मदेवा, सांप्रत अंधकारामुळें रात्र आणि दिवस समजत नसल्यानें आमचीं सर्व कर्मे बंद पडलीं आहेत. म्हणून आम्ही तुला शरण आलों आहों. आमचें कल्याण कर. देवाधिदेवा, ओल्या काष्ठामध्यें अग्नि स्थापन केला असतां जसा चोहींकडे धूर पसरतो, तसा कश्यपानें स्थापन केलेला हा दितीच्या उदरांतील गर्भ वाढत असून त्यामुळें दशदिशांच्या ठिकाणीं अंधकार पसरला आहे.

विदुरा, देवांचें तें भाषण ऐकून ब्रह्मदेवाला हंसू आलें. कारण त्याला दितीचें सर्व कृत्य माहीत होतेंच. नंतर त्यानें देवांस सर्व वर्तमान सांगितलें: "देवहो, तुमच्या पूर्वीच माझ्या अंतःकरणापासून उत्पन्न झालेले जे माझे सनकसनंदनादि चौघे पुत्र, ते निरिच्छपणें आकाशमार्गानें फिरत असतां सर्व लोकांना पूज्य अशा वैकुंठलोकीं सहज गेले. तेथें राहणाऱ्या लोकांचीं स्वरूपें विष्णूसारखीं असतात. निष्काम भक्तांसच ही गति मिळते. त्या वैकुंठलोकामध्यें पुराणपुरुष भगवान विष्णु शुद्धसत्त्वमय मूर्ति धारण करून आम्हां भक्तांस सुख देण्याकरितां वास करीत असतो. वेदांतज्ञानानें मात्र त्याचें स्वरूप समजून येतें. त्या लोकीं निःश्रेयस ह्या नांवाचें एक उद्यान आहे. तें वन म्हणजे मोक्षच होय. त्या वनांत अनेक कल्पवृक्ष आहेत. तेथील वृक्ष सर्व ऋतूंत फलपुष्पांनीं अगदीं ओथंबलेले असतात. विष्णुभक्त आपल्या स्त्रियांसह विमानांत बसून त्या उद्यानांत यथेच्छपणें फिरत असतात, आणि श्रीविष्णूचें पापनाशक असें निर्मल यश गातात. फुललेल्या कमलांवरून वहात येणारा मंद सुगंध वायु आल्हाददायक खरा, पण ते विष्णुभक्त त्याचा तिरस्कार करितात. कारण त्या योगानें कदाचित् विषयवासना उत्पन्न होऊन विष्णुभजनांत अंतर येईल, असें त्यांस वाटतें. तेथील पक्षी देखील नेहमीं हरिभजनांत निमग्न असतात. हंस, मयूर, पारवे, चक्रवाक, कोकिल, सारस, तित्तिर इत्यादि अनेक प्रकारचे पक्षी हरिगुण गायन करीत असतां, मध्येंच जर एखादा भुंगा मोठ्यानें गुंजारव करूं लागला, तर हा हरिगुणच गात आहे असें वाटून, ते गुण श्रवण करण्याकरितां ते सर्व पक्षी एकदम स्तब्ध राहतात. कारण, तेथें हरिगुणवर्णनाशिवाय कोणी व्यर्थ बडबड करीतच नाहीं! त्या उद्यानांत असलेलीं चंपक, बकुल, मालती, पुन्नाग, पारिजातक, कमोद, अर्णे, कमल, तिलक वगैरे अनेक प्रकारचीं पुष्पें सुगंधिक असतात खरीं; पण त्या सर्वांत तुळशीची योग्यता श्रेष्ठ मानितात. कारण, श्रीविष्णूनें तिला अत्यादरानें आपल्या कंठप्रदेशीं धारण केलें आहे. तेथील विमानें वैदूर्य, पाच, हिरे इत्यादि रत्नांनीं युक्त असून सुवर्णाचीं केलेलीं आहेत. तीं निष्काम भक्तांसच प्राप्त होतात. त्या निष्काम भक्तांचें भगवच्चरणारविंदीं इतकें लय लागलेलें असतें कीं, अत्यंत सुंदर अशा विलासिनी स्त्रियाही आपल्या सलील हास्यादिक हावभावांनीं त्या भक्तांचें चित्त विकृत करूं शकत नाहींत. देवहो, जिची प्राप्ति व्हावी म्हणून अन्य देव सदा प्रयत्न करीत असतात, व जी नित्य चंचल आहे, अशा लक्ष्मीची वैकुंठांतील स्थिति अगदींच निराळी आहे. तेथें ती सुंदर रूप धारण करून भगवान विष्णूच्या रत्नखचित मंदिरांत स्वस्थपणानें पायांतील तोरड्यांचा मंजुल शब्द करीत, हस्तांतील कमलानें संमार्जनच करीत आहे कीं काय असें भासतें! देवहो, एके समयीं, त्या वैकुंठामध्यें लक्ष्मीवन म्हणून जें विलासस्थान आहे, तेथें दासीजनांसमवेत लक्ष्मीनें श्री-

विष्णूचें तुलसीदलांनीं पूजन केल्यावर श्रीविष्णूनें तिचें चुंबन केलें. नंतर लक्ष्मीनें कुरळ केशांनीं व सरळ नासिकेनें शोभणारें तें आपलें मुख, प्रवालादिकांनीं बद्ध केलेल्या जलाशयांतील स्वच्छ व अमृततुल्य उदकांत अवलोकन केलें, तेव्हां तिला 'भगवंतानें आपलें चुंबन केलें' म्हणून जी धन्यता वाटली, ती काय वर्णन करावी? देवहो, भगवंताचें माहात्म्य अतिश्रेष्ठ होय. त्याच्या लीलांचें गायन करणारास वैकुंठलोकाची प्राप्ति होते. पापनाशक श्रीहरीच्या कथा श्रवण करण्याच्या ऐवजीं जे पुरुष अर्थकामविषयक निंद्य कथा श्रवण करितात, ते आपल्या पुण्याचा व्यय करून स्वतांस घोर नरकांत पाडतात. बाबांनो, मनुष्यजन्माची थोरवी मोटी आहे. त्यांत धर्मज्ञानासह तत्त्वज्ञान प्राप्त होतें. आम्ही सुद्धां मनुष्यजन्म मिळण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना करितों. परंतु जे लोक भगवदाराधन करीत नाहींत, आणि मनुष्यजन्मास येऊन ज्यांचा कंठ भगवंताच्या कीर्तनानें व कथाश्रवणानें दाटून येत नाहीं, ते भगवंताच्या मायेनें मोहित झाले आहेत असें समजावें. जे भगवंताचे निस्सीम भक्त आहेत, ते त्याच्या गुणांचें वर्णन परस्परांमध्यें करूं लागले म्हणजे त्यांचें देहभान नष्ट होतें, त्यांचे नेत्र प्रेमाश्रूंनीं भरून येतात, त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहतात, व त्यांना ईश्वरावांचून कांहीं दिसत नाहीं आणि भासतही नाहीं. असे जे भक्त असतात, तेच ह्या वैकुंठलोकास जातात. वैकुंठलोक हा सर्व लोकांच्या वर आहे. देवांना सुद्धां हा दुर्लभ आहे. ह्या लोकीं सनकसनंदनादि माझे पुत्र गेले असतां, तेथें असलेल्या इतर कोणत्याही वस्तु पाहण्याची त्यांना इच्छा झाली नाहीं. ते सहा चौक्या ओलांडून तडक, भगवान महाविष्णु असतात, तिकडे गेले; तों सातव्या चौकीच्या द्वारावर दोन द्वारपाल त्यांच्या दृष्टीस पडले. ते दोघेही वयानें अगदीं सारखे होते. त्या दोघांनींही आपल्या हातांत गदा धारण केलेल्या होत्या. बहुमोल वस्त्रें व किरीटकुंडलें ह्यांच्या योगानें ते प्रत्यक्ष विष्णूसारखे दिसत होते. त्यांच्या श्यामसुंदर देहावर स्कंधापासून पावलांपर्यंत लोंबणाऱ्या वनमाला शोभत असून त्यांच्या आसमंताद्भागीं भ्रमरांचे लोट इतस्ततः संचार करीत होते. त्या द्वारपालांनीं भुंवया किंचित् चढविल्या असून नाकपुड्या व आरक्त नेत्र ह्यांच्या योगें त्यांची मुद्रा कांहींशी रागीट दिसत होती. सनत्कुमारादि मुनि जसे कोणालाही न विचारतां ह्या द्वारापर्यंत गेले, तसेच ते ह्याही द्वारांतून आंत जाऊं लागले; तों तेथें त्या द्वारपालांनीं वेत्रयष्टीनें त्यांना प्रतिबंध केला! देवहो, सनकादिकांस प्रतिबंध म्हणजे काय ह्याची भावनाच नव्हती. कारण, त्यांची सर्वत्र समदृष्टि असल्यामुळें कोणापासूनही अटकाव न होतां ते खुशाल संचार करीत असतात. असो. त्या सनकादिक कुमारांचीं रूपें पाहून त्या द्वारपालांना हसूं आलें. ते चौघेही दिसण्यांत अगदीं बाल दिसत होते, पण वयानें व ज्ञानानें सर्वांत वृद्ध होते. त्यांच्या कमरेला वायूचा करगोटा होता, आणि कौपीनही त्याचीच होती. तेव्हां अशीं तीं नग्न मुलें पाहून हसूं येणें साहजिकच आहे. त्यांस त्यांची अंतःस्थिति कळण्यास काय मार्ग होता? वस्तुतः सनत्कुमारादि मुनि हे, जगांत जे अग्रगण्य असतील त्या सर्वांत श्रेष्ठ होत. ते मोठ्या उत्कंठेनें विष्णूच्या दर्शनास जात होते. ज्यांना प्रत्यक्ष महाविष्णूनें सामोरें यावें, त्यांना द्वारपालांकडून हा असा प्रतिबंध झालेला पाहून तो त्यांस सहन झाला नाहीं. त्यांचे नेत्र क्रोधानें लाल झाले: आणि ते म्हणाले, "हे द्वारपालहो, ह्या लोकीं ईश्वरदर्शनास प्रतिबंध असण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. कांकीं, ह्या लोकीं जे लोक येतात ते विष्णूचे भक्तच असतात. असें असतां, कोणी विष्णुदर्शनास

यावें आणि कोणी येऊं नये, हा द्वैतभाव असणें योग्य नव्हे. श्रीविष्णूचे ठिकाणीं द्वैतभाव मुळींच नाहीं. आपण जसे कपटी आहों, तसेच दुसरेही कपटी असतील, अशी तुम्हांला शंका आली, हा तुमच्या बुद्धीचा दोष होय. द्वारपालहो, ज्याप्रमाणें घटाकाश व महाकाश ह्यांमध्यें तात्त्विकदृष्टीनें भेद असत नाहीं, त्याप्रमाणेंच ह्या वैकुंठलोकीं वास करणारे महात्मे व प्रत्यक्ष भगवान महाविष्णु ह्यांमध्यें किंचितही भेद नाहीं. असें असतां, तुम्हांस आम्हांविषयीं शंका उत्पन्न होते, ह्यावरून तुम्हीं कोणी तरी वेषधारी वंचक आहां असें आम्हांस वाटतें. असो. ज्या अर्थी तुम्हीं श्रीविष्णूचे सेवक आहां, त्या अर्थी तुमचें कल्याण व्हावें म्हणून तुमच्या अपराधाबद्दल तुम्हांस शासन होणें योग्य आहे. ह्यास्तव, तुम्हीं हा लोक सोडून, द्वैभाव धारण करणाऱ्या पातकी मनुष्याला जेथें काम, क्रोध, लोभ हे शत्रु उत्पन्न होतात, अशा त्या मनुष्यलोकाला जा."

देवहो, तो भयंकर ब्रह्मशाप कानीं पडतांच ते द्वारपाल अगदीं भयभीत झाले. मोठमोठ्या शस्त्रास्त्रांचें सामर्थ्यही ब्रह्मशापामुळें व्यर्थ होय, ही गोष्ट त्यांच्या मनांत मूर्तिमंत उभी राहिली; आणि त्या द्वारपालांनीं आपला तरणोपाय होण्याकरितां एकदम त्या ऋषिमंडलाच्या चरणीं लोटांगण घातलें, व ते त्यांची प्रार्थना करूं लागले, "मुनिवर्य, आपण आम्हांस जें शासन केलें, तें योग्यच आहे. आतां आपल्या वचनाप्रमाणें घडो. कारण, अपराधाचें प्रायश्चित भोगलें असतां, त्या अपराधामुळें लागलेलें पाप नष्ट होतें. ह्यामुळें त्यांत आमचें हितच आहे. पण आमची आपल्याजवळ एवढीच प्रार्थना आहे कीं, आम्हीं केलेल्या अपराधाबद्दल आम्हांस आतां आपल्याच कृपेनें अनुताप होत आहे; ह्यास्तव अधोयोनींत जन्म होऊन आम्हांस मोह उत्पन्न झाला, तरी त्या लोकनायक भगवंताविषयींची आमची स्मृति नष्ट होऊं नये." देवहो, आपल्या द्वारपालांनीं केलेला हा साधूंचा अवमान भगवंतांस तत्काळ अंतर्दृष्टीनें कळला; व ते द्वारपालांपेक्षां अधिकच भिऊन जाऊन, सनकादिक उभे होते त्या ठिकाणीं श्रीलक्ष्मीसह लागलेच चालत आले. उद्देश एवढाच कीं, आपण तेथें गेल्यानें सनकादिकांस समाधान होईल, व ते शांत झाले म्हणजे आपल्या दासांस दिलेल्या शापाचें कांहीं तरी परिमार्जन करतील. देवहो, भगवन्मूर्ति त्या ठिकाणीं प्राप्त होतांच, सनकादिकांनीं पाहिलें कीं, आपण समाधीनें ज्याचें ध्यान करीत आहों, ते ब्रह्मस्वरूप आपल्या पुढें प्रत्यक्ष प्रकट झालें! त्या वेळा भगवंताच्या आसमंताद्भागीं पार्षदगणांनीं छत्रचामरादिक सुखसाधनें धारण करून आपल्या प्रभूची सेवा चालविली असून हंसांसारख्या शुभ्र चवऱ्यांनीं उत्पन्न केलेल्या मंदवायूनें छत्रावरील मौक्तिकांचे सर हालत असल्यामुळें जणू काय पर्जन्याचे श्वेत तुषार भगवंताच्या मस्तकावर गळत आहेत, असा भास होत होता! भगवंताची मुद्रा सनकादिकांवर व द्वारपालांवर अनुग्रह करण्याविषयीं उत्सुक अशी दिसत असून जगांतील सर्व स्पृहणीय वस्तूंचें तें धामच होय असें प्रत्येकास वाटत होतें. परमात्म्याचे संप्रम दृष्टिपात अवलोकन करून प्रत्येकास आनंदाचें भरतें येत होतें; आणि आपल्या श्यामसुंदर देहावर विशाल वक्षस्थलाच्या ठिकाणीं लक्ष्मीला धारण करून सर्व लोकांमध्यें श्रेष्ठ अशा वैकुंठलोकास भगवान हे अधिकच शोभा आणीत आहेत असा भास होत होता. त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न प्रभूच्या कटिप्रदेशीं पिंवळा पीतांबर परिधान केलेला असून त्यावर तेजःपुंज कमरपट्टा घातलेला होता. कंठामध्यें आपादलंबिनी वनमाला असून तिच्या सभोंवार भ्रमरपंक्ति गुंजारव करीत फिरत होत्या. भगवंतानें कंकणमंडित असा आपला एक हात गरुडस्कंधावर ठेविला असून

दुसऱ्या हातानें कमल गर गर फिरविण्याचा क्रम चालविला होता. भगवंताच्या कर्णांतील मकराकार कुंडलें विद्युल्लतेच्या कांतीस मागें सारीत असून, भगवत्कपोलांच्या अवर्णनीय तेजामुळें त्या कुंडलांना दिव्य शोभा प्राप्त झाली होती. मुखावर तरतरीत नासिका असून मस्तकावर रत्नखचित किरीट होता. चार बाहूंच्या अंतर्भागीं एक सुंदर हार विलसत असून कंठामध्यें कौस्तुभ मणि झळाळत होता. देवहो, भगवन्मूर्तीचें लावण्य इतकें कांहीं अनुपम होतें कीं, त्याच्या पुढें लक्ष्मीचें लावण्य केवळ तुच्छ होतें. देवहो, भगवंताचें हें रूप अवलोकन करण्यास मिळणें म्हणजे मोठें भाग्यच समजलें पाहिजे. भगवान ही आपली मूर्ति केवळ माझ्यावर, शंकरावर व तुम्हांवर अनुग्रह करण्यासाठींच प्रकट करितात! असें हें रूप पाहून सनकादिकांस जो आनंद झाला, त्याचें काय वर्णन करावें! त्यांनीं भगवन्मूर्ति एकसारखी अवलोकन केली, तरी त्यांची तृप्ति होईना. प्रभूचे चरणसरोजरजःकण व तुलसीदलमकरंद ह्यांनीं मिश्रित झालेला मंदवायु जेव्हां नासाग्रद्वारें त्यांच्या शरिरांत प्रविष्ट झाला, तेव्हां त्यांच्या वृत्ति एकदम प्रक्षुब्ध होऊन भक्तिसुखामध्यें ते पोहूं लागले व त्यांच्या शरिरावर हर्षभरानें रोमांच उभे राहिले! देवहो, भगवंताचें तें अद्वितीय रूप इतकें कांहीं मोहक होतें कीं, तें पाहतां पाहतां त्या सनत्कुमारांची फारच धांदल उडाली! कोणताच अवयव पूर्णपणें पाहण्याची त्यांची इच्छा तृप्त होईना, व त्यांना तर सर्वच अवयव पूर्णपणें पहावयाचे होते; वास्तव त्यांनीं वर मुखकमलाकडे पहावें, तों त्यांचें चित्त खालीं चरणकमलें पाहण्याविषयीं आतुर होई, व चरणांवर दृष्टि यावी, तों अधरोष्ठादिक मुखप्रांत पाहण्यास मनाची प्रवृत्ति घडे! अखेरीस त्यांनीं नेत्रद्वारें भगवद्दर्शन घेण्याचा प्रयत्न सोडून दिला, व अंतःकरणांत भगवंताचें ध्यान केलें; आणि नंतर त्याची स्तुति करण्यास प्रारंभ केला.

सनत्कुमार म्हणाले:—हे अनंता, तूं सर्वांच्या हृदयामध्यें असतांही दुष्टांस आणि पापी पुरुषांस तुझें दर्शन घडत नाहीं. तूं आमच्या अंतःकरणांत नेहमीं प्रकाशमान आहेस; पण तुझ्या मूर्तीचें दर्शन मात्र आजच झालें. तुझें हें आत्मस्वरूप जेव्हां आमच्या पित्यानें आम्हांस सांगितलें, तेव्हांच तें आमच्या बुद्धीमध्यें प्रकट झालें. विरक्त भक्त आपल्या अंतःकरणाचे ठिकाणीं ओळखितात तें आत्मस्वरूप हेंच. तूं शुद्धसत्त्वमय रूप धारण करून त्याविषयीं आपल्या भक्तांचे ठिकाणीं प्रीति उत्पन्न करितोस. ईश्वरा, तुला जे शरण आले ते केवळ कल्याणमूर्तिच होत. ते सतत तुझ्या लीलांचें गायन करीत असतात. त्यांपुढें त्यांस मोक्ष देखील हलका वाटतो; मग इतर इंद्रचंद्रादि पदांची ते कितीशी इच्छा करणार? म्हणून, तुझी भक्ति करण्याकडे आमची सदोदीत प्रवृत्ति असो. हे देवा, आजपर्यंत आमच्या हातून यत्किंचित् देखील पाप घडलें नाहीं; पण आज तुझ्या भक्तांस आम्हीं शाप दिला, हें आमच्या हातून महत्पाप घडलें. ह्या पापामुळें आम्हांस अधोगति प्राप्त होण्याचा संभव आहे. म्हणून आमची एवढीच विनंती आहे कीं, नरकवासांत सुद्धां जर आमचें अंतःकरण तुझ्या पादारविंदीं भ्रमराप्रमाणें तल्लीन होऊन जाईल, आणि आमचे कर्ण तुझ्या कथाश्रवणानें नित्य भरून जातील, तर आम्हांस खुशाल नरकवास मिळो! हे अनंतकीर्ति परमेश्वरा, तुझें हें स्वरूप पाहून आमच्या नेत्रांस फार आनंद होत आहे. विषयासक्त पुरुषांस तुझें दर्शन होणें दुर्लभ होय. आमचा तुला नमस्कार असो.

# अध्याय सोळावा.

—:०:—

## हिरण्याक्षाची उत्पत्ति.

### [ सनकादिकांचें सांत्वन ]

( जयविजयांस शाप होण्याचें कारण. )

ब्रह्मदेव म्हणाला:—देवहो, ह्याप्रमाणें त्या योगसंपन्न सनत्कुमारांनीं केलेलें भाषण ऐकून वैकुंठवासी भगवान त्यांस मोठया गौरवानें म्हणाला, "मुनिश्रेष्ठहो, तुमच्यापुढें उभे असलेले हे माझे पार्षदगण जयविजय होत. ह्यांनीं माझें हृद्गत न जाणल्यामुळें तुमचा मोठा अपराध केला आहे. वास्तविक पहातां तो त्यांनीं तुमचा अपराध केला नसून प्रत्यक्ष माझाच अपराध केला आहे असें मी समजतों. कारण, तुम्ही माझे भक्त असल्यामुळें तम्ही व मी ह्यांत भेद नाहीं. विप्रवर्यहो, ब्राह्मण हें माझें दैवत होय. ह्यास्तव तुम्हीं त्यांस केलेला दंड मला मान्य आहे; परंतु जयविजय हे तरी माझे सेवकच होत; ह्यास्तव माझ्या सेवकांनीं अपराध केला तो मींच केला असें समजून मी तुमची क्षमा मागतों. सेवकांनीं अपराध केला असतां लोक त्यांच्या धन्याची निंदा करितात; व लोकांचें तें निंदावचन, कुष्ट जसें त्वचेचा नाश करितें, तसें त्या धन्याच्या कीर्तीचा नाश करितें. हे ब्रह्मपुत्रांनो, मी जो ह्या श्रेष्ठ पदास पोहोंचलों आहें, तो तुमच्यामुळें. तुम्ही माझी पवित्र कीर्ति वर्णन करितां, त्यामुळें चांडालही पावन होतात. म्हणून, ऋषोहो, तुमच्याशीं प्रतिकूल आचरण करण्यास जर प्रत्यक्ष हे माझे बाहु प्रवृत्त होतील, तर त्यांस सुद्धां तोडून टाकण्यास मी मागें घेणार नाहीं. मग इतरांची कथा काय? मुनीहो, माझ्या चरणधूलीच्या स्पर्शानें लोकांचीं सर्व पापें तत्काल भस्म होतात; पण हा तरी ब्राह्मणांचाच प्रभाव आहे. मला सुस्वभाव प्राप्त झाला, तो तरी ब्राह्मणांच्या सेवेमुळेंच. जिचा आपल्यावर प्रसाद व्हावा म्हणून ब्रह्मादि देव सुद्धां किती तरी प्रयत्न करितात, तीच लक्ष्मी—मी तिचा मुळींच आदर करीत नाहीं तरी—मला क्षणभर सुद्धां सोडीत नाहीं, हें तरी ब्राह्मणांच्या सेवेचेंच फळ होय! विप्रहो, माझीं दोन मुखें आहेत; एक अग्नि, आणि दुसरें ब्राह्मण. त्यांत ब्राह्मण हें मुख श्रेष्ठ होय. तेव्हां तुमचा जो अवमान झाला, तो माझ्या मुखाचाच झाला असें मी समजतों. ज्ञानसंपन्न ब्राह्मण आपण केलेल्या सर्व कर्मांचीं फलें मला अर्पण करून संतुष्ट राहतात. असल्या निष्काम ब्राह्मणांस सुग्रास अन्नाचें भोजन घातलें असतां त्यांच्या मुखानें मी जसा तृप्त होतों, तसा यज्ञामध्यें अर्पण केलेले पदार्थ अग्निमुखानें खाल्ले असतां मी तृप्त होत नाहीं. 'आम्ही द्वारपालांना विचारल्यावांचून आंत आलों, हा आमचा अपराध द्वारपालांनीं काय म्हणून सहन करावा' असें तुम्ही म्हणाल, तर त्यावर माझें असें म्हणणें आहे कीं, तो मुळीं अपराधच नव्हे. कारण, ज्या माझ्या योगमायेचें ऐश्वर्य अगाध आहे, आणि ज्या माझें पादोदक शंकराला सुद्धां पवित्र करितें, तो मी ज्यांचे चरणरज मस्तकीं धारण करितों, त्या ब्राह्मणांनीं मजकडे निष्प्रतिबंधपणें येणें हा अपराध कसा असेल! शिवाय दुसरें असें आहे कीं, ज्या अर्थी ब्राह्मण, गाई आणि निराश्रित प्राणी हीं माझीं राहण्याचीं ठिकाणें आहेत असें मी मानितों, त्या अर्थी त्यांजकडून कदाचित् प्रसंगविशेषीं अपराध झाला, तरी सुद्धां तो इतरांनीं सहन केलाच पाहिजे. ब्राह्मणहो, इतकी विवेकबुद्धि नसल्याकारणानें गाई, ब्राह्मण व अनाथ प्राणी ह्यांच्यांत आणि माझ्यांत जे भेददृष्टि ठेवितात, त्यांजवर सर्पाप्रमाणें क्रुद्ध झालेल्या यमदूतांस मी पाठवून त्यांकरवीं गिधाडांसारख त्यांच्या अंगाचे लचके तोडवितों; परंतु जे लोक, ब्राह्मण कठोर भाषण बोलत असला तरी तो प्रत्यक्ष भगवान विष्णुच

आहे असें समजून गोड शब्दांनीं त्याचें सांत्वन करितात, आणि त्याला शरण येतात, त्यांनीं माझेंच पूजन केलें असें समजून मी त्यांचें गौरव करितों. हे मुनिश्रेष्ठहो, ब्राह्मणांविषयीं अशा प्रकारची माझी पूज्यबुद्धि असतांही ज्या अर्थी ह्या माझ्या दूतांनीं तुमचा अपराध केला आहे, त्या अर्थी तुमच्या वचनाप्रमाणें त्यांना दुर्गति प्राप्त होवो; पण त्यांचा तो प्रवास लवकर संपून ते माझ्याजवळ येवोत एवढीच माझी आपल्याजवळ प्रार्थना आहे; आणि ती आपण मान्य केली असतां मजवर आपला मोठा अनुग्रह होईल !"

ब्रह्मदेव म्हणाला:—देवहो, ह्याप्रमाणें भगवंताचें तें मधुर भाषण ऐकून, व भगवान आपल्यापेक्षांही आम्हां ब्राह्मणांसच अधिक श्रेष्ठत्व देत आहे असें पाहून, सनकादिकांना फार आनंद झाला. त्यांच्या मनांत जयविजयांच्या उद्धटपणाबद्दल जो संताप उत्पन्न झाला होता, तो समूळ नष्ट होऊन उलट भगवंताच्या भाषणाचा विचार करण्यांत त्यांची मति गुंग झाली. त्यांनीं पुष्कळ विचार केला तरी त्यांस भगवंताच्या त्या बोलण्याचें रहस्य समजेना. कारण, तें त्याचें भाषण थोडकें होतें, तरी अर्थानें गंभीर, व अभिप्रायानें गूढ असें होतें. शेवटीं ते हात जोडून म्हणाले, "हे जगत्पालका ईश्वरा, तूं परमसमर्थ असून आम्हांलाच मोठेपणा देऊन आमचा अनुग्रह संपादन करण्याची इच्छा करितोस, तेव्हां ह्या तुझ्या भाषणांतील गूढ जाणण्यास आम्ही असमर्थ आहों. मी ब्राह्मणांचा कैवारी आहें व ब्राह्मण माझें दैवत आहे, हें तुझें भाषण लोकशिक्षेकरितां आहे, ह्यांत संशय नाहीं. वस्तुस्थिति मात्र अशी आहे कीं, ब्राह्मणांचा आत्मा आणि त्यांचें परमदैवत तूंच आहेस. कारण, वेदप्रतिपाद्य जो अनादि व अनंत असा धर्म, तो तुजपासूनच उत्पन्न झाला आहे. वेळोवेळीं अवतार घेऊन त्या सनातन धर्माचें तूंच पालन करितोस व त्याचें आचरण करणारास मिळणारें फलही तूंच होस. योगीजन संसारांतून निवृत्त होतात ते तुझ्याच अनुग्रहानें. अशी वास्तविक स्थिति असतां, इतरांनीं तुझ्यावर अनुग्रह करणें हें कसें संभवेल ? आतां, ब्राह्मणांच्या सेवेमुळेंच मला ऐश्वर्य प्राप्त झालें, हें जें तुझें बोलणें, तें केवळ लोकांस कित्ता घालून देण्याकरितां होय. जगांत जीं जीं म्हणून ऐश्वर्यें आहेत, त्यांचा आधार तूंच आहेस. वैभवादिकांची इच्छा करणारे ब्रह्मादिक देव जिचे चरणरजःकण मस्तकीं धारण करितात, ती लक्ष्मी सुद्धां तुझ्या कंठांतील तुळसीमालेवरील भ्रमराची जागा प्राप्त होण्याकरितांच जणूं काय तुझी सेवा करीत आहे. पण इतकें करूनही त्या लक्ष्मीला तूं अंकित होत नाहींस. अशा तुला ब्राह्मणांच्या चरणरजांनीं आणि श्रीवत्सचिन्हानें काय पवित्र करावयाचें आहे ? ईश्वरा, धर्म हें तुझेंच स्वरूप होय. तुझ्या धर्मस्वरूपाच्या तप, शौच व दया ह्या मुख्य तीन चरणांनीं तूं ह्या स्थावरजंगमात्मक सृष्टीचें ब्राह्मणांकरितां आणि देवांकरितां रक्षण केलें आहेस. रजोगुण व तमोगुण हे धर्मघातक आहेत; पण सत्त्वगुणात्मक मूर्ति धारण करून, त्या धर्मघातक गुणांचा तूं लोप करून टाकिला आहेस; देवा, ती तुझी सत्त्वगुणाची मूर्तिच आमचें कल्याण करणारी आहे. भगवंता, तूं धर्मस्वरूपी असून श्रेष्ठ आहेस. तूं जर ब्राह्मणकुलास बहुमान देऊन त्याचें रक्षण करणार नाहींस, तर तूं प्रवृत्त केलेला व सर्वांचें कल्याण करणारा जो वेदोक्त धर्ममार्ग, त्याचा उच्छेद होईल. कारण थोर पुरुषांचा कित्ता इतर लोक गिरवितात. शिवाय, धर्माचा नाश होणें हें तुला कधींच इष्ट नाहीं; आणि म्हणूनच तूं ब्राह्मणांना नमस्कार करून त्यांच्यापुढें लीन होतोस. तुझ्या तशा करण्यापासून तुला कमीपणा थोडाच येणार आहे ? म्हणून आम्ही अशी विनंती करितों कीं, तूं ह्या द्वापार-

त्यांना वाटेल तो दंड कर, अथवा देणगी दे; आम्हांला ती तुझी इच्छा शिरसा वंद्य आहे. इतकेंच नव्हे, पण तुझे हे द्वारपाल निरपराधी असतां त्यांना आम्हीं शाप दिला म्हणून तूं उलट आम्हांस जरी शासन केलेंस, तरी तें आम्ही मान्य करितों."

भगवान म्हणाला:—श्रेष्ठ ब्राह्मणहो, तुम्हीं माझ्या द्वारपालांना शाप दिला म्हणून खेद करूं नका. कारण तो शाप मींच तुम्हांकडून वदविला आहे. आतां ते दोघे लवकरच दैत्ययोनींत जातील, आणि तेथें मजविषयीं द्वेषबुद्धि धारण करतील; व त्या योगानें त्यांना माझें सतत चिंतन घडून, पुन: ते लवकरच माझ्या जवळ प्राप्त होतील.

ब्रह्मदेव म्हणाला:—देवहो, नंतर सनत्कुमारांनीं भगवान श्रीहरीला एकवार अवलोकन केलें, आणि त्याला प्रदक्षिणा घालून नमस्कार केला व त्याचा निरोप घेऊन ते आनंदानें वैकुंठलोक सोडून आपल्या मार्गानें परत गेले. इकडे भगवान विष्णूनें आपल्या सेवकांना सांगितलें कीं, तुमच्या दुःखाचें निरसन करण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं आहे; पण ब्राह्मणांच्या शब्दाचा अवमान करण्याची माझी इच्छा नाहीं. कारण, असें हें होणारच होतें व तसें होणें हें मलाही इष्टच आहे. तसें जर नसतें, तर तुम्हीं त्यांचा अपमानही केला नसता, व केला असता तरी त्या अत्यंत शांत मुनींना त्याचा रागही आला नसता. जयविजयहो, ही सर्व माझीच इच्छा होय. ज्याप्रमाणें मला सृष्टि करण्याची इच्छा झाली, त्याचप्रमाणें युद्ध खेळावें अशी इच्छा झाली; पण मजबरोबर थोडा वेळ तरी टिकेल असा योद्धा मला कोण मिळणार? बरें, तुम्ही तसे आहां; पण तुम्हीं मजशीं शत्रुत्व पतकरिलें नसतें. ह्याकरितां, तुम्हीं मजशीं युद्ध करावें अशी मीं युक्ति योजिली. जयविजयहो, पूर्वी मी योगनिद्रेंत असतां लक्ष्मी मजकडे येऊं लागली, तेव्हां तिला तुम्हीं प्रतिबंध केला; त्यामुळें तिनें संतापून तुम्हांस शाप दिला होता कीं, "पुढें एखादे वेळीं असाच तुम्ही ब्राह्मणांना अडथळा कराल, व ते तुम्हांला शाप देतील, आणि त्या योगानें तुम्ही दुष्ट योनींत जन्म पावाल; व तेथें विरोधभक्ति करून, ब्राह्मणांच्या अपमानाच्या पातकापासून मुक्त होत्साते फिरून आपल्या पदाला याल." पार्षदहो, सर्वांना बुद्धि देणारा मीच होय. तेव्हां लक्ष्मीला, तुम्हांला व सनत्कुमारांना ह्याप्रमाणें बुद्धि व्हावी अशी मीं योजना केली, व त्याचप्रमाणें सर्व घडून आलें. तेव्हां तुम्हांस भिण्याचें कांहीं कारण नाहीं. थोडक्याच कालानें तुम्ही फिरून मजजवळ याल.

ब्रह्मदेव सांगतो:—देवहो, ह्याप्रमाणें भगवान विष्णु हे द्वारपालांचें समाधान करून निघून गेले. नंतर ते दोघे द्वारपाल ब्राह्मणांच्या प्रखर शापाच्या योगानें तत्काळ भूमीवर पडले, व सांप्रत ते कश्यपाच्या रेतरूपानें दितीच्या उदरामध्यें गर्भावस्थेंत आहेत. ते प्रत्यक्ष विष्णूचेच पार्षद असल्यामुळें त्यांच्या तेजापुढें सूर्याचेंही तेज नष्ट झालें आहे. आतां त्यास उपाय करणें हें तुमच्या किंवा माझ्या स्वाधीन मुळींच नाहीं. ईश्वरालाच दया उत्पन्न होईल तेव्हां सर्व गोष्टी घडून येतील. ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय करणारा तोच होय. ह्या वेळीं तोच आमचें कल्याण करो.

## अध्याय सतरावा.

—:०:—

### भयंकर उत्पात.

### आदिदैत्यांचा जन्म.

### हिरण्याक्ष व वरुण ह्यांचा संवाद.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें दितीच्या गर्भोत्पत्तीचें कारण ब्रह्मदेवानें देवांस सांगितलें,

व त्यावर विश्वास ठेवून ते सर्व देव निर्भयपणें आपापल्या स्थानीं गेले. इकडे, आपल्या पुत्रांपासून देवांना त्रास होईल असें जाणून दितीनें जो गर्भ तसाच आपल्या उदरांत धारण केला होता, त्यास शंभर वर्षें पूर्ण होतांच ती प्रसूत होऊन तिला दोन पुत्र प्रसवले. हे जन्मास येण्याचे वेळीं पृथ्वीवर व आकाशांत भयंकर उत्पात झाले. जिकडे तिकडे भूकंपाचे धक्के बसून मोठमोठे पर्वत हालूं लागले. दशदिशा भयाण दिसूं लागल्या. कित्येक ठिकाणी विजा पडल्या. अरिष्टसूचक धूमकेतु उगवले. तुफानाचा वारा वाहूं लागला. धुळीनें आकाश व्याप्त होऊन गेलें. मोठमोठे गगनचुंबित वृक्ष कडाकड उन्मळून पडूं लागले. निबिड नक्षत्रें रिचूं लागलीं. अंधकार पडला. सोसाटयाच्या वाऱ्यानें समुद्र खवळून जाऊन तो सर्व जग ग्रासीतच आहे कीं काय असें वाटूं लागलें. समुद्राच्या उदरांतील मकरादिक जलचर प्राणी क्षुब्ध झाले. नद्यादिकांचें सर्व पाणी गढूळ झालें. कमलादिकांचा विध्वंस झाला. चंद्र व सूर्य ह्यांना वरचेवर ग्रहणें लागूं लागलीं. त्यांना मोठमोठीं खळीं पडलीं. निरभ्र आकाशांत भयंकर गर्जना व पर्वताच्या कंदरांतून रथचक्रांचे ध्वनि होऊं लागले. कोल्हे गांवांत शिरून आपला अरिष्टसूचक शब्द करूं लागले. घुबडें आपल्या भयसूचक शब्दांनीं लोकांना भीति उत्पन्न करूं लागलीं. कुत्रीं मोठमोठयानें हेल काढून रडूं लागलीं. गर्दभ आपला कर्कश स्वर काढून सैरावैरा धावत सुटले. पांखरें वावरून आपल्या कोठयांतून पळत सुटलीं. ग्राम्य व वन्य पशु भयानें मलमूत्र विसर्जन करूं लागले. गाईच्या स्तनांतून दुधाऐवजीं रक्त निघूं लागलें. आकाशांतून पुवाची वृष्टि होऊं लागली. देवांच्या मूर्ति रडूं लागल्या. मंगळ, शनि वगैरे पापग्रहांस उत्तेजन येऊन ते गुरु, बुध आदिकरून शुभग्रहांचें उल्लंघन करून जाऊं लागले, व पुढें गेले असतांही पुनः मागें येऊन एकमेकांशीं युद्ध करूं लागले. विदुरा, ह्या सर्वांचें इंगित सनकादिकांशिवाय इतर कोणासही माहीत नव्हतें, म्हणून सर्व भ्याले, आणि आतांच जगाचा प्रलय होतो कीं काय, असें त्यांना वाटलें. इतक्यांत ते दोघे आदिदैत्य उत्पन्न होऊन त्यांचें अपूर्व सामर्थ्य दृष्टिगोचर झालें. ते जन्मतांच पर्वताप्रमाणें वाढूं लागले, आणि वाढतां वाढतां इतके वाढले कीं, त्यांचीं मस्तकें गगनमंडलास जाऊन भिडलीं, व शरिरांनीं दशदिशा व्यापून टाकिल्या. त्या दैत्यांच्या चालण्यानें पृथ्वी थरथर कांपूं लागली, व तेजानें सूर्य दिपून गेला. त्या दोन मुलांपैकीं जो पहिल्यानें जन्मला त्याचें हिरण्याक्ष, आणि मागून जन्मला त्याचें हिरण्यकशिपु, अशीं त्यांचीं कश्यप मुनींनीं नांवें ठेविलीं. त्यांत हिरण्यकशिपु वडील आणि हिरण्याक्ष धाकटा. हिरण्यकशिपूनें 'आपणास कोठूनही मरण प्राप्त होऊं नये' अशा प्रकारचा वर ब्रह्मदेवापासून मागून घेतला, व त्यामुळें उन्मत्त होऊन त्यानें त्रैलोक्यास अगदीं 'त्राहि त्राहि' करून सोडिलें. हिरण्यकशिपूचें हिरण्याक्षावर फार प्रेम होतें, आणि हिरण्याक्षही हिरण्यकशिपूच्या मर्जीप्रमाणें वागत असे. हिरण्याक्षाला युद्धाची फार हौस असल्यामुळें, कोठें तरी युद्ध उपस्थित करावें ह्या हेतूनें तो स्वर्गलोकीं गेला; पण त्याच्याशीं युद्ध करण्याचें कोणास धैर्य होणार? त्याची अजस्र गदा आणि भयंकर शरीर पाहून, गरुडास पाहतांच सर्प लपून बसतात त्याप्रमाणें सर्व देव भयानें लपून बसले! आपली इच्छा येथें पूर्ण होणार नाहींसें पाहून तो तेथून परत फिरला, व समुद्रतीरास आला. त्या समयीं समुद्र फार खवळून मोठमोठ्यानें गर्जना करीत होता. तें पाहून त्यामध्यें क्रीडा करण्याची हिरण्याक्षास इच्छा उत्पन्न झाली, व त्यानें समुद्रांत बुडी मारिली. तेथें त्यानें कोणासही उपद्रव दिला नाहीं; पण त्याकडे

पाहूनच वरुणाचे सेवक जे जलचर त्यांचें प्रसंगावधान सुटलें, व ते दूर पळून गेले. तो महाबळी हिरण्याक्ष कित्येक वर्षेपर्यंत समुद्रांत क्रीडा करीत होता. त्याच्या त्या क्रीडेनें आणि गदेच्या प्रहारानें समुद्र अतिशय खवळून मनस्वी गढूळ होऊन गेला होता. अशा रीतीनें क्रीडा करीत करीत हिरण्याक्ष हा वरुणाच्या विभावरी नामक नगरीस येऊन पोहोंचला. तेथें गेल्यावर, ज्या ठिकाणीं वरुण बसला होता त्या ठिकाणीं जाऊन त्यानें मुद्दाम कुचेष्टेनें त्यास लवून नमस्कार केला, आणि तो हंसत हंसत त्याला म्हणाला, "राजाधिराज वरुणा, मला युद्धदान दे. तूं परमसमर्थ असून लोकपाल आहेस. तुझी कीर्ति ह्या जगांत मी फार दिवसांपासून ऐकत आहें. एखादा अजिंक्य आणि मदोन्मत्त असा वीर असल्यास त्याची तूं पुरती खातरी करितोस असा तुझा विक्रम-दुंदुभि साऱ्या त्रैलोक्यांत गाजत आहे! तूं परमपराक्रमी अशा दैत्यदानवांस जिंकून पूर्वी एक मोठा थोरला राजसूय क्रतु केला होतास!" विदुरा, हिरण्याक्ष त्या वेळीं अगदीं उच्छृंखल झाला होता. त्यानें अशा रीतीनें आपला उपहास केलेला पाहून वरुणास फार क्रोध आला; पण त्या वेळीं त्यानें कालावर नजर देऊन आत्मसंयमन केलें, आणि शांतपणें हिरण्याक्षाला उत्तर दिलें: वरुण म्हणाला, "बा हिरण्याक्षा, आजपर्यंत आम्हीं पुष्कळ मोठमोठीं युद्धें जिंकिलीं. आतां आमचें वृद्धपण झालें; तेव्हां तो सर्व उपद्व्याप सोडून देऊन आम्ही आतां स्वस्थ बसलों आहों. आतां, तुला युद्धाचीच इच्छा आहे, तर मी तुला सांगतों तें ऐक. तुजबरोबर युद्ध करण्यास योग्य असा एक पुराणपुरुष श्रीविष्णुच आहे. तुझ्यासारखे वीरपुरुष त्याची फारच प्रशंसा कारितात. तुझ्यासारखे जे दुष्ट व उन्मत्त असतात, त्यांचा नाश करण्याकरितां तो अनेक रूपें धारण करितो. तो तुझी युद्धेच्छा पुरवील, आणि तुला समरांगणांत शयन



करण्यास लावील; आणि नंतर तुझें मांस तोडून खाण्याकरितां कोल्हींकुत्रीं तुझ्याभोंवतीं जमतील!"

## अध्याय आठरावा.

—:०:—

### हिरण्याक्षाचें व भगवंताचें वाग्युद्ध.

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, वरुणाचें भाषण ऐकून हिरण्याक्षाला फार आनंद झाला. भगवान विष्णु हा तुझे प्राण घेईल असें वरुणानें त्याला सांगितलें होतें, तरी त्याविषयीं त्यास यत्किंचितही दिक्कत वाटली नाहीं. पुढें नारद मुनि त्यास भेटले. तेव्हां त्यांपासून तो पुराणपुरुष विष्णु कोठें आहे, वगैरे सर्व वृत्त हिराण्याक्षास समजलें, आणि तो तत्काल रसातलांत शिरला. तेथें वराहरूपी भगवान दंताग्रीं पृथ्वी धारण करून वर येत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याच्या लोकोत्तर नेत्रकांतीनें हिरण्याक्ष अगदीं फिका पडला. तें रूप पाहून हिरण्याक्षाला फार आश्चर्य वाटलें, आणि उपहासपूर्वक हास्य करून तो मोठ्यानें म्हणाला:—कायहो हें आश्चर्य! अरण्यांतील पशु जलांत देखील संचार करावयास येतात! नंतर तो वराहास म्हणाला, "हे मूर्खा, मजजवळ ये आणि ह्या पृथ्वीला सोडून दे. विश्वस्रष्टयानें आम्हां पातालवासीयांस ही दिली आहे; म्हणूनच ही येथें आली आहे. हे अधमा, तूं जरी कपटानें वराहस्वरूप धारण केलें आहेस, तरी मी तुला पूर्णपणें ओळखतों. दुष्टा, मी येथें उभा असतां तूं ही पृथ्वी कशी घेऊन जातोस तें पहातों! नीचा, आमचे शत्रु जे देव त्यांनीं आमच्या नाशाकरितां तुझी योजना करून तुझा आश्रय केला आहे काय? ठीक आहे! अरे नामर्दा, तूं आडून दैत्यांचा वध करितोस; तुझ्या सामर्थ्याची सर्व मदार काय ती योगमायेवर अवलंबून असते! कांहीं चिंता नाहीं! आज भला माझ्या तावडींत सांपडलास. आतां तुझा वध

करून मी आपल्या बांधवांचा शोक आणि भय अगदीं नामशेष करून सोडतों. माझ्या ह्या गदेच्या प्रहारानें तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होऊन तूं मरण पावलास, म्हणजे तुझ्या आश्रयास असलेले सर्व ऋषि व देव ह्यांचा आधार तुटेल. मग ते जरी जिवंत राहिले तरी त्यांची कोण पर्वा बाळगणार!"

विदुरा, ह्याप्रमाणें हिरण्याक्षाचीं तीं शल्यप्राय भाषणें ऐकून भगवंतास फार क्रोध आला; पण आपल्या दाढेवरील पृथ्वी भयानें थरथर कांपत आहे असें पाहून, प्रथम तिची सुव्यवस्था लावण्याकरितां त्यानें हिरण्याक्षाच्या बोलण्याकडे त्या वेळेपुरता किंचित् कानाडोळा केला; आणि वर येऊन पृथ्वी पूर्वींच्या ठिकाणीं ठेविली, व ती फिरून खालीं जाऊं नये म्हणून तिच्या ठिकाणीं आपली आधारशक्ति स्थापन केली. भगवान वर येत असतां हिरण्याक्ष त्याच्या पाठीस लागला होता, आणि तोंडानें एकसारखा अपशब्दांचा वर्षाव करीत होता. विदुरा, त्या वेळीं हिरण्याक्षाचें स्वरूप फार उग्र दिसत होतें. त्याच्या सर्व शरीरावर सुवर्णाचे अलंकार होते. हातांत एक भयंकर गदा होती व अंगांत सोन्याचें चिलखत होतें. भगवंतानें पृथ्वी उदकांतून वर आणिली, त्या समयीं सर्व देवांनीं भगवंतावर पुष्पवृष्टि केली; तें पाहून तर हिरण्याक्ष जास्तच खवळला. तो फारच अद्वातद्वा भाषण करूं लागला. त्या वेळीं मात्र भगवंताचा क्रोधाग्नि अतिशयच भडकला;व तो हिरण्याक्षास उपहासपूर्वक म्हणाला, "अरे हिरण्याक्षा! तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी वनपशु खराच, पण सांप्रत तुझ्यासारख्या ग्रामसिंहांचा (कुत्र्यांचा) शोध करीत आहें. अरे दैवहीना, तूं अगदीं मृत्यूच्या दाराशीं येऊन ठेपला आहेस, म्हणून तुझ्या बुद्धीला हा असा भ्रंश पडला आहे; ह्यास्तव तूं ह्या वेळीं कितीही वल्गना केल्यास तरी माझ्यासारखे वीरपुरुष त्यांकडे मुळींच लक्ष पोंचविणार नाहींत. भगवान ब्रह्मदेवानें तुम्हांस दिलेली पृथ्वी मीं तुझ्यासमक्ष हरण केल्यामुळें तूं मजवर गदा उचललीस, आणि तूं मर्मभेदक भाषणें बोलत असतांही मी पळालों, तेव्हां मी भित्रा आणि निर्लज्ज ह्यांत संदेह नाहीं! पण आतां कसा बसा तुझ्याशीं सामना तर केला पाहिजेच! कारण, बलवंताशीं एकदा वैर बांधिलें म्हणजे त्याची कांहीं तरी वाट लावल्याशिवाय सोय नाहीं! आजकाल हिरण्याक्ष म्हणजे पादचारी योद्धयांचा अधिपति, अशी तुझी जिकडे तिकडे ख्याति झालेली आहे; तुला कोणाचीही भीति वाटत नाहीं! तथापि तूं आतां माझा पराभव करण्याच्या तयारीस लाग, आणि आपली प्रतिज्ञा पूर्ण करून आपल्या बांधवांच्या शोकाश्रूंचें परिमार्जन कर. बाबारे, जो पुरुष आपला शब्द खरा करीत नाहीं, तो निंद्य होय."

### हिरण्याक्षाशीं युद्ध व ब्रह्मदेवाची सूचना.

मैत्रेय मुनि पुढें सांगतातः—विदुरा, ह्याप्रमाणें भगवंताचें तें धिक्कारयुक्त व उपहासाचें भाषण ऐकून, एखाद्या डंवचलेल्या महाभुजंगाप्रमाणें हिरण्याक्ष संतप्त झाला. त्याचा श्वासोच्छ्वास फारच जोरानें चालूं लागला व त्याचीं सर्व इंद्रियें क्रोधानें थरथर कांपूं लागलीं. नंतर त्यानें मोठ्या आवेशानें भगवंतावर गदा हाणिली. परंतु भगवंतानें आपलें अंग किंचित् वक्र केलें, आणि योगाभ्यासी पुरुषाला ज्याप्रमाणें मृत्यु सहज चुकवितां येतो, त्याप्रमाणें त्यानें त्या गदेचा आघात सहज चुकविला! तें पाहून हिरण्याक्ष अगदीं लाल झाला, आणि रागानें ओंठ चावून हातांत गरगर फिरत असलेल्या गदेचा त्यानें फिरून प्रहार केला. भगवंतानें तोही प्रहार चुकविला, व आपली गदा उचलली; आणि आतां तो हिरण्याक्षाच्या ललाटावर प्रहार करणार, इतक्यांत त्या युद्धकुशल

हिरण्याक्षानें आपल्या गदेवर तो प्रहार झेलला! ह्याप्रमाणें त्या दोघांचें गदायुद्ध सुरू झालें. विदुरा, एका स्त्रीच्या ईर्ष्येनें दोन महावीर एकमेकांस पराजित करण्यासाठीं लढतात, त्याप्रमाणें पृथ्वीकरितां त्या उभयतांमध्यें भयंकर ईर्ष्या उत्पन्न होऊन युद्ध माजलें. गदेच्या आघातांनीं त्या उभयतांचीं शरीरें अगदीं ठेंचून जाऊन ते रक्तानें अगदीं न्हाऊन गेले. त्या रक्तानें उभयतांच्या क्रोधाग्नींत जास्तच भर पडली! ते दोघेही गदायुद्धांत निपुण; दोघांचीही तयारी चांगली; आणि दोघांच्याही गदा अप्रतिम. तेव्हां त्यांचें तें अलौकिक युद्ध पाहण्याकरितां इतर देव आणि ऋषि ह्यांसहवर्तमान ब्रह्मदेव तेथें प्राप्त झाला. सर्व ऋषींस मार्ग दाखविणारा भगवान ब्रह्मदेव तेथें प्राप्त झाला असतां त्यास दिसून आलें कीं, हिरण्याक्षाची शक्ति मुळींच क्षीण होत नसून ती उलट क्षणोक्षणीं वाढत आहे; भगवंताच्या प्रत्येक युक्तीवर तो प्रतियुक्ति योजीत आहे; व त्याचा पराक्रम आणि युद्धचातुर्य अद्वितीय असल्यामुळें त्याचा नाश होणें फार कठिण आहे. हें पाहून ब्रह्मदेव त्या वराहरूपी आदिनारायणास म्हणाला, "हे भगवंता, हा सर्व ऋषींचा आणि देवांचा समुदाय आपणांस अनन्यभावें शरण आला आहे. हा दुष्ट दैत्य आमच्या हृदयांत अगदीं शल्याप्रमाणें सलत आहे. ह्याच्यापासून देव, ब्राह्मण व गाई अगदीं त्रस्त झाल्या आहेत. हा महापराक्रमी असून नेहमीं मदोन्मत्त असतो. ह्याच्या जोडीचा योद्धा ह्या भूतलावर कोणी नाहीं, म्हणून हा नेहमीं उन्मत्तपणें प्रतिस्पर्ध्याचा शोध करीत फिरतो. देवा, लहान मूल, परिणामीं काय होईल हें न ओळखून जसें सर्पाशीं खेळत बसतें, तसे आपण ह्या दुष्ट व मदोन्मत्त दैत्याबरोबर खेळत बसूं नका. कारण, एकदा का सायंकाळ प्राप्त झाली, म्हणजे मग हा मुळींच आवरणार नाहीं. म्हणून त्याच्या आधींच आपण आपल्या दिव्य मायेचा स्वीकार करून ह्या दुष्टाचा नाश करून टाका. भगवंता, हा अभिजित् मुहूर्त अगदीं संपत आला आहे, ह्यास्तव ह्या सुवेळीं ह्याचा वध करून देवांस यश मिळवून द्या. पूर्वी सनत्कुमारांनीं ह्यास शाप दिला, त्या वेळी आपल्या हातूनच ह्यास मरण येणार, हें आपणच ठरवून ठेविलें आहे. ह्या वेळीं हा स्वतः आपल्याजवळ प्राप्त झाला आहे. तेव्हां हा सुयोग न दवडितां आपण एकदम ह्याचा वध करून सर्व लोकांचें भय दूर करा, एवढीच आपल्या चरणांजवळ प्रार्थना आहे."

## अध्याय एकोणिसावा.

—:०:—

### हिरण्याक्षाचा वध.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, हिरण्याक्षाला मारण्यास अमुक काल उत्तम आहे असें ब्रह्मदेवानें अगदीं प्रांजळपणानें सांगितलें, तें ऐकून परमेश्वराला हसूं आलें. मी प्रत्यक्ष कालस्वरूपी असून हा ब्रह्मदेव मला वेळ सुचवीत आहे तेव्हां किती तरी हा भोळा, असें त्याला वाटलें; परंतु त्यानें ब्रह्मदेवाला दुखविलें नाहीं. भगवंतानें ब्रह्मदेवाकडे प्रेमदृष्टीनें अवलोकन केलें, आणि तुझी सूचना मान्य आहे, असा भाव दर्शित केला. नंतर त्या वराहरूपी भगवंतानें आपल्यापुढें निर्भयपणें संचार करीत असलेल्या त्या हिरण्याक्षाच्या हनुवटीवर गदेचा प्रहार केला. तत्काल हिरण्याक्षानेंही उलट आपली गदा भगवंताच्या गदेवर मोठ्या जोरानें हाणिली; त्याबरोबर भगवंताच्या हातची गदा निसटून गरगर फिरत खालीं पडली! विदुरा, ह्याप्रमाणें भगवान निःशस्त्र असतां त्याजवर प्रहार करण्यास उत्तम वेळ होती; पण शस्त्रविहीन योद्ध्यावर प्रहार करूं नये अशी नीति असल्यामुळें हिरण्याक्षानें शस्त्र उचलिलें नाहीं. इकडे भगवंताच्या हातांतील गदा खालीं पड-

केली पाहून प्रेक्षक मंडळींत मोठा हाहाकार उडाला. नंतर भगवंतानें हिरण्याक्षाच्या शौर्याची मोठी वाखाणणी केली व आपल्या सुदर्शन चक्राचें स्मरण केलें. स्मरण करितांच तें चक्र तेथें प्राप्त झालें आणि भगवंताच्या हातांत शोभूं लागलें. हिरण्याक्ष हा वास्तविक विष्णूच्या पार्षदगणांतील मुख्य खरा; पण त्या वेळीं तो भगवंताचा शत्रु झाला होता, त्यामुळें विष्णूचें तें सुदर्शन चक्र हिरण्याक्षाचा प्राण घेण्यास उद्युक्त झालें. भगवान हिरण्याक्षाबरोबर युद्ध करण्यांत अगदीं व्यग्र असतां तो युद्धप्रसंग पाहण्याकरितां जमलेल्या देवसमूहाच्या मुखांतून 'देवा, तुझा उत्कर्ष असो, ह्या दैत्याचा तूं वध कर' असे उद्गार सारखे निघत होते. विदुरा, भगवंताचें कल्याण देवांनीं चिंतण्याची काय अवश्यकता होती? पण भगवन्मायेनें त्यांना मोह पाडिला होता! असो. ते उभयतां वीर एकमेकांचा प्राण घेण्याच्या विचारांत अगदीं गढून गेले. हिरण्याक्षाचे डोळे क्रोधानें लाल झाले. तो परमेश्वराकडे डोळे वटारून पाहूं लागला, व आपल्या नेत्रांनीं देवाला भाजीतच आहे कीं काय, असा भास होऊं लागला. त्यानें कडकडा दांत खाल्ले आणि मोठ्या त्वेषानें तो भगवंताच्या अंगावर चवताळून गेला व त्यानें भयंकर गर्जना करून 'दुष्टा, आतां तुला खचीत मारितों' असे शब्द बोलून आपली प्रचंड गदा भगवंताच्या अंगावर फेंकून मारिली! वायूच्या वेगाप्रमाणें ती गदा आपल्या अंगावर येत आहे, असें पाहून त्या अचिंत्यशक्ति वराहरूपी परमेश्वरानें आपला डावा पाय उचलिला व त्यानें ती गदा सहज पलीकडे ढकलून दिली, आणि गंभीर शब्दानें तो म्हणाला, "हिरण्याक्षा, तुझ्या मनांत मला जिंकण्याची जर इच्छा असेल तर ही आपली गदा उचल आणि उद्योगास लाग." ते भगवंताचे शब्द ऐकून हिरण्याक्ष जास्तच चिडला. त्यानें एक मोठी आरोळी मारली, आणि ती गदा पुनः उचलून भगवंताच्या अंगावर फेंकिली. ती आपल्या अंगावर आलेली गदा, गरुड नागिणीला सहज धरितो त्याप्रमाणें भगवंतानें सहज धरिली. तें पाहून हिरण्याक्ष अगदीं आश्चर्यचकित झाला. अशी ही प्रचंड गदा वेगानें अंगावर आली असतां, एखादें फूल झेलावें त्याप्रमाणें ज्यानें सहज झेलिली, त्याच्यापुढें माझा पराक्रम चालणें कठिण होय, अशी हिरण्याक्षाची पूर्ण खातरी झाली. त्याला आपल्या सामर्थ्याचा जो अतिशय अभिमान होता, तो सर्व नाहींसा होऊन त्याची मुखश्री म्लान झाली. भगवान त्याला त्याची गदा फिरून देत असतां त्या मानी दैत्याला ती तशी परत घेणें बरें वाटलें नाहीं. त्यानें आपला त्रिशूल उचलिला, आणि भगवंतावर नेम धरून फेंकिला. विदुरा, हा त्रिशूल कांहीं सामान्य नव्हता; पण त्याची शक्ति भगवंतापुढें काय चालणार? एखाद्या विद्वान ब्राह्मणावर जारणमारणाचे प्रयोग करणें जितकें निष्फल, तितकेंच भगवंतावर त्रिशूल सोडणें निष्फल! तो अत्यंत तेजस्वी त्रिशूल येत आहे असें पाहून भगवंतानें आपलें सुदर्शन चक्र सोडिलें. त्या चक्रानें तो त्रिशूल भगवंतापर्यंत पोहोंचण्याच्या पूर्वींच त्याचे तुकडे तुकडे केले. तें पाहून हिरण्याक्ष अतिशयच खवळला; तो तसाच चवताळून ईश्वराच्या अंगावर आला, आणि त्याच्या विशाल वक्षस्थलावर आपल्या कठोर मुष्टीचा प्रहार करून स्वतः अदृश्य झाला. विदुरा, ह्याप्रमाणें हिरण्याक्षानें आपल्याकडून मोठ्या जोरानें मुष्टिप्रहार केला; पण त्यापासून भगवंताला कांहीं सुद्धां झालें नाहीं. एखाद्या हत्तीवर पुष्पप्रहार केला असतां जसें त्याला कळत देखील नाहीं, तसें आपल्यास कोणीं मुष्टिप्रहार केला, हें भगवंताला कळलें देखील नाहीं. नंतर हिरण्याक्षानें असुरी माया उत्पन्न करून तिचा परमेश्वरावर प्रयोग सुरू

केला. विदुरा, कोणीही एकदा क्रोधानें व्याप्त झाला म्हणजे त्याचें देहभान कसें सुटतें, आणि त्याचे ठिकाणीं असलेली जी योग्यायोग्य बुद्धि तिचा अस्त कसा होतो, ह्या गोष्टीचें हें प्रत्यक्ष उदाहरण पहा: योगमायेचाही जो चालक, त्यावर अशा असुरी मायेचे कितीही प्रयोग केले तरी उपयोग काय? योगमायेपुढें त्या असुरी मायेची कितीशी योग्यता? पण हिरण्याक्षाला हा विचार सुचला का? मुळीं सुद्धां नाहीं! भगवंतावर त्या मायेचा कांहींच परिणाम झाला नाहीं, तरी इतरांस मात्र तो केवळ प्रलय भासला! त्या मायेच्या योगानें अनेक प्रकारचे उत्पात होऊं लागले: चोहींकडे भयंकर वावटळी उठल्या; आकाशांत अतिशय ढग उत्पन्न होऊन तें धुळीनें अगदीं व्याप्त झालें; दशदिशांकडे गर्द अंधकार पडला; आकाशांतून मोठमोठे दगड, रक्त, विष्ठा, केश इत्यादिकांचा सारखा वर्षाव होऊं लागला; विजा चमकूं लागल्या; मेघगर्जनांनीं आकाश दणाणून गेलें; पर्वतांमधून अनेक प्रकारच्या शस्त्रास्त्रांचा अव्याहत वर्षाव होत आहे असा भास होऊं लागला; हातांत त्रिशूळ धारण केलेल्या, नग्न आणि केश मोकळे सोडलेल्या अक्राळविक्राळ राक्षसी जिकडे तिकडे दिसूं लागल्या; हातांत शस्त्रें घेतलेले आणि तोंडानें 'हाणा, मारा, तोडा' इत्यादि अभद्र शब्द उच्चारीत असलेले असे अनेक यक्ष, राक्षस, रथी, पदाति इत्यादि वीर दिसूं लागले. तीं सर्व चिन्हें पाहून, असुरी मायेचा नाश करण्याकरितां यज्ञपति वराहानें सुदर्शन चक्र सोडिलें. विदुरा, हिरण्याक्षाचें आणि विष्णूचें ह्याप्रमाणें तुमुल युद्ध चाललें असतां तिकडे दितीची काय अवस्था झाली तें पहा: ह्या युद्धाचा परिणाम काय होईल ह्या चिंतेंत ती निमग्न असतां, विष्णु तुझ्या पुत्रांचा वध करील, हें पतीचें वाक्य तिला आठवलें आणि तिच्या काळजांत एकदम धस्स होऊन तिच्या स्तनांतून रक्ताचा पान्हा फुटला! इकडे, सुदर्शन चक्रानें आपल्या मायेचा नाश झालासें पाहून हिरण्याक्ष भगवंतासमोर आला, आणि त्यास आपल्या वेंगेंत धरून चिरडून टाकावा म्हणून धरावयास गेला; तों तो वेंगेंत न सांपडतां बाहेरच उभा आहे असें त्यास दिसलें. तेव्हां हिरण्याक्षानें भगवंतावर मुष्टिप्रहार करण्यास सुरुवात केली, पण त्याच्या त्या मुष्टिप्रहारानें तेथें होणार काय? हिरण्याक्ष आपल्या जवळ आलासें पाहून भगवंतानें त्याच्या एक कानशिलांत मारिली, त्याबरोबर त्याची गठडी वळली! त्याची स्थिति वाऱ्यानें उन्मळून पडलेल्या प्रचंड वृक्षाप्रमाणें झाली. त्याचें शरीर गोळांघ्या खाऊं लागलें. डोळे बाहेर आले, व हातपाय मोडून जाऊन तो मरून पडला! त्या महापराक्रमी दैत्याचा तो अक्राळविक्राळ देह अस्ताव्यस्त रीतीनें पडला, तेव्हां युद्ध पाहण्यास जमलेल्या देवांनीं त्याची प्रशंसा करण्यास आरंभ केला: ते म्हणाले, "अहो, असें मरण कोणाला येणार आहे? अज्ञानजन्य लिंगशरीरापासून सुटावें म्हणून योगीजन समाधीच्या योगानें ज्या भगवंताचें ध्यान करितात, तोच भगवान मरणसमयीं प्रत्यक्ष ह्याच्या डोळ्यांसमोर असून त्याच्या हातानें ह्याला मरण आलें, तेव्हां केवढें हें ह्याचें भाग्य! बरोबरच आहे, हा भाग्यवान कां नसेल? कारण हा आणि ह्याचा वडील भाऊ हिरण्यकशिपु हे दोघे विष्णूच्या पार्षदगणांतील मुख्य होत. ह्यांना ब्राह्मणांचा शाप मिळाल्यामुळें हे दैत्ययोनींत आले. असे आणखी कांहीं जन्म घेतल्यावर ते पुन: आपल्या स्थानावर जाणारच!"

ह्याप्रमाणें हिरण्याक्षाच्या भाग्याचें वर्णन करून देव भगवंताला म्हणाले, "हे वराहरूपी परमेश्वरा, तूं सर्व यज्ञांचा प्रवर्तक आहेस. जगाच्या रक्षणाकरितां शुद्धसत्त्वात्मक मूर्ति धारण करून वेळोवेळीं तूं आपल्या भक्तांवरील संकटें निवारण करितोस. आज तूं ह्या दुष्टाला मारून

प्राणिमात्रास निर्भय केलेंस, ही गोष्ट फार उत्तम झाली; आम्ही तुला अनन्यभावें वंदन करितों."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें हिरण्याक्षाचा वध करून भगवान तें वराहरूप सोडून आपल्या वैकुंठलोकास निघून गेले. बाबारे, हें भगवंताचें चरित्र मीं जसें गुरूपासून श्रवण केलें, तसेंच तें तुला सांगितलें आहे.

सूत म्हणतात:—शौनका, ही कथा ऐकून विदुराला मोठा आनंद झाला. भक्ति केली असतां परमेश्वर पशूंना देखील सुलभ आहे, पण ती न केल्यास देवांना देखील तो दुर्लभ आहे. गजेंद्राचीच गोष्ट ध्यानांत घ्याना ? तो जातीचा पशु; पण जेव्हां त्याला नक्रानें धरिलें व कोणत्याही उपायांनीं त्याजपासून सुटण्याची त्याला आशा दिसेना, तेव्हां त्यानें परमेश्वराचा धावा केला. त्याबरोबर चतुर्भुज भगवान गरुडावर बसून तत्काल तेथें प्राप्त झाले, आणि आपल्या त्या भक्ताला त्यांनीं नक्रापासून सोडविलें. परमेश्वराच्या कथा चित्तास समाधान उत्पन्न करितात. तोच सर्वांचा आधार होय. त्याला वश करण्यास निष्कामभक्तीसारखें दुसरें साधन नाहीं. ऋषीहो, हें वराहावताराचें कथानक जो भक्तिपुरःसर नित्य पठण करितो, तो ब्रह्महत्येसारख्या मोठ्या पातकापासूनही मुक्त होतो. त्यास इहपरलोकाचें सुख प्राप्त होऊन शेवटीं वैकुंठाची प्राप्ति होते.

## अध्याय विसावा.

—:०:—

### नानाविध प्रजांची उत्पत्ति.

शौनक म्हणाला:–हे सूता, आदिवराहानें पृथ्वीला जलांतून वर आणिल्यानंतर स्वायंभुव मनूला राहण्याकरितां स्थान प्राप्त झालें, हें उघडच आहे. आतां आमचें म्हणणें असें आहे कीं, पूर्वी भगवत्स्वरूपीं लीन झालेली सृष्टि प्रकट करण्याकरितां स्वायंभुवानें कोणते उपाय केले, ते आम्हांस सांग. हे रोमहर्षणे, तूं विदुरमैत्रेयांच्या संवादरूपानें आम्हांस भगवद्यश निरूपण करून सांगत आहेस हें फारच उत्तम होय. कारण, विदुर हा महान भगवद्भक्त असून श्रीकृष्णावर त्याचें निःस्सीम प्रेम होतें. धृतराष्ट्रानें श्रीकृष्णाचा अनादर केलेला पाहून, विदुरानें धृतराष्ट्र हा आपला वडील भाऊ आहे, असें मनांत न आणितां एकदम त्याचा व त्याच्या पुत्रांचा त्याग केला. सूता, विदुराची योग्यता व्यासाप्रमाणेंच होती. त्याचें चित्त ब्रह्मचिंतनांत लीन झालें असून तीर्थयात्रेमुळें त्याची अंतर्बाह्य शुद्धि झालेली होती. अशा त्या परमपवित्र विदुराची हरिद्वारीं मैत्रेय मुनीशीं गांठ पडली, आणि त्यानें तत्त्वज्ञानी लोकांत अग्रगण्य अशा त्या मैत्रेयाला नानाविध प्रश्न विचारले, तेव्हां त्या संवादांत आमच्या शंकेचें समाधान करणारीं प्रश्नोत्तरें झालीं असतीलच. हे सूता, भगवच्चरित्राचा असा कांहीं विलक्षण प्रभाव आहे कीं, तें कितीही श्रवण केलें तरी तृप्ति होत नाहीं. ह्यास्तव, विदुरमैत्रेयांचा जो संवाद झाला असेल, तो आम्हांस साकल्येंकरून सांग. तुझें कल्याण असो.

सूत म्हणतात:—ऋषीहो, भगवंतानें हिरण्याक्षाचा वध करून सहज भूमीचा उद्धार केला, ही गोष्ट श्रवण करून विदुराला मोठा आनंद झाला, व त्यानें मैत्रेयांस प्रश्न केले.

विदुर म्हणाला:—मैत्रेय मुने, आपण सर्वज्ञ आहां. सृष्टीच्या आरंभीं ब्रह्मदेवानें मरीचि आदिकरून प्रजापति उत्पन्न केले, व स्वायंभुव मनूला पृथ्वीचें राज्य दिलें वगैरे जो इतिहास आपण सांगितला, तो सर्व समजला; पण पुढें ब्रह्मदेवानें काय केलें ? मरीचि आदिकरून प्रजापति आणि स्वायंभुव मनु ह्यांना सृष्टीची वृद्धि करण्याविषयीं ब्रह्मदेवानें आज्ञा दिली होती, त्याप्रमाणें त्यांनीं सृष्टीची वृद्धि कशी केली ? त्यांनीं स्त्रिया करून सृष्टि उत्पन्न केली, किंवा त्यांनीं ब्रह्मदेवा-

प्रमाणेंच मानसिक सृष्टि निर्माण केली ? तशीच त्यांनी एकेकटयानें सृष्टि केली अथवा सर्वांनीं मिळून सृष्टि केली ? मुने, तें सर्व वृत्त मला सांगा.

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, सृष्टीच्या उत्पत्तीचा कांहीं प्रकार मीं पूर्वी तुला सांगितला आहे, तो तुझ्या ध्यानांत असेलच. मी आतां संक्षेपानें त्या प्रकारचा अनुवाद करून त्यासहित सर्व प्रकार यथास्थितपणें निवेदन करितों, तो सावधान चित्तानें श्रवण कर. बा विदुरा, निर्गुण निर्विकार परमात्म्याच्या प्रेरणेनें त्रिगुणात्मक प्रकृतीमध्यें क्षोभ उत्पन्न होऊन महत्तत्त्व प्रकट झालें. प्रकृतीस क्षुब्धता होण्याचीं कारणें तीन आहेत. एक–जीवाचें अतर्क्य असें प्राक्तनकर्म; दुसरें–प्रकृतीचा नियंता पुरुष; व तिसरें—सदोदीत अव्याहतपणें शक्ति चालविणारा काल. परमात्म्यानें ह्या तीन कारणांच्या योगें प्रकृतीस प्रेरित केलें, तेव्हां तिच्यापासून महत्तत्त्वाची उत्पत्ति झाली. महत्तत्त्वामध्यें स्वभावतः सत्त्वगुणाचें प्राधान्य असतें, परंतु जीवांच्या प्रारब्धकर्मामुळें त्यामध्यें रजोगुणाचें प्राबल्य होऊन त्यापासून अहंकाराचा उद्भव होतो. तो अहंकार तीन प्रकारचा आहे: ( १ ) सात्त्विक, ( २ ) राजस व ( ३ ) तामस. ह्या अहंकारापासून भौतिक सृष्टि उत्पन्न होते. शब्दस्पर्शादिक पांच सूक्ष्म भूतें, तशींच आकाशादिक पांच स्थूल भूतें, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, व त्यांच्या देवता हीं सर्व त्या अहंकारापासूनच प्रकट झालीं. तीं एकेकटीं सृष्टि निर्माण करण्यास असमर्थ असल्यामुळें दैवयोगानें त्यांच्या एकीकरणापासून एक पंचमहाभूतात्मक सुवर्णमय ब्रह्मांडकोश उत्पन्न झाला. हा ब्रह्मांडकोश चैतन्यरहित असल्यामुळें सहस्र वर्षेंपर्यंत समुद्राच्या उदकांत स्वस्थ पडून राहिला होता. नंतर त्यांत परमात्म्यानें प्रवेश केला. त्या परमात्मस्वरूप नारायणाच्या नाभीपासून सहस्र आदित्यांप्रमाणें देदीप्यमान असें एक कमल उत्पन्न झालें. हें कमलच सर्व विश्वाचें निवासस्थान होय. ह्या स्थानीं ब्रह्मदेव स्वतःसिद्ध उत्पन्न झाला. विदुरा, त्या ब्रह्मदेवाला भगवान नारायणानें सृष्टि निर्माण करण्याची शक्ति दिली, व त्या शक्तीच्या योगें ब्रह्मदेवानें पूर्वीच्या कल्पाप्रमाणें विश्वाची रचना करून त्यास नामरूपादिकांची प्राप्ति करून दिली. ब्रह्मदेवानें प्रथम पंचपर्वा अविद्या नामक सृष्टि उत्पन्न केली. ही सृष्टि म्हणजे तामिस्र, अंधतामिस्र, तम, मोह व महामोह हे होत. ही अज्ञानात्मक सृष्टि पाहून ब्रह्मदेव खिन्न झाला. नंतर ब्रह्मदेवानें तो अविद्यासृष्टिविधायक देह टाकून दिला. पुढें तो देह रात्रिरूप झाला. हा रात्रिरूप देह क्षुधा व तृषा ह्यांचें उत्पत्तिस्थान होय. ह्या देहापासून पुढें यक्ष व राक्षस उत्पन्न झाले. हे क्षुधेनें व तृषेनें अत्यंत पीडित झाले, तेव्हां ब्रह्मदेवालाच खाण्याच्या उद्देशानें त्याच्या अंगावर धावून आले, आणि म्हणाले, “ अहो, ह्या ब्रह्मदेवालाच भक्षण करा; हा आपला बाप असला म्हणून काय झालें ? ह्याच्यापासूनच जर आपण उत्पन्न झालों, आणि तहाननें व भुकेनें तळमळत आहों, तर आम्हीं काय करावें ?” तेव्हां ब्रह्मदेव फार घाबरला, आणि म्हणाला, “अरे, मी तुमचा पिता आहें, ह्याकरितां माझें रक्षण करा. ”

ब्रह्मदेवाचे हे शब्द ऐकून त्यांतील कांहींजण म्हणाले, “ अहो, ह्याला जिवंत ठेवू नका, ” व कांहींजण म्हणाले, “ अहो, ह्याला भक्षणच करा. ” विदुरा, ज्यांनीं ब्रह्मदेवाला ‘ भक्षण करा ’ असें म्हटलें, ते यक्ष होत; आणि ज्यांनीं ‘ जिवंत ठेवू नका ’ असें म्हटलें, ते राक्षस होत. ह्या यक्षराक्षसांनीं रात्रीचा स्वीकार केला. नंतर ब्रह्मदेवानें प्रकाशरूप शरीर धारण केलें, व व त्या शरिराच्या प्रभेनें त्यानें सात्त्विक देवांची उत्पत्ति केली. पुढें ब्रह्मदेवानें त्या प्रकाशमय देहाचाही त्याग केला. परंतु देवांनीं त्या देहाची दिवसरूप कांति ग्रहण करून तिच्या

योगें ते विविध क्रीडा करूं लागले. पुढें ब्रह्मदेवानें दुसरा देह धारण करून कमरेच्या पुढल्या भागापासून अत्यंत स्त्रीलंपट असे दैत्य उत्पन्न केले. ते कामातुर होऊन ब्रह्मदेवाशींच मैथुन करण्यास प्रवृत्त झाले. तेव्हां ब्रह्मदेवाला हसूं आलें, आणि भयही वाटलें, व तो पळूं लागला; शेवटीं पळतां पळतां तो परमेश्वराकडे गेला आणि त्याला शरण जाऊन म्हणाला, " हे ईश्वरा, तुझ्या आज्ञेनें मीं प्रजा उत्पन्न केली, तों ती माझ्याशींच मैथुन करण्यास प्रवृत्त झाली. तर ह्या प्रसंगीं तूंच माझें रक्षण कर. सर्वांच्या दुःखाचें निरसन करण्यास तूंच एक समर्थ आहेस."

विदुरा, ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाची स्थिति पाहून परमेश्वरानें त्याला सांगितलें, " ब्रह्मदेवा, तूं ही कामदोषित झालेली तनु सोडून दे." तेव्हां ब्रह्मदेवानें त्या तनूचा त्याग केला. ही ब्रह्मदेवानें टाकिलेली तनु संध्याकाळची अभिमानी देवता झाली. कामवासना प्रदीप्त होण्याची हीच वेळ होय. दैत्यांना ही वेळ स्त्रीप्रमाणें भासली, व त्या वेळची आकाशाची लाली, चांचल्य, गंभीर शब्द वगैरे धर्म त्यांना स्त्रीच्या अलंकारांसारखे दिसले. त्यांना असें वाटलें कीं, ह्या स्त्रीच्या पायांतील नुपुरें रुणझुण शब्द करीत आहेत; तारुण्यमदानें हिचे नेत्र लाल झाले आहेत; ही लाल रंगाची पैठणी नेसली असून तिजवर देदीप्यमान असा कंबरपट्टा हिनें घातला आहे; हिचे स्तन पुष्ट आहेत; हिचें नाक चाफेकळीसारखें असून दांत कुंदकळ्यांप्रमाणें सुंदर आहेत; ही हास्यमुख असून हिचें अवलोकन शृंगारयुक्त आहे; हिनें आपल्या मस्तकावरील कृष्णकेशकलापाचा बुचडा बांधिला असून विनयानें हिनें आपलें शरीर झांकून घेतलें आहे. ह्याप्रमाणें त्या स्त्रीसदृश भासणाऱ्या संध्येला अवलोकन करून सर्व असुर तिजवर मोहित झाले, व परस्परांशीं म्हणूं लागले, " कायहो हिचें सौंदर्य तरी! आम्ही तर हिचें स्वरूप पाहून अगदीं कामवश झालों! पण कायहो, हिला कसा कामविकार होत नाहीं! ही तर खुशाल आमच्यामध्यें अगदीं विकाररहित अशी फिरत आहे!"

ह्याप्रमाणें ते एकमेकांशीं बोलतां बोलतां स्त्रीसारख्या भासणाऱ्या त्या संध्येला मोठ्या प्रेमानें विचारूं लागले, " हे सुंदरी, तुला पाहून आम्ही अगदीं मोहित झालों आहों. तर तूं आहेस तरी कोणाची? हे विलासिनी, तूं कोणत्या कारणास्तव येथें प्राप्त झाली आहेस? तुझें रूप अमोल आहे, तर तें आम्हांला कां अर्पण करीत नाहींस? सखे, त्यामुळें आम्हांला फार दुःख होत आहे. तूं कोणीही ऐस. तुझें दर्शन आम्हांस सुखकर होत आहे. हे कल्याणी, तूं हा चेंडू ( लाल दिसत असलेला सूर्य ) खेळत आहेस; पण त्या चेंडूच्या उडण्याबरोबर आमचीं अंतःकरणेंही उडत आहेत. प्रिये, हा चेंडू तूं खेळत आहेस, व जिकडे जिकडे तो उडत जातो, तिकडे तिकडे तूंही त्याजबरोबर चपलतेनें जात आहेस आणि वरचेवर खालीं वांकत आहेस, ह्यामुळें तुझ्या सुंदर आणि पुष्ट स्तनभारानें तुझी कृश कटि मोडेल कीं काय अशी आम्हांस भीति वाटत आहे. तुझी दृष्टि ( नक्षत्रें ) कशी चोहींकडे फिरत आहे. सखे, तुझा केशकलाप ( अंधकार ) किती तरी मनोहर दिसत आहे हा!"

अशा प्रकारचें चेष्टायुक्त भाषण करून त्या दैत्यांनीं तिचा स्वीकार केला. हा सर्व प्रकार पाहून ब्रह्मदेवाला हसूं आलें, व त्या त्याच्या हास्यानें त्याजवर अशी एक प्रकारची कांति आली कीं, त्यामुळें तो फारच सुरेख दिसूं लागला. त्या कांतीपासून ब्रह्मदेवानें अनेक अप्सरा व गंधर्व उत्पन्न केले, व नंतर त्या शरिराचा त्याग केला. हें शरीरच चंद्रिका ( चांदणें ) होय. विश्वावसु आदिकरून गंधर्व व अप्सरा ह्यांनीं त्या कांतिरूप शरिराचा स्वीकार केला. पुढें ब्रह्मदेवानें दुसरें

शरीर ग्रहण करून आपल्या आळसापासून भूतें व पिशाचें निर्माण केलीं. तीं नग्न असून त्यांचे केंस पिंजारलेले होते. ही विलक्षण प्रजा पाहून ब्रह्मदेवानें डोळे मिटले व तें शरीर टाकून दिलें. नंतर भूतांनीं व पिशाचांनीं त्याचा स्वीकार केला. ह्या शरिरालाच जृंभणा ( जांभई )असें म्हणतात. ह्याचे आळस, जांभई, निद्रा व उन्माद हे चार भेद आहेत. ह्या चारही भेदांपासून अनेक प्रकारची भूतसृष्टि उत्पन्न झाली. पुढें एके वेळीं, मी मोठा बळवान आहें, असें ब्रह्मदेवाला वाटूं लागलें; तेव्हां त्या कल्पनारूप शरिरापासून साध्यगण व पितृगण उत्पन्न झाले. त्यांनीं त्या बळकट व अदृश्य शरिराचा स्वीकार केला. ह्या शरिराला उद्देशूनच कर्ममार्गी लोक आपल्या पितररूपी साध्यांना व पितरांना हव्यकव्यरूप अन्नें समर्पण करितात. नंतर ब्रह्मदेवानें आपल्या गुप्त होण्याच्या शक्तीपासून सिद्ध व विद्याधर उत्पन्न केले, आणि त्यांना आपला अंतर्धान नामक देह अर्पण केला. पुढें ब्रह्मदेव एके वेळीं आपलें प्रतिबिंब पहात असतां, मी फारच सुंदर आहें असें त्याला वाटूं लागलें, व त्या प्रतिबिंबापासून त्यानें किंपुरुष व किन्नर उत्पन्न केले, आणि त्यांनीं त्या प्रतिबिंबरूप शरिराचा स्वीकार केला. हे दोन्ही गण पहांटेच्या वेळीं, ब्रह्मदेवानें केलेल्या पराक्रमाचें वर्णन करून गायन करीत असतात. पुढें तो ब्रह्मदेव आपला विस्तीर्ण देह पसरून पडला, व सृष्टीची वृद्धि कशी होईल ही काळजी करूं लागला. परंतु सृष्टीची वृद्धि होईना, म्हणून शेवटीं संतापला. त्याला आपल्या शरिराचा राग आला आणि त्या रागांतच त्यानें तें शरीर टाकिलें. त्या क्रोधरूप शरिरापासून जे केश गळून पडले, त्यांपासून अहि ( एका जातीचे सर्प ) झाले. तें शरीर पसरलेलें होतें व संतापानें चळवळ करीत होतें; त्यापासून नाग वगैरे इतर सर्पजाति जन्मास आल्या. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाच्या संतापरूपी शरिरापासून रागीट व क्रूर अशी सर्पजाति उत्पन्न झाली. पुढें ब्रह्मदेव एके वेळीं स्वस्थ बसला असतां आपण कृतकृत्य झालों असें मानूं लागला; तेव्हां त्याच्या मनापासून मनु उत्पन्न झाले. हे मनु लोकांना धर्ममार्गास लावून त्यांचें रक्षण करितात. त्या जितेंद्रिय ब्रह्मदेवानें आपलें पुरुषाकार शरीर मनूंना दिलें. ब्रह्मदेवानें हे मनु उत्पन्न केले असें पाहून देवगंधर्वादिकांना मोठा आनंद झाला, आणि त्यांनीं त्याची स्तुति केली: ते म्हणाले;"हे जगदुत्पादका देवा, तूं मनूंना उत्पन्न केलेस ही गोष्ट फार चांगली झाली. कारण, ह्यांच्यामुळें अग्निहोत्रादि कर्मे चालतील व त्यामुळें आम्हांस व तुम्हाही हविर्भाग मिळेल."

नंतर ब्रह्मदेवानें तपश्चर्या, उपासना, आसनादि योग व समाधियोग साध्य करून इंद्रियांचा जय केला, व त्या शुद्ध शरिरापासून ऋषि उत्पन्न केले; ही प्रजा सर्वांना पूज्य अशी झाली. त्या शरिराचा ऋषींनीं स्वीकार केल्यामुळें त्यांच्या अंगीं तप, समाधियोग, वैराग्य व ज्ञान हे योग साध्य करून घेण्याचें सामर्थ्य आलें.

## अध्याय एकविसावा.

—:०:—

### कर्दम व स्वायंभुव ह्यांची भेट.

विदुर म्हणाला:—मैत्रेय मुने, ज्या स्वायंभुव मनूपासून मैथुनजन्य सृष्टि उत्पन्न होण्यास आरंभ झाला असें आपण मला सांगितलें, त्या स्वायंभुव मनूचा श्रेष्ठ वंश आणि प्रियव्रत व उत्तानपाद ह्यांचें सविस्तर चरित्र आपण मला सांगा. तसेंच त्या मनूच्या कन्या आकूति, देवहूति आणि प्रसूति, ज्या त्यानें अनुक्रमें रुचि ऋषि, कर्दम प्रजापति आणि दक्ष प्रजापति ह्यांस दिल्या होत्या, त्यांचे ठिकाणीं त्या प्रजापतींनीं कोणती सृष्टि उत्पन्न केली, तें सविस्तर वृत्त ऐकण्याची माझी फार इच्छा आहे.

### कर्दमास भगवद्दर्शन.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, भगवान ब्रह्मदेवानें प्रजा उत्पन्न करण्याविषयीं कर्दमाला आज्ञा दिली असतां तो सरस्वती नदीच्या तिरीं गेला, व तेथें त्यानें दहा हजार वर्षेपर्यंत उग्र तप केलें. त्या तपाच्या योगानें त्याचें चित्त शुद्ध झालें. तेव्हां तो शुद्धांतःकरणानें भगवान श्रीहरीची आराधना करूं लागला. विदुरा, तो काल कृतयुगाचा होता. कर्दमाच्या दहा हजार वर्षांच्या तपश्चर्येनें भगवान संतुष्ट झाले, आणि वेदांनीं ज्याचें वर्णन केलें आहे, असें आपलें स्वरूप त्यांनीं प्रकट केलें. त्या वेळीं भगवंतांनीं कंठांत कमलमाला धारण केली होती. ते भरजरी श्वेत पितांबर नेसले होते. मस्तकावर किरीट असून कर्णांमध्यें मकराकार कुंडलें तळपत होतीं. मस्तकावरील काळे आणि कुरळे केश मुखावर आल्यामुळें तें फारच शोभायमान दिसत होतें. त्यांनीं चारही हातांत शंख, चक्र, गदा आणि कमल हीं धारण केलीं होतीं. त्यांच्या मुखावर स्मितहास्य झळकत होतें; म्हणून त्यांच्या मुखाकडे पाहतांच मनाला आनंद होई. त्यांच्या वक्षस्थलावर श्रीचिन्ह आणि कंठाचे ठिकाणीं कौस्तुभ रत्न होतें. अशी ती मूर्ति गरुडावर बसून आपल्या सन्मुख आली आहेसें पाहून, आपला मनोरथ सिद्धीस गेल्यामुळें कर्दमाला फार हर्ष झाला. त्यानें भगवंतास साष्टांग नमस्कार घातला व हात जोडून तो सद्गदित वाणीनें त्याची प्रेमपूर्वक स्तुति करूं लागला.

### कर्दमानें केलेली भगवंताची स्तुति.

कर्दम उवाच—

जुष्टं बताद्याखिलसत्त्वराशेः सांसिध्यमक्ष्णोस्तव दर्शनान्नः ।
यद्दर्शनं जन्मभिरीड्य सद्भिराशासते योगिनो रूढयोगाः ॥
ये मायया ते हतमेधसस्त्वत्पादारविंदं भवसिंधुपोतम् ।
उपासते कामलवाय तेषां रासीश कामान्निरयेऽपि ये स्युः ॥
तथा स चाहं परिवोढुकामः समानशीलां गृहमेधधेनुम् ।
उपेयिवान्मूलमशेषमूलं दुराशयः कामदुघांघ्रिपस्य ॥
प्रजापतेस्ते वचसाऽधीश तंत्या लोकः किलायं कामहतो नु बद्धः ।
अहं च लोकानुगतो वहामि बलिं च शुक्लानिमिषाय तुभ्यम् ॥
लोकांश्च लोकानुगतान्पशूंश्च हित्वा श्रितास्ते चरणातपत्रम् ।
परस्परं त्वद्गुणवादसीधुपीयूषनिर्यापितदेहधर्माः ॥
न तेऽजराक्षभ्रमिरायुरेषां त्रयोदशारं त्रिशतं षष्टिपर्व ।
षण्नेम्यनंतच्छदि यत्त्रिणाभि करालस्रोतो जगदाच्छिद्य धावत् ॥
एकः स्वयं सन्जगतः सिसृक्षया द्वितीययात्मन्नधियोगमायया ।
सृजस्यदः पासि पुनर्ग्रसिष्यसे यथोर्णनाभिर्भगवन्स्वशक्तिभिः ॥
नैतद्बताधीश पदं तवेप्सितं यन्मायया नस्तनुषे भूतसूक्ष्मम् ।
अनुग्रहायास्त्वपि यर्हि मायया लसत्तुलस्या तनुवा विलक्षितः ॥
तं त्वाऽनुभूत्योपरतक्रियार्थं स्वमाययावर्तितलोकतंत्रम् ।
नमाम्यभीक्ष्णं नमनीयपादसरोजमल्पीयसि कामवर्षम् ॥

कर्दम म्हणाला:—हे सगुणरूपधरा भगवंता! आज माझें लोकोत्तर पूर्वपुण्य फळास आलें. अनेक जन्मपर्यंत शरिरास नानाप्रकारचे कष्ट देऊन योगीजन ज्या तुझ्या शुद्धसत्त्वमय मूर्तीच्या दर्शनाची इच्छा करितात, त्या तुझ्या मूर्तीच्या दर्शनानें आज माझे नेत्र सफल झाले. ईश्वरा, हा दुस्तर संसारसागर तरून जाण्यास आणि मोक्षप्राप्ति करून घेण्यास तुझें चरणकमलसेवन हेंच साधन होय. जे लोक स्त्री, पुत्र, धन इत्यादि नश्वर गोष्टींची प्राप्ति करून घेण्याकडे ह्या साधनाचा उपयोग करितात, ते निःसंशय तुझ्या मायेनें मोहित झालेले असतात. कारण, जीवांस हे विषयादि उपभोग नरकांत सुद्धां मिळतात! परमेश्वरा, मी जरी ह्या सकाम भक्तांचा तिरस्कार करीत आहें, तरी स्वतः माझीही स्थिति तीच आहे! मी देखील रूप, गुण, स्वभाव इत्यादिकांनीं योग्य आणि धर्म, अर्थ व काम हे पुरुषार्थ साध्य करून देण्यास पात्र अशी अनुरूप स्त्री वरण्याची इच्छा करीत आहें; आणि म्हणूनच, इच्छित फळदाते जे आपण, त्या आपल्या चरणांपाशीं आलों आहें. हे परमपुरुषा, बैल जसे दावणीला बांधून टाकलेले असतात, तसे तुझ्या वेदवाणीरूप आज्ञेनें हे सर्व सकाम लोक बांधले गेले आहेत. मीही त्यांपैकींच एक आहें. कर्ममार्गाविषयीं ज्या तुझ्या आज्ञा आहेत, त्यांचें पालन करण्यास्तव आणि देव, ऋषि व पितर ह्यांच्या ऋणांतून मुक्त होण्यास्तव मी भार्येची इच्छा करीत आहें. भगवंता, तुझे जे निष्काम भक्त ते आम्हांसारख्या कर्ममार्गीयांस तुच्छ समजतात. विषयोपभोगादि तुच्छ आणि क्षणभंगुर अशा आमच्या सुखांकडे व ऐश्वर्यांकडे ते ढुंकूनही पहात नाहींत. ते तुझ्याच चरणकमलांचा आश्रय करतात; आणि संसारबंधछेदक ज्या तुझ्या कथा, त्यांचें नेहमीं श्रवण आणि कीर्तन करितात; म्हणून त्यांस क्षुधा, तृषा इत्यादि देहधर्मांचा मुळींच ताप होत नाहीं. भगवंता, तुझ्या काळचक्राचा प्रभाव फार भयंकर आहे: ब्रह्म हा कणा होय; चैत्रवैशाखादि बारा व अधिकमासासुद्धां तेरा महिने ह्या त्या काळचक्राच्या आरा होत; तीनशेंसाठ अहोरात्र हीं पेरें असून वसंतग्रीष्मादि ऋतु ह्या धावा होत. लव, क्षण, निमेष इत्यादि कालाचीं अनंत सूक्ष्मरूपें हे त्याचे करवतासारखे दांत असून तीन चातुर्मास्य हीं त्याच्या मध्यभागीं असलेलीं वलयें होत. असें हें तीव्र आणि वेगवान संवत्सरात्मक काळचक्र सारखें फिरत असून चराचर जगाचें आयुष्य क्षीण करीत आहे; पण ह्या चक्रानें तुझ्या भक्तांचें मात्र आयुष्य कमी होत नाहीं. कारण ते सदैव तुझ्याच चरणकमलांचा आश्रय करितात. हे विश्वंभरा, तूं स्वतः एकच असून सृष्टि उत्पन्न करण्याकरितां योगमायेचा स्वीकार करतोस; आणि कोळी जसा स्वतःचेंच जाळें पसरून त्यांत खेळतो व कांहीं वेळानें तें आपणच मोडून टाकितो, तद्वतच ह्या सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व लय हीं तूंच करितोस. हे ईश्वरा, तूं आम्हांस गायन, वादन, संभोग, सुरूप स्त्री, षड्रस पक्वान्नें, सुगंधि पुष्पें वगैरे मायिक विषय देतोस खरे, पण तुझ्या मनांतून कांहीं ते द्यावयाचे नसतात; आम्हांस मोक्षसुखच द्यावें असें तुला वाटतें. तथापि सांप्रतकाळीं मला विषयसुखच दे. त्या योगानें मी तीन्ही पुरुषार्थ साध्य करून घेऊन देव, ऋषि, पितर ह्यांच्या ऋणांतून मुक्त झालों, म्हणजे मग मला मोक्षास ने. कारण तुझ्या सगुण मूर्तीचें मला दर्शन झालें आहे; ह्या मूर्तीच्या दर्शनानें भोग आणि मोक्ष हे दोन्ही साध्य होतात. देवा, ह्या जगाची रहाटी चालावी म्हणून तूं सकाम भक्तांस विषयादि ऐश्वर्यें देतोस; जे तुला ज्ञानेच्छेनें शरण येतात, त्यांस ज्ञानप्राप्ति करून देऊन त्यांच्या सर्व कर्मांचा नाश करितोस, आणि त्यांस मोक्षसुख देतोस. एतावता, सकाम आणि निष्काम अशा दोन्ही प्रकारच्या भक्तांस तुझें

चरणकमळसेवन हेंच इच्छित हेतुसिद्धीचें साधन होय. भगवंता, मी तुला पुनः पुनः नमस्कार करितों.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें कर्दमाचें निष्कपट भाषण श्रवण करून गरुडारूढ भगवंतानें स्मितहास्य केलें, आणि आपल्या अमृततुल्य वाणीनें तो कर्दमास म्हणाला, " ऋषिवर्या कर्दमा, तूं ज्या कारणाकरितां उत्तम असें तपाचरण करून माझें पूजन केलेंस, तें ह्यापूर्वीच माझ्या लक्षांत आलें असून त्याच्या सिद्धतेची मीं योजनाही करून ठेविली आहे. बा कर्दमा, सामान्य जनांनीं देखील माझें पूजन केलें असतां तें निष्फळ होणार नाहीं; मग तू तर प्रत्यक्ष प्रजापति असून एकाग्र अंतःकरणानें माझें पूजन केलें आहेस; तेव्हां तें निष्फळ कसें होईल ? आतां, मीं काय योजना करून ठेविली आहे ती तुला सांगतों: ब्रह्मदेवाचा स्वायंभुव मनु म्हणून पुत्र आहे. तो सार्वभौम राजा असून सदाचरणी आहे. तो ब्रह्मावर्त देशामध्यें राहून समुद्रवलयांकित पृथ्वीचें पालन करीत आहे. त्याला देवहूति नामक एक कन्या आहे. ती रूप, वय, स्वभाव इत्यादिकांनीं तुला योग्य अशी आहे. तो राजर्षि, आपली पट्टराणी जी शतरूपा, तिजसहवर्तमान परवांचे दिवशीं येथें येईल. त्याच्या समागमें त्याची कन्याही येणार आहे. कर्दमा, आपल्याला योग्य पति मिळावा अशी तिला इच्छा आहे. मनु येथें आला असतां तो आपली उपवर झालेली कन्या तुला अर्पण करील. तिचा तूं स्वीकार कर. ती पुढें बहुत वर्षेपर्यंत तुझी उत्तम प्रकारें सेवा करील, आणि त्या योगेंकरून तुझें अंतःकरण नेहमीं प्रसन्न राहील. तिजपासून तुला नऊ कन्या होतील. त्यांचा मरीच्यादि प्रजापतींशीं विवाह होऊन त्यांपासून प्रजावृद्धि होईल. माझ्या वेदरूपी आज्ञेप्रमाणें उत्तमानुष्ठानाच्या योगें तुझें अंतःकरण शुद्ध होईल, आणि सर्व कर्मफळें मलाच अर्पण करून शेवटीं, तूं मलाच शरण येशील. प्रथम गृहस्थाश्रमामध्यें अन्नाच्छादनाच्या योगानें तूं जीवांवर दया करशील, आणि चतुर्थाश्रमामध्यें ज्ञानसंपन्न होऊन सद्बोधानें तूं त्यांस अभय देशील. ह्याप्रमाणें वर्तत असतां तुला सर्व विश्व ईश्वरमय आहे असें दिसेल. आणि शेवटीं तूं मला येऊन मिळशील. हे मुनिश्रेष्ठा, मीही तुझ्या भार्येच्या उदरीं अवतार घेईन, आणि सांख्यशास्त्ररूप तत्त्वसंहितेचा तिला उपदेश करीन. "

मैत्रेय म्हणतातः—विदुरा, ह्याप्रमाणें वर देऊन तो परमात्मा सरस्वती नदीच्या तीरीं असलेल्या बिंदुसरोवरापासून आपल्या लोकीं निघून गेला. भगवान गरुडावर बसून जेव्हां जाऊं लागला, तेव्हां त्या गरुडाच्या पंखांतून सामवेदाच्या ऋचांचेंच गायन होत होतें ! असो. भगवान गेल्यानंतर, कर्दम ऋषि बिंदुसरोवराचे काठीं आपल्या आश्रमांत मनूची वाट पहात राहिला. विदुरा, इकडे स्वायंभुव मनुही आपल्या भार्येला व कन्येला बरोबर घेऊन, सुवर्णरथारूढ होत्साता पृथ्वीपर्यटन करण्यास निघाला होता. भगवंतानें सांगितलेल्या दिवशीं शांतस्वभावी अशा त्या कर्दम ऋषीच्या आश्रमास तो येऊन पोहोंचला. येथेंच कर्दम ऋषि तपश्चर्या करीत बसले असतां त्यांस भगवद्दर्शन घडून ते भगवंतास शरण आले; त्या समयीं तेथें भगवंताच्या नेत्रांतून प्रेमाश्रुबिंदु पडले; त्यामुळें त्यास बिंदुसरोवर असें म्हणतात. हें पुण्यकारक सरोवर सरस्वती नदीनें वेष्टिलेलें आहे. त्यांतील उदक अमृतासारखें मधुर आणि आरोग्यदायक आहे; म्हणून महान महान ऋषि त्या सरोवराचे आश्रयास येऊन रहातात. कर्दम ऋषीच्या आश्रमासभोंवतीं अनेक पवित्र वृक्ष आणि वेली असून, सर्व ऋतूंमध्यें त्या फळपुष्पांनीं भरलेल्या असत. तेथें अनेक जातीचे हरिण वगैरे पवित्र पशु व भारद्वाजादि पक्षी रहात असत. तें वन पक्ष्यांच्या किलबिलाटानें, भ्रमरांच्या गुंजा-

रवानें, मयूरांच्या नृत्यानें आणि कोकिलांच्या सुस्वर गायनानें सजीवच आहे कीं काय, असा भास होई. तेथें कदंब, चंपक, अशोक, करंज, बकुल, असण, कुंद, मंदार, कुडा, आम्र इत्यादिकांच्या कोमल आणि लहान लहान रोपड्यांच्या योगानें अपूर्व शोभा आली होती. एकंदरींत तें वन सर्व जातींच्या पशुपक्ष्यांनीं अगदीं गजबजून गेल्यामुळें आनंदमय होतें. स्वायंभुव मनु आपल्या मुलीला बरोबर घेऊन त्या पुण्याश्रमांत आला, आणि त्यानें कर्दम मुनींचें दर्शन घेतलें. त्या वेळीं कर्दम ऋषि नुक्तेच अग्नीला आहुति वगैरे देऊन स्वस्थ बसले होते. दीर्घकालच्या तपश्चर्येमुळें त्यांचें शरीर फारच तेजस्वी दिसत होतें. तपश्चर्येपासून त्यांच्या शरिरास आलेला कृशपणा भगवंताच्या कृपावलोकनानें पार नाहींसा झाला होता. त्या तेजस्वी पुरुषाच्या मस्तकावरील जटाभार फारच सुशोभित दिसत होता; सर्वांगास भस्माचें चर्चन केलें असल्यामुळें तो तेजःपुंज पुरुष मळकटलेल्या महामोल रत्नाप्रमाणें दिसत होता. स्वायंभुवानें कर्दम मुनींस विनयपूर्वक नमस्कार केला. त्या वेळीं कर्दमांनीं त्यास आशीर्वाद देऊन सत्कारपूर्वक त्याची पूजा केली. भगवंतानें सांगितल्याप्रमाणें मनु प्राप्त झाला असें पाहून कर्दमांस अत्यानंद झाला, आणि ते त्याच्याशीं सलगीनें मधुर भाषण करूं लागले.

कर्दम म्हणाले:—राजा, सृष्टिपालन करण्याची भगवान महाविष्णूची शक्ति तुझ्या ठिकाणीं वास करीत असल्यामुळें, तूंही प्रत्यक्ष विष्णुच आहेस. प्रजापालक राजे विष्णूचे अंश होत. तूं पृथ्वीपर्यटन करीत अहेस, तें सुद्धां साधूंचें भय निवारण करण्याकरितां आणि दुष्टांस शासन करण्याकरितांच करीत आहेस. जगाच्या संरक्षणाकरितां चंद्र, सूर्य, इंद्र, अग्नि, वायु, यमधर्म व वरुण हीं रूपें तूंच घेतोस; तुला माझा नमस्कार असो. तूं मोठा पराक्रमी आहेस. तुझा रथ पृथ्वीवर चालला असतां पृथ्वी कंपायमान होते. तुझ्या धनुष्याचा टणत्कार ऐकून शत्रूंचीं अंतःकरणें विदीर्ण होतात. तूं आपला सेनासमूह बरोबर घेऊन पृथ्वीवर सूर्याप्रमाणें भ्रमण करितोस, म्हणूनच पृथ्वीवरील सर्व वर्णव्यवस्था सुरळीतपणें चालल्या आहेत. नाहीं तर धर्मद्वेष्टे—नास्तिक लोक तत्काल आपल्या मतांचा प्रसार करतील; आणि त्यामुळें अधर्म माजून सर्व जगाचा नाश होईल. राजा, सर्व प्रजांचें रक्षण करण्यास्तव तूं पृथ्वीवर भ्रमण करितोस हें खरें; पण येथें तुझें येणें कां झालें ? आमच्या हातून जर कांहीं तुझी सेवा होण्यासारखी असेल तर आम्हांस आज्ञा कर. आम्ही मोठ्या आनंदानें तुझ्या आज्ञेचा स्वीकार करूं.

## अध्याय बाविसावा.

—:०:—

### देवहूतीचा कर्दमाशीं विवाह.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें कर्दमाचें गौरवपर भाषण श्रवण करून स्वायंभुव मनु लाजल्यासारखा झाला. पुढें कर्दमाचें भाषण संपल्यावर त्यानें स्वतः बोलण्यास प्रारंभ केला.

स्वायंभुव मनु म्हणाला:—अहो मुनिवर्य, वेद हें ब्रह्मदेवाचें स्वरूप होय. त्या वेदरूपी शरिराचें रक्षण व्हावें व वेदमार्गाची प्रवृत्ति सुरळीत चालावी, म्हणून त्यानें आपल्या मुखापासून ब्राह्मणांची उत्पत्ति केली, हें तुम्ही जाणतच आहां. तुमच्यामध्यें तपश्चर्या, ज्ञानाभ्यास आणि योगसाधन हे गुण उत्तम असून तुम्ही विषयभोगांत कधींही लंपट होत नाहीं. आम्हां क्षत्रियांनाही ब्रह्मदेवानेंच आपल्या बाहूंपासून उत्पन्न केलें, आणि म्हणूनच ब्राह्मण हें ब्रह्मदेवाचें हृदय आणि क्षत्रिय हें त्याचें शरीर होय असें म्हणतात. ह्या दोघांचा एकाच शरिराशीं संबंध असल्यामुळें हे एकमेकांचें रक्षण करितात. ही सर्व त्या परमेश्वराचीच इच्छा होय.

तो परमेश्वर ह्या जगाचें कारण असून त्या कारणाचें कार्य जें विश्व तेंही तोच होय. इतकें सर्व करूनही तो त्यापासून अलिप्त आहे. महाराज, आपल्या दर्शनानें मी पवित्र झालों आहें. माझ्या मनाचे जे कांहीं संशय होते, ते सर्व, आपण प्रजापालक राजांचे धर्म सांगितल्यामुळें निवृत्त झाले. आपण पूर्ण ज्ञानी आहां. मीं तप किंवा योगसाधन वगैरे कांहीं केलें नसतां आपली पायधूळ माझ्या मस्तकाला लागली, हें माझें पूर्वजन्मींचें पुण्य फळाला आलें असें मी समजतों. आपण राजधर्माचा उपदेश करून मजवर मोठा अनुग्रह केला आहे. आपलें भाषण ऐकून माझ्या चित्तास अत्यंत समाधान झालें आहे. आतां माझी आपल्यापाशीं एक विनंती आहे, ती आपण मान्य करावी; म्हणजे मी एका मोठ्या काळजींतून मुक्त होईन: ही माझी कन्या माझी फार लाडकी असल्यामुळें, हिला योग्य वर कसा मिळेल ह्या विवंचनेनें मला रात्रंदिवस चैन पडत नाहीं. त्यांतूनही, हिला एके वेळीं नारद मुनींनीं तुमच्या गुणांचें वर्णन करून सांगितल्यामुळें, तुमच्याखेरीज इतर कोणासही वरणार नाहीं असा हिनें निश्चय केला आहे. हिला एक प्रियव्रत व दुसरा उत्तानपाद असे दोन भाऊ असून दोन बहिणी आहेत. आपल्याला रूपगुणसंपन्न पति असावा अशी हिला इच्छा आहे. म्हणून मीं हिला आपणांस देण्याकरितां बरोबर आणिली आहे, व माझा असा भरंवसा आहे कीं, गृहस्थाश्रमांतील कर्मे करण्याचे कामीं सर्व प्रकारें ही आपणांस योग्य सहचरी होईल. ह्याकरितां, हे ब्राह्मणश्रेष्ठा, ह्या माझ्या लाडक्या देवहूतीचा आपण अंगीकार करा. प्रयत्न न करितां भोग्य विषय चालून आले असतां सर्वसंगपरित्याग केलेल्या पुरुषानें देखील त्यांचा अनादर करूं नये, असा न्याय आहे; मग आपल्यासारख्या भोगेच्छु पुरुषांनीं त्यांचा अंगीकार न करणें म्हणजे केवळ अन्याय होईल! सहज प्राप्त झालेल्या वस्तूविषयीं जो तिरस्कार दाखवितो, आणि त्याच वस्तूसाठीं पुढें एखाद्या कृपणापाशीं याचना करितो, त्याला ती प्राप्त होत नाहीं. मग त्याला मरणप्राय दुःख होऊन त्याची दुष्कीर्ति सर्व जगभर होते. ऋषिवर्या, आपण सुज्ञ असून विवाह करण्यास अगदीं उत्सुक आहां असें मीं खातरीपूर्वक ऐकिलें आहे. म्हणून मी म्हणतों कीं, आपण ह्या माझ्या कन्येचें पाणिग्रहण करा.

कर्दम ऋषि म्हणाले:—राजा, ठीक आहे. माझी इच्छा लग्न करण्याची असून, तुझ्या कन्येची इच्छाही मलाच वरण्याची आहे, व ह्या गोष्टीस तुझेंही अनुमोदन आहे; तेव्हां आतां कांहींच हरकत राहिली नाहीं. आतां, हा विवाह म्हणजे जगांतील पहिलाच विवाह होय; ह्याकरितां, वेदांत जो विवाह सांगितला आहे, त्याप्रमाणेंच हा विवाह व्हावा. ही तुझी कन्या अत्यंत लावण्यवती आहे, अशी कीर्ति मीं पूर्वीच ऐकिली आहे. ही आपल्या राजवाड्याच्या गच्चीवर खेळत असतां हिच्या रूपाकडे पाहून विश्वावसु गंधर्व आपल्या विमानांतून खालीं पडला! अशी ही सुंदर व कुलीन स्त्री आपण होऊन वरण्यास सिद्ध असतां कोणता पुरुष तिचा अंगीकार करणार नाहीं बरें? राजा, तुझ्या इच्छेप्रमाणें मी तर हिला वरतोंच; पण माझी एक अट अशी आहे कीं, ही गरोदर होईपर्यंतच मी हिच्याबरोबर गृहस्थाश्रमांत राहीन. नंतर, भगवंतानें सांगितल्याप्रमाणें ज्ञानसंपादनाचें जें मुख्य साधन ( अहिंसा वगैरे धर्म ), त्याचें अनुष्ठान करण्याकरिता मी वनांत जाईन. सृष्टि करण्याबद्दल माझा पिता जो ब्रह्मदेव त्याची मला आज्ञा असतां मी संन्यास कसा घेईन, अशी तूं शंका घेशील, तर मी तुला असें सांगतों कीं, ऋणत्रयापासून मुक्त झाल्यावर संन्यास घ्यावा अशी विष्णूची आज्ञा आहे. देवप्रभृति प्रजापतींचा स्वामीही तोच होय. ह्या

सर्व जगाची उत्पत्ति, स्थिति व लय तोच करितो' ह्यास्तव त्याची आज्ञा मला शिरसा वंद्य आहे.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, हें कर्दमाचें भाषण ऐकून स्वायंभुव मनूला व त्याचे मुलीला अतिशय आनंद झाला. स्वायंभुव मनूनें आपल्या प्रियपत्नीचें (शतरूपेचें) अनुमोदन घेऊन त्या सर्वगुणसंपन्न मुनीला आपली प्रिय कन्या देवहूति अर्पण केली. त्यानें जांवयाला आंदण म्हणून बहुमोल अलंकार व वस्त्रें आणि संसाराचें साहित्य दिलें. विदुरा, कन्या कितीही लाडकी असली, तरी ती दुसऱ्याला म्हणून दिली पाहिजेच; ह्यास्तव तिचें तें वियोगदुःख सहन करण्यास फारच कठिण असतें. स्वायंभुव मनूच्या इच्छेप्रमाणें त्याच्या मुलीला योग्य पति मिळाला हें उत्तमच झालें; पण तिला सोडून जाण्याची जेव्हां वेळ आली, तेव्हां मात्र त्याचें अंतःकरण भडभडून आलें. त्यानें आपल्या मुलीला पोटाशीं कवटाळून धरिलें, व "माझे लाडके देवहूति, हे माझे तान्हे, आम्ही आतां तुला येथेंच सोडून जातों," असे उद्गार काढीत त्यानें आपल्या नेत्राश्रूंनीं तिचे केंस भिजविले. शेवटीं राजानें कर्दम मुनींचा निरोप घेतला, व पत्नी आणि सेवक बरोबर घेऊन तो आपल्या नगरास निघाला. वाटेंत त्याला सरस्वती नदी लागली. त्या पवित्र नदीच्या तीरावर ऋषींचे अनेक आश्रम पाहून त्याला मोठें समाधान वाटलें. ती शोभा पाहून तो पुढें गेला. आपला राजा नगरांत परत येत आहे, ही वार्ता ऐकून प्रजाजनांचीं मनें प्रफुल्लित झालीं; व ते लोक बरोबर वाद्यें वगैरे घेऊन ब्रह्मावर्त देशांतील बर्हिष्मती राजधानीच्या बाहेर त्यास सामोरे आले. यज्ञवराहानें ह्याच ठिकाणीं पूर्वी आपलें शरीर थरथर कांपविलें होतें; त्या वेळीं त्याच्या अंगाचे जे केंस खालीं पडले, त्यांजपासून कुश म्हणजे हिरव्या रंगाचे दर्भ व काश म्हणजे मोळ हे उत्पन्न झाले. ह्या दर्भांच्या योगानेंच यज्ञांत विघ्न आणणाऱ्या राक्षसांचा ऋषि नाश करितात, व विष्णूच्या संतोषाकरितां यज्ञानुष्ठान करितात. असो. आपल्याला राहण्याला पृथ्वी हें स्थान मिळवून दिलें म्हणून त्या यज्ञवराहरूपी विष्णूच्या संतोषाकरितां स्वायंभुव मनूनें कुश व काश अशा दोन्ही प्रकारचे दर्भ पृथ्वीवर पसरून येथेंच यज्ञ केले होते. महासमर्थ स्वायंभुव मनु कर्दमाच्या आश्रमांतून स्वदेशीं परत आल्यावर सामोरे आलेले आपले लोक बरोबर घेऊन तो बर्हिष्मती राजधानींत शिरला, आणि आपल्या दर्शनानें नागरिकांना आनंद देत देत राजवाड्यांत प्रवेश करिता झाला. नंतर तेथें त्यानें पत्नी आणि मुलेंबाळें ह्यांसहवर्तमान गृहसौख्याचा यथेच्छ उपभोग घेतला. तो विषयोपभोग भोगीत होता, तरी धर्म व अर्थ ह्या पुरुषार्थांच्या साधनांत त्यानें खंड पडूं दिला नाहीं. परमेश्वराकडे त्याचें पूर्ण लक्ष असे. विदुरा, मनुष्यास कोणतीही गोष्ट साध्य असली, म्हणजे मग त्याला त्या गोष्टीचें मुळींच महत्त्व वाटत नाहीं. ईश्वरस्वरूपीं रममाण असणारा जो स्वायंभुव मनु, त्याची स्थिति अशीच होती. तो स्वतः पाहिजे ते भोग निर्माण करण्यास समर्थ असल्यामुळें, त्यास विषयोपभोगांचें कांहींच महत्त्व वाटलें नाहीं; मग त्यांच्या योगानें त्यास मोह तो कसा पडणार? तो आपला काळ भगवंताच्या चिंतनांत, त्याच्या कथाश्रवणांत किंवा तत्संबंधी ग्रंथ रचण्यांत घालवीत असल्यामुळें, त्याचा लवमात्रही काळ फुकट गेला नाहीं. स्वायंभुवानें आपलें सर्व आयुष्य परमेश्वरचिंतनांत दवडून, दोनशें चौऱ्यांयशीं युगांइतका म्हणजे एकाहत्तर महायुगांइतका काल घालविला. विदुरा, सर्वदुःखहर्ता जो परमेश्वर, त्याच्या आश्रयास असलेल्या पुरुषास रोग, काळजी, दुःख, भय, उत्पात किंवा आधिभौतिक दुःखें कधींही प्राप्त व्हावयाचीं नाहीत. स्वायंभुव मनु नेहमीं

प्राणिमात्रावर दया करण्याविषयीं तत्पर असे. तो महाज्ञानी होता. एके वेळीं ऋषींनीं त्यास वर्णाश्रमधर्मासंबंधी प्रश्न विचारिले असतां, त्यानें त्यांच्या समाधानार्थ एक ग्रंथ केला. त्यांत सर्व धर्म प्रतिपादिलेले आहेत. ह्याच ग्रंथास 'मनुस्मृति' असें म्हणतात. विदुरा, ह्या आदिराजाचें अवर्णनीय असें चरित्र मीं तुला सांगितलें; आतां देवहूतीचा पुढील वृत्तांत सांगतों.

## अध्याय तेविसावा.

—:०:—

### देवहूतीचें विवाहानंतरचें वृत्त.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, आईबाप निघून गेल्यावर ती साध्वी देवहूति आपल्या पतीच्या आज्ञेंत वागून, त्याच्या मनास संतोष वाटेल अशा रीतीनें त्याची सेवा करूं लागली. ती सदोदीत दक्ष असे. पतीची आज्ञा मान्य करणें ह्यापेक्षां अधिक महत्त्व ती आपल्या प्राणांस सुद्धां देत नसे. कर्दम व देवहूति ह्यांच्या जोडण्याला शंकर व पार्वती ह्यांची उपमा दिली तर चालेल. देवहूतीनें आपल्या सेवेनें, शहाणपणानें व मधुर भाषणानें पतीचें मन सदोदीत संतुष्ट राखिलें होतें. तिच्या अंगीं कडकडीत सत्य, अंतर्बाह्य शुद्धि, औदार्य, गंभीरता, इंद्रियजय इत्यादि सद्गुणांचें पूर्ण वास्तव्य होतें. स्वैरवर्तन, कपट, वैर, लोभ, पापवासना, गर्व इत्यादि दुर्गुणांपासून ती अगदीं अलिप्त होती. ह्याप्रमाणें तिचें निर्दोष व स्तुत्य असें वर्तन अवलोकन करून कर्दम ऋषींस मोठें समाधान वाटलें. बहुत कालपर्यंत देवहूतीनें आपलें पतिशुश्रूषणाचें व्रत अबाधित चालविलें व त्या योगें ती अगदीं कृश होऊन गेली. तेव्हां कर्दम ऋषींना तिची दया आली, आणि अशा साध्वी स्त्रियेची इच्छा आपण अद्याप पूर्ण करीत नाहीं, ही गोष्ट त्यांच्या मनाला खाऊं लागली. दैवापेक्षांही आपल्या पतीला अधिक बलवान मानून जी आपली निष्कपट भावानें सेवा करिते, आणि जी अनेक व्रतें व उपासतापास करून फार कृश झाली आहे, तिला अधिक दुःख देणें हें अगदींच अप्रशस्त होय, असें वाटून तो तिला म्हणाला, "हे मनुकन्ये देवहूति, तुझ्या सेवेनें आणि अकृत्रिम प्रेमानें मी संतुष्ट झालों आहें. देह हा प्रत्येक प्राण्याला प्रिय असतो, व जो तो त्याचें संगोपन करण्याकरितां झटत असतो; असें असतां तूं हा आपला देह माझ्या शुश्रूषेमध्यें क्षीण करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहींस. तुला अनेक भोग भोगावे अशी इच्छा आहे, हें मी जाणतों. मला परमेश्वराच्या कृपेनें तपश्चर्या, समाधि, उपासना व चित्तैकाग्र्य हीं साध्य होऊन भयशोकरहित असे दिव्य भोग प्राप्त झाले आहेत. तूं माझी एकनिष्ठपणें सेवा केलीस, म्हणून तुला मी अशी दिव्यदृष्टि देतों कीं, तिच्या योगानें मला मिळालेले भोग तुला स्वतांला प्राप्त झाले आहेत असें दिसेल. हे भोग इतर लौकिक भोगांप्रमाणें कधींही दुःखपरिणामी व्हावयाचे नाहींत. सार्वभौम राजानें आपली सर्व संपत्ति जरी खर्चीं घातली, तरी, मी जे भोग मिळवून देणार आहें, त्यांची नुस्ती कल्पनाही त्याला करितां येणार नाहीं. तूं तपश्चर्या करून सिद्ध झाली आहेस, व मनोभावानें पातिव्रत्यधर्माचें उत्तम आचरण केलें आहेस, म्हणून हे अलौकिक भोग तुला मिळणार आहेत. तूं ह्यांचा खुशाल उपभोग घे."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, आपल्याला अनेक ऐश्वर्यांचा उपभोग घेण्यास मिळावा अशी देवहूतीची इच्छा होती, व ते आपल्याला कसे मिळतील, ही तिला मोठी काळजी वाटत होती; पण जेव्हां कर्दमानें तिला असें सांगितलें, तेव्हां तिला मोठा आनंद झाला. तिनें किंचित् हास्यमुख करून लज्जायुक्त दृष्टीनें आपल्या पतीकडे पाहिलें. त्या वेळीं तिचा मुखचंद्रमा फारच मनोहर

दिसत होता. ती अत्यंत नम्रपणानें आपल्या पतीस म्हणाली, " महाराज, आपण समर्थ आहां. योगमाया आपल्या स्वाधीन असल्यामुळें आपण वाटेल तें करूं शकाल. आपल्या वचनानें मला फार आनंद झाला आहे. आतां, आपण केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें माझी इच्छा पूर्ण करावी. स्त्रियांस अपत्य असणें हा फार मोठा लाभ होय. महाराज, आपण वाटेल ते भोग निर्माण करण्यास समर्थ आहां. तेव्हां कामशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें समागमोत्सवाला उपयुक्त अशीं साधनें निर्माण करावीं. आपल्या योगें माझ्या ठिकाणीं कामोद्दीपन झालें आहे, व त्यामुळें मला अत्यंत पीडा होत आहे. हें माझें शरीर कामज्वरानें अगदीं पोळून गेलें आहे; ह्यास्तव अभ्यंग, भोजन, पान वगैरे विहारसामुग्री आपण प्रथमतः उत्पन्न करावी; म्हणजे तिच्या सेवनानें माझें हें कृश झालेलें शरीर विविध विलासांचा उपभोग घेण्यास समर्थ होईल. त्याप्रमाणेंच, क्रीडा करण्यासाठीं एक उत्तम मंदिरही अवश्य आहे. "

### विमानाचें वर्णन.

मैत्रेय मुनि म्हणाले:—विदुरा, आपल्या प्रियपत्नीची आवड पुरवावयाची अशी कर्दम ऋषींची इच्छा होतीच. त्यानें योगसामर्थ्यानें तत्काल एक इच्छागमनी विमान उत्पन्न केलें. तें दिव्य विमान आंत बसणाऱ्यांच्या सर्व कामना पूर्ण करणारें असून दिसण्यांतही फार सुंदर होतें. त्या विमानाचे स्तंभ रत्नांचे असून भिंती हिऱ्यांच्या होत्या, आणि त्यास मधून मधून पद्मरागमणि जडविलेले होते; त्यामुळें ते त्याचे नेत्रच आहेत कीं काय, असें भासे. त्याचीं द्वारें हिरेजडित असून उंबरठे पोंवळ्यांचे होते. त्या विमानास इंद्रनीलमण्यांचीं शिखरें असून त्यांवर सुवर्णाचे कलश ठेविलेले होते. त्यास अतिमूल्यवान अशीं सुवर्णाचीं तोरणें बांधिलेलीं असून, अनेक प्रकारच्या चित्रविचित्र रंगांच्या छतांनीं तें सुशोभित केलेलें होतें. त्यामध्यें ठिकठिकाणीं वैदूर्यमण्यांच्या बैठका बांधलेल्या होत्या. तसेंच, जागोजाग पलंग ठेविलेले असून त्यांवर उत्तम प्रकारच्या शुभ्र अशा शय्या होत्या; शिवाय ठिकठिकाणीं उत्तम पंखे ठेविलेले असून अनेक सुगंधि पडदेही सोडिलेले होते. त्यांत शयनागार, वेषगृह, क्रीडामंदिर वगैरे अनेक निरनिराळ्या सोई केलेल्या असून मध्यभागीं एक मोठा चौक होता. नानाप्रकारचे उपभोग्य पदार्थ त्या विमानांत अगदीं ओतप्रोत भरलेले होते. त्या विमानांतच एक कोट तयार केलेला असून त्याच्या आसमंतात् एक भलें मोठें विस्तीर्ण मैदान होतें. त्या कोटाच्या बुरुजांवर नीलमणि, पुष्कराज इत्यादि रत्नांचे पारवे, हंस वगैरे जे कृत्रिम पक्षी बसविलेले होते, ते इतके हुबेहूब होते कीं, सजीव पक्ष्यांस देखील हे आपल्या जातीचेच आहेत असा भास होऊन, त्यांचे थवेचे थवे तेथें येऊन पोहोंचले; आणि त्यांनीं आपल्या शब्दांनीं तें स्थल अगदीं नादमय करून सोडिलें. असें तें अप्रतिम विमान स्वतः कर्दम ऋषींनीं उत्पन्न केलें, तरी त्याचें त्यांस स्वतांसही फार आश्चर्य वाटलें. विदुरा, असें तें गृह जरी सर्व वस्तूंनीं परिपूर्ण होतें, तथापि त्यांत दासदासी वगैरे सेवकजन न दिसल्यामुळें देवहूतीच्या मनाला फारसें समाधान वाटलें नाहीं. कर्दम मुनि अंतर्ज्ञानी असल्यामुळें त्यांनीं तिचें मनोगत तत्काल ओळखिलें, व ते तिला म्हणाले, " हा वेडे, दासीजन नाहींत म्हणून का तुला वाईट वाटतें ? ऊठ, ह्या बिंदुसरोवरांत स्नान करून ह्या विमानांत येऊन बैस; म्हणजे तुला काय पाहिजे तें मिळेल. हें विमान सर्व मनोरथ पूर्ण करणारें आहे. " असें हें पतीचें भाषण ऐकून देवहूतीनें सरोवरांत प्रवेश केला, तों तेथें तिला एक रमणीय मंदिर दिसलें. देवहूतीनें त्या मंदिरांत प्रवेश केला असतां, त्या ठिकाणीं एक हजार स्त्रिया बसल्या आहेत असें तिच्या दृष्टीस पडलें. त्या सर्व स्त्रिया

तरुण असून त्यांच्या शरीरांना कमलासारखा सुगंध येत होता. देवहूतीला पाहतांच त्या सर्व स्त्रिया उठून उभ्या राहिल्या व हात जोडून नम्रपणें म्हणाल्या, " बाईसाहेब, आम्हा आपल्या दासी आहों. आपली काय आज्ञा असेल ती सांगावी." हा सर्व प्रकार पाहून देवहूतीला आश्चर्य वाटलें. ती अगदीं स्तब्ध उभी राहिली; पण त्या स्त्रिया पडल्या चतुर ! त्यांनीं तिचें मनोगत ओळखून तीस उंचीउंची तेलें व उटणीं लावून न्हाऊं घातलें आणि बहुमोल वस्त्रें परिधान करावयास दिलीं. नंतर त्यांनीं तिला अंतर्गृहांत नेलें. तेथें भोजनाची सिद्धता होतीच. अनेक प्रकारचीं फळें, षड्रस अन्नें व पेयें तेथें होतीं, त्यांचें यथेच्छ सेवन करून देवहूति तृप्त झाली. तिनें मुखमार्जन केल्यावर त्यांनीं तिला त्रयोदशगुणी तांबूल दिला, आणि उत्तम उत्तम अलंकार धारण करावयास दिले, व तिनें आपलें रूप पहावें ह्या हेतूनें एक मोठा आरसा तिच्यापुढें धरिला. विदुरा, आधींच ती सुंदर, त्यांतून नुकतीच न्हालेली, आणि त्यांतही वस्त्राभरणांनीं अलंकृत, मग काय विचारावें ? तें प्रतिबिंब पाहून तिला फार आनंद वाटला, आणि तिला आपल्या प्रियपतीचें स्मरण झालें. तेव्हां तत्काल ती सर्व दासींसह कर्दम ऋषि होते तेथें आपोआप येऊन पोहोंचली. हें पाहून देवहूतीस फारच नवल वाटलें.

### देवहूतीचे विलास.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, सरोवरांत स्नान करण्यापूर्वी देवहूतीची जी स्थिति होती, ती आतां राहिली नाहीं. आतां ती एक अप्रतिम लावण्याची पुतळी दिसूं लागली. ज्या वेळीं ती प्रथम आपल्या पित्याबरोबर कर्दमाच्या आश्रमांत आली, त्या वेळींही ती इतकी सुंदर दिसत नव्हती. अशा त्या आपल्या पत्नीकडे पाहून कर्दमाच्या मनांत तिजविषयीं अत्यंत प्रेम उत्पन्न झालें, आणि त्यानें तिला तत्काल त्या विमानांत बसविलें. विदुरा, आकाशस्थ चंद्र रोहिणीसहवर्तमान असतां तारागणांमध्यें जसा शोभतो, तसा तो विमानस्थ कर्दम मुनिही स्त्रीसमुदायांत देवहूतीसहवर्तमान शोभूं लागला. कर्दमाचें मन कामविकारयुक्त झालें होतें, तरी तो त्याच्या अधीन झाला नव्हता. त्यानें देवहूतीसहवर्तमान मेरु पर्वताच्या अनेक गुहांमध्यें कुबेराप्रमाणें बहुत कालपर्यंत क्रीडा केली. हा मेरु पर्वत सर्व कुलपर्वतांत श्रेष्ठ होय. ह्यावर इंद्रादि अष्टलोकपालांचीं विहारस्थानें आहेत. ह्यांतील गुहांमध्यें मधुर आणि शीतल वायु वहात असल्यामुळें कामी जनांस फारच आल्हाद होतो. तसेंच, गंगा नदी पृथ्वीवर पडत असल्यामुळें तिच्या धबधब्याचा गंभीर ध्वनि त्या गुहांतून घुमत असतो. कर्दम मुनीनें आपल्या भार्येसह मोठ्या आनंदानें वैश्रंभक, सुरसन, नंदन, पुष्पभद्रक, मानस, चैत्ररथ्य ह्या देवांच्या उद्यानांमध्यें विहार केला. त्या इच्छागमनी विमानांत बसून विहार करणाऱ्या कर्दमानें देवांस देखील लाजविलें. पृथ्वीवर जेवढीं म्हणून दर्शनीय स्थलें होतीं, तेवढीं सर्व त्यानें आपल्या प्रियपत्नीस दाखविलीं, आणि तो आपल्या आश्रमीं परत आला.

### देवहूतीची संतति व तिच्या मनाचा उद्वेग.

मैत्रेय ऋषि पुढें म्हणाले:—हे कुरुकुलोत्पन्ना, देवहूति रतिसुखाविषयीं फार उत्कंठित झाली होती. आपल्याला पुष्कळ मुलें व्हावीं असें तिला वाटे; तेव्हां तिचाही हेतु पुरवावा, आणि गर्भसंभवकालपर्यंतच गृहस्थाश्रमांत राहण्याच्या आपल्या प्रतिज्ञेलाही बाध येऊं नये, म्हणून कर्दमानें नऊ शरीरें धारण केलीं आणि आपल्या पत्नीशीं शंभर वर्षेपर्यंत क्रीडा केली; परंतु त्या उभयतांस तो काल एका क्षणाप्रमाणें वाटला ! विदुरा, पतिपत्नींचें प्रेम चांगलें असलें म्हणजे त्यांपासून होणारी प्रजाही चांगलीच होते, हें कर्दम जाणून होतेच. म्हणून, देवहूतीला, ती आपलें अर्धें शरीर आहे असें मानून तिच्याशीं ते प्रेमानें असत; तरी

पण ते आत्मज्ञानी असल्यामुळें विषयासक्त मात्र झाले नव्हते; असो. पुढें देवहूतीला गर्भधारणा होऊन योग्य काल गेल्यानंतर तिला नऊ कन्या झाल्या. त्या सर्व रूपानें सुंदर असून त्यांच्या अंगाला तांबड्या कमलांप्रमाणें सुवास येत होता. देवहूतीची अद्यापि एक इच्छा राहिली होती; पण कन्यांकडे पाहतांच तिला पतीनें केलेल्या प्रतिज्ञेचें स्मरण झालें, व तिच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. पण ते तिनें तसेच आवरून धरले, आणि लज्जेनें अधोमुख होऊन हळूच पतीशीं भाषण करण्यास सुरुवात केली: देवहूति म्हणाली, "पतिराज, आपल्या चरणांपाशीं माझी एक विनंती आहे; आपण मला अभय द्यावें. मी आपल्याला शरण आहें. महाराज, विवाहसमयीं आपण जे शब्द बोललां, त्याप्रमाणें सर्व गोष्टी तर आपण सिद्धीस नेल्या. आतां ह्या मुली आपणांस योग्य असे वर स्वतः मिळवून आपआपल्या पतिगृहीं जातील हें सर्व होईल; पण, प्रिया, आपण संन्यास घेऊन वनांत गेला असतां मला जें दुःख होईल, त्याचें निरसन होण्याकरितां चार ज्ञानाच्या गोष्टी सांगणारा मला कोणी तरी आहे का? आपण समर्थ आहां; आपण जें मनांत आणाल तें होण्यासारखें आहे. आपल्यास अशक्य असें कांहींच नाहीं. ह्यास्तव, आपण आणखी कांहीं दिवस येथेंच राहून एखादा ब्रह्मवेत्ता पुत्र जन्मास आला तर फार चांगलें होईल, नाहीं बरें? इंद्रियें तृप्त करण्यासाठीं विषयोपभोग भोगण्यांत जो काल आजपर्यंत गेला, तितका पुरे झाला. आपण महाज्ञानी असतां, आपल्या समागमांत राहून केवळ अज्ञानानें मीं आजपर्यंत इंद्रियें संतुष्ट करण्यांतच काल घालविला, ही माझी मोठी चूक झाली. तरी पण सत्संगतीचें कांहीं तरी फल मला मिळालेंच पाहिजे. कारण, असा एक नियम आढळून येतो कीं, मूढावस्थेंत जरी चांगल्याचा सहवास घडला, तरी तो सुफलदायी होतोच. तेव्हां इतक्या दिवसांचा साधूचा सहवास मला संसारभयापासून मुक्त करण्यास कारण झालाच पाहिजे. महाराज, ज्या प्राण्याचें कर्म धर्माच्या उपयोगीं पडत नाहीं, वैराग्य प्राप्त होण्याला साधन होत नाहीं, किंवा भगवत्सेवेकडे लागत नाहीं, तो प्राणी जिवंत असला काय आणि मेला काय, सारखाच! महाराज, आपण मला संसारबंधांतून मुक्त करून मोक्ष प्राप्त करून देण्यास समर्थ आहां. मीं आजपर्यंतचा सर्व काल आपल्या सहवासांत घालवूनही ह्या गोष्टीचा मला विचार सुचला नाहीं, तेव्हां ईश्वराच्या मायेनें मला खास फसविलें ह्यांत शंका नाहीं!"

## अध्याय चोविसावा.

—:०:—

### कर्दममुखें देवहूतीचें सांत्वन.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, भगवान विष्णूनें सांगितलेली गोष्ट कर्दम ऋषीच्या स्मरणांत होतीच. देवहूतीनें खेदाचे उद्गार काढिलेले ऐकून तो तिला म्हणाला, "प्रिये, तुझ्यासारख्या सद्‌गुणी स्त्रीला कधींही दुःख प्राप्त होणार नाहीं. तूं स्वतांबद्दल खेद करूं नको. तुझ्या उदरीं षड्‌गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वर लवकरच अवतार घेईल. तुझें कल्याण असो. आजपर्यंत ज्याप्रमाणें तूं अनेक व्रतांचें आचरण केलेंस, त्याचप्रमाणें पुढेंही इंद्रियनिग्रह, तपश्चर्या, दानें, व्रतें व नियम ह्यांच्या योगानें ईश्वराची भक्तिपुरस्सर सेवा कर. अशा रीतीनें तूं भगवंताची आराधना केलीस, म्हणजे तो भगवान विष्णु तुझ्या उदरीं अवतार घेईल; आणि माझी कीर्ति वाढविण्यासाठीं, तुला ब्रह्मज्ञानाचा उपदेश करून तुझ्या हृदयांतील अहंकाररूपी ग्रंथि तोडून टाकील."

### कपिलावतार.

मैत्रेय मुनि सांगतातः—विदुरा, पतीच्या वचनावर देवहूतीचा पूर्ण विश्वास होता. तिनें

पतीच्या आज्ञेप्रमाणें ईश्वराची आराधना करण्यास सुरुवात केली. बराच काळ लोटल्यानंतर भगवान विष्णूंनीं कर्दम मुनीच्या वीर्याचा आश्रय करून देवहूतीच्या उदरीं अवतार घेतला. तेव्हां स्वर्गामध्यें देवांनीं मंगलवाद्यें वाजविलीं; मेघांनीं आनंददर्शक गर्जना केल्या; गंधर्व उल्हासानें सुस्वर गायन करूं लागले; अप्सरा नृत्य करूं लागल्या; देवांनीं पुष्पवृष्टि केली; व दिशा सुप्रसन्न होऊन सर्वत्र आनंद दृग्गोचर झाला. त्या वेळीं, ब्रह्मदेव आपल्याबरोबर मरीचिप्रभृति ऋषींस घेऊन सरस्वती नदीच्या तीरावर कर्दम ऋषीच्या आश्रमांत प्राप्त झाला. विदुरा, ब्रह्मदेव ज्ञानी होता. लोकांस तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्याकरितां परब्रह्मरूप भगवंतानें देवहूतीच्या उदरीं आपल्या सत्त्वगुणरूपी अंशानें अवतार घेतला आहे, हें तो जाणत होता. शिवाय, कर्दमाच्या मनांत पुढें काय कर्तव्य आहे तेंही त्याला माहीत होतें. म्हणून त्यानें कर्दमाचा मोठा गौरव केला आणि तो त्यास म्हणाला, "कर्दमा, माझ्या आज्ञेप्रमाणें तूं निष्कपट वर्तन केलेंस, हीच माझी तूं आराधनाच केलीस, असें मी समजतों. जे पित्याच्या आज्ञेचें उल्लंघन करीत नाहींत, तेच पुत्र धन्य होत. वत्सा, ह्या तुझ्या सुंदर कन्या आपल्या संततीच्या योगानें अनेक प्रकारें सृष्टीची वृद्धि करतील. आतां तूं ह्या आपल्या कन्या मरीच्यादि ऋषींस दे. देतांना इतकें मात्र कर कीं, कोणत्या मुलीचा स्वभाव, आवड वगैरे कोणत्या ऋषीच्या स्वभावाशीं, आवडीशीं वगैरे जमते तें पहा. मुने, भगवान पुराणपुरुष तुझ्या पत्नीच्या उदरीं अवतीर्ण झाला आहे; हा तुझा पुत्र प्राणिमात्राचे मनोरथ पूर्ण करणारा होय. हे मनुकन्ये देवहूति, हा कैटभारि भगवान तुला तत्त्वज्ञानाचा उपदेश करून तुझ्या अंतःकरणांतील अज्ञानग्रंथि तोडून टाकील, आणि नंतर पृथ्वीवर पर्यटन करील. हा तुझा पुत्र प्रत्यक्ष विष्णुच होय. ह्याचे केंस सुवर्णासारखे असून नेत्र कमळासारखे आहेत, व ह्याच्या चरणांवर कमलचिन्हें आहेत. हा तुझी कीर्ति फार वृद्धिंगत करील. सांख्यशास्त्रामध्यें हा प्रवीण असल्यामुळें मोठमोठे विद्वान पुरुष ह्याला पूज्य मानितील, व हा कपिल ह्या नांवानें प्रसिद्ध होईल."

## कर्दमकन्यांचे विवाह.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें कर्दमाला व देवहूतीला आश्वासन देऊन हंसवाहन ब्रह्मदेव सनत्कुमार व नारद ह्यांसहवर्तमान सत्यलोकीं निघून गेला. मरीचि, अत्रि इत्यादि ऋषींस विवाहाच्या निमित्तानें त्यानें तेथेंच ठेविलें. इकडे कर्दमानें ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणें आपल्या कन्या मरीचिप्रभृति प्रजापतींना अर्पण केल्या; त्यानें आपली कला नांवाची कन्या मरीचीला दिली; अनसूया अत्रीला दिली; श्रद्धा आंगिरा ऋषीला दिली; हविर्भू पुलस्त्याला दिली; गति पुलह ऋषीला दिली; क्रिया क्रतूला दिली; ख्याति भृगूला दिली; अरुंधती वसिष्ठाला दिली; व शांति अथर्वण ऋषीला दिली. हे विवाहसंस्कार झाल्यानंतर कर्दम मुनीनें आपल्या जांवयांना, त्यांना ज्या ज्या वस्तु प्रिय होत्या त्या त्या देऊन संतुष्ट केलें. नंतर ते ऋषि आपआपल्या पत्न्यांना घेऊन स्वगृहीं निघून गेले.

## कर्दमकृत कपिलस्तुति.

इकडे, देवाधिदेव भगवान विष्णूनें आपल्या स्त्रीच्या उदरीं अवतार घेतला आहे, हें जाणून कर्दम मुनि एकांतामध्यें आपल्या पुत्राजवळ गेला, आणि हात जोडून त्याला म्हणाला, "भगवन्, ह्या सृष्टीमध्यें संसारांत राहून, पूर्वकर्मांच्या योगानें प्राण्यांस अनेक ताप सोसावे लागतात. ते ताप दूर व्हावे म्हणून देवता प्रसन्न करून घेण्याकरितां दीर्घ कालपर्यंत श्रम करावे लागतात. कित्येक प्रसंगीं तर ह्या कामीं प्राण्यांना अनेक जन्मपर्यंत योगाचा अभ्यास करावा लागतो, तेव्हांच त्यांना समाधि लावितां येतो. अशा

रीतीनें योग परिपक्व दशेला आला म्हणजे तुझ्या चरणांचें दर्शन होतें. आम्हीं तर असें कोणतेंच कृत्य केलें नाहीं; असें असतां तूं आमचे घरीं पुत्ररूपानें उत्पन्न झालास, हा आमच्यावर तुझा मोठाच अनुग्रह होय. देवा, तूं मला पूर्वीं आशीर्वाद दिल्याप्रमाणें आपलें भाषण सत्य केलेंस. वस्तुतः तूं निराकार असून आपल्या भक्तांचे मनोरथ पूर्ण करण्याकरितां नानाप्रकारचे देह धारण करितोस. प्रकृति, पुरुष, जीव व ईश्वर ह्या तत्त्वांचें यथार्थ स्वरूप समजावें अशी ज्या ज्ञानेच्छु पुरुषांची इच्छा असेल, त्यांनीं तुझ्या चरणकमलांचें नित्य सेवन करावें. संपत्ति, वैराग्य, कीर्ति, ज्ञान, पराक्रम व शोभा हे गुण तुझ्या ठिकाणीं परिपूर्ण भरलेले आहेत. ईश्वरा, मी तुला शरण आलों आहें. हे मायाचालका, प्रकृति, पुरुष व महत्तत्त्व ह्यांना क्षोभविणारा काल, आणि सात्त्विक, राजस व तामस हे अहंकार हीं तुझींच रूपें होत. इंद्रादि रूपांनीं तूंच लोकांचें पालन करतोस. हा सर्व जगत्प्रपंच तुझ्या स्वरूपीं लीन झाला आहे. ह्या जगाची उत्पत्ति आणि नाश हीं तुझ्या मायेची क्रीडा होय. ह्याच ज्ञाता तूंच आहेस. हे कपिलरूपी ईश्वरा, मी तुला शरण आहें. देवा, तूं माझा पुत्र होऊन देव आणि पितर ह्यांच्या ऋणांतून मला मुक्त केलें आहेस. आतां संसारांतील माझ्या सर्व इच्छा तृप्त झाल्या, म्हणून मी त्या सर्वांचा त्याग करून व संन्यासमार्गानें दुःखशोकरहित होऊन तुझें चिंतन करीत पृथ्वीवर भ्रमण करितों."

**कपिलाचें कर्दमाशीं भाषण.**

भगवान म्हणाले:—कर्दमा, मीं जो हा अवतार घेतला आहे, तो ज्ञानाचा उपदेश करण्याकरितांच घेतला आहे. म्हणून, तूं घरीं राहिलास तरी तुला मुक्ति दुर्लभ नाहीं. त्यांतून, संन्यास घेऊन निघून जावयाची तुझी इच्छाच असेल, तर तसें कर, पण मजकडे लक्ष असूं दे. कर्दमा, वैदिक वाक्यांत किंवा लौकिक भाषणांत मी जें जें म्हणतों, तें तें सत्य होतें. मीं तुला पूर्वीं सांगितल्याप्रमाणें हा अवतार घेतला आहे. ह्या संसारांत पडण्यास प्राण्यांना कारण काय तो लिंगदेह. त्यापासून सुटण्याची ज्यांना इच्छा असते, त्यांना, प्रकृत्यादि तत्त्वांहून आत्मा निराळा आहे हें ज्ञान होणें अवश्य होय. म्हणून त्या ज्ञानाचा मार्ग स्पष्ट करावा ह्याकरितांच मीं ह्या लोकांत हा अवतार घेतला आहे. कर्दमा, हा सूक्ष्ममार्ग पूर्वीं प्रवृत्त होताच; पण कालगतीनें तो हल्लीं नष्ट झाला आहे. त्याचें पुनरुज्जीवन मी आतां करणार आहें. तुझी इच्छा आहे, तर तूं आतां संन्यास घेऊन खुशाल जा. तूं आपलीं स्वतांचीं सर्व कर्मे मला अर्पण केलींस, म्हणजे मृत्यूला जिंकणें कांहीं तुला कठिण नाहीं. म्हणून, अज्ञानमूलक जो हा संसार, त्याला सोडून तूं मोक्षप्राप्तीकरितां माझी भक्ति कर. भक्तियोग पूर्ण झाला असतां तूं स्वस्वरूपींच माझें रूप पाहूं लागशील व नंतर मुक्त होशील. ज्या ज्ञानाच्या योगानें सर्व कर्मांचा क्षय होतो, त्या अध्यात्मज्ञानाचा उपदेश मी आपल्या मातेला करीन, म्हणजे तीही त्या ज्ञानाच्या योगानें हा भवसागर तरून जाईल.

**कर्दमाला मोक्षप्राप्ति.**

विदुरा, ह्याप्रमाणें कपिलरूपी भगवंताचें भाषण ऐकून कर्दमाला आनंद झाला. त्यानें कपिलाला एक प्रदक्षिणा घातली, आणि त्याला नमस्कार करून तो वनांत निघून गेला. त्यानें सर्वसंगपरित्याग केला, व मननशील ऋषींना योग्य अशा अहिंसालक्षणवृत्तीचा स्वीकार करून तो सर्वत्र भ्रमण करूं लागला. त्यानें आपलें अंतःकरण ब्रह्मस्वरूपीं लाविलें होतें. ह्या त्याच्या निश्चल भक्तीनें त्याला ब्रह्मरूपाचें प्रत्यक्ष ज्ञान झालें. हे कुरुकुलश्रेष्ठा विदुरा, कार्यकारणाहून निराळें असें जें ब्रह्म, त्या ब्रह्माच्या ठिकाणीं गुण मुळींच नाहींत. कर्दमानें अहंकार, ममत्व आणि

वैर हीं सर्व सोडून दिलीं. सर्व ठिकाणीं परमेश्वर आहे असें तो पहात होता. क्षुधा, तृषा, शोक, मोह, जरा आणि मृत्यु ह्या त्याच्या सहा लहरी शांत झाल्या होत्या. त्यानें ईश्वराची अखंड भक्ति केल्यामुळें त्याचे सर्व बंध तुटून गेले, व भगवद्भक्तांना मिळणारी, उत्तम गति त्याला प्राप्त झाली.

## अध्याय पंचविसावा.

—:०:—

### कपिलाचा देवहूतीला उपदेश.

शौनक म्हणाले:—सूता, प्रकृति, पुरुष इत्यादि तत्त्वांचा निर्देश करणारा सांख्यशास्त्रप्रवर्तक जो भगवान विष्णु, त्यानें, स्वत: जन्मरहित असूनही अज्ञजनांस आत्मतत्त्वज्ञान प्राप्त करून देण्याकरितां हा कपिल अवतार घेतला. ह्या महामुनींचें चरित्र श्रवण करण्याची आमची फार इच्छा आहे. परमेश्वराचीं अद्भुत चरित्रें आम्ही वारंवार ऐकतों, तथापि आमच्या कर्णांची मुळींच तृप्ति होत नाहीं. म्हणून, सूता, तें चरित्र तूं आम्हांला निवेदन कर.

सूत म्हणतात:—शौनका, आपण मला जो प्रश्न विचारिला, तोच प्रश्न पूर्वीं विदुरानें मैत्रेय ऋषींस विचारिला होता. मैत्रेयांवर भगवान वेदव्यासांची फार प्रीति असून, स्वत: मैत्रेय मुनिही मोठे ब्रह्मनिष्ठ होते. तेव्हां त्यांनीं जें चरित्र विदुरास कथन केलें, तेंच मी तुम्हांस निवेदन करितों.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, पिता कर्दम ऋषि वनांत निघून गेला असतां, भगवान कपिल मुनि आपल्या मातेचें समाधान करण्यासाठीं बिंदुसरोवराच्या तीरीं तिजजवळच राहिले. देवहूतीला ब्रह्मदेवाच्या वचनाचें स्मरण होतें, म्हणून ती एके दिवशीं आपल्या पुत्रास म्हणाली, "कपिला, तुझें स्वरूप मला समजलें आहे. तूं सर्व जगाला व्यापून राहणारा परमेश्वर आहेस. हे जगव्यापका प्रभो, मी ह्या अनिवार विषयांच्या अभिलाषानें गाढ अंधकारांत पडलें असतां, माझ्या जन्माचा शेवट होण्याच्या वेळीं तूं मला प्राप्त झालास. सर्व प्राण्यांचें आदिकरण तूंच आहेस. अज्ञानानें अंध झालेल्या लोकांस ज्ञानदृष्टि तूंच देतोस. देहादिकांच्या ठिकाणीं मीपणाचा जो अभिमान असतो, तो तुझ्याच मायेचा प्रभाव होय. हा माझा मायामोह तूं दूर करून टाक. प्रकृतिपुरुषांचें यथार्थ ज्ञान व्हावें म्हणून मी तुला शरण आलें आहें. हे संसारवृक्षछेदका परमेश्वरा, मी तुला नमस्कार करितें." विदुरा, असें हें मातेचें भाषण ऐकून कपिल महामुनींस मोठा आनंद झाला, आणि त्यांनीं तिला ज्ञानोपदेश करण्यास आरंभ केला.

कपिल म्हणतात:—माते, मनुष्यांस मोक्षप्राप्तीचा उपाय म्हटला म्हणजे अध्यात्मयोग होय. कारण, तो योग प्राप्त झाला असतां संसारदु:खांची व विषयसुखांची निवृत्ति होते. माते, हा योग ऐकण्याची इच्छा पूर्वीं ऋषींस झाली असतां त्यांस तो मीं सांगितला असून तोच आतां तुलाही सांगतों: ह्या आत्म्याला बंध किंवा मोक्ष प्राप्त होण्याला कारण अंत:करण होय. तें विषयांवर आसक्त झालें तर बंधाला कारण होतें, आणि ईश्वराच्या ठिकाणीं रत झालें तर मुक्तीला कारण होतें. अहंकार आणि ममता ह्या दोन प्रकारच्या अभिमानांपासून उत्पन्न झालेले काम, क्रोध, लोभ इत्यादि विकार नष्ट होऊन जेव्हां तें अंत:करण शुद्ध होतें, तेव्हां तें सुखदु:खरहित होऊन शांत रहातें. अशी अंत:करणाची स्थिति झाली, म्हणजे मग त्यांत भक्ति, ज्ञान, वैराग्य हीं उत्पन्न होतात. नंतर तो पुरुष आपणा स्वत:स प्रकृतीहून पलीकडचा, भेदरहित, स्वयंप्रकाश, अतिसूक्ष्म, अखंडित व उदासीन असें पाहतो. योगाभ्यास करणाऱ्या पुरुषांस ब्रह्मप्राप्तीचा सुगम मार्ग म्हटला म्हणजे निष्कामभक्ति हा होय. विषयांवर आसक्ति ठेवणें हें आत्मबंधनास कारण आहे, म्हणून सत्पुरुषांचा सहवास करावा. जो

पुरुष सत्पुरुषांची संगत धरितो, त्याला मोक्षद्वार उघडेंच आहे म्हणून समजावें. सत्पुरुष अत्यंत दयाळू आणि सहनशील असतात. त्यांचा स्वभाव शांत असतो. ते सर्वांशीं मित्रभावानें वागतात. शास्त्रानुसार वर्तन करण्यांत ते अगदीं दक्ष असतात. सुशीलता हेंच त्यांचें भूषण होय. ते अनन्यभावानें परमेश्वराची भक्ति करून सर्व कर्में मलाच अर्पण करितात. ते माझ्याकरितां आप्तस्वकीयांचा त्याग करण्यास मुळींच मागेंपुढें पहात नाहींत. परमेश्वराच्या कथाश्रवणाकडे त्यांचें अंतःकरण सतत लागल्यामुळें त्यांस कोणत्याही प्रकारचा ताप होत नाहीं; त्यांच्या संगतीला राहणाऱ्या मनुष्याचे सर्व दोष नाहींतसे होतात. म्हणून तूं सत्समागमाची इच्छा ठेव. त्या साधूंच्या समागमानेंच मनुष्यास ईश्वराच्या पराक्रमांचें यथार्थ ज्ञान होतें, भगवंताच्या कथा श्रवण करावयास मिळतात, आणि त्या योगानें मनुष्याचें अज्ञान नष्ट होतें. अज्ञानाची निवृत्ति म्हणजेच मोक्ष होय, आणि परमेश्वरप्राप्तीचा मार्ग तरी तोच आहे. ईशकथा श्रवण करण्यानें प्रथमतः मनुष्याला ईश्वराविषयीं आस्तिक्यबुद्धि उत्पन्न होते; नंतर लवकरच तो भगवत्पदीं प्रेम करूं लागतो; आणि अखेरीस त्याच्या ठिकाणीं दृढ भक्ति उत्पन्न होते. नंतर, ईश्वरानें केलेल्या सृष्टि वगैरे लीलांचा तो विचार करूं लागतो. त्या विचाराच्या योगानें, त्याला ह्या लोकांत दिसणाऱ्या उपभोगांचा व स्वर्गादि लोकीं असलेल्या नश्वर सुखांचा तिरस्कार उत्पन्न होतो. अशा रीतीनें त्याला वैराग्य प्राप्त झालें असतां, भक्तिप्रधान योगमार्गानें इंद्रियांचा निग्रह करून व अंतःकरण स्वाधीन ठेवून तो आत्मसाधनाच्या तयारीस लागतो. ह्याप्रमाणें मायेच्या गुणांपासून उत्पन्न झालेले भोग सोडून देऊन अष्टांगयोगानें तो आपल्या देहांतच सर्वांतर्यामी परमेश्वराची प्राप्ति करून घेतो.

देवहूति म्हणाली:—कपिला, ज्या भक्तीच्या योगानें मोक्षात्मक अशा तुझ्या स्वरूपाला मी तत्काल पावेन, ती भक्ति कोणती, तें तूं मला सांग. मात्र ती भक्ति मला करितां यावी. हे मोक्षस्वरूपा कपिला, भगवंताची प्राप्ति करून देणारा जो योग तूं सांगितलास, तो कसा करावा, व त्याचीं अंगें किती आहेत, हें मज मंदबुद्धि स्त्रीला समजेल अशा रीतीनें सांग.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें मातेचें भाषण ऐकून, ज्याच्यामध्यें प्रकृत्यादि तत्त्वांचें निरूपण आहे, तें सांख्यशास्त्र कपिल महामुनींनीं तिला निवेदन केलें.

कपिल म्हणाले:—माते, शब्दस्पर्शादि विषयांचें ज्यांच्या योगानें ज्ञान होतें, तीं इंद्रियें होत. ह्यांपासून विषयांचा अनुभव येतो हें खरें, पण त्यांचें मुख्य कर्तव्य म्हटलें म्हणजे वेदांत सांगितलेल्या कर्मांचें अनुष्ठान करणें हें होय. त्या कर्मांच्या आचरणानें मनुष्याचें अंतःकरण शुद्धसत्त्वगुणी होतें. असें झालें म्हणजे यत्नावांचून त्या पुरुषाचीं इंद्रियें ईश्वराच्या ठिकाणीं निष्कामवृत्ति होतात; हीच भगवद्भक्ति होय. ही अणिमामहिमादि सिद्धींपेक्षांही अधिक महत्त्वाची आहे. ईश्वराविषयीं ज्याची अशी निष्कामभक्ति जडली, त्यास मोक्ष सहज प्राप्त होतो. प्राण्यांनीं भक्षिलेलें अन्न जसें जठराग्नि नाहींसें करून टाकितो, तशी ती निष्कामभक्ति लिंगदेहाचा नाश करून टाकिते. लिंगदेहाचा नाश होणें हाच मोक्ष होय. माते, मुक्तीपेक्षांही भक्ति कशी श्रेष्ठ आहे तें तुला सांगतों. कित्तीएक भक्त सायुज्यमुक्तीची इच्छा न धरितां आपलीं सर्व कर्में ईश्वरार्पण करून ईश्वराच्या चरणसेवेंतच निमग्न असतात, आणि एकमेकांत ईश्वराच्या लीलांचें वर्णन करीत बसतात. ते सत्पुरुष परमेश्वराच्या दिव्य स्वरूपाचें नित्य दर्शन घेतात व त्याच्याशीं प्रेमळ भाषणें करितात. ते मोक्षाची इच्छा करीत नाहींत, तरी

त्यांस मोक्षप्राप्ति होतेच. अणिमामहिमादि सिद्धि अशा भक्तांस सहज प्राप्त झालेल्या असतात; पण ते निरिच्छ भक्त त्यांच्या उपभोगाची इच्छा देखील करीत नाहींत; इतकेंच नव्हे, तर वैकुंठलोकांतील जीं अत्युत्तम ऐश्वर्यें, त्यांस देखील ते तुच्छ मानितात. ईश्वराच्या चरणसेवेवांचून त्यांचीं अंतःकरणें दुसऱ्या कोठेंही रमत नाहींत. माते, हा भक्तियोग तुला असाध्य नाहीं. परमेश्वराच्या भक्तांचा कधींही नाश होत नाहीं. कारण त्यांचा प्रिय, आत्मा, पुत्र, मित्र, गुरु आणि उपास्य देव सर्व तोच असतो. कालचक्र सर्वांचा ग्रास करितें, पण ईश्वराच्या भक्तांना त्यापासून अपाय घडत नाहीं. जे इहपरलोकांतील सुखांचा त्याग करून अनन्यभक्तीच्या योगानें ईश्वराचें भजन करितात, त्यांस तो जन्ममृत्युरूप संसारांतून पार पाडितो. परमात्मस्वरूपीं कोणतेंही भय नाहीं. वायु, सूर्य, इंद्र, अग्नि, मृत्यु हे त्या परमेश्वराच्या भयानेंच आपापलीं कामें करितात. म्हणून आत्महित साधणारे योगी पुरुष त्या परमेश्वरालाच शरण जातात. ह्या जगांत मनुष्यानें सद्भावपूर्वक ईश्वराची भक्ति करणें, हाच त्याच्या कल्याणाचा उत्तम मार्ग होय.

## अध्याय सव्विसावा.

—:०:—

### तत्त्वांचीं निरनिराळीं लक्षणें.

भगवान कपिल म्हणाले:—माते, इतका वेळ मीं तुला भक्तियोग सांगितला. आतां तत्त्वांचीं निरनिराळीं लक्षणें सांगतों. त्या लक्षणांचें ज्ञान झालें असतां पुरुष मायेच्या गुणांपासून मुक्त होतो. अहंकाररूप हृदयग्रंथीचा छेद करणारें जें आत्मदर्शनरूप ज्ञान, तेंच मोक्षप्राप्तीस कारण आहे; पण आत्मतत्त्वाचें यथार्थ ज्ञान एकंदर तत्त्वांच्या लक्षणांनींच प्राप्त होतें, म्हणून तीं लक्षणें मी तुला क्रमानें सांगतों. माते, हें विश्व ज्याच्या योगानें व्यक्त झालें आहे, तो आत्माच पुरुष होय. तो स्वयंप्रकाश, अंतर्ज्ञानरूप, प्रकृतीहून पर, सर्वव्यापक, निर्गुण आणि अनादि असा आहे. त्याच व्यापक पुरुषानें, विष्णूची त्रिगुणात्मक शक्ति जी प्रकृति, ती लीलेनें जवळ आली असतां तिचा सहज अंगीकार केला. ह्या पुरुषाचे दोन भेद आहेत: एक जीव व दुसरा ईश्वर. पुरुषाप्रमाणें प्रकृतीचेही दोन भेद आहेत: एक अविद्या व दुसरी माया. प्राक्तनकर्माचा लय झाला म्हणजे जीव हा ईश्वरांत मिळून जातो; परंतु प्राक्तनकर्म अवशिष्ट आहे तोंपर्यंत तो अविद्येचें सत्य स्वरूप ओळखीत नाहीं, व त्यामुळें तो तिला भुलून जाऊन संसारचक्रांत सांपडतो. ह्यास्तव अविद्या म्हणजे ज्ञानाचें आच्छादन करणारा जीवाचा उपाधि होय. ईश्वर हा जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करणारा आहे. सत्व, रज व तम ह्या तीन गुणांच्या योगानें अनेक प्रकारची त्रिगुणात्मक सृष्टि उत्पन्न करणारी जी माया, ती त्या ईश्वराची शक्ति होय. ही माया सर्वतोपरी त्या ईश्वराच्या स्वाधीन असते.

जीव हा वस्तुतः अकर्ता, सर्वसाक्षी, नित्य आणि सुखस्वरूपी असून, अविद्येमुळेंच कर्मबद्ध होऊन परतंत्र होतो; आणि सत्व, रज व तम ह्या गुणांनीं घडून येणाऱ्या कार्यांचा कर्ता मीच असा त्यास अहंकार वाटतो. कार्यत्व, कारणत्व, कर्तृत्व आणि भोक्तृत्व हे सर्व धर्म जरी अहंकारामुळें उत्पन्न होतात, तरी त्यांपैकीं कार्यत्व, कारणत्व, आणि कर्तृत्व हे तीन विकार केवळ अहंकारावरच म्हणजे जड प्रकृतीवरच अनुभवास येतात; आणि भोक्तृत्व हा धर्म केवळ जीवावरच म्हणजे संसारी पुरुषावरच अनुभवास येतो.

देवहूति म्हणाली:—संसारी पुरुष ( जीव ) आणि त्याला उपाधिभूत जी प्रकृति ( अविद्या ) ह्यांचीं लक्षणें मला समजलीं. आतां, स्थूल आणि सूक्ष्म कार्यें हीं ज्यांचीं स्वरूपें आहेत, त्या, जगास

कारणीभूत अशा प्रकृति ( माया ) आणि पुरुष ह्या दोन्ही तत्त्वांचीं लक्षणें मला सांग.

कपिल म्हणाले:—माते, प्रकृति तत्त्वांत कोणतेही विशेष धर्म नाहींत; पण तें विशेष धर्मांचा आधार होय. आकाशामध्यें घटपटादि कोणतेही पदार्थ नाहींत, पण घटपटादि पदार्थांचा तें आधार आहे; तद्वत् प्रकृतीविषयीं समजावें. प्रकृति ही त्रिगुणात्मक आहे. ती इंद्रियांना समजत नाहीं; कार्य व कारण हीं तिचीं रूपें आहेत; व ती कधींही नष्ट होत नाहीं. ह्या प्रकृतीला प्रधान असेंही म्हणतात. पंचमहाभूतें, पंचसूक्ष्मभूतें, अंतःकरणचतुष्टय, आणि दहा इंद्रियें ह्या चोवीस तत्त्वांच्या समुदायाला 'प्रधानकार्यरूपी ब्रह्म' अशी संज्ञा देतात. पृथ्वी, अप्, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें होत. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हीं सूक्ष्मभूतें होत. कर्ण, त्वचा, दृष्टि, जिव्हा, नासिका, वाणी, हात, पाय, शिश्न आणि गुद हीं दहा इंद्रियें होत. मन, बुद्धि, अहंकार आणि चित्त हें अंतःकरणचतुष्टय असून संकल्प, निश्चय, अभिमान आणि चिंता ह्या त्यांच्या निरनिराळ्या वृत्ति होत. ह्याशिवाय काल हें एक पंचविसावें तत्त्व आहे, असें कोणी मानितात. तो काल प्रकृतीचा अवस्थाविशेष आहे. कित्येक ईश्वराच्या पराक्रमालाही काल असें म्हणतात. ह्या कालाचे दोन भेद आहेत: एक सृष्टि करणारा व दुसरा सृष्टीचा संहार करणारा. ज्यापासून प्रकृतिरूप उपाधीचा स्वीकार करणाऱ्या व देहावर मी असा अभिमान ठेवून मूढ होऊन राहणाऱ्या कर्त्या जीवाला भय प्राप्त होतें, तो संहार करणारा काल होय; व ज्यापासून, नामरूपादि विभागरहित अशी त्रिगुणात्मक समतारूप जी प्रकृति तिच्यामध्यें चलनवलनादिक चेष्टा होतात, तो सृष्टि करणारा काल होय. ह्याप्रमाणें तो भगवान आपल्या मायेच्या योगानें सर्व प्राण्यांच्या अंतर्यामीरूपानें आंत व कालरूपानें बाहेर व्यापून राहिला आहे. एकंदरींत, जीव आणि ईश्वर हे एकच आहेत असें मानिलें, तर प्रकृतीचे चोवीस भेद आणि एक पुरुष मिळून पंचवीस तत्त्वें होतात; आणि हे दोन निरनिराळे आहेत असें धरिलें, तर तीं सव्वीस होतील. जीवाला पूर्वकर्माचें फल मिळण्याची वेळ आली, तेव्हां प्रकृतीच्या गुणांमध्यें क्षोभ उत्पन्न झाला. त्या कालीं सर्वनियंत्या पुरुषानें ( ईश्वरानें ), स्वतांचें प्रकट होण्याचें स्थान जी प्रकृति, तिच्या ठिकाणीं आपली चैतन्यशक्ति स्थापन केली. तेव्हां तिच्यापासून महत्तत्त्व उत्पन्न झालें. हें महत्तत्त्व जगाचा पहिला अंकुर होय. ह्यापासून जग उत्पन्न झालें, तरी ह्या महत्तत्त्वाचें रूपांतर किंवा नाश होत नाहीं;—हें जसेंचें तसेंच राहतें. ह्या तत्त्वामध्यें अहंकारादि विश्व सूक्ष्म रूपानें भरलेलें होतें. तें विश्व प्रकट करण्याची वेळ आली, तेव्हां महत्तत्त्वानें आपल्या तेजाच्या योगानें प्रलयकाळच्या तीव्र अंधकाराला गिळून टाकिलें. माते, आतां कथानुरोधानें प्राप्त झालेली

### चतुर्व्यूहोपासना

तुला सांगतों: सर्व वेदांमध्यें प्रसिद्ध असलेलें, निर्मल, रागद्वेषादिरहित असें जें भगवत्प्राप्तीचें स्थान, व ज्याला वासुदेव नामक चित्त असें म्हणतात, तेंच महत्तत्त्व होय. त्याला अधिभूतरूपानें महत्तत्त्व अशी संज्ञा आहे, अध्यात्मरूपानें चित्त ही संज्ञा आहे, व उपास्यरूपानें वासुदेव ही संज्ञा आहे. त्या चित्ताचा अधिष्ठाता क्षेत्रज्ञ होय. हा चतुर्व्यूहोपासनेंतील पहिला व्यूह जाणावा. पृथ्वीचा संपर्क होण्यापूर्वी व फेस किंवा लाटा वगैरे उत्पन्न होण्यापूर्वी जसें उदक स्वच्छ, शांत व मधुर असतें, आणि नंतर भूमि, वायु वगैरेंच्या संबंधानें जसें तें विकृत होतें, तशी चित्ताची स्थिति आहे: वृत्ति उत्पन्न होण्यापूर्वी चित्त स्वच्छ ( भगवंताचें बिंब ग्रहण करण्यास योग्य ), निर्विकार व शांत असें असतें, आणि वृत्ति उत्पन्न झाल्यावर काम-

क्रोधादिकांनीं विकारयुक्त होतें. भगवंताच्या चिच्छक्तीपासून उत्पन्न झालेलें महत्तत्त्व कालगतीनें विकार पावूं लागलें; तेव्हां त्यापासून, ज्यांत सर्व कर्मे करण्याची शक्ति आहे असा सात्त्विक, राजस व तामस ह्या तीन प्रकारचा अहंकार उत्पन्न झाला. ह्यांत सात्त्विकापासून मन, राजसापासून इंद्रियें आणि तामसापासून पंचमहाभूतें उत्पन्न झालीं. ह्या अहंकारालाच प्रत्यक्ष सहस्रमुखी अनंत, भूतें, इंद्रियें, आणि मन ह्या स्वरूपाची देवता, आणि संकर्षण नामक पुरुष म्हणतात. हा चतुर्व्यूहोपासनेंतील दुसरा व्यूह जाणावा. ह्यांत ह्याला अधिभूतरूपानें भूतें, इंद्रियें व मन ह्यांचा समुदाय ही संज्ञा, अध्यात्मरूपानें अहंकार ही संज्ञा, व उपास्यरूपानें संकर्षण ही संज्ञा असून ह्याचा अधिष्ठाता रुद्र होय. देवतारूपानें कर्तृत्व, इंद्रियरूपानें करणत्व व भूतांच्या रूपानें कार्यत्व हीं, किंवा सात्त्विक, राजस आणि तामस ह्या त्रिगुणांप्रमाणें शांति, क्रूरता व मूर्खपणा हीं त्या अहंकाराचीं लक्षणें होत. सात्त्विक अहंकारांत विकार उत्पन्न होऊन त्यापासून संकल्पविकल्पात्मक मन उत्पन्न झालें; व त्याच्या संकल्पविकल्पांपासून नानाविध वासना उत्पन्न होतात. ह्या मनालाच अनिरुद्ध नामेंकरून देव व सर्व इंद्रियांचा अधिपति म्हणतात. ह्याचा वर्ण शरदतूंतील निळ्या कमलासारखा आहे. योगी स्वस्थपणें ह्याची आराधना करून ह्यास वश करून घेतात. चतुर्व्यूहोपासनेंतील हा तिसरा व्यूह होय. एथें ह्याला अधिभूतरूपानें व अध्यात्मरूपानें मन ही संज्ञा, आणि उपास्यदेवतारूपानें अनिरुद्ध ही संज्ञा असून ह्याचा अधिष्ठाता चंद्र आहे. हे महापतिव्रते, राजस अहंकार विकार पावला, तेव्हां त्यापासून बुद्धितत्त्व उत्पन्न झालें. वृत्तींच्या भेदानें ह्या तत्त्वाचीं निरनिराळीं लक्षणें झालीं आहेत. तीं—पदार्थांचें स्वरूप समजण्याचें विशिष्ट ज्ञान, विषय मिळवून देण्याचा इंद्रियांवर अनुग्रह करणें संशय, विपरीतज्ञान, निश्चय, स्मरण आणि निद्रा हीं होत. चतुर्व्यूहोपासनेंतील हा चौथा व्यूह जाणावा. ह्यांत ह्याला अधिभूत व अध्यात्म ह्या रूपांनीं बुद्धि ही संज्ञा व उपास्यरूपानें प्रद्युम्न ही संज्ञा असून ह्याचा अधिष्ठाता ब्रह्मा होय. पांच कर्मेंद्रियें व पांच ज्ञानेंद्रियें हीं राजस अहंकारापासून उत्पन्न झालीं. कारण, कर्म ही शक्ति प्राणाची आहे व तो प्राण राजस अहंकाराचें कार्य आहे, म्हणून कर्म करणारीं इंद्रियें हें राजस अहंकाराचेंच कार्य होय. तशीच ज्ञान ही शक्ति बुद्धीची आहे, व ती बुद्धि राजस अहंकाराचें कार्य असल्यामुळें ज्ञानेंद्रियेंही राजस अहंकाराचेंच कार्य होय. भगवंताच्या चिच्छक्तीनें प्रेरित झालेला तामस अहंकार विकार पावूं लागला असतां त्यापासून शब्द हें सूक्ष्मभूत उत्पन्न झालें. त्या शब्दापासून आकाश हें महाभूत झालें. शब्द विषयाचें ग्रहण करणारें श्रोत्रेंद्रिय होय. अर्थाचा आधार असणें, पाहणाराला बोधक चिन्ह होणें, व आकाशाच्या सूक्ष्मरूपानें असणें हें शब्दाचें लक्षण असें विद्वानांचें मत आहे. तसेंच, प्राणिमात्रास जागा देणें, आंत व बाहेर व्यवहार करण्यास स्थान असणें, व स्नायु इत्यादि छिद्ररूपानें प्राण, इंद्रियें आणि मन ह्यांस आधार असणें हीं आकाशाचीं कार्यरूप लक्षणें होत. पुढें कालगतीनें तें शब्दगुणयुक्त आकाश विकार पावूं लागलें असतां, त्यापासून स्पर्श हें सूक्ष्मभूत उत्पन्न झालें. त्या स्पर्शापासून वायु हें महाभूत उत्पन्न झालें. स्पर्श विषयाचें ग्रहण करणारें त्वगिंद्रिय होय. मृदुत्व, काठिन्य, शीत, उष्णता आणि वायूच्या सूक्ष्मरूपानें असणें हीं स्पर्शाचीं लक्षणें होत. वृक्षाच्या फांद्या वगैरे हालविणें, गवत वगैरे एकत्र जमविणें, सर्वत्र गति असणें, गंधज्ञान प्राप्त करून देणें, शीतोष्णांचा त्वचेशीं संयोग करणें, व इंद्रियांस त्यांचें कार्य करण्याची शक्ति देणें हीं वायूचीं कार्यरूप लक्षणें होत. कालगतीनें प्रेरण,

दिल्यामुळें त्या वायूंत विकार उत्पन्न होऊन त्यापासून रूप हें सूक्ष्मभूत उत्पन्न झालें. रूपापासून तेज हें महाभूत उत्पन्न झालें. रूपाचें ग्रहण करणारें नेत्रेंद्रिय होय. माते, पदार्थमात्राला आकार प्राप्त करून देणें, पदार्थांच्या आकारानें प्रतीतीस येणें, पदार्थांच्या रचनेप्रमाणें रचना असणें, आणि तेजाचा विशेष गुण होऊन राहणें हीं रूपाचीं लक्षणें होत. प्रकाश करणें, पचविणें, थंडी नाहींशी करणें, क्षुधा व तृषा उत्पन्न करून त्यांच्या निवृत्तीकरितां खाणें व पिणें, आणि पदार्थांस वाळविणें हीं तेजाचीं कार्यलक्षणें होत. पुढें रूपगुणात्मक तेजांत विकार उत्पन्न होऊन त्यापासून रस हें सूक्ष्मभूत उत्पन्न झालें, व त्यापासून उदक हें महाभूत झालें. रसाचें ग्रहण करणारें इंद्रिय जिव्हा होय. रसाचें मूळ स्वरूप मधुर असून संसर्गी द्रव्यांच्या योगानें खारट, तिखट, कडवट, आंबट इत्यादि अनेक प्रकारचे भेद पावतें. भिजविणें, मृत्तिकादिकांचे पिंड करणें, तृप्ति देणें, जगविणें, तृषा भागविणें, पदार्थाला मृदुता आणणें, ताप दूर करणें, व कूपादिकांमधून बाहेर काढिलें तरी पुनः उत्पन्न होणें हीं उदकाचीं कार्यभूत लक्षणें होत. नंतर त्या रसगुणात्मक उदकांत विकार उत्पन्न होऊन त्यापासून गंध हें सूक्ष्मभूत उत्पन्न झालें, व त्यापासून पृथ्वी हें महाभूत उत्पन्न झालें. गंधाचें ग्रहण करणारें घ्राणेंद्रिय होय. तो गंध वस्तुतः एकच असून संसर्गी द्रव्यांच्या मिश्रणानें मिश्रगंध, सुगंध, दुर्गंध इत्यादि भेद पावतो. प्रतिमादि रूपानें ब्रह्मवस्तूला साकारता आणणें, दुसऱ्या आश्रयाची अपेक्षा न धरितां असणें, जलादिकांचें धारण करणें, आकाशादिकांचा निरनिराळेपणा दाखविणें, आणि सर्व प्राण्यांचें व त्यांच्या पुरुषत्वादिक धर्मांचें विशेष परिणामांनीं प्राकट्य करणें हीं पृथ्वीचीं कार्यलक्षणें होत. आकाशाचा गुणविशेष जो शब्द तो ज्याला समजतो, तें कर्णेंद्रिय; वायूचा गुणविशेष ज्याला समजतो ते त्वगिंद्रिय; तेजाचें विशेष लक्षण जें रूप, तें ज्याला समजतें तें नेत्रेंद्रिय; उदकाचा गुण जो रस तो समजणारें तें रसनेंद्रिय; आणि भूमीचा गुणविशेष जो गंध, तो समजणारें इंद्रिय तें घ्राणेंद्रिय होय. कार्यकारणांचा संबंध असल्यामुळें वायु ह्या कार्यांत स्पर्श हा कार्याचा ( वायूचा ) गुण असून कारणाचा ( आकाशाचा ) शब्द हाही गुण आढळतो; ह्याप्रमाणेंच, कारणाचे गुण कार्यांत येतां येतां शेवटचें तत्त्व जें पृथ्वी तिच्या ठिकाणीं शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पांचही गुण आढळून येतात. महत्तत्त्व, अहंकार आणि पंचमहाभूतें हीं सात तत्त्वें उत्पन्न झालीं खरीं; पण त्यांचा संयोग न होतां तीं निरनिराळीं राहिलीं तर त्यापासून सृष्टि उत्पन्न होणार नाहीं म्हणून, सृष्टीस कारण जो परमेश्वर त्यानें काल, कर्म आणि सत्त्वादि गुण ह्यांसह त्यांमध्यें प्रवेश केला. नंतर, परमेश्वरानें क्षुब्ध केल्यामुळें तीं तत्त्वें आपसांत मिसळून त्यांपासून एक जड अंडें उत्पन्न झालें; त्यापासून विराट्पुरुषाची उत्पत्ति झाली. ह्या अंड्याला 'विशेष' अशी संज्ञा आहे. ह्यामध्यें हा सर्व लोकविस्तार भरलेला आहे. ह्याच्या भोंवतीं पृथ्वी, उदक, तेज, वायु, आकाश, अहंकार आणि महत्तत्त्व ह्यांचीं, एकाहून दुसरें दसपट मोठें अशीं आवरणें आहेत, व त्या सर्वांच्या बाहेर प्रकृतीचें वेष्टण आहे. हें षड्गुणैश्वर्यसंपन्न हरीचें स्वरूप होय. तें जें ब्रह्मरूप अंडें उदकामध्यें होतें, त्यामध्यें त्या सर्वशक्तिमान भगवंतानें अनेक प्रकारची रचना केली: प्रथम त्याला मुख उत्पन्न झालें. त्या ठिकाणीं वाणी हें इंद्रिय व त्या इंद्रियाची देवता अग्नि हीं उत्पन्न झालीं. नंतर त्याला नासिका उत्पन्न झाली; तेथें घ्राणेंद्रियासह प्राण जाऊन राहिला; आणि त्या इंद्रियाची देवता जो वायु, त्यानें त्या ठिकाणीं प्रवेश केला. मग डोळे निर्माण झाले; त्यांत चक्षुरिंद्रियासहित सूर्यानें

प्रवेश केला. हें झाल्यानंतर त्यास त्वचा निर्माण झाली; नंतर त्या त्वचेवर दाढी, मिशा वगैरे उत्पन्न होऊन, त्याची देवता ज्या ओषधि, त्यांनीं त्या ठिकाणीं प्रवेश केला. नंतर त्याला शिश्न उत्पन्न झालें; त्या जागीं रेतरूप शक्तीसह उदक येऊन राहिलें. तसेंच त्याला गुदद्वार उत्पन्न झालें; त्यांत मृत्यु हा अपान नांवाच्या इंद्रियशक्तीसह शिरला. नंतर त्यास हात उत्पन्न झाले; त्यांत क्रियारूप शक्तीसह इंद्रानें प्रवेश केला. मग त्यास पाय उत्पन्न झाले; त्यांत गतिरूप शक्तीसह लोकांचा स्वामी जो विष्णु तो प्रविष्ट झाला. नंतर त्यास नाड्या उत्पन्न झाल्या; त्या ठिकाणीं नद्यांनीं रक्तरूप इंद्रियांसह प्रवेश केला. मग त्यास उदर उत्पन्न झालें; येथें क्षुधा व तृषा ह्या इंद्रियशक्तींसह समुद्रानें प्रवेश केला. नंतर त्यास हृदय उत्पन्न होऊन त्यापासून मन झालें; त्याची देवता चंद्र हा त्या मनापासूनच झाला. हृदयाचे ठिकाणींच बुद्धीची उत्पत्ति होऊन त्या बुद्धीपासूनच तिची देवता ब्रह्मदेव उत्पन्न झाला. त्यामध्यें अहंकार उत्पन्न झाला; त्यांत आपल्या कर्मरूप शक्तीसह अहंकारवृत्ति जो रुद्र तो जाऊन राहिला. त्या हृदयापासून चित्ताची उत्पत्ति होऊन त्यापासून क्षेत्रज्ञ म्हणजे जीव ही त्याची देवता उत्पन्न झाली. ह्या सर्वांत क्षेत्रज्ञ ही देवता श्रेष्ठ होय. कारण, ह्या सर्व देवता विराट्पुरुषाला उठविण्याचा प्रयत्न करीत असतांही त्यापासून कांहीं उपयोग झाला नाहीं. म्हणून त्या सर्वांनीं आपआपल्या स्थानीं फिरून प्रवेश केला: अग्नीनें वाणीसहवर्तमान मुखामध्यें प्रवेश केला; वायु घ्राणेंद्रियासह नासिकेंत प्रविष्ट झाला; सूर्य नेत्रेंद्रियासमवेत नेत्रांत शिरला; श्रोत्रेंद्रियासहवर्तमान दिशा कर्णांचे ठिकाणीं जाऊन राहिल्या; सर्व ओषधि ह्या, केश रोम इत्यादिकांसह त्वचेच्या ठिकाणीं वास करित्या झाल्या; उदकानें रेतरूप शक्तीसह शिश्नामध्यें प्रवेश केला; अपान ह्या इंद्रियासह मृत्यूनें गुदद्वारीं प्रवेश केला; बलासह इंद्र हा हस्तांचे ठिकाणीं वास करिता झाला; गतीसह विष्णु पायांवर जाऊन राहिला; रक्तासह सर्व नद्यांनीं नाड्यांमध्यें प्रवेश केला; समुद्रानें क्षुधा व तृषा ह्यांसहवर्तमान उदरांत प्रवेश केला; चंद्र मनासहवर्तमान हृदयांत जाऊन राहिला; बुद्धीसहवर्तमान ब्रह्मदेव हृदयामध्यें प्रविष्ट झाला; आणि रुद्रानें अहंकारवृत्तीसह हृदयांत प्रवेश केला; पण इतकें होऊनही तो विराट्पुरुष जागा झाला नाहीं. शेवटीं चित्ताची देवता क्षेत्रज्ञ ( जीव ) ह्यानें जेव्हां चित्तासहवर्तमान हृदयामध्यें प्रवेश केला, तेव्हां तो पुरुष उठून उभा राहिला ! इंद्रियें, बुद्धि, प्राण व मन ह्यांनीं एखाद्या निजलेल्या मनुष्यास उठविण्याचा प्रयत्न केला असतां जीवाच्या साहाय्याशिवाय तो व्यर्थ होतो; त्याप्रमाणेंच, क्षेत्रज्ञ जीवाच्या साहाय्याशिवाय सूर्यादि देवतांनीं विराट्पुरुषास उठविण्याविषयीं केलेला प्रयत्न निष्फळ झाला. माते, श्रवण, कीर्तन इत्यादि प्रकारच्या भक्तीनें अंतःकरण शुद्ध करून घ्यावें; त्या शुद्धांतःकरणाच्या योगानें विषयांचे ठिकाणीं वैराग्य आणि प्रकृतिपुरुषांचें स्पष्ट ज्ञान हीं प्राप्त करून घ्यावीं; आणि त्या योगानें, देहामध्येंच भिन्नत्वानें वास करणाऱ्या आत्म्याचें स्वरूप ओळखून, योगसाधनानें निश्चळ झालेल्या बुद्धीच्या योगानें त्याचें सतत चिंतन करावें.

## अध्याय सत्ताविसावा.

—:०:—

### ज्ञानप्राप्तीची अवश्यकता.

कपिल म्हणाले:—माते, सूर्याचें प्रतिबिंब उदकांत पडलें असतां उदक हाललें म्हणजे तें प्रतिबिंब हालल्याचा भास होतो, पण आकाशांतील खरा सूर्य त्या विकारांपासून अगदीं अलिप्त असतो; तद्वत्, देहामध्यें असणाऱ्या जीवावर देहास होणाऱ्या सुखदुःखादि विकारांचा भास होतो;

पण ईश्वरावर त्यांचा परिणाम कांहींएक होत नाहीं. कारण तो स्वतः निर्गुण निर्विकार असल्यामुळें कोणतीही क्रिया करीत नाहीं; तेव्हां जो क्रियाच करीत नाहीं त्यास विकार कोठून उद्भवणार? माते, जीव व ईश्वर ह्यांतील भेद जो मीं तुला पूर्वी सांगितला आहे, तो नीट लक्षांत आण. जीवाचें सत्स्वरूप ईश्वर हेंच होय. परंतु अहंकारास वश होऊन जेव्हां तो जीव तें सत्यस्वरूप विसरतो, तेव्हां तो त्या नित्य व निर्विकार पदापासून च्युत होऊन देहाच्या गुणांवर आसक्ति ठेवितो, व मीच सर्व कर्मे करितों असा अभिमान बाळगितो, त्यामुळें तो परतंत्र होऊन त्याची शांतवृत्ति नाहींशी होते; आणि देहाभिमानामुळें, देहाकडून घडलेल्या पापपुण्यानुरूप उत्तम (देव), मध्यम ( मनुष्य ) व अधम ( तिर्यक्–पशु, पक्षी, वृक्ष, कीटक ) ह्या गतींस प्राप्त होतो. अशा प्रकारें तो जीव जन्ममरणरूप संसारांत येतो. माते, स्वप्नस्थितींत कांहीं तथ्यांश नाहीं हें माहीत असतांही ज्याप्रमाणें स्वप्नस्थ मनुष्याचे भय, शोक इत्यादि विकार तो जागृत झाल्याखेरीज नष्ट होत नाहींत, त्याप्रमाणेंच, विषयांत गुरफटून गेलेला जीव ज्ञानप्राप्तीखेरीज बंधमुक्त होत नाहीं. म्हणूनच पुरुषानें दुष्ट इंद्रियांच्या विषयरूप मार्गामध्यें आसक्त झालेलें आपलें मन, दृढभक्ति आणि तीव्र वैराग्य ह्यांच्या योगानें हळूहळू आपल्या स्वाधीन करून घ्यावें.

### दृढभक्ति व तीव्र वैराग्य उत्पन्न होण्यास साधनें.

माते, आतां दृढभक्ति व तीव्र वैराग्य प्राप्त होण्यास कोणतीं साधनें करावीं, तें सांगतों: पुरुषानें यमानियमादि योगसाधनांचें आचरण करून अंतःकरण स्वाधीन करून घेण्याचा अभ्यास करावा; परमेश्वरच मला मोक्ष देईल असा विश्वास ठेवून परमेश्वराचे ठिकाणीं अव्यभिचारी भक्ति ठेवावी; आणि नेहमीं त्याच्या कथांचें श्रवण करीत जावें. सर्व भूतांचे ठायीं समदृष्टि ठेवावी; कोणाचा द्वेष करूं नये; कोणत्याही ठिकाणीं आसक्ति ठेवूं नये; ब्रह्मचर्य व मौन हीं व्रतें स्वीकारावीं; सर्व कर्मांचें निष्कामपणें यथायोग्य आचरण करून तीं सर्व परमेश्वरास अर्पण करावीं; अयत्नेंकरून प्राप्त होईल तेवढ्यांत संतुष्ट असावें; परिमित अन्न सेवन करावें; नेहमीं ईश्वराचें मनन करीत असावें; एकांतवास करावा; अंतःकरण रागलोभादिकांनीं विकारयुक्त होऊं देऊं नये; सर्वांचें अभिष्ट चिंतन करावें; अंतःकरण दयाळू असूं द्यावें; धैर्य खचूं देऊं नये; आणि आपला स्वतांचा देह व त्या देहामुळेंच ज्यांचा संबंध जडला आहे असे पुत्र, कलत्र इत्यादिकांवरील आसक्ति सोडून, ' हा मी ' आणि ' हीं माझीं ' हा दुरभिमान सोडून द्यावा. असें केलें असतां प्रकृति आणि पुरुष ह्यांच्या खऱ्या स्वरूपाचें तत्त्वज्ञान प्राप्त होतें. त्या ज्ञानाच्या योगानें जागृति, स्वप्न इत्यादि बुद्धीच्या अवस्थांची निवृत्ति होऊन भेदबुद्धि नष्ट होते. नंतर, ज्याप्रमाणें नेत्राची देवता जो सूर्य तिच्या योगानें प्रत्यक्ष सूर्यबिंब दृष्टीस पडतें, त्याप्रमाणें साधक पुरुषानें अहंकारावच्छिन्न आत्म्याचे योगानें शुद्ध आत्मस्वरूपाचें दर्शन घ्यावें. ह्याप्रमाणें दर्शन घडलें असतां तो पुरुष ब्रह्मस्वरूपास प्राप्त होतो. त्या ब्रह्मस्वरूपास देहादि उपाधि नाहींत; तें मिथ्याभूत अहंकाराचे ठिकाणीं सद्रूपानें भासत असतें; सर्व जगाचें आदिकारण जी प्रकृति तिचें आश्रयस्थान तेंच होय; मिथ्याभूत म्हणून जितकीं, त्या सर्वांस त्यापासूनच प्रकाश मिळतो; आणि तें सर्व पदार्थांच्या ठिकाणीं व्यापक असून परिपूर्ण असें आहे. असो; माते, आतां, अहंकारावच्छिन्न आत्म्याच्या योगानें शुद्ध आत्मस्वरूपाचें ज्ञान कसें प्राप्त होतें तें तुला सांगतो: सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडून त्याचा कवडसा भिंतीवर पडतो; त्या कवडशाकडे पाहून जसें त्याच्या

मुळाकडे ( पाण्यांतील प्रतिबिंबाकडे ) लक्ष जातें, आणि त्याकडे पाहिलें असतां मग जसें खऱ्या सूर्यबिंबाचें ज्ञान करून घेतां येतें, तद्वतच भूतें, इंद्रियें व मन ह्यांमध्यें अहंकाराचें प्रतिबिंब पडलें आहे, व त्या अहंकारामध्यें आत्म्याचें प्रतिबिंब आहे, म्हणून देहेंद्रियमनोरूप प्रतिबिंबाच्या योगानें, ज्यांत ब्रह्मवस्तूचें प्रतिबिंब पडलें आहे असा त्रिगुणात्मक अहंकार प्रथम लक्षिला जातो, आणि नंतर त्या ब्रह्मप्रतिबिंबयुक्त अहंकाराच्या योगानें सत्यज्ञानरूप आत्म्याचें ज्ञान प्राप्त करून घेतां येतें. माते, आतां तुला

आत्मानुभवाचें एक उदाहरण

सांगतों: आकाशादि पंचमहाभूतें, शब्दादि पंचसूक्ष्मभूतें, इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार ह्यांचा निद्रावस्थेंत लय होतो; पण त्या वेळींही जो जागृत असून निरहंकार असा असतो तो आत्मा होय. आतां तूं कदाचित् असें म्हणशील कीं, त्या वेळीं तो स्पष्ट कां भासत नाहीं? तर, माते, जागृतावस्थेमध्यें भूतें, इंद्रियें, अहंकार इत्यादिदिकांच्या द्वारें तो सर्व गोष्टी पहात असतो, म्हणून तो स्पष्टपणें भासतो; निद्रेमध्यें भूतें, इंद्रियें व अहंकार हीं नष्ट होतात; ह्यास्तव तो स्पष्टपणें भासत नाहीं. एखाद्या द्रव्यलोभी पुरुषास, द्रव्य नष्ट झालें असतां ज्याप्रमाणें आपणच नष्ट झालों असें वाटतें, त्याप्रमाणेंच, आत्मा स्वतः अविनाशी असूनही, ज्या इंद्रियादिकांवर त्याची आसक्ति असते, तीं नष्ट झालीं असतां आपण स्वतांच नष्ट झालों, असें त्यास वाटतें; म्हणजे, जागृतावस्थेमध्यें असतां तो जसा प्रकाशमान असतो, तसा निद्रावस्थेंत प्रकाशमान असत नाहीं. माते, ह्याप्रमाणें विचार करून विवेकी पुरुष त्या आत्म्याच्या सत्यस्वरूपाचा अनुभव जोडितो. माते, तो आत्मा अहंकारासहित सर्व कार्यकारणात्मक द्रव्यांचा प्रकाशक असून सर्वांचा आश्रयही तोच आहे.

देवहूति म्हणाली:–हे सर्वज्ञा, तूं सांगितल्याप्रमाणें आचरण केलें असतां भक्ति व वैराग्य ह्यांच्या योगानें आत्म्याचें ज्ञान उत्पन्न होईल खरें, पण पुरुषाला प्रकृति कशी सुटणार? कारण, पुरुषावांचून देहेंद्रियादिरूप प्रकृतीचें स्वरूप समजत नाहीं, आणि प्रकृतीवांचून पुरुषाचें स्वरूप व्यक्त होत नाहीं. एकंदरींत ह्या दोघांचा एकमेकांस आश्रय असून दोघेही नित्य आहेत. तेव्हां प्रकृति ही पुरुषाला कधींही सोडूं शकणार नाहीं. गंध आणि भूमि किंवा रस आणि उदक हे पदार्थ एकमेकांपासून जसे निराळे होऊं शकत नाहींत, तशीच प्रकृति आणि पुरुष ह्यांची स्थिति आहे: तीं दोघें एकमेकांस सोडून कधींही असत नाहींत. वस्तुतः पुरुष हा कर्तृत्वरहित असून ज्या प्रकृतीच्या गुणांमुळें त्याला संसारबंध प्राप्त होतो, ते प्रकृतीचे गुण विद्यमान असतां त्याला मोक्षपद मिळणार कसें? तत्त्वज्ञानाच्या विचारानें एखाद्या पुरुषाचें संसाररूपी प्रचंड भय निवृत्त झालें, तरी ज्या प्रकृतीच्या गुणांमुळेंच हा संसार उत्पन्न होतो, ते विद्यमान असल्यामुळें संसाररूपी प्रचंड भय पुनः प्राप्त होण्याचा संभव आहे. ह्यास्तव, हे कपिला, तें भय सर्वथा नाहींसें होण्यास काय उपाय करावा तें मला सांग.

संसारभय सर्वथा नष्ट होण्यास उपाय.

भगवान कपिल म्हणाले:–माते, केवळ प्रकृतीच्या संबंधामुळेंच पुरुषाला बंध प्राप्त होतो असें नाहीं; परंतु ती चांगली आहे, असें मानून पुरुषानें तिजवर आसक्ति ठेविली म्हणजे त्याला बंध प्राप्त होतो, आणि ती आसक्ति सुटली कीं मोक्ष प्राप्त होतो. आतां, एखाद्या पुरुषाचें संसाररूपी भय निवृत्त झालें असतांही तें त्यास पुनः प्राप्त होतें, ह्याचें कारण साधनामधील व्यंग हें होय. म्हणून साधकानें साधनामध्यें मुळींच व्यंग पडूं देऊं नये. तीं साधनें अशीं: ईश्वरार्पणबुद्धीनें निष्काम स्वधर्माचरण करावें; रागद्वेषादि विकारां-

पासून अंतःकरण अलिप्त ठेवावें; परमेश्वराच्या ठिकाणीं दृढभक्ति ठेवावी; वारंवार भगवंताच्या लीला श्रवण कराव्या; प्रकृति व पुरुष ह्यांच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान प्राप्त करून घ्यावें; तीव्र वैराग्य धारण करावें; शास्त्राज्ञेप्रमाणें परिमित आहार ठेवावा; तपश्चर्या करावी; व अष्टांगयोगाचें साधन करून निश्चलपणें आत्मस्वरूपाचें ध्यान करावें. ह्याप्रमाणें नित्य क्रम चालू ठेविला असतां, पुरुषाच्या प्रकृतीचा ( मोहरूप अविद्येचा ) हळू हळू क्षय होऊं लागतो; आणि ज्याप्रमाणें अरणीपासून उत्पन्न झालेल्या अग्नीच्या योगानेंच अरणि जळून जाते, त्याप्रमाणें, प्रकृतीच्या गुणांमुळेंच उत्पन्न झालेल्या तत्त्वसमुदायाच्या साहाय्यामुळें प्राप्त झालेल्या ज्ञानाच्या योगानें त्या प्रकृतीचा क्षय होतो. प्रकृतीचे भोग भोगीत असतांच तिच्या ठायीं संसारदुःखाला कारणीभूत असे अनेक दोष आढळून येतात. ते दोष दिसूं लागले म्हणजे पुरुषाला हळूहळू तिचा वीट येऊं लागतो. मग तिच्यावरील आसक्ति सोडून देऊन तो आत्म्याच्या आनंदस्वरूपीं रममाण झाला, म्हणजे प्रकृतीपासून त्याचें कांहीं सुद्धां अहित होऊं शकत नाहीं. स्वप्नामध्यें कितीही भय, शोक किंवा दुःख प्राप्त झालें असतां जागेपणीं तें सर्व आठवत असूनही ज्याप्रमाणें मनुष्याला मोह पडत नाहीं, त्याप्रमाणें, ज्ञानप्राप्तीच्या योगानें आत्मस्वरूपीं रममाण असणाऱ्या पुरुषास प्रकृति मोह पाडूं शकत नाहीं. माते, ह्या साधनांचें अनेक जन्मपर्यंत अनुष्ठान करावें, तेव्हां कोठें मनुष्याची आत्मस्वरूपीं प्रीति जडते, आणि त्याला विवेक उत्पन्न होतो ! असें झालें म्हणजे मात्र त्याला वैराग्यप्राप्ति होते, व मग त्याला ब्रह्मलोकापर्यंत सर्व लोकांविषयीं वैराग्य उत्पन्न होऊन त्याची परमेश्वराचे ठिकाणीं भक्ति जडते. भक्तीच्या योगानें त्याला आत्मस्वरूपाचें ज्ञान होतें. त्या ज्ञानाच्या योगानें त्याचे सर्व संशय दूर होतात. नंतर, ईशानुग्रहामुळें, परमेश्वराच्या आश्रयास असलेला आनंद ज्यास मोक्ष म्हणतात, त्याप्रत तो सहज प्राप्त होतो. त्या ठिकाणीं देह, इंद्रियें, वगैरे कांहींच नसून तेथें गेलें म्हणजे लिंगदेहाचा नाश होतो. लिंगदेहाचा नाश झाला म्हणजे प्राणी ह्या संसारांत मुळींच पडत नाहीं. माते, अशा तऱ्हेचें आचरण ठेविलें म्हणजे मोक्ष प्राप्त होतो खरा; पण मध्यें अणिमादि सिद्धींचें मोठें भय असतें. कारण, योगाभ्यासाच्या योगेंकरून त्या पूर्णपणें सिद्ध होतात, आणि मनुष्याच्या मनाला मोह पाडितात. योगी त्यांच्या मोहजालांतून सुटला, तरच त्याला अविनाशी गति प्राप्त होते. त्या गतीच्या ठिकाणीं मृत्यूचा मुळींच गर्व चालत नाहीं; पण जर का तो सिद्धींच्या मोहजालांत गुंतून गेला, तर त्याला फिरून जन्ममरण प्राप्त होतें, आणि मग मृत्यूला देखील गर्व होतो कीं, मोठ्या योग्यालाही मीं स्वाधीन करून घेतलें ! म्हणून, मनुष्यानें ह्या सिद्धींच्या मोहजालापासून दूर राहण्याविषयीं खबरदारी ठेवावी.

## अध्याय अठाविसावा.

—:०:—

### योगाचे भेद.

भगवान कपिल म्हणाले:—माते देवहूति, योगामध्यें सबीज आणि निर्बीज असे दोन भेद आहेत—ईश्वराच्या मूर्तीचें ध्यान करीत करीत हळूहळू मन विषयांपासून सोडवून तें भगवत्स्वरूपीं लावावयाचें ह्यास सबीज योग, आणि कोणत्याही मूर्तीचें ध्यान न करितां सर्व विषयांपासून मनाचें आकलन करून तें आत्मस्वरूपीं लावावयाचें ह्यास निर्बीज योग म्हणतात.

#### सबीज योगाचें स्वरूप.

माते, सबीज योगसाधनानें अंतःकरण प्रसन्न होऊन निःसंशय मोक्षमार्गाकडे लागतें. वास्तव

योगाभ्यासी पुरुषानें शक्त्यनुसार स्वधर्म आचरावा; अधर्मापासून दूर असावें; दैवबलानें जें कांहीं अन्न मिळेल तेवढयांतच संतुष्ट असावें; आत्मज्ञानी पुरुषांचें चरणसेवन करावें; हिंसा करूं नये; सत्य बोलावें; चोरी करूं नये; अवश्य तेवढयाच वस्तूंचा संग्रह करावा; ब्रह्मचर्य व तप ह्यांचें आचरण करावें; देह व अंतःकरण हीं नेहमीं शुचिर्भूत ठेवावीं; अध्ययन व परमेश्वरपूजन ह्यांत अंतर पडूं देऊं नये; धर्म, अर्थ, काम ह्या पुरुषार्थधर्मांचे ठिकाणीं आसक्ति ठेवूं नये; मोक्षधर्माचे ठिकाणीं प्रीति ठेवावी; नेहमीं शुद्ध आणि परिमित अन्नाचें सेवन करावें; भयरहित अशा एकांतवासांत रहावें; व्यर्थ भाषण करूं नये; आसन साध्य करून शरीर स्थिर ठेवण्याचा अभ्यास करावा; प्राणायामाच्या योगानें हळूहळू प्राणवायु साध्य करून घ्यावा; मनाच्या साहाय्यानें इंद्रियें बाह्य विषयांपासून आवरून हृदयस्थानीं लावावीं; शरीरामध्यें मूलाधारचक्र वगैरे जीं प्राणांचीं स्थानें आहेत, त्यांपैकीं कोणत्या तरी एका ठिकाणीं प्राणवायु व मन हीं स्थिर करावीं; भगवंताच्या लीलांचें चिंतन करावें; आणि परमात्मस्वरूपीं एकाग्र चित्त लावावें. मन हें फार चंचल आहे. तें विषयसंगानें दूषित झालेलें असतें, आणि इंद्रियांच्या विषयरूप आडमार्गाकडे धाव घेतें; म्हणून साधक पुरुषानें आतां सांगितलेल्या ह्या मार्गांनीं व व्रतें, दानें इत्यादि दुसऱ्याही उपायांनीं तें कुमार्गगामी मन बुद्धीच्या साहाय्यानें हळूहळू परमेश्वरस्वरूपीं लीन करावें. माते, आतां तुला

### आसनादिकांचे नियम

सांगतोः योग्यानें आपलें आसन पवित्रस्थलीं मांडावें; तें फार उंच किंवा सखल असूं नये; प्रथम खालीं दर्भ घालून त्यावर मृगचर्म आणि त्यावर वस्त्र अशी त्या आसनाची रचना असावी; नंतर पुष्कळ वेळपर्यंत सुखानें एका ठिकाणीं बसतां येईल असा अभ्यास करावा; त्यावर स्वस्तिकासन किंवा ज्या आसनापासून आपणास त्रास होणार नाहीं असें दुसरें एखादें आसन घालून बसावें, आणि शरीर किंचितूही वक्र न होऊं देतां प्राणायाम करावा; पूरक, कुंभक, रेचक किंवा रेचक, कुंभक, पूरक ह्यांपैकीं ज्या प्रकारानें आपलें मन स्थिर होईल, त्या प्रकारानें प्राणायाम करून प्राणमार्ग शुद्ध करावा; सुवर्ण अग्नीमध्यें घालून तापविलें असतां जसें लवकर निर्मल होतें, तसें, प्राणायामाच्या योगें प्राणवायूचा जय करणाऱ्या योग्याचें अंतःकरण कामक्रोधादि विकाररहित होऊन लवकर शुद्ध होतें. माते, प्राणायाम करून योग्यानें वातपित्तादि दोष नाहींतसे करावे; धारणेच्या योगानें पापें जाळून टाकावीं; प्रत्याहाराच्या योगानें विषयसंबंध तोडून टाकावे; आणि ध्यानाच्या योगानें रागलोभादि दुर्गुण नाहींतसे करावे. ह्या प्रकारें योगाभ्यास करितां करितां मन शुद्ध व स्थिर झालें म्हणजे नासिकाग्रीं दृष्टि ठेवून योग्यानें भगवन्मूर्तीचें ध्यान करावें. त्या

### ध्यानाचा प्रकार

असाः भगवंताचें मुखकमल प्रसन्न आहे; नेत्र कमलगर्भाप्रमाणें आरक्त आहेत; वर्ण कृष्णकमलपत्राप्रमाणें नील आहे; व हस्ताचे ठायीं शंख, चक्र, गदा हीं विलसत आहेत; परिधान केलेलीं रेशमी वस्त्रें प्रफुल्लित कमलकेसरांप्रमाणें पिवळीं आहेत; हृदयावर श्रीवत्सलांछन असून कंठामध्यें कौस्तुभ मणि झळकत आहे; कंठांत वनमाला असून तिच्या सभोंवतीं मधुपानानें मत्त झालेले भ्रमर गुंजारव करीत आहेत; शरीरावरील अलंकार अतिशय मूल्यवान असून कटिप्रदेशीं कमरपट्टा शोभत आहे; भक्तांचें हृदयकमल हेंच भगवंताचें आसन असून, त्याचें शांत आणि गंभीर स्वरूप भक्तांच्या मनाला आणि नेत्रांना आनंद देत आहे; तो आपल्या भक्तांकडे सप्रेमदृष्टीनें पहात आहे; त्याला सर्व लोक नमस्कार करीत

आहेत, आणि तो भक्तांवर अनुग्रह करण्याविषयीं अगदीं तत्पर आहे, असें ध्यान करावें. माते देवहूति, ज्याचें चरित्र वर्णनीय आणि पुण्यकारक असून जो पुण्यश्लोकांनाही यशस्कर आहे, त्या परमेश्वराच्या मूर्तीचें ध्यान करून साधकानें आपलें चित्त त्यांत अगदीं रंगून जाईल अशी व्यवस्था करावी. तें ध्यान सुद्धां आपल्या आवडीप्रमाणें—चालत असलेल्या, सिंहासनावर बसलेल्या, शेषादि शय्यांवर शयन केलेल्या, अनेक प्रकारच्या लीला चालविणाऱ्या, अथवा सर्वांतर्यामित्वानें हृदयगुहेमध्यें वास करणाऱ्या परमेश्वराच्या मूर्तीचें करावें. नंतर त्या भगवंताच्या मूर्तीवर चित्त स्थिर राहूं लागलें आणि त्याचे सर्व अवयव एकसमयावच्छेदेंकरून मनांत येऊं लागले, म्हणजे त्या साधक पुरुषानें आपलें मन निरनिराळ्या अवयवांचे ठिकाणीं लावावें. माते, त्या

अवयवध्यानाचा प्रकार

असा: प्रथमतः भगवंताच्या चरणकमलांचें ध्यान करावें; त्या चरणकमलांवर वज्र, अंकुश, ध्वज आणि कमल हीं चिन्हें आहेत; त्याच्या बोटांचीं नखें उंच, आरक्त व सुशोभित असून त्या नखांच्या किरणांनीं साधक पुरुषाच्या हृदयांतील अज्ञानांधकार अगदीं नाहींसा होत आहे. त्या भगवंताच्या चरणकमलांचें क्षालन केलें असतां त्यापासून भागीरथी उत्पन्न झाली; व त्या भागीरथीचें उदक मस्तकीं धारण केलें असतां संसारी पुरुष भवसागरांतून तरून जातो; त्या भागीरथीच्या उदकस्पर्शापासून प्रत्यक्ष शंकरालाही अत्यंत सुख झालें. माते, भगवंताचें चरणकमल म्हणजे साधक पुरुषाच्या अंतःकरणांतील पापरूपी पर्वताचा नाश करणारें वज्रच होय. असो. अशा त्या भगवंताच्या चरणकमलांचें पुष्कळ वेळ ध्यान करून नंतर त्या जन्ममरणातीत परमेश्वराच्या जंघाद्वयाचें ( दोन्ही पोटऱ्यांचें ) ध्यान करावें; तें जंघाद्वय विश्वकर्त्या ब्रह्मदेवाची माता होय. सर्व देव ज्या श्रीलक्ष्मीला वंदन करितात, ती लक्ष्मी सुद्धां तें जंघाद्वय आपल्या मांडीवर घेऊन पल्लवांप्रमाणें कोमल हातांनीं त्याचें सेवन करीत असते. नंतर, भगवान गरुडारूढ असतां गरुडाच्या स्कंधावर शोभायमान होणाऱ्या त्याच्या मांड्यांचें ध्यान करावें; त्या मांड्यांचा बलास आधार असून जवसाच्या फुलांप्रमाणें त्या श्यामवर्ण आहेत. नंतर भगवंताच्या कटिप्रदेशाचें ध्यान करावें; त्या कटिप्रदेशासभोंवतीं उंची पिवळा पितांबर परिधान केलेला असून तो घोंट्यापर्यंत खालीं लोंबत आहे व त्यावर कमरपट्टा शोभत आहे. नंतर, भगवंताच्या चतुर्दशभुवनात्मक उदराच्या मध्यभागीं असणाऱ्या नाभीरूप विवराचें ध्यान करावें; त्या नाभीपासूनच, स्वयंभू ब्रह्मदेवाचें उत्पत्तिस्थान जें सर्वलोकरूपी कमल तें उत्पन्न झालें. नंतर त्या भगवंताच्या स्तनांचें ध्यान करावें; ते पाचूच्या मण्यांसारखे असून गळ्यांतील हारांच्या कांतीनें गौरवर्ण दिसत आहेत. पुढें योग्यानें भगवंताच्या वक्षस्थलाचें ध्यान करावें; त्या वक्षस्थलाचे ठिकाणीं लक्ष्मी वास करीत असून तें भक्तजनांस आनंद देणारें आहे. नंतर भगवंताच्या कंठाचें ध्यान करावें; त्या कंठाचे ठिकाणीं भगवंतानें भूषणाकरितां कौस्तुभ मणि धारण केला असून त्या कौस्तुभ मण्याला सुद्धां भगवंताच्या कंठानें शोभा आली आहे. नंतर भगवंताच्या बाहूंचें ध्यान करावें; ते बाहु म्हणजे सर्व लोकपालांचें आश्रयस्थान होय. त्या बाहूंचे ठिकाणीं धारण केलेलीं भूषणें फार उज्ज्वल आहेत. नंतर, ज्याचें तेज शत्रूंस असह्य आहे व ज्याला सहस्र पांकळ्या आहेत, अशा भगवंताच्या चक्राचें ध्यान करावें. नंतर भगवंताच्या पांचजन्य शंखाचें ध्यान करावें; तो शंख भगवंताच्या हस्तकमलाचे ठायीं राजहंसाप्रमाणें शोभतो. नंतर भगवंताच्या कौमोदकी गदेचें ध्यान करावें; ती

गदा मोठमोठ्या शत्रूंच्या रक्तानें लाल झाली असल्यामुळें शोभत आहे. नंतर भगवंताच्या कंठातील वनमालेचें ध्यान करावें. तिच्या वासाला लुब्ध झालेल्या भ्रमरांची तिजभोंवतीं गर्दी आहे. नंतर, शुद्धचैतन्यरूप जीवाप्रमाणें जो निर्मल आहे, अशा कौस्तुभ मण्याचें ध्यान करावें. नंतर, जो भगवान भक्तांवर दया करावी म्हणून ह्या लोकीं अवतार घेतो, त्याच्या मुखकमलाचें ध्यान करावें; त्याची नासिका सरळ असून, कानांतील हालणाऱ्या मकराकार कुंडलांची प्रभा त्याच्या गालांवर पडल्यामुळें त्याचें मुख फारच शोभायमान दिसत आहे; त्याचे नेत्र काळेभोर असून मत्स्याकृति आहेत, व त्यांवर कुरळे केंस आल्यामुळें, लक्ष्मीचें निवासस्थान जें कमल त्याशीं ते स्पर्धाच करीत आहेत कीं काय, असें भासत आहे; त्या नेत्रांवरील भुंवया स्फुरण पावत आहेत; अशा त्या मुखकमलाचें योग्यानें निरालसपणें एकाग्र ध्यान करावें. नंतर, परमेश्वरास आपली अधिक दया येऊन तो आपल्याकडे सप्रेमदृष्टीनें अवलोकन करीत आहे असें पुष्कळ वेळपर्यंत पहात रहावें. नंतर त्या सकलदुःखहर्त्या श्रीभगवंताच्या हास्याचें ध्यान करावें. त्या हास्याच्या योगानें भगवद्भक्तांचें दुःख, शोक वगैरे सर्व नष्ट होऊन त्यांस सुख होतें. नंतर भगवंताच्या भ्रुकुटीमंडलाचें ध्यान करावें; मदनानें साधक पुरुषाला पीडा देऊं नये म्हणून त्या मदनास मोहित करण्याच्या हेतूनें भगवंतानें हें भ्रुकुटीमंडल आपल्या मायेपासून निर्माण केलें आहे. नंतर, ती भगवन्मूर्ति मोठ्यानें हसत आहे असें त्या योग्यानें ध्यानांत आणावें; व हसत असतां अधरोष्टाची शुभ्र कांति दांतांवर पडल्यामुळें, कुंदकळ्यांसारखी असलेली ती दंतपंक्ति किंचित् तांबड्या रंगाची दिसत आहे अशी कल्पना करावी. हें हास्यध्यान सुंदर असल्यामुळें तेव्हांच ध्यानांत यईल. ह्याप्रमाणें, प्रेमरसानें ओतप्रोत भरलेलें आपलें अंतःकरण भगवत्स्वरूपीं जडलें, म्हणजे मग त्याव्यतिरिक्त कोणतीही वस्तु पाहण्याची इच्छा धरूं नये, व तेथून मन चळूं देऊं नये. ह्या प्रकारच्या ध्यानमार्गानें परमेश्वराचे ठिकाणीं प्रीति उत्पन्न झाली, म्हणजे भक्तियोगानें त्या योग्याचें अंतःकरण द्रवून जाईल, त्याच्या अंगावर रोमांच उठतील, व प्रेमातिशयानें त्याचें अंतःकरण सद्गदित होऊन त्याच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचे पूर वाहूं लागतील. असें झालें असतां त्या भगवन्मूर्तीवरून त्याचें चित्त हळूहळू सुटत जाऊन परमानंदस्वरूपीं रममाण होईल. परमानंदसुखाचा अनुभव मिळाला, म्हणजे शब्दस्पर्शादिक विषयांचा कंटाळा येतो. नंतर ध्यानाचा विषय नाहींसा झाला कीं मनाचा आश्रय सुटतो; आणि अग्नि ज्याप्रमाणें काष्ठें संपलीं म्हणजे मोठ्या अग्निरूपाला जाऊन मिळतो, त्याप्रमाणें, तें आश्रयरहित झालेलें मन ब्रह्मस्वरूपीं लय पावतें. अशी स्थिति झाली म्हणजे ध्येय व ध्याता हे विषय नष्ट होतात, व तो पुरुष अखंड अशा आत्मसाक्षात्काराचा अनुभव घेतो. ह्याप्रमाणें योगाभ्यासाच्या योगानें चित्ताचा लय झाला, म्हणजे त्या आनंदरूप झालेल्या योग्यास सुखदुःखांचें भान मुळींच उरत नाहीं, व पूर्वी आपणास सुखदुःखें होत असत असें जें वाटे, तें अविद्यात्मक अहंकारामुळें होय, असें त्याला स्पष्ट समजतें. त्या योग्याला स्वतांच्या शरिराचें देखील स्मरण रहात नाहीं. ज्याप्रमाणें मद्यपानानें धुंद झालेल्या मनुष्यास आपल्या कमरेस वस्त्र आहे किंवा नाहीं ह्याचें सुद्धां स्मरण नसतें, त्याचप्रमाणें, आत्मानुभवाच्या परमानंदांत निमग्न झालेल्या त्या योग्याला, देह बसला आहे किंवा उठला आहे, दैवबलानें एका जागेवरून दुसऱ्या जागेवर गेला आहे किंवा त्याच ठिकाणीं आहे वगैरे कोणत्याही गोष्टीचें स्मरण नसतें. तो स्वस्वरूपास मिळालेला असतो. हाच जीवन्मुक्त

स्थिति होय. आतां कदाचित् तूं असें म्हणशील कीं, त्यास जर आपल्या देहाचें स्मरण सुद्धां उरत नाहीं, तर त्याजकडून देहपोषण होणार नाहीं, मग देह चालावा कसा? तर, माते, पूर्वसंस्कारात्मक जें कर्म, तें देहाच्या उत्पत्तीस कारण आहे. तें कर्म जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत इंद्रियांसह हा देह चालतोच; परंतु अज्ञानावस्थेप्रमाणें योगी त्याचा अभिमानानें स्वीकार मात्र करीत नाहीं. स्त्री, पुत्र, गृह वगैरे सर्वांसहित हा देह, स्वप्नांतील वस्तूप्रमाणें केवळ भासमान असून मिथ्या आहे असें तो मानीत असतो. मनुष्याची पुत्रावर आणि द्रव्यावर अतिशय प्रीति असते; त्यांस तो केवळ प्राण समजतो; पण त्या दोहोंवर ‘ माझा प्राण ’ असा आरोप करणारा ज्याप्रमाणें त्या दोहोंहून निराळा असतो, त्याप्रमाणें देह, इंद्रियें, प्राण ह्यांना ‘ हीं माझीं ’ असें म्हणणारा द्रष्टा पुरुष निराळा होय, हें उघड आहे. ठिणगी, पेटलेला कोळसा, कोलीत इत्यादिकांस लोक अग्नि म्हणतात; कित्येक तर धुराला सुद्धां अग्निच म्हणतात; पण वस्तुतः त्यांचा दाहक आणि प्रकाशक अग्नि जसा त्यांहून भिन्न, तसाच भूतें, इंद्रियें आणि अंतःकरण ह्यांहून त्यांचा द्रष्टा जीवात्मा भिन्न, जीवात्म्याहून त्याचा द्रष्टा ब्रह्मसंज्ञक पुरुष भिन्न, आणि प्रकृतीहून तिचा चालक सच्चिदानंदरूप परमात्मा हा भिन्न होय. उद्भिज्ज, स्वेदज, जारज आणि अंडज हे चतुर्विध प्राणी निरनिराळे भासतात खरे; पण त्या सर्वांच्या ठिकाणीं महाभूतें वास करीत असल्यामुळें, महाभूतरूपानें ते सर्व एकच आहेत; त्याचप्रमाणें, स्थावरजंगमात्मक सर्व भूतांच्या ठिकाणीं उपादानकारणानें वास करणारा आत्मा, आणि कार्यत्वानें आत्म्याच्या ठिकाणीं असणारीं भूतें हीं एकच होत. जळणारें लांकूड आंखूड, लांब, वांकडें जसें असेल तसें अग्नीचें स्वरूप निरनिराळें दिसतें; पण वस्तुतः अग्नि जसा एकच असतो, तद्वतच, निरनिराळ्या देहांमध्यें वास करणारा आत्मा एकच असून केवळ देहस्वभावांच्या भिन्नत्वामुळेंच अनेक प्रकारचा भासतो. माते, ही विष्णूची माया अतर्क्य आहे; हिच्यामुळेंच जीवास बंधन प्राप्त होतें. योग्यानें विचाराच्या योगानें त्या मायेचें निवारण करून स्वस्वरूपीं स्थित असावें. •

## अध्याय एकुणतिसावा.

—:०:—

### भक्तियोगवर्णन.

देवहूति म्हणाली:—हे समर्था कपिला, तूं साक्षात् परमेश्वर असून जीवांवर उपकार करण्याकरितां हा अवतार धारण केला आहेस. पुरुष, प्रकृति व महदादि तत्त्वें ह्यांचीं लक्षणें सांख्यशास्त्रांत सांगितलेलीं त्वां मला सांगितलीं; त्यांच्या योगानें मनुष्याला निरनिराळ्या तत्त्वांच्या सत्स्वरूपाची ओळख लवकर पडेल. आतां, ह्यांच्या योगानें ज्याची सिद्धि घडते, तो भक्तियोग विस्तारानें मला सांग. तसेंच, प्राण्यांस संसारांतील अनेक प्रकारच्या गति कसकशा प्राप्त होतात, तेंही मला सांग, म्हणजे त्यांच्या ज्ञानानें मुमुक्षु जनांस वैराग्य उत्पन्न होईल. तसेंच, महाशक्तिमान काळ म्हणून जें तुझें (परमेश्वराचें) रूप आहे, त्याचप्रमाणें, ज्याच्या भयानें लोक पुण्यकर्म करितात, व जो ब्रह्मादिकांचाही नियामक आहे, त्याचेंही स्वरूप मला निवेदन कर; म्हणजे, जे लोक अज्ञानानें मिथ्याभूत देहादिकांचे ठिकाणीं अहंकार धरितात, आणि कर्मांच्या ठिकाणीं आसक्त होऊन संसारांत पाडणारीं तीं कर्मेंच करीत राहतात, ते त्या संसाररूपी अंधकूपांतून बाहेर निघतील. अज्ञाननिद्रेंत घोरत पडलेल्या लोकांस जागृत करण्याकरितांच तूं हा अवतार धारण केला आहेस, म्हणून मीं विचारलेल्या गोष्टी तूं सविस्तरपणें मला सांग; म्हणजे लोकांचें कल्याण होईल.

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, ह्याप्रमाणें मातेचें भाषण ऐकून भगवान कपिल महामुनींस संतोष झाला, व त्यांनीं तिच्या प्रश्नांचा प्रेमपूर्वक गौरव करून त्यांचीं उत्तरें देण्यास प्रारंभ केला.

भक्तियोगाचे प्रकार.

कपिल म्हणाले:—माते देवहूति, मनुष्यें निरनिराळ्या हेतूंनीं माझी भक्ति करीत असल्यामुळें, भक्तियोग आचरण करण्याचे अनेक निरनिराळे मार्ग झाले आहेत. त्यांत तामस, राजस व सात्त्विक हे तीन भेद मुख्य असून त्या प्रत्येकाचे आणखी तीन तीन भेद आहेत:–मजविषयीं भेदबुद्धि बाळगून, मनांत दुसऱ्याविषयीं मत्सर किंवा हिंसाबुद्धि हीं ठेऊन, अथवा दंभ करणें ह्यांच्या योगें जे लोक माझी भक्ति करितात, ते भक्त तामस (कनिष्ठ) होत. ह्यांत अधम, मध्यम व उत्तम असे तीन प्रकार आहेत: हिंसेसाठीं भक्ति करणारा अधम; ढोंगी हा मध्यम; आणि मत्सरी हा ह्या तिघांत उत्तम. मजविषयीं भेदबुद्धि ठेवून विषयोपभोग, कीर्ति किंवा ऐश्वर्य मिळविण्याकरितां भक्ति करणारा पुरुष राजस (मध्यम) भक्त होय. ह्यांत, विषयोपभोगांसाठीं भक्ति करणारा हा अधम; कीर्तीसाठीं भक्ति करणारा मध्यम; ऐश्वर्येच्छु हा तिघांत उत्तम. माझ्या ठिकाणीं द्वैतभाव खराच, पण त्यांतही केवळ पापक्षालनार्थ, ईश्वरप्राप्तीसाठीं, किंवा वेदाज्ञेचें परिपालन करण्यासाठीं जो माझी भक्ति करितो, तो सात्त्विक (उत्तम) भक्त होय. ह्यांत, पापक्षालनासाठीं भक्ति करणारा कनिष्ठ; ईश्वरप्राप्तीसाठीं भक्ति करणारा मध्यम; आणि वेदाज्ञेचें पालन करणारा सर्वांत उत्तम होय. माते, ह्याप्रमाणें सात्त्विक, राजस आणि तामस असे भक्तीचे तीन प्रकार, आणि त्या प्रत्येकाचे आणखी तीन असे एकंदर नऊ प्रकार झाले. श्रवण, कीर्तन, स्मरण, चरणसेवा, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन हे ह्या प्रत्येक प्रकाराचे आणखी नऊ भेद आहेत. मिळून एकंदर सगुणभक्तीचे प्रकार एक्यायशीं झाले. निर्गुणभक्तीचा एकच प्रकार आहे. माझ्या लीला श्रवण करूनच ज्याचें अंतःकरण भक्तिरसानें परिप्लुत होतें, आणि गंगोदकाचा ओघ जसा समुद्राकडेसच जातो, तसा ज्याचे अंतःकरणाचा ओघ मजकडेसच वळतो, त्याचें तें निष्काम अंतःकरण तेथेंच रममाण होतें. हिलाच निर्गुणभक्ति म्हणतात. अशा निष्काम भक्तांस मी जरी चारही मुक्ति दिल्या, तरी देखील त्यांस माझ्या सेवेशिवाय कांहींच गोड लागत नाहीं. मग ऐहिक वस्तूंविषयीं इच्छा कोठून होणार? म्हणूनच ह्या भक्तिमार्गास 'आत्यंतिक' (कधींही नष्ट न होणारा) असें म्हणतात. ह्याच्या योगानें मनुष्य ह्या त्रिगुणात्मक संसारसमुद्राचें उल्लंघन करून मत्स्वरूपीं येऊन मिळतो. माते, आतां

ही भक्ति उत्पन्न होण्यास योग्य आचरण कोणतें तें तुला सांगतों: मनुष्यानें परमेश्वरार्पणबुद्धि ठेवून उत्तम प्रकारें स्वधर्माचरण करावें; यज्ञयागादिकांपुरतीच हिंसा करून पंचरात्रादि आगमांमध्यें सांगितल्याप्रमाणें माझें निष्कामबुद्धीनें पूजन करावें; माझ्या मूर्तीचें दर्शन, स्पर्श, अर्चन, पूजन, स्तवन, वंदन हीं करावीं; सर्व प्राणिमात्राचे ठिकाणीं अभेदत्वें परमेश्वरच भरला आहे अशी सद्बुद्धि ठेवावी; अंतःकरणाचे ठिकाणीं धैर्य आणि विषयांचे ठिकाणीं वैराग्य धारण करावें; समानशील लोकांशींच स्नेह ठेवावा; सत्पुरुषांना योग्य सन्मान द्यावा; अनाथांवर दया करावी; यमनियमादिक पाळावेत; माझें नामस्मरण करावें; आत्मप्रतिपादन करणाऱ्या शास्त्रांचें वारंवार श्रवण आणि मनन करावें; मन नेहमीं शांत व सरळ ठेवावें; सत्पुरुषसमागम अवश्य करावा; व देहादिकांविषयीं अभिमान धरूं नये. ह्याप्रमाणें भागवतधर्मानें वागणारा जो पुरुष, त्याचें अंतःकरण निर्मल होतें, व त्यानें भगवद्गुण श्रवण केले कीं लागलीच त्याचें अंतःकरण

त्या ठिकाणीं जडून जातें; आणि पुष्पादि पदार्थांच्या योगानें वायु जसा घ्राणेंद्रियास आपल्या स्वाधीन करून घेतो—सारखा वासच घेत रहावेंसें वाटतें—तसें, भक्तियोगानें उचंबळलेलें व सुखदुःख सारखें समजणारें मन अनायासें परमेश्वरास आपल्या स्वाधीन करून घेतें. माते, सर्व प्राणिमात्राचे अंतर्यामीं मी वास करितों, हें न ओळखितां जो केवळ देहावरच आत्मदृष्टि देऊन माझ्या मूर्तीचें पूजन करितो, तो नुसता ढोंगी होय. सर्वांतर्यामी जो मी, त्या मला न ओळखितां जो मूर्तिपूजा करितो, तो नुसत्या भस्मामध्येंच होम करितो. अर्थात् भस्मांत होम करणें जसें निरर्थक होय, तसेंच प्राणिमात्राचे ठिकाणीं भेदबुद्धि ठेवून माझ्या मूर्तीचें पूजन करणें निरर्थक होय. देहादिकांविषयीं अभिमान ठेवणारा, भेदबुद्धीनें वागणारा, व सर्व प्राणिमात्राच्या अंतर्यामीं वास करणाऱ्या मजशीं परबुद्धीनें द्वेष करणारा जो पुरुष, त्याचें मन कधींही शांत रहात नाहीं. देवहूति, जो पुरुष प्राणिमात्राबरोबर वैरभाव धरितो, त्यानें सर्वोपचारांनीं जरी माझी पूजा केली, तरी मी मुळींच संतुष्ट होत नाहीं. ह्याकरितां, माझें सर्वांतर्यामी वास्तव्य आहे हें न ओळखणाऱ्या पुरुषानें आपलीं नित्यनैमित्तिक कर्में करून सांपडेल तितक्या अवकाशांत मूर्तीचे ठिकाणीं माझें पूजन करावें. जो मनुष्य स्वतांहून किंवा प्राणिमात्राहून परमेश्वर निराळा आहे अशी भावना ठेवितो, त्या पुरुषास मी स्वतांच संसारदुःख देतों आणि मृत्युभय उत्पन्न करितों. म्हणून, सर्वांतर्यामीं वास करणारा जो मी, त्या माझें सर्वांभूतीं पूजन करावें. माते, त्याचा प्रकार असा: आपल्यापेक्षां जे श्रेष्ठ असतील त्यांचा बहुमान करावा; आपल्या बरोबरीचे असतील त्यांच्याशीं स्नेह राखावा; आपल्यापेक्षां हीन असतील त्यांचें प्रिय करून त्यांस संतुष्ट राखावें; व सर्वांभूतीं समदृष्टि असूं द्यावी.

## श्रेष्ठाश्रेष्ठविचार.

कपिल म्हणाले:—हे सुमंगले, माती, दगड इत्यादि अचेतनांपेक्षां सचेतन जे वृक्षादिक ते श्रेष्ठ; त्यांहून श्वासोच्छ्वास करणारे जंगम प्राणी श्रेष्ठ; त्यांहून ज्ञानवान श्रेष्ठ; त्यांहून शब्दादि विषयांचें ग्रहण करणारे श्रेष्ठ; त्यांतही स्पर्श जाणणाऱ्या प्राण्यांपेक्षां रस जाणणारे मत्स्यादिक श्रेष्ठ; त्यांहून गंध जाणणारे भ्रमरादि श्रेष्ठ; त्यांहून शब्द जाणणारे सर्पादि श्रेष्ठ; त्यांहून रूपज्ञान असणारे कावळे वगैरे श्रेष्ठ; आणि त्यांपेक्षां, ज्यांस खालीं वर दांत असतात ते मर्कटादि श्रेष्ठ होत. माते, पादहीन सर्पादिकांपेक्षां बहुपाद गोम वगैरे प्राणी श्रेष्ठ; त्यांहून चतुष्पाद श्रेष्ठ; त्यांहून द्विपाद ( मनुष्य ) श्रेष्ठ; त्यांमध्यें चतुर्वर्ण श्रेष्ठ; त्या चार वर्णांत ब्राह्मण श्रेष्ठ; ब्राह्मणांमध्यें वेदवेत्ते श्रेष्ठ; वेदवेत्त्यांहून अर्थवेत्ते श्रेष्ठ; अर्थवेत्त्यांहून मीमांसक (दुसऱ्याची संशयनिवृत्ति करणारे) श्रेष्ठ; त्यांहून स्वतांचीं वर्णाश्रमविहित कर्में करणारे श्रेष्ठ; त्यांहूनही सर्वसंगपरित्याग करून केवळ निष्कामबुद्धीनें कर्माचरण करणारे श्रेष्ठ; आणि ज्यानें आपलीं सर्व कर्में व शरीर मलाच अर्पण केल्यामुळें माझी प्राप्ति होण्यास ज्यास कोणताही प्रतिबंध मुळींच उरला नाहीं तो सर्वांत श्रेष्ठ होय. माझे ठिकाणीं सर्व कर्में अर्पण करून कर्तृत्वाभिमानरहित झालेला व सर्वांभूतीं समदृष्टि ठेवणारा जो पुरुष, त्या पुरुषावांचून मला कोणीही उत्तम दिसत नाहीं. म्हणून, सर्व प्राणिमात्राचे ठिकाणीं ईश्वर भरला आहे अशी भावना ठेवून त्या सर्वांचें बहुमानपुरस्सर वंदन करावें. माते देवहूति, येथपर्यंत तुला भक्तियोग आणि अष्टांगयोग हे सांगितले. ह्यां दोहोंपैकीं कोणत्याही एकाचें आचरण केलें असत मनुष्याला ईशप्राप्ति होण्यास अडचण नाहीं आतां तुला

कालाचें स्वरूप व जीवाला संसार प्राप्त होण्याचें कारण सांगतों: माते, भगवंताचें प्रकृतिपुरुषात्मक व इतर तत्त्वात्मक असें जें रूप सर्व सृष्टीचें नियमन करितें, त्यास दैव म्हणतात. ह्या दैवाच्या प्रेरणेनेंच जीवांस कर्मदशा प्राप्त होते, व त्यापासून नानाप्रकारच्या गति मिळतात. हेंच स्वरूप पदार्थमात्राच्या निराळेपणास कारण झालें म्हणजे त्यास काल म्हणावयाचें. ह्या कालापासूनच महदादि तत्त्वांस, व त्यांच्या अभिमानानें भेददृष्टि ठेवून वागणाऱ्या जीवांस भय उत्पन्न होतें. ह्या कालाचा सर्व जगास आश्रय असल्यामुळें तो सर्व भूतांच्या अंतरीं प्रवेश करितो, आणि पंचमहाभूतांच्या योगानें सर्व जगाचा संहार करितो. ह्याचें सामर्थ्य इतकें आहे कीं, सर्व जगाचे अधिपति जे ब्रह्मादि देव, ते मुद्धां ह्याच्या अधीन आहेत. यज्ञादि कर्मांचें फल देणार जो विष्णु, तें सुद्धां ह्याचेंच स्वरूप होय. ह्यास कोणी मित्र नाहीं, कोणी शत्रु नाहीं, बांधव नाहीं किंवा कांहीं नाहीं; ह्यास सर्वच सारखे. हा स्वतः सावध असतो, आणि जे लोक बेसावध असतील त्यांच्या अंतरीं प्रवेश करून त्यांचा संहार करण्याचा ह्याचा क्रम आहे. ह्याच्या भयानेंच सर्व जगाचा जीवनाश्रय जो वायु तो वाहातो; ह्याच्या भयानेंच सूर्य योग्य कालीं व योग्य ठिकाणीं ताप आणि प्रकाश उत्पन्न करितो; ह्याच्या भयानेंच इंद्र वृष्टि करितो; नक्षत्रसमुदाय प्रकाश पाडतो; वनस्पति व लता ह्या योग्य कालीं फळें, पुष्पें देतात; व नद्या वाहातात. ह्याच्या भयानें समुद्र सुद्धां आपली मर्यादा सोडून पलीकडे जाण्यास समर्थ होत नाहीं; ह्याच्या भयानेंच अग्नि प्रदीप्त होतो; ह्याच्या भयानेंच पर्वतांसह पृथ्वी उदकांत बुडून जात नाहीं; आणि हें आकाश सुद्धां ह्याच्या भीतीमुळेंच प्राण्यांस वास्तव्य करण्यास स्थळ देतें. ह्याच्या आज्ञेवरूनच, जगाचा मूळ अंकुर जें महत्तत्त्व तें आपल्या देहापासून पृथ्वी, अप्, तेज, वायु, आकाश, अहंकार आणि स्वतः आपण ( महत्तत्त्व ) ह्या सात आवरणांनीं वेष्टित अशा ह्या लोकास ब्रह्मांडरूपानें विस्तृत करितें. ह्या जगांत ओतप्रोत भरलेल्या त्रिगुणांचे नियंते ब्रह्मा, विष्णु व रुद्र—जे प्रत्येक कल्पामध्यें ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करण्यास प्रवृत्त होतात, ते सुद्धां ह्या कालाच्याच आज्ञेनें. हा काळ वस्तुतः अविनाशी, अनंत आणि अनादि असून पित्याच्या रूपानें पुत्र उत्पन्न करून जगाची उत्पत्ति वाढवितो, आणि मृत्यूच्या योगानें प्रत्यक्ष मृत्यूचा देखील संहार करितो. माते, असा हा काल सर्व जगाचा संहारक आहे.

## अध्याय तिसावा.

—:०:—

### जीवाची संसारांतील स्थिति.

भगवान कपिल मुनि म्हणाले:—माते देवहूति, काळाचा प्रभाव फार मोठा आहे. त्याच्या योगानें जीवांस अनेक अवस्था प्राप्त होतात; पण मेघ जसे वायूच्या योगानें इतस्ततः भ्रमण करीत असतांही त्यांस वायूच्या पराक्रमाचें ज्ञान होत नाहीं, तसे हे लोक कालचक्रांत सांपडले असतांही त्यांस कालाच्या प्रचंड पराक्रमाचें ज्ञान होत नाहीं. स्वतांला सुख प्राप्त व्हावें म्हणून मोठ्या प्रयत्नानें जी जी वस्तु मनुष्य संपादन करितो, तिचा हा सर्वसमर्थ काल नाश करितो. असें झालें म्हणजे मनुष्य त्या वस्तूकरितां शोक करूं लागतो. कारण, पुत्रकलत्रादिकांसहित आपला देह हा नश्वर असतां, तो मंदबुद्धि मनुष्य आपल्या देहाच्या संबंधानें प्राप्त झालेलें घर, शेत, द्रव्य इत्यादिकांस अज्ञानानें शाश्वत असें मानितो. ह्या संसारामध्यें प्राणी ज्या ज्या योनीमध्यें जन्मास जाईल, त्या त्या योनीमध्येंच त्याला सुख वाटत

असतें. मग तो प्रत्यक्ष नरकांत जरी जन्मास आला असला, तरी देखील विष्टाभक्षण हेंच त्यास सुखप्रद वाटतें! तें जोंपर्यंत त्याला मिळत आहे, तोंपर्यंत हा देह सोडून जावें असें त्यास वाटत नाहीं. कारण, ईश्वराच्या मायेनें तो पूर्ण मोहित झालेला असतो. स्वतांचें शरीर, स्त्री, धन, पुत्र, गृह, पशु, बांधव ह्यांच्याविषयीं त्याच्या अंतःकरणांत अनेक प्रकारचे विचार चालत असून, तो आपल्यास त्यांतच धन्य मानीत असतो; व त्यांच्या पोषणाच्या चिंतेनें सतत चिंतातुर असतो. म्हणून हा मूढ प्राणी एकामागून एक अशीं एकसारखीं पापें करितो. मायावी स्त्रियांपासून प्राप्त होणारें एकांतसुख, लहान मुलांचीं मधुर भाषणें इत्यादिकांच्या योगानें प्राण्याचें अंतःकरण व इंद्रियें आकर्षिलीं जातात; आणि तो गृहस्थाश्रमी पुरुष दुःखमय संसारामध्यें राहून दुःखाचा प्रतिकार करण्याची खटपट करीत असतो, व हें सुखच आहे असें मानितो. असा गृहस्थाश्रमी पुरुष सुख होण्याकरितां ज्या धर्माचें आचरण करितो, ते धर्महो त्यास फिरून संसारांत पाडणारे असेच असतात; तरी त्याचें त्या प्राण्यास ज्ञान न होऊन तो त्या संसारांतच अविश्रांत श्रम करीत राहतो. स्त्रीपुत्रांच्या पोषणाकरितां तो अनेक घोर कर्में करून द्रव्य संपादन करितो, व त्या द्रव्यावर ती मंडळी यथास्थित चैन करिते. त्यांची पूर्तता होऊन कांहीं उरलें, तर हा त्याचा वांटेकरी होतो; पण ह्या कर्मांमुळें ह्याला जी अधोगति मिळते, तिला मात्र ती मंडळी वांटेकरी होत नाहीं. स्त्रीपुत्रांच्या पोषणाकरितां व त्यांस सुख मिळावें ह्याकरितां द्रव्यप्राप्तीच्या इच्छेनें हा अनेक प्रकारचे व्यापार करीत असतो. त्यांत त्याच्या प्रारब्धकर्मानें बूड वगैरे आली, तर त्याचा लोभ अधिकाधिक वाढत जाऊन तो आणखी तसलेच व्यापार करीत राहतो. शेवटीं तो लोभाच्या पूर्ण अधीन होतो व परद्रव्याचा अपहार करण्याची त्यास इच्छा उत्पन्न होते. पण तो मंदभाग्य असल्यामुळें त्यानें किती जरी उद्योग केले तरी ते व्यर्थ होतात; व मग त्या दुर्दैवी पुरुषाचे हातून त्याच्या कुटुंबाचें पोषण होत नाहीं. शेवटीं, माझा उत्कर्ष कसा होईल, अशी चिंता करीत तो तळमळत बसतो. अशा स्थितींत त्याच्यानें कुटुंबपोषण होईनासें झालें म्हणजे, शेतकरी जसा म्हाताऱ्या बैलाच्या खाण्यापिण्याची हयगय करितो, तशीं त्याचीं बायकामुलें सुद्धां त्याच्याविषयीं तिरस्कार करितात! इतकें झालें तरी त्यास वैराग्य प्राप्त होत नाहींच. पुढें वार्धक्य प्राप्त झालें असतां तो जरेनें व्याप्त होऊन त्याचें स्वरूप विद्रूप होतें; त्यास अनेक रोग जडतात; खाल्लेलें अन्न पचत नाहीं; त्याचा आहार तुटतो; व त्याचे सर्व व्यवहार हळूहळू कमी होत जातात. अशा स्थितींत, त्यानें पूर्वी मोठा प्रयत्न करून पोशिलेलीं माणसें त्याचा कंटाळा करूं लागतात. एखाद्या कुत्र्यापुढें भाकरीचा तुकडा टाकितात, त्याप्रमाणें तीं त्याला अन्न देतात. तरी तो मरणोन्मुख मनुष्य अपमानपूर्वक दिलेलें तें अन्न स्वीकारितो. इतकें झालें तरी त्याला त्या घराविषयीं वैराग्य उत्पन्न होत नाहीं. प्राणवायु निघून जात असतां वायूच्या मार्गभूत नाड्यांमधून कफ दाटला जातो. खोकला व श्वास ह्यांपासून त्याला फार श्रम होतात व कंठ घरघर वाजूं लागतो. अशा रीतीनें मृत्यूच्या पाशांत सांपडलेल्या त्या पुरुषाच्या सभोंवतीं त्याचे आप्त रडत बसलेले असतात, व ते त्याला 'बाबा, भाऊ' वगैरे अनेक प्रकारांनीं हाका मारूं लागतात; तरी त्यांच्याशीं एक शब्द देखील बोलण्याचें त्यास सामर्थ्य नसतें.

### यमयातना.

ह्याप्रमाणें, ज्यानें इंद्रियांचा जय न करितां केवळ कुटुंबाच्या पोषणासाठीं आपल्या आयुष्यांतील सर्व काल व्यर्थ घालविलेला असतो, तो नि-

वृद्ध पुरुष रोगादिकांच्या पीडेनें बेशुद्ध होऊन अखेरीस इष्टमित्र शोक करीत असतां मरण पावतो. त्यास नेण्याकरितां आलेले यमदूत पाहून त्याला फारच भय वाटतें, व तो मलमूत्रोत्सर्ग करितो. अपराधी मनुष्याला शिक्षा देण्याकरितां जसे राजाचे दूत बांधून नेतात, तसे ते यमदूत, त्या प्राण्याला, यातना भोगण्यासाठीं तयार केलेल्या शरिरांत घालून व त्याच्या गळ्याला घट्ट पाश आवळून बलात्कारानें पुष्कळ लांब रस्त्यानें ओढीत नेतात. वाटेनें ते यमदूत त्यास मोठमोठ्या शिक्षांचें भय घालीत असतात. ह्यामुळें त्या प्राण्याचें हृदय फाटून जातें व तो थरथर कांपूं लागतो. वाटेंत त्यास कुत्रे फाडफाडून खात असतात, व त्या वेळीं त्याला आपल्या पापकर्मांचें स्मरण होतें. वाटेनें जातांना तापलेल्या वाळूवरून त्याला चालावें लागतें. त्यास अतिशय भूक व तहान लागलेली असते, तरी त्यास अन्नपाणी मिळत नाहीं. अशा स्थितींत त्याच्यानें एक पाऊल सुद्धां उचलवत नाहीं, तरी यमदूत पाठीवर सारखे कोरडे लगावीत असल्यामुळें तो मोठ्या कष्टानें एकेक पाऊल उचलीत असतो. अतिशय थकल्यामुळें तो वाटेंत चालतांना कित्येक वेळां पडतो, तरी त्याला ते यमदूत ओढीतच असतात. पृथ्वीपासून यमपुरी नऊ हजार नव्वद योजनें लांब आहे. इतका लांबचा मार्ग त्याला तीन मुहूर्तांत आक्रमण करावा लागतो. एखादा फारच पापी असेल तर यमदूत त्याला दोन मुहूर्तांतच तेथें ओढीत नेतात ! अशा प्रकारचा दुःखमय प्रवास संपल्यावर त्या प्राण्यास यमपुरींतील यातनांचा अनुभव मिळण्यास सुरवात होते. त्याच्या अंगाभोंवतीं जळकीं लांकडें बांधून त्याला भाजतात; त्याच्या शरिराचें मांस त्याच्या स्वतांकडून तोडवून तें त्यास खावयास लावितात, किंवा इतरांकडूनही तोडवून खावावितात ! तेथें असलेलीं कुत्रीं, गिधाडें त्याचीं आंतडीं ओढून काढितात; सर्प, विंचू इत्यादि विषारी प्राणी त्यास चावून पीडा देतात; शस्त्रानें त्याचे अवयव तोडितात; मत्त गजांकडून त्यास तुडवून त्याचे तुकडे तुकडे करितात; कित्येक वेळां त्यास पर्वताच्या कड्यांवरून लोटून देतात; व कित्येक वेळां त्यास चिखलाच्या खाड्यांत बुडवून ठेवितात. अशा प्रकारें त्याचे हाल करून, मग त्या जीवास त्याच्या कर्मानुसार तामिस्र, अंधतामिस्र, रौरव इत्यादि नरकांत ढकलून देतात. माते, कित्येक विचारशील पुरुष तर स्वर्ग अथवा नरक याच लोकीं आहे असें म्हणतात. कारण, या लोकामध्येंही नरकसंबंधी यातना भोगणारे कीटकादिक प्राणी प्रत्यक्ष दिसून येतात; असो. ह्याप्रमाणें, आपल्या देहाचें किंवा आपल्या कुटुंबाचें पोषण करणारा पुरुष त्या सर्वांस येथेंच सोडून परलोकीं जातो व स्वतः कर्मानुसार फळ भोगितो. प्राण्याची हिंसा किंवा द्रोह करून ज्यांचें पोषण केलें, ते सर्व येथेंच राहतात; आणि त्यानें केलेलें पाप मात्र त्याजबरोबर जातें, व त्यास नरकवास प्राप्त करून देण्यास उपयोगीं पडतें ! शरिराप्रमाणें किंवा कुटुंबाप्रमाणें तें पाप त्यास येथेंच टाकून जातां येत नाहीं. तें त्याचें पाप दैव त्याच्याजवळ आणून पोहोंचवितें, व त्यामुळें त्या जीवास नरकयातना भोगाव्या लागतात. जो पुरुष केवळ अधर्माचरणाच्या योगानेंच कुटुंबपोषण करण्यांत मग्न असतो, त्याला सर्व नरकांतील शेवटला नरक जो अंधतामिस्र, त्यांत पडावें लागतें ! हा नरकवास संपल्यानंतरही श्वानसूकरादि योनींतील सुख भोगावें लागतें ! आणि अनुक्रमानें तें भोगीत असतां पापक्षय झाला म्हणजे तो फिरून मनुष्यजन्मास येतो.

## अध्याय एकतिसावा.

—:०:—

### प्राणी जन्मास कसा येतो ?

कपिल महामुनि म्हणाले:—माते, प्राणी जन्मास कसा येतो, तें आतां तुला सांगतों: प्राण्याला शरीर प्राप्त होण्याला कारण त्याचें पूर्वकर्म होय. त्याचा प्रवर्तक ईश्वर आहे. त्या पूर्वकर्माच्या फळप्राप्तीची वेळ आली, म्हणजे एखाद्या पुरुषाच्या शरिरामध्यें धान्यकणाच्या आश्रयेंकरून तो प्राणी प्रवेश करितो, आणि नंतर त्या पुरुषाच्या रेत:कणाचा आश्रय करून स्त्रीच्या उदरांत प्रविष्ट होतो. पहिल्या रात्रीं तें पुरुषाचें रेत आणि स्त्रीचें रुधिर ह्या दोहोंचें एके ठिकाणीं मिश्रण होतें. पुढें पांच रात्रींनीं त्याचा वाटोळा बुडबुडा बनतो. दहा दिवसांनीं कांहींसा कठिण बोरासारखा गोळा होतो, व एका महिन्यांत त्याचा मांसपिंडासारखा आकार होतो. जर तें रेत तिर्यक् योनीमध्यें असेल, तर तें अंड्यासारखें होतें. नंतर त्याला मस्तक उत्पन्न होतें. दोन महिन्यांनीं त्याला हातपाय वगैरे अवयव उत्पन्न होतात, तीन महिन्यांनीं रोम, अस्थि व त्वचा हीं उत्पन्न होतात, व तो गर्भ स्त्रीचा अथवा पुरुषाचा असेल त्याप्रमाणें चिन्ह उत्पन्न होतें. चार महिन्यांनीं मांसादिक सप्तधातु उत्पन्न होतात. पांच महिन्यांनीं क्षुधा व तृषा ह्या उत्पन्न होतात. सहा महिन्यांनीं तो गर्भ चर्मानें वेष्टित होऊन उजव्या कुशींत फिरूं लागतो. नंतर, माता ज्या अन्नोदकांचें सेवन करीत असेल, त्याच्या योगानें त्या गर्भाच्या सप्तधातूंची उत्तरोत्तर वृद्धि होते. मातेचें उदर म्हणजे विष्ठा आणि मूत्र ह्यांनीं भरलेला एक खाडा होय. त्यांत जंतूंची उत्पत्ति होत असतेच. अशा ठिकाणीं त्या प्राण्याला राहणें योग्य वाटत नाहीं; पण करतो काय ? निरुपायामुळें त्याला तेथेंच राहणें भाग पडतें. तेथें त्याला फार यातना सोसाव्या लागतात. गर्भस्थ जीव हा कोमल असल्यामुळें मातेच्या उदरांतील भुकेलेले कृमि त्याच्या सर्वांगाला टोंचीत असतात, व त्यामुळें त्याला क्षणोक्षणीं मूर्छा येते. कडू, तिखट, उष्ण, खारट, रुक्ष, आंबट इत्यादि मातेनें भक्षिलेल्या पदार्थांचा त्याला स्पर्श होऊं लागला, म्हणजे त्याच्या सर्वांगाला वेदना होऊं लागतात. त्याच्यावर पहिलें गर्भाशयाचें आवरण असतें, व त्याच्या बाहेरून मातेच्या आंतड्यांचें वेष्टन असतें. गर्भाची पाठ व डोकें हीं द्रोणासारखीं वाकलेलीं असतात, व तेथें तो कुशींत डोकें ठेवून असतो. त्याला स्वतांचे अवयव हालविण्याचें देखील सामर्थ्य नसतें. अशा वेळीं दैवयोगानें त्याला स्मरणशक्ति प्राप्त होते. त्या योगानें त्याला पूर्वीच्या शंभर जन्मांत केलेलीं कर्मे आठवतात. तो पुष्कळ वेळपर्यंत उच्छ्वास न सोडितां तेथेंच स्तब्ध रहातो. त्या अवस्थेंत त्याला सुख तें काय मिळणार ? नंतर सातवे महिन्यांत त्याला ज्ञान प्राप्त होतें. पण प्रसूतिवायु त्याला एकसारखे धक्के मारीत असतात, म्हणून तो एके ठिकाणीं स्थिर रहात नाहीं. त्या उदरांत तो एखाद्या विष्ठेंतील किड्याप्रमाणें फिरत असतो. त्याला त्या वेळीं देह आणि आत्मा ह्या दोहोंचें ज्ञान असतें, म्हणून त्याला आपणास प्राप्त झालेल्या स्थितीबद्दल दुःख होतें; व ज्या कर्मामुळें ही स्थिति भोगावी लागली, तिजबद्दल पश्चात्ताप होतो. पण त्या वेळीं तो सप्तधातुरूप बंधनानें बद्ध झाल्यामुळें त्याचा कांहीं उपाय चालत नाहीं. तो मोठ्या सद्गदित वाणीनें परमेश्वराची प्रार्थना करितो.

## गर्भस्थ जीव परमेश्वराची स्तुति करितो ती.

जीव म्हणतो:—

तस्योपसन्नमवितुं जगदिच्छयाऽऽत्तनानातनोर्भुवि चलच्चरणारविंदम् ।
सोऽहं व्रजामि शरणं ह्यकुतो भयं मे येनेदृशी गतिरदर्श्यसतोऽनुरूपा ॥
यस्त्वत्र बद्ध इव कर्मभिरावृतात्मा भूतेंद्रियाशममयीमवलंब्य मायाम् ।
आस्तेऽविशुद्धमविकारमखंडबोधमातप्यमानहृदयेऽवसितं नमामि ॥
यः पंचभूतरचिते रहितः शरीरेच्छन्नोऽयथेंद्रियगुणार्थचिदात्मकोऽहम् ।
तेनाविकुंठमहिमानमृषिं तमेनं वंदे परं प्रकृतिपूरुषयोः पुमांसम् ॥
यन्माययोरुगुणकर्मनिबंधनेऽस्मिन्सांसारिके पथि चरंस्तदभिश्रमेण ।
नष्टस्मृतिः पुनरयं प्रवृणीत लोकं युक्त्या कया महदनुग्रहमंतरेण ॥
ज्ञानं यदेतददधात्कतमः स देवस्त्रैकालिकं स्थिरचरेष्वनुवर्तितांशः ।
तं जीवकर्मपदवीमनुवर्तमानास्तापत्रयोपशमनाय वयं भजेम ॥
देह्यन्यदेहविवरे जठराग्निनाऽसृग्विण्मूत्रकूपपतितो भृशतप्तदेहः ।
इच्छन्नितो विवसितुं गणयन्स्वमासान् निर्वास्यते कृपणधीर्भगवन्कदा नु ॥
येनेदृशीं गतिमसौ दशमस्य ईश संग्राहितः पुरुदयेन भवादृशेन ।
स्वेनैव तुष्यतु कृतेन स दीननाथः कोनाम तत्प्रति विनांऽजलिमस्य कुर्यात् ॥
पश्यत्ययं धिषणया ननु सप्तवध्रिः शारीरके दमशरीर्यपरः स्वदेहे ।
यत्सृष्टयाऽस तमहं पुरुषं पुराणं पश्ये बहिर्हृदि च चैत्यमिव प्रतीतम् ॥
सोऽहं वसन्नपि विभो बहुदुःखवासं गर्भान्न निर्जिगमिषे बहिरंधकूपे ।
यत्रोपयातमुपसर्पति देवमाया मिथ्यामतिर्यदनुसंसृतिचक्रमेतत् ॥
तस्मादहं विगतविक्लव उद्धरिष्य आत्मानमाशु तमसः सुहृदात्मनैव ।
भूयो यथा व्यसनमेतदनेकरंध्रं मा मे भविष्यदुपसादितविष्णुपादः ॥

'हे भगवन्, मी महापातकी असल्यामुळें मला जी गति तूं दिली आहेस, ती माझ्या कर्माला अनुसरूनच आहे. पण मला आतां त्याबद्दल पूर्ण पश्चात्ताप झाला असून मी तुला अनन्यभावानें शरण आलों आहें. देवा, शरण आलेल्या प्राण्यांचा प्रतिपाल करण्याकरितां नानाविध देह घेऊन तूं पृथ्वीवर अवतीर्ण होतोस, व जे कोणी तुझ्या अवतारचरित्रांचें मनन करून निर्भय अशा तुझ्या पदकमलांस वंदन करितात, त्यांची सर्व भीति नाहींशी करितोस. परमेश्वरा, मी भूतें, इंद्रियें आणि अंतःकरण ह्या रूपानें म्हणजे देहरूपानें परिणाम पावलेल्या मायेचा आश्रय करून स्वतांच्या कर्मांच्या योगानें बांधला गेलों आहें, तरी माझ्या त्रस्त झालेल्या हृदयांत तुझ्या आनंदमय स्वरूपाचा अनुभव येत आहे. हें तुझें स्वरूप निर्विकार आणि निर्मळ असें आहे. मी त्याला वंदन करितों. देवा, तुझ्याप्रमाणेंच माझेंही स्वरूप वास्तविक निर्मळ खरें, पण तें अज्ञानानें आच्छादिलेलें आहे; त्यामुळें मी पंचमहाभूतांपासून उत्पन्न झालेल्या शरिराच्या ठिकाणीं म्हणजे इंद्रियें, सत्त्वादिक गुण, शब्दादिक विषय व चिदाभास ह्यांच्या ठिकाणीं अभिमान धारण करणा-

रा झालों आहें. परंतु वास्तविकपणें त्या शरिराशीं माझा कांहींएक संबंध नाहीं. देवा, प्रकृति व पुरुष ह्यांपलीकडे असलेलें जें तुझें नित्य, शुद्ध व बुद्ध असें स्वरूप, त्यास मी नमस्कार करितों. प्रभो, सत्त्व, रज आणि तम ह्या त्रिगुणांच्या स्वाधीन होऊन प्राणी जीं कर्मे करितो, तीं त्याला संसारबंधनास कारण होतात, व त्याला स्वस्वरूपाची विस्मृति पडते, आणि तो ह्या संसारांत अनेक क्लेश भोगीत फिरतो. त्याला स्वस्वरूपाची पुनः प्राप्ति होण्यास साधन एक तुझाच अनुग्रह होय. हल्लीं मला जें त्रिकालज्ञान झालें आहे, तें तुझ्याच कृपेमुळें. सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टीच्या अंतर्यामीं तूंच अंशरूपानें वास करितोस. तुजशिवाय इतर सर्व जीवरूपानें कर्ममार्गांत येऊन पडले आहेत. त्यांचें हें दुःख हरण करण्याचें सामर्थ्य तुजवांचून इतरांमध्यें नाहीं. म्हणून आम्ही सर्व जीव आध्यात्मिकादिक त्रिविध तापांचें निरसन होण्याकरितां तुझें भजन करितों. भगवंता, मातेच्या उदरामध्यें असलेल्या रक्त, विष्ठा आणि मूत्र ह्यांच्या कुपांत पडून राहिलेला हा देह ह्या जठराग्नीच्या योगानें अतिसंतप्त होऊन गेला आहे. एथून बाहेर केव्हां पडेन ह्या आशेनें मी आपले दिवस मोजीत राहिलों आहें. परमेश्वरा, एथून तूं केव्हां बरें माझी मुक्तता करणार ? माझें अंतःकरण अतिशय दीन होऊन मला कांहीं सुचेनासें झालें आहे. हे ईश्वरा, तूं पराकाष्ठेचा दयाळू आहेस. कारण, तूं मजसारख्या दहा महिन्यांच्या अज्ञ जीवाला एवढें ज्ञान प्राप्त करून दिलेंस. ह्या तुझ्या उपकृतीबद्दल मला कधींही उतराई होतां येणार नाहीं. मी तुला नुसत्या वंदनानेंच पूजितों. तूं दीनांचा नाथ असल्यामुळें स्वतांच्या उपकृतीमध्येंच संतुष्ट असतोस; कारण तिची फेड कोणाच्याही हातून होत नाहीं. प्रभो, मजसारखेच संसारांत उत्पन्न झालेले पश्वादिक जीव आपल्या शरिरास होणारीं सुखदुःखें मात्र जाणितात; परंतु तूं दिलेल्या ज्ञानाच्या योगानें माझ्या ठिकाणीं शांति, इंद्रियनिग्रह इत्यादि गुण उत्पन्न झाले आहेत, आणि तुझें अनादि स्वरूप मला अंतर्बाह्य दिसत आहे; म्हणून, हे भगवंता, ह्या ठिकाणीं जरी मी अतिशय दुःखांत आहें, तरी मला बाहेर पडण्याची इच्छा नाहीं. कारण, मी बाहेर पडलों असतां, ज्या बुद्धीच्या योगानें तुझें हें स्वरूप पाहण्यास समर्थ झालों आहें, ती माझी बुद्धि अविद्येच्या योगानें आच्छादित होऊन मला मोह पाडील, आणि अहंकाराच्या योगानें दुःखमय संसारचक्रांत फेरे खावयास लावील. हे भगवंता, मी येथेंच राहतों व तुझ्या चरणकमलांचें हृदयांत ध्यान करून आपल्या दुःखाचें परिमार्जन करतों. तूं दिलेल्या बुद्धीच्या योगानें तुझ्या स्वरूपाचें ज्ञान प्राप्त करून घेऊन ह्या संसाररूपी अंधकारांतून आत्म्याचा असा उद्धार करितों कीं, फिरून ह्या दुःखाचें नांव देखील घ्यावयास नको! कारण, वारंवार ह्या संसारांत येणें म्हणजे प्रत्येक वेळीं गर्भवासाचें दुःख आहेच!'

कपिल महामुनि म्हणालेः—माते देवहूति, ह्याप्रमाणें तो दहा महिन्यांचा जीव भगवंताची स्तुति करून मुक्त होण्याविषयीं आपल्या बुद्धीचा निश्चय करीत आहे, तोंच प्रसूतिवायु त्याला खालीं ओढितो. ह्या वेळीं त्याचें तोंड खालीं असतें. त्या वायूनें त्याला त्याच्या स्थानापासून एकाएकीं लोटून दिलें असतां तो फार व्याकुळ होतो, त्याचा उच्छ्वास बंद होतो, स्मृति नष्ट होते आणि मोठ्या कष्टानें तो बाहेर पडतो. भूमीवर पडला असतां मातेच्या रक्तामध्यें व मूत्रामध्यें लोळत असलेला तो जीव, विष्ठेंत उत्पन्न झालेल्या किड्याप्रमाणें वळवळूं लागतो, आणि गर्भवासांतील श्रेष्ठ ज्ञान नष्ट होऊन विपरीत गति प्राप्त झाल्यामुळें तो अतिशय रडूं लागतो. त्याच्या रडण्याचें वास्तविक कारण कोणासही समजत नसल्यामुळें, हा रडूं लागला असतां ते भलतेच उपचार करि-

तात. तो भुकेनें रडत असला, तरी त्याचें पोट दुखत असेल अशी कल्पना करून ते त्यास औषधें पाजितात; आणि खरोखर ज्या वेळीं पोट दुखत असेल, त्या वेळीं त्यास भूक लागली असेल अशी कल्पना करून बळेंच त्यास दूध पाजितात. एकंदरींत, त्यास जें हवें असेल तें मिळत नाहीं; आणि भलभलते उपचार होऊं लागले तर त्यांचा त्यास प्रतिकारही करितां येत नाहीं. ह्या वयांत बहुतकरून त्याला गलिच्छ वस्त्रांत असावें लागतें, व त्यामुळें त्याला ढेंकूण किंवा पिसा चावूं लागल्या, तर त्यांचें निवारण करण्याचेंही सामर्थ्य नसतें. अशा स्थितींत त्याची बाल्यावस्था जाते. पुढें पौगंड अवस्थेंत अध्ययन वगैरे करण्याचा त्रास त्याला भोगावा लागतो. ह्याही वेळीं तो सर्वस्वीं दुसऱ्या मनुष्यावर अवलंबून असल्यामुळें, त्याला पाहिजे असेल तें वेळचे वेळीं मिळतेंच असें नाहीं; व शिवाय तो अज्ञान असल्यामुळें त्याला त्याबद्दल त्वरित राग येतो. ही अवस्था कशीबशी जाते, तों त्याला तारुण्यावस्था प्राप्त होते. तेव्हां त्याला कामपीडा होऊं लागते. त्याच्या शरिराबरोबर क्रोध, लोभ, अहंकार हे विकारही वृद्धिंगत होतात. तो इतर कामीजनांशीं वैरभाव करूं लागतो, व त्यामुळें त्याचा स्वतांचा नाश होतो. वास्तविक देह हा पंचमहाभूतांपासून उत्पन्न झालेला असतो; परंतु ह्या प्राण्याची बुद्धि अज्ञानानें नष्ट झाली असल्यामुळें, देह माझा आहे अशी खोटीच कल्पना तो करितो. तो देह त्याला त्याच्या पूर्वार्जित कर्मापासून प्राप्त झालेला असतो. त्या देहामध्यें असतां त्याला जन्म, जरा, व्याधि, मरण इत्यादि अनेक दुःखें वारंवार प्राप्त होतात; तथापि तो त्या देहाच्या संगोपनार्थ अनेक नवीं नवीं कर्मे करीत असल्यामुळें त्याला पुनःपुनः ह्या दुःखमय संसारांत पडावें लागतें. जगतामध्यें शिश्नोदरपरायण लोकच फार आढळतात. एखादा सन्मार्गवर्ती पुरुष जर ह्यांच्या संगतीला लागून ह्यांच्या मार्गांत रमूं लागला, तर त्याला सुद्धां पूर्वी सांगितलेल्या नरकयातना भोगाव्या लागतात. कारण, दुर्जनांच्या संगतीनें सत्य, शौच, दया, मौन, बुद्धि, संपत्ति, लज्जा, कीर्ति, सहनशीलता, इंद्रियदमन, मनोनिग्रह, ऐश्वर्य इत्यादि गुणांचा लोप होतो. म्हणून विषयासक्त, मूढ व स्त्रीलंपट अशा नीच पुरुषांच्या संगतीला सज्जनांनीं लागूं नये. कारण हे लोक म्हणजे स्त्रियांचे पाळीव पशु बनलेले असतात. स्त्रियांच्या अथवा स्त्रीलंपट पुरुषांच्या संगतीनें मनुष्याला जितका मोह पडेल आणि बंधन प्राप्त होईल, तितकें इतर कशानेंही होणार नाहीं. म्हणून पुरुषानें स्त्रियांपासून व विषयी जनांपासून अगदीं अलिप्त असावें. माते, स्त्रियांचा मोह फार अनिवार आहे. प्रत्यक्ष ब्रह्मदेव देखील आपल्या सुंदर कन्येला पाहून मोह पावला, आणि तिजविषयीं त्याच्या मनांत पापवासना उत्पन्न झाली. अशी ही आपल्या पित्याची स्थिति झालेली पाहून सरस्वतीनें हरिणीचें रूप घेतलें आणि ती पळूं लागली; तरीही ब्रह्मदेव तिचा नाद सोडीना! त्यानेंही हरिणाचें रूप घेतलें, आणि मरीच्यादि ऋषि पहात असतां निर्लज्जपणें तो तिच्यामागें धावूं लागला. माते, ब्रह्मदेवाची जर ही स्थिति, तर त्यानें उत्पन्न केलेल्या मरीचिप्रभृति प्रजापतींची, त्या प्रजापतींनीं उत्पन्न केलेल्या कश्यपादिक ऋषींची, आणि त्यांपासून उत्पन्न झालेले देव, मनुष्य इत्यादिकांची काय कथा? ह्या जगामध्यें स्त्रीरूप मायेनें मोहित न झालेला असा एक नरनारायण ऋषीवांचून दुसरा कोणीही पुरुष मला दिसत नाहीं. माते, ह्या माझ्या स्त्रीरूपी मायेचें बळ किती अगाध आहे तें पहा: दशदिशा जिंकणाऱ्या महावीरासही ही केवळ आपल्या नेत्रकटाक्षबाणानें पराजित करून सोडिते! ह्याकरितां, ज्याला माझ्या सेवेच्या

योगानें आत्मस्वरूपाचा लाभ करून घेऊन योगाचें उत्तम फल प्राप्त करून घेण्याची इच्छा असेल, त्यानें स्त्रियांची यत्किंचितही संगति करूं नये. कारण स्त्री म्हणजे मुमुक्षु पुरुषाला नरकास नेण्याचें द्वारच होय. ही देवानें निर्माण केलेली प्रत्यक्ष माया होय. ही मोठ्या लडिवाळपणानें प्रेम दाखवीत जवळ जवळ येते, पण तें खरें नव्हे; एखाद्या खोल विहिरीच्या तोंडावर गवताचें आच्छादन असतांना तेथें भय असेल ही कल्पना होत नाहीं—पण त्याजवर पाय ठेविला असतां जशी प्राणांशीं गांठ पडते, तशा ह्या स्त्रिया दिसतात मोहक, पण त्यांचा सहवास मात्र केवळ प्राणघातक होय, असें मुमुक्षूनें समजावें. माते, मुमुक्षु स्त्रीनेंही ह्याचप्रमाणें विचार करून समजावें कीं, पूर्वजन्मीं मी पुरुष असतां विषयासक्त.तेमुळें अंतकाळीं स्त्रीचा ध्यास लागून मला ह्या जन्मीं स्त्रीरूप प्राप्त झालें, व ह्या जन्मीं जर पुरुषाविषयीं आसक्ति ठेविली, तर अंतकाळीं त्याच्याच ध्यासानें पुढील जन्मीं पुरुषरूप प्राप्त होईल. ह्याप्रमाणें हें रहाटगाडगें असेंच चालू राहिलें, तर संसाराची निवृत्ति कधींही होणार नाहीं. मला द्रव्य, सुख व पुत्र देणारा जो पति प्रिय वाटत आहे, तो पति नसून केवळ माझा मृत्यु होय. पति, गृह इत्यादि वस्तु मला भुरळ पाडणाऱ्या असून, व्याधाचें गायन जसें मृगाच्या नाशास कारण होतें, तशा ह्या माझ्या नाशास कारण होत. आई, आतां तुला जर अशी शंका येईल कीं, जीव व्यापक व नित्य आहे, तर त्याचें परलोकीं जाणें म्हणजे काय, आणि त्याला जन्ममरण कसचें ? तर, माते, त्याचा उपाधिभूत जो लिंगदेह, त्याच्या योगानें त्याला एका लोकांतून दुसऱ्या लोकीं जातां येतें, व तेथें तो आपल्या कर्मांचीं फळें भोगीत असतो, आणि तीं भोगीत असतां तो आणखी नवीं नवीं कर्में करितो. आत्म्याच्या अनुरोधानें चालणाऱ्या ह्या जीवाचा उपाधिभूत लिंगदेह व पंचभूतात्मक स्थूलदेह हे दोन्हीही आपआपलें कार्य करण्यास असमर्थ झाले, म्हणजे तेंच ह्या जीवाचें मरण होय; आणि ते देह पुनः प्रकट झाले, म्हणजे तोच ह्या जीवाचा जन्म होय. कावीळ वगैरे रोगांनीं मनुष्याचे नेत्रगोलक बिघडले असतां त्याची पाहण्याची शक्ति नाहींशी होऊन नेत्रेंद्रियाची शक्तिही नाहींशी होते, व असें झालें असतां ज्याप्रमाणें जीवाला पाहण्याची शक्ति मुळींच उरत नाहीं, त्याप्रमाणें, हा देह म्हणजे घटपटादि पदार्थांच्या साक्षात्काराचें स्थान होय; ह्या स्थूल देहालाच शब्दादि विषय ग्रहण करण्याचें सामर्थ्य नाहींसें होतें, तेव्हां त्यांतील सूक्ष्म देह सुद्धां आपलें काम करण्यास असमर्थ होतो; असें झालें म्हणजे स्थूल शरीर नाश पावतें; हेंच त्याचें मरण होय. तें स्थूल शरीर सूक्ष्म शरिरासह पुनः उत्पन्न होतें, आणि हाच मी आहें अशा अभिमानानें विषयांचें ग्रहण करण्यास समर्थ होतें, हेंच त्याचें जन्म होय. वस्तुतः जीवाला जन्ममरण मुळींच नाहीं. म्हणून मुमुक्षु पुरुषानें मरणाची भीति अगदीं बाळगूं नये; आपला उदरनिर्वाह कसा चालेल म्हणून काळजी करून दुसऱ्यास दैन्य दाखवूं नये; तसेंच, उपजीविकेविषयीं प्रयत्नही करूं नये. तर धैर्यानें वागून ह्या जीवाच्या अज्ञात गतीचें ज्ञान प्राप्त करून घ्यावें, व सर्वसंगपरित्याग करून पृथ्वीचे पाठीवर आनंदानें संचार करावा. सर्वसंगपरित्यागापासून इतकाच अर्थ घ्यावयाचा कीं, देहावर आसक्ति न ठेवितां योगाभ्यास आणि वैराग्य ह्या दोहोंचें आचरण करावयाचें; म्हणजे त्यांच्या योगानें आपली बुद्धि सुसंस्कृत होऊन देहावरील आसक्ति सुटेल.

---

# अध्याय बत्तिसावा.

—:०:—

## काम्यकर्मांचीं फलें.

कपिल मुनि म्हणाले:—माते देवहूति, इतका वेळ पापकर्मांचीं फलें प्राण्याला कशीं मिळतात, तें तुला सांगितलें. आतां काम्यकर्मांचीं फलें कशीं मिळतात, तें तुला सांगतों: जो पुरुष गृहस्थाश्रमधर्मांचें आचरण करून धर्म, अर्थ व काम ह्यांची प्राप्ति करून घेतो, तो, ज्याप्रमाणें गाईला चारा घालून दूध काढणारा पुरुष पुन: चारा घालून दूधच मिळवितो त्याप्रमाणें तेंच तें पुन: मिळवितो. त्याहून 'पर' जें 'ब्रह्म' तें त्याला प्राप्त होत नाहीं. अशा प्रकारें विषयोपभोगांचीच इच्छा करणारा पुरुष भक्तिपुरस्सर यज्ञ करून देव आणि पितर ह्यांची आराधना करितो, व भागवतधर्माकडे दुर्लक्ष करून देव व पितर ह्यांस संतुष्ट करण्यासाठीं मोठ्या श्रद्धेनें अनेक व्रतें व नियम करितो. पण त्यांचें फल त्याला फारच क्षुद्र मिळतें. चंद्रलोकापर्यंत जाऊन सोमपान करण्यापलीकडे त्याला कांहीं मिळत नाहीं. बरें, तें तरी फार दिवस राहतें असें नाहीं! तें फल त्याला एकदा मिळालें कीं त्याचें पुण्य क्षीण होतें, आणि तो फिरून मृत्युलोकीं येतो. द्रव्य देऊन त्याजबद्दल कांहीं पदार्थ घेतला असतां त्या द्रव्याबद्दल त्याला मिळालेल्या वस्तूपेक्षां जसें कांहीं जास्त मिळत नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्याच्या द्रव्याबद्दलचा मोबदला त्याला मिळाल्यानंतर तेथें उभें राहण्याचें देखील त्याचें कारण संपतें, त्याप्रमाणें काम्यकर्मांची स्थिति आहे. पण हें तत्त्व त्या काम्यकर्में करणाऱ्या पुरुषाच्या लक्षांत येत नाहीं, आणि ईश्वरार्पण बुद्धीनें निष्काम कर्में करणें ह्या भागवतधर्माकडे तो अगदीं दुर्लक्ष करितो. सकाम कर्में करणाऱ्या पुरुषांना जे लोक प्राप्त होतात, ते ब्रह्मदेवाच्या प्रत्येक दिवशीं जो जगाचा प्रलय होतो त्यांत नाश पावतात. तशी स्थिति भगवंताच्या निष्काम भक्तांना मिळणाऱ्या स्थानाची नसते. तें स्थान म्हणजे परमेश्वराचें स्वरूप होय. तें कधींही नाश पावत नाहीं. तो परमेश्वर नित्य असून जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय ही त्याची क्रीडा होय. भागवतधर्माचें आचरण करणारे पुरुष विषयसुखादि शुष्क हेतु पूर्ण करून घेण्यासाठीं आपल्या धर्माचा विनियोग करीत नाहींत; ते निष्काम बुद्धीनें कर्में करून तीं भगवत्पदीं अर्पण करितात; आपलें चित्त शुद्ध व शांत ठेवून ममता व अहंकार सोडून देतात; आणि पवित्र होत्साते सूर्याच्या द्वारा परमेश्वराच्या विश्वव्यापक देहांत मिळून जातात. जे हिरण्यगर्भाची परमेश्वरबुद्धीनें उपासना करितात, ते दोन परार्धांच्या शेवटीं ब्रह्मदेवाचा प्रलय होईपर्यंत त्याच्या सत्यलोकीं राहतात; व जेव्हां त्या त्रिगुणात्मक ब्रह्मदेवाला पृथ्वी, उदक, अग्नि, वायु, आकाश, मन, इंद्रियें, शब्दादि विषय व भूतांचें आदिकारण अहंकार ह्यांनीं चोहोंकडून भरलेल्या ब्रह्मांडाचा लय करण्याची इच्छा होते व तो ईश्वराच्या स्वरूपीं प्रवेश करितो, तेव्हां ते त्या ब्रह्मदेवाबरोबर ब्रह्मस्वरूपास मिळतात. तें ब्रह्मरूप परमानंदानें भरलेलें आहे; म्हणून, माते, तूं त्या परमेश्वरास शरण जा. तो सर्व भूतांच्या हृत्कमळीं वास करीत असून त्याचा पराक्रम अतर्क्य होय. माते, अभेद बुद्धीनें ईश्वरभक्ति केली असतां काय फल मिळतें तें तुला सांगितलें. आतां

### भेदबुद्धीनें केलेल्या परमेश्वरभक्तीचें फल

तुला सांगतों, ऐक: स्थावरजंगमात्मक सृष्टीचा कर्ता जो भगवान ब्रह्मदेव, तो ईश्वराची अभेदबुद्धीनें भक्ति करितो. पण मी 'सृष्टिकर्ता' हा त्याचा अभिमान नाहींसा होत नाहीं. ह्यामुळें, जरी त्याच्या प्रळयाच्या वेळीं मरीच्यादिक ऋषि, सनत्कुमारादि योगीश्वर, व इतर योगमार्गी सिद्ध ह्यांच्यासह तो परब्रह्मरूपाशीं ऐक्य पावतो, तरी पुन: सृष्टीच्या आरंभीं ईश्वररूपी काळाच्या यो-

गानें सत्त्व, रज आणि तम ह्या गुणांत न्यूनाधिक्य झालें असतां त्याला पुनः जन्म घ्यावा लागतो. त्याचप्रमाणें, ऋषिप्रभृतींचीही स्थिति तीच होते. त्यांनाही पुनः जन्म घेऊन आपापल्या अधिकारावर यावें लागतें. कारण, त्यांचाही अभिमान नष्ट झालेला नसतो. माते, ह्याप्रमाणें, जर प्रत्यक्ष ब्रह्माची निष्काम पण भेदबुद्धीनें उपासना केली असतां पुनर्जन्म घ्यावा लागतो, तर पितरादिकांची कामनिक भक्ति करणारांना तो घ्यावा लागतो ह्यांत नवल तें काय ? माते देवहूति, त्या

**काम्यकर्माचीं लक्षणें व योग्यता**

तुला सांगतों: अमुक फल मिळविण्याची इच्छा असेल तर अमुक कर्म करावें, असें ज्या कर्माबद्दल सांगितलेलें असतें तीं काम्यकर्मे होत. हीं कर्मे फलाची इच्छा नसेल तर करूंच नये, असें मात्र कोठें सांगितलेलें नाहीं. ह्या जगांत ज्यांच्या मनाची प्रवृत्ति उपभोग प्राप्त करून घेण्याकडे असते, ते लोक नानाप्रकारचीं कर्मे त्या उपभोगप्राप्तीकरितां करीत असतात. रजोगुणानें त्यांच्या मनाला बंधन प्राप्त झालेलें असतें. त्यांचीं इंद्रियें त्यांच्या स्वाधीन नसतात. गृहकृत्यांत ते अगदीं गढून गेलेले असतात. ते नित्य पितरांची आराधना करितात. हे पुरुष धर्म, अर्थ व काम ह्या तीन पुरुषार्थांविषयींच तत्पर असल्यामुळें भगवान मधुसूदनाच्या कथांविषयीं विन्मुख असतात. विष्ठा भक्षण करणाऱ्या प्राण्यांच्या पुढें षड्रसान्न ठेविलें तरी त्यांना जसें तें प्रिय न वाटून विष्ठाच गोड लागते, तसे हे लोक परमेश्वराच्या कथा हें अमृत टाकून अभद्र गोष्टीच श्रवण करतात. खरोखर ते पुरुष दुर्दैवी होत. गर्भाधानसंस्कारापासून स्मशानसंस्कारापर्यंत सर्व संस्कार करणारे लोक धूम नांवाच्या दक्षिणमार्गानें अर्यमा नांवाच्या पितरांच्या राजाच्या पितृलोकास जातात, व तेथून पुनः आपल्या पुत्रांच्या वगैरे उदरीं जन्मास येतात. माते, हे लोक कर्माधीन असतात. कर्मानें उत्पन्न झालेलें पुण्य संपलें कीं देव तात्काळ त्यांचीं भोगसाधनें काढून घेतात. मग अर्थातच ते लोक फिरून खालीं मृत्युलोकांत पडतात. म्हणून काम्यकर्म अत्यंत निंद्य होत. माते, ह्याकरितां तुला सांगतों कीं, तू परमेश्वराची निष्काम उपासना कर. त्याच्या ठिकाणीं निष्काम भक्ति ठेवणाऱ्या मनुष्याला संसाराविषयीं उपरति उत्पन्न होते, व वैराग्य प्राप्त झालें असतां परब्रह्माचा प्रत्यक्ष साक्षात्कार करून देणारें ज्ञान त्याला होतें. अशा भक्ताचें चित्त भगवद्गुणांच्या प्रीतीनें भगवत्त्स्वरूपीं निश्चल होऊन, इंद्रियांच्या अधर्मामुळें उत्पन्न होणारें अमुक विषय मला आवडतात, आणि अमुक विषय मला आवडत नाहींत, अशा प्रकारचें वैषम्य तें चित्त धरीत नाहीं. अशी स्थिति झाली कीं, त्या शुद्ध झालेल्या अंतःकरणाच्या योगानें, त्या मनुष्याला, मी परमानंद सुखास प्राप्त झालों आहें, असें लागलेंच निश्चयात्मक ज्ञान होतें. त्या आनंदस्वरूपी आत्म्याच्या ठिकाणीं अमुक एक त्याज्य अथवा ग्राह्य हे भेद नाहींत. तो निःसंग, निर्विकल्प व ज्ञानरूपी आहे. द्रष्टा आणि दृश्य हीं सर्व तो एकच होय. ब्रह्म त्यालाच म्हणतात. त्याचें निरनिराळ्या शास्त्रांनीं निरनिराळें वर्णन केलेलें आहे. उपनिषदें त्याला परब्रह्म म्हणतात; योगशास्त्रें परमात्मा किंवा ईश्वर म्हणतात; सांख्यशास्त्र त्याला पुरुष, आणि भक्तियोग भगवान असें म्हणतो. माते, कर्मयोग, भक्तियोग, ज्ञानयोग व अष्टांगयोग ह्या सर्वांच्या योगानें प्रपंचाविषयीं वैराग्य प्राप्त होतें. वस्तुतः हा प्रपंच मिथ्या होय. तो खरा आहे असें वाटणें ही केवळ भ्रांति आहे. महत्तत्त्व, अहंकार, पंचमहाभूतें, एकादश इंद्रियें, विराट् जीव, त्या जीवाचें शरीर ब्रह्मांड, व महत्तत्त्वादिकांपासून झालेलें हें सर्व जग हें सगळें त्या आत्मस्वरूपीं भासत आहे. म्हणून मनुष्यानें अंतःकरण एकाग्र करावें, विष-

यांवरील आसक्ति सोडावी, व विश्वासानें भक्तिपूर्वक योगाभ्यास करावा; म्हणजे त्याला परब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो. माते, ज्याच्या योगानें प्रकृति व पुरुष ह्यांचें खरें ज्ञान होतें, त्या सत्यज्ञानाचा मार्ग तुला मीं सांगितला. निर्गुण ज्ञानयोग व निष्काम भक्तियोग ह्या दोहोंचें भगवंताची प्राप्ति हें एकच फल होय. जसा रूपरसादिक बहुत गुणांचा आश्रय असणारा दूध, गूळ किंवा कोणताही पदार्थ निरनिराळे विषय ग्रहण करणाऱ्या इंद्रियांना निरनिराळ्या प्रकारांनीं अनुभवाला येतो, म्हणजे डोळ्यांना पांढरा किंवा तांबडा, रसनेंद्रियाला गोड, तुरट किंवा खारट, त्वचेला उष्ण किंवा थंड लागतो, तसा भगवान निरनिराळ्या शास्त्रमार्गांनीं निरनिराळ्या प्रकारांनीं अनुभवाला येतो, पण सर्वांचें पर्यवसान एकच आहे. एक सांगतें, इष्टापूर्त कर्में करावीं; एक म्हणतें,यज्ञ करावे; एक उपदेशितें, दानें करावीं; एकाचें म्हणणें आहे, तपश्चर्या करावी; एकाचे मतें स्वाध्याय व मीमांसा करावी; ह्याप्रमाणें कोणी अष्टांगयोग, कोणी भक्तियोग, कोणी वैराग्यसाधन करावें असें सांगतात. माते देवहूति, असे कितीही निरनिराळे प्रकार असेल, तरी त्यांत शेवटीं एका भगवंताचेंच प्रतिपादन केलेलें आहे. तो भगवान स्वयंप्रकाश होय. माते, सात्त्विक, राजस व तामस आणि निर्गुण असें भक्तियोगाचें चार प्रकारांचें स्वरूप व कालाचें लक्षण ह्या दोन्ही गोष्टी मीं तुला सांगितल्या. ह्या कालाची गति कोणाला कळत नाहीं. तो प्राण्यांची उत्पत्ति, स्थिति व नाश हीं करितो. अज्ञानामुळें जीव नानाप्रकारचीं कर्मे करितो, व त्या कारणानें त्याला संसारांतील अनेक गति प्राप्त होतात. त्या गति मीं तुला सांगितल्या. ह्या संसारांत आत्मा आपलें सत्यस्वरूप विसरतो. असो. तत्त्वज्ञान हें फार गूढ आहे. दुष्ट, दुराभिमानी, उद्धट व दुराचरणी मनुष्याला ह्याचा उपदेश कधींही करूं नये. त्याचप्रमाणें, लोभी पुरुषाला तें सांगूं नये, व ज्याचें मन गृहकृत्यांत गढून गेलेलें असेल किंवा जो भक्तद्वेष्टा असेल त्यालाही तें शिकवूं नये. माते, ह्या उपदेशास पात्र कोण, तें तुला सांगतों: ज्याची ईश्वराविषयीं आस्तिक्यबुद्धि असेल, जो सर्वांशीं नम्रतेनें वागणारा असेल, जो ह्या तत्त्वज्ञानावर दोषदृष्टि ठेवीत नसेल, जो गुरुजनांची व ईश्वराची सेवा करण्याविषयीं तत्पर असेल, ज्याला बाह्य विषयांविषयीं वैराग्य उत्पन्न झालें असेल, ज्याचें अंतःकरण शांत असेल, आणि ज्याची बुद्धि निर्मत्सर असून ज्याला ईश्वराविषयीं प्रेमबुद्धि असेल, तोच पुरुष ह्याचा उपदेश करण्यास योग्य होय. माते, ह्या तत्त्वज्ञानाच्या श्रवणाचें व पठणाचें फल फार मोठें आहे. ह्याच्या श्रवणानें व पठणानें मनुष्याला उत्तम गति मिळते.

# अध्याय तेहतिसावा.

—:o:—

## देवहूतीच्या आख्यानाचा उपसंहार.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, कपिल महामुनि हे तत्त्वरूप विषयानें युक्त असलेल्या सांख्यशास्त्राच्या ज्ञानाचे प्रवर्तक होत. त्यांनीं केलेलें भाषण ऐकून, त्यांची माता व कर्दम प्रजापतीची पत्नी जी देवहूति, तिच्या मनावरील अज्ञानाचें आवरण नाहींसें झालें; आणि तिनें कपिल मुनींना नमस्कार करून त्यांची स्तुति केली.

देवहूति म्हणाली:—प्रत्यक्ष ब्रह्मदेव तुझ्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेला असतांही, त्याच्या दृष्टीस तुझें स्वरूप पडलें नाहीं; म्हणून त्यानें तुझें नुसतें ध्यानच केलें. तूं उदकामध्यें शयन करणारा असून पंचमहाभूतें, इंद्रियें, शब्दादिक विषय व मन ह्यांनीं व्याप्त आणि सत्त्वादि गुणांच्या प्रवाहानें युक्त अशा सर्व प्रपंचाचें बीज आहेस. जगाची उत्पत्ति, स्थिति व लय तूंच

करितोस. ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर हीं तुझींच रूपें होत. तुझा संकल्प कधींही व्यर्थ होत नाहीं. जगांतील सर्व व्यवहार तुझ्याच शक्तीनें चालतात. तुझ्या शक्ति अनंत आहेत. सर्व प्राणिमात्राचा नियामक तूंच होस. प्रलयकालीं हें जग तुझ्याच उदरामध्यें लीन झालेलें होतें, तेव्हां तुझें शरीर फारच मोठें असलें पाहिजे. असें असतां माझ्या उदरांत तू राहिलास तरी कसा? अथवा, त्यांत कांहींच विशेष नाहीं. कारण, प्रलयाच्या वेळेस तूं सर्व जग आपल्या उदरांत सांठवून, बालकाचें रूप धरून व पायाचा आंगठा आपल्या तोंडांत घालून वडाच्या पानावर शयन केलें होतेंस; त्या तुला माझ्या उदरांत राहणें काय अवघड आहे? शरीर धारण करण्यांत तुझा उद्देश इतकाच असतो कीं, दुष्टांचा नाश करावा आणि सज्जनांचें रक्षण करावें. पूर्वी तूं वराहादिक अवतार घेतलेस तेही ह्याकरितांच, आणि हा तुझा अवतार तर भक्तांना ज्ञानमार्ग दाखविण्याकरितांच होय. तुझ्या दर्शनानें मी कृतार्थ झालें आहें. तुझ्या नांवाचा एकवार उच्चार केला असतां, चांडाळ असला तरी तो एखाद्या सोमयाग करणाऱ्या ब्राह्मणाच्या योग्यतेचा होतो; मग ज्याला तुझें प्रत्यक्ष दर्शन झालें तो पावन होईल ह्यांत नवल तें काय? तपश्चर्या, होम, तीर्थस्नानें, वेदाध्ययन व अध्यापन ह्यांचें फल तूंच होस. तुझें नामस्मरण केलें असतां हें सर्व केल्यासारखें आहे. विषयांपासून इंद्रियें अंतर्मुख करून ध्यान करावयाचें तें तुझेंच. तूं आपल्या तेजानेंच गुणप्रवाहाचा निरास करून टाकिला आहेस. जो सर्व जगाला व्यापणारा व ज्याच्या गर्भांत वेद आहेत, तो ईश्वर तूंच होस. वेदांतशास्त्रांत ज्याचें प्रतिपादन केलें आहे, तें परब्रह्म तूंच होस. पुरुष तुलाच म्हणतात. तुला माझा नमस्कार असो.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें कपिल नामक पुराणपुरुषाची स्तुति केली असतां कपिल महामुनींनीं आपल्या मातेस उत्तर दिलें: कपिल मुनि म्हणाले, "माते, तुला मीं जो योगमार्ग सांगितला, त्याचें साधन करणें मनुष्याला फार सुलभ आहे. त्या मार्गाचें अवलंबन तूं केलेंस, म्हणजे तुला लवकरच उत्तमोत्तम गति प्राप्त होईल. मोठमोठे ब्रह्मवेत्ते पुरुष ह्याच मार्गाचा स्वीकार करितात. ह्यावर तूं विश्वास ठेव, म्हणजे तूं संसारांतून मुक्त होशील; आणि जन्ममरणरहित अशा माझ्या स्वरूपास प्राप्त होशील. जे अज्ञान लोक ह्या मार्गाचा स्वीकार करीत नाहींत, ते ह्या संसारचक्रांतच गुरफटलेले राहतात. त्यांची सुटका कधींच होत नाहीं.

### देवहूतीचा देहन्यास.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें त्या भगवान कपिल महामुनींनीं देवहूतीला आत्म्याची गति दाखवून दिली, आणि तिची आज्ञा घेऊन ते इच्छित प्रदेशीं निघून गेले. नंतर ती देवहूति, कपिल महामुनींनीं सांगितल्याप्रमाणें योगमार्गाच्या योगानें आपलें चित्त एकाग्र करून बिंदुसरोवराजवळील आपल्या आश्रमामध्यें समाधि लावून स्वस्थ राहिली. तो आश्रम सरस्वती नदीच्या मस्तकावरील किरीटाप्रमाणें शोभत होता. देवहूतीचे केश मूळचे काळे असून कुरळ होते; पण पुढें त्रिकालस्नानाच्या योगानें ते अगदीं चिकटून जाऊन त्यांच्या पिंगट जटा बनल्या होत्या. तपश्चर्येनें तिचें तें गोंडस शरीर अगदीं कृश झालें. जी मोठमोठीं अमोल व तलम वस्त्रें परिधान करीत होती, ती मग वल्कलें परिधान करूं लागली. पूर्वी आपल्या पतीच्या सामर्थ्यानें जी अनुपम सौख्याचा अनुभव घेत होती, तिनें पुढें त्या सर्व सौख्यास विषवत् मानून त्याचा त्याग केला. पति अरण्यांत निघून गेल्यामुळें तिला जें दुःख झालें होतें, तें तिनें कपिलाच्या सहवासांत कसें तरी गिळिलें होतें; पण त्यानेंही तिला पुढें सोडिलें, त्यामुळें तिला सर्व जग भ-

याण वाटूं लागलें. ज्ञानप्राप्ति झाली होती तरी पुत्राचा ध्यास सुटेना. अहोरात्र तिला कपिलच डोळ्यांसमोर दिसे. तिनें सर्व ऐश्वर्याचा त्याग केला होता; इतकेंच नव्हे, तर स्वतांच्या शरिराविषयींही तिच्या मनांत प्रेम राहिलें नव्हतें. पुत्रानें सांगितल्याप्रमाणें तिनें षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराच्या चिंतनांत आपला काल घालविला. प्रथम ती परमात्म्याच्या स्वरूपाचें समग्र ध्यान करी व नंतर प्रत्येक अवयवाचें क्रमाक्रमानें चिंतन करी. तिनें आपल्या अखंड भक्तीच्या योगानें आणि कडकडीत वैराग्यानें ब्रह्मरूपप्राप्तीचें ज्ञान संपादन केलें. तिला समाधियोग उत्तम साधल्यामुळें गुणांच्या योगानें उत्पन्न होणारा अहंकार तिला स्पर्श देखील करीत नव्हता. तिची देहबुद्धि अगदीं नष्ट झाली होती. तपश्चर्येमुळें तिचें शरीर अगदीं कृश झालें होतें; तरी त्यामध्यें एक प्रकारचें फार विलक्षण असें तेज आलें होतें. धूमाच्छादित अग्नीप्रमाणें तिचें शरीर गुप्त तेजानें शोभत होतें. विदुरा, ह्याप्रमाणें ती देवहूति कपिलानें सांगितलेल्या मार्गाचें आचरण करून परब्रह्मरूपीं ऐक्य पावली. ज्या ठिकाणीं देवहूतीला योगसिद्धि प्राप्त झाली, तें अत्यंत पुण्यकारक क्षेत्र सिद्धपूर ह्या नांवानें त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहे.

हे शांत पुरुषा विदुरा, योगमार्गाच्या योगानें देवहूतीच्या शरिरांतील सप्तधातुरूपी मळ नाहींतसे झाले होते. पुढें तें शरीर नदीरूप परिणामास पावलें. सिद्ध पुरुष ह्या नदीच्या तीरावर तपश्चर्या करण्याकरितां येऊन राहतात व येथें त्यांना सिद्धि त्वरित प्राप्त होते. इकडे ते महायोगी कपिल मुनि मातेची आज्ञा घेऊन निघाले, ते ईशान्य दिशेस गेले. तेथें त्यांची सिद्ध, चारण, गंधर्व, मुनि व अप्सरांचे समुदाय ह्यांनीं स्तुति केली; समुद्रानें त्यांची स्तुति करून त्यांस राहावयास जागा दिली; व सांख्यशास्त्रनिपुण पंडितांनीं त्यांचा गौरव केला. नंतर, त्रैलोक्यांतील प्राण्यांना मोक्ष प्राप्त करून देणाऱ्या योगमार्गाचा उपदेश करणारे ते कपिल महामुनि तेथें एकाग्र अंतःकरणानें समाधि लावून स्वस्थ राहिले. विदुरा, तूं विचारल्याप्रमाणें हा कपिलाचा व देवहूतीचा पवित्र संवाद मीं तुला सांगितला. हें कपिल मुनींनीं आपल्या मताप्रमाणें सांगितलेलें आत्मयोगाचें शास्त्र फार गुप्त आहे. ह्याचें जो नित्य श्रवण करितो, त्याला गरुडध्वज भगवंताच्या ठिकाणीं पूर्ण भक्तियोग त्वरित प्राप्त होऊन शेवटीं परमात्म्याच्या चरणकमलांची प्राप्ति होते.



# श्रीमद्भागवत.

## चतुर्थस्कंध.

### अध्याय पहिला.

—:०:—

#### स्वायंभुवमनूचा वंश.

मैत्रेय मुनि म्हणाले:—विदुरा, आकूति, देवहूति आणि प्रसूति ह्या तीन कन्या, व प्रियव्रत आणि उत्तानपाद हे दोन पुत्र, अशीं पांच अपत्यें शतरूपेपासून स्वायंभुव मनूला झालीं; तरी आपल्याला अधिक मुलें असावीं अशी त्याला इच्छा असल्यामुळें, आपली कन्या जी आकूति, ती रुचि ऋषीला देते वेळीं त्यानें आपल्या भार्येचें (शतरूपेचें) अनुमोदन घेऊन त्या ऋषीपासून असा ठराव करून घेतला कीं, 'हिला जो मुलगा होईल तो तुझा असें समजून मी तो तुला देईन.' पुढें त्या वेदवेत्त्या व ज्ञानसंपन्न ऋषीनें उत्तम प्रकारें ईश्वराचें आराधन केलें, व त्याच्या प्रभावानें प्रत्यक्ष भगवान विष्णूनें लक्ष्मीसहवर्तमान त्या ऋषीच्या भार्येच्या म्हणजे आकूतीच्या उदरीं अवतार धारण केला. पुढें तीं दोन्ही मुलें यज्ञ व दक्षिणा ह्या नांवांनीं प्रसिद्धीस आलीं. आपल्याला नातू झाला असें ऐकून स्वायंभुव मनूला फार आनंद झाला. पुढें तो मोठा झाला तशी त्याच्या गुणांची ख्याति होऊं लागली; व नंतर स्वायंभुव मनूनें त्याला आपल्या घरीं आणिलें; इकडे दक्षिणा ही आपल्या आईबापांजवळच राहिली. नंतर कांहीं काळ लोटल्यावर दक्षिणा उपवर झाली; तेव्हां, ती त्याची बहीण होती तरी ती लक्ष्मीचाच अवतार असल्यामुळें, विष्णवंश यज्ञानें तिजशीं विवाह केला. त्या वधूवरांत उत्तम प्रेम मावत असून त्यांस एकमेकांच्या समागमानें अत्यंत संतोष होत असे. पुढें त्या दंपत्यापासून तोष, प्रतोष, संतोष, भद्र, शांति, इडस्पति, इध्म, कवि, विभु, स्वन्ह, सुदेव आणि रोचन असे बारा पुत्र उत्पन्न झाले. ह्या मन्वंतरांत, स्वायंभुव मनूचे पराक्रमी पुत्र प्रियव्रत व उत्तानपाद, त्यांचे मुलगे, व त्याच्या मुलींचे मुलगे ह्यांनीं पृथ्वीचें पालन केलें. दक्षिणेचे जे बारा पुत्र सांगितले, ते ह्या मन्वंतरांत देव होते. त्या सर्वांस 'तुषित' ही सामान्य संज्ञा असे. यज्ञ हा देवेंद्र असून मरीच्यादिक हे ऋषि होते. विदुरा, मनूची दुसरी मुलगी देवहूति, जी कर्दमाला दिलेली होती, तिची कथा मीं तुला सांगितलीच आहे. प्रसूति ही स्वायंभुव मनूची तिसरी कन्या होय. ही ब्रह्मदेवाच्या दक्ष नामक पुत्राला दिली होती. तिची विस्तीर्ण संतति त्रैलोक्यभर पसरली आहे; असो. देवहूतीला नऊ मुली असून, त्या सर्व प्रजापतींस दिल्या होत्या; त्यांपैकीं मरीचि ऋषीची पत्नी जी कला, तिला कश्यप आणि पूर्णिमा असे दोन पुत्र झाले. ह्या मरीचि ऋषीच्या वंशानेंही सृष्टींतील लोकसंख्येची बरीच वृद्धि झाली. पूर्णिमाला विश्वग आणि विरज हे दोन पुत्र व देवकुल्या नामक कन्या अशीं तीन अपत्यें झालीं. देवकुल्येनें ईश्वराचे चरण धुतले, म्हणून ती जन्मांतरीं स्वर्गीची गंगा झाली.

दुसरी अनसूया, जी अत्रि ऋषीला दिली होती, तिला दत्त, दुर्वासा व सोम हे तीन महासमर्थ पुत्र झाले. हे अनुक्रमें विष्णु, शंकर व ब्रह्मदेव ह्यांचे अवतार होत.

विदुर म्हणाला:–हे मैत्रेय गुरो, ब्रह्मा, विष्णु व महेश हे जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करणारे असतां, त्यांना अत्रि ऋषीच्या घरीं अवतार घेण्याचें काय प्रयोजन?

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, अत्रि ऋषि मोठे ब्रह्मज्ञानी होते. त्यांना ब्रह्मदेवानें सृष्टि करण्याची आज्ञा केली. तेव्हां ते आपल्या पत्नीला घेऊन ऋक्ष नांवाच्या कुलपर्वतावर तपश्चर्या करण्याकरितां गेले. हा पर्वत फार रमणीय होता. त्यावर पुष्पगुच्छांनीं भरलेले पळसाचे व अशोकाचे अनेक वृक्ष असून निर्विंध्या नांवाची नदी झुळझुळ शब्द करीत त्यावरून वहात होती. तें पाहून पहाणाराच्या मनास अत्यंत समाधान होई. अशा पर्वतावर शीत–उष्ण, जय–अपजय, सुख–दुःख इत्यादिक द्वंद्वांचा त्याग करून, प्राणायामाच्या योगानें मनाचें संयमन करणाऱ्या त्या अत्रि ऋषीनें शंभर वर्षेपर्यंत एका पायावर उभें राहून, वायु भक्षण करीत तपश्चर्या केली. आपणास परमेश्वरासारखी संतति प्राप्त व्हावी अशी त्याची इच्छा होती, म्हणून त्यानें असें खडतर तप आरंभिलें. त्या समयीं, प्राणायामरूप इंधनाच्या योगानें प्रदीप्त झालेला अग्नि अत्रि ऋषींच्या मस्तकांतून निघून ब्रह्मांडाचा दाह करूं लागला असतां देवांना मोठें संकट पडलें. तेव्हां, ज्यानें इतकी खडतर तपश्चर्या केली, त्याचे मनोरथ पूर्ण करण्याकरितां ब्रह्मा, विष्णु व महेश हे, ज्या ठिकाणीं अत्रि ऋषि तपश्चर्या करीत होते तेथें हंस, गरुड व नंदी ह्या वाहनांवर बसून प्राप्त झाले. त्यांजबरोबर अप्सरा, ऋषि, गंधर्व, सिद्ध, विद्याधर व सर्प हेही तेथें आले. त्या कालीं त्यांस पाहून अत्रि ऋषीस फार आनंद झाला, व त्यांनीं मोठ्या उल्हासानें त्या देवांची पूजा करून त्यांची स्तुति करण्यास आरंभ केला.

अत्रि ऋषि म्हणाले:–देवहो, सत्त्व, रज व तम ह्या त्रिगुणांपासून जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करण्याकरितां अवतरलेले आपण त्रिवर्ग येथें आलां, हें पाहून मला फार आनंद होत आहे. आपणांस मी अभिवंदन करितों. पण, महाराज, मी पुत्रप्राप्तीची इच्छा धरून ज्याचें आराधन केलें, तो आपणां तिघांपैकीं कोण, हें मला सांगावें. महाराज, मी एकाचें आराधन करीत असतां आपण तिघे येथें प्राप्त झालां हें पाहून मला फार आश्चर्य वाटत आहे.

मैत्रेय म्हणतात:—विदुरा, अत्रि ऋषीचें तें भाषण ऐकून देवांना हसूं आलें, आणि मधुर वाणीनें ते त्यास म्हणाले, " मुनिश्रेष्ठा, तूं ज्या एका ईश्वराचें आराधन केलेंस, त्याचेच आम्ही अंशधारी आहों. तुझा संकल्प कधींही व्यर्थ होणार नाहीं. तुझें कल्याण असो. आतां लवकरच तुझ्या इच्छेप्रमाणें आमच्या अंशांपासून सुकीर्तिमान असे तीन पुत्र तुला होतील. " विदुरा, देवांनीं दिलेला आशीर्वाद ग्रहण करून अत्रि ऋषींनीं व अनसूयेनें त्यांचें पूजन केलें. नंतर ते देव आपआपल्या स्थानांप्रत निघून गेले. पुढें थोड्याच दिवसांनीं ब्रह्मदेवाच्या अंशापासून सोम, विष्णूच्या अंशापासून योगशास्त्रांत निपुण असा दत्त, व शंकराच्या अंशापासून दुर्वासा असे तीन पुत्र अनसूयेस झाले. विदुरा, आतां कर्दमाच्या श्रद्धा नांवाच्या कन्येचा वंशविस्तार तुला सांगतों: अंगिरा ऋषीला, त्याची पत्नी जी श्रद्धा तिच्या उदरीं चार कन्या आणि दोन पुत्र झाले. सिनीवाली, कुहू, राका व अनुमति हीं त्या कन्यांचीं नांवें, आणि उतथ्य व महासमर्थ ब्रह्मवेत्ता बृहस्पति हीं पुत्रांचीं नांवें होत. स्वारोचिष मन्वंतरांत हे प्रख्यात होते. विदुरा, कर्दमाची चौथी मुलगी हविर्भू, जी पुलस्त्याला दिली होती, तिला

अगस्त्य आणि विश्रवा असे दोन पुत्र झाले. त्यांपैकीं अगस्त्य हा दुसऱ्या जन्मीं जठराग्नि झाला. दुसरा पुत्र जो विश्रवा, त्याला त्याच्या इडविडा नामक पत्नीपासून एक पुत्र झाला. यक्षांचा राजा कुबेर तो हाच. विश्रव्याला केशिनी नांवाची दुसरी एक बायको होती. तिच्यापासून त्याला तीन पुत्र झाले. हेच रावण, कुंभकर्ण व बिभीषण ह्या नांवांनीं प्रसिद्धीस आले. गति नांवाच्या पांचव्या मुलीला, तिचा पति पुलह ह्याजपासून कर्मश्रेष्ठ, वरीयान् आणि सहिष्णु असे तीन पुत्र झाले. सहावी मुलगी क्रिया, जी क्रतु ऋषीला दिली होती, तिला साठ हजार पुत्र झाले. हेच वालखिल्य ऋषि होत. वसिष्ठाला कर्दमानें आपली सातवी कन्या ऊर्जा ही दिली होती. तिजपासून त्याला चित्रकेतु, सुरोची, विरजा, मित्र, उल्वण, वसुभृद्यान व द्युमान असे सात पुत्र झाले. वसिष्ठाच्या दुसऱ्या पत्नीपासून त्याला शक्ति आदिकरून पुत्र झाले. आठवी मुलगी चित्ति—अथर्वा ऋषीची पत्नी हिला दधीच नामक एकच पुत्र झाला. ह्याचें तोंड घोड्यासारखें असून हा मोठा व्रतवैकल्यें करणारा होता. विदुरा, कर्दमाची नववी मुलगी ख्याति ही भृगु ऋषीला दिली होती. तिला धाता, विधाता व कवि हे तीन पुत्र, व श्री नांवाची एक कन्या अशीं चार अपत्यें झालीं. ही श्री महाभगवद्भक्त होती. मेरूनें आपल्या दोन कन्या आयति व नियति ह्या धाता व विधाता ह्या दोन पुत्रांना दिल्या. त्यांपैकीं आयतीला मृकंड व नियतीला प्राण हे पुत्र झाले. पुढें मृकंडाला एक मुलगा झाला. हाच मार्कंडेय होय. प्राणालाही वेदशिरा नांवाचा एक पुत्र झाला. भृगूंचा तिसरा मुलगा जो कवि, त्यास शुक्र हा एकच मुलगा झाला. विदुरा, ह्याप्रमाणें कर्दम ऋषीच्या कन्यांचा वंश तुला सांगितला. ह्या वंशानेंही सृष्टीच्या लोकसंख्येमध्यें बरीच भर पडली.

## प्रसूतीचा वंश.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, स्वायंभुव मनूची तिसरी कन्या प्रसूति, जी दक्ष प्रजापतीला दिली होती, तिला सोळा कन्या झाल्या. त्यांपैकीं तेरा धर्माला दिल्या, एक अग्नीला दिली, एक पितरांना दिली, व एक शंकराला दिली. बुद्धि, मेधा, श्रद्धा, मैत्री, दया, शांति, क्रिया, तुष्टि, तितिक्षा, ऱ्ही, उन्नति, पुष्टि व मूर्ति ह्या तेरा धर्माला दिल्या. ह्यांपैकीं बाराजणींना एकेक मुलगा झाला. त्यांचीं नांवें अनुक्रमें अर्थ, स्मृति, शुभ, प्रसाद, अभय, सुख, योग, मुद, क्षेम, प्रश्रय, दर्प व स्मय हीं होत. तेरावी जी मूर्ति, तिला नरनारायण असे दोन पुत्र झाले. ह्यांच्या जन्मकाळीं सर्व जगांत आनंदीआनंद होऊन गेला. स्वर्गांत वाद्यें वाजूं लागलीं; गंधर्व आणि किन्नर पंचमस्वरांत गायन करूं लागले; अप्सरा नृत्य करूं लागल्या; देवांनीं पुष्पवृष्टि केली; मुनिजन मोठ्या प्रेमभरानें ईश्वराची स्तुति करूं लागले; फार काय सांगावें? पर्वत, नद्या व वृक्ष हे सुद्धां प्रसन्न होऊन गेले! त्या काळीं ब्रह्मदेव आदिकरून सर्व देवांनीं नरनारायणांची स्तुति केली: ते म्हणाले, "हे नरनारायणा, ज्याप्रमाणें, आकाशांत ढगें आलीं असतां त्यांविषयीं जशी कल्पना करावी तशीं तीं भासतात, त्याप्रमाणेंच, आपण आपल्या मायारूपानें निर्माण केलेलें हें जग भासत आहे. आज तुम्हीं धर्माच्या घरीं नरनारायणरूपानें अवतार घेतला आहे. तुमच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान होणें दुर्गम आहे; तुमच्या ब्रह्मतत्त्वाचेंही प्रत्यक्ष ज्ञान होणें दुर्लभच, परंतु शास्त्रांच्या उपदेशानें फक्त त्याचें अनुमान मात्र करितां येतें. प्रभो, आम्हांवर कृपा करा."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें देवांनीं त्या नरनारायणांची स्तुति केली, व ते देव आपआपल्या विमानांत बसून स्वर्गलोकीं निघून गेले. नंतर नरनारायण गंधमादन पर्वतावर तपश्चर्या करण्याक-

रितां गेले. त्यांनींच पुढें यादवांच्या व कौरवांच्या कुळांत अनुक्रमें कृष्ण व अर्जुन हे अवतार घेऊन भूमीचा भार हरण केला. दक्ष प्रजापतीची चौदावी मुलगी स्वाहा, जी अग्नीला दिली होती, तिला पावक, पवमान व शुचि असे तीन पुत्र झाले. हे तीघे अग्नीचे अभिमानी ( देवता ) असून होमद्रव्यांचें भक्षण करितात. ह्या तिघांपासून आणखी पंचेचाळीस अग्नि उत्पन्न झाले. हे पंचेचाळीस अग्नि, ह्यांचे तीन पितर, व एक पितामह मिळून एकुणपन्नास अग्नि होतात; ह्यांचींच नांवें घेऊन वेदवेत्ते पुरुष वैदिक कर्मांमध्यें आग्नेयी इष्टि करितात. दक्षानें आपली पंधरावी कन्या स्वधा ही पितरांना दिली होती. त्यांचीं नांवें अग्निष्वात्त, बर्हिषद, सौम्य, आज्यप, साग्नि, व अनग्नि हीं होत. ह्यांजपासून स्वधेला वयुना व धारिणी ह्या दोन मुली झाल्या. त्या शास्त्रीय आणि अनुभविक ज्ञानांत पारंगत असून ब्रह्मज्ञानाचा उपदेश करीत असत. दक्ष प्रजापतीनें आपली सोळावी मुलगी सती शंकराला दिली होती. आपल्या पतीचा कांहीं अपराध नसतां पित्यानें त्याचा अपमान केला म्हणून कुपित होऊन हिनें योगसामर्थ्यानें स्वतांच्या देहाचा त्याग केला.

## अध्याय दुसरा.

—:०:—

### दक्षाचा शिवाशीं द्वेष.

विदुर म्हणालाः—मैत्रेया, दक्षानें शंकराचा अपमान केल्यामुळें सतीनें देहत्याग केला असें आपण सांगितलें; पण, महाराज, दक्षानें शंकराचा अपमान करावा, असें कोणतें कृत्य शंकराकडून घडलें बरें? मुनिश्रेष्ठा, सासऱ्याचा व जांवयाचा इतका द्वेष उत्पन्न होण्याला काय कारण झालें तें सविस्तर निवेदन करावें.

मैत्रेय सांगतातः—विदुरा, पूर्वी एके वेळीं शिष्यांसह वसिष्ठादि महान महान ऋषि, परिवारासह सर्व देव, मुनि व अग्नि ह्या सर्वांना बोलावून सृष्टि करणाऱ्या प्रजापतींनीं एक सत्र करण्यास प्रारंभ केला. कांहीं वेळानें, सूर्याप्रमाणें देदीप्यमान असा दक्ष प्रजापति त्या ठिकाणीं आला; त्याच्या येण्यानें तो विस्तीर्ण यज्ञमंडप प्रकाशित झाला. त्या श्रेष्ठ पुरुषाला पाहून, ब्रह्मदेव आणि शंकर ह्या दोघांशिवाय सर्वजण उठून उभे राहिले; सर्वांचीं मनें त्या दक्षाकडेसच लागलीं; त्यांतील प्रमुखांनीं दक्षाचा उत्तम प्रकारें सत्कार केला; व तोही, सर्वांचा गुरु जो ब्रह्मदेव त्यास नमस्कार करून आपल्या आसनावर बसला. पण सर्वांनीं आपल्याला उत्थापन दिलें, परंतु शंकर हा जाग्यावरून हालला देखील नाहीं, असें पाहून दक्ष प्रजापति अत्यंत क्रोधायमान झाला, आणि विस्तवासारखे लाल डोळे करून शंकराकडे पाहूं लागला. त्या वेळीं सर्व सभासदांना वाटलें कीं, जणूं काय दक्ष हा शंकराला भाजीतच आहे! नंतर सर्व सभासदांसमक्ष तो शंकराला उद्देशून म्हणाला, "सभासदहो, मी जें आपणांस सांगणार आहें, तें अविचारानें किंवा मात्सर्यानें सांगतों असें समजूं नका. थोरांच्या वर्तनाविषयीं मी सांगत आहें. अहो, सर्व लोकपालांनीं मिळविलेल्या कीर्तीचा नाश करूं पाहणाऱ्या, व साधूंच्या आचरणाला कलंक लावणाऱ्या ह्या निर्लज्ज शंकरानें गर्वानें फुगून जाऊन माझा अपमान केला हें योग्य आहे काय? माझी कन्या सती ही सावित्रीच्या साम्यतेची आहे. तिच्याशीं ज्या अर्थी ह्यानें अग्नि आणि ब्राह्मण ह्यांसमक्ष विवाह केला आहे, त्या अर्थी हा माझा शिष्य होय. म्हणून ह्यानें मला उत्थापन देणें अवश्य होतें. अहो, ह्याची ही नीच स्थिति मला पूर्वींच माहीत होती; आणि ह्यामुळें माझी सुंदर आणि सुशील कन्या सती ही ह्यास देण्याचें माझ्या मनांत मुळींच नव्हतें. ह्याची स्थिति कशी आहे ती पहाः शुद्धता कशी असते ती ह्याच्या स्वप्नींही नाहीं; हा नेहमीं भूत-

गणांना व प्रेतांना बरोबर घेऊन भयंकर स्मशानांत नागवा उघडा फिरत असतो; ह्याचे केंस पिंजारलेले असतात; हा स्मशानांतील राख अंगाला फांसून मनुष्यांच्या हाडांच्या माळा गळ्यांत अडकवितो; भृंगापानानें उन्मत्त होऊन हा सदैव भटकत असतो; ज्यांचीं शरिरें म्हणजे केवळ तमोगुणाच्या मूर्ति, त्या प्रमथादिकांचा हा राजा; हा नेहमीं धुंदींत असतो; ह्याला प्रिय कोण म्हणाल तर कैफी लोक! ह्याला शिव हें नांव मात्र आहे; वास्तविकपणें हा अशिवाची मूर्ति होय! ह्याचे नेत्र पहा कसे माकडाच्या नेत्रांप्रमाणें दिसत आहेत; ह्याला ती माझी हरिणाक्षी आणि अत्यंत सुकुमार अशी कन्या शोभते तरी का? पण ह्या ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून मीं ती ह्याला दिली; आणि आतां मात्र त्या गोष्टीविषयीं मला फार पश्चात्ताप होत आहे."

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, अशा प्रकारें दक्ष प्रजापति मोठ्या क्रोधानें बोलत असतां शंकर एक शब्दही बोलले नाहींत; ते अगदीं शांतवृत्तीनें बसले होते. पण त्यांच्या स्वस्थ बसण्यानें दक्षाचा क्रोध अनावर होऊन त्यानें त्यांस शाप देण्याकरितां हातांत उदक घेतलें, आणि म्हटलें, "अहो, देवांमध्यें हा शंकर अधम आहे, म्हणून ह्याला इतर देवांबरोबर हविर्भाव मिळणार नाहीं." विदुरा, ह्याप्रमाणें शाप देऊन दक्ष प्रजापति तेथून निघून गेला. त्या वेळीं, असें अनुचित कर्म करूं नको म्हणून पुष्कळांनीं त्यास सांगितलें, पण तिकडे मुळींच लक्ष न देतां त्यानें शाप दिलाच. त्या शापाच्या योगानें नंदिकेश्वराला फार क्रोध आला, व त्यानेंही दक्ष प्रजापतीस उलट शाप दिला: तो म्हणाला, "ह्या गर्विष्ठ दक्षानें, कोणाचाही द्वेष न करणारा जो भगवान शंकर त्याशीं विमुख होऊन त्याचा व्यर्थ अपमान केला, ह्यास्तव हा अज्ञानी राहून मोक्षापासून विमुख होईल; कर्ममार्गांतील वचनें सत्य मानून, कपटाचरणानें भरलेल्या गृहस्थाश्रमांतच हा पशूप्रमाणें विषयलंपट होऊन राहिला आहे, व आत्म्याची ओळख विसरला आहे, म्हणून हा स्त्रीलंपट होईल; आणि ह्यानें मत्त बोकडाप्रमाणें वर्तन केल्यामुळें लवकरच ह्याचें मुख बोकडाप्रमाणें होईल!" विदुरा, नंतर तो नंदिकेश्वर, ज्या ब्राह्मणांनीं मुग्ध राहून अप्रत्यक्ष रीतीनें शंकराच्या निंदेस अनुमोदन दिलें, त्यांस शाप देण्यास सिद्ध झाला. तो म्हणाला, "अहो, कर्मकांड हा केवळ अज्ञानाचा प्रकार असतां, त्यालाच तत्त्वज्ञान समजून शंकराचा अपमान करणाऱ्या ह्या मूर्ख दक्षाच्या निंद्य कृत्याला ज्या ज्या ब्राह्मणांनीं अनुमोदन दिलें, ते सर्व जन्ममरणांचीं दुःखें भोगतील! कर्ममार्गाची प्रशंसा करणाऱ्या वेदांतील वाक्यांनीं दक्षानुयायी ब्राह्मणांचीं अंतःकरणें मूढ झाल्यामुळें ते शंकराचा द्वेष करूं लागले, ह्यास्तव ते असेच मूढ राहतील; त्यांस भक्ष्याभक्ष्याचा विचार राहणार नाहीं; कुटुंब व आत्मपोषण हेंच खरें सुख मानून त्याकरितांच ते विद्या, तप आणि व्रतें आचरतील; आणि शरीर व इंद्रियें ह्यांनाच प्रिय मानून हे पृथ्वीवर भिक्षा मागत फिरतील!"

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ब्राह्मणसमुदायास दिलेले हे शाप ऐकून भृगु ऋषींनींही शिवभक्तांना दुर्धर शाप दिले: ते म्हणाले, "शंकराचीं व्रतें पाळणारे किंवा त्यांचे अनुयायी हे सर्व सच्छास्त्राचे शत्रु व पाखंडी होवोत! शिवदीक्षेमध्यें सुरा, आसव वगैरे फार पूज्य मानिलीं जातात; म्हणून अपवित्र, अज्ञानी आणि शरिरावर जटा, भस्म व अस्थि धारण करणारे लोक ह्या मार्गांत शिरतील! चारही वर्णांच्या धर्ममर्यादा ब्राह्मण आणि वेद ह्यांच्या योगानें सुरळीत चालल्या आहेत; असें असतां तुम्ही त्यांची निंदा करितां, त्या अर्थीं तुम्ही पाखंडी आहां; वेद हा कधींही नष्ट न होणारा अत्यंत शुद्ध व पुण्यकारक धर्ममार्ग होय. त्याची तुम्ही निंदा करितां,

ह्यास्तव भूताधिपति हाच ज्याचें मुख्य दैवत अशा वेदविरुद्ध पाखंड मार्गामध्यें तुम्ही प्रविष्ट व्हा!"

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, भृगु मुनींनीं दिलेले हे शाप ऐकून भगवान शंकराला किंचित् वाईट वाटलें, व अनुचरांसहित तो तेथून निघून गेला. नंतर, प्रजापतींनीं सहस्र वर्षांचें सत्र आरंभिलें होतें तें आपल्या संकल्पाप्रमाणें उत्तम प्रकारें सिद्धीस नेलें, व गंगा आणि यमुना ह्यांच्या संगमावर अवभृथ स्नानें करून तेथून ते आपआपल्या स्थानीं गेले.

# अध्याय तिसरा.

—:०:—

## दक्षयज्ञ.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, नंतर ते सासरे-जांवई बराच कालपर्यंत एकमेकांशीं द्वेष धरून होते. कोणत्याही यज्ञांत दक्षानें शंकरास हविर्भाग दिला नाहीं. दक्षास शंकराशीं द्वेष करण्याला अपमान हें एकच कारण झालें होतें असें नाहीं; तर गर्व हें दुसरें कारण झालें होतें. कारण, दक्षाला ब्रह्मदेवानें सर्व प्रजापतींचें आधिपत्य दिलें होतें. दक्ष प्रजापतीनें शास्त्रनियमाप्रमाणें प्रथम वाजपेय यज्ञ करून नंतर बृहस्पतिसव ह्या नांवाचा यज्ञ करण्यास आरंभ केला. त्या वेळीं त्यानें सर्व ब्रह्मर्षि, देवर्षि, पितर व देवता ह्यांना पत्न्यांसह व भृत्यांसह बोलावून त्यांचा योग्य सत्कार केला; परंतु त्यानें शंकराला व त्याच्या भक्तांना केवळ बोलाविलेंही नाहीं; इतकेंच नव्हे, तर आपली प्रियकन्या जी शंकराची पत्नी सती, तिलाही त्यानें आमंत्रण केलें नाहीं. दक्षाच्या घरीं यज्ञसमारंभ आहे ही गोष्ट, स्वर्गांत देव एकमेकांशीं बोलत होते त्यावरून सतीला कळली. पुढें कांहीं वेळानें तिला दिसून आलें कीं, चारही दिशांकडून देवगंधर्वादि सर्वजण आपापल्या स्त्रियांसहवर्तमान मोठ्या थाटानें आणि औत्सुक्यानें सुंदर अशा विमानांत बसून अत्यंत त्वरेनें तिकडेच जात आहेत. तें पाहून, आपणही माहेरीं जावें अशी उत्कट इच्छा सतीला झाली, व तिनें मोठ्या युक्तीनें भगवान शंकरापाशीं ती गोष्ट काढिली.

### सतीची शंकरास विनंती.

सती म्हणाली:—प्रियकरा, माझ्या पित्याच्या घरीं मोठ्या थाटानें यज्ञसमारंभ होत आहे. त्या ठिकाणीं सर्व देव आपापल्या पत्न्यांसह जात आहेत. ह्या वेळीं माझ्या सर्व बहिणी आपापल्या पतींसह त्या समारंभास आल्या असतील. मलाही माहेराहून आल्याला फार दिवस झाले आहेत. तेव्हां, ह्या वेळीं तेथें गेल्यानें आईची भेट होईल, माहेरचीं इतर सर्व माणसें भेटतील, आणि अनायासें यज्ञसमारंभही पहावयास सांपडेल. शिवाय, देव, ऋषि, गंधर्व व अप्सरा आणि त्यांचा मोठा लवाजमा ह्यांनीं माझ्या पित्याची नगरी अगदीं गजबजून गेली असेल. अशा प्रकारचें माझ्या पित्याचें ऐश्वर्य पाहून मला किती तरी आनंद वाटेल म्हणून सांगू! महाराज, ती मौज पहाण्यासाठीं माझें अंतःकरण कसें अगदीं उतावीळ होऊन गेलें आहे. आतां, माझ्या पित्यानें आपणांस बोलाविलें नाहीं अशी आपण शंका घ्याल, तर मित्रांच्या, पालकांच्या, गुरूंच्या आणि आईबापांच्या घरीं त्यांनीं न बोलावितांही जाण्यास हरकत नाहीं. म्हणून आपण दोघेंही जाऊं. देवाधिदेवा, आपण दयाळू आहां; दुसऱ्याचें दुःख निवारण करण्याविषयीं आपण नेहमीं तत्पर असतां; आपल्या अंगीं असलेल्या दीनवात्सल्याची साक्ष आपला 'नील' कंठच देत आहे. माझ्या माहेरीं एवढा मोठा समारंभ असतां मी तेथें नाहीं म्हणून मला फार वाईट वाटत आहे. भगवन्, जगांतील सर्व कौतुक आणि

आश्चर्य मायेनें निर्माण केलेलें आहे; पण आपण सर्वज्ञ असल्यामुळें त्या मायेच्या मिथ्या पसाऱ्यापासून आपल्याला मोह पडत नाहीं. तेव्हां आपणांस ह्या समारंभाचें कांहीं विशेष वाटणार नाहीं; पण, देवा, मी अज्ञान आहें. ज्याप्रमाणें ह्या मिथ्या संसारांत आपल्याला सुख वाटत नाहीं, त्याप्रमाणें माझी स्थिति अद्याप झाली नाहीं. माहेरीं जाण्याविषयीं माझें अंतःकरण कसें तिळतिळ तुटत आहे. महाराज, ह्या अर्धांगीवर हा एवढा अनुग्रह करावाच.

मैत्रेय म्हणतातः—विदुरा, अशा प्रकारें आपल्या प्रिय पत्नीचें भाषण ऐकून, दक्षानें सर्व प्रजापतींच्या समक्ष जे मर्मभेदक वाग्बाण मारिले होते, त्यांचें शंकरांस स्मरण झालें आणि ते हसत हसत सतीशीं बोलूं लागले.

### सतीचा निषेध.

शंकर म्हणालेः—प्रिये, तुझा स्वभाव चांगला आहे, म्हणून तुला सर्व जग चांगलें दिसतें. सज्जन आपल्या आप्तांच्या घरीं बोलावणें नसतांही जातात ही गोष्ट खरी, पण त्या आप्तांना प्रेम आणि अगत्य असेल तर! जर ते आपल्याच ताठ्यांत असून अभिमानानें दुसऱ्याचा उपमर्द करीत असतील, तर काय उपयोग? प्रिये, तुझा पिता देहाभिमानानें अंध झालेला आहे. त्याला विवेकज्ञान मुळींच नाहीं. तपश्चर्या, विद्या, धन, सुदृढ शरीर, कुल, सत्ता इत्यादि गोष्टींच्या अनुकूलतेनें त्याला पराकाष्ठेचा गर्व झाला आहे. त्याला ह्या गोष्टींचा चांगला उपयोग करतां आला नाहीं; सत्पुरुष ह्यांचा उपयोग चांगल्या रीतीनें करितात. नमस्कार, आदरातिथ्य, नम्रता, बहुमान ह्या गोष्टी सत्पुरुष परमेश्वरबुद्धीनेंच करतात, देहबुद्धीनें करीत नाहींत. म्हणून, आदरातिथ्य हें मनानें केलें तरी चालतें, प्रत्यक्षच केलें पाहिजे असें नाहीं. देहाभिमानी पुरुषांस त्यांतील रहस्य कळत नाहीं. प्रजापतींनीं केलेल्या सत्राच्या वेळीं तुझा पिता सभेमध्यें आला, तेव्हां मीं आपल्या मनानें त्याचा सत्कार केला होता; परंतु त्या देहाभिमानी मूर्खास त्याचा विचार न होऊन, तो मला अनान्वित दुरुत्तरें बोलला आणि शाप देऊन निघून गेला; तेव्हां अशांच्या घरीं ते आप्त असले तरी जाणें योग्य नव्हे. प्रिये, शस्त्रप्रहारांचे वण बुजतात, पण शब्दप्रहारांचे वण बुजत नाहींत. तुझ्या पित्यावर तुझें प्रेम असणें साहजिक आहे; पण, सखे, माझ्याशीं तो द्वेषभावानें वागत असल्यामुळें तुला तेथें मान मिळणार नाहीं. म्हणून तूं तेथें जाण्याची इच्छा करूं नको. कदाचित् तूं म्हणशील कीं, पित्याच्या समजुतीप्रमाणें तुम्ही उठून कां उभे राहिला नाहीं? तर, मी कोणत्याही पुरुषाला शरिरानें मान देत नाहीं; कारण, जो सर्वत्र भरलेला, त्या ईश्वराचेंच मी नेहमीं चिंतन करितों, व शुद्ध अंतःकरणानें इंद्रियें अंतर्मुख करून त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न वासुदेवाचेंच निरंतर नमस्कारानें आराधन करीत असतों. असो; आतां माझें तुला इतकेंच सांगणें आहे कीं, जरी तुला दक्षानें जन्म दिला आहे, तरी तो माझा शत्रु झाला आहे, म्हणून तू त्याच्या घरीं जाऊं नको; इतकेंच नव्हे, तर त्याच्या सेवकांचें किंवा तत्पक्षीय मंडळीचें मुखावलोकनही करूं नको. संभावितांचा आप्तजनांकडून अपमान झाला असतां, जिवंत राहण्यापेक्षां मरण बरें, असें त्यांस वाटूं लागतें. ह्याउपर माझा शब्द मोडून गेलीस, तर त्यांत तुझें कल्याण होणार नाहीं.

## अध्याय चौथा.

—:०:—

### सतीचें दक्षगृहीं गमन.

मैत्रेय म्हणालेः—विदुरा, ह्या वेळीं शंकरांच्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली होती. त्यांना वाटलें कीं, सतीला जाण्यास आज्ञा द्यावी तर, दक्षानें अपमान केला म्हणजे ती क्रोधानें जीव

देणार; बरें, आज्ञा देऊं नये तर ती संतापानें लागलेच प्राण सोडणार; तेव्हां आतां कांहींच न बोलतां स्वस्थ बसावें हेंच चांगलें; असा विचार करून ते अगदीं स्तब्ध राहिले. इकडे सतीचें मन अगदीं गोंधळून गेलें; काय करावें हें तिला सुचेना. आप्तजनांची भेट होऊन अपूर्व समारंभ पाहण्यास सांपडेल ह्या आशेनें एकदा ती जाण्यास निघे; पण आज्ञाभंगामुळें पतीला कोप येईल असें वाटून तिचें मन तिला फिरून मागें ओढी. अशा स्थितींत ती ढळढळां रडूं लागली, व माहेरच्या माणसांविषयीं अनिवार प्रेमामुळें अखेरीस तिला शंकराचा फार राग आला. तिचें अंग थरथर कांपूं लागलें, व नेत्र क्रोधानें अगदीं लाल झाले. तिनें शंकराकडे इतक्या उग्र मुद्रेनें पाहिलें कीं, जणूं काय ती त्या अप्रतिम पुरुषाला भाजीत आहे असें सर्वांस वाटलें. शेवटीं, ज्यानें तिला आपली अर्धांगी केली, त्या श्रेष्ठ पुरुषाला सोडून, क्रोधावेशानें सुस्कारे टाकीत झपाट्यानें ती आपल्या पित्याच्या घरीं जाण्यास निघाली. तिनें वाहनाची सुद्धां अपेक्षा केली नाहीं. पण भगवती सती पायीं जात आहे, असें पाहून शंकराच्या अनुचरांना वाईट वाटलें; व लगबगीनें धावत जाऊन त्यांनीं तिची प्रार्थना केली आणि तिला नंदिकेश्वरावर बसवून ते सर्व तिच्या समागमें निघाले. नंतर नौबदी, शंख, मुरल्या, चेंडू, आरसे, कमळें, छत्रें, चामरें, माळा वगैरे सर्व सरंजाम बरोबर घेऊन मोठ्या थाटानें सतीची स्वारी यज्ञमंडपांत येऊन थडकली. तेथें देव, ऋषि, यक्ष, गंधर्व व किन्नर ह्या सर्वांच्या योगानें तो सभामंडप फार सुशोभित दिसत होता; व जरी तेथें पशुहिंसाकर्म चाललें होतें, तरी मृत्तिका, काष्ठ, लोह, सुवर्ण इत्यादिकांच्या पात्रांनीं व ऋत्विजांच्या वेदघोषानें तें शोभून गेलें होतें. सतीच्या आगमनानें कोणासच आनंद झाला नाहीं; आणि झाला असला तरी, प्रत्यक्ष दक्षानेंच तिचा आदरसत्कार न केल्यामुळें, कोणासच उघडपणें तिचा गौरव करतां येईना. फक्त तिच्या बहिणींना व आईला मात्र अतिशय आनंद झाला. त्यांनीं तिला प्रेमानें आलिंगन दिलें. त्या वेळीं त्यांच्या नेत्रांतून प्रेमाश्रूंचे पूर वाहूं लागले. पण यज्ञमंडपांत प्रत्यक्ष पित्यानें अनादर केल्यामुळें, आई, बहिणी इत्यादिकांनीं आदर केला तरी तो तिला प्रिय वाटला नाहीं. तिचें मन खिन्न झालें. शिवाय पुढें तिला असेंही दिसून आलें कीं, ह्या यज्ञांत, आपला पति जो शंकर त्यास दक्षानें हविर्भागही दिला नसून उलट तो त्याची निंदाच करीत आहे. हें पाहून तिला फार राग आला व तिचे नेत्र अगदीं लाल झाले. त्या वेळीं ती जगाचा संहार करणाऱ्या देवतेप्रमाणें दिसूं लागली. तिच्याकडे कोणाच्यानेंही पाहवेना. इतक्या थरावर गोष्ट आली तरी, कर्माभ्यासाच्या गर्वानें फुगून गेलेल्या दक्षाच्या तें ध्यानींमनींही नाहीं, हें पाहून शंकराच्या गणांस क्रोध आला व ते त्याचा प्राण घेण्यास सिद्ध झाले; पण सतीनें त्यांना आवरून धरिलें, व क्रोधानें दांत ओंठ चावून ती सर्वांसमक्ष

## दक्षाची निर्भर्त्सना

करून त्याला बोलूं लागली, "हे अधमा, सर्व जगांत जो अत्यंत श्रेष्ठ, ज्याला आपपरभाव नसून सर्वांवर जो समदृष्टीनें प्रेम ठेवितो, आणि ज्याच्या चरणरजाचीही योग्यता ह्या तुझ्या प्रेतवत् शरिरास नाहीं, त्या महात्म्या शंकराचा तूं द्वेष करितोस काय? अरे, जगामध्यें चार प्रकारचे लोक असतात: जे दुसऱ्यांचे क्षुल्लक गुण देखील मोठे करून त्यांचें वर्णन करितात, ते श्रेष्ठ होत; जे दुसऱ्यांचे गुण तेवढेच घेऊन दोषांचा उच्चारही करीत नाहींत, ते सत्पुरुष होत; जे सारासार विचार करून गुणांस गुण व दोषांस दोष म्हणतात, ते सामान्य पुरुष होत; आणि जे गुणांना दोषदृष्टीनें पाहतात, ते तुझ्यासारखे नीच, अधम आणि दुष्ट बुद्धीचे होत; तेव्हां तूं शंकराविषयीं मत्सरबुद्धि धारण केलीस, हें तुला योग्यच आहे!

अरे, प्रेततुल्य शरिरालाच आत्मा म्हणून समजणाऱ्या तुझ्यासारख्या मूर्खांनीं शंकरासारख्या साधुपुरुषांची कितीही निंदा केली, तरी त्यांची योग्यता यत्किंचित् तरी कमी होण्याचा संभव आहे का? तुझ्या हातून व्यर्थ बडबड करण्यापलीकडे जास्त तें काय होणार आहे? अरे, ज्याच्या 'शिव' ह्या कल्याणकारक नांवाचा नकळत नुसता उच्चार झाला तर सर्व पापें भस्म होऊन जातात, अशा त्या ईश्वराचा तूं द्वेष करतोस, तेव्हां तुला काय म्हणावें! ज्याच्या चरणकमलांचा मकरंद प्राप्त व्हावा म्हणून साधूंचीं मनें भ्रमरांप्रमाणें तेथें गुंजारव करीत राहतात, आणि ज्याच्या कीर्तीचें केवळ श्रवण करण्यानेंच चारही पुरुषार्थ साध्य होतात, त्या जगन्नायक प्रभूशीं द्वेष करून तुझें कधींही कल्याण होणार नाहीं! शंकर आपल्या जटा मोकळ्या सोडून अंगाला चिताभस्म लावितो आणि हडकांच्या माळा गळ्यांत घालून भूतगणांबरोबर नागवा उघडा संचार करतो म्हणून तो अपवित्र आहे अशी त्याची तूं निंदा करतोस; पण ब्रह्मदेव आदिकरून मोठमोठे देव, हें सर्व जाणत असूनही, त्याच्या चरणांवरून खालीं पडलेला निर्माल्य आपल्या मस्तकीं धारण करितात, हें लक्षांत आण. ह्यावरूनच सिद्ध होतें कीं, तुजसारख्या पशूंना शंकराची योग्यता कळत नाहीं. अशा निंदकांची जिव्हा तात्काळ छेदन करून टाकावी; अथवा हे असले अमंगल शब्द कानीं पडल्याबरोबर, ज्या ह्या पंचभूतात्मक शरिरामुळें हा त्रास सोसावा लागला, त्याचा त्यागच करावा; किंवा ज्याच्या हातून ह्या दोन्ही गोष्टी होत नसतील, त्यानें लागलीच निघून तरी जावें, हें उचित होय."

### सतीचा देहत्याग.

सती पुढें म्हणते:—दक्षा, ज्या अर्थीं तूं त्या नीलकंठाची निंदा करतोस, त्या अर्थी तुजपासून उत्पन्न झालेल्या ह्या शरिराचा मी त्याग करणार! दक्षा, ज्याप्रमाणें देवांची गति आकाशांत आणि मानवांची पृथ्वीवर, त्याचप्रमाणें धर्मांची गोष्ट आहे: कोणी प्रवृत्तिमार्गानें चालतात, कोणी निवृत्तिमार्ग स्वीकारतात. वेदामध्यें दोन्ही मार्गांचा विचार केलेला आहे, म्हणून ते दोन्ही खरे आहेत. ह्याकरितां, कोणी कोणत्याही मार्गानें गेला, तरी एकानें दुसऱ्याची निंदा करणें योग्य नाहीं. कारण, ह्या दोन्ही मार्गांपासून आत्मप्राप्ति ही एकच गोष्ट साधावयाची आहे. हे मार्ग एकमेकांपासून अगदीं भिन्न असल्यामुळें, एकाच वेळीं दोहोंचें आचरण होणें शक्य नाहीं. आतां तूं म्हणशील कीं, ह्या दोहोंपैकीं एकाचें तरी शंकर कोठें आचरण करतो? तर, ज्याकरितां ह्या दोन्ही मार्गांचें वेदांनीं प्रतिपादन करून ठेविलें आहे, त्या आत्मस्वरूपींच जर तो नेहमीं रममाण असतो, तर त्याला कोणत्याही मार्गांत राहण्याचें काय कारण आहे? दुसरें असें कीं, सर्व कर्मांचा त्याग केल्यावांचून आत्मप्राप्ति होत नाहीं, अशी वास्तविक स्थिति असतां, हे कर्ममार्गी कर्मठ लोक यज्ञशाळेंत राहून, तेथील अन्न भक्षण करणाऱ्या धूममार्गी लोकांकडून नेहमीं आपला स्तुतिपाठ होत असलेला ऐकून गर्विष्ट होतात; व ह्यामुळें कर्मांत जास्तच गढून जाऊन त्यांच्याकडून कर्मांचा त्याग कधींच होत नाहीं. अर्थात् सर्वसंगपरित्याग केलेल्या लोकांप्रमाणें त्यांना उत्तम गति केव्हांही मिळत नाहीं. म्हणून, दक्षा, तुला ती गति मिळणार नाहीं; तूं अशीच सज्जनांची निंदा करीत राहणार! तूं माझ्या प्रिय पतीची निंदा आणि अवहेलना केली आहेस, तर तुझ्यापासून उत्पन्न झालेल्या ह्या माझ्या निंद्य शरिराचा मी त्याग करणार. मला ह्याचा अगदीं कंटाळा आला आहे. दक्षा, ज्या ज्या वेळीं भगवान शंकर तुझ्या नांवाचा संबंध जोडून 'दाक्षायणी' ह्या नांवानें मला हांक मारितील, त्या त्या वेळीं मला त्या नांवाची लाज वाटून खालीं तोंड करावें लागेल! त्यापेक्षा

हें प्रेतवत् शरीर नसलें तर काय गेलें? मी आतांच ह्याचा त्याग करतें!"

मुनिवर्य मैत्रेय सांगतात:—हे कुरुश्रेष्ठा, असें म्हणून लागलीच सती पिवळें वस्त्र नेसून उत्तरेकडे तोंड करून बसली, आणि आचमन करून तिनें मौन धारण केलें, व योगशास्त्राप्रमाणें समाधि लावण्याचा क्रम सुरू केला. तिनें प्रथम आसन निश्चल करून प्राण व अपान हे दोन वायु नाभिस्थानीं एकत्र केले. नंतर त्यांना ऊर्ध्वगति देऊन नाभिचक्रावरून हृदयांत आणिले, व बुद्धीसह त्यांस तेथेंच स्थिर केलें. मग तिनें हळूहळू तेथून कंठमार्गानें ते ललाटस्थानीं नेले. भगवान शंकराच्या सहवासानें ती योगशास्त्रांत निष्णात झाली होती; ह्यास्तव तिनें लागलीच योगसामर्थ्यानें अग्नि उत्पन्न करून तो आपल्या शरिरावर धारण केला. विदुरा, ह्या सतीची योग्यता काय सांगावी! जगांतील सर्व सत्पुरुषांमध्यें श्रेष्ठ जो शंकर, त्यानें ज्या शरिराला वारंवार आपल्या अंकावर घेतलें होतें, त्या शरिराचा तिनें दक्षाच्या संबंधामुळें त्याग केला! तिनें समाधि लावून, आपला पति जो जगद्गुरु भगवान शंकर त्याच्या चरणीं सर्व लक्ष लाविलें. शंकराशिवाय तिला कांहीं दिसत नव्हतें आणि भासतही नव्हतें. योगसाधनानें आणि शिवभजनानें तिचीं सर्व पापें नाहींतशीं झालीं, व समाधियोगापासून उत्पन्न झालेल्या अग्नीनें तिचा देह प्रज्वलित झाला. तेव्हां सभामंडपांतील आणि सर्व नगरींतील लोक हाहाकार करूं लागले व त्यांच्या शोकानें सर्व आकाश दणाणून गेलें. देवश्रेष्ठ जो भगवान शंकर, त्याच्या प्रिय पत्नीचा दक्षानें भरसभेंत अपमान केला, म्हणून हा भयंकर प्रकार घडला असा सर्व लोक दक्षाला दोष देऊं लागले. कित्येक म्हणूं लागले कीं, अशा थोर मनाच्या स्त्रीचा अपमान केला, तेव्हां दक्ष प्रजापतीइतका दुष्ट प्राणी जगांत कोणीही नसेल. ह्यानें परब्रह्मस्वरूपी शंकराचा अपराध करून, त्याची पत्नी प्राण देण्यास तयार झाली तरी तिचें निवारण केलें नाहीं. अशा अनेक प्रकारांनीं लोक बोलताहेत तों सतीनें प्राणांचा त्याग केला! हा भयंकर प्रकार पाहून शंकराचे पार्षदगण क्रोधायमान झाले, आणि ते दक्षाला मारण्यास पुढें सरले. तेव्हां ज्ञानसंपन्न भृगु मुनींनीं यज्ञांतील विघ्नांचा नाश करणारे मंत्र म्हणून दक्षिणाग्नींत आहुति दिल्या. त्याबरोबर, ज्यांना पूर्वीं तपश्चर्येच्या योगानें सोमरस मिळाला होता, ते देदीप्यमान ऋभु नांवाचे सहस्त्रावधि देव तेथें उत्पन्न झाले, आणि त्यांनी शंकराच्या गणांना मारण्यास सुरुवात केली; त्यामुळें ते सर्व दशदिशांकडे पळून गेले.

## अध्याय पांचवा.

—:०:—

### वीरभद्राचा अवतार व दक्षयज्ञाचा विध्वंस.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, दक्ष प्रजापतीनें सतीचा अपमान केल्यामुळें तिनें प्राण दिला, व ऋभु नांवाच्या देवांनीं शंकराच्या गणांस पळवून लाविलें, हें वर्तमान नारदानें शंकरास कळविलें. तें ऐकतांच शंकरास फार क्रोध आला, आणि आपल्या जटांतून विद्युल्लतेसारखी तेजस्वी अशी एक जटा उपटून त्यानें भूमीवर आपटली. त्याबरोबर, प्रचंड शरिराचा, मेघासारख्या कांतीचा व सहस्त्र भुजांचा असा एक पुरुष त्या जटेंतून उत्पन्न झाला. त्याचें मस्तक आकाशाला लागत असून, त्यानें आपल्या कंठांत नरकपाळांच्या माळा धारण केल्या होत्या. त्याच्या जटा प्रज्वलित अग्नीप्रमाणें दिसत असून, त्यानें आपल्या हातांत नानाप्रकारचीं आयुधें धारण केलीं होतीं. त्यानें हात जोडून शंकराची प्रार्थना केली, "महादेवा, मीं आपलें कोणतें कार्य करावें त्याविषयीं मला आज्ञा व्हावी." शंकर म्हणाले, "हे पराक्रमी पुरुषा वीर-

भद्रा, तूं माझ्या अंशापासून उत्पन्न झाला आहेस, त्या अर्थी तूं माझ्या सैन्याचें आधिपत्य स्वीकारून दक्ष प्रजापतीचा वध कर, आणि त्याच्या यज्ञाचा विध्वंस करून टाक."

मैत्रेय सांगतात:–विदुरा, शंकराची ही आज्ञा ऐकतांच वीरभद्रानें त्याला प्रदक्षिणा घातली, आणि भयंकर गर्जना करीत तो दक्षाकडे जाण्यास निघाला. त्याच्या अंगांत इतकी वीरश्री संचरली होती कीं, त्या वेळीं त्याच्याकडे वक्रदृष्टि करून पाहण्याची प्रत्यक्ष काळाचीही छाती नव्हती! त्याच्या पावलांच्या दणदणाटानें भूमंडळ हदरूं लागलें. असा तो वीरभद्र त्रिशूल हातीं घेऊन दक्षाकडे जाण्यास निघाला, तेव्हां शंकराचे पार्षदगणही मोठमोठया आरोळ्या मारीत त्याच्या मागून निघाले. इकडे यज्ञमंडपांत अशुभ चिन्हें होऊं लागलीं: धुळीनें सर्व आकाश भरून जाऊन अंधार पडला; वारा अगदीं बंद झाला; व प्रलयकाल समीप आला कीं काय असें वाटूं लागलें. तेव्हां ऋत्विज, यजमान, सदस्य, ब्राह्मण, ब्राह्मणस्त्रिया वगैरे सर्व चिंतेंत पडलीं. भावी अनर्थाची यथार्थ कल्पना त्यांस होईना. परचक्रादि येणार अथवा धेनूंस वगैरे कोणी चोरणार असें म्हणावें, तर प्राचीनबर्हि राजा जिवंत असल्यामुळें असला उपद्रव करण्याची कोणाचीही छाती नाही असा त्यांचा दृढ ग्रह होता. असो. त्या प्रसंगीं दक्षाची पत्नी प्रसूति व इतर स्त्रिया ह्यांचीं अंतःकरणें खिन्न झालीं. विदुरा, त्या काळीं त्या मंडळींत असे उद्गार ऐकूं येऊं लागले: "दक्षानें सतीचा अपमान केल्यामुळें तिनें प्राणत्याग केला, त्याचेंच हें फळ आहे. दक्षाच्या ह्या कृतीनें शंकराला फार क्रोध आला असेल. तो पुरुष किती उग्र आहे, ह्याची कल्पना प्रलयकालच्या त्याच्या नृत्यावरून चांगली करतां येईल. त्या वेळीं तो आपला जटाभार मोकळा सोडतो, आणि त्रिशूलावर मोठमोठया दिग्गजांना अडकवून अट्टहास्यानें मेघगर्जनेप्रमाणें भयंकर आरोळ्या मारून जेव्हां दशदिशांचे तुकडे उडवीत नाचत असतो, तेव्हां त्याचें तेज कोणालाही सहन करवत नाहीं. त्या वेळचें त्याचें नुसतें वर्णन ऐकलें तर काळीज फाटून जातें! त्यांतून त्यानें रागानें भुंवया चढविल्या म्हणजे त्याच्याकडे पाहून प्रत्यक्ष काळाचीही बोबडी वळते, व ब्रह्मदेवाचें सुद्धां अंतःकरण थरारून जातें; मग तेथें दक्षाची काय कथा!"

असो. ह्याप्रमाणें, ज्याला जें सुचेल तें बोलून सर्वजण दक्षाला दोष देत आहेत, इतक्यांत पृथ्वीवर आणि आकाशांत सहस्रावधि उत्पात होऊं लागले, व ते पाहून दक्षही मनांत दचकला; तों शंकराच्या नानाविध अनुचरांनीं एकदम त्या महायज्ञावर झडप घालून त्यांतील अग्नि विझवून टाकला! कित्येकांनीं यज्ञशाळेच्या पुढील मंडपाचा विध्वंस केला; कोणीं स्त्रियांना बसण्याची जागा मोडून टाकली; कोणीं होमकुंडांत मूत्रोत्सर्ग केला; तसाच कोणीं होमद्रव्याचा, कोणीं पात्रांचा असा नाश करून सर्व यज्ञमंडप उध्वस्त करून टाकिला! विदुरा, इतकेंच करून ते राहिले नाहींत; तर त्यांनीं तेथें जमलेल्या ऋषींचाही छल मांडिला. त्यांनीं देवांना धरून बांधून ठेविलें, आणि ऋषिपत्न्यांना भेवडाविलें. मणिमानानें भृगूला बांधिलें, चंडीशानें पूषाला धरिलें, नंदिकेश्वरानें भगाला पाडिलें, आणि वीरभद्रानें दक्षाला पकडलें. बाकीच्या गणांनीं राहिलेले देव, ऋत्विज, सदस्य ह्यांजवर दगडांचा वर्षाव करून त्यांना पीडा दिली. अशी ही भयंकर गडबड पाहून, ज्याला जिकडे वाट फुटेल तिकडे तो पळून गेला. सभेमध्यें दाढी-मिशा दाखवीत भृगु ऋषि शंकराला हसला होता, म्हणून वीरभद्रानें त्याच्या दाढी-मिशा उपटून टाकल्या; दक्ष हा शंकराची निंदा करीत असतां भगानें नेत्रसंकेत केला होता, म्हणून त्याला भूमीवर पाडून वीरभद्रानें त्याचे

डोळे काढिले; त्यानें पूषा ऋत्विजाचे दांत पाडिले; कारण दक्षानें भगवान शंकराला शाप दिला तेव्हां तो दांत काढून हसला होता; नंतर तो वीरभद्र दक्ष प्रजापतीच्या छातीवर बसून खड्गानें त्याच्या शरिराचें विदारण करूं लागला; पण त्यापासून मात्र कांहीं उपयोग झाला नाहीं. कारण, कांहीं केलें तरी त्याची त्वचा मुळींच तुटेना. तेव्हां त्या पराक्रमी वीरपुरुषानें, यज्ञपशूला बुकलून मारतात त्याप्रमाणें दक्षाचा गळा दाबून त्या यजमानरूप पशूचें मस्तक धडापासून मोकळें केलें, आणि त्वेषानें तें दक्षिणाग्नींत टाकून त्यास पूर्णाहुति दिली, व यज्ञमंडपास आग लावून तो कैलास पर्वतावर निघून गेला. नंतर भूत, प्रेत,पिशाच आदिकरून सर्वजण आनंदानें त्याच्या मागें नाचत गेले, आणि यज्ञसमारंभांतील ऋषि, ब्राह्मण वगैरे मंडळी ' शांतं पापं, शांतं पापं ' म्हणत बसली !

## अध्याय सहावा.

--:०:--

### देवांचें ब्रह्मदेवासह कैलासीं गमन.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, शंकराच्या गणांनीं अशा प्रकारें देव, ऋत्विज आणि सभासद ह्यांचा पराभव करून त्यांचीं शरिरें छिन्नविच्छिन्न केलीं, तेव्हां ते फार भयभीत झाले व त्यांनीं झालेली सर्व हकीगत सत्यलोकीं जाऊन कमलोद्भव ब्रह्मदेवाला सांगितली. जगदात्मा विष्णु आणि जगत्पिता ब्रह्मदेव ह्यांना हें भविष्य पूर्वींच कळून आलें होतें; ह्यास्तव ते दक्षाकडील यज्ञाला मुळींच गेले नव्हते. विदुरा, देवांनीं निवेदन केलेला सर्व वृत्तांत ऐकून भगवान ब्रह्मदेव म्हणाला, "देवहो, दुर्बलांनीं बलिष्ठांशीं वैर केलें असतां त्याचा परिणाम दुर्बलांनाच घातक व्हावयाचा. तशांतून, बलिष्ठांच्या हातून अपराध घडलेला असेल तर कदाचित् दुर्बलांनीं त्यांचा द्वेष करणें न्याय्य होईल, पण दुर्बलांनीं बलिष्ठांचा अपराध करून जय मिळविण्याची आशा करणें हें सर्वथैव अनुचित होय. देवहो, तुमच्याकडून शंकराचा अपराध घडला आहे. त्याला यज्ञांत भाग मिळणें योग्य असून तुम्हीं तो दिला नाहीं ही मोठी चूक केली. शंकराचा राग फार कठीण; क्रुद्ध झाल्यास त्यास त्रैलोक्यही जाळून टाकण्याची शक्ति आहे; आणि ह्या वेळीं तर दक्षानें भरसभेंत त्याला केलेलीं मर्मभेदक भाषणें त्याच्या मनांत सलत असून शिवाय त्याच्या प्रिय पत्नीचा तुमच्यामुळें अंत झाला आहे; ह्या सर्व गोष्टींचा विचार केला तर आज तुम्ही जिवंत राहिलां, हेंच तुमचें भाग्य असें मी समजतों; असो. आतां तुम्हांला आपलें कल्याण व्हावें अशी जर इच्छा असेल, तर तुम्हीं त्या शंकरालाच शरण गेलें पाहिजे, आणि त्याचीच प्रार्थना करून त्याला प्रसन्न करून घेतलें पाहिजे. शंकर दयाळू आहे; तर जा, त्याचे पाय घट्ट धरा, आणि आपल्या घडलेल्या अपराधाची क्षमा मागून यज्ञाचें पुनः संधान व्हावें अशी इच्छा प्रकट करा. अहो, भगवान शंकर स्वतंत्र आहे. तो कोणाच्याही अधीन नाहीं. त्याचें खरें स्वरूप आणि सामर्थ्य प्रत्यक्ष महाविष्णूला व मलाही अद्यापि कळलेलें नाहीं. मग इतरांची कथा काय ? " असो. विदुरा, नंतर देव, पितर, ऋषि वगैरे सर्वांस बरोबर घेऊन ब्रह्मदेव कैलास पर्वतास जावयास निघाले. त्या

### कैलासाचें वर्णन

किती म्हणून करावें ! तो अत्यंत रमणीय असून सर्व पर्वतांपेक्षां उंच आहे, व तेथें सृष्टीचा संहार करणाऱ्या शंकराचें वसतिस्थान आहे. त्या पर्वतावर अनेक सिद्ध पुरुष व देव मोठ्या प्रेमानें वास्तव्य करितात. त्यांपैकीं कित्येक जन्मतः सिद्ध असून कित्येक औषधि, तपश्चर्या, मंत्र व योग ह्यांच्या योगें सिद्धांच्या स्थितीस पावले आहेत. किन्नर, गंधर्व, अप्सरा हीं तर त्या पर्वतावर नित्यच राहतात. त्या पर्वताचीं शिखरें रत्न-

मय असून नानाविध धातूंनीं चित्रविचित्र झालेलीं आहेत. त्यावर ताल, शाल, तमाल, सुरू, मंदार, पारिजात, कांचन, असाणा, अर्जुन वगैरे अनेक प्रकारचे वृक्ष असून ते इतके उंच आहेत कीं, ते गगनाला सावरूनच धरीत आहेत कीं काय असा भास होतो! त्याचप्रमाणें आम्र, कदंब, नाग, पुन्नाग चंपक, अशोक, बकुल, चंदन वगैरे अनेक जातींचे प्रफुल्लित पुष्पवृक्ष आणि जाई, जुई, मोगरा, माधवी आदिकरून बहुविध पुष्पवेली ह्यांच्या सुवासानें आकाश अगदीं भरून गेलेलें असतें. तेथें फणस, उंबर, अश्वत्थ, पिंपर्णी, वड, निंब, भूर्ज, केळी, पोफळी, जांभळी, खर्जुरी, आंबाडे, मोह, इंगुदी, वेळू इत्यादि अनेक वृक्ष विपुल आहेत. त्या पर्वतावर अनेक सरोवरें असून त्यांत कुमुद, उत्पल, कल्हार, शतपत्र इत्यादि विविध कमळें प्रफुल्लित असतात. तेथें वास करणाऱ्या पक्ष्यांचे थवे आपल्या गायनानें पर्वतनिवासी जनांचें मन रंजवीत असतात. हरिण, व्याघ्र, सिंह, लांडगे, तरस, रानडुकर, वनगाई, रीस, वानर, कोल्हे, ससे, बैल, रेडे आदिकरून चतुष्पाद जनावरें स्वैर संचार करीत असतांना दृष्टीस पडतात. कैलास पर्वतावर, जगाला पावन करणाऱ्या नंदा व अलकनंदा ह्या दोन महानद्या वहात आहेत. त्यांस अवलोकन केलें असतां, कैलास पर्वतानें आपल्या गळ्यांत हारच घातला आहे कीं काय, असा भास होतो. त्या रम्य प्रदेशाला शोभा आणणारे त्या नद्यांचे प्रवाह शांत झालेल्या देवस्त्रियांचें विहारस्थान होय. तेथें स्वर्गांतील स्त्रिया आपापल्या पतींसह क्रीडा करीत असतां केशरकस्तुरींच्या उट्यांनीं तें सर्व जळ सुगंधयुक्त होतें, आणि त्यामुळें हत्ती आपल्या सख्यांना बरोबर घेऊन मोठ्या आनंदानें तेथें क्रीडा करितात. तेथें नदीतटाकीं एक अलका नांवाची नगरी आहे. हिचा स्वामी कुबेर होय. एथें यक्षस्त्रिया रत्नजडित विमानांत बसून वनशोभा पाहण्याकरितां सायंकाळीं पतिसमागमें फिरत असतात. विदुरा, त्या पर्वतावर ब्रह्मदेवासह ते सर्व ऋषि वगैरे येऊन पोहोंचले. मयुरांच्या नृत्यानें आणि कोकिलांच्या मधुर गायनानें त्यांची चित्तवृत्ति आनंदमय होऊन गेली. भ्रमरांच्या गुंजारवानें व सुपुष्पांच्या सुगंधानें ते ब्रह्मानंदांत डुलूं लागले. त्यांना पुढें अनेक पुष्करिणी दिसल्या. त्यांच्या पायऱ्या वैदूर्य रत्नाच्या होत्या. सहस्त्रदलांच्या कमळांनीं त्यांतील जळ सुवासित झालें होतें. तेथें किंपुरुष क्रीडा करण्याकरितां आले असून ते नानाप्रकारच्या जलयानांत बसून विहार करीत होते. हें पाहून ते ब्रह्मादिक सर्व जन पुढें चालले. नानाप्रकारच्या सुखसोहळ्यांनीं परिपूर्ण अशा त्या वनांतून ते मार्ग क्रमीत आहेत, व शंकरापासून आपण कृतकार्य होऊन कसे येऊं ह्याविषयीं विचार करीत आहेत, इतक्यांत, ज्याची उंची चारशें कोस आणि विस्तार तीनशें कोस आणि छाया निश्चल व घनदाट, असा प्रचंड वटवृक्ष त्यांच्या दृष्टीस पडला, व त्याच्या छायेखालीं कोणी बसलें आहे असें त्यांना दिसलें; नंतर जरा पुढें जातात तों, सभोंवतीं सनकसनंदनप्रभृति महान महान सिद्ध पुरुष असून गुह्यकांचा व राक्षसांचा अधिपति कुबेरही तेथें जवळच बसला आहे, आणि मध्यस्थानीं भगवान जटाधारी शंकर हे आपल्या उजव्या मांडीवर डावें पाऊल व डाव्या गुडघ्यावर डावा हात ठेवून वीरासन घालून तर्कमुद्रा धरून अधिष्ठित झाले आहेत असें त्यांनीं पाहिलें. ह्या वेळीं शंकरांची मुद्रा अगदीं शांत होती. त्यांनीं सर्वांगास चिताभस्म लाविलें होतें. कंठांत, मनगटांत, बाहूंमध्यें व मस्तकाभोंवतीं रुद्राक्षाच्या माळा व जटेमध्यें चंद्रकला धारण केली होती. शुद्ध अशा दर्भासनावर बसून ते नारद मुनींना सनातनब्रह्माचा उपदेश करीत होते. त्यांची ती शांतवृत्ति पाहून देवादिकांना जरा धीर आला,

व ब्रह्मदेवासह सर्व मंडळींनीं पुढें जाऊन त्यांना नमस्कार केला. प्रत्यक्ष ब्रह्मदेव आले असें पाहून शंकरानेंही त्यांस अभ्युत्थानपूर्वक प्रणाम केला. त्याचप्रमाणें, शंकराच्या जवळ असलेल्या सनकसनंदनादिकांनींही ब्रह्मदेवाला नमस्कार केला, व सर्व देवांनीं शंकराला नमस्कार केल्यानंतर, ब्रह्मदेवानें हसत हसत बोलण्यास सुरवात केली.

### ब्रह्मदेवाची शंकरास विनंती.

ब्रह्मदेव म्हणालाः—शंकरा, तूं जरी स्वतांकडे कमीपणा घेऊन मला नमस्कार केलास, तरी मी तुझें स्वरूप जाणतों. तूं सर्व जगाचा नियंता असून प्रकृति व पुरुष ह्यांचें तूं कारण आहेस. तूं निर्गुण, निराकार, निरुपम असा सच्चिदानंदस्वरूपी आहेस. प्रकृति आणि पुरुष हे तुझेच अंश असून, ज्याप्रमाणें कोळी आपल्या इच्छेनें तंतु उत्पन्न करितो, त्यांचें जाळें बनवितो, कांहीं वेळ त्याचें रक्षण करितो, आणि शेवटीं स्वतांच तें खाऊन टाकतो, त्याचप्रमाणें, प्रकृतिपुरुषांच्या योगानें तूं जगाची उत्पत्ति करितोस, त्याचें पालन करितोस, आणि लयही पण तूंच करितोस. धर्म आणि अर्थ साधून देणाऱ्या वेदत्रयीचें रक्षण व्हावें म्हणून, दक्षाला निमित्तमात्र पुढें करून तूंच यज्ञ उत्पन्न केलास. चार वर्ण व त्यांच्या धर्ममर्यादा तूंच करून ठेविल्या आहेस, व त्या सर्व लोक मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें पाळतात. अधर्मानें वागणारांस शासन आणि धर्मानें वागणारांस मोक्ष हीं देणाराही तूंच आहेस; असें असतां एखाद्याला विपरीत फल कां मिळावें ? तुझा कोप ह्यास कारण आहे असें म्हणावें, तर सर्वांभूतीं तूंच भरलेला आहेस अशी भावना ठेवून जे आपलें अंतःकरण तुला अर्पण करितात, व आत्मस्वरूपीं लीन असतात, अशा सत्पुरुषांना कशाचीही भीति रहात नाहीं. आतां, पद्मनाभ जो विष्णु त्याच्या मायेनें मोहित झाल्यामुळें, ज्यांच्या अंतःकरणांत आपपरभाव उत्पन्न होतो आणि त्यामुळें दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होऊन, ते दुसऱ्याला निंद्य अशीं दुर्भाषणें बोलून दाखवितात, त्यांचा नाश दैवानेंच झालेला असतो. ह्यासाठीं, आपल्यासारख्या महासमर्थ साधूंनीं त्यांविषयीं मनांत राग न आणतां, ते अज्ञान आहेत असें समजून त्यांवर कृपा करणेंच योग्य आहे. हे शंकरा, तूं दयाळू आहेस; म्हणून, मायेच्या मोहांत गुंतून ज्यांनीं तुला हविर्भाग देणें योग्य असतांही अभिमानानें व मूर्खपणानें तो दिला नाहीं, त्यांना त्या त्यांच्या अपराधाची क्षमा कर, आणि दक्ष प्रजापतीला जिवंत करून अपूर्ण राहिलेला यज्ञ त्याकडून फिरून करीव. त्याचप्रमाणें, भगाला फिरून दृष्टि दे; भृगु ऋषीच्या दाढी-मिशा उपटल्या आहेत त्या त्याला प्राप्त होऊं दे; पूषा ऋत्विजाचे दांत पुनः येतील असें कर; आणि तुझ्या गणांनीं देवांचीं व ऋत्विजांचीं गात्रें दगड व शस्त्रें मारून खिळखिळीं केलीं आहेत, तीं पूर्ववत् होतील असें कर, अशी आमची तुला हात जोडून प्रार्थना आहे. ह्यापुढें यज्ञाचा अवशिष्ट म्हणून जो पदार्थ राहील, तो तुझा भाग तुला मिळत जाईल. ह्याही यज्ञांत तुझा भाग तुला मिळून त्याची पूर्णता होवो.

## अध्याय सातवा.

—:०:—

### दक्षाचें संजीवन.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेनें शंकराला संतोष झाला, आणि त्यानें हसत हसत म्हटलें कीं, "ब्रह्मदेवा, मायावश होऊन ज्यांनीं अपराध केला, त्यांना योग्य शासन मिळालेंच आहे; आतां त्याविषयीं मी कांहीं मनांत आणीत नाहीं, व त्याचा उच्चारही करीत नाहीं. आतां, दक्षाचें मस्तक जळून गेलें आहे, ह्यास्तव त्याला बोकडाच्या तोंडाचें मस्तक लागेल; भग आपला यज्ञांतील भाग मित्र नामक देवाच्या दृष्टीनें पाहील;

पूषा ऋत्विजानें पीठ खावें, व तेंही यजमानाच्या दातांनीं चावून खावें; यज्ञांतील अवशिष्ट हविर्भाग देवांनीं मला दिला आहे म्हणून त्यांचे अवयव पूर्वीप्रमाणें होतील; अध्वर्यु आणि ऋत्विज ह्यांपैकीं ज्यांचे बाहु तुटले असतील, त्यांचीं कार्यें अश्विनीकुमारांच्या बाहूंनीं होतील; व हात तुटले असतील त्यांचीं कार्यें पूषाच्या हातांनीं होतील, आणि भृगूला बोकडाची दाढी प्राप्त होईल."

मैत्रेय म्हणतात:—विदुरा, शंकराच्या मुखांतून निघालेलें हें भाषण ऐकून सर्वांना आनंद झाला, आणि त्यांनीं शंकराला यज्ञाला येण्याविषयीं प्रार्थना केली; तेव्हां सर्वांना बरोबर घेऊन भगवान शंकर दक्षाच्या यज्ञमंडपांत आले. ते तेथें आल्यावर त्यांच्या सांगण्याप्रमाणें सर्व व्यवस्था झाली, व दक्षाच्या धडाला यज्ञांतील बोकडाचें मस्तक लावण्यांत आलें. नंतर शंकराच्या अमृतोपम अवलोकनानें, एखादा निजलेला पुरुष जागा होतो त्याप्रमाणें दक्ष तात्काळ उठून उभा राहिला, व त्याची दृष्टि भगवान शंकरावर गेली. शंकरानें त्याला कृपादृष्टीनें पाहिलें असतां तो पूर्वीचा सर्व वैरभाव विसरून शंकराची स्तुति करण्याचा विचार करूं लागला, तों त्याच्या मुखांतून शब्दही निघेना. कारण, सती मरण पावली हा विचार मनांत येऊन त्याचा कंठ भरून आला, व तें दुःख त्याच्यानें कांहीं केल्या आवरून धरवेना. पुढें महाप्रयासानें चित्त स्थिर करून तो शंकराला म्हणाला, "हे षड्गुणैश्वर्यसंपन्न शंकरा, मीं तुझे अनंत अपराध केले असल्यामुळें तूं मला शिक्षा केलीस हा माझ्यावर तुझा अनुग्रहच झाला. कारण, ही शिक्षा जर तूं दिली नसतीस, तर मला अधर्मानें वागल्याचें फळ म्हणजे अधोगति ही भोगावी लागली असती. तुझ्या ह्या शिक्षेनें माझ्या सर्व पातकांचा त्वरित क्षय होऊन तुझ्या चरणकमलांचें मला दर्शन झालें. प्रभो, भगवान विष्णूला व आपल्याला असें करणें हें उचितच आहे. पहा—अधर्मानें वागणाऱ्या जनावरावरही आपण अवकृपा करीत नाहीं; मग यज्ञयागादिक धार्मिक क्रिया करणाऱ्या पुरुषांवर आपल्या हातून कशी अवकृपा होईल बरें ? हे विश्वेश्वरा, श्रुत्यंतर्गत आत्मतत्त्वाचें संरक्षण करण्याकरितां विद्या, तपश्चर्या, व्रतें इत्यादिकांचें अनुष्ठान करणाऱ्या ब्राह्मणांस आपण उत्पन्न केलें; व ह्यामुळेंच, जेव्हां जेव्हां त्यांजवर संकटें येतात, तेव्हां तेव्हां आपण त्यांचें प्रतिपालन करितां. शंकरा, तूं मजवर उपकार केला आहेस, त्यानें तुझें मन संतुष्ट होईल; पण कांहीं केलें तरी तुझ्या उपकारांची फेड माझ्या हातून होणार नाहीं."

### यज्ञपति विष्णूचें दर्शन.

मैत्रेय म्हणतात:—विदुरा, अशा प्रकारें शंकराजवळ दक्ष प्रजापतीनें क्षमा मागितल्यानंतर ब्रह्मदेवानें दक्षाला व ऋत्विज आदिकरून मंडळीला सांगून फिरून यज्ञ करण्यास आरंभ केला. पूर्वी घडलेल्या सर्व दोषांचें निवारण व्हावें, व निर्विघ्नपणें यज्ञ शेवटास जावा, म्हणून ब्राह्मणांनीं तीन कपाळांवर भाजलेला त्रिकपाळ नांवाचा पुरोडाश विष्णूला अर्पण करण्याकरितां सिद्ध केला, आणि अध्वर्यूनें तो हातांत घेतला आणि त्यानें व यजमान दक्ष प्रजापतीनें शुद्ध अंतःकरणपूर्वक विष्णूचें ध्यान करून त्याची आहुति दिली; तों तात्काळ सर्वदुःखनिवारक परमेश्वर महाविष्णु गरुडावर बसून तेथें प्रकट झाले. त्यांच्या दिव्य प्रभेनें तो यज्ञमंडप उज्ज्वलित झाला. त्यांचा वर्ण श्यामल असून सूर्याप्रमाणें तेजस्वी असा किरीट त्यांच्या मस्तकावर झळकत होता; कटिप्रदेशीं पिवळा पितांबर परिधान केलेला असून चारही हातांत शंख, चक्र, गदा व पद्म हीं आयुधें होतीं. कर्णद्वय कुंडलांनीं युक्त असून मुखकमल काळ्याभोर कुरळ केसांनीं फारच मनोहर दिसत होतें; भगवंतांनीं गळ्यांत वनमाला घातली होती, आणि त्यांच्या वक्षस्थलावर असलेलें श्रीवत्सलांछन अत्यंत शोभायमान दिसत होतें. त्यांच्या सलील दृष्टि-

पातांनीं सर्व जगाला मोह उत्पन्न होत होता; त्यांच्या दोन्ही पार्श्वभागीं शुभ्र चामरें ढाळण्यांत येत होतीं; व ऊर्ध्वभागीं असलेल्या श्वेतछत्ररूप चंद्राच्या धवल कांतीनें मस्तकावर अनुपम शोभा प्राप्त झाली होती. असो; ह्याप्रमाणें भक्तवत्सल प्रभूची मूर्ति दृष्टीस पडल्याबरोबर ब्रह्मदेव, शंकर आदिकरून सर्व मंडळी उठून उभी राहिली, आणि त्यांनीं वंदन केलें. दयाघन ईश्वरानें प्रत्यक्ष दर्शन देऊन सर्वांना कृतार्थ केलें, ह्यामुळें प्रेमानें त्या सर्वांचे कंठ भरून आले, आणि त्यांनीं आपापल्या बुद्धीप्रमाणें भगवंताची स्तुति केली. यज्ञपति नारायणास पाहून दक्ष प्रजापतीला अतिशय आनंद झाला. त्यानें षोडशोपचारें अंतःकरणपूर्वक त्याची पूजा केली, आणि हात जोडून प्रथम त्यानेंच भगवंताची स्तुति करण्यास आरंभ केला.

## दक्षप्रभृतींनीं यज्ञस्वरूपी विष्णूची केलेली स्तुति.

दक्ष म्हणालाः—

**शुद्धं स्वधाम्न्युपरताखिलबुद्ध्यवस्थं**
**चिन्मात्रमेकमभयं प्रतिषिध्य मायाम् ।**
**तिष्ठंस्तयैव पुरुषत्वमुपेत्य तस्या-**
**मास्ते भवानपरिशुद्ध इवात्मतंत्रः ॥**

'हे परमेश्वरा, तूं आपल्या सच्चिदानंद स्वरूपाच्या ठिकाणीं सदैव अधिष्ठित आहेस; तूं शुद्ध चैतन्यानें भरलेला आहेस; तुझ्याविषयीं विचार करीत असतां बुद्धीच्या सर्व शक्ति कुंठित होतात; जगामध्यें यच्चयावत् सर्व पदार्थांमध्यें तुझी व्याप्ति आहे; अखिल सृष्टीमध्यें तुझ्या व्यतिरिक्त कांहींएक नसल्यामुळें तुला भीति म्हणून कसलीच नाहीं; तूं केवळ ज्ञानस्वरूप आहेस; अविद्यात्मक मायेचा तुझ्यावर मुळींच प्रभाव चालत नाहीं; तूं केवळ लीलेनें माया निर्माण करितोस; आणि तिचा स्वीकार करून निरनिराळ्या अवतारांच्या रूपानें कामक्रोधादिक मनोविकारांस वश होतोस असें भासतें. हे भगवंता, कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं समर्थ परमेश्वर तूंच आहेस व शंकर हा तुझाच अवतार आहे; ह्यास्तव, हे सर्वसमर्था प्रभो, माझ्या सर्व अपराधांची क्षमा करून माझी भेददृष्टि नाहींशी कर.'

ऋत्विज म्हणालेः—

**तत्त्वं न ते वयमनंजन रुद्रशापात्**
**कर्मण्यवग्रहधियो भगवन्विदामः ।**
**धर्मोपलक्षणमिदं त्रिवृदध्वराख्यं**
**ज्ञातं यदर्थमधिदैवमदो व्यवस्थाः ॥**

'हे निर्गुणनिरंजना परमेश्वरा, तुझें स्वरूप जाणण्याची आमची शक्ति नाहीं. पुण्यप्राप्तीचें साधन म्हणून ज्याचें प्रतिपादन तिन्ही वेदांत केलेलें आहे, तेंच तुझें यज्ञात्मक सत्य स्वरूप असें आम्ही समजतों; आणि त्यामुळें व नंदिकेश्वराच्या शापामुळें आमच्या बुद्धीला कर्ममार्गाबद्दल दुराग्रह उत्पन्न झाला आहे. ह्याकरितां, अज्ञानामुळें आमच्या हातून घडलेल्या अपराधाची क्षमा कर.'

सदस्य म्हणालेः—

**उत्पत्त्यध्वन्यशरण उरुक्लेशदुर्गेऽन्तकोग्र-**
**व्यालान्विष्टे विषयमृगतृष्यात्मगेहोरुभारः ।**
**द्वंद्वश्वभ्रे खलमृगभये शोकदावेऽज्ञसार्थः**
**पादौकस्ते शरणद कदा याति कामोपसृष्टः ॥**

'हे देवाधिदेवा, सर्व जिवांना आश्रय देणारा तूंच आहेस. अहाहा! ह्या संसाराचें स्वरूप किती भयंकर म्हणून सांगावें? ह्यांत खरें सुख तर काडीमात्र नाहीं; महान महान संकटांनीं हा ओतप्रोत भरलेला आहे; ह्यामध्यें मृत्युरूप उग्र सर्प दंश करण्यास टपून बसला आहे; एथें विषयरूप मृगजलाला जीव बळी पडतात; सुख-दुःख, जयापजय इत्यादि खोल गर्तांमध्यें प्राणी तेव्हांच नष्ट होतात; ह्या भवाटवीमध्यें खलरूप दुष्ट पशूंची सर्वत्र अत्यंत भीति असून शोकरूप दावानल नित्य भडकलेला आहे; अशा ह्या

संसारमार्गामध्यें अज्ञानी जीव हे गृहकलत्रादिकांचा भार मस्तकावर घेऊन कामवासनेनें पीडित होत्साते नित्य फिरत असतात; ह्यासाठीं त्यांना सकलदुःखनिवारक अशा तुझ्या चरणरूप निवासस्थानाची प्राप्ति केव्हां होईल बरें ?'

शंकर म्हणाले:—

**तव वरद वरांघ्रावाशिषेहाखिलार्थे**
**ह्यपि मुनिभिरसक्तैरादरेणार्हणीये ।**
**यदि रचितधियं माऽविद्यलोकोऽपविद्धं**
**जपति न गणये तत्त्वत्परानुग्रहेण ॥**

'हे इच्छितवरप्रदा ईश्वरा, तुझे चरण सर्व पुरुषार्थ प्राप्त करून देणारे आहेत. सर्वसंगपरित्याग करणारे मुनिही ज्या तुझ्या चरणांची पूजा करितात, त्या तुझ्या चरणीं मीं आपली बुद्धि लीन केली आहे; म्हणून, मला कोणीही आचारभ्रष्ट म्हटलें तरी तुझ्या कृपेमुळें मला त्याचें मुळींच वैषम्य वाटत नाहीं.'

भृगु ऋषि म्हणाले:—

**यन्मायया गहनयाऽपहृतात्मबोधा**
**ब्रह्मादयस्तनुभृतस्तमसि स्वपंतः ।**
**नात्मन् श्रितं तव विदंत्यधुनाऽपि तत्त्वं**
**सोऽयं प्रसीदतु भवान्प्रणतात्मबंधुः ॥**

'भगवंता, तूं शरणागतांचा रक्षक आहेस, तुझ्या दुर्धर मायेनें मोहित केल्यामुळें ब्रह्मादिक देवांना सुद्धां अंतर्यामीं असलेल्या तुझ्या सत्य स्वरूपाचें यथार्थ ज्ञान अद्यापि होत नाहीं. मग आम्हां मूढ जनांना तें कसें व्हावें बरें ? ह्यास्तव आम्हांकडून घडलेल्या अपराधाची क्षमा कर.'

ब्रह्मदेव म्हणाले:—

**नैतत्स्वरूपं भवतोऽसौ पदार्थ-**
**भेदग्रहैः पुरुषो यावदीक्षेत् ।**
**ज्ञानस्य चार्थस्य गुणस्य चाश्रयो**
**मायामयाद्व्यतिरिक्तो यतस्त्वम् ॥**

'देवा, तूं ज्ञानाचा, शब्दादि विषयांचा व इंद्रियांचा आधार आहेस खरा; परंतु तीं सर्व मायेचीं कार्यें असल्यामुळें त्यांपासून तूं अगदीं अलिप्त आहेस. तूं जरी मायेचा प्रवर्तक आहेस, तरी मायाकृत उपाधि तुला मुळींच उपसर्ग करीत नाहींत. ह्यास्तव, जीवांस इंद्रियांच्या द्वारें जें कांहीं भासतें, तें तुझें सत्य स्वरूप नव्हे, हें उघड आहे.'

इंद्र म्हणाला:—

**इदमप्यच्युत विश्वभावनं**
**वपुरानंदकरं मनोदृशाम् ।**
**सुरविद्विट्क्षपणैरुदायुधै-**
**र्भुजदंडैरुपपन्नमष्टभिः ॥**

'हे अच्युता, सर्व विश्वाला पाळून करणारें असें हें तुझें रूप होय. ह्याच्या योगानें आमच्या चित्तास अत्यंत आल्हाद होत आहे. देवा, दैत्यादिक दुष्टांचा संहार करण्यासाठीं तूं आपल्या ह्या अष्टभुजांच्या ठिकाणीं आठ आयुधें उचलून धारिलीं आहेस.'

ऋत्विजांच्या स्त्रिया म्हणाल्या:—

**यज्ञोऽयं तव यजनाय केन सृष्टो**
**विध्वस्तः पशुपतिनाऽद्य दक्षकोपात् ।**
**तं नस्त्वं शवशयनाभ शांतमेधं**
**यज्ञात्मन्नलिनरुचा दृशा पुनीहि ॥**

'हे यज्ञरूपा ईश्वरा, दक्ष प्रजापतीनें तुझ्या आराधनासाठीं हा यज्ञ करण्यास आरंभ केला असतां शंकराचा अपराध त्याजकडून घडला, म्हणून ह्या यज्ञभूमीला स्मशानभूमीचें रूप आलें. तर आतां तूं कृपाळू होऊन हिला पवित्र आणि उज्वल रूप प्राप्त करून दे.'

ऋषि म्हणाले:—

**अनन्वितं ते भगवन्विचेष्टितं**
**यदात्मना चरसि हि कर्म नाज्यसे ।**
**विभूतये यत उपसेदुरीश्वरीं**
**न मन्यते स्वयमनुवर्ततीं भवान् ॥**

'हे ईश्वरा, तूं कल्पनातीत असा परब्रह्ममूर्ति आहेस. ह्या जगांत सर्वांना आपआपल्या कर्मांचीं फळें भोगावीं लागतात; पण तूं कर्में करीत असूनही तुला त्यांचीं फळें भोगावीं लागत नाहींत. कारण, तूं तीं करीत असतां, त्यांपासून अगदीं अलिप्त राहतोस. शिवाय, ज्या लक्ष्मीच्या प्राप्तीसाठीं लोक नानाप्रकारचे उपाय करितात, ती लक्ष्मी तुझी सतत सेवा करीत असतांही तूं तिचा मुळींच आदर करीत नाहींस; तेव्हां तुझ्या लीला अगाध आणि अतर्क्य आहेत; आम्हांला त्यांचें मोठें आश्चर्य वाटतें.'

सिद्ध म्हणाले:—

**अयं त्वत्कथामृष्टपीयूषनद्यां**
**मनोवारणः क्लेशदावाग्निदग्धः ।**
**तृषार्तोऽवगाढो न सस्मार दावं**
**न निष्क्रामति ब्रह्मसंपन्नवन्नः ॥**

'देवा, आमचा मनोरूप हत्ती क्लेशरूप वणव्यामध्यें सांपडून अगदीं पोळून गेल्यामुळें तुझ्या कथारूप शुद्ध अमृताच्या प्रवाहामध्यें बुडी मारून त्याचें यथेच्छ पान करीत बसला आहे. त्यास आतां संसाररूप दावानलाचें भान सुद्धां राहिलें नाहीं. ब्रह्मज्ञानी पुरुषाप्रमाणें तो आतां अन्य विषयांपासून पराङ्मुख झाला आहे.'

दक्षपत्नी म्हणाली:—

**स्वागतं ते प्रसीदेश तुभ्यं नमः**
**श्रीनिवास श्रिया कांतया त्राहि नः ।**
**त्वामृतेऽधीश नांगैर्मखः शोभते**
**शीर्षहीनः कबंधो यथा पूरुषः ॥**

'हे कृपासागरा, तुझें स्वागत असो. आम्ही सर्व तुला अनन्यभावानें शरण आहों; तूं प्रसन्न होऊन लक्ष्मीसह आमचें रक्षण कर. सर्व अंगें यथास्थित असूनही मस्तकाशिवाय शरीर शोभत नाहीं, त्याप्रमाणें प्रयाजअनुयाजादि सर्व अंगें यथास्थित चालविलीं आहेत, तरी तुझ्याशिवाय हा यज्ञमंडप शोभत नाहीं. तुला नमस्कार असो.'

लोकपाल म्हणाले:—

**दृष्टः किं नो दृग्भिरसद्ग्रहैस्त्वं**
**प्रत्यग्द्रष्टा दृश्यते येन दृश्यम् ।**
**माया ह्येषा भवदीया हि भूमन्**
**यस्त्वं षष्ठः पंचभिर्भासि भूतैः ॥**

'हे परमेश्वरा, ह्या स्थावरजंगम दृश्य पदार्थांचें ज्ञान इंद्रियांस होतें, ह्या म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. वास्तविकपणें ही सर्व तुझी शक्ति आहे. सर्व जगाचा साक्षी व नियामक तूंच आहेस. ह्यास्तव त्या सर्वांपासून तूं निराळा आहेस, हें उघड दिसतें. तेव्हां इंद्रियांच्या नियमित शक्तीवर भिस्त ठेवणाऱ्या आम्हां जीवांना तुझें स्वरूप कसें कळेल बरें? देवा, सृष्टींतील पांचभौतिक पदार्थांप्रमाणें तूंही आणखी एक पदार्थ आहेस, असा भास आम्हांस होतो, हा सर्व तुझ्या मायेचा खेळ होय. ज्या पुरुषांचा अज्ञानमल झडून जातो, त्यांसच तुझ्या स्वरूपाची कल्पना होते. आम्हां पामरांना ती होत नाहीं.'

योगेश्वर म्हणाले:—

**प्रेयान्न तेऽन्योऽस्त्यमुतस्त्वयि प्रभो**
**विश्वात्मनीक्षेन्न पृथग्य आत्मनः ।**
**अथापि भक्त्येश तयोपधावता-**
**मनन्यवृत्त्याऽनुगृहाण वत्सल ॥**
**जगदुद्भवस्थितिलयेषु दैवतो**
**बहुभिद्यमानगुणयात्ममायया ।**
**रचितात्मभेदमतये स्वसंस्थया**
**विनिवर्तितभ्रमगुणात्मने नमः ॥**

'हे समर्था, जे पुरुष तुझें सर्वव्यापक स्वरूप जाणतात, व ज्यांच्या ठायीं भेददृष्टि मुळींच नाहीं, त्यांखेरीज तुला अन्य कोणी प्रिय नाहीं हें खरें; पण तुझी अनन्यभावानें आम्ही सेवा करितों, म्हणून तूं आमच्यावर कृपा कर. आम्ही अज्ञान आहों, म्हणून आमचा अव्हेर करूं नको. जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हे तुझ्या इच्छे-

चे खेळ आहेत. तूं उत्पन्न केलेल्या मायेच्या योगानें जीवांना प्राक्तनानुसार नानाप्रकारचीं रूपें प्राप्त होतात. जेव्हां तुला आपला खेळ आटोपावासा वाटतो, आणि तूं आपल्या इच्छेनें उत्पन्न केलेली माया आटोपून धरतोस, तेव्हां तीं सर्व रूपें नाहींतशीं होतात. जीवांना कर्मे करण्यास लावणारा त्यांचा चालक तूंच आहेस. आमचा तुला नमस्कार असो.'

वेद म्हणाले:—

नमस्ते श्रितसत्त्वाय धर्मादीनां च सूतये ।
निर्गुणाय च यत्काष्ठां नाहं वेदापरेऽपि च ॥

' देवा, तुझ्या स्वरूपाचें ज्ञान होणें मोठें दुर्घट आहे. स्वतः आम्हांलाही तुझा अंत लागत नाहीं. आजपर्यंत मोठमोठ्यांनीं तुझ्या तत्त्वाचा विचार करून पाहिला, परंतु त्यांस यश आलें नाहीं. वास्तविकपणें तूं निर्गुण आहेस. सत्त्वादिक गुण धारण करून तूं केवळ धार्मिक कर्मांचा प्रसार करितोस. देवा, तुला आम्ही नमस्कार करितों.'

अग्नि म्हणाला:—

यत्तेजसाऽहं सुसमिद्धतेजा
हव्यं वहे स्वध्वर आज्यसिक्तम् ।
तं यज्ञियं पंचविधं च पंचभिः
स्विष्टं यजुर्भिः प्रणतोऽस्मि यज्ञम् ॥

' यज्ञांमध्यें घृतानें सिंचन केलेलें होमद्रव्य मी ज्या त्या देवतेस पोहोंचवूं शकतों, तें माझ्या अंगीं असलेलें तेज तुझेंच आहे. अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, चातुर्मास्य, पशु आणि सोम हे, आणि आश्रावय, अस्तु श्रौषट्, यज, ये यजामहे, व वषट् ह्या पांच मंत्रांनीं केलेले यज्ञ, हें तुझेंच रूप आहे. तुला माझा नमस्कार असो.'

देव म्हणाले:—

पुरा कल्पापाये स्वकृतमुदरीकृत्य विकृतं
त्वमेवाद्यस्तस्मिन्सलिल उरगेन्द्राधिशयने ।
पुमान् शेषे सिद्धैर्हृदि विमृशिताध्यात्मपदविः
स एवाद्याक्ष्णोर्यः पथि चरसि भृत्यानवसि नः ॥

' हे नारायणा, तूं स्वतांच उत्पन्न केलेलें जग कल्पाच्या समाप्तिकालीं आटोपून आपल्या उदरांत सांठवितोस, आणि प्रलयकालच्या जलांत शेषशय्येवर निद्रा घेतोस. देवा, तुझें चिंतन योगी सतत करीत असतात. हे पुराणपुरुषा, आज तुला आम्ही प्रत्यक्ष पाहत आहों. आम्ही तुला नमस्कार करतों. हे भक्तरक्षका, तूं आमचें रक्षण कर.'

गंधर्व म्हणाले:—

अंशांशास्ते देवमरीच्यादय एते
ब्रह्मेन्द्राद्या देवगणा रुद्रपुरोगाः ।
क्रीडाभांडं विश्वमिदं यस्य विभूमं-
स्तस्मै नित्यं नाथ नमस्ते करवाम ॥

' हे सर्वव्यापका परमेश्वरा, ब्रह्मरुद्रादिक देव, व मरीचिप्रभृति ऋषि आदिकरून हें सर्व जग तुझ्याच अंशापासून उत्पन्न झालें आहे. हें सर्व विश्व तुझ्या क्रीडेचें उपकरण होय. तुला आमचा नमस्कार असो.'

विद्याधर म्हणाले:—

त्वन्माययाऽर्थमभिपद्य कलेवरेऽस्मिन्
कृत्वा ममाहमिति दुर्मतिरुत्पथैः स्वैः ।
क्षिप्तोऽप्यसद्विषयलालस आत्ममोहं
युष्मत्कथाऽमृतनिषेवक उद्व्युदस्येत् ॥

' देवा, सर्व पुरुषार्थ साध्य होण्यास शरीर हें साधन आहे खरें; पण तुझ्या मायेनें ह्या शरिराविषयीं अभिमान उत्पन्न झाल्यामुळें क्षणभंगुरत्व अनुभवाला येत असतांही त्याचा भीपणा सुटत नाहीं. हे ईश्वरा, प्राणी तुझ्या कथांचें श्रवण करूं लागला असतां त्याच्या अंगचा मोह दूर होतो. ह्यास्तव तुझ्या कथांचें श्रवण आणि कीर्तन हेंच संसारी पुरुषास उत्तम साधन आहे, ह्यांत संदेह नाहीं.'

ब्राह्मण म्हणाले:—

त्वं क्रतुस्त्वं हविस्त्वं हुताशः स्वयं
त्वं हि मंत्रः समिद्दर्भपात्राणि च ।

त्वं सदस्यार्त्विजो दंपती देवता
अग्निहोत्रं स्वधा सोम आज्यं पशुः ॥
त्वं पुरा गां रसाया महासूकरो
दंष्ट्रया पद्मिनीं वारणेंद्रो यथा।
स्तूयमानो नदँल्लीलया योगिभि-
र्व्युज्जहर्थ त्रयीगात्रयज्ञक्रतुः ॥
स प्रसीद त्वमस्माकमाकांक्षतां
दर्शनं ते परिभ्रष्टसत्कर्मणाम्।
कीर्त्यमाने नृभिर्नाम्नि यज्ञेश ते
यज्ञविघ्नाः क्षयं यांति तस्मै नमः ॥

'हे भगवंता, कर्ता करविता सर्व तूंच आहेस. यज्ञही तूंच असून होमद्रव्यें, अग्नि, मंत्र, समिधा, दर्भ, यज्ञपात्रें, सदस्य, ऋत्विज, यजमान, यजमानपत्नी, देवता, अग्निहोत्र, स्वधा, सोमरस, घृत, पशु हीं सर्व तूंच आहेस; वेदत्रयी हें तुझेंच स्वरूप होय. पूर्वी यज्ञवराह अवतार घेतला होतास, त्या समयीं मुनिजनांनीं तुझी प्रार्थना केली तेव्हां तूं मोठी गर्जना करून रसातळांतून पृथ्वीला दाढेवर घेऊन सहज वर आणिलेंस. देवा, तुझ्या ह्या लोकोत्तर कृत्यांचा आम्ही देहाभिमानानें विचार करीत नाहीं, म्हणून आमच्याकडून यज्ञांत अनेक अपराध होतात; त्यांबद्दल आम्हांस तूं क्षमा कर आणि हा यज्ञ शेवटास ने. देवा, तुझ्या नामस्मरणानेंच सर्व विघ्नें नष्ट होतील असा तुझा प्रभाव आहे. तुला आमचा नमस्कार असो.'

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, ह्याप्रमाणें त्या यज्ञसंरक्षक नारायणाची सर्वांनीं स्तुति केल्यावर, वीरभद्रानें विध्वंस केलेल्या यज्ञास दक्षानें फिरून आरंभ केला. विदुरा, ईश्वर नेहमीं स्वस्वरूपानंदांत निमग्न असतो खरा; पण दक्षाच्या मनाला समाधान व्हावें ह्याकरितां त्याला, 'तूं दिलेल्या पुरोडाशानें मी संतुष्ट आहें' असें दर्शविण्याकरितां त्यानें हांक मारून सांगितलें, "दक्षा, जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय करण्याकरितां ब्रह्मदेव, शंकर वगैरे सर्व रूपें मायेच्या योगानें मीच धारण करितों; म्हणून, ते व मी भिन्न आहों, असें समजणें योग्य नाहीं. दक्षा, तूंही ज्ञाता आहेस; तेव्हां ब्रह्मा, विष्णु व शंकर ह्या मूर्तित्रयामध्यें भेदबुद्धि ठेवूं नको. म्हणजे तुला शांति मिळून सर्व अर्थ साध्य होतील."

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, ह्याप्रमाणें विष्णूनें केलेला उपदेश श्रवण केल्यावर त्रिकपाल पुरोडाशाचा भाग त्याला अर्पण करून दक्षानें त्याची यथासांग पूजा केली, आणि अंग व प्रधान असे दोन्ही प्रकारचे याग करून त्याची आराधना केली. नंतर त्यानें समाधानयुक्त अंतःकरणानें रुद्राला त्याचा यज्ञावशेष भाग अर्पण केला, आणि त्यास संतुष्ट करून यज्ञांतील उदवसानसंज्ञक शेवटचें कर्म करून सर्वांचें आराधन केलें, व ऋत्विजांसह अवभृथ स्नान केलें. नंतर देवांनीं त्याला, तुझी धर्मबुद्धि स्थिर राहील, असा वर देऊन स्वस्थानीं गमन केलें. अशा प्रकारें यज्ञाचा शेवट गोड झाला. विदुरा, दक्षकन्येनें त्या यज्ञांत आपलें शरीर टाकलें, तरी फिरून तिनें हिमालय पर्वताच्या मेना नामक पत्नीच्या उदरीं जन्म घेऊन, ज्याप्रमाणें जगत्कर्त्री शक्ति प्रलयकालीं निद्रिस्त झाल्यावर पुनः सृष्टीच्या उत्पत्तिकालीं जागी होऊन ईश्वराच्या जवळ प्राप्त होते, त्याप्रमाणें फिरून शंकरालाच वरून त्याजवळ प्राप्त झाली. असो. हें दक्षयज्ञविध्वंसक शंकराचें चरित्र मला बृहस्पतीचा शिष्य महाभगवद्भक्त जो उद्धव, त्यानें सांगितलें. हें अत्यंत पवित्र चरित्र जो भक्तिपूर्वक वाचील किंवा श्रवण करील, तो आपल्या व दुसऱ्याच्या सर्व दुःखांचें निरसन करून अंतीं सायुज्य मिळवील.

## अध्याय आठवा.

—:०:—

### अधर्माचा वंश.

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, सनकादिक मुनि,

नारद, ऋभु, हंस, अरुणि व यति हे ब्रह्मदेवाचे मुलगे गृहस्थाश्रम न स्वीकारतां आजन्म ब्रह्मचर्यव्रतच धारण करून राहिले होते. तेव्हां त्यांचा पुढें वंशविस्तार झाला नाहीं, हें सिद्धच आहे. आतां अधर्म ह्या नांवाचा एक ब्रह्मदेवाचा पुत्र होता, त्या अधर्माचा वंश तुला सांगतों: अधर्मानें मृषा (असत्य) ह्या नांवाच्या स्त्रीशीं विवाह केला. त्याला तिजपासून एक पुत्र व एक कन्या झाली. त्यांचीं दंभ व माया अशीं नांवें होतीं. ह्या बहीणभावंडांनीं एकमेकांशींच शरीरसंबंध केला, व पुढेंही ह्यांच्या वंशांत असेच धर्मविरुद्ध विवाह झाले; असो. इकडे निर्ऋतीला (नाशाला) संतति नव्हती, म्हणून त्यानें हें जोडपें दत्तक घेतलें. ह्या जोडप्याला लोभ हा मुलगा आणि निकृति (वंचना) ही मुलगी अशीं दोन मुलें झालीं. वडिलोपार्जित पद्धतीप्रमाणें त्यांनींही एकमेकांशींच लग्न लाविलें. त्यांनाही एक कन्या व एक पुत्र झाला. त्यांचीं अनुक्रमें हिंसा व क्रोध हीं नांवें होत. रीतीप्रमाणें ह्यांनाही कलि (कलह) आणि दुरुक्ति (अपशब्द) हीं दोन अपत्यें झालीं. त्यांनींही एकमेकांशींच लग्न लाविलें. त्यांना मृत्यु नामक कन्या आणि भय नामें पुत्र हें जोडपें झालें, व त्या जोडप्याला यातना आणि नरक हीं संतति झाली. विदुरा, मी तुला सांगितलेल्या ह्या प्रतिसृष्टीचें पुण्यकारक आख्यान जो मननपूर्वक त्रिवार वाचील, त्याला अधर्मानें वागण्याची बुद्धि होणार नाहीं.

## ध्रुवचारित्र.

मैत्रेय म्हणाले:—हे कुरुकुलभूषणा विदुरा, आतां तुला मी विष्णूच्या अंशापासून उत्पन्न झालेल्या स्वायंभुव मनूच्या वंशाचें वर्णन सांगतों. ह्याच्या कीर्तीचें श्रवण केलें असतां मन शुद्ध होतें. त्या स्वायंभुव मनूला शतरूपेपासून प्रियव्रत आणि उत्तानपाद असे दोन पुत्र झाले, हें तुला पूर्वीं सांगितलेंच आहे. हे विष्णूचे भक्त असल्यामुळें जगाचें रक्षण करण्यांत नेहमीं तत्पर असत. उत्तानपाद राजाला दोन स्त्रिया होत्या. एक सुनीति व दुसरी सुरुचि. त्यांत सुरुचि ही आवडती होती. त्या दोघींना ध्रुव व उत्तम असे दोन पुत्र झाले. पैकीं ध्रुव हा नावडतीचा आणि उत्तम हा आवडतीचा होता. एकदा उत्तानपाद राजा उत्तमाला मांडीवर घेऊन खेळवीत असतां ध्रुवाला वाटलें कीं, आपणही पित्याच्या अंकावर बसावें; म्हणून तो तसें करूं लागला, पण राजानें त्याला मांडीवर बसूं दिलें नाहीं. विदुरा, जवळच ध्रुवाची सापत्न माता सुरुचि उभी होती तिनें हें पाहिलें. आपल्यावर पतीचें विशेष प्रेम आहे म्हणून तिला अतिशय गर्व झालेला होता, व त्यांत आणखी हें राजाचें वर्तन तिच्या दृष्टीस पडलें; मग काय विचारितां? राजाला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें ती ध्रुवाला म्हणाली, "बाळा, तूं राजपुत्र आहेस खरा, पण तूं माझ्या उदरीं जन्म घेतलें नाहींस, त्या अर्थीं राजाच्या अंकावर बसण्यास तूं योग्य नाहींस. ह्यास्तव अप्राप्य वस्तूची इच्छा तूं करूं नको; आणि ह्याउपर तें पद तुला प्राप्त करून घेणें असेल, तर खडतर तपश्चर्या करून ईश्वराला प्रसन्न करून घे, व पुढल्या जन्मीं तरी माझ्या उदरीं जन्मास ये." विदुरा, ध्रुवाच्या सावत्र आईनें केलेलें हें कठोर भाषण ऐकून उत्तानपाद राजानें एका शब्दानें देखील तिचा प्रतिकार केला नाहीं; तेव्हां मोठ्यानें श्वास टाकून ध्रुव हा रडत रडत आपल्या मातेकडे निघून गेला. मुलगा रडत आला, असें पाहून सुनीतीनें त्याला मांडीवर घेतलें, तों झालेला वृत्तांत नागरिकजन तिला सांगूं लागले. तो ऐकून सुनीतीला पराकाष्ठेचें दुःख झालें. विदुरा, स्त्रियांचीं मनें स्वभावतांच कोमल असतात. तशांतून तीं सवतीचीं मर्मभेदक भाषणें! मग काय पुसतां? तिचें अंतःकरण अगदीं करपून गेलें, ती ढळढळां रडूं लागली, व दीर्घ श्वास टाकून ध्रुवाला म्हणाली, "बाळा, आपल्या

प्रारब्धीं जसें असेल तसें आपल्याला सुख किंवा दुःख मिळतें; त्याबद्दल दुसऱ्यास दोष देण्यांत काय अर्थ ? शिवाय, तुझी सापत्न माता तरी काय खोटें बोलली ! कारण, ज्या मला नुसती दासी सुद्धां म्हणण्याचें महाराजांच्या जिवावर येतें, त्या नावडत्या बायकोच्या पोटीं तूं आला आहेस हें खरेंच; म्हणून, बाळा, तुला जर उत्तम पद मिळावें अशी इच्छा असेल, तर तुझ्या सावत्र आईनें सांगितल्याप्रमाणें भक्तिपूर्वक तूं ईश्वराची आराधना कर, म्हणजे तोच तुला तें देईल. बाबारे, त्या भगवंताचें सामर्थ्य अगाध आहे. प्रत्यक्ष ब्रह्मदेवानेंही परमेष्ठिपद प्राप्त करून घेण्याकरितां भगवंताच्या चरणकमलांची सेवा केली होती. तुझा पितामह स्वायंभुव मनु ह्यानेंही सर्वांभूतीं परमेश्वर भरला आहे अशी बुद्धि ठेवून त्याच्याच आराधनेसाठीं यज्ञयागादिक कर्मे केलीं; आणि त्या योगानें त्याला इहपरलोकींचे भोग मिळून अंतीं मोक्षसुख प्राप्त झालें. म्हणून, ध्रुवा, तूं आपल्या शुद्ध अंतःकरणांत त्या जगदात्म्याची स्थापना करून त्याजवरच निश्चल भाव ठेव; म्हणजे, ब्रह्मदेवासारखे मोठमोठे पुरुष अनेक यत्न करीत असतांही त्यांकडे ढुंकून सुद्धां न बघणारी लक्ष्मी ज्याच्या चरणांची रात्रंदिवस सेवा करिते, तो भक्तवत्सल लोकनायक प्रभु तुझे सर्व मनोरथ पूर्ण करील."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, मातेच्या उपदेशाप्रमाणें वागण्याचा निश्चय करून ध्रुवानें तत्क्षणींच आपल्या पित्याची नगरी सोडिली व अरण्यांत गमन केलें. हें वर्तमान त्रिकालज्ञ नारदांना समजलें तेव्हां त्यांना फार आश्चर्य वाटलें. नंतर ते ध्रुवासमीप आले आणि त्याच्या मस्तकावर आपल्या पवित्र करानें स्पर्श करून विस्मयानें आपल्याशींच म्हणाले, "अहो, क्षात्रतेज विलक्षण खरेंच ! हा बालक केवढासा ! परंतु सावत्र आईचें मर्मभेदक भाषण सहन न होऊन हा लागलीच अरण्यांत चालता झाला !" विदुरा, ध्रुवाचा हेतु नारद मुनींच्या लक्षांत आलाच होता. म्हणून त्यांनी उघडपणें ध्रुवास म्हटलें, "मुला, तूं अद्यापि लहान आहेस. तुझे आतां खेळण्यासवरण्याचे दिवस, मानापमानाचा विचार तूं कशाला करतोस ? खरें पाहूं गेलें तर मान आणि अपमान हे कांहीं नाहींत. हा सर्व भ्रामक कल्पनेचा बाजार आहे. वास्तविक कोणी कोणाचा अपमान करीत नाहीं, आणि कोणी कोणाला मान देत नाहीं. सुख-दुःख, मानापमान हे ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें त्याला मिळतात. म्हणून त्याविषयीं असंतोष न मानितां, दैवानें जें प्राप्त झालें असेल, त्यांतच संतोष मानावा. आतां, कदाचित् तुझ्या मातांच्या उपदेशाप्रमाणें ईश्वराची आराधना करून तुला त्यास संतुष्ट करावयाचें असेल, तर तें कर्म फार कठिण आहे. योगी सर्वसंगपरित्याग करून व योगाभ्यासानें समाधि लावून त्या भगवत्पदाचा शोध करीत असतात, तरी सुद्धां त्यांना एका जन्मांत त्याची प्राप्ति होत नाहीं; व अनेक जन्म घेऊनही त्यांना म्हणजे त्याची प्राप्ति होतेच असें नाहीं; म्हणून, बाळा, तूं हा बिकट मार्ग सोडून दे. ह्या मार्गाचा विचार करण्यास वृद्धापकालच योग्य होय. ती वेळ आली, म्हणजे तूं आपोआपच तो यत्न करूं लागशील. बाळा, सध्यां तूं प्राक्तनकर्मानुसार प्राप्त झालेल्या स्थितींत संतोष मानून चित्तवृत्ति शांत ठेव, म्हणजे मायाकृत भ्रमांतून मुक्त होशील. बाळारे, ऐहिक तापत्रयांतून सुटका होण्यास उत्तम मार्ग म्हटला म्हणजे सदाचार हा होय; व त्याचें स्वरूप असें कीं, प्रत्येकानें आपल्यापेक्षां अधिक गुणवान पुरुषावर प्रेम करीत जावें, कमी गुणवान पुरुषाविषयीं अनादरबुद्धि ठेवूं नये, व समानाशीं मैत्रीची इच्छा धरावी. जे लोक ह्या नियमानें वागतात, त्यांस दुःखें भोगावीं लागत नाहींत."

मैत्रेय म्हणतातः—विदुरा, नारदांचें हें भाषण

ऐकून ध्रुवानें प्रत्युत्तर दिलें, "मुनिश्रेष्ठा, मनुष्यांवर कितीही प्रकारचे प्रसंग आले तरी त्यांनीं शांति धरावी, ही गोष्ट सांगून आपण मजवर मोठा उपकार केला; पण, महाराज, मी क्षत्रियकुलोत्पन्न असल्यामुळें माझ्या अंगीं स्वभावतांच नम्रता नाहीं. त्यांतूनही सापत्न मातेचे वाग्बाण माझ्या अंतःकरणांत शल्याप्रमाणें टोंचत आहेत; म्हणून माझ्या मनावर ह्या उपदेशाचा कांहींच परिणाम होत नाहीं. तर, हे ब्रह्मनिष्ठ मुने, त्रैलोक्यांत जें अत्युत्कृष्ट पद असेल, व जें ह्यापूर्वी माझ्या पितरांना किंवा इतर कोणालाही प्राप्त झालें नसेल, तें मिळण्याचें साधन सांगा." विदुरा, नारद म्हणजे काय सामान्य पुरुष! प्रत्यक्ष ज्ञानसंपन्न ब्रह्मदेवापासून उत्पन्न झालेला आणि जगाचें हित करण्याकरितां ब्रह्मवीणा घेऊन भ्रमण करणारा तो; त्याला हें भाषण ऐकून फार संतोष झाला, व त्यानें ध्रुवास ज्ञानोपदेश केला.

### नारदांचा ध्रुवास उपदेश.

नारद म्हणाले:—ध्रुवा, मातेनें तुला जगन्निवास परमेश्वराची आराधना करण्यास सांगितलें, तोच तुझ्या कल्याणाचा मार्ग होय. म्हणून एकाग्र अंतःकरणानें तूं त्याचें भजन कर. ज्याला चतुर्विधपुरुषार्थरूप उत्तम फल प्राप्त करून घेण्याची इच्छा असेल, त्यानें श्रीहरीच्या चरणांची सेवा करावी, हेंच उत्तमसाधन होय. म्हणून, ज्या ठिकाणीं परमेश्वर नेहमीं आनंदानें वास करीत असतो, त्या यमुनातीरावरील मधुवनांत तूं जा, आणि तुला सांगतों त्याप्रमाणें आचरण कर; म्हणजे तुझें कल्याण होईल. ध्रुवा, तुझें उपनयन झालें नाहीं, ह्यास्तव अध्ययनादि कित्येक कर्मे तुला वर्ज्य आहेत; तथापि अधिकारानुरूप अन्य कर्मे करण्यास प्रत्यवाय नाहीं. तेथें पवित्र अशा यमुनेचें त्रिकालस्नान करून शुद्धासन घालून बसावें, आणि पूरक, कुंभक व रेचक ह्या त्रिवृत् प्राणायामांच्या योगें प्राण, इंद्रियें व मन हीं निश्चल करून

### परमेश्वरस्वरूपाचें ध्यान

करावें. तें ध्यान कसें करावयाचें तें तुला सांगतों: प्रथम परमेश्वराची अत्यंत सुंदर अशी मूर्ति ध्यानांत आणावी. त्या मूर्तीचें मुख सुप्रसन्न असून नेत्र कमलांसारखे मनोहर आहेत; नासिका सरळ असून भुवया कमानदार आहेत; अंगकांति निर्मल आकाशाप्रमाणें श्यामल असून ओष्ठ आरक्त आहेत; सूर्याप्रमाणें तेजस्वी असा मुकुट मस्तकावर झळकत असून कानांतील कुंडलांची प्रभा गालांवर पडलेली आहे; गळ्यांत वनमाला विलसत असून वक्षस्थलावर श्रीवत्सलांछन अत्यंत शोभा देत आहे; चारही बाहु भूषणांनीं युक्त असून हातांत शंख, चक्र, गदा आणि पद्म हीं धारण केलेलीं आहेत; तो पीतांबर नेसला असून त्यानें देदीप्यमान असा कमरपट्टा घातला आहे; त्याचीं नखाग्रें हिरकण्यांसारखीं चमकत असून त्यानें पायांत नूपुरें घातलीं आहेत; सहस्रदलकमलासारख्या सिंहासनावर तो बसला असून त्याच्या कंठांत कौस्तुभ मणि झळकत आहे; व तो लोकनायक प्रभु भक्ताची इच्छा पूर्ण करण्यास सिद्ध असून सप्रेमदृष्टीनें स्मित हास्य करीत आहे, असें ध्यानांत आणावें. ध्रुवा, अशा प्रकारें भगवंताच्या मनोहर रूपाचें ध्यान केलें असतां ध्यान करणाऱ्या मनुष्याच्या अंतःकरणांत फार लवकर वैराग्य उत्पन्न होतें, व मग त्याचें मन सत्स्वरूपापासून पराङ्मुख होत नाहीं. असो; नंतर

ॐनमो भगवते वासुदेवाय। ह्या श्रेष्ठ मंत्राचा जप करावा. ह्या गुह्य मंत्राचा सात अहोरात्र जप केला असतां प्रत्यक्ष भगवद्दर्शन होतें. ह्याप्रमाणें जप झाल्यावर परमेश्वराची पूजा करावी. त्या स्थलीं काष्ठ, मृत्तिका, शिला, सुवर्ण, रौप्य इत्यादि जो पदार्थ सुलभ असेल, त्याची भगवत्प्रतिमा सिद्ध करावी. पूजेस योग्य अशा स्थलीं व कालीं पवित्र जल, पुष्पें, कंदमुळें, फळें, दूर्वा आदिक-

रून अंकुर, भूर्जपत्रें, तुळसी इत्यादिकांनीं भगवंताचें अर्चन करावें. उपासकानें आपलें मन स्थिर ठेवावें; निरर्थक भाषण करूं नये; अपशब्द वर्ज्य करावे; वनांतील फलमूलांचा परिमित आहार ठेवावा; व भगवंताच्या शुद्ध यशाचें चिंतन करावें. बा ध्रुवा, ह्या प्रकारें यथाशास्त्र पूजनविधि केला असतां चारी पुरुषार्थांची प्राप्ति होते. साधकाला केवळ मोक्षाचीच इच्छा असेल, तर त्यानें सर्व कर्में निष्कामबुद्धीनें करून भगवंतास अर्पण करावीं, म्हणजे त्यास निःसंशय सायुज्य मिळेल.

### ध्रुवगमनामुळें उत्तानपादाचें दुःख.

मैत्रेय पुढें सांगू लागले:—विदुरा, ह्याप्रमाणें नारदांचा उपदेश ग्रहण करून, त्यांच्या आज्ञेप्रमाणें तो ध्रुव बाळ मधुवनांत गेला. इकडे नारदांची स्वारी तेथून निघाली, ती उत्तानपाद राजाच्या अंतःपुरांत प्राप्त झाली. त्यांस पाहतांच राजानें त्यांस उत्तम आसन दिलें, आणि अर्घ्यपाद्यादिकांनीं त्यांची पूजा केली. तो स्वागतविधि आटोपल्यावर, राजाची मुद्रा सचिंत आहे असें पाहून नारदांनीं त्याला विचारिलें, " हे राजा, तुझ्या मुखावर उदासीनतेची कळा आली असून, चिंतेनें तूं अगदीं ग्रस्त झाला आहेस असें दिसतें; तर कोणत्या गोष्टीची तुला न्यूनता आहे तें मला सांग. " विदुरा, नारदांचें हें भाषण ऐकून राजानें प्रत्युत्तर दिलें, " महाराज, मला सांगण्यास फार लाज वाटते कीं, म्यां अप्रबुद्धानें अतिशय स्त्रीलंपट होऊन, स्वतांच्या पांच वर्षांच्या अज्ञान मुलास बाहेर घालविलें, आणि त्याच्या आईची वास्तपुस्तही केली नाहीं. मुनिवरा, हें कृत्य होऊन गेल्यावर आतां मला त्याचा फार पश्चात्ताप होत आहे. ह्या वेळीं तो बालक कोठें बसला असेल आणि काय करीत असेल कोण जाणे ! त्याचे प्राण भुकेनें व्याकुळ झाले असतील, त्याचे नेत्र निस्तेज झाले असतील, तो चालून चालून अतिशय थकला असेल, असे नानातऱ्हेचे विचार मनांत येऊन माझें मन कसें अगदीं कावरेंबावरें झालें आहे; त्या योगानें अंतःकरणांत कल्होळ होत असून मुळींच चैन पडत नाहीं! अहो, तो मुलगा फार ज्ञानी आहे. तो माझ्या मांडीवर बसावयास येत असतां म्यां दुष्टानें त्यास बसूं दिलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्याची सावत्र आई जी माझी द्वितीय पत्नी सुरुचि, ती मजसमक्ष त्याला दुरुत्तरें बोलून दुखावीत असतां म्यां स्त्रीलंपटानें तिचेंही निवारण केलें नाहीं. महाराज, आपण सर्वज्ञ आहां, तेव्हां आपणास सर्व वृत्त माहीत असलें पाहिजे. तो खुशाल आहेना? वनांतील हिंस्र पशूंकडून त्याचा नाश तर झाला नाहींना? मुने, आपण त्याचें कुशलवृत्त कळवून माझा शोक दूर करावा."

### उत्तानपाद राजाचें सांत्वन

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, राजाचें हें भाषण ऐकून नारद म्हणाले, "राजा, दुःख करूं नको. तुझा पुत्र खुशाल आहे. तुझ्या पुत्राची योग्यता फार मोठी आहे. तुला अजून त्याचा पराक्रम समजला नाहीं. तो इंद्रादि लोकपालांनाही अशक्य असें कर्म करून तुझी कीर्ति जगांत प्रसृत करील व लवकरच परत येईल." विदुरा, नारदांचें हें अमृततुल्य भाषण ऐकून राजानें तत्काल सर्व राज्यलक्ष्मीचा त्याग केला, आणि तो पुत्राचेंच चिंतन करीत बसला.

### ध्रुवाचें तप.

मैत्रेय पुढें निवेदन करूं लागले:—विदुरा, इकडे ध्रुवानें नारदांच्या उपदेशाप्रमाणें मधुवनांत जाऊन ईश्वराची आराधना करण्यास सुरवात केली. त्यानें पहिल्या महिन्यांत प्रत्येक चौथ्या दिवशीं मात्र थोडींशीं फळें खाल्लीं, आणि अहोरात्र उपाशीं राहून ईश्वरचिंतन केलें; दुसऱ्या महिन्यांत प्रत्येक सहावे दिवशीं झाडाचीं गळून पडलेलीं पानें खाऊन निर्वाह चालविला; तिसऱ्या महिन्यांत प्रत्येक नवव्या दिवशीं नुसतें जल

प्राशन करून ईशचिंतन चालविलें. अशा रीतीनें आहाराचा संकोच करून तो तपश्चर्या करीत असतां पुढें कांहीं दिवसांनीं त्याला आहाराची आवश्यकता मुळींच उरली नाहीं. त्यानें योगाभ्यासानें आपला प्राणवायु इतका स्वाधीन करून घेतला कीं, चौथ्या महिन्यांत बाराव्या दिवशीं मात्र तो वायु भक्षण करी. नंतर पांचव्या महिन्यांत त्यानें एका पायावर उभें राहून तपश्चर्या करण्यास आरंभ केला. विदुरा, ऐहिक विषयांवर प्रीति उत्पन्न होणें अथवा न होणें हें मनाच्या अधीन आहे. ध्रुवानें आपल्या मनाचा इतका निग्रह केला कीं, तें भगवत्स्वरूपाव्यतिरिक्त अन्य विषयांकडे केव्हांही आसक्त होत नसे. ध्रुवाचें मन ब्रह्मचिंतनांत अत्यंत निमग्न झालें, आणि त्याच्या ठिकाणीं ब्रह्मतेज ओतप्रोत भरून तो स्वतः विश्वव्यापक परमात्माच बनला!

### ध्रुवाच्या समाधीनें त्रैलोक्याची धांदल.

मैत्रेय ऋषि पुढें सांगतातः—विदुरा, ह्याप्रमाणें ध्रुवानें परमेश्वरैक्यबुद्धीनें समाधि लाविला, तेव्हां त्याच्या तपस्सामर्थ्यानें तिन्ही लोक गडबडून गेले. त्यानें विश्वाचें आपल्या स्वरूपीं ऐक्य करून श्वासाचा निरोध केल्यामुळें सर्व लोकांचे श्वास बंद झाले. तेव्हां सर्व देव भगवान विष्णूला शरण गेले, आणि त्याची प्रार्थना करून त्यास म्हणाले कीं, "हे भगवंता, स्थावरजंगमात्मक सृष्टीचे प्राण एकदम कोंडले जावे, असा हा अनुभव आम्हांला आजपर्यंत नाहीं. देवाधिदेवा, आपण शरणागतांचें रक्षण करणारे आहां, ह्यास्तव ह्या अरिष्टांतून आमचें संरक्षण करा."

### देवांस आश्वासन.

श्रीभगवान म्हणालेः—देवहो, उत्तानपाद राजाचा पुत्र ध्रुव ह्यानें विश्वस्वरूपीं ऐक्य करून प्राणायाम केला आहे, म्हणून तुमची अशी ही स्थिति झाली आहे. आतां मी त्याला त्याच्या समाधीपासून निवृत्त करितों; म्हणजे तुम्हांला सुख प्राप्त होईल. आतां तुम्ही आपल्या मनांतील सर्व चिंता सोडून द्या, व भयरहित होत्सातें स्वस्थानीं परत जा.

## अध्याय नववा.

—:०:—

### ध्रुवास परमेश्वरदर्शन.

मैत्रेय म्हणालेः—विदुरा, सकलसंकटनिवारक भगवंतानें ह्याप्रमाणें भाषण केल्यावर सर्व देव निर्भयपणें स्वर्गास निघून गेले. इकडे तो भक्तकामकल्पद्रुम परमेश्वर गरुडावर बसून, त्याचा प्रिय भक्त ध्रुव जेथें बसला होता त्या मधुवनांत आला. प्रत्यक्ष परमेश्वर पुढें येऊन उभा राहिला तरी, निश्चल अंतःकरणानें हृत्कमलींच सच्चिदानंद प्रभूचें स्पष्टपणें रूप अवलोकन करणाऱ्या त्या ध्रुवानें नेत्र मुळींच उघाडिले नाहींत; तेव्हां भगवंतानें आपलें स्वरूप त्याच्या हृदयांतून गुप्त केलें. अशा प्रकारें शुद्धचैतन्य जगदात्मा एकाएकीं दिसेनासा होऊन हृदयांत अंधकार उद्भवला, तेव्हां ध्रुव बाळानें नेत्र उघाडिले, तों हृदयांत दिसत असलेलेंच दिव्य रूप प्रत्यक्ष आपल्यापुढें उभें आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तें पाहिल्याबरोबर ध्रुव बाळ अगदीं गडबडून गेला. आतां काय करावें हें त्याला सुचेना. त्यानें ईश्वराच्या चरणीं लोळण घातली, त्याला दृढ आलिंगन दिलें, आणि तो हात जोडून तटस्थ त्याच्याकडे पाहत उभा राहिला. ईश्वराची आपण पुष्कळ स्तुति करावी अशी त्याच्या मनानें फार उचल घेतली, पण ती कशी आणि कोणत्या शब्दांनीं करावी हें त्याला कळेना. तेव्हां सर्वांतरसाक्षी भगवंतानें त्याचें मनोगत जाणिलें आणि आपला शंख त्याच्या गालाला लाविला. शंखाचा स्पर्श होतांच ध्रुवाला अद्भुत वाणीची स्फूर्ति झाली व त्यानें परमेश्वराचा स्तव केला.

## ध्रुवानें केलेली परमेश्वराची स्तुति.

ध्रुव म्हणाला:—

योऽतः प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्तां संजीवयत्यखिलशक्तिधरः स्वधाम्ना ।
अन्यांश्च हस्तचरणश्रवणत्वगादीन्प्राणान्नमो भगवते पुरुषाय तुभ्यम् ॥
एकस्त्वमेव भगवन्निदमात्मशक्त्या मायाख्ययोरुगुणया महदाद्यशेषम् ।
सृष्ट्वाऽनुविश्य पुरुषस्तदसद्गुणेषु नानेव दारुषु विभावसुवद्विभासि ॥
त्वद्दत्तया वयुनयेदमचष्ट विश्वं सुप्तप्रबुद्ध इव नाथ भवत्प्रपन्नः ।
तस्यापवर्ग्यशरणं तव पादमूलं विस्मर्यते कृतविदा कथमार्तबंधो ॥
नूनं विमुष्टमतयस्तव मायया ते ये त्वां भवाप्ययविमोक्षणमन्यहेतोः ।
अर्चंति कल्पकतरुं कुणपोपभोग्यमिच्छंति यत्स्पर्शजं निरयेऽपि नृणाम् ॥
या निर्वृतिस्तनुभृतां तव पादपद्मध्यानाद्भवज्जनकथाश्रवणेन वा स्यात् ।
सा ब्रह्मणि स्वमहिमन्यपि नाथ माभूत्किंत्वंतकासिलुलितात्पततां विमानात् ॥
भक्तिं मुहुः प्रवहतां त्वयि मे प्रसंगो भूयादनंत महताममलाशयानाम् ।
येनांजसोल्बणमुरुव्यसनं भवाब्धिं नेष्ये भवद्गुणकथामृतपानमत्तः ॥
तेन स्मरंत्यतितरां प्रियमीश मर्त्यं ये चान्वदः सुतसुहृद्गृहवित्तदाराः ।
ये त्वब्जनाभ भवदीयपदारविंदसौगंध्यलुब्धहृदयेषु कृतप्रसंगाः ॥
तिर्यङ्नगद्विजसरीसृपदेवदैत्यमर्त्यादिभिः परिचितं सदसद्विशेषम् ।
रूपं स्थविष्ठमज ते महदाद्यनेकं नातः परं परम वेद्मि न यत्र वादः ॥
कल्पांत एतदखिलं जठरेण गृह्णञ्छेते पुमान्स्वदृगनंतसखस्तदंके ।
यन्नाभिसिंधुरुहकांचनलोकपद्मगर्भे द्युमान्भगवते प्रणतोऽस्मि तस्मै ॥
त्वं नित्यमुक्तपरिशुद्धविबुद्ध आत्मा कूटस्थ आदिपुरुषो भगवांस्त्र्यधीशः ।
यद्बुद्ध्यवस्थितिमखंडितया स्वदृष्ट्या द्रष्टा स्थितावधिमखो व्यतिरिक्त आस्से ॥
यस्मिन्विरुद्धगतयो ह्यनिशं पतंति विद्यादयो विविधशक्तय आनुपूर्व्यात् ।
तद्ब्रह्म विश्वभवमेकमनंतमाद्यमानंदमात्रमविकारमहं प्रपद्ये ॥
सत्याशिषो हि भगवंस्तव पादपद्ममाशीस्तथाऽनुभजतः पुरुषार्थमूर्तेः ।
अप्येवमार्य भगवान्परिपाति दीनान्वाश्रेव वत्सकमनुग्रहकातरोऽस्मान् ॥

‘ ज्यानें आपल्या चैतन्यशक्तीनें हृदयांतरीं प्रवेश करून माझें अज्ञान ओळखिलें, आणि माझ्या वाणीला व हस्तपादादिक अवयवांना बहुविध कर्में करण्यास स्फूर्ति दिली, त्या ह्या सर्वशक्तिमान ज्ञानदायक प्रभूला माझा नमस्कार असो. हे भगवंता, वाणी व इतर इंद्रियें ह्यांना सामर्थ्य देणाऱ्या अग्नि वगैरे देवता प्रसिद्ध आहेत, ह्यास्तव मीं त्यांस स्फूर्ति दिली हें म्हणणें यथार्थ नाहीं, असें तूं म्हणशील; परंतु, हे देवाधिदेवा, अग्नि व अन्य देवता हीं तरी कोणाचीं रूपें ? हे विश्वेश्वरा, हें स्थावरजंगमात्मक सर्व जग तुझ्या अगाध मायेचें कार्य होय. ह्या सर्वांच्या अंतर्यामीं विभुत्वानें तुझी व्याप्ति आहे. मायेच्या नानाविध गुणांमुळें तूं देवतादिरूपानें पृथक्पणें दृग्गोचर होतोस, परंतु हा सर्व भास होय. तुझें वास्तविक स्वरूप एक व अद्वितीय असें आहे.

पहा—अग्नि हा सर्वत्र एकच असतांना लांब, रुंद, जाड, बारीक इत्यादि काष्ठांच्या स्थितीप्रमाणें जसा तो लांब, रुंद इत्यादि दृश्य रूपें धारण करितो, तशीच तुझी स्थिति होय. हे दीनदयाळा, तुझें सामर्थ्य किती वर्णन करावें? जगदुत्पत्ति करणारा ब्रह्मदेव हा श्रेष्ठ खरा, पण त्याच्या श्रेष्ठपणाचें आदिबीज तूंच होस. हे प्रभो, तूं त्याला ज्ञानशक्ति दिलीस, तेव्हांच त्यास विश्वाचें यथार्थ स्वरूप दिसलें. तात्पर्य, जगांत कोणतीही गोष्ट स्वतंत्रपणें करण्याची शक्ति एक तुझ्या ठिकाणींच आहे. तुझी कृपा नसल्यास कोणास कांहींएक करितां येणार नाहीं. ह्यास्तव ह्या सर्व विश्वावर तुझे अनंत उपकार आहेत. म्हणून प्रत्येक कृतज्ञ पुरुषाचें मुख्य कर्तव्य तुझ्या पदकमलांचें ध्यान करणें हें होय. हे नारायणा, हा भवसमुद्र तरून जाण्यास निष्कामबुद्धीनें तुझी भक्ति करणें हा एकच उपाय आहे. विषयसुखाची इच्छा धरून जे माझ्यासारखे लोक तुझी आराधना करितात,ते साफ फसतात ह्यांत संदेह नाहीं. कारण, विषयसुख हें नरकांत सुद्धां प्राण्यांना मिळतें, तेव्हां त्यासाठीं तुझी सेवा करणें म्हणजे तुझ्या अगाध व अचिंत्य सामर्थ्याचा दुरुपयोग करणें हें होय. हे देवाधिदेवा, सकाम भक्तांना स्वर्गादि सुखें प्राप्त होतात खरीं, पण तीं कालाच्या अधीन असल्यामुळें त्यांची वास्तविक स्थिति सुखावह आहे असें म्हणतां येत नाहीं. खरें सुख म्हटलें म्हणजे तुझ्या ध्यानमननादिकांपासून किंवा तुझ्या भक्तांच्या चरित्रश्रवणापासूनच होतें. फार काय सांगूं! हें सुख तुझ्या सच्चिदानंदस्वरूपांत सुद्धां प्राप्त होणार नाहीं. म्हणून, हे विश्वव्यापका अनंता, तुझ्या पुण्यप्रद कीर्तीचें वर्णन करण्यांत ज्यांनीं आपलें अंतःकरण सतत गुंतविलें आहे, अशा साधुजनांचा सहवास नित्य घडावा हीच देणगी मला दे; म्हणजे तुझ्या कथामृताचें प्राशन करीत मी स्वस्थ बसेन. तुझ्या चरणकमलीं ज्यांनीं आपलें चित्त स्थिर केलें, त्यांना घर-दार, पुत्र-कलत्र, आप्त-सुहृत् आणि स्वतांचें शरीर ह्यांचें सुद्धां मुळींच भान राहत नाहीं. परमेश्वरा, तूं अनादि आहेस. पर्वत, वृक्ष, पशु, पक्षी, देव, दैत्य, मनुष्यें इत्यादि सर्व सृष्टि हें तुझेंच रूप होय. जगांतील बऱ्या वाईट सर्व स्थिति ह्याही तुझ्यापासूनच उत्पन्न होतात. तुझ्या स्वरूपाचा अंत ब्रह्मदेवालाही नाहीं. जेथें शब्दांची गति खुंटते म्हणून वेदांनींही हात टेंकले, तेथें मजसारख्या अर्भकाचा काय पाड! हे दयाघना परमेश्वरा, प्रळयकालीं हें सर्व जग तूं आपल्या उदरांत लीन करितोस. त्या वेळीं तुला साहाय्य करणारा एक शेष मात्र असतो. हे शेषशयना जगदीशा, त्या कालीं तूं योगनिद्रेचा अंगीकार करितोस, त्यामुळें तुझी दृष्टि अंतर्मुख झालेली असते. पुढें तुझ्या जागृतिसमयीं, त्रिभुवनाचें जनस्थान असें जें तुझें नाभिकमल, त्यापासून ब्रह्मदेव प्रकट होतो, व त्याच्या द्वारें ह्या विश्वाची पुनः घटना होते. हे शाश्वता, तुला निद्रादिक उपाधि आहेत असें म्हणणें म्हणजे हा एक प्रकारचा अलंकार होय. वस्तुतः तूं नित्यमुक्त आहेस. तुझ्या ठिकाणीं रागद्वेषादि मल मुळींच नाहींत. तूं केवळ ज्ञानस्वरूप आहेस. तुझी व्याप्ति सर्वत्र आहे. सर्व सृष्टीच्या आधीं व अंतीं तूंच अवशिष्ट असतोस. तूंच आपल्या अखंडचैतन्यरूप दृष्टीनें ह्या विश्वांतील सर्व व्यापार अवलोकन करीत असतोस; आणि ह्या त्रैलोक्याचें पालन करण्याकरितां सर्वयज्ञात्मक विष्णुस्वरूप तूंच धारण करितोस. हे विश्वमूर्ते, तुझें निर्गुण, निर्विकार व सर्वव्यापक जें रूप, तेंच ब्रह्म होय. नित्य एकमेकांशीं विरुद्ध असणाऱ्या ज्या विद्या-अविद्या, सुख-दुःख, राग-लोभ, जयापजय इत्यादि उपाधि, त्या ह्या ब्रह्मस्वरूपांतच उत्पन्न होतात व विनाश पावतात. हे भगवंता, सर्व पुरुषार्थांची प्राप्ति करून घेण्यास

तुझ्या पादपद्माचाच आश्रय करणें इष्ट आहे. तुझ्या पदसुधेच्या आस्वादनांत तुझे भक्त तल्लीन झाले म्हणजे त्यांस राज्यादि उपभोग्य वस्तूंचें तुच्छत्व पूर्ण प्रत्ययास येतें व ते आपली दृष्टि बहिर्मुख न करितां सदासर्वकाळ तुझ्या आराधनेंत रममाण होतात. हे जगदीशा, मी तुला अनन्य-भावानें शरण आलों आहें. तूं अत्यंत दयावंत आहेस. गाय आपल्या वांसराला, त्याला मागाव-याचें कळत नसतांही प्रेमाचा पान्हा सोडून ज्या-प्रमाणें दूध देते, त्याप्रमाणें, तुझा भक्त अज्ञाना-मुळें तुजपाशीं कांहीं मागत नसला तरी तूं त्याला प्रेमानें सर्व सिद्धि देतोस. देवा, भक्तांचें रक्षण करणें हें तुझें ब्रीदच आहे. ह्यास्तव माझ्या-वर सर्वतोपरी करुणा करून माझे मनोरथ पूर्ण कर.'

### भगवंताची ध्रुवास आज्ञा.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, अशा प्रकारें ध्रुवानें भगवंताची स्तुति केल्यावर भगवान परमेश्वर त्यावर प्रसन्न होऊन म्हणाले, " हे क्षत्रियपुत्रा ध्रुवा, तूं आपल्या अंतःकरणांत कोणत्या पदाची इच्छा करीत आहेस हें मी जाणतों, व जरी तें पद आजपर्यंत मीं कोणालाही दिलें नाहीं, तरी तुझ्या उत्तम तपश्चर्येमुळें तुला तें देतों. बाळा ध्रुवा, तुला आतां मी जें पद देणार, त्याची योग्यता फारच मोठी आहे; तेथें ग्रह, नक्षत्र इत्यादिक तेजो-गोलकांचें चक्र स्थापित केलेलें आहे; तें पद कल्पसमाप्तिसमयीं नष्ट होत नाहीं; ज्याप्रमाणें खळ्यावर धान्य मळण्याकरितां एक खांब पुरून त्यास जे बैल बांधलेले असतात ते त्या खांबा-भोंवतीं एका क्रमानें फिरत असतात, त्याप्रमाणें त्या पदाभोंवतीं धर्म, अग्नि, कश्यप, शुक्र, तसेंच मरीच्यादिक सप्तर्षि व अन्य तारका हीं नित्य फिरत असतात. ध्रुवा, अशा प्रकारचें अद्वि-तीय असें तें पद मी तुला देण्यास सिद्ध आहें; पण प्रथम तूं आपल्या पित्याकडे जा. तो तुला सर्व पृथ्वीचें राज्य देऊन वनांत जाईल, तेव्हां तें राज्य तूं छत्तीस हजार वर्षें कर. बाबारे, राज्यादिकांमुळें तुझ्या इंद्रियांच्या शक्ति कधींही क्षीण होणार नाहींत. तूं माझा भक्त असतां तुझ्या सावत्र आईनें तुजपाशीं द्वेष केला, हा तिजकडून माझा मोठा अपराध घडला आहे. त्याबद्दल तिला शासन व्हावें अशी तुझी जरी इच्छा नाहीं तरी त्याचें फळ तिला भोगावें लाग-णारच! म्हणून तुझा सावत्र भाऊ मृगयेकरितां वनांत गेला असतां नष्ट होईल; ती वार्ता ऐकल्या-बरोबर तुझी सावत्र आई पुत्राचा शोध करण्या-करितां वनांत जाईल; व तो सांपडत नाहींसें पाहून वणव्यांत शिरून ती आपला प्राण देईल! असो. ध्रुवा, तुझ्या हातून अनेक यज्ञ होतील, त्यांत तूं ब्राह्मणांना विपुल धन देशील; आणि अशा प्रकारें माझी आराधना करीत अनेक भोग भोगशील व शेवटीं तुला माझें स्मरण होईल. बाळा, नंतर तूं ऋषिलोकांच्या शिरो-भागीं असलेल्या माझ्या दिव्य पदास प्राप्त होशील. बाबारे, तें पद इतकें श्रेष्ठ आहे कीं, तेथें जो प्राणी पोहोंचला, तो पुनः संसारांत पडत नाहीं."

विदुरा, असा आशीर्वाद देऊन भगवान अंत-र्धान पावले. इकडे ध्रुवही ईश्वराच्या आज्ञेप्रमाणें आपल्या नगरास परत आला. परंतु परत येतांना त्याला फार वाईट वाटलें.

विदुर म्हणाला:—मुनिश्रेष्ठा, सकाम पुरुषांना परमेश्वरपद प्राप्त होणें दुर्घट असतांही, ईश्वराच्या चरणांची आराधना केल्याबरोबर एका जन्मां-तच ध्रुवाला त्या पदाची प्राप्ति झाली; मग त्याला वाईट वाटलें म्हणून आपण म्हणतां त्याचें कारण काय बरें असावें?

### ध्रुवाच्या खेदाचें कारण.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ध्रुवाला वाईट वाट-ण्याचें कारण निराळेंच आहे. भगवान कैवल्य-दाता सच्चिदानंद प्रभु प्रसन्न झाला असतां आपण त्यापाशीं मोक्ष मागितला नाहीं हें किती अनुचित

कृत्य असा त्याला पश्चात्ताप झाला. तो मनांत म्हणाला, " अरेरे! सापत्नमातेच्या दुःशब्दांनीं विद्ध होऊन मीं हा केवढा आत्मघात केला बरें! सनक, सनंदन आदिकरून महात्मे नैष्ठिक ब्रह्मचर्यव्रताचें आचरण करून अनेक जन्म समाधियोगाचा अभ्यास करितात, तेव्हां त्यांना ज्या भगवंताच्या पदाचें ज्ञान होतें, त्या भगवत्पदाला मी केवळ सहा महिन्यांच्या तपानें प्राप्त झालों असतां भेदबुद्धि ठेविल्यामुळें मी त्यापासून दूर झालों, ह्याबद्दल मला दुःख होतें. अरेरे! मीं मंदभाग्य म्हणून नश्वर पदाची याचना केली; मी त्या परब्रह्मपदाला गेलों असतों, तर देवांच्याही वर गेलों असतों, ह्यामुळें देवांनींच माझ्या बुद्धीला भ्रम उत्पन्न केला असावा, आणि म्हणूनच नारदांनीं योग्य उपदेश केला असूनही माझी बुद्धि नष्ट झाली! अहो, संसाराच्या यातनेंतून सुटण्याकरितां ईश्वराची प्राप्ति झाली असतां मीं संसार मागून घेतला, तेव्हां ह्यापरतें दुर्भाग्य तें कोणतें? हें माझें मागणें म्हणजे सार्वभौम राजा प्रसन्न झाला असतां त्याजपाशीं दुर्दैवी मनुष्यानें थोडेसें भात मागावें त्याप्रमाणें झालें! खरोखर माझी तपश्चर्या मीं व्यर्थ घालविली. असो, आतां पश्चाताप करून काय उपयोग?"

मैत्रेय ह्मणाले:—विदुरा, परमेश्वर मोक्ष देण्यास समर्थ आहे. तेव्हां त्याची भक्ति करणारे तुझ्यासारखे लोक त्याच्या चरणसेवेशिवाय कशाचीही इच्छा करीत नाहींत. दैवयोगानें जें मिळेल त्यांतच संतुष्ट असतात; असो.

### ध्रुवाचें स्वनगरीं आगमन.

मैत्रेय पुढें म्हणाले:—विदुरा, इकडे उत्तानपाद राजाला आपला पुत्र परत येत आहे ही वार्ता समजली, तेव्हां ती गोष्ट त्याला प्रथम खरी देखील वाटली नाहीं; पण इतक्यांत, 'लवकरच ध्रुव परत येईल' हें नारदांचें वाक्य त्याला आठवलें, आणि मग त्याला अतिशय हर्ष झाला. त्यानें ती वार्ता सांगणाराला मोठें बक्षीस दिलें, आणि तात्काळ तो आपल्या रथांत बसून ध्रुवाला आणण्याकरितां वाद्यादिकांसहित मोठ्या थाटानें सामोरा चालला. त्यानें बरोबर आपला सर्व दलभार, अनेक ब्राह्मण, कुलीन व वृद्ध वृद्ध मंत्री आणि आप्तगण घेतले. ध्रुवाच्या दोन्ही माता उत्तमाला बरोबर घेऊन पालख्यांत बसून निघाल्या. नगराच्या बाहेर राजा आला, तों ध्रुव येत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तात्काळ राजानें रथाखालीं उतरून धावत जाऊन पुत्राला घट्ट आलिंगन दिलें. त्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले, कंठ सद्गदित झाला, व त्यानें पुत्राच्या मस्तकाचें अवघ्राण करून त्याला नेत्रोदकानें स्नान घातलें. ध्रुवानेंही त्याला नमस्कार केला, आणि त्याचे अनेक आशीर्वाद घेतले. नंतर त्यानें आपल्या दोन्ही मातांना नमस्कार केला. त्यांनींही याच्या अंगावरून हात फिरवून त्याचा फार गौरव केला. सुरुचीनें त्याला उठवून घट्ट पोटाशीं धरिलें आणि म्हटलें, 'बाळा, चिरंजीव हो.'

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, सुरुचीची ह्या वेळची स्थिति व पूर्वीची स्थिति ह्यांतील भेद मनांत आण. बाबारे, सर्व कांहीं भगवदिच्छेस अनुसरून घडतें, ही गोष्ट ह्यावरून पूर्ण व्यक्त होते. पहा—ज्यावर जगन्नायक परमात्म्याची कृपा होते, त्यावर सर्वच ममता करूं लागतात. असो; नेत्र अश्रूंनीं अगदीं भरून आल्यामुळें तिच्यानें पुढें एक शब्दही बोलवला नाहीं. ध्रुवाच्या शरिराचा स्पर्श झाल्याबरोबर तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले, व स्तनांतून दुधाच्या धारा वाहूं लागल्या. त्या प्रसंगीं लोकांनीं सुनीतीची फार प्रशंसा केली: ते म्हणाले, "हे सुनीति, तुझ्या दुःखाचें निवारण करणारा तुझा एकुलता एक पुत्र तुला फिरून भेटला ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. आमची खातरी आहे कीं, ज्याचें सतत ध्यान केलें असतां अत्यंत दुर्जय अशा मृत्यूला देखील वश क-

रून घेतां येतें, त्या सकलदुःखहर्त्या परमेश्वराची तूं उत्तम आराधना केली आहेस, असो; हा तुझा पुत्र दीर्घकाल पृथ्वीचें राज्य करील."

### ध्रुवाचा नगरप्रवेश.

मैत्रेय सांगतातः—विदुरा, नंतर राजानें ध्रुवाला व उत्तमाला हत्तिणीवर बसवून आनंदानें नगरांत आणिलें. वाटेनें लोक राजाची स्तुति करीत होते. इकडे प्रजाजनांनीं सर्व नगर श्रृंगारिलें होतें. जागोजागीं मकराकार तोरणें उभारलीं होतीं. ठिकठिकाणीं फलपुष्पयुक्त कदलीस्तंभ आणि फलसंपन्न पूगपोत (पोफळीचे लहान लहान वृक्ष) उभे केलेले होते. प्रत्येक घराच्या दरवाज्यांत उदकपूर्ण कलशांवरून दिवे लाविलेले असून ते कलश आम्रपल्लव, मोत्यांचे सर व पुष्पमाला ह्यांनीं अलंकृत केलेले होते. मार्गांतून व गृहादिकांच्या उपरितन भागीं जरतारी झालरी लाविल्या होत्या. सर्वत्र सुवर्णमंडित छत दिलें असून मधून मधून विमानें व गोपुरें ह्यांचीं शिखरें विलसत होतीं; आणि प्रत्येक गृहाच्या अंगणामध्यें व बाहेरील राजमार्गांवर चंदनादिकांचे सडे घातले असून लाह्या, अक्षता, फुलें, तांदूळ व बळी हीं स्थापित केलीं होतीं. अशा प्रकारें श्रृंगारलेल्या त्या नगरांत ध्रुवानें प्रवेश केला, तेव्हां सर्वांनीं ध्रुवावर पुष्पांचा वर्षाव केला, आणि त्याचें कल्याण चिंतिलें. अशा थाटानें ध्रुवानें पित्याच्या मंदिरांत प्रवेश केला.

विदुरा, उत्तानपाद राजाचें तें मंदिर स्वर्गांतील देवमंदिराप्रमाणें होतें; तें रत्नखचित असून, त्यामध्यें ठिकठिकाणीं दुग्धफेनासारख्या पांढऱ्या स्वच्छ आणि मृदु शय्या हस्तिदंती पलंगांवरून घातलेल्या होत्या. चहूंकडे जरीचे पडदे सोडलेले असून, मूल्यवान आसनें आणि सुवर्णाचीं उपकरणें सर्वत्र ठेविलेलीं होतीं. त्याच्या भिंती पाचेच्या व स्फटिकाच्या असून ठिकठिकाणीं उभ्या केलेल्या सुंदर पुतळ्यांच्या हातांतून रत्नदीप दिलेले असल्यामुळें ती शोभा अनुपम दिसत होती. त्याच्या सभोंवार अनेक उपवनें होतीं, त्यांमध्यें देवलोकींचे अनेक प्रकारचे वृक्ष लावलेले होते, आणि पक्ष्यांच्या जोडप्यांच्या शब्दानें आणि भ्रमरांच्या गुंजारवानें नादित होत असल्यामुळें तीं अतिशय रमणीय दिसत होतीं. त्या उपवनांमधून अनेक वापी होत्या. त्यांच्या पायऱ्या वैदूर्य मण्यांनीं बांधिलेल्या असून, त्यांत काळीं, पांढरीं, लाल अशीं कमलें होतीं, आणि हंस व कारंडव ह्यांचे समुदाय व चक्रवाक, सारस, हे पक्षी त्यांत क्रीडा करीत होते; असो.

### ध्रुवास राज्याभिषेक.

पुत्राचें तें अत्यंत अद्भुत कृत्य श्रवण करून व त्याला प्रत्यक्ष पाहून उत्तानपाद राजाला फार हर्ष झाला; आणि कांहीं दिवसांनीं, तो मोठा झाला असून प्रजाजन व प्रधानमंडल हे त्यावर प्रेम करीत आहेत असें पाहून त्यानें त्यास राज्याभिषेक केला, आणि आपण सर्वसंगपरित्याग करून आत्मचिंतन करण्याकरितां वनांत निघून गेला.

## अध्याय दहावा.

—:०:—

### उत्तमाचें मरण व ध्रुवाचें यक्षांशीं युद्ध.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ध्रुवाला दोन स्त्रिया होत्या. एक शिशुमार प्रजापतीची कन्या भ्रमि आणि दुसरी वायूची कन्या इला. कल्प आणि वत्सर हे दोन पुत्र भ्रमीला झाले, व उत्कल नांवाचा एक पुत्र आणि एक रूपवती कन्या अशीं दोन मुलें इलेला झालीं. सुरुचीचा पुत्र उत्तम ह्यानें विवाह केला नाहीं. तो एकदा मृगयेस गेला असतां एका बलाढय यक्षानें त्याचा प्राण घेतला, व त्या दुःखानें त्याच्या आईनें प्राणत्याग केला. विदुरा, उत्तमाला यक्षानें मारिलें ही वार्ता ऐकून ध्रुवाला अत्यंत कोप आला,

आणि त्यानें आपला विजयरथ जोडून यक्षांची राजधानी जी अलका नगरी तिजवर चाल केली. उत्तर दिशेस जातां जातां हिमालय पर्वताच्या एका दऱ्यांत ती यक्षांची आणि गुह्यकांची अलका नगरी त्याच्या दृष्टीस पडली. तेथें पुष्कळ नागरिकजन संचार करीत होते, आणि शंकराचे भूतगणही तेथें आले होते. तेथें पोहोंचतांच त्या महापराक्रमी ध्रुव राजानें आपला शंख फुंकला. त्या शंखाच्या नादानें आकाश दणाणून गेलें व सर्व दिशांकडून प्रतिध्वनि उठले. तेव्हां यक्षस्त्रिया घाबरल्या आणि काबऱ्याबावऱ्या होऊन इकडे तिकडे पाहूं लागल्या. शंखध्वनि ऐकून तेथील पराक्रमी यक्षांचे बाहु स्फुरण पावूं लागले व त्यांच्या अंगांत वीरश्रीचा संचार झाला. लागलेच ते आयुधें सज्ज करून चोहोंकडून ध्रुवावर चाल करून आले. विदुरा, ध्रुवही कांहीं सामान्य योद्धा नव्हता. आपल्यावर यक्ष धावून येत आहेत असें पाहून त्या महारथ्यानें आपल्या प्रचंड धनुष्यानें प्रत्येकावर तीन तीन बाण एकदम सोडले. ते सर्व त्या प्रत्येकाच्या ललाटावर लागतांच ते अगदीं गलितवीर्य झाले, व त्यांनीं आपसांत ध्रुवाची वाहवा केली. ध्रुवाचें तें शौर्य व युद्धकौशल्य अवलोकन करून यक्षांस अधिकच आवेश उत्पन्न झाला. ध्रुवाचा पराजय केलाच पाहिजे अशी तळमळ लागून त्यांतील प्रत्येकानें सहासहा बाण ध्रुवावर सोडले व मागून तेरा सहस्र यक्षांनीं क्रुद्ध होऊन परिघ, खड्ग, प्रास, शूल, कुठार, शक्ति, ऋष्टि, भ्रुशुंडी, बाण ह्यांची सारखी वृष्टि करून शस्त्रांच्या व बाणांच्या भडिमारानें, यक्षांनीं, पर्जन्य जसा जलधारांनीं पर्वतास आच्छादित करितो तसें ध्रुव राजास आच्छादून टाकिलें. स्वर्गांत सिद्धांनीं हें पाहिलें, तेव्हां त्यांच्या मुखांतून हाहाकार शब्द निघूं लागले, व मानवसूर्य आज यक्षांच्या सेनासमुद्रांत बुडून नष्ट झाला असें ते म्हणाले. इकडे सर्व यक्ष जयशब्दानें गर्जना करूं लागले; इतक्यांत, धुक्यांतून सूर्य बाहेर पडतो त्याप्रमाणें ध्रुवाचा रथ अस्त्रसमुदायांतून बाहेर पडला, आणि ध्रुवानें लागलाच आपल्या धनुष्याचा टणत्कार करून शत्रूंच्या मनाला भय उत्पन्न केलें, व अस्त्रांचा विध्वंस उडविला. इंद्राचें वज्र पर्वतांच्या उदरांत शिरावें, त्याप्रमाणें ध्रुवाचे बाण शत्रूंचीं कवचें फोडून त्यांच्या शरिरांत घुसले. विदुरा, ध्रुवानें ह्या वेळीं फारच घोर संग्राम केला. तेव्हां सर्व समरभूमि रक्तानें लाल झाली; सहस्रावधि यक्ष व राक्षस मरून पडले; जिकडे तिकडे शिरें व धडें दिसूं लागलीं; किरीट, कुंडलें सर्वत्र चमकूं लागलीं; आणि अशा प्रकारें वीरांना उत्तेजन देणारी ती समरभूमि पाहून ध्रुव राजाला अधिकच स्फुरण चढलें, व त्यानें तुमुल युद्ध करून आपल्या बाणांनीं समरभूमि निर्वीर केली. विदुरा, त्या प्रसंगीं शत्रूचे बहुतेक वीर पडले, व बाकीचे पळून गेले. तेव्हां अलका नगरी पाहावी अशी ध्रुवाची इच्छा होती, पण मायावी शत्रु केव्हां कपटकारस्थान रचतील ह्याचा नियम नाहीं असें मनांत आणून तो तेथेंच कांहीं वेळ सावधगिरीनें राहिला. शत्रु फिरून युद्धाचा उद्योग करीत असावेत असा संशय त्याला उत्पन्न झाला, व त्यानें ती गोष्ट आपल्या सारथ्यास कळविली. इतक्यांत, समुद्रावर वाऱ्यानें शब्द होतो तसा शब्द कानीं आला; धुळीनें दिशा धुंद झाल्या; आकाश अभ्रांनीं भरून गेलें; चोहींकडे विजा चमकूं लागल्या; भयंकर गडगडाट ऐकूं येऊं लागले; रक्त, पू, मूत्र, विष्ठा वगैरे गलिच्छ पदार्थांचा पाऊस पडूं लागला; आणि आकाशांतून गारा पडतात त्याप्रमाणें ध्रुवाच्या पुढें धडें कोसळूं लागलीं! तितक्यांत आकाशांत एक प्रचंड पर्वत आविर्भूत झाला; त्यांतून दगडांचा वर्षाव होऊं लागला; चारही दिशांकडून

गदा, खड्ग, परिघ, मुसळें आदिकरून आयुधांची वृष्टि सुरू झाली; भयंकर सर्प हे विजेप्रमाणें आपल्या मुखांतून अग्नि ओकत सैरावैरा धावूं लागले; व्याघ्रसिंहादि हिंस्त्र पशु इतस्ततः हिंडूं लागले; आणि समुद्र मोठमोठ्यानें गर्जना करून आपलें शरीर फुगवून पृथ्वी बुडवूं लागला! विदुरा, अशा प्रकारें असुरांनीं मायेच्या योगें अनेक प्रकारचे उत्पात निर्माण केले, तरी त्या पराक्रमी पुरुषाला त्यांपासून मुळींच भीति वाटली नाहीं. यक्षांनीं ध्रुवावर अति दुस्तर माया सोडिली असें पाहून ध्रुवाचें कल्याण व्हावें ह्याकरितां मुनींनीं तेथें येऊन परमेश्वराची प्रार्थना केली, आणि ध्रुवाला आशीर्वाद दिला कीं, "हे उत्तानपादपुत्रा ध्रुवा, ज्याचें नुसतें नांव घेतलें असतां हा दुस्तर संसार सहज तरून जातां येतो, तो भक्तसंकटनिवारक षड्गुणैश्वर्यसंपन्न ज्ञानदाता प्रभु नारायण ह्या प्रसंगीं तुझें कल्याण करो."

## अध्याय अकरावा.

—:०:—

### नारायणास्त्रानें यक्षांचा पराभव.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ऋषींनीं केलेलें तें भाषण उपदेशाप्रमाणें ध्रुवानें ऐकून घेतलें, आणि तत्काळ आचमन करून नारायणास्त्राचें संधान केलें. ध्रुवानें तसें करितांच, अंतरीं ज्ञानाचा उदय झाला म्हणजे सर्व क्लेश जसे क्षणांत नाहींतसे होतात, तशी गुह्यकांनीं उत्पन्न केलेली ती माया नष्ट झाली. ध्रुवानें नारायणास्त्राचा प्रयोग करून सोडलेले बाण, मयूर जसे कठोर शब्द करीत अरण्यांत शिरतात तसे भयंकर शब्द करीत शत्रुसमुदायांत शिरले, आणि त्या योगानें शत्रूंचा फारच नाश होऊं लागला. बा विदुरा, त्या वेळीं ते अत्यंत क्रोधायमान झाले, व सर्पांनीं आपल्या फणा उभारून जसें गरुडाला मारण्याकरितां जावें, तसे ते सर्व वीर आपापलीं शस्त्रें पाजवून चोहींकडून ध्रुवावर धावून गेले. तेव्हां ध्रुवानें आपल्या बाणांनीं त्यांतील कित्येकांना स्वर्गपथ दाखविला; कित्येकांचे हातपाय तोडिले, कित्येकांचीं शरीरें छिन्नविच्छिन्न केलीं; आणि कित्येकांना पळवून लाविलें. असा प्रकार चालला आहे व त्यांत पुष्कळ निरपराधी गुह्यकगणांचा वध होत आहे हें पाहून, ध्रुवाचा आजा जो स्वायंभुव मनु त्याचें अंतःकरण कळवळलें, आणि ऋषींसह तात्काळ तेथें येऊन त्यानें

### ध्रुवास उपदेश

केला: स्वायंभुव म्हणाला, "बाळा, आतां आपला क्रोध आवर. क्रोध हा नरकाचें द्वार व पापाची मूर्ति होय. ह्या तुझ्या क्रोधावेशांत अनेक निरपराधी पुण्यजनांचा वध होत आहे. ध्रुवा, निरपराधी लोकांचा वध करणें हें आपल्या कुलाला उचित नव्हे. सत्पुरुष अशा कृत्याची निंदा करितात. बाळा, तुझें भावावर प्रेम होतें, व त्याचा वध झाल्यामुळें तुला राग आला ह्या गोष्टी खऱ्या; पण एकाच्या अपराधाकरितां सहस्रावधि निरपराधी लोकांना शिक्षा करणें, हा कोठला न्याय? ह्या जड शरिरालाच आत्मा असें पशूप्रमाणें मानून त्याकरितां दुसऱ्याचा घात करण्यास प्रवृत्त होणें हें तुझ्यासारख्या ज्ञानी पुरुषाला योग्य नव्हे. अरे, तुझ्या हातून असलीं कृत्यें घडतील, असें आम्हांला मुळींच वाटलें नव्हतें. कारण, तूं लहानपणींच सर्वांच्या ठिकाणीं आत्मबुद्धि ठेवून परमेश्वराची एकनिष्ठपणानें सेवा केलीस आणि जें पद मिळणें अत्यंत दुर्लभ तें मिळविलेंस. बाळा, ज्या गोष्टींपासून निवृत्त होण्याविषयीं इतरांना उपदेश करण्याची तुझी योग्यता, त्याच निंद्य गोष्टी तूं स्वतः करण्यास प्रवृत्त झालास, हें काय! दया, क्षमा, शांति व समदृष्टि ह्या गुणांचा तुला अगदींच कसा विसर पडला? बाबारे, दया, क्षमा इत्यादि गुणांची योग्यता फारच श्रेष्ठ आहे. हे गुण ज्या पुरुषाच्या

ठिकाणीं वास करितात, त्यावर परमेश्वर अनुग्रह करितो. परमेश्वराचा अनुग्रह झाला म्हणजे त्या भाग्यवान पुरुषास मायोपाधींपासून मुळींच पीडा होत नाहीं व तो लिंगदेहापासून मुक्त होऊन शेवटीं सायुज्य जोडितो. बा ध्रुवा, ह्या विश्वांतील सर्व व्यापारांचा चालक षड्गुणैश्वर्यसंपन्न प्रभु जगदात्माच होय. एक पांचभौतिक पदार्थ दुसऱ्या पांचभौतिक पदार्थाचा नाश करितो किंवा त्यास अन्य प्रकारें विकृत करितो, ही सर्व भ्रामक माया आहे. बाबा, स्त्रीपुरुषसमागमापासून स्त्रीपुरुषांची उत्पत्ति होते, पुढें त्यांची स्थिति चालते व अंतीं त्यांचा नाश होतो, ह्या सर्व क्रिया भगवन्मायेनें सत्त्वादिक गुणांत क्षोभ होऊन घडतात. ह्या जगांत जेवढे म्हणून विकार अनुभवास येतात, ते सर्व मायेचे आहेत. तिचा नियंता जो अनादि अनंत परमात्मा, तो सर्वथा विकारहीन आहे. देहादि वस्तु जड असतांही त्यांपासून नानाविध कार्यें घडतात, ह्याचें कारण त्या देहादिकांमध्यें परमात्म्याचें अस्तित्व आहे हें होय. लोहचुंबकाच्या सान्निध्यानें लोखंड जसें चलित होतें, तशी परमात्म्याच्या सान्निध्यानें ही कार्यकारणरूप जड सृष्टि चलित होते. बाळा ध्रुवा, सृष्टिस्थितिलयादिक यच्चयावत् कार्यें भगवच्छक्तीनें घडतात खरीं, पण तीं सर्व एकदम घडत नाहींत. कालरूप परमात्म्याच्या इच्छेनें अथवा शक्तीनें मायेच्या गुणांत क्षोभ झाला म्हणजे गुणांतील न्यूनाधिक्याप्रमाणें निरनिराळीं कार्यें उत्पन्न होतात. रजोगुणाचें आधिक्य झालें असतां सृष्टि होते; सत्त्वगुणाचें आधिक्य झालें असतां स्थिति होते; आणि तमोगुणाचें आधिक्य झालें असतां लय होतो. सारांश उत्पत्ति, स्थिति वगैरे सर्व कार्यें परमेश्वराची इच्छा व मायेच्या गुणांत क्षोभ करणारा काळ ह्यांच्या योगें घडतात. त्या कार्यास अमुक एक व्यक्ति कारण आहे, असें म्हणणें म्हणजे अज्ञान होय. ह्यास्तव 'मी' आणि 'तूं' हा सर्व भेद मिथ्या मानिला पाहिजे. वास्तविकपणें सर्व ठिकाणीं आत्मा एकच आहे. पिता पुत्राला उत्पन्न करितो, चोर लोकांना लुटितात, आणि दुष्ट पुरुष निरपराध्यांचा घात करितात; पण वास्तविक पाहतां पिता पुत्राला उत्पन्न करीत नाहीं, चोर लोकांना लुटीत नाहींत, किंवा दुष्ट हे दुसऱ्यांचा घात करीत नाहींत; हे सर्व त्या ईश्वराचे खेळ आहेत. लांकडाच्या बाहुल्या नाचविणारा सूत्रधार—एक बाहुली दुसरीला मारीत आहे, दुसरी तिसरीला लुटीत आहे आणि तिसरी चौथीला खेळवीत आहे, असें ज्याप्रमाणें लोकांना दाखवितो, त्याप्रमाणें, ह्या सर्व गोष्टींचा सूत्रधार तो एकच परमात्मा असून, त्या गोष्टी अमुक अमुक पुरुष करीत आहे असें तो आपल्या मायेच्या योगें दाखवितो. बाहुल्या नाचविणाऱ्या सूत्रधाराच्या मनांत जसे कोणत्याही बाहुलीबद्दल क्रोध, लोभ हे विकार नसतात, त्याचप्रमाणें, ईश्वराच्या मनांत कोणाही व्यक्तीविषयीं राग, लोभ इत्यादि विकार नाहींत. तो निर्विकार व शांत आहे. बाहुल्या नाचविणारा सूत्रधार त्या बाहुल्यांना सोडतांनाच त्यांना परत घेण्याकरितां दोऱ्या बांधून त्या आपल्याजवळ ठेवितो; ह्यामुळें त्या बाहुल्या सुटल्या त्या वेळेसच जशा परत गेलेल्यासारख्या असतात, तसा कोणताही प्राणी जन्मास येतेवेळींच त्याच्या गळ्यांत भगवान काल हा मृत्युरूपानें बांधलेला असतां, ह्यामुळें वास्तविकपणें प्राणी जन्मास आल्याबरोबरच मेलेला आहे असें म्हटलें पाहिजे. बाहुलीला ज्याप्रमाणें आपल्याला कसें नाचावयाचें आहे हें ठाऊक नसतें, त्याप्रमाणेंच प्राण्यालाही आपल्याला काय करावयाचें हें माहित नसतें. कर्ता करविता सर्व कांहीं भगवान काल होय. ह्या काळाची शक्ति फार अचिंत्य आहे. ह्या कालालाच कोणी कर्म ही संज्ञा देतात; कोणी स्वभाव म्हणतात;

कोणी दैव समजतात; व कित्येक काम असेंही म्हणतात. कालाच्या ठिकाणीं विषमबुद्धि मुळींच नाहीं. तो जीवाला पूर्वकर्मानुसार बरीं वाईट फलें प्राप्त करून देण्यास नित्य सिद्ध असतो. म्हणून, हे ध्रुवा, तुला सांगतों कीं, कुबेराच्या सेवकांनीं तुझा भाऊ मारिला नाहीं, तर तो आपल्या दैवानेंच मेला आहे असें मनांत आण. जन्मास घालणें, प्रतिपाल करणें व लयास नेणें ह्या सर्व गोष्टी कालाधीन आहेत. तथापि त्याला अहंकार नसल्यामुळें तो त्या कर्मापासून अलिप्त असतो. तो दैवरूपी ईश्वर अभक्तांना मृत्यु आणि भक्तांना मोक्ष देतो. म्हणून तूं अहंकार सोडून सर्वांठायीं आत्मा सारखा भरलेला आहे अशी बुद्धि ठेवून परमेश्वराला शरण जा. त्याचें माहात्म्य अगाध आहे. बाळा, तुझी सावत्र आई तुला मर्मभेदक भाषणें बोलली म्हणून, तूं पांच वर्षांचा असतांही वनांत गेलास, आणि इंद्रियांना अगोचर अशा ज्या ईश्वराची आराधना करून अत्युच्च पद मिळविलेंस, तो परमेश्वर, ज्याच्या ठायीं यत्किंचितही भेदभाव नाहीं त्याच्याच अंतरीं वास करितो, ह्या गोष्टीचा तूं आपल्या अंतर्यामीं दृष्टि देऊन विचार कर; म्हणजे तुझ्या ठिकाणीं असलेला हा सर्व आपपरभाव नाहींसा होईल. ध्रुवा, क्रोध हा भयंकर रोग आहे; शास्त्रादिकांच्या श्रवणरूप औषधानें ह्याचा नाश कर. ह्या क्रोधाच्या योगानें तुझ्या हातून ह्या वेळीं मोठा अनर्थ घडला आहे. यक्षांनीं आपला भाऊ मारला म्हणून तूं त्यांचा वध केलास, पण यक्षांचा राजा जो कुबेर त्याला ह्यामुळें राग आला असेल. तो शंकराचा भाऊ होय. म्हणून जोंपर्यंत आपल्या कुलावर एखादें संकट ओढवलें नाहीं, तोंपर्यंतच त्याजपाशीं नम्रतापूर्वक सर्व अपराधांची क्षमा माग आणि त्याला प्रसन्न करून घे."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें स्वायंभुव मनूनें केलेला उपदेश अत्यादरपूर्वक ग्रहण करून ध्रुवानें त्यास नमस्कार केला. नंतर स्वायंभुव मनु ऋषींसहवर्तमान स्वस्थानीं निघून गेला.

## अध्याय बारावा.

—:०:—

### ध्रुवास कुबेराचा वर.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, स्वायंभुव मनूचा उपदेश ऐकून ध्रुवाचा क्रोध शांत झाला, व त्यानें यक्षांचा वध करणें बंद केलें. पुढें कुबेराला हें वर्तमान समजलें, आणि तो चारण, यक्ष, किन्नर ह्यांसह तेथें आला. तेव्हां ध्रुव हात जोडून नम्रपणें उभा राहिला असतां कुबेर त्याला म्हणाला, "हे पुण्यवंता क्षत्रियपुत्रा, तुझा पितामह जो मनु, त्याच्या उपदेशानें तूं आपल्या मनांतील तीव्र वैर सोडून दिलेंस, हें पाहून मी तुजवर संतुष्ट झालों आहें. झाल्या गोष्टीविषयीं आतां विचार करण्याचें कारण नाहीं. त्या सर्व गोष्टी कालात्मक परमेश्वराच्या इच्छेनेंच होत असतात. प्राण्याचा नाश किंवा उत्पत्ति होण्याला तो कालच कारण आहे. म्हणून तुझ्या भावाला यक्षांनीं मारिलें नाहीं किंवा तूंही यक्षांना मारिलें नाहींस. कर्ता करविता सर्व कांहीं तो परमेश्वर आहे. 'मी' व 'तूं' हा द्वैतभाव अज्ञानानें उत्पन्न होतो, म्हणून स्वप्नांतील गोष्टीप्रमाणें तो मिथ्या होय. प्राण्यांना बंधदुःखादि प्राप्त होतात, ह्यांस हा सर्व मीपणा कारण आहे. आतां तूं जा. तुझें कल्याण असो. परमेश्वर सर्व भूतांचे ठिकाणीं आहे, पण त्याचें ज्ञान इंद्रियांना होत नाहीं. मायेच्या योगानें तो त्रिगुणात्मक शक्ति स्वीकारतो, पण वास्तविक तो गुणरहित आहे. म्हणून सर्वांचे ठिकाणीं आत्मबुद्धि ठेवून ईश्वराची आराधना कर. हे उत्तानपादपुत्रा, तुझी योग्यता फार मोठी आहे; ह्यास्तव तूं इच्छेस येईल तो वर मजपासून मागून घे."

मुनिश्रेष्ठ मैत्रेय पुढें सांगूं लागले: विदुरा, ह्याप्रमाणें यक्षपति कुबेराचें भाषण श्रवण करून

त्या भगवद्भक्त व बुद्धिमान ध्रुवानें, 'सकलदुःखहर्त्या परमेश्वराचें मला सतत स्मरण असावें' असा वर मागितला. विदुरा, ध्रुवाचें मागणें ऐकून कुबेरास फार समाधान वाटलें व तो अभिष्ट वर अर्पण करून तो अंतर्धान पावला. इकडे ध्रुवही आपल्या नगरास परत आला. नंतर त्यानें अनेक यज्ञ करून व त्यांत विपुल दक्षिणा देऊन भगवान यज्ञपति परमेश्वराची आराधना केली, आणि उपाधिरहित परमात्म्याच्या ठिकाणीं त्यानें आपली भक्ति अचल केली. विदुरा, त्यामुळें, सर्व भूतांचे ठायीं तोच एक परमात्मा भरला आहे अशी ध्रुवाची बुद्धि झाली. आपल्या प्रारब्धांतील पुण्यपापांचा क्षय होण्याकरितां तदनुरूप कर्में करून त्यानें छत्तीस हजार वर्षे पृथ्वीचें राज्य केलें. राज्य करीत असतां त्यानें इंद्रियांचा पूर्ण जय केला होता. स्वप्नगत सृष्टीप्रमाणें हें विश्व आत्म्याच्या ठिकाणीं मायामय आहे असें तो मानीत असे. त्याचा स्वभाव मोठा उदात्त होता. ब्राह्मण म्हणजे त्याला जीव कीं प्राण वाटत असत. दीनांवर दया करणें हें त्याचें अखंड व्रत असे. तो धर्ममर्यादांचें उत्तम प्रकारें पालन करी, व ह्या सर्व गुणांमुळें त्याची सर्व प्रजा पित्याप्रमाणें त्याच्यावर अनुरक्त असे. अशा प्रकारें राजवैभवाचा उपभोग घेत असतां शेवटीं त्यानें आपलें शरीर, स्त्री, अपत्यें, मित्र, राजवैभव हीं सर्व कालाधीन आहेत असा विचार करून पुत्राच्या स्वाधीन राज्य केलें, आणि आपण बदरिकाश्रमीं निघून गेला. तेथें यमनियमादि अष्टांगयोगांचा अविश्रांत अभ्यास करून तो षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराचे ध्यानांत निमग्न राहिला. त्याची देहबुद्धि नष्ट झाली, व 'हा मी ध्रुव' एवढें देखील भान त्यास राहिलें नाहीं !

**नंदसुनंदांची भेट.**

मैत्रेय म्हणाले:-विदुरा, पुढें एके दिवशीं त्याला अत्यंत देदीप्यमान असें एक विमान, भगवान विष्णूच्या सारखींच रूपें धारण करणारे दोन श्रेष्ठ देव ज्यांत बसले आहेत असें, आकाशांतून उतरत आहेसें दिसलें. लवकरच तें विमान त्याच्या जवळ आलें. तेव्हां विमानांतील पुरुष मधुसूदनाच्या पार्षदगणांपैकीं श्रेष्ठ देव आहेत असें त्याच्या लक्षांत आलें. त्या वेळीं त्याची इतकी गडबड उडाली कीं, कोणत्या क्रमानें त्यांची पूजा करावी हेंही त्याला सुचेना. शेवटीं ईश्वराचें स्मरण करीत त्यानें हात जोडून त्यांस वंदन मात्र केलें. तेव्हां ते विष्णूचे पार्षदगण ध्रुवाशीं बोलूं लागले.

**ध्रुवास विष्णुपदीं येण्याविषयीं विनंती.**

नंदसुनंद म्हणाले:-हे राजा, तुझें कल्याण असो. तू पांच वर्षांचा असतांनाच तपश्चर्या करून परमेश्वरास संतुष्ट केलेंस, आणि मोठमोठ्यांनाही जें अप्राप्य, तें श्रेष्ठ विष्णुपद तूं मिळविलेंस; ह्यास्तव तेथें तुला नेण्याकरितां आम्ही आलों आहों. तर आतां, ज्या स्थलाच्या भोंवतीं चंद्रसूर्यादि ग्रह प्रदक्षिणाकार फिरत असतात, त्या अढळपदीं राहण्यासाठीं तूं चल. राजा, असें स्थान आजपर्यंत तुझे पितरांस किंवा इतर कोणासही प्राप्त झालें नाहीं.

**ध्रुवाचें श्रीविष्णुपदीं गमन.**

मैत्रेय म्हणाले:-विदुरा, नंदसुनंदांचें हें अमृततुल्य भाषण ऐकून ध्रुवानें स्नान केलें, आणि सर्व नित्यकर्में आटोपून मुनिजनांना वंदन करून त्यांचे आशीर्वाद ग्रहण केले. पुढें त्यानें त्या विमानास प्रदक्षिणा करून त्यास नमस्कार घातला, नंदसुनंदांस अभिवंदन केलें, आणि आतां तो विमानांत बसणार, तों मृत्यु जवळ आला आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. विदुरा, त्या वेळीं ध्रुवाचें रूप अत्यंत तेजःपुंज बनलें होतें. त्यानें तात्काळ मृत्यूच्या मस्तकावर पाय देऊन विमानांत आरोहण केलें, व तो स्वर्गलोकीं जाण्यास निघाला. स्वर्गांत वाद्यें वाजूं लागलीं, गंधर्व गायन करूं लागले व देवांनीं पुष्पवृष्टि

केली. इतक्यांत त्याला आपल्या मातेचें स्मरण झालें, व तिला टाकून आपण एकटें जाणें बरें नाहीं असें त्याला वाटलें. हा त्याच्या मनांतील विचार विष्णूच्या पार्षदांना तात्काळ कळून आला; आणि त्यांनीं, 'तुझी माता देवी सुनीति विमानांत बसून तुझ्यापुढें चालली आहे, ती पहा' असें म्हणून अग्रभागीं सुनीतीचें विमान दाखविलें. तेव्हां तें पाहून ध्रुवाला आनंद झाला, व त्यानें विमान चालविण्यास सांगितलें. वाटेनें, आपल्यावर पुष्पवृष्टि करणारे देव आणि सूर्यचंद्रादि ग्रह त्याच्या दृष्टीस पडले; आणि तो सप्तर्षीचें व त्रैलोक्याचेंही उल्लंघन करून त्यांच्या वर असलेल्या विष्णूच्या श्रेष्ठ पदाप्रत प्राप्त झाला! विदुरा, विष्णूचें तें ध्रुवपद स्वतांच्या तेजानें नित्य प्रकाशित आहे. त्याच्या दिव्य कांतीनें सर्व त्रैलोक्यास प्रकाश प्राप्त होतो. जे पुरुष नित्य पुण्याचरण करितात व ज्यांच्या ठिकाणीं दया, क्षमा, शांति इत्यादि श्रेष्ठ गुण वास करितात, त्यांसच त्या पदाची प्राप्ति होते. असो; विदुरा, सर्व त्रैलोक्यास ललामभूत असणाऱ्या त्या ध्रुवपदीं तो धीरोदात्त ध्रुव राजा नित्य राहिला आहे.

मैत्रेय सांगतात:—विदुरा, ह्याप्रमाणें ध्रुवास अढळपदाचा लाभ झाल्यानंतर पुढें कांहीं दिवसांनीं, प्रचेत्यांनीं ब्रह्मसत्र आरंभिलें तेव्हां नारद मुनि तेथें फिरत फिरत गेले; तों त्या ठिकाणीं भगवंताचें गुणवर्णन करण्याचा प्रसंग आला असतां, त्या महापतिव्रता सुनीतीच्या पुत्रानें आपल्या तपस्सामर्थ्यानें जी गति मिळविली व ती मिळविण्याकरितां त्यानें आपल्या मनाचा जो निर्धार केला होता, त्याचें नारदांनीं वर्णन केलें.

**ध्रुववर्णन.**

नारद म्हणाले:—ध्रुव हा पांच वर्षांचा बालक असतांना त्याला त्याच्या सावत्र आईनें केलेलीं दुर्भाषणें सहन न होऊन तो तत्क्षणींच वनांत गेला, आणि माझ्या उपदेशाप्रमाणें वागून त्यानें ईश्वरास वश करून घेतलें. त्यानें थोड्या दिवसांत जें पद प्राप्त करून घेतलें, तें पद वेदवेत्त्या पुरुषांनाही दुर्लभ आहे. तसें पद अनेक वर्षं यत्न करून मिळविण्याची नुसती इच्छा करणारा देखील क्षत्रिय पृथ्वीवर असेल असें मला वाटत नाहीं.

मैत्रेय म्हणतात:—विदुरा, ह्याप्रमाणें हें अत्यंत पुण्यकारक व साधूंना मान्य असें ध्रुवचरित्र मीं तुला सांगितलें आहे. हें भक्तिपुरस्सर ऐकिलें असतां मनुष्याची भगवंतावर भक्ति जडते, आणि त्याला आयुष्य, पुण्य, कीर्ति व धन प्राप्त होऊन त्याचें कल्याण होतें व सर्व क्लेश नाहींतसे होतात. म्हणून मनुष्यानें सावधान चित्तानें प्रत्येक दिवशीं सकाळीं आणि संध्याकाळीं ह्या चरित्राचें श्रवणकीर्तन करावें; अथवा तसें न झाल्यास निदान पौर्णिमा, अमावास्या, द्वादशी, श्रवण नक्षत्र, क्षयतिथि, व्यतिपात, संक्रांत आणि रविवार ह्या दिवशीं तरी भाविक जनांस तें ऐकवावें; म्हणजे निश्चयानें सिद्धि प्राप्त होईल.

# अध्याय तेरावा.

—:०:—

## प्रचेतसाख्यान.

सूत म्हणतात:—ऋषीहो, मैत्रेय मुनींनीं निवेदन केलेलें ध्रुवाख्यान श्रवण करून अधोक्षज भगवंताच्या ठिकाणीं विदुराची भक्ति सुदृढ झाली, व त्यानें पुनः मैत्रेय मुनींना आणखी प्रश्न केले.

विदुर म्हणाला:—मुनिश्रेष्ठ, आपण सांगितलेलें ध्रुवचरित्र ऐकून मला फार आनंद झाला आहे. महाराज, आतां, प्रचेत्यांनीं आरंभिलेल्या सत्रांत भगवद्भक्त नारदांनीं ज्या भगवत्कथा वर्णिल्या, त्या सांगण्याचा मजवर अनुग्रह करावा. तसेंच, ज्या प्रचेत्यांनीं यज्ञमूर्ति भगवंताची आराधना केली, ते सत्पुरुष प्रचेते कोणाचे वंशज व त्यांनीं कोणत्या ठिकाणीं सत्र केलें, हेंही सांगण्याची कृपा व्हावी.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ध्रुव आपल्या उत्कल नामक पुत्राला राज्य देऊन वनांत गेला; पण त्या राजपुत्राळा त्या राज्यलक्ष्मीपासून सुख वाटेना. कारण, तो जन्मापासून शांत वृत्तीचा असून कोणत्याही विषयांचे ठिकाणीं आसक्त होत नसे; व सर्वांभूतीं आत्मा भरलेला आहे, व सर्व लोक आत्म्याच्या ठिकाणीं निविष्ट आहेत, असें मानी. परब्रह्मस्वरूप हें नित्य शांत, शुद्ध, ज्ञानैकरस व आनंदघन आहे असा त्यास अनुभव आला होता. तो निरंतर योगाभ्यासांत निमग्न असल्यानें त्याच्या वासना अगदीं नष्ट झाल्या होत्या. ज्वालारहित अग्नि जसा शांत दिसतो, तसा तो उत्कल अगदीं शांत दिसत असे. तो बाह्य स्वरूपावरून अगदीं बोजड वाटत असून त्याची वृत्ति एखाद्या वेडयाप्रमाणें भासे; ह्यामुळें अज्ञानी लोक त्याला 'जड' असें म्हणत. परंतु वास्तविक तो तसा नसून महाज्ञानी होता. असो. उत्कलाला वत्सर नांवाचा एक सावत्र भाऊ होता. उत्कल हा वेडा आहे असें समजून प्रधानादिकांनीं वत्सराळा राज्याभिषेक केला. पुढें वत्सराला त्याच्या स्वर्वीथी नामक पत्नीपासून पुष्पार्ण, तिग्मकेतु, इष, ऊर्ज, वसु आणि जय असे सहा पुत्र झाले. पुष्पार्णाला प्रभा आणि दोषा अशा दोन भार्या होत्या. प्रभेला प्रातर, मध्यंदिन आणि सायं असे तीन पुत्र झाले, व दोषेला प्रदोष, निशीथ (मध्यरात्र) आणि व्युष्ट ( पहांट ) हे तीन पुत्र झाले. त्या पुत्रांपैकीं व्युष्टाला त्याच्या पुष्करिणी नामक पत्नीपासून एक मुलगा झाला. त्याचें नांव सर्वतेजस् असें होतें. त्याला आकूति नामक पत्नीपासून चक्षु ह्या नांवाचा पुत्र झाला. त्या चक्षूला त्याच्या नड्वला नामक पट्टराणीच्या उदरीं बारा पुत्र झाले. हे सर्व मोठे शुद्धाचरणी होते. पुरु, कुत्स, त्रित, द्युम्न, सत्यवान, ऋत, व्रत, अग्निष्टोम, अतीरात्र, प्रद्युम्न, शिबि आणि उल्मुक हीं त्यांची नांवें होत. उल्मुकाला पुष्करिणी नामक पत्नीपासून अंग, सुमनस्, ख्याति, क्रतु, अंगिरस आणि गय हे सहा पुत्र झाले. अंगाची सुनीथा नामक पत्नी होती. तिजपासून वेन त्याला नांवाचा पुत्र झाला. हा मुलगा इतका दुष्ट होता कीं, त्याला कंटाळून अंग हा घरादाराचा त्याग करून वनांत निघून गेला. पुढें तो वेन राज्य करूं लागला. पण तो स्वभावतः दुष्ट असल्यामुळें धर्मबाह्य आचरण करूं लागला. त्या कारणानें मुनि त्रासले आणि त्यांनीं त्याला शाप दिला. विदुरा, मुनींचेंच शापवचन तें! त्यामुळें वेन राजा तात्काळ मृत्यु पावला! तेव्हां चोरादिकांपासून प्रजांस फार उपद्रव होऊं लागला, व सर्वत्र अव्यवस्था माजली. ह्यास्तव, लोकांचें नियमन करण्याकरितां, त्या मुनींनीं मृत झालेल्या वेन राजाच्या उजव्या हाताचें मंथन करून त्यापासून एक पुत्र उत्पन्न केला. विदुरा, त्या पुत्राचें नांव पृथु. हा ईश्वराचाच अंशावतार होय. ह्यानें सर्व पृथ्वीची सुव्यवस्थित रचना केली, म्हणून ह्याला पहिला राजा असें म्हणतात.

विदुर म्हणाला:—मुनिश्रेष्ठा, अंग राजा सच्छील साधु असतांना त्याच्या पोटीं वेनासारखा दुष्ट पुत्र कसा झाला, कीं ज्याच्यामुळें वैताग उत्पन्न होऊन त्याला घरादाराचा त्याग करावा लागला? शिवाय, आणखी असाही एक प्रश्न आहे कीं, राजा हा दुष्टांचा शासन करणारा असतांना त्यालाच मुनींनीं शाप दिला, तेव्हां वेनानें असा अपराध तरी कोणता केला होता? मुनिपुंगवा, धर्ममर्यादा तर अशी आहे कीं, राजा हा लोकपालांचें तेज धारण करीत असल्यामुळें त्याच्या हातून कांहीं अनुचित कर्म घडलें तरीही त्याचा अपमान करूं नये. तर असें असूनही धर्मज्ञ मुनींनीं त्यास देहांत शासन केलें, ह्यावरून त्या वेन राजाचें आचरण सर्वथा गर्हणीय असलें पाहिजे असें मला वाटतें.

## वेन राजाचें चरित्र.

( राज्यप्राप्तीपर्यंत. )

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, तो सर्व इतिहास मी तुला सांगतों, सावधानपणें ऐक. बाबा, पूर्वी एके प्रसंगीं अंग राजानें अश्वमेध यज्ञ आरंभिला होता. त्यामध्यें वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं आवाहन केलें असतांही देवता आल्या नाहींत. तेव्हां ऋत्विजांना आश्चर्य वाटलें आणि ते राजास म्हणाले, "राजा, आम्ही होम करितों, पण देवता आपला हविर्भाग स्वीकारीत नाहींत, तर ह्याचें कारण काय असावें? होमद्रव्यांना दोष द्यावा, तर तूं तीं श्रद्धेनें संपादन केलीं आहेस; मंत्रतंत्रामध्यें कांहीं न्यून असेलसें म्हणावें, तर तसाही प्रकार मुळींच नाहीं; असें असतां कर्माचे साक्षी देव आपापले भाग कां स्वीकारीत नाहींत नकळे." हें ब्राह्मणांचें भाषण ऐकून राजाला फार वाईट वाटलें. त्यानें यज्ञदीक्षा घेतल्यामुळें मौनव्रत स्वीकारलें होतें, तरी सदस्यांना कांहीं प्रश्न विचारण्यासाठीं त्यांच्याच अनुज्ञेनें त्यानें तें मोडलें आणि तो म्हणाला, "सदस्यहो, तुम्हीं देवांचें आवाहन केलें असूनही ते येथें येऊन आपापला हविर्भाग घेत नाहींत, त्या अर्थी मजकडून कांहीं तरी दोष घडला असावा हें खास. तर तो दोष कोणता असावा तें मला सांगा." सदस्य म्हणाले, "राजा, ह्या जन्मीं तुजकडून कोणता एखादा दोष घडला असेल असें मुळींच संभवत नाहीं. परंतु तुला संतति नाहीं, हा मात्र एक प्राक्तनदोष आहे. तर तो जाईल असें कांहीं साधन कर. तूं पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें आराधना केलीस, म्हणजे यज्ञभोक्ता नारायण तुला पुत्र देईल. राजा, ईश्वर हा भक्तांचीं सर्व दुःखें दूर करणारा आहे. ह्यास्तव तो तुझी वासना पूर्ण केल्याशिवाय राहणार नाहीं. राजा, अपत्यासाठीं तूं यज्ञपतीची आराधना केलीस म्हणजे तुला वर देण्याकरितां प्रत्यक्ष भगवान विष्णु एथें प्राप्त होतील, व त्या वेळीं त्यांजबरोबर लोकपाल देवही असतील, म्हणून त्या प्रसंगीं ते अनायासें हविर्भाग ग्रहण करितील व तुझा कार्यभाग सहज सिद्धीस जाईल."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें ब्राह्मणांनीं सांगितल्यानंतर अंग राजानें संततीकरितां पुरोडाशाचा होम केला. तेव्हां अग्नीपासून एक पुरुष उत्पन्न झाला. त्याच्या कंठांत सुवर्णाच्या माळा असून त्यानें शुभ्र वस्त्र परिधान केलें होतें; व त्याच्या हस्तांत सुवर्णपात्र असून त्यांत त्यानें सिद्ध पायस घेतलें होतें. विदुरा, ब्राह्मणांची आज्ञा घेऊन त्या बुद्धिमान राजानें त्या दुधाचा स्वीकार केला, आणि त्याचें अवघ्राण करून मोठ्या संतोषानें तें आपल्या पत्नीला दिलें. तें दूध राणीनें प्राशन केल्यावर तिला गर्भधारणा झाली, आणि योग्य काल गेल्यावर तिला पुत्र झाला. विदुरा, ब्रह्मदेवाचा पुत्र अधर्म ह्याच्या अंशापासून उत्पन्न झालेला जो मृत्यु तो ह्या पुत्राचा मातामह होय. लहानपणापासूनच तो आजाच्या वळणावर गेल्यामुळें तो अधर्मी निपजला. त्याचें नांव वेन असें होतें. तो दुष्ट वेन मृगयेसाठीं वनांत जाई आणि गरीब व निरुपद्रवी पशूंना मारी. त्याला पाहिलें कीं, 'हा वेन येत आहे, संभाळा,' असें लोक ओरडत सुटत. तो अतिशय निर्दय होता. आपल्या बरोबरीच्या मुलांशीं खेळतांना तो त्यांना गुरांप्रमाणें झोडपून काढी. असें हें मुलाचें दुष्ट आचरण पाहून अंग राजाला फार दुःख झालें. त्यास ताळ्यावर आणण्यासाठीं त्यानें पुष्कळ प्रयत्न केले, परंतु ते सर्व निष्फल झाले; तेव्हां त्याला अतिशय वाईट वाटलें; व तो म्हणाला, "अहो! कुसंतानापेक्षां निसंतान फार चांगलें; कारण कुसंतानापासून प्राप्त होणारीं दुःखें तरी मग सोसावीं लागत नाहींत! अरेरे! दुष्ट अपत्यापासून कायहो विपत्ति प्राप्त होतात. जनांत सर्वत्र उपहास होतो; मोठा अधर्म घडतो; सर्वांशीं वैर जोडावें लागतें; आणि अहर्निश

चिंतेंत पडणें प्राप्त होतें! अहो, संतति हें एक आत्म्यावर मोहरूपी पटल आहे. तिच्या योगानें मनुष्याला आनंद होतो खरा, पण एकंदरीतें ती दुःखासच कारण आहे; चांगला पुत्र असला तरी सुद्धां जर त्याच्या जिवाला यत्किंचित् दुःख होईल, तर आईबापांना शोक होतो. तेव्हां सुपुत्र असणें हें देखील एक शोकाचेंच कारण होय. त्यापेक्षां कुपुत्र असणेंच पुष्कळ चांगलें. कारण त्याच्या कृत्यामुळें घरांत एकामागून एक अनेक दुःखें येऊं लागतात, आणि शेवटीं मनुष्याला त्या घराबद्दल वैराग्य उत्पन्न होतें."

मुनिश्रेष्ठ मैत्रेय म्हणाले:—हे कुरुकुलभूषणा विदुरा, अशा प्रकारचे विचार रात्रंदिवस अंग राजाच्या मनांत घोळत असल्यामुळें त्याला चैन पडेना. शेवटीं तो एके दिवशीं अतिशय त्रासून, पत्नीला गाढ निद्रा लागली असतां तिला नकळत मध्यरात्रीं उठून बाहेर निघून गेला. राजा विरक्त होऊन निघून गेल्यामुळें पुरोहित, अमात्य, मित्रमंडळ, आदिकरून प्रजांना अत्यंत दुःख झालें. त्यांनी पृथ्वीवर त्याचा पुष्कळ शोध केला; पण कुयोगी पुरुषांना अंतर्यामीं असलेल्या आत्म्याचा जसा शोध लागत नाहीं, तसा त्या प्रजाजनांना त्या अंग राजाचा शोध लागला नाहीं. शेवटीं ते निराश होऊन परत आले आणि ऋषींना वंदन करून, राजाचा कोठेंही शोध लागत नाहीं, असें त्यांनीं त्यास सांगितलें.

## अध्याय चौदावा.

—:०:—

### वेन राजास अभिषेक व त्याचें दुर्वर्तन.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, अंग राजा राज्य सोडून वनांत गेला तेव्हां प्रजेला शास्ता नाहींसा होऊन मनुष्यांची स्थिति पशुतुल्य होत चालली. त्या वेळीं भृगु आदिकरून मुनींच्या मनांत विचार घोळूं लागले कीं, आतां कोणत्या तरी रीतीनें लोकांची नीट व्यवस्था लागेल असा कांहीं तरी उपाय योजिला पाहिजे. शेवटीं त्यांनीं अंग राजाची पत्नी सुनीथा हिचें अनुमोदन घेऊन, प्रजांना वेन अप्रिय होता तरी त्यालाच राज्याभिषेक केला. वेन राजा अति क्रूर असल्याचें सर्वांना माहीत होतेंच; ह्यामुळें, त्याजपासून आपणांस भयंकर शिक्षा होईल अशी भीति बाळगून चोर, चहाड वगैरे दुष्ट लोक लागलेच लपून बसले. वेन राजा स्वभावतांच गर्विष्ठ असून आत्मश्लाघा करणारा होता, आणि तशांत तो राज्यारूढ झाला; ह्यास्तव ऐश्वर्यमदानें तो फारच उन्मत्त झाला व मोठमोठ्या ज्ञानवृद्ध पुरुषांचाही अवमान करूं लागला. एके दिवशीं हा दुष्ट राजा आपल्या रथांत बसून मदांध झालेल्या निरंकुश हत्तीप्रमाणें बाहेर फिरावयास निघाला, आणि त्यानें ब्राह्मणांना अशी ताकीद दिली कीं, "यज्ञ, दान, होम वगैरे कोठेंही कोणीं करूं नये." विदुरा, तो दुष्ट जेव्हां अशा प्रकारचा डांगोरा पिटवीत पर्यटन करूं लागला, तेव्हां स्वर्ग व पृथ्वी हीं थरथर कांपूं लागलीं! पुढें तें सर्व वर्तमान मुनींस समजलें. तेव्हां आतां लोकांवर कांहीं तरी संकट येणार असें त्यांना वाटलें; आणि भूतवात्सल्यानें प्रेरित होऊन ते सर्व एके ठिकाणीं मिळाले आणि त्यांनीं विचार केला कीं, प्रजा अराजक राहिली असतां तिला चोरादिकांपासून उपद्रव होईल म्हणून, हा वेन राजा राज्यपदाला अयोग्य असतांही आम्हीं ह्याला राज्याभिषेक करविला; पण सर्पाला दूध पाजून पोषिलें असतां जसा दूध पाजणारावरच अनर्थ ओढवतो, तसा ह्या दुष्टाला राज्यासनावर बसविल्यामुळें आम्हांवरच अनर्थ ओढवला आहे! असो. आतां, जरी हा अविचारी आणि अधर्मरत आहे, तरी समजुतीच्या चार गोष्टी सांगणें हें आपलें कर्तव्य आहे; आणि इतकें करूनही जर तो ताळ्यावर

आला नाहीं, तर त्याचा दोष आपल्याकडे नाहीं. इतक्याउपर त्यानें आपलें आचरण न बदलल्यास आपण आपल्या तेजानें त्याला दग्ध करून टाकूं म्हणजे झालें !

### वेनास ब्राह्मणांचा उपदेश.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, असा विचार करून ते मुनि वेन राजाजवळ आले, आणि आपल्या मनांतील क्रोध दाबून ठेवून मधुर वाणीनें त्यांनीं त्याशीं बोलण्यास सुरुवात केली: ते म्हणाले, "राजा, आम्ही तुला कांहीं विनंती करीत आहों, इकडे लक्ष दे. आम्हीं सांगितल्याप्रमाणें तूं वागलास, तर तुझें आयुष्य, संपत्ति, बल, कीर्ति इत्यादि वृद्धिंगत होऊन तुझें कल्याण होईल. पुरुषानें काया, वाचा, मन व बुद्धि ह्यांच्या योगें धर्माचें आचरण केलें असतां त्याला उत्तम लोकाची प्राप्ति होते, व तेंच कर्म निष्कामबुद्धीनें केलें असतां प्रत्यक्ष मोक्षही मिळतो. राजा, प्रजेचें उत्तम प्रकारें पालन करणें हा तुझा धर्म आहे. जो राजा धर्मानें वागत नाहीं, तो ऐश्वर्यापासून भ्रष्ट होतो. प्रजांकडून योग्य कर घेऊन त्यांचें दुष्ट अधिकाऱ्यांपासून व चोरांपासून संरक्षण करणाऱ्या राजाचें भाग्य काय वर्णावें ! ज्या राजाच्या प्रजा आपल्या वर्णाश्रमधर्मास विहित अशीं कर्में करून यज्ञपति भगवंतास पूजितात, त्याला प्रत्यक्ष परमेश्वर प्रसन्न होतो; लोकनायक परमात्म्याचा प्रसाद प्राप्त झाल्यावर मग त्यास कोणतीच उणीव राहत नाहीं. लोकपालांसुद्धां सर्व लोक त्यास करभार आणून देतात. राजा, सर्व लोक, देव व यज्ञ ह्यांचें सुव्यवस्थित रीतीनें पालन करणारा परमेश्वरच होय. वेदत्रयी, हवनीय द्रव्यें व तपश्चर्या हीं त्या भगवंताचींच रूपें आहेत. राजा, तुझ्या देशांत राहणारे लोक तुझा उत्कर्ष होण्यासाठीं अनेक प्रकारें यज्ञयागादिकांनीं ईश्वराचें आराधन करीत असतात; ह्यास्तव तूं त्यांना नीटपणें वागवावेंस हें आम्हांस उचित दिसतें. राजा, सर्व वैभवांचें प्रधान कारण इंद्रादिक लोकपालांची कृपा हें होय. ही कृपा संपादन करण्यास ब्राह्मणांकरवीं यज्ञानुष्ठान करणें हेंच साधन आहे; म्हणून ब्राह्मणांची हेलना करणें हें सर्वथैव गर्ह्य होय." ह्यावर वेन म्हणाला, "ब्राह्मणहो, तुम्ही अधर्माला धर्म असें मानितां, आणि तुमच्या उपजीविकेचीं साधनें प्राप्त करून देणारा व तुमचें सर्वस्वीं संरक्षण करणारा जो मी, त्या माझी पूजा करणें सोडून जारिणी स्त्रीप्रमाणें भलत्याचीच आराधना करितां, तेव्हां तुम्ही मूर्ख आहां ह्यांत संदेह नाहीं. ब्राह्मणहो, जे पुरुष आपल्या राजाची अवज्ञा करितात, त्यांचें केव्हांही कल्याण व्हावयाचें नाहीं. अहो, विष्णु, ब्रह्मदेव, शंकर, इंद्र, वायु, यम, सूर्य, पर्जन्य, कुबेर, चंद्र, पृथ्वी, अग्नि, वरुण वगैरे शाप किंवा वर देण्यास समर्थ असे सर्व देव राजाच्या देहांत वास करितात; अर्थात् राजा हा प्रत्यक्ष विष्णुच आहे. ह्याकरितां तुम्ही सर्व माझीच आराधना करीत जा व मलाच बलि आणून देत जा. मजहून श्रेष्ठ असा आराध्य पुरुष कोणीही नाहीं."

### वेन राजाचा नाश.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें त्या दुर्बुद्धि व अधर्मरत वेन राजाची ऋषींनीं पुष्कळ विनवणी केली, तरी तिचा कांहींएक उपयोग न होतां त्यानें उलट त्या ऋषींनाच मूर्ख ठरवून त्यांचा अपमान केला, व आपलें पाऊल अधिकच खोलांत टाकिलें ! तेव्हां ब्राह्मण संतापून म्हणाले, "अहो, ह्या दुष्ट राजाचा एकदम वध करा. हा जिवंत राहिला तर सर्व जगाची लवकरच राखरांगोळी करील. हा नराधम राजपदाला पात्र नव्हे. हा इतका निर्लज्ज झाला आहे कीं, ज्या परमेश्वराच्या कृपेनें ह्याला एवढें ऐश्वर्य प्राप्त झालें, त्याची सुद्धां निंदा करण्यास हा भीत नाहीं. तेव्हां ह्यास ठार मारणें हेंच इष्ट होय." मैत्रेय म्हणाले:—विदुरा, हा वेळपर्यंत त्या मुनिगणांनीं आपला क्रोध दाबून

ठेविला होता, परंतु तो आतां एकदम बाहेर निघाला; आणि आपल्या दुराचरणामुळें मृतप्राय झालेल्या त्या वेन राजाचा नुसत्या हुंकारानेंच नाश करून टाकून ते आपापल्या आश्रमांत निघून गेले ! विदुरा, पुत्राच्या मरणानें सुनीथेला अत्यंत दुःख झालें, व तिनें मंत्रविद्येच्या योगानें त्या शवाचें संरक्षण केलें. पुढें कांहीं कालानंतर, एके दिवशीं ते मुनि सरस्वतीच्या उदकांत स्नान करून नित्य कर्में आटोपल्यावर ईश्वराचे गुणानुवाद वर्णन करीत बसले असतां, चोहोंकडे भयंकर उत्पात होत आहेत असें त्यांना दिसलें. तेव्हां सांप्रत पृथ्वीचें पालन करणारा कोणी नाहीं त्यामुळें तर कांहीं अनर्थ ओढवणार नाहींतना ! असें ते परस्परांशीं बोलूं लागले. इतक्यांत सर्व दिशांकडे धुरळा उठत आहे व लोकांना लुटण्यासाठीं चोर इकडे तिकडे धावत आहेत असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्या ऋषींच्या लक्षांत आलें कीं, राजा मरण पावला असून दुष्टांचें शासन करण्यास कोणी नाहीं, म्हणून हा सर्व चोरवडा व धामधूम माजली आहे. राष्ट्रांत कित्येक लोक दंगेधोपे मोडण्यास समर्थ असे आहेत; परंतु अराजक स्थितीमध्यें त्यांस तसें करणें इष्ट वाटत नाहीं. विदुरा, ह्याप्रमाणें मनांत आणून त्या ऋषींनीं निश्चय केला कीं, सज्जनांचें पालन व दुष्टांचें निग्रहण करण्यास ह्या पृथ्वीवर कोणी तरी राजा संस्थापित केला पाहिजे; अंग राजाच्या वंशावर भगवंताची कृपा असल्यामुळें ह्या वंशाकडेच हा अधिकार चालणें सर्वथा श्रेयस्कर आहे; ह्याकरितां अंग राजाचा वंश पुढें चालेल अशी कांहीं तरी तजवीज करणें आपणांस उचित होय. अनाथांच्या संरक्षणासाठीं शांतवृत्ति व समदृक् अशा ब्राह्मणांनींही दुष्टांचा संहार करण्यास सिद्ध व्हावें; नाहींपक्षां अशी उपेक्षा करणाऱ्या ब्राह्मणांस अधर्माचरणाचें पातक लागून त्यांच्या तपश्चर्येचा उच्छेद होतो असें शास्त्रवचन आहे; ह्यास्तव औदासिन्य धरून उपयोगी नाहीं. विदुरा, नंतर पुत्रोत्पत्तीसाठीं त्या मृत वेन राजाच्या मांडीचें त्यांनीं वेगानें मंथन केलें; तों, ज्याचा रंग कावळ्यासारखा आहे, ज्याचे हात-पाय फार आखूड असून हनुवटी मोठी आहे, व नाक बसकें, डोळे लाल व केंस तांबडे आहेत, असा एक पुरुष उत्पन्न झाला; आणि, मी काय करूं, असे दीनवाणे शब्द त्यानें उच्चारिले. तें ऐकून ऋषि त्याला तात निषीद (बाळा बैस.) असें म्हणाले; ह्यावरूनच त्याला पुढें निषाद असें नांव पडलें. अरण्यांत व पर्वतावर राहणारे नैषाद ( भिल्ल ) हे त्याचेच वंशज होत. पापमूर्ति वेन राजाचें सगळें भयंकर पाप काढून घेऊन तो जन्मास आला असल्यामुळें, त्याच्या वंशजांस गांवांत प्रवेश करण्यास अधिकार नाहीं.

## अध्याय पंधरावा.

—:o:—

### पृथु राजाचें चरित्र.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, निषाद हा राज्याला अयोग्य आहे, असें पाहून ऋषींनीं त्या मृत शरिराच्या बाहूंचें मंथन केलें; तेव्हां त्यापासून एक जोडपें उत्पन्न झालें. त्यास पाहून ऋषींना फार आनंद झाला. ते लोकांस सांगूं लागले कीं, "हा पुरुष प्रत्यक्ष विष्णूचा अवतार आहे. हा सर्व जगांतील आदिराजा होय. हा महाभाग आपली कीर्ति सर्वत्र प्रथित म्हणजे प्रसिद्ध करील, ह्यास्तव ह्यास पृथु असें म्हणतील. तशीच ही स्त्री रूपगुणांनीं अलंकारांस देखील शोभवील, म्हणून सर्व जन हिला अर्चि असें म्हणतील. ही नित्य पतीच्या अनुरोधानें वागेल." मैत्रेय म्हणाले:—विदुरा, त्या वेळीं आकाशांत शंख, दुंदुभि, कर्णे, मृदंग इत्यादि आनंदसूचक वाद्यें वाजूं लागलीं, सिद्धांनीं पुष्पवृष्टि चालविली, गंधर्वांनीं गायन आरंभिलें, ब्राह्मण स्तुति करूं लागले, अप्सरा नाचूं लागल्या, व सर्व

देव, ऋषि आणि पितर ह्यांसह विष्णु, शंकर, आणि ब्रह्मदेव हे तेथें आले. ब्रह्मदेवानें त्या मुलांकडे पाहिलें, तों पृथूच्या उजव्या हातावर चक्रचिन्ह आणि दोन्ही पायांवर कमलचिन्ह असलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यावरून, हा ईश्वरांश आहे अशी ह्याची खातरी झाली. पुढें त्याला अभिषेक करण्यास चोहोंकडून साहित्य आणिलें; आणि वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं अभिषेक करण्यास आरंभ केला. इतक्यांत नद्या, समुद्र, पर्वत, नाग, गाई, पशु, पक्षी, स्वर्ग, पृथ्वी व सर्व भूतें ह्यांनीं त्याला नजराणे दिले. अभिषेकविधि पूर्ण झाल्यावर राजानें बहुमोल वस्त्रें आणि अलंकार धारण केले. त्याच्याजवळ त्याची पत्नी अर्चि ही मूल्यवान अलंकार धारण करून बसली. अर्चीच्या सान्निध्यानें पृथूस अपूर्व शोभा प्राप्त झाली, व त्यामुळें त्यांजकडे पाहणारांना अतिशय आनंद झाला. विदुरा, नंतर देवादिकांनीं त्या

### पृथूला अपूर्व नजरनजराणे

दिले: कुबेरानें त्याला उत्तम सिंहासन दिलें; वरुणानें एक दिव्य छत्र दिलें; त्या छत्राची कांति चंद्राप्रमाणें असून त्यांतून सारखें उदक पाझरत असे; वायूनें वाळयाच्या दोन चवऱ्या दिल्या; धर्मानें कीर्तिरूप शुभ्र माळ दिली; इंद्रानें उत्तम किरीट दिला; दुष्टांचा निरोध करण्याचें साधन असा दंड यमानें दिला; वेदमय कवच ब्रह्मदेवानें दिलें; सरस्वतीनें उत्तम हार दिला; विष्णूनें सुदर्शन चक्र दिलें; लक्ष्मीनें ऐश्वर्य दिलें; शंकरानें दशचंद्रमंडित खड्ग दिला; पार्वतीनें शतचंद्रमंडित ढाल दिली; चंद्रानें शुभ्र घोडे दिले; विश्वकर्म्यानें अत्यंत सुंदर रथ दिला; अग्नीनें शंकराच्या धनुष्यासारखें धनुष्य दिलें; सूर्यानें किरणरूप बाण दिले; पादस्पर्श केल्याबरोबर इच्छिल्या ठिकाणीं नेणाऱ्या योगपादुका पृथ्वीनें दिल्या; आकाश प्रतिदिनीं पुष्पमाला देऊं लागलें; विद्याधरादि देवयोनींनीं नाट्य, गायन, वादन आणि अंतर्धानविद्या हीं प्राप्त करून दिलीं; ऋषींनीं कल्याणकारक आशीर्वाद दिले; समुद्रानें शंख दिला; समुद्र, पर्वत आणि नद्या ह्यांनीं त्या श्रेष्ठ पुरुषाच्या रथाला मार्ग करून दिले; आणि सूत, मागध व बंदी हे स्तुति करण्यास उभे राहिले. विदुरा, त्या सर्वांनीं दिलेल्या नजराण्यांचा पृथूनें प्रेमपूर्वक स्वीकार करून त्या सर्वांचे उपकार मानिले. नंतर सूतमागधादि जन स्तुति करण्यास उद्युक्त झालेले पाहून, पृथु राजानें आपल्या गंभीर वाणीनें त्या

### स्तुतिपाठकांचा निषेध

केला: तो म्हणाला, " हे स्तुतिपाठकहो, जोंपर्यंत कोणत्याही प्रकारें माझे गुण व्यक्त झाले नाहींत, तोंपर्यंत माझी उगीच स्तुति करूं नका. कांहीं कालानंतर ते गुण स्पष्ट झाले म्हणजे मग स्तुति करणें योग्य होईल; म्हणून तुम्हीं आपल्या मधुर वाणीनें माझ्या अंगीं नसलेल्या गुणांचें वर्णन करण्यापेक्षां, षड्गुणैश्वर्यसंपन्न सुकीर्तिमान अशा परमेश्वराचें गुणवर्णन करावें हें योग्य होय. कदाचित्, ' तूं पुढें गुणवान होणार आहेस, ह्यास्तव आम्ही तुझी स्तुति करीत आहों ' असें तुमचें म्हणणें असेल, तर हल्लीं माझ्या ठिकाणीं गुण नाहींत, ही गोष्ट ह्यांत उघडच झाली; ह्यास्तव तुमच्या वर्णनानें माझी स्तुति न होतां उलट निंदाच होईल. हे बंदिजनहो, मोठमोठ्या साधूंनाही ते स्तुतीस पात्र असतां त्यांची स्तुति केलेली पसंत पडत नाहीं; आणि मजकडून तर स्तुति करण्यास योग्य असें अद्याप कोणतेंच कृत्य झालें नाहीं. मग मी व्यर्थ तुमच्याकडून स्तुति कशी करून घ्यावी बरें ?"

## अध्याय सोळावा.

—:०:—

### पृथु राजाचें चरित्रकथन.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, पृथु राजाचें तें निस्पृ-

हृतेचें भाषण श्रवण करून स्तुतिपाठकांना आनंद झाला. त्यानें, माझी स्तुति करूं नका म्हणून त्यांस सांगितलें, तरी मुनींच्या आज्ञेवरून त्यांनीं ती केलीचः ते म्हणाले, "राजा, तुझ्या माहात्म्याचें वर्णन ब्रह्मदेवासारख्या महाज्ञानी पुरुषांनाही झालें नाहीं, तेथें आमचा काय पाड ? राजा, तूं प्रत्यक्ष ईश्वरांश आहेस; तेव्हां तुझीं अतर्क्य चरित्रें आम्हांस कशीं वर्णन करितां येतील ? तथापि तुझ्या चरित्राविषयीं आमच्या अंतःकरणांत मुनींनीं बोधरूप जी स्फूर्ति प्रकट केली आहे, तिच्या योगें आम्ही तुझ्या स्तुत्य कृत्यांचें वर्णन करितों." विदुरा, असें बोलून, लोकांना उद्देशून ते सूतमागधादि स्तुतिगायक म्हणाले, " जनहो, हा राजा अत्यंत श्रेष्ठ आहे. हा तुमची धर्माचरणाकडे प्रवृत्ति करील. धर्ममर्यादांचें संरक्षण करून धर्मोच्छेदकांचें शासन करणें हें ह्यास प्रधान कर्तव्य वाटेल. ह्याच्या ठिकाणीं अष्टलोकपालांच्या शक्ति वास करीत आहेत. त्या शक्तींच्या योगानें हा यथाकालीं लोकांचें अभिष्ट पुरवील. ज्याप्रमाणें सूर्यनारायण हिंवाळ्यांत व उन्हाळ्यांत आपल्या किरणांनीं पृथ्वीवरील उदक ग्रहण करितो, व पावसाळ्यांत त्याची वृष्टि करवितो, त्याचप्रमाणें हा पराक्रमी राजा प्रजेपासून योग्य वेळीं कर ग्रहण करील, व प्रसंगीं ते त्यांच्याच उपयोगाला लावील. उच्च, नीच हा भेद न ठेवितां हा सर्व प्रजेशीं सूर्याप्रमाणें निःपक्षपातानें वागेल. हा पृथ्वीप्रमाणें शांत व गंभीर स्वभावाचा होईल. योग्य वेळीं पर्जन्य न पडल्यास हा स्वतः पर्जन्य पाडून लोकांचें संरक्षण करील. हा सकलदुःखहर्ता परमेश्वरच आपल्या अंशानें एथें अवतरला आहे. चंद्राकडे पाहिलें असतां जसा नेत्रांना संतोष होतो, तसा ह्याच्या दर्शनानें लोकांस संतोष होईल. वरुणाप्रमाणें हा आपलें हरएक कार्य गंभीरतेनें व योग्य विचारानें सिद्धीस नेईल. कार्य शेवटास जाईपर्यंत ह्याची मसलत कोणास कळणार नाहीं. हा राजा वेनरूप अरणीपासून उत्पन्न झालेला अग्नि होय. ह्याच्यापुढें शत्रु केव्हांही टिकाव धरणार नाहींत. आत्मा ज्याप्रमाणें अंतर्बाह्य व्याप्त असून निर्विकार असतो, त्याप्रमाणें हा निर्विकार राहील. हा यमधर्माप्रमाणें धर्ममार्गांत सुस्थिर असेल. हा शत्रूच्या पुत्रासही विनाकारण शासन करणार नाहीं, व स्वतांच्या पुत्रासही विनाकारण त्यानें अपराध केला असेल तर दंड केल्याशिवाय रहाणार नाहीं. ह्या पृथु राजाची सत्ता—भगवान सूर्यनारायण जितक्या प्रदेशाला प्रकाशित करतो, तेथपर्यंत निष्प्रतिबंध चालेल. हा दृढनिश्चयी आणि सत्यप्रतिज्ञ होईल. हा ब्राह्मणांचें हित आणि वृद्धांची सेवा करील. हा शरणागतांचें रक्षण करून प्रजेचें पुत्रवत् पालन करील. हा परस्त्रियांवर मातृवत् भक्ति ठेवील; पत्नीला स्वतांच्या अर्ध्या देहाप्रमाणें मानील; व ब्रह्मज्ञानी पुरुषांचा दास बनेल. हा पृथु राजा अद्वितीय पराक्रमी होईल; मित्रांच्या सुखाविषयीं आवड धरील; सत्समागमाची हौस बाळगील; व दुष्टदंडनासाठीं सर्वदा सिद्ध असेल. हा आपलें धनुष्य हातांत घेऊन विजयरथांत बसून सूर्याप्रमाणें सर्व भूमंडलाला प्रदक्षिणा घालील व त्याचें संरक्षण करील. ह्याला सर्व राजे नम्र होऊन करभार आणून देतील; आणि त्यांच्या स्त्रिया ह्यास महाविष्णूप्रमाणें पूज्य मानून ह्याचा महिमा वर्णितील. प्रजांना उपजीविकेचीं साधनें मिळवून देण्यासाठीं हा गोरूप पृथ्वीचें दोहन करील; व आपल्या धनुष्याच्या प्रभावानें पर्वतांचें चूर्ण करून पृथ्वी सपाट करील. सिंह जसा आपल्या गर्जनेनें सव पशूंना भय उत्पन्न करितो, त्याप्रमाणें आपल्या धनुष्याचा टणत्कार करीत पृथ्वीवर फिरूं लागला म्हणजे हा शत्रूंना भय उत्पन्न करील. सरस्वती नदीच्या उगमस्थानीं हा शंभर अश्वमेध करील. शंभर अश्वमेध करणाऱ्यास इंद्रपद प्राप्त होतें; ह्यास्तव हा आपलें पद घेईल ह्या भीतीनें इंद्र ह्याच्या शंभराव्या यज्ञाचा अश्व

हरण करील. पुढें ह्याच्या स्वतांच्या गृहोद्यानांत ज्ञानसंपन्न सनत्कुमार ह्याला भेटतील; हा भक्तिपुरस्सर त्यांची आराधना करील; नंतर ते ह्याला ज्ञानोपदेश करितील; आणि ह्याच्या पराक्रमाची चोहोंकडे कीर्ति होऊन, देव व दैत्यही ह्याची थोरवी गाऊं लागतील. जनहो, अशा प्रकारें हा महापराक्रमी पृथु राजा पृथ्वीचें राज्य करून सर्वांस सुख देईल."

# अध्याय सतरावा.

—:०:—

## पृथुचरित्रासंबंधी विदुराचे प्रश्न.

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, त्या स्तुतिपाठकांनीं ह्याप्रमाणें स्तुति केल्यावर पृथु राजानें त्यांना इच्छित वस्तु देऊन संतुष्ट केलें; व त्या समारंभास जमलेले ब्राह्मणादि चारी वर्ण, पुरोहित, प्रधानमंडळ, इतर नागरिक व सेवकजन ह्या सर्वांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें दक्षिणा व वस्त्राभरणें देऊन त्यांचा योग्य सत्कार केला. पुढें मुनिजनांनीं बंदिजनांच्या अंतःकरणांत स्फूर्ति उत्पन्न करून त्यांजकडून वदविलेल्या भविष्याप्रमाणें त्या पृथु राजानें पृथ्वीचें राज्य केलें.

विदुर म्हणाला:–मुनिश्रेष्ठा, पृथु राजानें गोरूप पृथ्वीचें दोहन केलें असें आपण सांगितलें; पण जिचें स्वरूप अति मोठें, त्या पृथ्वीनें गोरूप कशासाठीं धरिलें? पृथूनें तिचें दूध काढिलें, तेव्हां वत्स कोण होता व पात्र कोणतें होतें? पृथ्वी उंचसखल असतां त्यानें ती सारखी कशी केली? इंद्रानें त्याचा अश्व कां हरण केला? आणि ब्रह्मज्ञानसंपन्न सनत्कुमार मुनींपासून अपरोक्षज्ञान प्राप्त झालें असतां तो कोणत्या गतीला गेला? महाराज, माझ्या ह्या सर्व शंकांचें निरसन करून आणखी त्या पुण्यकीर्ति पृथु राजाच्या कांहीं अद्भुत कथा असतील तर त्याही सांगाव्या. मला त्या ऐकण्याची फार इच्छा आहे.

सूत म्हणाले:– शौनकादि ऋषीहो, ह्याप्रमाणें विदुरानें त्या श्रेष्ठ पृथु राजाच्या कथा सांगण्याविषयीं मैत्रेय मुनींस मोठ्या नम्रतेनें प्रश्न केले असतां त्यांस फार संतोष झाला, व त्यांनीं विदुराचें अभिनंदन करून उत्तरें देण्यास आरंभ केला.

## पृथूचा व पृथ्वीचा संवाद.

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, पृथु राजाला राज्याभिषेक झाला, त्या वेळीं पृथ्वी अगदीं निःसत्व झाली होती, व त्यामुळें क्षुधेनें प्रजा फार क्षीण झाल्या होत्या. पृथु राजा राज्यारूढ होतांच त्या राजाजवळ येऊन म्हणाल्या, "हे राजा, वृक्षाच्या ढोलींत अग्नि ठेविला म्हणजे जसा तो वृक्ष शुष्क होतो, तशीं हीं आमचीं शरिरें जठराग्नीच्या योगानें अगदीं शुष्क झालीं आहेत. राजा, ब्राह्मणांनीं आमच्या पोषणासाठीं तुला उत्पन्न केलें असून तूं शरणागतांचा रक्षक आहेस. ह्यास्तव आम्हां शरणागतांचें रक्षण करणें हें तुझें कर्तव्य आहे. म्हणून आम्ही तुला विनंती करितों कीं, आम्ही भुकेनें तडफडून मेलों नाहीं तों तूं आम्हांस अन्न मिळवून देण्याचा प्रयत्न कर."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, असे हे प्रजाजनांचे विलाप ऐकून पृथु राजानें बराच वेळ विचार केला; तेव्हां त्याला कळून आलें कीं, पृथ्वीनें सर्व औषधि आणि बीजें ग्रासून टाकिलीं आहेत, त्यामुळें धान्य उत्पन्न होत नाहीं. विदुरा, तेव्हां तो पृथु राजा, त्रिपुरासुराचा वध करण्याचे वेळीं क्रुद्ध झालेल्या शंकराप्रमाणें क्रुद्ध झाला व त्यानें आपलें धनुष्य हातीं घेऊन भूमीकडे रोंख धरून बाण सोडण्याची तयारी केली. तें पाहून पृथ्वीच्या अंगास कंप सुटला; व व्याधाच्या भयानें हरिणी पळूं लागते त्याप्रमाणें ती भयभीत होऊन गाईचें रूप घेऊन पळत सुटली. पृथु राजाही संतापानें लाल झाला व धनुष्यावर बाण सज्ज करून ती जाईल तिकडे तिच्या मागें धावत सुटला. त्या वेळीं ती पृथ्वी माता

दाही दिशांस धावत गेली, तरी पृथु राजानें तिची पाठ सोडिली नाहीं. शेवटीं, त्याजपासून आपलें संरक्षण करण्यास कोणीच समर्थ नाहीं असें जाणून ती पृथ्वी त्या महापराक्रमी पृथु राजासच शरण आली व म्हणाली, "हे राजा, मी दीन गाय तुला शरण आलें आहें; तूं माझें रक्षण कर. मी निरपराधी स्त्री आहें, व तूंही महापराक्रमी असून धर्मज्ञ आहेस; ह्यास्तव तूं स्त्रीहत्या करूं नको. शिवाय दुसरें असें आहे कीं, मला मारिलें असतां जगांत मोठा अनर्थ गुदरेल. कारण, माझ्या ठिकाणीं परमेश्वरानें सर्व विश्वाची स्थापना केली आहे, आणि तूं मला मारिलेंस तर तुझ्यासुद्धां हें सर्व विश्व उदकांत बुडून जाईल."

**पृथूचें पृथ्वीशीं क्रोधयुक्त भाषण.**

तेव्हां पृथु राजा म्हणालाः—हे पृथ्वी, तूं माझी आज्ञा मान्य करीत नाहींस, त्या अर्थीं मी तुला मारणार. यज्ञांमध्यें तुझा हविर्भाग तुला मिळत असूनही जर तूं धान्य उत्पन्न करीत नाहींस, तर गवत खाऊन दूध न देणाऱ्या गाईप्रमाणें तुला शिक्षा देणेंच योग्य होय. ब्रह्मदेवानें जीवपोषणाकरितां जीं ओषधिबीजें पूर्वींच उत्पन्न केलीं आहेत; तीं तूं आपल्या उदरांत गुप्त ठेविलीं असून अद्याप तूं तीं बाहेर काढीत नाहींस आणि माझी अवज्ञा करतेस, तर इतकी मतिमंद तूं कशानें झालीस? ही सर्व प्रजा भुकेनें व्याकुळ होऊन एकसारखी रडत आहे, म्हणून मी तुझ्या शरिराचे तुकडे तुकडे करून त्यांतील मेदाच्या योगानें ह्या बुभुक्षित जनांचा शोक शमवीन. जो कोणी स्वतांला श्रेष्ठ मानून स्वार्थदृष्टीनें इतर प्राण्यांशीं निर्दयपणानें वागतो, त्या दुष्टाचा राजानें वध केला असतां त्याला हत्येचें पाप लागत नाहीं; मग तो पुरुष असो, स्त्री असो, अथवा नपुंसक असो. तूं गर्वानें फार ताठली आहेस. तुला मारल्यामुळें प्रजा जरी उदकांत बुडाल्या, तरी माझ्याप्यानें उदकांत त्यांचें संरक्षण करवणार नाहीं, असें मात्र तुला वाटूं देऊं नको. मी स्वतांच्या योगसामर्थ्यानें उदकांत सुद्धां त्यांचें रक्षण करीन." विदुरा, असें हे पृथूचें क्रोधयुक्त भाषण आणि स्वरूप पाहून पृथ्वी थरथर कांपूं लागली, आणि नम्रपणें हात जोडून त्याशीं बोलूं लागली.

**पृथ्वीचें पृथूला दीनवाणें उत्तर.**

पृथ्वी म्हणालीः—हे राजा, तूं प्रत्यक्ष परमेश्वर आहेस; तुला माझा नमस्कार असो. जो आपल्या मायेच्या योगानें हें विश्व उत्पन्न करितो, व स्वतः गुणस्वरूप आहे असा भासूं लागतो; ज्याच्या ठिकाणीं मूर्तिमंत परब्रह्मज्ञान वास करीत असल्यामुळें भूतें, इंद्रियें, देवता इत्यादिकांच्या योगानें उत्पन्न होणारे रागद्वेषादि मल मुळींच नाहींत; ज्यानें जारज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज ही चतुर्विध सृष्टि सत्त्वादिक गुणांपासून उत्पन्न केली;व ज्यानें सर्व जीवांना आधार मिळावा म्हणून मलाही उत्पन्न केलें, त्या परमेश्वराचाच तूं अवतार असतां, तूंच शस्त्र उचलून मला मारावेंस हें योग्य नाहीं. हे प्रभो, उत्पत्ति आणि लय हीं दोन्ही कर्में तुझींच आहेत खरीं; पण ज्या अर्थीं उत्पन्न केलेल्या सृष्टीचें पालन करण्याकरितांच तूं अवतार धारण केला आहेस, त्या अर्थीं ह्या वेळीं माझ्या घाताची इच्छा करणें तुला योग्य नाहीं. हे विश्वाधिपते, तुझ्या मायेचा तर्क करणेंही अवघड आहे. ज्यांच्या मनांत तुझ्या मायेनें मोह उत्पन्न केला, त्यांना तुझ्या चरितांचें यथावत् स्वरूप कळत नाहीं. महाभूतात्मक द्रव्यें, इंद्रियें, देवता, बुद्धि व आत्मा ह्या अचिंत्य शक्तींच्या योगें तूं ह्या विश्वाची सृष्टि, स्थिति व संहार करितोस, आणि ह्या प्रबल शक्तींच्या योगानेंच तूं कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुंसमर्थ आहेस. हे देवाधिदेवा, पूर्वीं वराह अवतार घेऊन तूंच मला वर काढिलेंस, आणि नौकेप्रमाणें तरंगत असतां माझ्या पाठीवर सर्व

प्रजा व्यवस्थितपणें स्थापिल्यास, ह्यास्तव तूं आपल्या तीक्ष्ण बाणानें ह्या दीन गाईचा दुधासाठीं वध करूं इच्छितोस, ह्याचें मला मोठें आश्चर्य वाटतें.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ईश्वराच्या मायेनें ज्यांना मोहित केलें आहे, त्या आमच्यासारख्या लोकांना त्याच्या भक्तांचें देखील चरित्र समजत नाहीं; तेव्हां त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न परमात्म्याचें चरित्र कोठून समजणार? आमचा त्याच्या भक्तांना नमस्कार असो.

# अध्याय अठरावा.

—:०:—

## अन्नादिकांच्या उत्पत्तीसाठीं पृथ्वीनें सांगितलेला उपाय.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, अशा प्रकारें पृथ्वीनें पृथूची स्तुति केली. ह्या वेळीं पृथु राजाचे ओठ रागानें थरथर कांपत असून त्याच्याकडे पाहून पृथ्वीला फार भय वाटत होतें; तरी ती धैर्यानें त्याला म्हणाली, "हे राजा, तूं आपला क्रोध शांत करून मी काय सांगतें तें ऐक, आणि ज्याप्रमाणें भ्रमर पुष्पांतील सार ग्रहण करितात, त्याप्रमाणें तूं माझ्या बोलण्यांतील सार ग्रहण कर. हे भूपते, तत्त्ववेत्त्या मुनींनीं, इहपरलोकीं जनांचें कल्याण व्हावें म्हणून अनेक उपाय योजून ठेविले आहेत, आणि त्यांचे प्रयोगही करून पाहिले आहेत. त्यांप्रमाणें जो पुरुष वागून अनुष्ठान करितो, त्याला जीं फळें मिळावयाचीं तीं सहजगत्या मिळतात; आणि जो पुरुष त्या मुनींच्या वचनांचा अव्हेर करून स्वच्छंदानें वागतो, त्याची कार्यसिद्धि त्यानें कितीही श्रम केले तरी होत नाहीं. हे नरपते, जगांत यज्ञयागादिकांचा उच्छेद करणारे दुष्ट पुष्कळ झाले, आणि ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेल्या औषधींचा उपभोग घेऊं लागले; तसेंच, तुझ्यासारख्या राजांनीं माझें पालन करावयाचें तें न करितां वेनासारखा क्रम आरंभिला; आणि सर्वत्र दंगेधोपे व धामधूम सुरू झाली; तेव्हां पुढें होणाऱ्या यज्ञयागादिकांना उपयोगीं पडण्याचें साधन आपणाजवळ राखावें, ह्या हेतूनें मीं त्या औषधि ग्रासून टाकिल्या. राजा, ह्या गोष्टीला बराच काल लोटला असल्यामुळें सांप्रत त्या वनस्पति माझ्या उदरांत क्षीण झाल्या आहेत; पण आतां तूं योग्य उपायाची योजना करून त्या बाहेर काढून घे. हे वीरा, तो उपाय हाच कीं, ज्याच्याकडे पाहिल्याबरोबर मला प्रेमाचा पान्हा फुटेल, असा एक वत्स आणि दूध काढण्यास पात्र सिद्ध कर; म्हणजे मी त्या वत्साला व पात्राला योग्य असें दूध देऊन तुझ्या सर्व इच्छा पूर्ण करीन. हे पराक्रमी पुरुषा, जर तुला प्राण्यांचें रक्षण करावयाचें असेल, आणि प्राण्यांना बल देणारें इच्छित अन्न ज्याचें त्यास मिळावें अशी तुझी इच्छा असेल, तर तुला माझें दूध काढण्यास समर्थ असा दोग्धाही तयार केला पाहिजे; आणि इंद्रानें वृष्टि केली असतां तें उदक वर्षाऋतु संपून गेला तरी देखील माझ्या पाठीवर सारखें रहावें अशा रीतीनें तूं मला सपाट कर."

### गोरूप पृथ्वीचें दोहन.

मैत्रेय म्हणाले:—हे कुरुकुलभूषणा विदुरा, पृथु राजानें पृथ्वीचें तें हितकारक व मधुर असें भाषण श्रवण केलें, आणि स्वायंभुव मनूला वत्स करून हस्तरूप पात्राच्या ठिकाणीं धान्यादि ओषधिरूप[1] दूध काढून घेतलें. विदुरा, पृथू-

१ राजाला करभार मिळणें अवश्य आहे, व तो तर धान्य उत्पन्न झाल्याशिवाय मिळणें शक्य नाहीं; म्हणूनच पृथूनें हस्तरूप पात्राच्या ठायीं धान्यरूप दूध काढून घेतलें असें म्हटलें आहे. ह्याचप्रमाणें इतरांनींही आपणांस लागणाऱ्या वस्तु, आपल्यापैकीं कोणा एखाद्या श्रेष्ठ व्यक्तीस वत्स करून म्हणजे पुढें करून, पात्रामध्यें म्हणजे योग्य ठिकाणीं काढून घेतल्या, असें पुढें सांगितलें आहे. कोणास कोणत्या वस्तूची गरज लागते, व त्या वस्तूकरितां योग्य पात्र ( भांडें ) कोणतें असणार, ह्याविषयीं वाचकांची स्पष्ट समजूत पडावी म्हणून त्या त्या ठिकाणीं टिपेंत दूध काढणाराचें, पात्राचें, वत्साचें व दुधाचें स्पष्टीकरण केलें आहे.

चें हें कृत्य पाहून इतरांनींही आपापल्या इच्छित वस्तु दुग्धरूपानें काढून घेतल्या: ऋषींनीं बृहस्पतीला[1] वत्स करून इंद्रियांचे ठिकाणीं त्या धरित्री देवीचें छंदोमय दूध काढून घेतलें. नंतर देवांनीं इंद्राला वत्स करून, मनाचा उत्साह, इंद्रियांची शक्ति, व शारिरिक बल ह्यांस वृद्धिंगत करणारें अमृतरूपी[2] दूध काढून घेतलें. पुढें दैत्यदानवांनीं प्रल्हादास वत्स करून लोखंडाचे[3] भांड्यांत मद्य, आसव वगैरे सर्व प्रकारची दारू दुग्धरूपानें काढून घेतली. नंतर गंधर्व व अप्सरा ह्यांनीं विश्वावसूला वत्स करून मुखकमलरूप[4] पात्राचे ठायीं सुस्वर गायन आणि मनोहर भाषण हें दूध काढिलें. पुढें महाभाग्यवान श्राद्धदेवता पितर ह्यांनीं अर्यम्याला वत्स करून मृत्तिकेच्या[5] कच्चया पात्रांत कव्य म्हणजे श्राद्धीयद्रव्यरूप दूध काढून घेतलें. नंतर सिद्ध पुरुषांनीं कपिलाला वत्स करून आकाशरूपी[6] पात्रांत सर्वसिद्धिरूप दूध काढिलें. पुढें विद्याधर व इतर मायावी पुरुष ह्यांनीं मयासुराला वत्स करून आकाशरूप[7] पात्रांत मायारूपी दूध काढिलें. नंतर भूतपति रुद्राला वत्स करून यक्ष, पिशाच, भूतें, राक्षस ह्यांनीं नरकपालरूप[8] भांड्यांत रक्तरूपी दूध काढिलें. विदुरा, पुढें साप, विंचू वगैरे विषारी प्राण्यांनीं तक्षकाला वत्स करून बिलरूपी[9] पात्रांत विषरूपी दूध काढिलें. नंतर सर्व पशूंनीं नंदीला वत्स करून अरण्यरूपी[10] पात्रांत तृणरूपी दूध काढून घेतलें. पुढें हिंस्र पशूंनीं वनराजाला (सिंहाला) वत्स करून, स्वतांच्या शरिराच्या ठायीं मांसरूपी आपलें आवडतें अन्न काढून घेतलें. नंतर पक्ष्यांनीं गरुडाला वत्स करून स्वतांच्या शरिराच्या ठिकाणीं किडे, फळें वगैरे आपले भक्ष्य पदार्थ दुग्धरूपानें काढून घेतले. पुढें वनस्पतींनीं वटवृक्षाला वत्स करून आपल्या ठिकाणीं सर्वरसरूप दूध काढून घेतलें; आणि नंतर पर्वतांनीं हिमालयाला वत्स करून आपल्या शिखरांवर पिवडी, काव इत्यादि धातुरूप दूध संपादिलें.

---

१ ऋषींमध्यें बृहस्पति श्रेष्ठ होय. म्हणून त्याला पुढें करून ऋषींनीं छंदोमय-वेदरूपी-दूध, इंद्रियांच्या -कर्ण व मुख ह्यांच्या-ठिकाणीं काढून घेतलें. ऋषींना वेदपठन करावयाचें असल्यामुळें त्यांनीं वेदरूपी दूध काढून घेतलें हें योग्यच झालें. आतां त्या दुधाला पात्र अर्थात योग्य भांडें म्हटलें म्हणजे कर्ण आणि मुखच. कारण प्रथम कर्णांनीं वेदाचें श्रवण करावयाचें व मग मुखानें पठन.

२ अमृत हें वरील गुणांचें उत्पादक आहे; व देव हे अमृतपान करितात. अमृत हें सोन्याच्या पात्रांत असावयाचेंच हें उघड आहे.

३ दैत्य व दानव हे मद्यपी असल्यामुळें त्यांच्या नशिबीं लोहपात्राशिवाय दुसरें काय असणार ?

४ गायनाचें स्थान मुख व भाषणाचेंही स्थान तेंच; ह्यास्तव मुखकमलरूप पात्र योजिलें, हें युक्तच होय.

५ श्राद्धसमयीं मृत्तिकेच्या कच्चया पात्रांत श्राद्धीय वस्तु ठेवाव्या, असें शास्त्रवचन आहे.

६ सिद्ध पुरुषांचें विहार करण्याचें स्थान आकाश. त्या ठिकाणीं संचार करण्यास अष्टसिद्धि प्राप्त झाल्या पाहिजेत.

७ मयासुर मायावी होता. विद्याधरांना नानाप्रकारचीं रूपें धारण करणें, अंतरिक्षामध्यें क्षणांत गुप्त होणें वगैरे मायावी प्रकार फार आवडत. म्हणूनच मायावी मयासुराला वत्स करून, ह्या विद्या साध्य करून देणारी जी माया, तिच्या रूपानें त्यांनीं दूध काढून घेतलें.

८ भूतें, राक्षस वगैरे ह्यांना रक्तप्राशन फार आवडतें. म्हणून नरकपालाशिवाय त्यांजवळ दुसरें पात्र तें काय मिळणार ?

९ सर्प, विंचू वगैरे विषारी प्राणी बिळांतूनच असतात. त्यांनीं आपल्या स्वभावाला-विषारी स्वभावाला-अनुसरूनच विषरूप दुग्ध काढिलें.

१० पशूंनीं खावयास तृण काढून घेतलें. त्याचें स्थान -पात्र-अरण्यच.

विदुरा, अशा प्रकारें, ज्याच्या त्याच्या इच्छे- प्रमाणें सर्व वस्तु पृथ्वीपासून मिळाल्यामुळें पृथु राजाला फार संतोष झाला. तेव्हांपासून पृथ्वीवर त्याचें फार प्रेम जडलें व तो तिला दुहिते- प्रमाणें मानूं लागला. विदुरा, पुढें त्या समर्थ वेनपुत्रानें स्वतांच्या धनुष्याग्रानें पर्वतांचीं शिखरें चूर्ण करून बहुतेक भूमंडळ सारखें करून टाकिलें; आणि लोकांच्या सोईप्रमाणें त्यांना राहण्याचीं स्थानें सिद्ध करून दिलीं. गांव, पुरें, नगरें, किल्ले, वाड्या, व्रज हीं सर्व व्यवस्था प्रथमतः त्यानेंच केली. ह्यापूर्वी पृथ्वीवर वाटेल त्यानें वाटेल तेथें निर्भयपणें रहावें अशी स्थिति होती.

## अध्याय एकुणिसावा.

—:०:—

### पृथु राजाचे अश्वमेध.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, नंतर पृथु राजानें ब्रह्मावर्त क्षेत्रांत, जेथें सरस्वती नदी पूर्ववाहिनी आहे त्या स्थलीं, शंभर अश्वमेध करण्यासाठीं दीक्षा घेतली. विदुरा, शंभर यज्ञ करणाराला इंद्रपद प्राप्त होतें; म्हणून तसें होणें इंद्राला कधींही इष्ट नसतें. ह्याकरितां कोणी शंभर यज्ञ करूं लागल्यास ते पुरे न व्हावे म्हणून इंद्र त्यांमध्यें नानाप्रकारचीं विघ्नें आणतो. ह्यास्तव पृथूचा हाही यज्ञोपक्रम इंद्राला सहन होईना. विदुरा, पृथूच्या यज्ञांची महती किती वर्णन करावी? त्यांमध्यें यज्ञपति विष्णु प्रत्यक्ष दर्शन देत असे. त्याच्याबरोबर ब्रह्मदेव, शंकर आणि इंद्रादि लोक- पाल आपापल्या गणांसह येत. गंधर्व, मुनि आणि अप्सरांचे समुदाय परमेश्वराची कीर्ति गात जवळ उभे रहात. सिद्ध, चारण, विद्या- धर, दैत्यदानव, गुह्यकादिक जन भगवंताच्या स्तु- तींत निमग्न होत. नंदसुनंदादि पार्षदगण हात जोडून सेवा करण्यांत तत्पर असत; आणि कपिल, नारद, सनकादिक महायोगी त्या परमे- श्वराच्या सेवेकरितां मोठ्या उत्सुकतेनें त्याच्या मागून येत. विदुरा, पृथूनें आरंभिलेल्या त्या यज्ञांत सर्व गोष्टी अनुकूल होत्या: स्वतः पृथ्वी कामधेनूचें रूप घेऊन यजमानास इच्छित वस्तु तत्काल सिद्ध करून देण्याकरितां उभी होती. दूध, दहीं, तूप वगैरे सर्व रस नद्या वाहून आणीत. वृक्ष हे फलें, पुष्पें आणि मध पुरवीत. समुद्र हे रत्नांच्या राशी पुढें ठेवीत. पर्वत चतुर्विध अन्न देत; व सर्व मांडलिक राजे आणि प्रजा इतर सर्व साहित्यांचा पुरवठा करीत. विदुरा, अशा प्रकारें थाटानें आणि सर्वानुकूलतेनें त्या भगवद्भक्त पृथु राजाचे यज्ञ चालले असतां तो समारंभ इंद्रा- च्यानें पाहवला नाहीं; आणि अखेरीस त्या इंद्रानें

### यज्ञांत विघ्न

केलें: विदुरा, पृथु राजा शेवटल्या यज्ञाच्या वेळीं यज्ञपति विष्णूची आराधना करीत असतां इंद्रानें पृथु राजाचा यज्ञपशु (घोडा) सोडून नेला! इत- क्यांत ज्ञानसंपन्न अत्रि ऋषींची आकाशांत दृष्टि गेली; तों, ज्याच्या मस्तकावर जटाभार असून ज्यानें सर्वांगाला भस्म लाविलें आहे, असा एक पुरुष यज्ञांतील घोडा घेऊन जात आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्यांनीं इंद्राचा ढोंगी वेष ओळखिला, आणि त्यांनीं तें पृथूच्या शूर पुत्राला सांगितलें. तें ऐकल्याबरोबर तो क्रोधानें संतप्त होऊन इंद्राच्या मागें धावत चालला, आणि दुष्टा, उभा रहा! उभा रहा! असें त्यास म्हणाला. पण तो सारखा पुढेंच पळत होता. पृथुपुत्रानेंही त्याच्यामागें लगट केली. शेवटीं इंद्र नजरेच्या आटोक्यांत आला, तों त्या पृथुपुत्राला हा कोणी साधुपुरुष असावा असें दिसलें; म्हणून तो त्याज- वर बाण सोडीना. तेव्हां अत्रि ऋषींला वाटलें कीं, हा त्याच्या ढोंगाला पाहून फसत आहे. तेव्हां त्या ऋषींनीं त्याला ओरडून सांगितलें, "हे पृथुपुत्रा, फसूं नको. तो अधम महेंद्र असून

यज्ञाचा विध्वंस करीत आहे, तर तूं अवश्य त्याचा वध कर." अशी आज्ञा मिळाल्याबरोबर पृथूचा पुत्र अत्यंत क्रुद्ध झाला, आणि सीतेला रावण घेऊन जात असतांना जसा जटायु त्याच्या अंगावर धावून गेला, तसा तो त्वेषानें इंद्राच्या अंगावर धावून गेला. तेव्हां इंद्रानें घोडा सोडून दिला व आपला ढोंगी वेष टाकून देऊन तो गुप्त झाला. इकडे त्या शूर मुलानें तो घोडा आणून यज्ञमंडपांत बांधिला. हा त्या मुलाचा अद्भुत पराक्रम पाहून तेथें जमलेल्या महान महान ऋषींनीं त्याला विजिताश्व (घोडा जिंकून आणणारा) असें नांव दिलें. विदुरा, पुढें इंद्रानें तेथें निबिड अंधकार उत्पन्न केला, व यज्ञस्तंभाच्या डोक्यावर चषाल नामक जें लांकडाचें कडें असतें त्याला बांधिलेला घोडा फिरून हरण करून नेला. त्या वेळीं इंद्रानें कपाल व खट्वांग हीं आयुधें हातांत घेतलीं होतीं; ह्यास्तव तो अंतरिक्ष मार्गानें अश्व घेऊन पळून जात असतां, तो कोणी साधु असावा, असा पुनः राजपुत्राचा समज झाला. परंतु इतक्यांत अत्रि मुनींनीं राजपुत्राला सांगितलें कीं, "हे पृथुपुत्रा, तो पहा इंद्र पहिल्याप्रमाणेंच ढोंगी वेषानें अश्व हरण करून नेत आहे." विदुरा, अत्रि मुनींची आज्ञा मिळतांच तात्काळ त्या राजपुत्रानें क्रोधाविष्ट होऊन इंद्रावर नेमका बाण सोडिला. तेव्हां लागलाच इंद्रानें पूर्वीप्रमाणें वेष गुप्त करून घोडा सोडून दिला. अशा रीतीनें इंद्रानें अनेक प्रकारचीं सोंगें घेऊन कित्येक वेळां अश्व हरण करून नेला, आणि त्या शूर पृथुपुत्रानें तितक्या वेळां तो सोडवून आणिला. विदुरा, ह्या वेळीं जीं जीं पाखंडरूपें इंद्रानें धारण केलीं होतीं, तीं सर्व मंदबुद्धीच्या पाखंडी लोकांनीं पुढें ग्रहण केलीं, आणि पाखंडमतांचा प्रसार केला. विदुरा, हे नास्तिक लोक सकृद्दर्शनीं सर्वांना प्रिय वाटतात; कारण हे बोलण्यांत अत्यंत चतुर असून दिसण्यांत साधूंसारखे दिसतात, ह्यामुळें त्यांच्या बोलण्यांतील चतुराईनें लोकांना त्यांचाच धर्म खरा आहे असा भ्रम उत्पन्न होतो. असो; इंद्रानें माजविलेला तो सर्व बखेडा पाहून त्या पराक्रमी पृथु राजाला फार क्रोध आला; व आपलें धनुष्य सज्ज करून तो इंद्राला मारण्यास प्रवृत्त झाला. विदुरा, पृथु राजाची शक्ति असह्य होती. त्याच्या मुखाकडे कोणाच्यानेंही पाहवेना. तो इंद्राचा वध करूं इच्छित आहेसें पाहून ऋत्विजांनीं त्याचा प्रतिकार केला आणि ते म्हणाले, "हे बुद्धिमता, ह्या यज्ञकर्मामध्यें तूं फक्त यज्ञपशूचाच वध करावास; इतरांचा वध करणें योग्य नाहीं. तुझ्या ह्या यज्ञकर्मांत विघ्न आणणारा इंद्र तुझ्या कीर्तीनेंच निस्तेज झाला आहे. त्यास आम्ही आपल्या नित्यसिद्ध मंत्रांनीं येथें बोलावितों. तो येथें आल्यावर त्या तुझ्या शत्रूचा आपण सर्व बलात्कारानें होम करूं म्हणजे झालें."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, अशा प्रकारें भाषण करून, स्रुक्पात्रें धारण करणार ते ऋत्विज क्रोधानें इंद्राचें आवाहन करून आतां आहुति देणार, इतक्यांत ब्रह्मदेव तेथें येऊन त्यानें त्या

### ऋत्विजांचा प्रतिकार

केला आणि म्हटलें, "अहो ऋत्विजहो, ज्याची हत्या करण्यास तुम्ही उद्युक्त झालां आहां, त्याच्या स्वरूपाचा तुम्हीं विचार केला आहे काय? अहो, यज्ञ करून ज्या देवांची आराधना करावयाची, ते सर्व ह्याचेच देह आहेत; शिवाय हा यज्ञ नांवाचा इंद्र साक्षात् परमेश्वराचा अवतार आहे. म्हणून ह्याचा वध तुम्ही करूं नका. ब्राह्मणहो, ह्या समर्थ इंद्राशीं तुम्ही सख्य करा. ह्यानें तुमच्या यज्ञकर्मांत विघ्न आणण्याच्या इच्छेनें केवढा विपरीत पाखंडधर्म उत्पन्न केला त्याचा विचार करा. ऋत्विजहो, पृथूचे शंभर यज्ञ होण्यास जरी एक यज्ञ कमी आहे, तरी त्याची कीर्ति इंद्रापेक्षांही अधिक विस्तृत होईल."

### पृथूला ब्रह्मदेवाचा उपदेश.

नंतर ब्रह्मदेव राजाला म्हणतो:—हे पृथु राजा,

तूं आजपर्यंत केलेले यज्ञ पुरे आहेत. आतां तूं हा कर्ममार्ग सोडून मोक्षमार्गाला लाग. तुला मोक्षधर्म विदित आहेच. अरे, इंद्र आणि तूं दोघेही परमेश्वराचे अंश आहां; म्हणून तूं इंद्रावर क्रोध करणें सर्वथा अयोग्य होय. आरंभिलेलें यज्ञकर्म पूर्ण कसें होईल म्हणून तूं काळजी करूं नको. कारण, दैव जें कार्य वरचेवर मोडून काढीत असेल, तें दुराग्रहानें शेवटास नेण्याबद्दल मनुष्यानें व्यर्थ प्रयत्न करूं नये. कां कीं, त्यापासून कार्यासिद्धि न होतां उलट त्रास मात्र फार होतो. म्हणून आतां हा यज्ञ असाच राहूं दे. हे वेनपुत्रा, तूं विष्णूचा अवतार आहेस. तुझ्या पित्याच्या दुराचरणामुळें लुप्त झालेल्या धर्ममार्गाचें पुनरुज्जीवन करण्याकरितां तूं हा अवतार घेतला आहेस; असें असतां तूं इंद्राशीं द्वेष करूं लागलास ह्यामुळें तो पाखंडधर्म जास्त जास्त उत्पन्न करीत आहे. तेव्हां ह्या अधर्माच्या प्रसाराला तूं कारणीभूत व्हावेंस हें योग्य नाहीं. तर जगत्स्रष्ट्या भृग्वादि ऋषींनीं ज्या हेतूनें तुला उत्पन्न केलें तो त्यांचा हेतु शेवटास नेण्याबद्दल तूं संकल्प कर. प्रथम तूं इंद्राशीं सख्य जोड, आणि त्यानें उत्पन्न केलेल्या तीव्र पाखंडमार्गाचा विध्वंस कर.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें, सर्व लोकांचा गुरु जो भगवान ब्रह्मदेव, त्यानें केलेला उपदेश ऐकून पृथु राजानें इंद्राशीं सख्य केलें. नंतर त्यानें अवभृथस्नान करून ऋत्विजादि सर्व ब्रह्मवृंदांना सत्कारपूर्वक दक्षिणा देऊन संतुष्ट केलें, आणि पितर, देव, ऋषि ह्या सर्वांची पूजा करून त्यांपासून आशीर्वाद ग्रहण केले.

~~~~~~~~~~

## अध्याय विसावा.

—:०:—

### पृथु राजाला उपदेश.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, पृथु राजानें केलेल्या त्या यज्ञांच्या योगानें यज्ञभोक्ता नारायण संतुष्ट झाला, व इंद्रही आनंद पावला. नंतर भगवंतांनीं

**शरिराहून आत्म्याचें भिन्नत्व**

कसें आहे, हें व्यक्त करून दाखविलें. श्रीभगवान म्हणाले, " राजा, तुझे शंभर यज्ञ पुरे होऊं नयेत म्हणून ह्या इंद्रानें त्यांमध्यें विघ्न केलें; पण आतां तो तुजपाशीं क्षमा मागत आहे, तर तूं त्याला क्षमा कर. राजा, हें जड शरीर म्हणजे आत्मा नव्हे, असें जाणून ज्ञानवान पुरुष कोणाचाही द्वेष करीत नाहींत. राजा, तुजसारख्या पुरुषांचा मायामोह जर सुटला नाहीं, तर तूं आजपर्यंत वृद्धांची सेवा केलीस ती व्यर्थ होय, असें म्हटलें पाहिजे. ह्यास्तव मी तुला सांगतों कीं, विषयेच्छा व तदनुसार कर्मे ह्यांच्या संगतीमुळें व आत्मज्ञानाच्या अभावामुळें हा देह प्राप्त झालेला आहे, हें लक्षांत आणिलें म्हणजे आत्मज्ञान होऊन देहावरील आसक्ति सुटते; आणि मग तो विरक्त पुरुष संसारांत असला तरी ह्या शरिरानें उत्पन्न केलेल्या गृहावर, द्रव्यावर किंवा पुत्रकलत्रादिकांवर त्याचें प्रेम रहात नाहीं. कारण आपलें शरीरही नाशिवंत आहे हें त्याला कळलेलें असतें; मग इतर सर्व जें या शरिरापासूनच उत्पन्न झालेलें आहे, तें शाश्वत कसें वाटेल ! राजा, आत्मा हा देहापासून भिन्न कसा आहे तें पहा: आत्मा निर्विकार आहे; देहाला बालपण, तारुण्य आणि वृद्धावस्था हे विकार उत्पन्न होतात. आत्मा चैतन्यरूप आहे; देह जड आहे. आत्मा निर्मळ आहे; देह मलिन आहे. आत्मा निर्गुण आहे; देह सगुण आहे. आत्मा अमर्याद आहे; देह मर्यादित आहे. आत्मा कशानें झांकला जात नाहीं; देह हा गृह, वस्त्र इत्यादिकांनीं झांकला जातो. आत्मा दिसत नसून देहाला पाहणारा साक्षी आहे; देह अदृश्य असून त्याला आत्मा दिसत नाहीं. राजा, अशा प्रकारें ज्यानें आत्म्याचा विचार केला आहे, तो पुरुष संसारांतील कर्मे करीत राहिला तरी
~~~~~~~~~~

त्यांपासून अलिप्त राहून आत्मानंदांत निमग्न होतो. राजा, अशा रीतीनें आत्मानुभवाच्या योगानें मनुष्याचें मन शुद्ध झालें म्हणजे त्याला विज्ञान प्राप्त होऊन त्याचें ईश्वराशीं ऐक्य होतें; आणि ज्याप्रमाणें आकाशांत दिसणाऱ्या तरंगांविषयीं कांहींएक विचार न करितां मनुष्य ते स्वस्थपणें पाहत बसतो, त्याप्रमाणें आत्म्याशीं ऐक्य पावलेला तो पुरुष देहाकडून होत असलेल्या कर्मांचा विचार न करितां स्वस्थपणें तीं पाहत बसतो. राजा, ज्या पुरुषाला आत्मानात्मविवेक प्राप्त होतो, व ज्याला सूक्ष्मभूतें, कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें व चिदाभास ह्यांच्या योगें देह हा आत्म्याहून पृथक् आहे अशी प्रतीति येते, त्याला मग संपत्ति किंवा विपत्ति ह्यांपैकीं कांहींही प्राप्त झालें तरी तो अविकृत राहतो; आणि तो माझ्या ठिकाणीं दृढ प्रेम ठेवतो. राजा, तूंही असाच आत्मानात्मविचार करून, सुखदुःखांना सारखें मानून आणि सर्वांवर निःपक्षपात दृष्टि ठेवून प्रधानादिकांच्या साहाय्यानें प्रजेचें रक्षण कर. राजा, निःपक्षपातानें प्रजेचें रक्षण करणें हाच राजाचा धर्म आहे. त्यापासून त्याला पुण्य प्राप्त होऊन शिवाय प्रजेनें केलेल्या पुण्याचा षष्ठांश आणखी जास्त मिळतो; पण तसें न करितां जर अन्याय करून राजानें प्रजा असंतुष्ट ठेविली, तर त्याचें पुण्य क्षीण होऊन प्रजेनें केलेलीं पापें त्याला भोगावीं लागतात. म्हणून, द्विजवरांना मान्य व परंपरागत धर्मानें तूं वागलास म्हणजे तुजवर प्रजा संतुष्ट राहून त्या पुण्याईनें तुला तुझ्या घरीं चालून आलेल्या सिद्ध पुरुषांचें दर्शन होईल. राजा, यज्ञतपश्चर्यादि कर्में करून मला वश करूं पाहणाऱ्यांपेक्षां, ज्यांचीं अंतःकरणें सम असतात असे साधु मला फार आवडतात. तुझ्या अंगचे सद्गुण, तुझी निर्मत्सर बुद्धि व तुझा शांत स्वभाव हीं पाहून मला परमसंतोष झाला आहे; तर तुला जो पाहिजे तो वर मागून घे."

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, हें भगवंताचें भाषण ऐकून पृथु राजानें इंद्राच्या अपराधाबद्दलचा द्वेष आपल्या मनांतून काढून टाकला, व त्यास प्रेमानें आलिंगन दिलें. नंतर भगवान स्वस्थानीं जावयास निघाले असतां त्यानें त्यांची भक्तिपुरस्सर पूजा करून त्यांच्या चरणांना अभिवंदन केलें. त्याचें निस्सीम प्रेम अवलोकन करून भगवान गरुडाच्या अंगावर हात ठेवून स्वस्थ उभे राहिले. पृथु राजाही हात जोडून तटस्थ मुद्रेनें भगवंताकडे पाहूं लागला. प्रेमानें त्याचा कंठ सद्गदित झाला; डोळे पाण्यानें भरून आले; व त्याच्यानें एक शब्दही बोलवेना. शेवटीं त्यानें हृदयांत परमेश्वराचें ध्यान करून त्याला दृढ आलिंगन दिलें; आणि नंतर डोळे पुसून व अंतःकरण शांत करून त्यानें परमेश्वराकडे पाहिलें, आणि त्याचें अनन्यभावानें स्तवन केलें.

## पृथूनें केलेली परमेश्वराची स्तुति.

पृथु म्हणाला:—

**वरान्विभो त्वद्वरदेश्वराद्बुधः कथं वृणीते गुणविक्रियात्मनाम् ।**
**ये नारकाणामपि संति देहिनां तानीश कैवल्यपते वृणे न च ॥**
**न कामये नाथ तदप्यहं क्वचिन्न यत्र युष्मच्चरणांबुजासवः ।**
**महत्तमांतर्हृदयान्मुखच्युतो विधत्स्व कर्णायुतमेष मे वरः ॥**
**स उत्तमश्लोकमहन्मुखच्युतो भवत्पदांभोजसुधाकणानिलः ।**
**स्मृतिं पुनर्विस्मृततत्त्ववर्त्मनां कुयोगिनां नो वितरत्यलं वैरः ॥**

यशः शिवं सुश्रव आर्य संगमे यदृच्छया चोपश्रृणोति ते सकृत्।
कथं गुणज्ञो विरमेद्विना पशुं श्रीर्यत्प्रवव्रे गुणसंग्रहेच्छया ॥
अथाभजे त्वाऽखिलपूरुषोत्तमं गुणालयं पद्मकरेव लालसः ।
अप्यावयोरेकपतिस्पृधोः कलिर्न स्यात्कृतत्वच्चरणैकतानयोः॥
जगज्जनन्यां जगदीश वैशसं स्यादेव यत्कर्मणि नः समीहितम्।
करोति फल्ग्वप्युरु दीनवत्सलः स्व एव धिष्ण्येऽभिरतस्य किं तया ॥
भजंत्यथ त्वामतएव साधवो व्युदस्तमायागुणविभ्रमोदयम्।
भवत्पदानुस्मरणादृते सतां निमित्तमन्यद्भगवन्न विद्महे ॥
मन्ये गिरं ते जगतां विमोहिनीं वरं वृणीश्वेति भजंतमात्थ यत्।
वाचा नु तंत्या यदि ते जनोऽसितः कथं पुनः कर्म करोति मोहितः ॥
त्वन्मायया ऽद्धा जन ईश खंडितो यदन्यदाशास्त ऋतात्मनोऽबुधः ।
यथाऽचरेद्वालहितं पिता स्वयं तथा त्वमेवार्हसि नः समीहितुम् ॥

'हे विश्वव्यापका देवाधिदेवा, तूं मला वर देण्यास सिद्ध आहेस, हें पाहून मला फारच आनंद होत आहे; परंतु तुजपाशीं कोणता वर मागावा, ह्याजबद्दल मात्र माझें मन बरेंच साशंक आहे. हे नारायणा, ब्रह्मादिक दुसरे देवही वरप्रदान करण्यास समर्थ आहेत खरे; परंतु तुझ्या ठिकाणीं जशी कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुंशक्ति आहे, तशी त्यांच्या ठिकाणीं नाहीं. ह्यास्तव तुझ्यापाशीं वर मागण्याची संधि प्राप्त झाल्यास कोणताही ज्ञाता पुरुष, देहाभिमानी जनांस आवडणाऱ्या सुखोपभोगांची मुळींच आवड धरणार नाहीं. कारण, तसले सुखोपभोग हे नरकांतील जीवांना सुद्धां जर मिळतात, तर ते तुजपासून मागून घेण्यांत लाभ कोणता? म्हणून, हे दीनवत्सला मोक्षाधिपते, माझी अशी प्रार्थना आहे कीं, तूं मला कोणताही सुखोपभोग प्राप्त करून देऊं नको. हे लोकनायका, मी तुला मोक्षाधिपति असें म्हणतों ह्यावरून मला मोक्षाची अपेक्षा आहे, असें तुला वाटत असल्यास तो तुझा समजही यथार्थ नव्हे. पहा—महान महान सत्पुरुषांच्या हृदयांतून मुखावाटे बाहेर पडणारा तुझ्या चरणसरोजाचा मकरंद जेथें मिळणें शक्य नाहीं, त्या मोक्षरूप स्थितीची सुद्धां इच्छा माझ्यासारखा पुरुष कधीं देखील करणार नाहीं. हे परमेश्वरा, तुझे गुणानुवाद श्रवण करण्यास सांपडणें हेच मला सर्वतोपरी श्रेयस्कर वाटतें; व त्यामुळें मी तुझ्याजवळ असा वर मागतों कीं, तुझ्या गुणकथा ऐकण्याकरितां मला दहा सहस्र कान दे ! देवा, तुझ्या गुणानुवादश्रवणाचा प्रभाव इतका लोकोत्तर आहे कीं,त्याच्या योगानें तत्त्वमार्गापासून भ्रष्ट झालेल्या जनांना सुद्धां पुनः आत्मज्ञानाची स्फूर्ति होते. ह्यास्तव मला अन्य वरांची मुळींच इच्छा नाहीं. हे देवाधिदेवा, एखाद्या गुणज्ञ पुरुषाला सहजगत्या साधुसमागम घडला, व त्या योगें त्यास तुझ्या मंगलकथेचा लाभ झाला, तर तो त्या तुझ्या कथेंत इतका तल्लीन होऊन जातो कीं, त्यास कोणताही अन्य विषय तुच्छ व नीरस वाटतो. फार काय सांगावें ? प्रत्यक्ष देवी लक्ष्मीनें सुद्धां तुझ्या चरणकमलांची अखंड सेवा करून, तुझ्या कथांचें सदैव श्रवण घडावें असाच वर मागून घेतला. असो; आतां असें झाल्यापासून एक गोष्ट मात्र होण्याची भीति आहे; ती ही कीं, त्या योगानें कदाचित् लक्ष्मीचें व माझें वांकडें पडण्याचा संभव आहे; आणि यज्ञ करितांना जसें इंद्राशीं माझें भांडण झालें, तसें लक्ष्मीशींही होईल.

कारण, दोघांचाही हेतु तुझ्याच प्राप्तीविषयीं असल्यामुळें तिला तें सहन न होऊन ती मजबरोबर द्वेष करूं लागेल. पण मी त्याबद्दल कांहीं काळजी करीत नाहीं. कारण ज्याप्रमाणें पूर्वी इंद्राच्या व माझ्या भांडणांत तूं माझा पक्ष स्वीकारलास, त्याप्रमाणें ह्याही वेळीं तूं माझाच पक्ष स्वीकारशील. कां कीं, जो तूं ह्या स्वस्वरूपीं नेहमीं रत असतोस, त्या तुला लक्ष्मीची काय पर्वा आहे? म्हणूनच साधु तुझ्या चरणांची अपेक्षा करतात. पण, देवा, पहिल्यानें मात्र तूं आपल्या भक्तांना, वर मागा, म्हणून फसवावयास पाहतोस, आणि एखादें क्षुद्र फल देऊन त्यांना फिरून भवचक्रांत गोते खावयास लावतोस. तर हें करणें मात्र तुला योग्य नाहीं. कारण, ज्याला आधींच मायेनें फसविलें आहे, त्याला आणखी तूंही फसवावेंस ह्यांत तुझा मोठेपणा तो काय? तर, भगवंता, ज्याप्रमाणें पिता आपल्या पुत्राचें कल्याणच करतो, अकल्याण कधींही करीत नाहीं, त्याप्रमाणें तूंही करावेंस.'

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, अशा प्रकारें पृथु राजानें प्रार्थना केली असतां परमेश्वरानें त्याचें निष्कपट प्रेम पाहून त्याला सांगितलें कीं, "राजा, माझी माया जाणणें हें अति दुर्घट असतां तूं तिचें स्वरूप पूर्ण ओळखून मजवर दृढभक्ति ठेविलीस, आणि सर्व प्रकारच्या ऐश्वर्याविषयीं निरिच्छता व्यक्त केलीस, हें पाहून मला फार संतोष झाला आहे. तर आतां तूं काळजी करूं नको; तुझी माझ्या ठिकाणीं अखंड भक्ति राहील. तूं माझ्या आज्ञेप्रमाणें प्रजेचें पालन कर; व उन्मत्त होऊं नको; म्हणजे तुला सर्व अर्थ प्राप्त होतील."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ह्याप्रमाणें भगवद्वचन श्रवण करून पृथु राजानें पुनः भगवंताची पूजा केली; व देव, ऋषि, पितर, गंधर्व, सिद्ध, चारण, नाग, किन्नर, अप्सरा, मानव व पक्ष्यादिक इतर नानाविध प्राणी ह्या सर्वांचा सत्कार केला, आणि भगवान विष्णु व इतर सर्व पृथु राजाचा निरोप घेऊन आपआपल्या स्थानीं परत गेले. विदुरा, पृथु राजाचें मन परमात्मस्वरूपीं पूर्णपणें जडलें होतें. भगवान जावयास निघाले असतां, त्याचें लक्ष भगवंतांकडे अगदीं वेधून जाऊन तो एकसारखा त्यांजकडे पहात उभा राहिला; आणि शेवटीं भगवान दृष्टीआड झाले तेव्हां त्यांस फिरून एकवार नमस्कार करून पृथु राजा परत आपल्या नगरास निघाला.

## अध्याय एकविसावा.

—:०:—

### पृथु राजाचा नगरप्रवेश.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, इकडे नागरिकजनांनीं सर्व नगर उत्तम प्रकारें शृंगारिलें. ठिकठिकाणीं मौक्तिकांचे सर, फुलांचे हार, दुकूलवस्त्रें, व सुवर्णमंडित तोरणें लावण्यांत आलीं. चोहोंकडे अत्यंत सौगंधिक धुपाचा परिमळ वाहूं लागला. नगरींतील राजमार्ग, वीथिका व अंगणीं चंदनादिकांच्या सडयांनीं सिंचित केलीं. जागोजाग फलें, पुष्पें, अक्षता, अंकुर, लाह्या, दीप वगैरे मांडून ठेविले. मुख्य मुख्य स्थळीं सुंदर सुंदर कदलीस्तंभ व पूगवृक्ष उभे केले; व जिकडे तिकडे सुकुमार पल्लवांनीं अभिनव शोभा प्राप्त झाली. इतक्यांत पृथु राजाची स्वारी नगरासमीप येऊन पोहोंचली. पौरजन व नागरिककन्या हातांमध्यें दीप, बलि, अक्षता वगैरे मंगलसाहित्य घेऊन मोठ्या थाटमाटानें राजाला सामोऱ्या आल्या; आणि नंतर पृथु राजानें वेदघोष करणाऱ्या ब्राह्मणांसमवेत व राजयश गाणाऱ्या बंदिजनांसमवेत वाजत गाजत नगरांत प्रवेश केला. तो नगरांतून राजवाड्यांत जात असतां मार्गांत पौरजनांनीं ठिकठिकाणीं त्याची पूजा केली, व त्यानेंही संतुष्ट होऊन प्रजाजनांचा यथायोग्य गौरव केला. विदुरा, पृथु राजाचा स्वभाव फारच शांत होता. अपरंपार ऐश्वर्य प्राप्त झालें असतांही

त्यास लवमात्र गर्व नव्हता. आपल्या प्रजांचे मनोरथ पूर्ण करण्यास तो नेहमीं तत्पर असे. त्याचें आचरण अत्यंत पवित्र होतें. त्याची दिव्य कीर्ति सर्वत्र पसरली होती. तो सद्गुणांचें केवळ निधानच होता. त्यानें यज्ञयागादिक कर्में करून भूमंडलाचें उत्कृष्ट रीतीनें पालन केलें, व अंतीं सच्चिदानंद परमात्मपदाची प्राप्ति करून घेतली.

सूत म्हणतातः—शौनका, मैत्रेयानें ह्याप्रमाणें सकलगुणालंकरणविभूषित पृथु राजाचें लोकोत्तर चरित्र वर्णिलें असतां, मैत्रेय मुनींस प्रोत्साहन देण्यासाठीं त्या महान भगवद्भक्त विदुरानें पुनः त्यांस विज्ञापना केली.

विदुर म्हणालाः—मुनिश्रेष्ठा मैत्रेया, आपण पृथु राजाचें चरित्र सांगितलें तें ऐकून मला अतिशय आनंद झाला आहे. ब्राह्मणांनीं त्यास राज्याभिषेक केला त्या वेळीं देवादिकांनीं त्यास मोठमोठ्या देणग्या दिल्या, त्या अतुलपराक्रमी राजानें पृथ्वीचें दोहन केलें, धरित्री सारखी केली, इंद्रानें त्याचा अश्व नेला, भगवान महाविष्णूनें त्यास दर्शन दिलें, वगैरे सर्व हकीगत आपण मला सांगितली; पण पुढें पृथु राजानें आपलें आयुष्य कशा प्रकारें घालविलें, तें ऐकण्याची मला इच्छा आहे; तर तेवढें कृपा करून सांगावें. हे मुनिपुंगव, ह्या जगांतील सर्व उपभोग्य वस्तु वास्तविकपणें त्या राजर्षीच्या पराक्रमाचें उच्छिष्ट होय. लोकपालांसह सर्व त्या श्रेष्ठ राजाच्या दिव्य विक्रमामुळेंच आपला योगक्षेम चालवीत आहेत. तेव्हां अशा भूपतीचें चरित्र श्रवण करण्यास कोण उत्सुक असणार नाहीं बरें ?

## पृथु स्वरूपवर्णन.

मैत्रेय म्हणालेः—विदुरा, तूं भगवंताचें गुणवर्णन ऐकण्याविषयीं उत्सुक असतोस, त्यामुळें मलाही त्याविषयीं स्फुर्ति होते; असो. विदुरा, पृथु राजाचें राहण्याचें स्थान गंगा आणि यमुना ह्या नद्यांच्या मध्यभागीं होतें. तेथें तो प्रारब्धानें प्राप्त झालेले भोग भोगीत असे. असें करण्यांत त्याचा इतकाच उद्देश होता कीं, आपलें प्रारब्धकर्म संपावें. त्यानें कोणतेंही कर्म इच्छा धरून केलें नाहीं. ब्राह्मण आणि भगवद्भक्त ह्यांखेरीज सप्तद्वीपवती सर्व पृथ्वीवर तो एकटा दंड चालवीत असे. विदुरा, एके वेळीं एका यज्ञसमारंभांत देव, ब्रह्मर्षि आणि राजर्षि ह्यांचा मोठा समाज जमला होता. त्या सर्वांचा योग्य सत्कार केल्यावर पृथु राजा सभेमध्यें भाषण करण्यास उभा राहिला. विदुरा, पृथु राजाचा बांधा उंच होता. त्याचे बाहु विशाल व पुष्ट होते. त्याची देहकांति गौरवर्ण असून नेत्र कमलांसारखे आरक्त व तेजःपुंज होते. नासिका सरल व मुद्रा प्रशांत होती. मुख प्रसन्न व दंतपंक्ति मनोहर होती. त्याचें वक्षस्थल विशाल व स्कंधप्रदेश भरलेला होता. कटिभाग विस्तीर्ण असून उदरप्रांत पिप्पलपत्राप्रमाणें सुंदर होता. नाभिप्रदेश भोंवऱ्यासारखा असून वरतीं तीन वळ्या शोभत होत्या. त्याच्या शरिरावर अपूर्व तेज चमकत असून मांड्या सुवर्णासारख्या उज्ज्वल दिसत होत्या. त्याचीं पदकमलें कांतिमान असून त्यांचे अग्रभाग उत्तुंग होते. केंस बारीक, कुरळे, काळेभोर व तुळतुळीत होते. कंठ शंखासारखा होता. त्यानें महामोल दुकूलवस्त्र परिधान केलें असून देदीप्यमान भरजरी शालू पांघरला होता. यज्ञकर्म करण्यास उद्युक्त झाल्यामुळें त्यानें शरिरावरील अलंकार काढून ठेविले होते; तथापि त्या शालूंतून त्याच्या देहाची दिव्य प्रभा झळाळत होती; व त्यानें कृष्णाजिन धारण केलें असून हस्तामध्यें दर्भ घेतले होते; असो. विदुरा, पृथु राजा सभेमध्यें भाषण करण्यास उभा राहिला, तेव्हां नक्षत्रसमुदायांत ज्याप्रमाणें रोहिणीपति शोभतो, त्याप्रमाणें त्या देव, ब्राह्मण इत्यादिकांच्या समुदायांत तो भूपति शोभूं लागला; आणि त्या महात्म्यानें आपल्या सुरस वक्तृत्वानें सर्व सभाजनांस विस्मित करून सोडलें.

## पृथु राजाचें नीतिपर भाषण.

पृथु राजा म्हणाला:—साधुजनहो, ज्यांना धर्माचें तत्त्व जाणण्याची इच्छा असेल, त्यानीं आपले विचार आपल्यासारख्या सत्पुरुषांपुढें मांडावे असा नियम आहे. त्या नियमानुसार, मी स्वतांला ज्ञान प्राप्त करून घ्यावें ह्या इच्छेनें आपले विचार आपणांस कळवीत आहें. आपल्याला धर्मतत्त्व शिकविण्यासाठीं मीं बोलतों आहें असें आपण समजूं नका. प्रजाजनांना शिक्षण लावावें, त्यांस आपापल्या धर्माप्रमाणे चालण्यास प्रवृत्त करावें, आणि त्यांना निर्वाहाचीं साधनें प्राप्त करून देऊन त्यांचें रक्षण करावें, ह्याचकरिता मला राजा नेमिलें आहे; व त्या राजधर्माप्रमाणें मी वागलों, तरच मला उत्तम लोकाची प्राप्ति होईल; जर मी ह्याप्रमाणें वर्तन केलें नाहीं, तर प्रजांचें पाप मला भोगावें लागेल, व माझें ऐश्वर्य क्षीण होऊन जाइल, असें मी मानितों. म्हणून, हे सभ्यहो, माझें परलोकीं कल्याण व्हावें अशी तुमची इच्छा असेल, तर तुम्ही परमेश्वरास स्मरून स्वधर्माचें योग्य प्रकारें आचरण करीत जा; म्हणजे तुम्हीं मजवर मोठाच अनुग्रह केला असें मी समजेन. हे देव, ऋषि व पितरहो, ह्या गोष्टीला तुम्ही आपलें अनुमोदन द्या. कारण धर्माचरण करणारा, तें करावयास सांगणारा, व तें करण्यास अनुमोदन देणारा ह्या तिघांसही सारखें फल मिळतें. आपलीं कर्मे परमेश्वराला अर्पण करणें हें वेनासारख्या कित्येक पुरुषांना संमत नसेल; पण मनु, उत्तानपाद, ध्रुव, प्रियव्रत, आमचे पितामह अंग, ब्रह्मदेव, प्रल्हाद, शंकर, बलि अशा सर्व श्रेष्ठ पुरुषांचें मत, सर्व कर्मांचीं फलें देणारा परमेश्वरच असल्यामुळें त्यालाच सर्व कर्मे अर्पण करावीं, असें आहे; ह्यास्तव, वेन राजासारख्यांना धर्माविषयीं अज्ञान आहे असेंच म्हणावें लागतें. अशा पुरुषांविषयीं साधूंना फार वाईट वाटतें. अहो, कर्ता करविता एक परमेश्वरच आहे. चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त करून देण्यास तोच एक समर्थ होय. ज्याप्रमाणें परमेश्वराच्या चरणांगुष्ठापासून उगम पावलेली नदी उत्तरोत्तर वृद्धिंगत होत जाऊन लोकांच्या सकळ पापांचा नाश करिते, त्याप्रमाणें संसारांत त्रस्त झालेल्या मनुष्यांच्या ठिकाणीं ईश्वराच्या चरणसेवेची रुचि एकवार उगम पावली, म्हणजे ती प्रतिदिनीं वाढत जाऊन त्याच्या सर्व पूर्वकर्मांचें पाप नाहींसें करिते; आणि मग वैराग्याची प्राप्ति होऊन त्याला तत्त्वज्ञानाचा साक्षात्कार झाला म्हणजे तो जो षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवंताच्या चरणांचा आश्रय करून राहतो, तो पुनः ह्या क्लेशदायक संसारांत कधींच येत नाहीं. म्हणून, जनहो, तुम्ही आपापलीं कायिक, वाचिक व मानसिक कर्मे स्वधर्माप्रमाणें करून तीं अभेदबुद्धीनें परमेश्वरास अर्पण करीत जा; म्हणजे तो तुमच्या सर्व इच्छा पूर्ण करील. ईश्वराचें रूप वस्तुतः शुद्ध ज्ञानानें पूर्ण आहे; त्याच्या ठिकाणीं गुण नाहींत; तो मायेच्या योगानें नानाप्रकारचीं रूपें स्वीकारतो, तरी तो त्यांपासून वेगळा आहे; तंडुल, घृत, दधि इत्यादि अनेक प्रकारचीं द्रव्यें, शुक्लादि गुण, कंडणादि क्रिया, मंत्र, अर्थ, संकल्प इत्यादिक सर्व कांहीं यज्ञसंबंधी गोष्टी हीं त्या परमेश्वराचींच रूपें होत; व त्यांच्याच योगानें स्वस्वरूप यज्ञांची सिद्धि तो करितो. ज्याप्रमाणें यज्ञ व यज्ञांगें हीं भगवद्रूप आहेत, त्याप्रमाणें यज्ञांचें फलही भगवद्रूपच आहे. प्रकृति, काळ, वासना आणि पूर्वकर्म ह्यांच्या योगानें शरिरें जन्म पावतात, आणि तीं अनेक प्रकारचीं दिसतात, ही सर्व परमेश्वराची माया असून त्या सर्वांच्या अंतर्यामीं एकच पुरुष आहे. जळणाऱ्या लांकडांचे आकार असतील तसाच अग्नि आहेसा दिसतो—परंतु जशीं वास्तविक तीं अग्नीचीं पृथक् स्वरूपें नसून अग्नि एकच असतो, तशीं शरिरें अनेक प्रकारचीं दिसतात तरी त्यांत वास्तविक परमेश्वराचें स्वरूप एकच आहे. अहो,

ह्या माझ्या प्रजाजनांचे मजवर मोठे उपकार आहेत. कारण, ते स्वधर्माचरणानें वागून यज्ञभोक्त्या परमेश्वराची आराधना करितात. राजे लोक ऐश्वर्य आणि बल ह्यांनीं संपन्न असतात खरे; परंतु त्यांनीं ब्राह्मणांवर व ईश्वराच्या भक्तांवर आपला अधिकार चालविण्याच्या भरीस कधींही पडूं नये. कारण, जरी ते ऐश्वर्यसंपन्न नसले, तरी सहनशीलता, तपश्चर्या व ज्ञान ह्या गुणांनीं ते स्वभावतांच फार तेजस्वी असतात. प्रत्यक्ष भगवान विष्णु ब्राह्मणांच्या चरणांचें नित्य वंदन करितो, म्हणून त्याला अखंड लक्ष्मी व पवित्र कीर्ति प्राप्त झाली आहे. अहो, त्या परमेश्वराला ब्राह्मण फार प्रिय आहेत. ब्राह्मणांची सेवा केली असतां तो संतोष पावतो. म्हणून धर्मपरायण लोकांनीं नम्रपणें निरंतर ब्राह्मणांचीच सेवा करावी. ब्राह्मण हें परमेश्वराचें मुख आहे; म्हणून त्यांच्या सेवेमध्यें नित्य तत्पर असलें म्हणजे अनायासें चित्त शुद्ध होऊन सर्व फलांची प्राप्ति होते. योगी ज्या ब्रह्मविषयक ज्ञानाचा अभ्यास करितात, त्या ज्ञानाचें प्रतिपादन करणारीं उपनिषद्वाक्यें परमेश्वराचेंच वर्णन करितात. परमेश्वराचें स्वरूप अनंत आहे, हें तत्त्व ज्यांना पूर्णपणें कळतें त्या लोकांनीं, ब्राह्मणांच्या ठिकाणीं सर्व देव आहेत, असें निष्ठापूर्वक समजून त्यांना अन्न दिलें म्हणजे तें परमेश्वराला जितकें प्रिय होतें, तितकें अग्नीमध्यें हवन केलेलें अन्न प्रिय होत नाहीं. कारण, ब्रह्मज्ञानविशिष्ट ब्राह्मण हे चित्स्वरूप होत व अग्नि हा केवळ जड होय. सभासदहो, जे अत्यंत पवित्र आहेत व ज्यांचा अंत मुळींच लागत नाहीं, त्या वेदांचें पठन व मनन ब्राह्मण एकाग्र चित्तानें करीत असतात; आणि तदनुरूप श्रद्धा, तपश्चर्या, शुद्ध आचरण, मौन व इंद्रियनिग्रह हे गुण स्वीकारितात; म्हणून त्या ब्राह्मणांची पायधूळ मी यावज्जन्म मस्तकीं धारण करीन. सभ्यहो, ब्राह्मणांची पादधूलि धारण करणाराचें सर्व पाप तत्काल नष्ट होतें, व त्यास शमदमादि श्रेष्ठ संपत्ति लवकर प्राप्त होतात. ह्यास्तव मी अशी इच्छा करितों कीं, ब्राह्मणांचे समुदाय, गाईचे कळप व षड्गुणैश्वर्यसंपन्न भक्तकामकल्पद्रुम परमात्मा मला प्रसन्न होवो.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, असें हें राजाचें भाषण ऐकून सर्वांना फार संतोष झाला आणि त्यांच्या मुखांतून 'वाहवा! वाहवा!' असे उद्गार निघाले. ते म्हणाले, "सुपुत्र उदरीं आला असतां उत्तम गति मिळते असें ज म्हणतात, तें अगदीं यथार्थ आहे. कारण, सुपुत्राच्या योगानें अतिशय पापी असा वेन राजा नरकांतून पार पडला. हिरण्यकशिपु देखील भगवंताची निंदा केल्यामुळें नरकांत पडणार होता; पण सुपुत्र प्रल्हाद उदरीं आल्यामुळें तो उद्धरून गेला. राजा, तूं वीरश्रेष्ठ व पृथ्वीचा पिता आहेस. परमेश्वरावर तुझी अचल भक्ति आहे. तूं दीर्घायुषी हो. तुझ्यासारखा रक्षणकर्ता मिळाल्यामुळें आम्ही धन्य आहों. तूं ज्ञाता आहेस. तुझ्या उपदेशानें आज आम्ही अज्ञानांधकारांतून बाहेर निघालों. तूं आपल्या सत्त्वगुणाच्या योगानें सर्व पृथ्वीचें पुत्रवत् पालन करतोस, तस्मात् तुझें कल्याण असो!"

## अध्याय बाविसावा.

—:०:—

### सनत्कुमारांची व पृथु राजाची भेट.

मैत्रेय मुनि म्हणाले:—विदुरा, अशा प्रकारें पृथु राजाची ते प्रजाजन स्तुति करीत होते; इतक्यांत सूर्याप्रमाणें तेजःपुंज असे चार मुनि तेथें आले. ते आकाशांतून उतरत असतांना राजाच्या आणि प्रजाजनांच्या दृष्टीस पडले; तेव्हां त्यांच्या तेजावरूनच, हे कोणी तरी सत्पुरुष पापाचा नदेव, करण्याकरितां येत आहेत, असें त्यास वाटलें. ते भूमीवर आल्याबरोबर राजा आणि प्रजाजन मोठ्या उत्सुकतेनें त्यांना मान देण्यासाठीं उठून उभे

राहिले. राजानें त्या मुनींना प्रेमपूर्वक वंदन केलें, आणि सुवर्णाचीं आसनें सिद्ध करून ठेविलीं होतीं त्यांवर बसण्याविषयीं विनंती केली. नंतर ते मुनि, ज्याप्रमाणें गार्हपत्यादि अग्नि आपापल्या स्थानीं होमकुंडांत शोभतात, त्याप्रमाणें आपआपल्या आसनीं शोभूं लागले. नंतर राजानें त्यांची षोडशोपचारें पूजा केली, व त्यांच्या चरणतीर्थाचें आपल्या मस्तकावर सिंचन केलें. विदुरा, हे मुनि शंकराचे वडील बंधु असल्यामुळें त्यालाही वंद्य होते. असो.

## साधुस्तुति.

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, नंतर पृथु राजा संतुष्ट चित्तानें व श्रद्धापूर्वक अंतःकरणानें त्या सनत्कुमारांना म्हणाला, "मुनिवर्य, मीं असें कोणतें पुण्य केलें होतें कीं, ज्याच्या योगानें योग्यांना सुद्धां दुर्लभ असें आपलें दर्शन मला झालें? प्रत्यक्ष भगवान विष्णु, शंकर आणि ब्रह्मदेव हे ज्यांना प्रसन्न आहेत, त्या आपल्यासारख्या साधुपुरुषांना ह्या लोकीं आणि परलोकीं दुर्लभ तें काय असावयाचें आहे? आपलें सर्व जगांत पर्यटन आहे; तरी आत्मा ज्याप्रमाणें सर्व दृश्य वस्तु पाहतो–पण त्या वस्तूंना तो दिसत नाहीं, त्याप्रमाणें आपण सर्व लोकांना पाहतां, परंतु सर्व लोकांना आपण दिसत नाहीं. जो गृहस्थाश्रमी पुरुष आपल्या सर्व परिवारासह साधुजनाच्या सेवेंत तत्पर असतो, तो निर्धन असला तरी धन्य होय. त्याला साधुच म्हटलें पाहिजे. सर्व प्रकारच्या संपत्तीनें भरलेलें असूनही ज्यांत परमेश्वराच्या भक्तांचें चरणतीर्थ पडत नाहीं, तें घर सर्पाश्रित चंदनवृक्षाप्रमाणें निरुपयोगी होय."

## पृथु राजाची भवसागर तरण्याविषयीं पृच्छा.

आ राजा पुढें म्हणाला:—ब्राह्मणहो, आपली थोरवी मीं काय वर्णन करावी! आपण बाल असूनही मोक्षप्राप्तीच्या इच्छेनें मोठमोठीं व्रतें आचरीत आहां. ह्या प्रसंगीं आपण आम्हांवर अनुग्रह कराल तरच आमचा तरणोपाय होईल. ह्या दुःखमय संसारांत आम्ही आपल्या कर्मामुळें येऊन पडलों आहों, आणि इंद्रियांचे विषय हेच आम्हांला पुरुषार्थ वाटतात; तर ह्यांतून आम्हांस सोडवा. कदाचित हें माझें विचारणें व्यवहारविरुद्ध होईल कारण शिष्टसंप्रदाय असा आहे कीं, आपल्या घरीं कोणी पाहुणे आले असतां त्यांना कुशलप्रश्न विचारावे. पण ज्यांच्या ठिकाणीं कल्याण आणि अकल्याण ह्या बुद्धीच्या वृत्ति नाहींत, आणि जे नित्य स्वस्वरूपीं रममाण असतात, त्या आपणांसारख्या साधुपुरुषांना कुशलप्रश्न ते काय विचारावयाचे आहेत? कारण आपलें नेहमीं कल्याणच असतें. आपण संसारांत तप्त झालेल्या जनांचे हितकर्ते आहां; म्हणून मी आपणांस विचारतों कीं, कोणत्या उपायानें ह्या संसारांत प्राण्यांचें कल्याण होईल? विप्रहो, आपण प्रत्यक्ष परमेश्वर आहां. कारण, जन्मरहित असा परमेश्वर भक्तांवर अनुग्रह करण्यासाठीं सिद्धांचीं रूपें घेऊन पृथ्वीवर फिरत असतो हें प्रसिद्ध आहे.

मैत्रेय म्हणाले:–विदुरा, तें गंभीर अभिप्रायानें भरलेलें पृथु राजाचें सुंदर भाषण ऐकून सनत्कुमार मुनींना फार संतोष झाला, आणि त्यांनीं प्रसन्न अंतःकरणानें राजाचें समाधान केलें.

## सनत्कुमारांचें पृथूस उत्तर.

(संसारतरणोपाय–हरिभक्ति.)

सनत्कुमार म्हणाले:—राजा, तूं स्वतः ज्ञानी असूनही हा प्रश्न विचारीत आहेस, तेव्हां ह्यांत सर्व लोकांचें कल्याण व्हावें हाच तुझा हेतु आहे, हें उघड होय. अशी बुद्धि सत्पुरुषावांचून इतरांस व्हावयाची नाहीं. तेव्हां तुजसारख्या साधूंचा समागम आम्हांस होत आहे, हा एक अलभ्य लाभच होय असें आम्ही समजतों. राजा, मधुसूदनाच्या चरणकमलांचें गुणवर्णन करण्याविषयीं प्रश्न करणें व ते गुण ऐकण्याविषयीं उत्सुक होणें हें फार कठिण आहे, पण त्याविषयींची

तुझी निश्चल भक्ति पाहून आम्हांस फार आनंद वाटतो. राजा, प्राण्याच्या मनाला कामरूपी मल लागला कीं तो कधींही निःशेष होत नाहीं, हें खरें; परंतु भगवद्गुणकथेवर त्या प्राण्याची प्रीति जडली असतां त्या प्राण्याच्या मनावरील मल अगदीं नाहींसा होतो. ह्या जड देहावर आसक्ति न ठेवितां शुद्धचैतन्यरूप जो आत्मा त्याच्या स्वरूपींच रत असावें, असें शास्त्राचेंही मत आहे. आतां, ही स्थिति प्राप्त होणें कठिण तर खरेंच; पण प्रयत्न केला असतां तें साध्य होण्यासारखें आहे. ही गोष्ट कोणाला नुसत्या श्रवणानें प्राप्त होईल, कोणाला ती प्राप्त होण्यास त्यापेक्षां जास्त श्रम करावे लागतील; पण अखेरीस कोणत्या तरी उपायानें त्या मनुष्याची भक्ति हळू हळू वृद्धिंगत होऊन त्याला ती स्थिति प्राप्त होईल ह्यांत संदेह नाहीं ! देहादिकांविषयीं अनादर व आत्म्याविषयीं आवड हीं उत्पन्न होण्यास मुख्य उपाय हे आहेत कीं, साधक पुरुषानें गुरूच्या व शास्त्राच्या वचनांवर श्रद्धा ठेवावी; भागवतधर्मांचें आचरण करावें; ज्ञानवृद्धीविषयीं हौस धरावी; द्रव्यप्राप्ति आणि इंद्रियतृप्ति ह्या खटाटोपांतच रममाण झालेल्या लोकांशीं सहवास करूं नये; त्या विषयांचा तिरस्कारपूर्वक त्याग करावा; एकांतस्थानीं बसून आत्मस्वरूपाचा विचार करण्यांत संतोष मानावा; पण परमेश्वराचें कथामृत प्राशन करण्यास मिळत असेल, तर एकांतवासाचा त्याग करण्याचा प्रसंग आला तरी तो करावा; योग्यासारखी शांत वृत्ति ठेवावी; निरिच्छपणें यमनियमादि नियम पाळावे; शीत–उष्ण, लाभ–हानि, जय–अपजय इत्यादि द्वंद्वें सहन करावीं; हिंसा करूं नये; उदरपोषणासाठीं अनेक प्रकारचे पदार्थ असावे म्हणून प्रयत्न करूं नये; सहज मिळतील त्या पदार्थांपासून कार्य करून घ्यावें; संग्रहाची इच्छा धरूं नये; ईश्वरेच्छेनें प्राप्त झालेले भोग संतोषानें भोगावे; व ईश्वरावर दृढ विश्वास ठेवून त्याच्या गुणांचें वर्णन करावें किंवा ऐकावें; म्हणजे मनुष्याची श्रद्धा वाढून तिच्या योगानें ह्या जड देहावरील आसक्ति कमी कमी होत जाते, व निर्गुण परब्रह्माच्या ठिकाणीं दृढ भक्ति जडते. ब्रह्मरूप आत्म्याच्या ठिकाणीं अशी निश्चल भक्ति जडली, म्हणजे सद्गुरूच्या उपदेशानें त्यास ज्ञान आणि वैराग्य प्राप्त होतें. ज्ञान आणि वैराग्य प्राप्त झालें म्हणजे काम, क्रोध, लोभ इत्यादि षड्रिपूंची त्या मनुष्यास बाधा होत नाहीं. कामक्रोधादि विकार नाहींतसे झाले, म्हणजे मग त्यास अर्थातच कशाची वासना रहात नाहीं; आणि अंतःकरणाला कसलीही वासना राहिली नाहीं, म्हणजे ते सर्व विषय विसरून जाऊन चित्त आत्मस्वरूपीं रत होतें; आणि मग तें अंतःकरण चैतन्यरूप ब्रह्माशीं ऐक्य पावल्यामुळें, काष्ठें अग्नीशीं ऐक्य पावल्यावर जशीं जळून जातात, तसें जळून जातें ! अशा प्रकारें ज्ञानाच्या योगानें अंतःकरणाचें आत्म्याशीं ऐक्य झाल्यावर सर्व विकार नाहींतसे होऊन मग त्याला ह्या देहाचें भान रहात नाहीं, व देह मिथ्या आहे ह्या गोष्टीची प्रतीति उत्पन्न होते. स्वप्नांत एकादें दुःख किंवा सुख भोगतांना मध्येंच जागृत झाल्यावर तें सर्व खोटें असें जसें प्रतीतीस येतें, तसाच हा प्रकार आहे. स्वप्नांतील मिथ्या व्यापारांपासून शरीर सुटण्यास जशी जागृति झाली पाहिजे, तसें ह्या पंचभूतात्मक मिथ्या शरीरव्यापारापासून सुटण्यास जीवाला परमात्म्याचें ज्ञान झालें पाहिजे, व तें होण्यास प्रथम षड्गुणैश्वर्यसंपन्न लोकनियंत्या परमेश्वराच्या ठिकाणीं भक्ति सुदृढ जडली पाहिजे. राजा, भगवत्पदीं सुदृढ भक्ति जडली म्हणजे सर्व गोष्टी क्रमाक्रमानें घडून येतात; आणि साधकाचे मनोरथ व्यवस्थितपणें पूर्ण होतात.

आतां, आत्म्याच्या ठिकाणीं प्रीति न ठेवितां देहादिक पदार्थ खरे मानून त्यांतच तल्लीन झालें असतां काय प्रकार होतो तो पहाः प्रथम, मनु-

ण्याच्या मनांत आपल्याजवळ विपुल संपत्ति असावी हा विचार उत्पन्न होतो; ती प्राप्त झाली म्हणजे सुंदर स्त्री पाहिजे असें वाटतें; नंतर तिच्यासह सुखांत राहतां यावें म्हणून उत्तम घर, वाडा किंवा बंगला वगैरे पाहिजे अशी इच्छा होते; मग तेथें गायन, वादन, नृत्य इत्यादि अनेक प्रकार पाहिजेत असा अभिलाष उद्भवतो; आणि अशा प्रकारें एकामागून एक त्या मनुष्याच्या वासना वाढूं लागतात. कोणतीही वस्तु मिळाली कीं तिला आणखी कशाची तरी जोड असल्यावांचून तिच्यापासून सुख उत्पन्न होत नाहीं; ह्यास्तव अंतःकरणाला सारखी ओढ लागून अखेरीस त्याला कधींच समाधान वाटत नाहीं; आणि हें करूं का तें करूं, अशी मनाची स्थिति होऊन शेवटीं मनुष्य अविचारी बनतो; आणि त्याची विचारशक्ति नाहींशी झाली म्हणजे त्याला पूर्वानुसंधान रहात नाहीं; तें नाहींसें झालें म्हणजे तो ज्ञानभ्रष्ट होतो; आणि अशाप्रकारें विषयाच्या नादानें जो ज्ञानभ्रष्ट झाला त्यानें आपल्या आत्म्याचा नाश आपणच करून घेतला असें ज्ञानी म्हणतात. अहो, ज्याच्या सर्वव्यापक अस्तित्वामुळें सर्व वस्तु प्रिय वाटतात, त्याचा जर स्वतांच आपण नाश केला, तर त्यापेक्षां अधिक मोठा नाश तो कोणता ? म्हणून अर्थाचें व इंद्रियतृप्तीचें सतत चिंतन करीत राहणें म्हणजे सर्व पुरुषार्थांचा नाश करून घेणें होय. असा मनुष्य मानवजन्मांत सुलभ असलेल्या परोक्ष व अपरोक्ष ज्ञानाला मुकतो व त्याला वृक्षपाषाणादि स्थावरयोनींत जन्म घेऊन अनंतकाल दुःख भोगीत पडावें लागतें. म्हणून, ज्या प्राण्याच्या मनांत ह्या दुःखमय संसारांतून सुटावें असें असेल, त्यानें चतुर्विध पुरुषार्थांचा नाश करणाऱ्या वस्तूंवर कधींही आसक्ति ठेऊं नये. राजा, धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे जे चतुर्विध पुरुषार्थ, त्यांपैकीं मोक्ष हा अत्यंत श्रेष्ठ होय. धर्मादि पहिले तीन पुरुषार्थ श्रेष्ठ खरे, परंतु ते नाशवंत आहेत; पण मोक्ष हा श्रेष्ठ असून शिवाय अविनाशी आहे.

राजा, ज्या वेळीं सत्त्व, रज व तम ह्या गुणांमध्यें क्षोभ उत्पन्न होऊन ब्रह्मदेवासारखे उच्च व आपणांसारखे नीच प्राणी उत्पन्न झाले, त्या वेळींच जसा कालानें त्यांचा नाश करून ठेविला आहे, आणि म्हणूनच जसें हें सर्व अशाश्वत आहे, तसेच धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ अशाश्वत आहेत. तस्मात्, राजा, देह, इंद्रियें, प्राण, बुद्धि व अहंकार ह्यांनीं वेष्टिलेल्या स्थावरजंगमात्मक विश्वाच्या हृदयामध्यें प्रकाशमान असणारा जो परमेश्वर ‘ तोच मी आहें ’ असें जाण, व त्या ज्ञानाच्या योगानें प्रधान पुरुषार्थ जो मोक्ष त्याची प्राप्ति करून घे. आतां, तूं म्हणशील कीं, अंतरीं जीव प्रकाशमान आहे, हें मला कळत आहेच; तेव्हां त्याला वेगळें जाणायाचें तें काय ? तर, बाबारे, ह्याच विधानांत तुझ्या शंकेचें उत्तर आहे. तें असें कीं, ‘ जीव प्रकाशमान आहे असें मला कळतें ’ असें म्हटलें, म्हणजे जीवाला जाणणारा दुसरा कोणी आहे हें उघड सिद्ध होतें. आतां, जीवाला वागविणारें कर्म आहे अशी कदाचित् तुला शंका येईल; तर कर्म हें परतंत्र आहे, व त्यास दुसऱ्याला जाणण्याची शक्ति नाहीं; तेव्हां जीवाला जाणणारा सर्वशक्तिमान परमेश्वर जीवाहून वेगळा असून स्वयंप्रकाशित आहे, हेंच सिद्ध होतें. पुष्पमालेवर जसा सर्पाचा भास होतो, तसा आत्म्यावर जीवाचा नुसता भास होतो. पुष्पमालेचें ज्ञान झाल्यावर जसा सर्पविषयींचा भ्रम निघून जातो, तसें आत्म्याचें ज्ञान झाल्यावर जीवाविषयाचा भ्रम निघून जातो. परमेश्वर शुद्धचैतन्य व ज्ञानस्वरूप आहे. तो कर्मांच्या योगानें कधींही मलिन व बद्ध होत नाहीं. मनुष्याच्या अंतःकरणामध्यें ‘ मी कर्में करणारा ’ असा जो अभिमान उत्पन्न होतो, तो

कर्मांच्या योगानें उत्पन्न होतो; ह्यास्तव तें कर्म नाहींसें झालें म्हणजे त्याच्यामुळें उत्पन्न होणारा अभिमानही नाहींसा होतोच. ' मी कर्म करणारा' हा मिथ्या अभिमान नाहींसा झाला, म्हणजे अर्थातच जीवाहून आत्मा वेगळा आहे, हें स्पष्ट अनुभवास येतें; म्हणून सर्व गोष्टींना कारण जो अहंकार, व तो उत्पन्न होण्यास कारण जें कर्म, त्यांचा क्षय होण्याकरितां मोक्षाची इच्छा करणारे पुरुष ईश्वराच्या चरणाची शुद्धांतःकरणानें भक्ति करितात, व त्या भक्तीच्या योगानें कर्मांचा नाश करून अभिमानरहित होत्साते परमेश्वराच्या पदाप्रत पावतात. राजा, योगाभ्यासी लोक बुद्धि निर्विषयक करून इंद्रियांना विषय भोगू देत नाहींत हें खरें; परंतु भगवद्भक्तांप्रमाणें त्यांना आपला अहंकार दूर करतां येत नाहीं; कारण अहंकार उत्पन्न करणारें जें कर्म, तें सदैव त्यांच्या पाठीस लागलेलें असतेंच; म्हणून, तूं त्या ज्ञानदात्या परमेश्वराची भक्तिच कर. तोच सर्वांचा आश्रय आहे. बाबारे, संसार हा एक समुद्र आहे, व काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर आणि अहंकार हे त्या समुद्रांतील भयंकर नक्र ( मगर ) आहेत. ह्याकरितां, हा भवसागर तरून जाणें झाल्यास ईश्वराच्या चरण-नौकेचाच आश्रय केला पाहिजे. तिचा आश्रय न करितां जे लोक योगादि क्लेशदायक साधनांच्या आश्रयानें भवसागर तरून जाण्याची इच्छा करितात, त्यांस अतिशय कष्ट पडतात ह्यांत संशय नाहीं.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, अशा प्रकारें त्या आत्मज्ञानी सनत्कुमारांनीं पृथु राजाला ईश्वराच्या प्राप्तीचा मार्ग सांगून परब्रह्मतत्त्वाचा बोध केला, तेव्हां राजानें त्यांची स्तुति केली: तो म्हणाला, " ब्रह्मनिष्ठ मुनिहो, सकलदुःखहर्त्या परमेश्वरानें मजवर पूर्वींच अनुग्रह केला आहे, पण त्याची पूर्णता आज आपण येथें आल्यानें झाली, हे आपले मजवर अनंत उपकार आहेत. मुनिवर्यहो, आपल्याला कांहीं गुरुदक्षिणा द्यावी अशी माझी इच्छा आहे; पण मी काय द्यावें हेंच मला समजत नाहीं. कारण, मजजवळ असलेले राज्यादि सर्व पदार्थ साधूंनींच मला दिलेले आहेत, तेव्हां त्या सर्व पदार्थांवर आपली सत्ता आहेच; तथापि परमेश्वरानें उत्पन्न केलेल्या पदार्थांनींच जसें परमेश्वराचे पूजन करावयाचें, तसें, आपल्या आशीर्वादानें प्राप्त झालेल्या ह्या देहानें व ऐश्वर्यादि पदार्थांनीं आपलें मी पूजन करितों. ब्रह्मज्ञहो, माझे पंचप्राण, पत्नी, पुत्र, राज्य, संपत्ति, गृह, पृथ्वी, सेना इत्यादि सर्व कांहीं मी तुम्हांस अर्पण करितों. राजाधिकार, सेनापतित्व, धर्मन्याय इत्यादिक सर्व गोष्टींवर आपणांसारख्या वेदशास्त्रज्ञ पुरुषाचीच सत्ता असणें उचित. ह्या जगतांत स्वातंत्र्य काय तें ब्राह्मणासच आहे. स्वताचे पदार्थ सेवन करणारे एक ब्राह्मणच होत. क्षत्रियादि सर्व वर्णांस ब्राह्मणांच्या अनुग्रहामुळें ऐश्वर्य प्राप्त होतात. मुनिहो, आपण पूर्ण वेदवेत्ते आहां. आपण मला भगवत्स्वरूपाची यथार्थ प्रतीति उत्पन्न करून दिली, त्याबद्दल मी तुमचा अत्यंत ऋणि आहें. ह्या ऋणांतून उतराई होणें हें सर्वथा अशक्य होय. ह्यास्तव मी आपणांस हात जोडून अभिवंदन करावें इतकेंच योग्य आहे. "

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, पृथूनें अशा प्रकारें नम्रपणाचें भाषण करून, त्या आत्मज्ञानपरिपूर्ण सनत्कुमारांची षोडशोपचारें पूजा केली. ती ग्रहण करून ते मुनि पृथूच्या सुस्वभावाची प्रशंसा करीत सर्वांसमक्ष आकाशमार्गें निघून गेले. पुढें, सनत्कुमारांनीं केलेल्या उपदेशानुसार आत्म्याचें सतत चिंतन करीत पृथु राजा राज्य करीत राहिला. त्याची आत्मस्वरूपीं दृढ प्रीति जडली, आणि नरजन्माचें साफल्य झालें असें वाटून त्यानें धन्यता मानिली. तो जें जें कर्म करी, तें तें काळ, देश, बल, स्थिति इत्यादिकांच्या अनुरोधानें ब्रह्मार्पणबुद्धीनें करी; कोण-

त्याही विषयावर आसक्ति न ठेवितां चित्त नेहमीं समाधानयुक्त राखी; आणि प्रकृतीच्या पलीकडे असणारें जें परब्रह्म, तेंच सर्वत्र व्याप्त असून सर्वांचें साक्षी आहे, असें मानीत असे. पृथु राजा गृहस्थाश्रमी असून अखिल वैभवांनीं परिपूर्ण असलेलें सार्वभौम राज्य उपभोगीत होता, तरी त्याची वृत्ति निरहंकार व अंतर्मुख अशीच होती. त्याला त्याच्या अर्चि नामक भार्येपासून पांच पुत्र झाले. त्यांचीं नांवें विजिताश्व, धूम्रकेतु, हर्यक्ष, द्रविण आणि वृक अशीं होतीं. ते रूपांनीं व गुणांनीं अगदीं पित्यासारखे होते. विदुरा, पृथु राजाची महती काय वर्णन करावी? त्या एकट्याच्या ठिकाणीं सर्व लोकपालांचे गुण वास्तव्य करीत होते. तो मनानें, शरीरानें व वाणीनें अनेक कृत्यें करून प्रजेचें रंजन करीत असे ह्यास्तव 'राजा' हें अन्वर्थक नाम त्यास प्राप्त झालें होतें. त्याच्या सौम्य व शांत वर्तनावरून तो दुसरा सोमच आहे असें लोकांना वाटे. सूर्य जसा भूमीवरील उदक ग्रहण करून तिला पर्जन्य व ताप देतो, तसा तो पृथु राजा आपल्या प्रजेपासून करभार ग्रहण करून तिला संपत्ति व ताप हीं देत असे; म्हणजे पृथु राजा लोकांपासून जे कर वसूल करी, त्याचा उपयोग सदाचरणी लोकांची भरभराट करण्याकडे व दुराचरणी लोकांचा विध्वंस करण्याकडे करी. विदुरा, पृथु राजा अग्नीप्रमाणें दुःसह होता; महेंद्राप्रमाणें विजयशाली होता; पृथ्वीप्रमाणें गंभीर होता; स्वर्गलोकाप्रमाणें अभीष्टप्रद होता; आणि पर्जन्याप्रमाणें यथेच्छ धन पुरविणारा होता. समुद्राचा जसा अंत लागत नाहीं, तसा त्याच्या शक्तीचा, बुद्धीचा वगैरे अंत लागत नसे. त्याचें धैर्य तर केवळ मेरु पर्वताप्रमाणें अचल होतें; दुष्ट दंडनाच्या कामीं तो दुसरा यमधर्मच होता; हिमालय पर्वताप्रमाणें त्याच्या ठिकाणीं सर्व अद्भुत वस्तूंचें व गुणांचें भांडारच होतें; त्याचा धनसंचय कुबेराप्रमाणें विशाल व वरुणाप्रमाणें गुप्त असे; त्याच्या ठिकाणीं वायूप्रमाणें सर्वत्र निष्प्रतिबंधपणें संचार करण्याचें सामर्थ्य होतें; आणि त्याचें शारीरबल, मानसिक धैर्य व ऐंद्रियसौष्ठव हें केवळ अश्रुतपूर्व होतें. विदुरा, तो राजा भूतपति शंकराप्रमाणें उग्र असून मदनाप्रमाणें मोहक होता; सिंहाप्रमाणें पराक्रमी असून मनूप्रमाणें दयाळू होता; आणि ब्रह्मदेवाप्रमाणें लोकनियंता असून बृहस्पतीप्रमाणें ब्रह्मज्ञ व प्रत्यक्ष भगवान विष्णूप्रमाणें आत्मवान होता. विदुरा, गोब्राह्मणांचा प्रतिपाल, परमेश्वराची भक्ति, लोकापवादाचें भय, परोपकाराचा प्रयत्न व थोरांविषयीं आदर ह्या गोष्टींसंबंधानें तर त्यास कोणाचीच उपमा देतां येत नसे. विदुरा, पृथु राजाच्या अशा श्रेष्ठ गुणांमुळें साधु लोक नित्य त्याची सर्वत्र स्तुति करीत; आणि प्रभु रामचंद्र जसा साधूंच्या अंतरीं वास करितो, तसा तो सर्वांच्या अंतरीं वास करीत असे.

## अध्याय तेविसावा.

—:०:—

### पृथूचें तप.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, त्या बुद्धिमान पृथु राजानें स्वतः अन्नादिकाची उत्पत्ति करून व सर्व पृथ्वीची उत्तम प्रकारें व्यवस्था लावून बहुत कालपर्यंत प्रजांचें पालन केलें. नंतर एके दिवशीं त्याला असें वाटलें कीं, आपण ईश्वराची आज्ञा सर्व प्रकारें पालन करून धर्माचें संरक्षण केलें; पण आतां आपलें उतारवय झालें आहे, तेव्हां आपण आत्मसाधनाचा मार्ग धरावा हेंच योग्य होय. असा विचार करून त्यानें सर्व राज्य पुत्रांच्या स्वाधीन केलें आणि आपण पत्नीसह तपोवनांत निघून गेला. त्या वेळीं त्याच्या पुत्रांना व प्रजाजनांना अत्यंत वाईट वाटलें. त्या निग्रही पुरुषानें वनामध्यें तीव्र तपश्चर्या करण्याचा उद्योग सुरू केला. तप करणें हा वानप्रस्थ लोकांचा परम-

मान्य धर्म होय. प्रथम कित्येक दिवस तो कंद मुळें व फळें भक्षण करी; पुढें कांहीं दिवसांनीं तो झाडांच्या गळून पडलेल्या पानांवर आपला निर्वाह चालवूं लागला; नंतर कित्येक महिनेपर्यंत नुसतें उदक पिऊन त्यानें निर्वाह केला; आणि शेवटीं तो केवळ वायुभक्षण करून राहिला. त्या प्रभावशाली राजर्षीनें, उन्हाळ्यांत चहूंकडे अग्नि पेटलेला आहे व मस्तकावर सूर्य तपत आहे अशा रीतीनें पचाग्निसाधन चालवावें; पावसाळ्यांत पर्जन्यामध्यें बसून वृष्टिवेग सहन करावा; हिंवाळ्यांत गळ्याइतक्या पाण्यांत बसून रहावें व प्रतिदिवशीं भूमीवर शयन करावें; असा क्रम ठेविला आणि ह्याप्रमाणें दृढनिग्रहानें तपश्चर्या करून व प्राणायामाचा अभ्यास करून प्राणवायु स्वाधीन करून घेतला. अशा क्रमानें तपश्चर्या हळू हळू सिद्ध झाली, तेव्हां त्याचीं सर्व कर्मे क्षीण होऊन अंतःकरण निर्मळ झालें; व कामक्रोधादि षड्रिपूंच्या शक्ति नष्ट होऊन वासनारूपी बंधनें तुटून गेलीं. पुढें त्यानें ज्ञानसंपन्न सनत्कुमार मुनींनीं उपदेशिलेल्या अध्यात्मज्ञानाच्या पद्धतीनें, सर्वांतर्यामी, परमेश्वराची आराधना करण्याचा क्रम आरंभिला. ह्याप्रमाणें पृथूनें आत्मसाधन केलें, तेव्हां त्याच्या अंतरीं परमेश्वराविषयीं एकनिष्ठ भक्ति उत्पन्न झाली; पुढें त्याला वैराग्य उत्पन्न होऊन त्या द्वारें ज्ञान प्राप्त झालें; आणि नंतर त्यानें त्या ज्ञानरूप तीक्ष्ण खड्गानें अहंकाररूप हृदयग्रंथि तोडून टाकिला. विदुरा, हा अहंकारच भवबंधनाचें मुख्य कारण होय. हा इतका प्रबळ आहे कीं, योगमार्गाचें अनुष्ठान करीत असतांनाही हा केव्हां केव्हां विघ्नें उत्पन्न करितो व त्या योग्याला पुनः आत्मसाधनापासून खालीं आणितो. विदुरा, पृथु राजाचें तीव्र तप चालू असतां त्यासही अष्टविध सिद्धि प्राप्त झाल्या; पण त्याला त्यांच्या फळांच्या ठिकाणीं आसक्ति उत्पन्न झाली नाहीं. ह्यांच्याविषयीं अहंकार उद्भवल्यास आपलें सर्व तप व्यर्थ होईल ह्याविषयीं तो नेहमीं सावध असे, व भगवत्कथांविषयीं प्रेम धारण करून ऐहिक सुखांस तुच्छ मानी. असो. विदुरा, अशा प्रकारें उग्र तपश्चर्या चालवून पृथु राजानें जीवाचें आत्म्याच्या स्वरूपीं ऐक्य केलें, व पूर्णब्रह्मरूपता प्राप्त झाल्यानंतर शरिराचा त्याग केला. विदुरा, त्या महाभाग्यवान

**पृथूनें देहत्याग कसा केला**

तें तुला सांगतोः त्यानें आपल्या टाचांनीं गुदद्वार बंद केलें, व मूलाधारचक्रावरून वायु हळू हळू वर चढवीत नाभिप्रदेशीं आणून ठेविला; नंतर तेथून पुनः क्रमानें हृदय, ऊर आणि कंठ ह्या ठिकाणीं चढवीत चढवीत ललाटीं आणिला; आणि शेवटीं त्या स्थानाहून क्रमानें वर सरकावून ब्रम्हरंध्रीं निविष्ट केला. विदुरा, पृथूला कोणत्याही प्रकारची इच्छा राहिली नव्हती. त्यानें शरीर उत्पन्न करणाऱ्या पंचभूतांचा समष्टिशरिरांत विलय केला. तो प्रकार असाः त्यानें आपल्या प्राणवायूचें महावायूशीं ऐक्य केलें; शरिरांतील पृथ्वीचे भाग पृथ्वींत मिळविले; तेज तेजाशीं जोडलें; इंद्रियांचे पोकळ अवकाश आकाशांत मिळविले; आणि रक्तरेतादिकांपैकीं द्रवांश उदकांत मिसळले. अशा रीतीनें त्यानें जें ज्यापासून उत्पन्न झालें तें त्याच्या ठिकाणीं समाविष्ट केलें. नंतर त्यानें पंचमहाभूतांचाही लय केलाः पृथ्वीतत्त्वाचा उदकतत्त्वांत; उदकतत्त्वाचा तेजतत्त्वांत; तेजतत्त्वाचा वायुतत्त्वांत; आणि वायुतत्त्वाचा आकाशांत विलय केला. पुढें त्यानें देवतांसह मनाचा इंद्रियांमध्यें लय केला. त्या इंद्रियांचाही, ज्यांची वृत्ति ज्या सूक्ष्मभूतावर चालते, त्या त्या सूक्ष्मभूतांत लय केला. नंतर त्यानें आकाश आणि हीं सूक्ष्मभूतें ह्यांचा, सर्व भूतांचें आदिकारण जो अहंकार त्या अहंकारात विलय केला; आणि त्या अहंकाराचाही महत्तत्त्वाशीं संयोग करून, त्या महत्तत्त्वाचें ऐक्य, मायोपाधि-

प्रधान जो जीव त्या जीवाच्या ठिकाणीं केलें; आणि नंतर, ज्ञान आणि वैराग्य ह्यांच्या योगानें स्वस्वरूपीं स्थिर झालेल्या त्या समर्थ पृथूनें तो मायोपाधि जीवही सोडून दिला व शेवटीं आपण परब्रह्मरूप बनला. त्याची पत्नी महाराणी अर्चि ही त्याजबरोबर वनांत आली होती, हें मीं तुला सांगितलेंच आहे. जिचें पाऊल कधींही पृथ्वीला लागलें नव्हतें, त्या भाग्यशाली आणि सुकुमार स्त्रीनें आपल्या पतीबरोबर निष्ठापूर्वक व्रतांचें आचरण केलें: ती पतीची सेवा करून कंद, मुळें व फळें खाऊन आपला निर्वाह करी; आणि इतकें दुःख व कष्ट तिला सोसावे लागत असत, तरी पतिसेवा घडत आहे ह्यांतच तिला अत्यंत आनंद वाटे. असो. विदुरा, आपल्या पतीच्या शरीरांतील सर्व चेतना नष्ट झाल्या असें त्या साध्वीला आढळलें, तेव्हां तिला अत्यंत दुःख झालें. नंतर तिनें तेथेंच पर्वताच्या शिखरावर चिता तयार केली आणि त्यावर तें प्रेत ठेविलें. पुढें तिनें स्नान करून, ज्यानें पृथ्वीवर अनेक सत्कर्में करून पुरुषार्थ गाजविला व अंतीं सद्गति मिळविली, त्या आपल्या पतीला उदक दिलें, व देवांना नमस्कार करून त्या चितेभोंवतीं तीन प्रदक्षिणा घातल्या; आणि पतीच्या चरणांचें ध्यान करीत करीत अग्नीमध्यें प्रवेश केला ! तेव्हां स्वर्गांत देवांनीं व देवस्त्रियांनीं त्या महासाध्वी अर्चीनें सहगमन केलेलें पाहून तिची स्तुति केली, व पुष्पांचा वर्षाव केला. त्या कालीं देवस्त्रिया म्हणाल्या, “ अहो, ही अत्यंत धन्य होय ! हिनें आपल्या पतीची निस्सीम सेवा केली. अशी सेवा इतर कोणत्याही स्त्रीच्या हातून होणार नाहीं. ही पहा आम्हांला खालीं टाकून आपल्या पतीच्या मागून अत्युच्च अशा विष्णुपदास जात आहे ! अहो, ही भगवत्पदास जात आहे हें आम्हीं नुसतें पहावें मात्र. तें स्थान मिळविण्याची आम्हांस योग्यता नाहीं. अहो, मनुष्याचें आयुष्य किती क्षणभंगुर आहे ? असें असतांही भगवत्पदाची प्राप्ति करून देऊन कर्माचा नाश करणारें ज्ञान तीं संपादन करितात, तेव्हां त्यांस दुर्लभ असें काय आहे बरें? मनुष्यजन्म हें मोक्षप्राप्तीचें साधन आहे. अनेक योनींत फिरण्याचे कष्ट सोसावे, तेव्हां कोठें प्राण्याला हा दुर्लभ नरदेह प्राप्त होतो. ह्यास्तव, इतकें असूनही जो मनुष्य विषयसुखांत रमून राहतो, तो सर्वस्वीं फसतो व आत्मद्रोही बनतो, ह्यांत संदेह नाहीं. ”

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, अशा प्रकारें त्या देवस्त्रिया एकमेकांत बोलत आहेत, इतक्यांत ती महासाध्वी अर्चि, ज्या उच्च पदाला तिचा पति गेला होता, त्या पदास जाऊन पोहोंचली. असो. असें हें त्या महाप्रभावशाली भगवद्भक्त पृथूचें चरित्र मीं तुला सांगितलें. हें पुण्यप्रद चरित्र जो भक्तियुक्त अंतःकरणानें ऐकेल अथवा दुसऱ्यास ऐकवील, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होऊन अंतीं त्यास सद्गति मिळेल.

## अध्याय चोविसावा.

—:०:—

### प्रचेत्यांचें चरित्र.

( रुद्रगीतोपदेशापर्यंत. )

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, पृथूचा वडील पुत्र विजिताश्व हा त्याच्या मागें पृथ्वीचें राज्य करूं लागला. तो महापराक्रमी व कीर्तिमान होता. त्याचें आपल्या धाकट्या भावांवर अकृत्रिम प्रेम होतें. त्यानें त्यांस चारही दिशांचीं राज्यें वांटून दिलीं;—हर्यक्षाला पूर्व दिशेचें, धूम्रकेशाला दक्षिण दिशेचें, वृकाला पश्चिम दिशेचें, आणि द्रविणाला उत्तर दिशेचें. इंद्रापासून विजिताश्वाला गुप्त होण्याची विद्या[१] प्राप्त झाली होती, व त्यामुळें त्याला

१ ही विद्या प्राप्त होण्याचें कारण—पृथूच्या अश्वमेधयज्ञाच्या वेळीं इंद्रानें अश्व हरण केला हें विजिताश्वाला माहीत असूनही त्यानें इंद्राचा वध केला नाहीं, हें होय.

अंतर्धान हें दुसरें नांव पडलें होतें. त्याला शिखंडिनी नांवाच्या भार्येपासून तीन पुत्र झाले. त्यांचीं नांवें पावक, पवमान आणि शुचि अशीं होतीं. हे मूळचे अग्नि होत. ह्यांना वसिष्ठाच्या शापामुळें मनुष्यजन्म प्राप्त झालें होतें. हे तिन्ही पुत्र योगमार्गाचें अवलंबन करून पुनः आपल्या पूर्वस्वरूपास गेले. विदुरा, अंतर्धानाला नभस्वती नांवाची दुसरी पत्नी होती. तिजपासून त्याला हविर्धान नांवाचा पुत्र झाला. अंतर्धानाला वाटत असे कीं, राजाची वृत्ति कठोर आणि निर्दयपणाची आहे; कारण त्याला प्रजाजनांकडून कर, दंड वगैरे घेऊन त्यांस पीडा देण्याचे प्रकार अवश्य करावे लागतात. म्हणून त्यानें ती वृत्ति सोडून देऊन पुष्कळ काळपर्यंत चालणारा यज्ञ करण्यास आरंभ केला. त्यांतही त्यानें सर्वांतर्यामी परमेश्वराची समाधीच्या योगानें आराधना करण्याचा क्रम चालविला, आणि त्या योगें आत्मज्ञान प्राप्त करून घेऊन सलोकता मुक्ति मिळविली. विदुरा, अंतर्धानास नभस्वती नामक द्वितीय भार्येपासून झालेला जो हविर्धान नामक पुत्र, त्याला त्याच्या हविर्धानी नामक पत्नीपासून बर्हिषद, गय, शुक्ल, कृष्ण, सत्य आणि जितव्रत असे सहा पुत्र झाले. बर्हिषद हा कर्मकांडामध्यें आणि योगाभ्यासामध्यें निष्णात होता. तो एकामागून एक असे सारखे यज्ञ करीत असे. त्या प्रत्येक यज्ञाकरितां तो वेगवेगळ्या ठिकाणीं मंडप घाली, व त्यामुळें यज्ञमंडपांतील पूर्वाभिमुख पसरलेल्या दर्भांनीं सर्व पृथ्वीतल आच्छादिलें होतें. त्यानें ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून शतद्रुति नामक समुद्राच्या कन्येशीं विवाह केला. ती वयानें लहान पण अत्यंत सुंदर असून, अमोलिक वस्त्राभरणांच्या योगानें इतकी मोहक दिसत असे कीं, ती विवाहसमयीं अग्नीला प्रदक्षिणा घालीत असतां तिच्या सौंदर्याकडे पाहून अग्नीच्याही मनांत शुकीप्रमाणें कामवासना उत्पन्न झाली! ह्या नववधूच्या पायांतील नूपुरांचा मंजुळ ध्वनि ऐकून देव दैत्य, गंधर्व, सिद्ध, मनुष्य आणि सर्प ह्या सर्वांच्या चित्ताची चलबिचल होत असे. विदुरा, ह्या शतद्रुतीपासून बार्हिषदाला 'प्रचेते' ह्या नांवाचे दहा पुत्र झाले. जशीं त्या सर्वांचीं नांवें एकसारखीं होतीं, तसें त्यांचें आचरणही एकसारखेंच होतें. ते सर्व धर्मशास्त्रांत पारंगत होते. त्यांना प्रजा उत्पन्न करण्याविषयीं पित्यानें आज्ञा दिली असतांही ते तपश्चर्या करण्यासाठीं समुद्रांत शिरले; मध्यंतरीं त्यांना भगवान शंकरानें प्रसन्न होऊन दर्शन दिलें व उपदेश केला. त्याच उपदेशाचा निदिध्यास करीत त्यांनीं तेथें दहा हजार वर्षें उग्र तप केलें.

विदुर म्हणाला:—मुनिश्रेष्ठ, प्रचेत्यांना शंकराचें दर्शन कसें झालें, व त्यानें त्यांना काय उपदेश केला, हें ऐकण्याची मला फार इच्छा आहे. ऋषिवर्य, शंकराचें दर्शन होणें फारच दुर्लभ होय. मोठमोठे मुनि ज्याच्या दर्शनाच्या इच्छेनें सर्वसंगपरित्याग करून ध्यानस्थ बसतात, त्याचें माहात्म्य काय वर्णन करावें ? तो सतत आत्मस्वरूपीं रममाण असतो. स्वतांच्या रंजनासाठीं तो कांहींएक करीत नाहीं. केवळ, दुष्ट लोकांपासून जगाचें रक्षण करावें ह्या हेतूनें तो उग्र शक्ति धारण करून त्रैलोक्यांत भ्रमण करीत असतो.

---

१ पूर्वी सप्तर्षींचें सत्र चाललें असतां त्यांच्या पत्नीला पाहून अग्नीच्या मनांत कामवासना उत्पन्न झाली होती. त्या वेळीं अग्नीला अनीतिमार्गापासून परावृत्त करण्याकरितां त्याच्या स्वाहा नामक पत्नीनें स्वतांच ऋषिभार्येचें रूप घेऊन त्याजबरोबर क्रीडा केली. नंतर तिनें शुकीचें ( पोपटाच्या मादीचें ) रूप घेऊन अग्नीचें रेत एका दर्भगुच्छामध्यें ठेविलें, आणि मूळचें स्वरूप धारण करून ती अग्नीजवळ येऊन बसली. अशी कथा आहे. पूर्वापरसंबंधावरून येथें शुकी शब्दाचा अर्थ ऋषिपत्नी असा समजावयाचा.

### प्रचेत्यांस शंकराचें दर्शन.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ते प्रचेते पित्याची आज्ञा घेऊन तपश्चर्या करण्याविषयींच्या निश्चयानें पश्चिमेकडे निघाले, तों समुद्राच्या अलीकडेच एक विस्तीर्ण सरोवर त्यांच्या दृष्टीस पडलें. त्या सरोवरांतील उदक साधूंच्या अंतःकरणाप्रमाणें निर्मळ होतें. त्यांत निळ्या व तांबड्या रंगाचीं, रात्रीं, दिवसा आणि प्रदोषकाळीं फुलणारीं असंख्य कमलें होतीं; त्या जलाशयांतील मत्स्यादिक प्राणी शांत व प्रसन्न होते; हंसचक्रवाकादि पक्षी तेथें आनंदानें संचार करीत असत; पुष्पांतील मकरंद पिऊन भृंगे आपल्या गुंजारवानें तें वन नादमय करीत; आणि कमलांतील पराग वाहून नेणारा वायु तेथें असणाऱ्या प्राण्यांच्या मनाला प्रोत्साहित करीत असे. अशा त्या सरोवराची शोभा पहात पहात व त्यापासून होणाऱ्या सुखाचा अनुभव घेत घेत प्रचेते इकडे तिकडे हिंडत आहेत, तों त्यांना त्या सरोवरांतून कांहीं मनोहर नाद ऐकूं येऊं लागला. हा नाद तालसुरावर चाललेल्या गायनाचा आहे असें पाहून त्यांना पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें, आणि ते तेथेंच उभे राहिले; इतक्यांत, ज्याच्याबरोबर अनेक पार्षदगण आहेत, असा भगवान शंकर सरोवराच्या बाहेर येत आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. नंतर त्या नीलकंठ त्रिनेत्राला पाहिल्याबरोबर त्या सर्व प्रचेत्यांनीं त्याला नमस्कार केला. तेव्हां आपल्या दर्शनापासून प्रचेत्यांना आनंद झाला आहे असें पाहून शंकरालाही संतोष वाटला, व त्या भक्तसंकटनिवारक प्रभूनें त्यांचें कल्याण व्हावें ह्या उद्देशानें त्यांना उपदेश केला.

### शंकराचा प्रचेत्यांना उपदेश.

शंकर म्हणाले:—प्रचेतेहो, तुमचें कल्याण असो. तुम्ही बर्हिषदाचे पुत्र असून काय हेतु धरून चालला आहां, हें मीं जाणलें आहे. तुम्हांवर अनुग्रह करावा ह्याकरितांच मीं तुम्हांस दर्शन दिलें. अहो, त्रिगुणात्मक प्रकृतीहून व जीवसंज्ञक पुरुषाहून श्रेष्ठ अशा त्या परमात्म्याचे भक्त मला फार प्रिय आहेत. अशा भक्तांची योग्यता मला फार मोठी वाटते. अहो, स्वधर्माचें निष्ठापूर्वक आचरण जो पुरुष शंभर जन्मपर्यंत सतत करितो, तो ब्रह्मदेवाच्या स्वरूपास पावतो व त्याहीपेक्षां पुण्यवान जो असेल तो माझ्या स्वरूपीं मिळतो; परंतु ज्याप्रमाणें मी व इतर देव ह्यांना अंतीं वैष्णवपद प्राप्त होतें, त्याप्रमाणें भगवद्भक्तांना एका जन्मींच वैष्णवपद प्राप्त होतें. आतां तुम्हांला मी एक अत्यंत गुप्त असा उपदेश करितों. त्याचा तुम्ही निष्ठापूर्वक जप करा; म्हणजे तुमचें कल्याण होईल.

## श्रीशंकरांनीं प्रचेत्यांना उपदेशिलेलें रुद्रगीत.

## ( भगवन्नमन. )

श्रीशंकर म्हणाले:—

जितं त आत्मविद्वर्य स्वस्तये स्वस्तिरस्तु मे ।
भवता राधसा राधं सर्वस्मा आत्मने नमः ॥
नमः पंकजनाभाय भूतसूक्ष्मेंद्रियात्मने ।
वासुदेवाय शांताय कूटस्थाय स्वरोचिषे ॥
संकर्षणाय सूक्ष्माय दुरंतायांतकाय च ।
नमो विश्वप्रबोधाय प्रद्युम्नायांतरात्मने ॥
नमो नमोऽनिरुद्धाय हृषीकेशेंद्रियात्मने ।

नमः परमहंसाय पूर्णाय निभृतात्मने ॥
स्वर्गापवर्गद्वाराय नित्यं शुचिषदे नमः ।
नमो हिरण्यवीर्याय चातुर्होत्राय तंतवे ॥
नम ऊर्ज इषे त्रय्याः पतये यज्ञरेतसे ।
तृप्तिदाय च जीवानां नमः सर्वरसात्मने ॥
सर्वसत्त्वात्मदेहाय विशेषाय स्थवीयसे ।
नमस्त्रैलोक्यपालाय सहओजोबलाय च ॥
अर्थलिंगाय नभसे नमोऽतर्बहिरात्मने ।
नमः पुण्याय लोकाय अमुष्मै भूरिवर्चसे ॥
प्रवृत्ताय निवृत्ताय पितृदेवाय कर्मणे ।
नमोऽधर्मविपाकाय मृत्यवे दुःखदाय च ॥
नमस्त आशिषामीष मनवे कारणात्मने ।
नमो धर्माय बृहते कृष्णायाकुंठमेधसे ।
पुरुषाय पुराणाय सांख्ययोगेश्वराय च ॥
शक्तित्रयसमेताय मीढुषेऽहंकृतात्मने ।
चेत आकूतिरूपाय नमो वाचो विभूतये ॥

( भगवत्स्वरूपवर्णन. )

दर्शनं नो दिदृक्षूणां देहि भागवतार्चितम् ।
रूपं प्रियतमं स्वानां सर्वेंद्रियगुणांजनम् ॥
स्निग्धप्रावृड्घनश्यामं सर्वसौंदर्यसंग्रहम् ।
चार्वायतचतुर्बाहु सुजातरुचिराननम् ॥
पद्मकोशपलाशाक्षं सुंदरभ्रु सुनासिकम् ।
सुद्विजं सुकपोलास्यं समकर्णविभूषणम् ॥
प्रीतिप्रहसितापांगमलकैरुपशोभितम् ।
लसत्पंकजकिंजल्कदुकूलं मृष्टकुंडलम् ॥
स्फुरत्किरीटवलयहारनूपुरमेखलम् ।
शंखचक्रगदापद्ममालामण्युत्तमर्धिमत् ॥
सिंहस्कंधत्विषो बिभ्रत्सौभगग्रीवकौस्तुभम् ।
श्रियाऽनपायिन्याक्षिप्तनिकषाश्मोरसोल्लसत् ॥
पूररेचकसंविग्नवलिवल्गुदलोदरम् ।
प्रतिसंक्रामयद्विश्वं नाभ्याऽऽवर्तगभीरया ॥
श्यामश्रोण्यधिरोचिष्णुदुकूलस्वर्णमेखलम् ।
समचार्वंघ्रिजंघोरुनिम्नजानुसुदर्शनम् ॥

( भगवत्प्रार्थना. )

पद्मा शरत्पद्मपलाशरोचिषा नखद्युभिर्नोऽऽतरघं विधुन्वता ।
प्रदर्शय स्वीयमपास्तसाध्वसं पदं गुरोमार्गगुरुस्तमोजुषाम् ॥

एतद्रूपमनुध्येयमात्मशुद्धिमभीप्सताम् ।
यद्भक्तियोगोऽभयदः स्वधर्ममनुतिष्ठताम् ॥
भवान्भक्तिमता लभ्यो दुर्लभः सर्वदेहिनाम् ।
स्वाराज्यस्याप्यभिमत एकांतेनात्मविद्गतिः ॥
तं दुराराध्यमाराध्य सतामपि दुरापया ।
एकांतभक्त्या को वांछेत्पादमूलं विना बहिः ॥
यत्र निर्विष्टमरणं कृतांतो नाभिमन्यते ।
विश्वं विध्वंसयन्वीर्यशौर्य विस्फूर्जितभ्रुवा ॥
क्षणार्धेनापि तुलये न स्वर्गं नापुनर्भवम् ।
भगवत्संगिसंगस्य मर्त्यानां किमुताशिषः ॥

अथानघांघ्रेस्तव कीर्तितीर्थयोरंतर्बहिः स्नानविधूतपाप्मनाम् ।
भूतेष्वनुक्रोशसुसत्त्वशीलिनां स्यात्संगमोऽनुग्रह एष नस्तव ॥
न यस्य चित्तं बहिरर्थविभ्रमं तमो गुहायां च विशुद्धमाविशत् ।
यद्भक्तियोगानुगृहीतमंजसा मुनिर्विचष्टे ननु तत्र ते गतिम् ॥

यत्रेदं व्यज्यते विश्वं विश्वस्मिन्नवभाति यत् ।
तत्त्वं ब्रह्म परं ज्योतिराकाशमिव विस्तृतम् ॥

यो माययेदं पुरुरूपयाऽसृजद्बिभर्ति भूयः क्षपयत्यविक्रियः ।
यद्भेदबुद्धिः सदिवात्मदुःस्थया तमात्मतंत्रं भगवन्प्रतीमहि ॥

क्रियाकलापैरिदमेव योगिनः श्रद्धान्विताः साधु यजंति सिद्धये ।
भूतेंद्रियांतःकरणोपलक्षितं वेदे च तंत्रे च त एव कोविदाः ॥
त्वमेक आद्यः पुरुषः सुप्तशक्तिस्तया रजःसत्त्वतमो विभिद्यते ।
महानहं खं मरुदग्निवार्धराः सुरर्षयो भूतगणा इदं यतः ॥
सृष्टं स्वशक्त्येदमनुप्रविष्टश्चतुर्विधं पुरमात्मांशकेन ।
अथोविदुस्तं पुरुषं संतमंतर्भुंक्ते हृषीकैर्मधु सारघं यः ॥
स एष लोकानतिचंडवेगो विकर्षसि त्वं खलु कालयानः ।
भूतानि भूतैरनुमेयतत्त्वो घनावलीर्वायुरिवाऽविषह्यः ॥
प्रमत्तमुच्चैरितिकृत्यचिंतया प्रवृद्धलोभं विषयेषु लालसम् ।
त्वमप्रमत्तः सहसाभिपद्यसे क्षुल्लेलिहानोऽहिरिवाखुमंतकः ॥
कस्त्वत्पदाब्जं विजहाति पंडितो यस्तेऽवमानव्ययमानकेतनः ।
विशंकयाऽस्मद्गुरुरर्चति स्म यद्विनोपपत्तिं मनवश्चतुर्दश ॥

अथ त्वमसि नो ब्रह्मन्परमात्मन्विपश्चिताम् ।
विश्वं रुद्रभयध्वस्तमकुतश्चिद्भया गतिः ॥

( भगवन्नमन )

'ईश्वरा, आत्मज्ञानी पुरुषांत श्रेष्ठ असे जे भगवद्भक्त, त्यांस स्वानंदसुखाची जोड करून देण्याकरितांच तूं आपला उत्कर्ष नेहमीं प्रकट करीत असतोस; ह्यास्तव तुझ्या कृपेनें मलाही आत्मसुखाची प्राप्ति होवो. हे सच्चिद्घना विश्वमूर्ते, माझा नमस्कार ग्रहण करावा. भगवंता, सर्वलोकमय जें कमळ, तें तुझ्या नाभीपासूनच उत्पन्न झालें; तेव्हां शब्दादि सूक्ष्म भूतें, आकाशादि महाभूतें आणि चक्षुरादि इंद्रियें—जीं ह्या अखिल सृष्टीचीं आदिकारण आहेत, त्यांचा आत्मा अर्थात् चालक तूंच आहेस; सदैव शांतिरूप, विकाररहित व स्वयंप्रकाश अशी चित्ताची देवता जी वासुदेव तेंही तुझेंच स्वरूप होय. तुला माझा नमस्कार असो. हे केशवा, अहंकारदेवतारूपानें असणारें जें तुझें संकर्षणस्वरूप, तें इंद्रियांना अगोचर आहे खरें; परंतु तें नाशरहित असून, आपल्या मुखामधील अग्नीच्या ज्वालांनीं त्रैलोक्य दग्ध करून टाकितें. तसेंच, अखिल प्राणिमात्रास विश्वाचा बोध होण्यास कारणीभूत असणारी जी बुद्धि, त्या बुद्धीची देवता प्रद्युम्न हें रूप सुद्धां तूंच धारण केलें आहेस; ईश्वरा, तुझ्या त्या स्वरूपांना मी नमस्कार करितों. हे परमात्मन्, सर्व विषयांचें ग्रहण करणाऱ्या इंद्रियांचा राजा जें मन, त्या मनाची अनिरुद्ध देवता तूंच होस; तुला मी वारंवार नमस्कार करितों. हे नारायणा, ज्या रूपाचे ठिकाणीं वृद्धि किंवा क्षय हे विकार नाहींत, त्या, सर्व जगाला व्यापून राहणाऱ्या तुज सूर्यरूपी परमेश्वरास माझे शतशः प्रणिपात असोत. हे विश्वात्मन्, तूं स्वर्ग आणि मोक्ष ह्यांच्या प्राप्तीचें साधन आहेस; ज्यांचें अंतःकरण निर्मळ असेल, त्या सत्पुरुषांच्या ठायीं तुझें निरंतर वास्तव्य असतें. देवा, तुला मी नमस्कार करितों. हे भगवंता, चातुर्होत्र कर्मांचा विस्तार करणारा व सुवर्णवीर्यानें युक्त असा जो अग्नि, तें तुझेंच रूप आहे. त्या तुझ्या रूपास माझा नमस्कार असो. हे परमेश्वरा, पितरांचें अन्न कव्य, देवांचें अन्न हव्य व यज्ञाचें रेत सोम हीं तुझींच स्वरूपें असल्यामुळें, सूर्य अग्नि व सोम हींही तुझींच रूपें होत. तेव्हां, भगवंता, त्या स्वरूपांच्या योगानें ज्या तुला वेदत्रयीचें आधिपत्य प्राप्त झालें आहे, त्या तुझ्या स्वरूपांस मी वंदन करितों. हे लोकपालका, ज्यापासून सर्व जीवांना तृप्ति होते, तें उदक हेंही तुझेंच स्वरूप होय. त्या तुझ्या रूपाला माझा नमस्कार असो. हे प्रभो, सर्व पृथ्वीमध्यें व प्राणिमात्राच्या देहामध्यें तूंच वास्तव्य करितोस; त्या तुज विराट्पुरुषाला मी नमस्कार करितों. हे गोविंदा, मनाला, देहाला व इंद्रियांना शक्ति देऊन प्राणरूपानें त्रैलोक्याचें पालन करणारा जो वायु, तें तुझेंच रूप होय. त्या तुज वायुरूपाला माझा नमस्कार असो. हे भगवंता, ज्याचा शब्द हा गुण असल्यामुळें सर्व पदार्थांचें ज्ञान होण्यास जो कारणीभूत आहे, आणि अवकाश हा गुण असल्यामुळें ज्याच्या योगानें अंतर्बाह्य व्यवहार चालतो, त्या तुज आकाशरूपी विराट्पुरुषाला मी नमस्कार करितों. हे त्रिविक्रमा, पुण्याचरणाच्या योगानें प्राप्त होणारा जो स्वर्गलोक तें तुझेंच स्वरूप होय; प्रवृत्ति आणि निवृत्ति ह्या मार्गांच्या आचरणानें प्राप्त होणारे जे पितृलोक व देवलोक, तींही तुझींच स्वरूपें आहेत; आणि अधर्माचरणाच्या योगानें दुःखदायक फलाची अर्थात् मृत्यूची प्राप्ति करून देणारें जें मृत्युस्वरूप, तें सुद्धां तुझेंच रूप होय; ईश्वरा, तुझ्या त्या स्वरूपांना मी वंदन करितों. हे पुरुषोत्तमा, तूं प्राण्यांना इच्छित वस्तु देऊन त्यांचे मनोरथ पूर्ण करतोस; तुला सर्व ज्ञान आहे; सांख्यशास्त्राचा प्रवर्तक व योगशास्त्राचा अधिपति पुराणपुरुष तूंच होस; आणि परमधर्मात्मक व निर्मळ ज्ञानवान जें कृष्णस्वरूप, तेंही तूंच आहेस.

माझे तुला अनंत नमस्कार असोत. हे अच्युता, साध्य ( कर्म ), साधन ( कारण ) व साधक ( कर्ता ) हीं ज्याचीं कार्यें, तो अहंकारवृत्ति रुद्रही तूंच होस; आणि ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति हीं ज्याचीं स्वरूपें व ज्यापासून परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी ह्या रूपांनीं वेदवाणाची उत्पत्ति झाली, तो ब्रह्मदेव देखील तूंच आहेस! तुला मी शतशः नमस्कार करितों.

( भगवत्स्वरूपवर्णन. )

'हे भगवंता, असें हें तुझें लोकोत्तर व अद्वितीय स्वरूप पाहण्याची आम्हांस अत्यंत उत्कंठा उत्पन्न झाली आहे; तर तूं आम्हांस दर्शन दे. हे देवाधिदेवा, तुझें रूप तुझ्या भक्तांना अतिशय प्रिय आहे. ते रात्रंदिवस तुझ्या रूपाच्या ध्यानमननांत निमग्न असतात. त्यांच्या सर्व इंद्रियांचे व्यापार तुझ्याव्यतिरिक्त अन्य विषयांत केव्हांही चालत नाहींत. हे परमेश्वरा, तुझें तें स्वरूप वर्षाऋतूंतील सजल मेघाप्रमाणें श्यामल असून सौंदर्याचें केवळ आगर आहे; त्यास चार बाहु असून ते सुंदर व दीर्घ आहेत; मुख सप्रमाण व मनोरम असून त्याच्या अवयवांत यत्किंचितही उणेपणा नाहीं;नेत्र हे कमलाच्या गर्भांतील पत्रांप्रमाणें आरक्त असून भ्रुकुटी रमणीय आहेत; दंतपंक्ति अगदीं शुभ्र असून नासिका सरळ आहे; गाल मुखाला शोभतील असे असून कानही सुबक आहेत; नेत्रकटाक्षांनीं सलील हास्याची छबी उत्पन्न होत असून कुरळ केसांचे योगानें अनुपम शोभा आलेली आहे; कटिभागीं कमलकेसरांप्रमाणें तेजस्वी असें दुकूलवस्त्र असून अंगावर भरजरी शालू झळकत आहे; कर्णांमध्यें कुंडलें तळपत असून, किरीट, कडीं, रत्नहार, नूपुरें, कमरपट्टा इत्यादि दिव्य अलंकार आपआपल्या स्थानीं विलसत आहेत; हातांत शंख, चक्र, गदा व कमल असून कंठाचे ठिकाणीं वैजयंती व कौस्तुभ मणि आहे; तुझे स्कंध सिंहस्कंधांसारखे विशाल असून त्यांवर कुंडलादिकांची प्रभा पडली आहे. वक्षस्थलावर अखंड असें श्रीवत्सचिन्ह असल्यामुळें, सोनें कसाला लावून पहावयाच्या काळ्या दगडावर सुवर्णरेषा उमटली असतां तो जसा शोभतो, तसें तें श्यामल वक्षस्थल शोभत आहे; उदरावरील तीन वळ्या श्वासोच्छ्वासाच्या योगानें हालत असल्यामुळें ती एक अनुपम शोभा दिसत आहे; तुझ्या उदराचे ठिकाणीं जें नाभिस्थान आहे, तें उदकांतील भोंवऱ्याप्रमाणें गंभीर आहे; त्या योगानें, त्या नाभीपासून उत्पन्न झालेल्या जगतास तें परत बोलावीत आहे कीं काय, असें वाटतें; श्यामल कटिप्रदेशावर धारण केलेल्या पीतांबरावरील कमरपट्ट्याच्या योगानें त्या स्वरूपास फार शोभा आलेली आहे; शरीरमानाला अनुसरूनच पाय, पोटऱ्या व मांड्या असून गुडघे अगदीं सखल असल्यामुळें, तुझ्या स्वरूपावरून दृष्टि हालवूं नयेसें वाटतें.

( भगवत्प्रार्थना. )

'भगवंता, तूं सर्वांचा गुरु आहेस. तुझ्या चरणांच्या नखप्रभेचा असा अद्वितीय प्रताप आहे कीं, तिच्या योगानें अज्ञानरूप तिमिराचा तात्काळ नाश होतो. ह्यास्तव तूं आपल्या शरत्कालीन कमलाप्रमाणें शोभणाऱ्या चरणांचें दर्शन दे, म्हणजे आमचें सर्व भय दूर होईल. हे देवाधिदेवा, आत्मशुद्धीची इच्छा करणारे पुरुष तुझ्या त्या स्वरूपाचें अखंड ध्यान करितात व स्वधर्मनिष्ठ लोकांनीं तुझ्या ह्या स्वरूपाची अनन्यभावें भक्ति केली असतां त्यांना निःसंशय मोक्षप्राप्ति होते. हे विश्वभावना, प्राण्यांना तुझ्या स्वरूपाचें दर्शन होणें दुर्घट आहे; पण तुझ्या भक्तांना तुझी प्राप्ति झाल्याविना रहात नाहीं. स्वर्गाधिपति जो इंद्र, त्याला देखील तूं प्रिय आहेस; आणि आत्मज्ञानवेत्त्या पुरुषांना तर जी गति मिळते, ती तुझ्याच ठिकाणीं. हे भगवंता, तुझ्या ठिकाणीं अचल भक्ति जडणें हें साधूंना सुद्धां दुर्मिळ आहे; तेव्हां

एखाद्याच्या हातून जर तशी भक्ति घडली, तर तो तुझ्या चरणसेवेशिवाय दुसऱ्या कशाची तरी इच्छा करील का ? हे विश्वाधिपते, तुझें सामर्थ्य काय वर्णावें ? ज्यानें नुसती भुंवई वांकडी केली असतां विश्वाचा नाश होतो, तो परमशक्तिमान मृत्यु, ज्यांनीं तुझ्या चरणांचा आश्रय केला आहे त्यांवर कधींही अंमल चालवूं शकत नाहीं. 'वाटेल तेव्हां आपण ह्याचा नाश करूं' हा त्या मृत्यूचा अभिमान तुझ्या भक्तांपुढें अगदींच लटका पडतो ! हे दीनवत्सला, तुझ्या भक्तांचा समागम क्षणभर जरी झाला, तरी त्याची योग्यता फार मोठी आहे. त्याची बरोबरी स्वर्गाच्यानें देखील करवणार नाहीं; इतकेंच नव्हे, तर मोक्ष सुद्धां त्याच्या तुलनेला उणाच पडेल; तेव्हां नश्वर अशीं जीं मनुष्यांचीं राज्यादिक ऐश्वर्यें, त्यांची त्यापुढें कितीशी मातबरी ? म्हणून, हे भगवंता, आम्हांस नेहमीं साधुसमागम दे. हे ईश्वरा, पापाचा नाश करणाऱ्या ज्या तुझ्या चरणांपासून पवित्र अशी भागीरथी उत्पन्न झाली, त्या चरणांचें साधु नेहमीं वर्णन करीत असून त्या पवित्र भागीरथीच्या उदकांत ते स्नान करितात; आणि ह्यामुळें त्यांचीं अंतःकरणें व शरीरें निर्मळ होऊन दया, क्षमा, शांति हे गुण त्यांच्या ठायीं ओतप्रोत वास करितात. हे जगदीशा, अशा ह्या समदृष्टि पुरुषांच्या समागमानें मनुष्याच्या अंतःकरणांत भक्ति उत्पन्न होते, आणि मग त्याचें मन शुद्ध होऊन, तें बाह्य विषयाकडे धाव घेत नाहीं. देवा, अशा रीतीनें भक्तियोग पूर्ण झाला, म्हणजे मनुष्याला तुझ्या पूर्णस्वरूपाचें दर्शन घडतें. हे विश्वमूर्ते, तुझ्या ह्या स्वरूपांत हें अखिल विश्व स्पष्ट दिसत असून, त्या स्वयंप्रकाश व सर्वव्यापी स्वरूपाचा ह्या सृष्टीमध्यें विभुत्वानें भास होतो. हे आदिपुरुषा, अनेक रूपें धारण करून लोकांच्या बुद्धीला भ्रम उत्पन्न करणारी जी माया, त्या मायेचें सामर्थ्य तुझ्या परमात्मस्वरूपीं मुळींच चालत नाहीं. तूं हें विश्व उत्पन्न करून अगदीं खऱ्याप्रमाणें भासवितोस; ह्याचें पालन करणारा व शेवटीं लय करणारा तरी तूंच आहेस; आणि इतकें असूनही तूं अगदीं निर्विकार व शांत आहेस; तेव्हां अशा त्या सर्वसामर्थ्यवान आणि षड्गुणैश्वर्यसंपन्न तुज परमेश्वराला आम्ही शरण आहों. हे जगन्नियंत्या, इंद्रियें, भूतें व अंतःकरण ह्यांचा प्रवर्तक तूंच आहेस, हें ओळखून जे तुझ्या ठिकाणीं श्रद्धा ठेवितात, व तुझ्याच चरणांचें सेवन किंवा पूजन करितात, ते पुरुष वेदोक्त व तंत्रोक्त कर्में करण्यांत निपुण होत. हे परमेश्वरा, विश्वोत्पत्तीच्या पूर्वीं तुज आदिपुरुषाची मायाशक्ति निद्रित असते, तेव्हां तूं एकच असतोस. नंतर सृष्टीच्या आरंभीं ती तुझी मायाशक्ति जागृत होऊन सत्त्व, रज व तम असे तिचे तीन विभाग होतात; आणि त्यांपासून महत्तत्त्व, अहंकार, पंचमहाभूतें, देव, पितर, भूतगण इत्यादिकांनीं युक्त असलेलें हें विश्व उत्पन्न होतें. अशा प्रकारें तुझ्या मायेपासूनच उत्पन्न झालेल्या जरायुज, स्वेदज, अंडज व उद्भिज्ज अशा चतुर्विध जीवांचे ठायीं जीव आणि आत्मा ह्या दोन रूपांनीं जो तूं प्रविष्ट होतोस, त्या तुला 'पुरुष' अशी संज्ञा आहे. त्यांमध्यें, मधाप्रमाणें तुच्छ असलेल्या विषयांचे ठिकाणीं जो आसक्त होतो, तो जीव; आणि जो सर्वज्ञ व अभोक्ता आहे, तो भगवान आत्मा होय. अशा प्रकारें सृष्टीची उत्पत्ति करून तिजमध्यें प्रवेश करणारा जो तूं, तो, ज्याप्रमाणें वायु मेघांना अस्ताव्यस्त करून त्यांचा लय करितो, त्याप्रमाणें स्थावरजंगमात्मक सर्व भूतांचा लय करितोस. परमेश्वरा, तुझें सामर्थ्य इतकें अपार आहे कीं, त्याचा अंतच लागत नाहीं; त्याचप्रमाणें, तुझ्या स्वरूपाचें ज्ञानही केवळ अनुमानानेंच प्राप्त करून घ्यावें लागतें. भगवंता, विषयांचे ठिकाणीं आसक्ति ठेवणाऱ्या, व सदोदीत कांहीं ना कांहीं तरी विकारांत

मग्न असणाऱ्या असावध जीवांवर, कालरूपी जो तूं, तो, भुकेलेला साप उंदरावर झडप घालतो त्याप्रमाणें झडप घालून त्यांचा नाश करितोस. हे प्रभो, ह्याचकरितां ब्रह्मदेव व चौदा मनु ह्यांनीं कालाचें भय दूर व्हावें म्हणून तुझ्या चरणांचें श्रद्धापूर्वक पूजन केलें. हे अनंता, जो तुझा अनादर करितो, त्याचा कालाच्या भयानें थरकांप होत असतो; तेव्हां ज्याला हें सर्व ज्ञान आहे, तो मनुष्य तुझ्या चरणसेवेपासून विन्मुख कशाला होईल बरें? हे भगवंता, कालाच्या व रुद्राच्या भयानें हें सर्व जग ग्रस्त झालेलें आहे. ह्याजकरितां, हे परमात्मन्, तुझें चरणकमल हेंच स्थान निर्भय होय, असें जाणून आम्ही तुला शरण आलों आहों.'

श्रीशंकर म्हणतातः—राजपुत्रहो, शुद्ध अंतःकरणानें तुम्ही ह्या स्तोत्राचा जप करीत जा, व स्वधर्माचरण करून भगवत्स्वरूपीं चित्त लावा, म्हणजे तुमचें कल्याण होईल. प्रचेतेहो, जो भगवान श्रीहरि तुमच्या व सर्व प्राणिमात्राच्या अंतरीं वास करितो, त्याचेंच ध्यान, स्तवन व पूजन करणें अत्यंत अवश्य आहे. मीं जें स्तोत्र आतां उपदेशिलें, त्या 'योगादेश' स्तोत्राचें तुम्हीं पठण करून शांत अंतःकरणानें रहा. राजपुत्रहो, पूर्वी ब्रह्मदेवानें आम्हांस निर्माण करून सृष्टि करण्याची आज्ञा दिली, त्या वेळीं ह्या स्तोत्राचाच त्यानें आम्हांस उपदेश केला, ह्याच स्तोत्राच्या निदिध्यासानें आमचें सर्व अज्ञान नष्ट झालें, व आम्हीं आपलीं उद्दिष्ट कार्यें सिद्धीस नेलीं. राजपुत्रांनो, जो पुरुष 'परमेश्वरच आपला आधार आहे' अशी भावना ठेवून एकाग्र अंतःकरणानें ह्या स्तोत्राचा जप करीत जाईल, त्याचे सर्व अर्थ साध्य होतील. अहो, ह्या लोकीं सर्व फलांमध्यें ज्ञान हेंच उत्तम फल आहे; कारण त्या ज्ञानाच्या योगानें मनुष्य हा भवसागर तरून जाऊन भगवत्स्वरूप होतो. राजपुत्रहो, जो ह्या स्तोत्राचा जप नित्य शुद्ध अंतःकरणानें करील, तो निःसंशय श्रीहरिपदाप्रत प्राप्त होईल, आणि त्याचें इच्छित फल त्यास मिळेल. जो पुरुष पहांटेस उठून शुचिर्भूत होत्साता श्रद्धायुक्त अंतःकरणानें ह्याचा पाठ करील, तो सर्व भवबंधनापासून मुक्त होईल. राजपुत्रहो, मीं उपदेशिलेल्या ह्या स्तोत्राचा जप करीत तुम्ही तपाचरण करा, म्हणजे तुमचे सर्व मनोरथ पूर्ण होतील.

## अध्याय पंचविसावा.

--:०:--

### बर्हिषदास नारदांचा उपदेश.

मैत्रेय ऋषि म्हणाले:—विदुरा, प्रचेत्यांना भगवान शंकरानें ह्याप्रमाणें परमात्म्याच्या स्तोत्राचा उपदेश केल्यावर त्यांनीं शंकराची पूजा केली; आणि नंतर तो शंकर त्या राजपुत्रांच्या देखत गुप्त झाला. नंतर शंकरानें उपदेशिलेल्या स्तोत्राचा जप करीत दहा सहस्र वर्षेंपर्यंत उदकांत उभें राहून सर्व प्रचेत्यांनीं तपश्चर्या केली. इकडे प्राचीनबर्हि[1] राजाची यज्ञयागादिक कर्मांवरील आसक्ति अद्याप दृढ आहे असें पाहून, दयाळू नारद ऋषींनीं त्यास ब्रह्मज्ञानाचा बोध केला.

नारद मुनि म्हणाले, "राजा तूं जीं कर्में करीत आहेस, त्यांचा हेतु काय बरें? ह्या संसारांत प्राप्त होणारीं दुःखें नष्ट व्हावीं व अनेक सुखें उपभोगण्यास सांपडावीं, हाच काय? राजा, हा जर तुझा हेतु असेल, तर तुजकडून मोठा प्रमाद होत आहे हें लक्षांत आण. सामान्य पुरुषांना दुःखनाश व सुखप्राप्ति हींच फलें महत्त्वाचीं वाटून ते काम्यकर्मे करितात हें खरें; परंतु तुझ्यासारख्या विचारी पुरुषानें हीं दोन्ही फलें श्रेयस्कर नाहींत हें मनांत आणिलें पाहिजे." नारद ऋषींचें भाषण ऐकून राजा म्हणाला, "भगवन्, मी

१ मागें जो बर्हिषद नांवाचा राजा सांगितला, त्यासच हें दुसरें नांव होतें.

नित्य कर्मांत निमग्न असल्यामुळें माझी बुद्धि एकदेशीय होऊन, खरें कल्याण कशांत आहे हें मला समजेनासें झालें आहे; ह्याकरितां, महाराज, ज्या निर्मल ज्ञानाच्या योगानें कर्मापासून होणाऱ्या पापपुण्यांतून मी मुक्त होईन, असें ज्ञान मला कृपा करून सांगावें. मुने, स्त्री, पुत्र व वित्त हेच पुरुषार्थ मानून पुष्कळ लोक ह्या संसारांत बरीं वाईट कर्में करण्यास प्रवृत्त होतात, व त्यांतच त्यांस अभिमान वाटून, मनुष्याचें वास्तविक पर्यवसान कशांत झालें पाहिजे ह्याचें त्यांस भान रहात नाहीं." तेव्हां नारद मुनि म्हणाले, "राजा, तूं यज्ञांत मारविलेले हे हजारों पशु व अन्य प्रकारें निर्दयपणानें मारलेले हे इतर प्राण्यांचे हजारों कळप पहा. [ इतकें बोलून नारदांनीं योगसामर्थ्यानें हजारों पशु पक्षी राजास आकाशांत दाखविले. ] राजा, हे सर्व तुझ्या मरणाची वाट पहात आहेत. ह्यांस तूं जी पीडा केली आहेस, ती हे रात्रंदिवस स्मरत असून तूं मेलास म्हणजे हे आपल्या भाल्यासारख्या तीक्ष्ण अशा शृंगें, चंचु इत्यादि अवयवांनीं मोठ्या त्वेषानें तुला तात्काळ छिन्नविच्छिन्न करून टाकतील.आतां तुला मी पुरंजनाचें चरित्ररूप प्राचीन कथानक सांगतों, त्याचें तूं एकाग्र चित्तानें मनन कर. म्हणजे अशा प्रसंगीं काय करावें ह्याचें तुला चांगलें ज्ञान होईल.

## पुरंजनाचें चरित्र.

नारद म्हणतातः—बर्हिषदा, पुरंजन नांवाचा एक अतिविख्यात राजा होता. त्याचा अविज्ञात नांवाचा एक मित्र होता. ह्या अविज्ञाताचें कोणतेंही कृत्य कोणास कळत नसे. पुरंजन राजास उत्तम स्थळांची मोठी आवड असे. आपणास राहण्यास उत्तम स्थल मिळावें म्हणून त्यानें पुष्कळ शोध केला; परंतु त्याच्या मनाप्रमाणें त्यास स्थल मिळेना. त्यानें भूतलावरील अनेक स्थलें सूक्ष्म रीतीनें स्वतः अवलोकन केलीं; परंतु आपल्या सर्व इच्छा ज्या ठिकाणीं परिपूर्ण होतील असें एकही स्थल त्यास आढळलें नाहीं. तेव्हां त्याच्या मनास फारच उद्विग्नता आली. तथापि त्यानें प्रयत्न सोडला नाहीं. अखेरीस हिमाचलाच्या दक्षिण भागीं भरतखंडांत त्याला एक नगरी आढळली; त्या नगरीला नऊ वेशी असून भोंवतालीं तट व बागा होत्या. जागोजाग उंच उंच गोपुरें केलेलीं होतीं. सभोंवतीं विस्तृत खंदक असून कित्येक स्थलीं गवाक्षें व सुंदर कमानी होत्या. त्या नगरींतील वाड्यांचा बाह्य देखावाही तसाच रमणीय होता. त्या वाड्यांचे एथून तेथून लागलेले कळस कित्येक सुवर्णाचे, कित्येक रजताचे व कित्येक लोहाचे असून आंतील व बाहेरील दृश्य भूमिभाग इंद्रनील, स्फटिक वैदूर्य, मोतीं, पाच, माणिक इत्यादि देदीप्यमान रत्नांनीं लकलकत असल्यामुळें चित्तास आकर्षण करणारी प्रभा आसमंतात् फांकली होती, व त्यामुळें ही नागांची भोगावती नगरीच आहे कीं काय, असा भास होत होता! राजा, त्या पुरीची अंतस्थ रचना फारच मनोवेधक असून तींतून बाह्य प्रदेशांचा व बाह्य विषयांचा अनायासें उपभोग घेण्याच्या उत्तम सोई करून ठेविलेल्या होत्या. तेथें जागोजाग मंडळी बसण्यास ओटे केले होते. मधून मधून रस्ते एकत्र मिळवून चौक बनविले होते. तेथील मार्ग मोठे प्रशस्त असून नजीकच खेळण्याच्या जागा केल्या होत्या. बाजारची व्यवस्था उत्तम केलेली असून चैनी लोकांकरितां सुंदर विश्रांतिमंदिरें ठिकठिकाणीं बांधिलीं होतीं. सर्वत्र ध्वजपताका फडकत असून अनेक ठिकाणीं विद्रुम-भूमिकाही तयार केल्या होत्या! त्या पुरीच्या बाहेरील देखावा तर काय वर्णन करावा! तेथें एक मनोहर उपवन होतें. त्यामध्यें अनेक उत्तमोत्तम वृक्ष व वेली लागून गेल्या होत्या. त्यांवर कोकिल पक्षी सुस्वर गायन करीत असत. तेथें कांहीं पुष्करिणी होत्या, त्यांमध्यें भ्रमर हे कमलांतील मकरंद सेवन करण्यांत व गुंजारव करण्यांत गुंग झाले होते.राजा, वसंत ऋतूंतील वारा थंडगार झऱ्यावरून वाहत

आल्यामुळें त्यांत मिसळलेले पाण्याचे तुषार फारच सुखकारक असत. झुळझुळ वाहणाऱ्या वाऱ्याच्या योगानें वृक्ष, वेली व कमलिनी डोलत असून सर्वत्र टवटवी दिसत होती. तेथें हरणें, ससे वगैरे अनेक वन्य पशु खुशाल रहात होते. त्यांपासून कोणास कधींही इजा होत नसे. हा सर्व प्रकार पाहून तो बाग पहाण्याविषयीं स्वभावतांच इच्छा उत्पन्न होई. त्या उद्यानांतील कोकिलांचा मधुर शब्द श्रवण करून त्या मार्गानें जाणारास तें उद्यान पाहण्याविषयीं इतकी उत्कंठा उत्पन्न होई कीं, कोकिलांचा शब्द म्हणजे वनश्रीचा उपभोग घेण्याचें आमंत्रणच आहे, असें त्यास वाटे.

हे प्राचीनबर्हि राजा, अशा त्या उपवनामध्यें पुरंजन राजानें, कर्मधर्मसंयोगानें प्राप्त झालेली एक रूपवती तरुण स्त्री पाहिली. तिच्या तैनातींत दहा ( कारभाऱ्यासुद्धां अकरा ) मुख्य हुजऱ्ये असून, त्यांपैकीं प्रत्येकाच्या ताब्यांत शेंकडों खालच्या प्रतीचे नोकर, पडेल तें काम करण्यास तयार होते. केवळ तिच्या रक्षणाकरितां म्हणून तिच्या बरोबर एक पांच फणांचा सर्प असून त्यानें तिला चोहोंकडून गराडा दिला होता. तिच्या मुद्रेवरून, ती आपणास अनुरूप वर मिळविण्याच्या प्रयत्नांत आहे असें भासत होतें. राजा, त्या लोकोत्तर सुंदरीच्या तारुण्यास नुकताच आरंभ झाला होता. तिच्या शरिराचा बांधा व हस्तपादादिक अवयवांची ठेवण फारच हृदयंगम होती. नासिका अगदीं सरळ व तरतरीत, दंत शुभ्र व सतेज, गाल पुष्ट व आरक्त, मुखचंद्र अत्यंत प्रसन्न व मोहक, आणि कर्ण अतिशय सुप्रमाण व यथायोग्य असून नानाप्रकारच्या कर्णभूषणांनीं युक्त होते. कमर फार बारीक असून देहाचा वर्ण कांहींसा काळासांवळा होता. ती पिवळी पैठणी नेसली असून वरून कमरपट्टा होता, आणि पायांत तोरड्या असून त्यांचा फार मंजुळ शब्द होत असे; ह्यामुळें, ती चालूं लागली म्हणजे देवांगनेचा भास होई. राजा, त्या स्त्रीचे पयोधर वर्तुलाकार व अगदीं जवळ जवळ असून तारुण्याचा नुकताच प्रारंभ झाला आहे असें सुचवीत होते. तिचीं पावलें मोठ्या बेतानें व डौलानें पडत असून तिच्या ठिकाणीं लज्जेचा उद्गम झाला होता; व ह्यामुळें, वक्षस्थलावरील पदर वारंवार सावरून उत्तुंग स्तनांस झांकण्याचा ती प्रयत्न करीत होती. राजा, अशा प्रकारें ती युवती त्या उपवनांत अनुरूप भर्त्याच्या शोधांत फिरत असतां तिची पुरंजन राजावर दृष्टि गेली, व तिनें त्यावर प्रेमभरित अंतःकरणानें असा कटाक्षबाण फेंकिला कीं, तो वीर लाजल्यासारखें करून मंदहास्य करणाऱ्या त्या प्रमदेला पाहून तात्काळ विव्हल झाला.

तेव्हां पुरंजन तिला म्हणतो:—हे कमलनयने, तूं कोण? कोणाची कन्या? आलीस कोठून? सुंदरी, तुझा ह्या ठिकाणीं येण्याचा हेतु कोणता? तुझ्या बरोबर जे हे दहा परिचारक व त्यांवर एक नायक असे अकराजण आहेत, ते कोण? तुझ्याबरोबर कांहीं स्त्रियाही दिसत आहेत, त्या कोण? बरें, तुझ्यापुढें सर्प चालत आहे, तो कां? सुंदरी, तूं मूर्तिमंत लज्जा असून ह्या निर्जन वनांत एकटी, ऋषींप्रमाणें इंद्रियांचा निग्रह करून आपला पति जो धर्म त्यास शोधीत आहेस काय? अथवा तूं पार्वती असून शंकराच्या प्राप्तीसाठीं हें वन धुंडीत आहेस? किंवा तूं सरस्वती असून ब्रह्मदेवाचा शोध करीत आहेस? अथवा तूं लक्ष्मी असून विष्णूच्या शोधांत तर नाहींसना? हे चारुगात्री, तूं कोणीही अस; तुझा भर्ता तुझ्या दृढ भक्तीमुळें आपणास कृतार्थ मानील ह्यांत संशय नाहीं; असो. बरें, आतां, तूं लक्ष्मी आहेस असें म्हणावें, तर तुझ्या हातांतला कमळाचा कळा कोठें पडला? पण छे! ह्या माझ्या कल्पना अगदीं मिथ्या आहेत; कारण ह्यांपैकीं कोणीही भूमीवर पायांनीं संचार करणारी नाहीं. तेव्हां आतां, सुंदरी, तूं देवता नाहींस हें उघड

ठरलें; तर लक्ष्मीनें ज्याप्रमाणें विष्णूला वरून वैकुंठास सुशोभित केलें, त्याप्रमाणें तूं ह्या वीराला वरून ही नगरी सुशोभित कर. सुंदरी, माझ्याकडे पाहून लाजून तूं जें मंदस्मित केलेंस, त्यामुळें मी अगदीं विव्हल झालों असून मला भगवान कामदेवानें सर्वस्वीं जिंकून टाकिलें आहे. त्याच्या दुःसह वेदना मला अत्यंत व्याकुल करीत आहेत; ह्याकरितां तूं माझ्यावर अनुग्रह कर. हे कमलाक्षी तूं लज्जेनें खालीं केलेलें मुख वर करून मजकडे पहा. तुझ्या त्या उत्तम भ्रुकुटी, ते अतिचंचल नेत्र, ते कपाळावर आलेले कुरळ केश फिरून माझ्या दृष्टीस पडूं दे. हे सुंदरी, तुझें मधुर भाषण कधीं ऐकेन असें मला झालें आहे, तर विलंब न करितां माझे हेतु पूर्ण कर.

नारद म्हणतातः—राजा, ती स्त्रीही त्याच्या रूपानें मोहित झाली होतीच, ह्यास्तव राजाची अतिशय काकळुतीची प्रार्थना ऐकल्याबरोबर तिनें तात्काळ मंदस्मित करून आपली अनुकूलता व्यक्त केली: ती पुरंजनास म्हणाली, "हे नरवरा, माझा व माझ्या बरोबरच्या मंडळीचा पिता कोण हें आम्हांस बरोबर माहीत नाहीं. तशींच आमचीं गोत्रें किंवा नांवें ह्यांचीही आम्हांस कांहींएक माहिती नाहीं. आम्ही आज ह्या ठिकाणीं, आहों, ह्यापेक्षां अधिक ज्ञान आम्हांस बिलकूल नाहीं. राजा, मला इतकें माहीत आहे कीं, हे अकरा पुरुष माझे मित्र आहेत व ह्या स्त्रिया माझ्या मैत्रिणी आहेत; आणि हा जो सर्प आहे, तो, मी निजल्यावर ह्या पुरीचें रक्षण करितो. राजा, तुझी माझी भेट झाली ही मोठी सुदैवाची गोष्ट होय. तशांत तूं विषयोपभोग भोगण्याविषयीं उत्सुक आहेस, हें पाहून तर मला फारच आनंद झाला. राजा, मी आपले मित्र व मैत्रिणी ह्यांसुद्धां तुझ्या सेवेस तयार आहें. तुला वाटेल तो विषय आम्ही यथेच्छ प्राप्त करून देऊं. प्रियकरा, तूं आतां ह्या नवद्वारपुरींत शंभर वर्षें रहा, व अनेक ऐषआरामांचा सुखानें उपभोग घे. प्राणवल्लभा, तुझ्या व्यतिरिक्त इतर पुरुष अरसिक व मूढ असे मला भासतात; त्यांस परलोकाची किंवा पुढील तरतुदीची कल्पना सुद्धां नसल्यामुळें ते केवळ पशुच होत. ह्याकरितां, तुझ्याशिवाय दुसऱ्याचें माझ्याकडून रंजन व्हावयाचें नाहीं. राजा, तूं माझ्याशीं रत झाल्यास धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे तर साधतीलच; परंतु त्याशिवाय तुला संततिसुख प्राप्त होऊन तुझें यश चोहींकडे विस्तृत होईल. केवळ अद्वैतानें सृष्टीचा विचार करणाऱ्या पुरुषांस ह्या सुखाचा गंध सुद्धां नसतो. प्रिया, ह्या गृहस्थाश्रमाची प्रौढी केवढी म्हणून सांगावी ? ह्यामध्यें देव, पितर, ऋषि, मनुष्यें व इतर प्राणी ह्यांस तर सुख देतां येतेंच; परंतु शिवाय स्वतांस देखील शाश्वत सुख प्राप्त करून घेतां येतें, असें महान महान वेदवेत्ते सांगतात; तर मग तुझ्यासारख्या महाबलाढ्य, उदार, सुंदर, रसिक, अनायासें प्राप्त झालेल्या व अनुरक्त अशा पुरुषास टाकून, माझ्यासारख्या दीन व परतंत्र अबलेनें कोणास वरावें बरें ? हे प्रतापी राजा, तूं अबलांवर करुणा करणारा व प्रेमपूर्वक हास्य करून त्यांची चिंता समूळ नाहींशी करणारा असून केवळ मदनाचा पुतळा आहेस; तर तुझ्यावर कोणत्या स्त्रीचें मन आसक्त होणार नाहीं बरें ?"

नारद म्हणतातः—हे प्राचीनबर्हि राजा, ह्याप्रमाणें संभाषण झाल्यावर त्या उभयतांनीं एकमेकांस वरण्याचा संकेत करून त्या नगरींत प्रवेश केला, आणि तसें करून तेथें शंभर वर्षें सुखानें घालविलीं. तो राजा त्या नगरींत असतां निरनिराळे भाट, चारण वगैरे नेमलेल्या वेळीं त्याचा स्तुतिपाठ गात असत. त्याच्या भोंवतीं सदोदीत युवतीजनांचा समाज असे. जेव्हां दाहादिकांनीं तो तप्त होई, तेव्हां तो ऱ्हदिनी नांवाच्या जलाशयांत निमज्जन करी. त्या नगरीच्या वरच्या भागीं सात व खालच्या भागीं दोन अशा नऊ वेशी होत्या.

पुरंजन राजा पहिल्या सात वेशींनीं अन्य देशीं जाई. त्या सात वेशींपैकीं पांच वेशी पूर्व दिशेस होत्या, एक दक्षिणेस होती, व राहिलेली एक उत्तरेस होती. पूर्वेकडील पांच वेशींपैकीं खद्योता व आविर्मुखी ह्या नांवाच्या दोन वेशी एकत्र केलेल्या होत्या. त्या वेशींनीं पुरंजन राजा द्युमान् नामक मित्रास बरोबर घेऊन विभ्राजित देशास जात असे. नलिनी व नालिनी नांवाच्या वेशीही पूर्वी सांगितलेल्या वेशींप्रमाणें पूर्वेसच असून एकेजागींच केलेल्या होत्या. पुरंजन राजा ह्या वेशींतून अवधूत नामक साथीदार बरोबर घेऊन सौरभ देशीं प्रयाण करी. शिवाय मुख्या नामक आणखी एक वेस पूर्वबाजूसच होती. ही जरी एकच होती, तरी तींतून दोन देशीं जाण्याची व्यवस्था केलेली होती. पुरंजन राजास बहूदन व आपण ह्या देशांत जावयाचें असलें म्हणजे तो ह्या वेशीनें जाई, व बरोबर रसज्ञ व विपण नामक चतुर मित्र घेई. त्या नगरीच्या दक्षिणेस व उत्तरेस ज्या वेशी होत्या, त्यांचीं नांवें पितृहू व देवहू अशीं होतीं. पुरंजन राजा ह्या वेशींतून श्रुतधर नांवाच्या जिवलग मित्राबरोबर दक्षिणपंचाल व उत्तरपंचाल देशास गमन करीत असे. राजा, तुला आतां खालच्या बाजूच्या दोन वेशींची माहिती सांगावयाची राहिली. ह्या दोन्ही वेशी पश्चिमेस होत्या. त्यांचीं नांवें आसुरी व निर्ऋति हीं होतीं. ग्रामक नांवाच्या देशास जावयाचें असतां पुरंजन राजा आसुरी वेशीनें जाई व बरोबर दुर्मद नामक मित्रास घेई; आणि वैशस नांवाच्या देशास जावयाचें झालें म्हणजे तो लुब्धकास बरोबर घेऊन निर्ऋति वेशीनें बाहेर पडे. ह्या पुरीमध्यें राहणाऱ्या लोकांत निर्वाक् व पेशस्कृत् ह्या नांवांचे दोन आंधळे होते. पुरंजन राजा निर्वाकाच्या पाठीवर बसून पाहिजे तिकडे जाई, व पेशस्कृताकडून वाटेल तें काम करून घेई. तो, विषूचीन नामक प्रधानासमवेत अंतःपुरांत जाऊन आपल्या स्त्रीशीं रतिक्रीडा करी; आणि तिच्या व पुत्रादिकांच्या भजनीं लागून हर्षशोकादि विकारांत गुंग होई. ह्याप्रमाणें कर्माच्या ठिकाणीं प्रवृत्त झालेला विषयासक्त पुरंजन राजा इतका स्त्रीवश झाला कीं, राणी जें जें करण्यास सांगे तें तें तो करूं लागला; एखादे वेळीं ती मद्य प्याली कीं लागलीच ह्यानेंही मद्य पिऊन विव्हल व्हावें; ती भोजन करूं लागली म्हणजे ह्यानेंही भोजन करावें; तिनें कांहीं पदार्थ सेवन केला म्हणजे तोच ह्यानें करावा; ती गाऊं लागली कीं ह्यानेंही गावें; ती रडूं लागली म्हणजे ह्यानेंही रडावें; ती हसूं लागली म्हणजे ह्यानेंही हसावें; ती बडबडूं लागली कीं ह्यानेंही बडबडावें; ती धावूं लागली कीं ह्यानेंही धावावें; ती थांबली कीं ह्यानेंही थांबावें; ती निजली कीं ह्यानेंही निजावें; ती बसली कीं ह्यानें बसावें; जें ती ऐकेल, तें ह्यानें ऐकावें; जें ती पाहील, तें ह्यानें पहावें; तिनें वास घेतला कीं ह्यानें वास घ्यावा; तिनें कशाला स्पर्श केला कीं ह्यानें तसें करावें; ती शोकविव्हल झाली कीं ह्यानें शोकविव्हल व्हावें; व ती प्रसन्न झाली कीं ह्यानेंही प्रसन्न व्हावें. सारांश, त्याची सदसद्विवेकबुद्धि अगदीं सुटली, व तो आपल्या स्त्रीचें एकसारखें अनुकरण मात्र करीत राहिला. असो. ह्या प्रकारें ती स्त्री व तिचीं साथीदार स्त्रीपुरुषें ह्यांनीं त्या पुरंजन राजास सर्वस्वीं फसवून आपला दास करून टाकिलें.

## अध्याय सविसावा.

—:०:—

### पुरंजनाची मृगया.

नारद म्हणतात—प्राचीनबर्हि राजा, पुरंजन हा एके वेळीं मोठें धनुष्य बरोबर घेऊन सेनापतीसहवर्तमान मृगया करण्याकरितां पंचप्रस्थ नामक अरण्यामध्यें गेला. त्या वेळीं तो ज्या रथामध्यें बसला होता, त्यास पांच घोडे जोडिले

असल्यामुळें तो रथ फारच वेगानें चालला होता. त्या रथास एक आंस व दोन चाकें असून दोन धुरा होत्या. त्यावर तीन ध्वज असून ते पांच बळकट रज्जूंनीं बांधिलेले होते. रथावरील सारथ्याच्या हातांत एक लगाम होता. त्यांत वीरास बसण्याची जागाही उत्तम केलेली होती. रथास घोडे जोडण्याकरितां दोन जागा केल्या असून त्या रथावर शस्त्रांची सामग्रीही चांगली घेतलेली होती. कदाचित् शत्रूची गांठ पडून बाहेरून शस्त्रप्रहार वगैरे झाल्यास त्याचा प्रतिकार करण्याकरितां ढाली इत्यादि उपसाहित्य बरोबर ठेविलेलें होतें. रथास जोडलेल्या घोडयांस निरनिराळ्या पांच चाली शिकवून ठेविलेल्या असल्यामुळें, तो रथ भिन्न प्रसंगीं भिन्न गतीनें जाण्यासारखा होता. त्या वीरानें सुवर्णाचें चिलखत परिधान करून बरोबर अक्षय्य बाणभाता घेतला होता. बर्हिषद राजा, ह्याप्रमाणें धनुष्यबाणांची व इतर सर्व उत्तम तयारी करून तो पुरंजन राजा मृगयेकरितां लुब्ध होऊन बाहेर पडला. शिकारीच्या प्रसंगीं कोमल मनाच्या स्त्रिया बरोबर असणें युक्त नाहीं असें मनांत आणून त्यानें आपल्या वल्लभेस मात्र ह्या वेळीं बरोबर घेतलें नाहीं. त्याच्या मनांतील सर्व भूतदया नष्ट होऊन त्याचें हृदय अतिशय कठोर बनलें, व तो त्या अरण्यामध्यें राक्षसाप्रमाणें वर्तन करूं लागला. जे जे वनपशु त्याच्या दृष्टीच्या आटोक्यांत आले, त्या सर्वांस त्यानें आपल्या तीव्र बाणांनीं यमसदनास पाठविलें! बर्हिषदा, 'मृगया करण्यास राजे लोकांस प्रत्यवाय नसतां ह्या भाषणावरून ती करण्यास प्रत्यवाय आहे असें दिसतें' असें तूं म्हणशील; तर, बाबारे, अमर्याद मृगया करण्यास राजास सुद्धां निषेधच आहे हें ध्यानांत ठेव. सांवत्सरिक श्राद्धादिकांमध्यें मांसाची आवश्यकता असते, म्हणून त्या वेळीं मात्र मृगया करण्याविषयीं आसक्त झालेल्या राजानें ती करावी; परंतु तेव्हां सुद्धां त्यानें कामापुरते पवित्र पशु मारावे, असा शास्त्रकारांनीं नियम केला आहे. हे राजेंद्रा, ह्याप्रमाणें विचार करून जो पुरुष वागतो, त्यास मात्र हिंसेचें पातक लागत नाहीं. परंतु जो कोणी अहंकारानें ह्या नियमाचें अतिक्रमण करितो, तो कर्माधीन होऊन आपल्या अविचाराचें फळ भोगण्यासाठीं नरकास जातो; असो. बर्हिषदा, पुरंजनाच्या बाणवृष्टीनें त्या अरण्यामध्यें मोठा अनर्थ झाला. तेथें त्या राजानें इतके मृग मारिले कीं, ते पाहून कोणाही सदय मनुष्यास दुःख झाल्यावांचून राहिलें नसतें. तेथें अनेक ससे, डुकर, महिष, गवे, काळवीट, हरिण व साळिंदर असे मेध्य पशु व दुसरेही अनेक पशु मृत्युमुखीं पडले. अखेरीस राजा थकला आणि क्षुधा, तृषा इत्यादिकांनीं व्याप्त झाल्यामुळें त्या कर्मापासून परावृत्त होऊन आपल्या घरीं परत आला. नंतर स्नान व भोजन करून स्वस्थपणें विश्रांति घेतल्यावर तो फिरून ताजातवाना झाला. नंतर अत्तरें, अर्गजा, चंदनाची उटी, सुवासिक पुष्पांच्या माळा इत्यादिकांनीं आपलें शरीर सुशोभित करून त्यानें आपल्या राणीच्या समागमाची इच्छा केली. तो कामशरानें अतिशयच व्याप्त झाला व वेडयासारखा होऊन आपल्या सुंदर व प्रिय अशा गृहदेवतेची चौकशी करूं लागला. त्यानें अंतःपुरांतील स्त्रियांस मोठ्या उत्सुकतेनें विचारिलें, "तुम्ही आपल्या धनिणीसह पूर्ववत् खुशाल आहांना? पहा—मी मृगयेला गेलों त्या वेळीं घरामध्यें जशी प्रसन्नता दिसत होती, तशी प्रसन्नता आतां मला दिसत नाहीं. बायांनो, काय सांगूं! जर घरामध्यें माता किंवा पतिव्रता स्त्री नसेल, तर त्या घरामध्यें कोणत्या चतुर पुरुषाला रहावेंसें वाटेल बरें? अहो, मी भयंकर संकटांत असतां त्यांतून सुटका होण्याचा जी मला उपाय सांगे व जी मला पदोपदीं बोध करी, ती माझी प्रिया कोठें आहे!" हे प्राचीनबर्हे,

असें पुरंजन राजानें विचारल्यावर त्या स्त्रियांनीं त्यास सांगितलें, "राजा, तुझी स्त्री काय करण्याच्या बेतांत आहे हें आम्हांस माहीत नाहीं. ती पहा, ती नुसत्या भूमीवर निजली आहे !"

नारद म्हणतातः—हे पृथ्वीपते, तेव्हां पुरंजन राजा भूमीवर अस्ताव्यस्त पडलेल्या आपल्या पत्नीस पाहून दुःखानें फार व्याकुळ झाला. त्यानें रागवावयाचें वगैरे कारण तिला गोड शब्दांनीं विचारलें, परंतु ती कांहींच बोलेना. राजा बर्हिषदा, तो वीर स्त्रीस वश करून घेण्याच्या कामांत मोठा पटाईत होता; ह्यामुळें हळू हळू त्यानें तिचें सांत्वन केलें : प्रथम त्यानें तिच्या पायांवर मस्तक ठेविलें, पुढें तिला आपल्या मांडीवर घेतलें व तिच्या अंगावरून हात फिरवून तिला म्हटलें, "प्रिये, सेवकांनीं आपल्या कामांत चुकी केली असतां त्यांस आपलेसें मानून धन्यांनीं शिक्षा करावी हेंच उचित होय. ज्यांस धन्यांकडून अशी शिक्षा मिळत नाहीं, ते सेवक खरोखर दुर्दैवी होत, असें मी मानतों. अपराधी सेवकांना प्रभूनें केलेला दंड म्हणजे मोठा अनुग्रह होय. सुंदरी, जो सेवक मूर्ख असतो, त्यास धन्यानें केलेल्या हिताच्या कृत्याचा अर्थ न समजतां तो क्रोधाविष्ट होतो. ह्यास्तव, प्राणप्रिये, जर माझ्याकडून कांहीं अपराध झाला असेल, तर त्याबद्दल मला शिक्षा कर. सुंदरी, माझ्याविषयीं तुझ्या मनांत असलेल्या अतिशय प्रेमामुळें तू लज्जेनें व संकोचानें किंचित् हसून जशी मजकडे पाहत असस, तशीच ह्या वेळीं पहा! सुंदरी, नीलकेशरूप भ्रमरांनीं शोभायमान दिसणाऱ्या तुझ्या मुखकमलाची प्रभा मला पाहूं दे बरें ! प्रिये, तुझें मंजुळ भाषण ऐकण्याविषयीं मी फारच उत्सुक झालों आहें, तर मजजवळ दोन शब्द बोलण्याची कृपा कर. हे वीरस्त्रिये, ब्राह्मण व विष्णुदास ह्यांखेरीज दुसऱ्या कोणीं जर तुझा कांहीं अपराध केला असेल, तर त्याचें मी आतांच शासन करितों. कारण, माझा अपराध करणारा पुरुष शिक्षा भोगल्याशिवाय राहील असें कालत्रयींही घडणार नाहीं. प्रिये, आजपर्यंत तुझें मुख कुंकुमरहित, मलिन, खिन्न, संतापलेलें, निस्तेज व कठोर असें कधींच दिसलें नाहीं. तसेंच, तुझे हे सुंदर पयोधर शोकाश्रूंनीं भिजलेले असे मी आजच पहात आहें. सुंदरी, हा तुझा पिकलेल्या तोंडल्यासारखा व केशराच्या कर्दमासारखा लाल अधरोष्ठ इतका निस्तेज झालेला आज पहिल्यानेंच माझ्यापुढें आहे. तर हें असें होण्याचें कारण काय बरें ? प्रिये, मी मृगया करण्याविषयीं आतुर होऊन तुला न विचारतां अरण्यांत गेलों ह्याबद्दल मला क्षमा कर. सुंदरी, मी मदनव्यथेनें पीडित झालों असून आतां ती माझ्यानें अगदीं सहन होत नाहीं; तर अशा वेळीं पतीचें इष्ट हेतु पूर्ण करण्यास कोणती कामिनी स्त्री मागें घेईल बरें ?"

## अध्याय सत्ताविसावा.

--:०:--

### पुरंजनाचा कालक्षेप व त्याच्या नगराला वेढा.

नारद म्हणतातः—हे प्राचीनबर्हि राजा, ती स्त्री (पुरंजनी) फार चतुर होती. आपल्या भर्त्याची आपल्या ठिकाणीं दृढ आसक्ति पाहून ती त्याशीं पूर्ववत् विलास करूं लागली. जेव्हां ती अभ्यंग व वेणीफणी करून, कुंकूं लावून, भांग भरून व डागडागिणे घालून मोठ्या प्रेमानें त्याजवळ आली, तेव्हां त्याला फारच आनंद झाला; आणि तिला लागलेंच दृढ आलिंगन देऊन तो एकांतांतल्या गुजगोष्टी बोलूं लागला. अशा प्रकारें ती त्यास आपला अगदीं अंकित करून टाकून त्याजबरोबर रममाण झाली. ह्याप्रमाणें त्या सुंदरीशीं क्रीडा करण्यांत त्यानें कित्येक दिवस व रात्री घालविल्या. त्याची ज्ञानशक्ति अगदीं नष्ट

झाल्यामुळें, स्त्रीसुखाचा उपभोग घेण्यांत आपला किती काळ गेला, ह्याचें त्यास मुळींच भान राहिलें नाहीं. ह्या प्रकारें पुरंजन राजानें कामांध होऊन कोमल शय्येवर राणीचा हात उशास घेऊन निजावें; व त्यास राणी म्हणजे केवळ पुरुषार्थ वाटावा. प्राचीनबर्हि राजा, त्या पुरंजनास असें वाटलें तें योग्यच आहे; कारण कामाधीन झाल्यामुळें आपलें स्वरूपभूत जें परब्रह्म त्याचें त्यास मुळींच ज्ञान झालें नव्हतें. हे बर्हिषदा, आपल्या स्त्रीबरोबर क्रीडा करण्यांत त्या पुरंजन राजाचें सर्व तारुण्य क्षणार्धाप्रमाणें निघून गेलें. त्यापासून त्या पुरंजनीला अकराशें पुत्र व एकशें दहा कन्या झाल्या. त्या मुली आपल्या आईबापांचें यश वाढविणाऱ्या असून त्यांच्या ठिकाणीं सुशीलता, औदार्य वगैरे गुण पूर्णपणें वास करीत होते. प्राचीनबर्हि राजा, पुरंजनीच्या नांवावरून त्यांस पौरंजनी असें म्हणत असत. पंचालपति पुरंजन राजानें आपले पुत्र व कन्या उपवर झाल्या असें पाहून त्यांचे विवाह केले. पुढें त्या पुत्रांना प्रत्येकीं शंभर शंभर पुत्र झाले व त्यामुळें पंचाल देशांत पुरंजन राजाचा वंश चांगल्या प्रकारें विस्तृत झाला. पुढें पुत्र, पौत्र, गृह, संपत्ति, सेवक, देश इत्यादिकांचे ठिकाणीं त्याचें ममत्व अगदीं खिळून जाऊन तो पुरंजन राजा ह्या अफाट प्रपंचाचा सर्वस्वीं दास बनला. प्राचीनबर्हि राजा, तुझ्याप्रमाणें अनेक प्रकारच्या विषयोपभोगांच्या इच्छा धारण करून त्यानें यज्ञदीक्षा घेतली, व पशूंचे बळी देऊन भयंकर यज्ञांच्या योगानें देव, पितर व भूतपति ह्यांचें सांत्वन केलें! ह्याप्रमाणें कुटुंबाच्या ठिकाणीं आसक्ति ठेवून अनेक कृत्यांत तो राजा निमग्न असतां, कामाधीन लोकांचा केवळ शत्रु असा जो जरासमय, तो त्यास प्राप्त झाला. बर्हिषद राजा, चंडवेग नांवाचा एक गंधर्वांचा बलाढ्य अधिपति होता. त्या शूराजवळ तीनशें साठ बलाढ्य गंधर्व होते; तशाच त्या गंधर्वांच्या प्रत्येकाची एक एक शुक्ल व कृष्ण मिळून अशा, तीनशें साठ गंधर्वी स्त्रिया होत्या. आपल्या सर्व इच्छा पूर्ण करणारी जी पुरंजन राजाची नगरी, तिला त्या गंधर्वस्त्रिया आपल्या पतींसहवर्तमान पाळीपाळीनें लुटूं लागल्या. चंडवेगाच्या लोकांकडून पुरंजन राजाच्या नगरीला असा त्रास पोहोंचूं लागला, तेव्हां प्रजागर नामक पांच फडांच्या नागानें त्यांस प्रतिबंध केला. त्या नागानें त्या तीनशें साठ गंधर्वांबरोबर व तितक्याच गंधर्वस्त्रियांबरोबर शंभर वर्षेपर्यंत मोठ्या आवेशानें युद्ध केलें. परंतु तो एकटा पुष्कळांबरोबर झगडतां झगडतां शेवटीं थकला; तेव्हां पुरंजन राजा मोठ्या चिंतेंत पडला. प्राचीनबर्हि राजा, पुरंजन राजास हा प्रसंग आपणावर येणार असें आधींच समजावयास पाहिजे होतें; परंतु तो त्या नगरीमध्यें व बाहेरच्या पंचालादिक देशांमध्यें आपल्या दूतांनीं आणून दिलेले करभार ग्रहण करण्यांत व आपल्या प्रियतमेशीं रममाण होण्यांत गुंग झाल्यामुळें त्यास हें महाभय आधीं समजलें नाहीं. पुरंजन राजा त्या वेळीं आतां कसें करावें ह्या विवंचनेंत असतां त्याला आणखी एक महाभय उत्पन्न झालें: कालाची एक कन्या जरा नांवाची, आपणास वर मिळविण्याच्या इच्छेनें सर्व त्रिभुवनांत हिंडत होती, परंतु तीस कोणीही वरीना. ती अतिशय कुरूप असल्यामुळें तिला सर्व लोकांत दुर्भगा असें नांव पडलें होतें. तिला पूर्वी कांहीं कालपर्यंत पूरु राजानें वरल्यामुळें त्याला तिनें राज्यप्राप्तिरूप वर दिला होता. बर्हिषदा, इकडे मी सत्यलोकांतून भूलोकीं आलों असतां, मी नैष्ठिक ब्रह्मचारी आहें असें जाणत असतांही, ती काममोहित होऊन माझ्या गळीं पडली. त्या वेळीं मी तिला झिटकारिलें, तेव्हां तिनें मला क्रोधानें शाप दिला कीं, "मुने, तूं माझा अनादर केल्यामुळें तुझें एके ठिकाणीं फार वेळ राहणें कधींही घडणार नाहीं." मग ती हिरमुष्टी होऊन माझ्या सांगण्यावरून

भय नामक यवनाधिपतीकडे गेली, व आपला स्वीकार करण्याविषयीं तिनें त्यास प्रार्थिलें: ती म्हणाली, "महाराज, आपण यवनांचे मोठे प्रतापी राजे आहां, ह्यास्तव आपणांस वरण्याची माझी मनीषा आहे. प्राणिमात्रानें कोणताही संकल्प केला असतां आपण तो निश्चयानें परिपूर्ण करितां, अशी आपली सर्वत्र ख्याति आहे. महाराज, लौकिक व्यवहाराप्रमाणें अथवा शास्त्राप्रमाणें जी गोष्ट दान करण्यास व स्वीकारण्यास योग्य, त्या गोष्टीचें दान न करणें अथवा ती प्राप्त झाली असतां तिचा स्वीकार न करणें ह्या दोहोंबद्दल तसें करणाराचा धिक्कार होतो. ह्यास्तव, हे भगवंता, ह्या दासीचा कृपा करून अंगीकार करा; दुःखी जनांवर अनुकंपा करणें हाच पुरुषाचा प्रधान धर्म होय." हे प्राचीनबर्हि राजा, तो यवनाधिपति, कालकन्येचें भाषण ऐकतांच देवांचें गुप्त कार्य करण्याची इच्छा करून किंचित् हसून तिला म्हणाला, "हे कालकन्ये, मीं नीट विचार करून तुजकरितां पति योजून ठेविला आहे. तूं लोकांचें अकल्याण करणारी असल्यामुळें तुला वरण्याला कोणीही राजी नसतो. ह्याकरितां, पूर्वप्राक्तनामुळें जन्मास आलेल्या लोकांचा त्यांस नकळत तूं उपभोग घे. तुला मी आपलें सैन्य मदतीस देतों, म्हणजे तुला कसलीच धास्ती नाहीं. हा प्रज्वार नांवाचा माझा भाऊ आहेच; तूं माझी बहीण हो, म्हणजे आपण आपलें भयंकर सैन्य घेऊन कोणाच्या लक्षांत न येतां लोकांत फिरूं."

## अध्याय अठ्ठाविसावा.

—:०:—

### पुरंजनाच्या नगरीचा नाश व त्याचें निधन.

नारद म्हणतातः—प्राचीनबर्हि राजा, भय नामक यवनराजाचे सैनिक त्याच्या आज्ञेवरून प्रज्वार व कालकन्या जरा ह्यांसहवर्तमान ही सर्व पृथ्वी फिरले. फिरतां फिरतां त्यांनीं पुरंजन राजाच्या, ऐहिक संपत्तीनें भरलेल्या व वृद्ध पन्नगानें रक्षण केलेल्या नगरीला मोठ्या आवेशानें वेढा दिला. कालकन्येनें त्या नगरींत बलात्कारानें प्रवेश करून पुरंजन राजास तत्काळ जिंकून टाकिलें. बर्हिषद राजा, कालकन्येचा त्या नगरींत प्रवेश होतांच तिला तेथें आपला अंमल बसविण्यास अगदीं वेळ लागला नाहीं. पुढें यवनांनीं चोहोंकडून प्रवेश करून त्या नगरीची नासाडी मांडली. तेव्हां ती दुर्दशा पाहून पुरंजन राजास अतिदुःख होऊं लागलें. कालकन्येचा दृढ पाश पडतांच कुटुंबाच्या मायापाशांत व विषयसुखांत गुंतून गेलेल्या त्या राजाची बुद्धि भ्रष्ट झाली; तो एकदम निस्तेज झाला; त्याच्या स्वभावांत बदल झाला; आणि गंधर्व व यवन ह्यांनीं बलात्कारानें त्याचें सर्व ऐश्वर्य हिरावून घेतल्यामुळें तो अगदीं दीन झाला! पुढें कालकन्येनें यवनसेवकांकडून सर्व पंचाल देशही उध्वस्त करून टाकिला. तेव्हां ती अंतर्बाह्य दुःस्थिति पाहून राजाचे पुत्र, पौत्र, दास, दासी, प्रत्यक्ष स्त्री, आप्तसोयरे वगैरे सर्व खवळून गेलीं, आणि पुरंजन राजास भयंकर काळजी उत्पन्न झाली. त्यानें त्या संकटाचें निवारण करण्यासंबंधानें पुष्कळ विचार करून पाहिला, परंतु त्यास कांहीं उपाय सुचेना. बर्हिषदा, पुरंजनाची सर्व विषयांवरील सत्ता नष्ट झाली असतांही ते फिरून प्राप्त व्हावे म्हणून तो इच्छा करीतच होता! तसेंच, केवळ स्त्रीपुत्रादिकांनींच नव्हे, तर प्रत्यक्ष त्याच्या शरिरानें त्याजवरील ममता टाकून दिली होती, तरी त्या स्त्रीपुत्रादिकांवर व शरिरावर तो प्रेम करीतच होता! परंतु अखेरीस निरुपाय होऊन, गंधर्व, यवन व कालकन्या ह्यांनीं उध्वस्त करून टाकलेल्या त्या आपल्या नगरीला सोडून जाण्याचा विचार त्यानें मोठ्या नाखुषीनें मनांत आणिला. इतक्यांत, त्या यवन-

राजाचा वडील भाऊ जो प्रज्वार त्यानें पुढें होऊन आपल्या भावाच्या संतोषाकरितां त्या सगळ्या नगरीला आग लावून दिली ! ती जळूं लागली तेव्हां तो पुरंजन राजा स्त्री, पुत्र, पौत्र, नागरिक जन व सेवकवर्ग ह्यांसहवर्तमान त्या अग्नीच्या योगानें होरपळूं लागला. तेव्हां त्या पुरीचा रक्षक (पांच फडांचा नाग) अगदीं दीन झाला व मोठ्या विवंचनेंत पडला; त्याच्या अंगास कांपरें भरलें; व अखेरीस अग्नीनें जळत असलेल्या त्या पुरींतून बाहेर पडण्याचा विचार त्यानें मनांत आणिला. आपले सर्व अवयव शिथिल झाले, गंधर्वांनीं आपला सारा पराक्रम नाहींसा केला, व यवनांनीं तर अगदीं आपला कोंडमाराच चालविला, असें पाहून तो नगरपाल धाय मोकलून रडूं लागला. इकडे, 'माझें, माझें' करीत असलेला तो पुरंजन राजा, आतां आपली स्त्री, मुलगे, नातू, पणतू, सुना, जांवई, चाकर, आप्त, इष्ट, घरदार, धनद्रव्य, भांडेंकुंडें, वस्त्रपात्र इत्यादि सर्व कांहीं आपणास सोडून दिलें पाहिजे, असें मनांत आणून मोठ्या खेदानें आपल्याशींच म्हणतो, "अरेरे ! माझ्या मागें माझी अनाथ स्त्री काय बरें करील! अरेरे, माझ्या पुत्रादिकांची आतां स्थिति काय होईल! हे स्त्रिये, मी जेवलों नाहीं, तर तूं जेवीत नव्हतीस ! मीं स्नान केलें नाहीं, तर तुला स्नान करण्यास उल्हास वाटत नसे! हाय हाय! मी रागावलों असतां तूं किती तरी दुःखी होत असस ! मी जर तुला कधीं बोललों, तर तूं भयानें माझ्या पुढें अवाक्षर देखील काढिलें नाहींस! अगे, मी चुकलों असतां तूं मला वाटेवर आणावेंस; मीं प्रवासांत असतां तूं रात्रंदिवस दुःख करावेंस ! प्रिये, तुला पराक्रमी पुत्रपौत्रादिक झाले असूनही माझ्या मागें हा गृहस्थाश्रम चालविण्याची पंचाईत पडावीना ! शिव शिव ! माझ्या संततीवर हा केवढा प्रसंग ! मी येथून गेलों म्हणजे, समुद्रांत तारूं फुटलें असतां लोकांची जशी दुर्दशा होते, तशी त्यांची दुर्दशा होईल !" बर्हिषद राजा, बिचारा पुरंजन ह्याप्रमाणें शोकांत निमग्न असतां, त्याला बांधून नेण्याच्या निश्चयानें भय नामक यवनाधिपति स्वतः तेथें प्राप्त झाला. तो आपल्या सेवकांकडून त्यास जखडून बांधवून पशूप्रमाणें आपल्या घरीं ओढून नेऊं लागला, तेव्हां त्याचे नागादिक सेवक दुःख करीत त्याच्या मागून त्याच्या बरोबर निघून गेले. पुरींत कोंडून टाकलेला नाग पुरींतून बाहेर पडतांच ती विस्कळीत होऊन अग्नीनें खाक झाली. इकडे ते यवन बळजबरीनें पुरंजन राजास ओढून नेत असतां त्याचें ज्ञान इतकें नष्ट झालें होतें कीं, त्यास आपल्या पूर्वीच्या हितकर्त्या अविज्ञात मित्राचें तेव्हांही स्मरण झालें नाहीं. जर त्यास अविज्ञाताचें स्मरण झालें असतें, तर त्यानें त्याला त्या यवनापासून ताबडतोब सोडविलें असतें. असो. हे प्राचीनबर्हे, पुरंजन राजाला यवनांनीं आपल्या घरीं नेतांच, त्यानें पूर्वी निर्दयपणानें यज्ञांत मारलेले पशु आपणांस झालेल्या यातनांच्या स्मरणानें एकदम चवताळून जाऊन त्याजवर तुटून पडले; व त्यांनीं कुऱ्हाडींनीं त्याच्या देहाचे तुकडे तुकडे करून टाकिले ! नंतर, अत्यंत स्त्रीलंपट होऊन गेल्यामुळें भयंकर प्रसंगांत पडलेल्या पुरंजन राजानें अनंत संवत्सरपर्यंत दुस्तर अशा नरकांत पडून नानाप्रकारचीं दुःखें अनुभविलीं; व अहोरात्र त्यास आपल्या स्त्रीचाच निदिध्यास लागल्यामुळें अखेरीस विदर्भ नामक मोठ्या राजाच्या घरीं तो स्त्रीच्या जन्मा गेला. पुढें ती वैदर्भी उपवर झाल्यावर तिच्या स्वयंवराच्या वेळीं इतर राजांस जिंकून मलयध्वज नामक पांड्यराजानें तिला वरिलें. त्याला तिच्यापासून प्रथम कृष्णेक्षणा नांवाची एक सुस्वरूप कन्या व नंतर सात पुत्र झाले. हे सात पुत्र पुढें द्रविड देशचे राजे झाले. ह्या एकेक पुत्रापासून पुढें कोट्यवधि पुत्र जन्मास आले. बर्हिषद राजा, कृष्णेक्षणेशीं अगस्त्य ऋषीनें विवाह केला. तिच्या

ठिकाणीं त्याला दृढच्युत नामक पुत्र उत्पन्न झाला. ह्या दृढच्युतास पुढें इध्मवाह नांवाचा पुत्र झाला. इकडे मलयध्वज राजानें पुत्रांना पृथ्वीचे भाग करून देऊन आपण कृष्णाची उपासना करण्याच्या इच्छेनें कुळपर्वतावर प्रयाण केलें. तेव्हां,चंद्राची कांति ज्याप्रमाणें चंद्राच्या मागोमाग जाते, त्याप्रमाणें पांड्यराजाची स्त्री, आपल्या मुलांबाळांचा, घरादाराचा, व ऐश्वर्याचा त्याग करून त्याच्या मागोमाग चालती झाली. त्या स्थलीं चंद्रवसा, ताम्रपर्णी आणि वटोदका ह्या नांवाच्या नद्या होत्या. त्यांच्या पवित्र उदकानें मलयध्वज राजा अंतरांच्या व बाहेरच्या मलांचें क्षालन करीत, व कंद, फळें, फुलें पानें, तृण व उदक ह्यांवर आपला चरितार्थ चालवीत, हळू हळू आपल्या शरिराला शुष्क करणारें तप करूं लागला. सर्व ठिकाणीं समदृष्टि ठेवून त्यानें शीत-उष्ण, वायु-वृष्टि, क्षुधा-तृषा, प्रिय-अप्रिय, सुख-दुःख हीं द्वंद्वें आपल्या चित्ताला विक्षेप न करतील अशा प्रकारें तीं जिंकून टाकिलीं. तपश्चर्या, उपासना, अहिंसादिक यम व जपादिक नियम ह्यांच्या योगानें कामादिक विकार जिंकून टाकून तो ब्रह्म आणि जीवात्मा ह्यांचें ऐक्य करूं लागला. ह्याप्रमाणें भावना करीत करीत देवांचीं शंभर वर्षेपर्यंत झाडाच्या खोडाप्रमाणें तो एके ठिकाणीं निश्चल राहिला, व भगवान वासुदेवाच्या ठिकाणीं दृढ प्रीतीच्या योगानें सर्वत्र आत्मस्वरूपावांचून त्यास दुसरें कांहीं दिसेनासें झालें. मनुष्याला स्वप्नामध्यें 'माझें मस्तक तुटलें' असा भास झाला असतांही, स्वप्नांतील शरिराहून मी निराळा आहें, असें तो मानतो; त्याप्रमाणें 'मी देहादिक उपाधींहून निराळा व्यापक ब्रह्मरूप आहें' असें प्रत्यक्ष भगवान श्रीहरिरूप गुरूनें अंतर्यामीं प्रकाशित केलेल्या व सर्वत्र अनुभवास येणाऱ्या ज्ञानाच्या योगानें मानूं लागून, परब्रह्माच्या ठिकाणीं आत्म्याला व आत्म्याच्या ठिकाणीं परब्रह्माला अभेदबुद्धीनें पाहतां पाहतां तें पाहणें सोडून देऊन तो देहादि बंधनांपासून मुक्त झाला! त्याची परमपतिव्रता स्त्री वैदर्भी ही विषयोपभोगांचा त्याग करून आपल्या धार्मिक पतीची प्रेमानें सेवा करीत असे. तिनें वल्कलें परिधान केलीं होतीं, व व्रतादिकांनीं आपलें शरीर कृश करून घेतलें होतें. तिचा केशभार म्हणजे एक मोठी जटा बनून गेली होती. ती आपल्या पतीच्या समीप, शांत अशा अग्नीजवळ जशी त्याची धूमरहित ज्वाला असावी, तशी भासत होता. प्राचीनबर्हि राजा, मलयध्वज राजा देहत्याग करून गेला असतांही, त्याचें आसन पूर्ववत् स्थिर असल्यामुळें, आपला भर्ता देहत्याग करून गेला हें तिला समजलें नाहीं, व त्यामुळें तिनें तें समजेपर्यंत पहिल्याप्रमाणेंच त्याची शुश्रूषा चालू ठेविली होती. पुढें पतीची पूजा करीत असतां तिला त्याच्या पायांचे ठिकाणीं उबारा लागेनासा झाला, तेव्हां ती कळपांतून चुकलेल्या हरिणीप्रमाणें भयभीत होऊन मोठ्यानें आक्रोश करूं लागली. त्या दीन अबलेच्या नेत्रांवाटे अश्रुपूर वाहूं लागून त्या योगानें तिचें वक्षस्थल भिजून गेलें. तेव्हां ती दुःखभरांत म्हणाली, "राजर्षे, उठा उठा, चोरांपासून व दुष्ट राजांपासून ह्या घाबरलेल्या समुद्रवलयांकित पृथ्वीचें रक्षण करा!" ह्याप्रमाणें शोक करीत व नेत्रांतून अश्रु ढाळीत ती आपल्या पतीच्या पायांवर पडली! अखेरीस तिनें काष्ठांची चिता रचून तीवर आपल्या पतीचें कलेवर ठेविलें, व चितेस अग्नि लावून आपण त्यांत उडी घेण्यास तयार झाली. इतक्यांत तिच्या पूर्वीच्या परिचयाचा आत्मज्ञानी ब्राह्मण तेथें येऊन त्यानें तिला गोड शब्दांनीं उपदेश केला.

ब्राह्मण म्हणाला:—बाई, तूं कोण? कोणाची आहेस? ज्याच्याकरितां तूं इतका शोक करीत आहेस, हा येथें निजलेला कोण? ज्याच्याबरोबर तूं पूर्वी संचार करीत असस, अशा तुझ्या मित्राला (मला) तूं ओळखतेस काय? नंतर

पूर्वजन्माची स्मृति देऊन तो म्हणतो, " मित्रा तुला आपल्या अविज्ञात नामक मित्राची आठवण आहे काय? अरे! मला सोडून तूं पृथ्वीवरील भोग भोगण्याच्या इच्छेनें आला नाहींस का? श्रेष्ठा, तूं व मी मानस सरोवरांत राहणारे हंस आहों. पूर्वी आपण सहस्र वर्षे म्हणजे प्रलय-काल संपेपर्यंत घरावांचून राहत होतों. गड्या, तूं मला सोडून विषयोपभोग भोगण्याच्या अभिलाषानें पृथ्वीवर आलास आणि फिरतां फिरतां कोणीं एका स्त्रीनें निर्माण केलेलें एक नगर पाहिलेंस. त्याच्या भोंवतीं पांच उपवनें होतीं, नऊ वेशी होत्या, तेथें एक नगरपाल होता, तीन कोट होते, सहा वाणी होते, पांच बाजार होते, पांच मोठे कारखाने होते, व त्या सर्वांची धनीण एक स्त्री होती. मित्रा, तूं त्या नगरींत प्रवेश केलास, तेव्हां तेथें तुला एका स्त्रीनें मोहून टाकिलें. त्या वेळीं तूं तिच्या-बरोबर रममाण झाल्यामुळें तुला आपल्या ब्रह्म-स्वरूपाचा विसर पडला, व तिच्या संगतीनें तुला ही दुःखदायक स्थिति आली आहे. गड्या, तूं विदर्भाची कन्या नव्हस, हा मलयध्वज तुझा भर्ता नव्हे, व जिनें तुला नवद्वारपुरीमध्यें कोंडून टाकिलें होतें, त्या पुरंजनीचाही तूं पति नव्हेस. बाबा, ही सर्व माझी माया बरें? ह्या मायेमुळेंच पूर्वी तूं आपणास पुरुष समजत होतास व आतां स्त्री समजत आहेस! वास्तविक तूं दोन्ही नाहींस! आपण दोघेही हंस आहों. आपल्या खऱ्या स्थितीचा विचार कर. बाबा, तूं आणि मी पृथक् नाहीं. तूं तोच मी व मी तोच तूं हें ध्यानांत आण. विवेकी पुरुष आपणां उभयतांमध्यें किंचित् सुद्धां भेद पहात नाहींत. आरशांत व डोळ्यांनीं एखाद्यास पाहिलें असतां जसा भेद दिसतो, तसाच आपणांत भेद आहे.

नारद म्हणाले:—हे प्राचीनबर्हि राजा, ह्याप्रमाणें त्या हंसानें म्हणजे ईश्वरानें मानस सरोवरांतील हंसाला म्हणजे जीवाला बोध केला, तेव्हां तो स्वस्वरूपीं स्थित झाला; आणि विषयोपभोगामुळें नष्ट झालेली त्याची स्मृति त्यास फिरून प्राप्त होऊन, मी स्वतः ब्रह्मच आहें, असें त्यास ज्ञान झालें.

नारद म्हणतातः—हे प्राचीनबर्हि राजा, हें ब्रह्मज्ञान तुला पुरंजन राजाच्या कथेचें रूपक करून विदित केलें आहे. कारण, विश्वचालक भगवंताला अशीं रूपकें आवडतात.

## अध्याय एकुणतिसावा.

—:०:—

### पुरंजनोपाख्यानाचा गूढार्थ.

प्राचीनबर्हि राजानें नारद मुनींस म्हटलें, "भगवन्, आपण सांगितलेल्या चरित्राचा गूढार्थ सामान्य जनांच्या ध्यानांत येणें अवघड असल्यामुळें मला तो नीट कळला नाहीं. आत्मज्ञानी पुरुषांस तो बरोबर समजावयाचा; आम्हांसारख्या कर्मांत निमग्न झालेल्यांस तो समजावयाचा नाहीं. ह्याकरितां, आपण केलेलें रूपक मला कृपा करून उलगडून सांगावें."

नारद म्हणतातः—राजा, पुरंजन म्हणजे पुरुष ( जीव ) असें समजावें. कारण, तो कर्मानुसार आपल्याला राहण्याकरितां पुर म्हणजे शरीर उत्पन्न करीत असतो. राजा, शरिरें अनेक प्रकारचीं आहेत. त्यांस एक, दोन, तीन, चार अथवा चोहोंहून अधिक पाय असतात, अथवा कित्येकांस मुळींच पाय नसतात. त्या पुरंजनाचा मित्र अविज्ञात म्हणून जो सांगितला, तो नामरूपहीन ईश्वर होय. जेव्हां प्रकृतीच्या गुणांचें पूर्णपणें ग्रहण करण्याची जीव इच्छा करितो, तेव्हां तो नऊ द्वारांचें, दोन हातांचें व दोन पायांचें मनुष्यशरीर पसंत करितो. बुद्धि ही त्या पुरुषाची स्त्री समजावी. बुद्धीच्याच योगानें अहंभाव उत्पन्न होतो, व ह्या बुद्धीच्या द्वारेंच जीव रूपरसादिक

विषयांचा आस्वाद घेतो. राजा, श्रवणादिक पंचविषय भोगणारीं व भाषणादिक पंचकर्मे करणारीं इंद्रियें हे बुद्धीचे मित्र होत; व ह्या इंद्रियांच्या ज्या वृत्ति, त्या मैत्रिणी होत. प्राण, अपान, इत्यादि पांच प्रकारचा जो प्राण, तो पांच मस्तकांचा नाग समजावा. राजा, मन हा कारभारी समज. त्याची सत्ता मोठी असून तें कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें ह्यांस आपल्या कबजांत ठेवितें. शब्द, स्पर्श, रस, रूप, गंध हे पांच विषय म्हणजे पंचाल देश समजावा. शरीर हें पंचाळ देशांतील एक पुर होय. दोन नेत्र, दोन नाकपुडया व दोन कान, ह्या एकेका ठिकाणीं केलेल्या वेशी म्हणून सांगितल्या; आणि मुख, शिश्न व गुद ह्या भिन्न स्थळीं केलेल्या वेशी सांगितल्या. त्या प्रत्येक स्थळीं रहात असलेल्या इंद्रियरूप मित्रांना बरोबर घेऊन त्या त्या द्वारानें जीव विषयांकडे बाहेर जातो. दोन डोळे, दोन नाकपुड्या व मुख ह्या पुढल्या बाजूला केलेल्या वेशी होत. उजवा कान ही दाक्षिणेकडील वेस, व डावा कान ही उत्तरेकडील वेस असें मनांत आण. तशाच शिश्न व गुद ह्या पश्चिमेकडील वेशी समज. खद्योता व आविर्मुखी ह्या नांवाच्या एकत्र असलेल्या दोन वेशी सांगितल्या, त्या म्हणजे दोन नेत्र समजावे. विभ्राजित नांवाचा जो देश सांगितला, तो रूप हा विषय होय. द्युमान् नांवाचा जो मित्र, तें चक्षुरिंद्रिय होय. त्याच्या योगें जीव हा रूप ह्या विषयाचें ग्रहण करितो. तशाच नलिनी व नालिनी ह्या वेशी सांगितल्या, त्या नासिकाछिद्रें समजावीं. सौरभ देश म्हणजे गंध हा विषय. अवधूत मित्र म्हणजे घ्राणेंद्रिय समज. मुख्या म्हणून जी वेस सांगितली, तें मुख समजावें. विपण नांवाचा जो मित्र सांगितला, तें वागिंद्रिय होय. रसज्ञ म्हणून जो मित्र सांगितला, तें रसनेंद्रिय समजावें. आपण नांवाचा जो देश सांगितला, तो वाग्व्यवहार समजावा. बहूदन म्हणजे नानाप्रकारचें अन्न. पितृहू म्हणून जी दक्षिणवेस सांगितली, तो उजवा कान; देवहू म्हणून जी उत्तरवेस सांगितली, तो डावा कान समजावा. कर्मकांड व ज्ञानकांड हे विषय सांगण्याकरितां उत्तरपंचाल व दक्षिणपंचाल हे देश सांगितले. कर्मकांडाप्रमाणें वागून मनुष्य पितृलोकीं जातो, व ज्ञानकांडाप्रमाणें वागून तो देवलोकीं जातो. श्रुतधर मित्र सांगितला, तें श्रोत्रेंद्रिय समजावें. आसुरी नांवाची पश्चिमेकडील वेस सांगितली, तें शिश्न होय. ग्रामक देश म्हणजे स्त्रीसंभोग असें समजावें. उपस्थास मीं दुर्मद असें म्हटलें. निर्ऋति म्हणजे गुदद्वार समजावें. वैशस हें नरकस्थान होय. लुब्धक म्हणून सांगितलें, तें गुदेंद्रिय जाणावें. निर्वाक् व पेशस्कृत् हे अनुक्रमें हात व पाय समजावे. अंतःपुर म्हणजे हृदय व विषूचीन म्हणजे मन होय. हा जीव मनाच्या द्वारें सत्त्व, रज व तम ह्या गुणांच्या योगानें शांति, सुख किंवा दुःख ह्यांचा अनुभव घेतो. जसजशी बुद्धि सत्त्वादिक गुणांनीं स्वतः विकार पावते, तसतशी ती इंद्रियांना विकृत करिते.

प्राचीनबर्हि राजा, पुरंजन राजा रथामध्यें बसून मृगयेस गेला म्हणून सांगितलें, तें ध्यानांत आण. देह हा रथ समज. इंद्रियें हे त्याचे घोडे. वर्षे जसें फार वेगानें निघून जातें, तसा त्या रथाचा वेग ही गति समज. पुण्य व पाप हीं त्याचीं दोन चाकें; तीन गुण हे त्याचे ध्वज; पांच प्राण हे त्याचे बळकट रज्जु; व मन हा त्याचा लगाम अशी कल्पना कर. बुद्धि हा त्या रथाचा सारथी समजावा. हृदय ही वीराची बसण्याची जागा समजावी. सुखदुःखादिक द्वंद्वें ह्या घोडे जोडण्याच्या दोन जागा. पंचेंद्रियांचे विषय हीं शस्त्रास्त्रें व सप्तधातु ह्या ढाली वगैरे उपसाहित्य समजावें. कर्मेंद्रियें ही त्या रथाची बाह्यगति होय. ह्या गतीनें जीव मृगजळासारख्या मिथ्या विषयांवर चाल करितो. अकरा इंद्रियें ही त्याची सेना.

मृगया करणें म्हणजे अयोग्य प्रकारें इंद्रियांनीं विषयांचें सेवन करणें !

नारद पुढें सांगतात:—हे प्राचीनबर्हे, चंडवेग म्हणून सांगितला, तो कालगणन करणारा संवत्सर होय. त्या संवत्सरांतील दिवस म्हणजे गंधर्व व रात्री म्हणजे गंधर्वस्त्रिया समजाव्या. हे तीनशें साठ अहोरात्र अनुक्रमानें फिरून प्राण्यांचें आयुष्य हरण करितात. कालकन्या म्हणजे प्रत्यक्ष जरा होय. तिला स्वीकारण्यास कोणीही प्राणी तयार होत नाहीं. यवनेश्वर म्हणून सांगितला, तो सर्वांचा नाश करणारा मृत्यु होय. जरा ही त्याची बहीण असें म्हटलें आहे. त्याचे यवन सैनिक म्हणून सांगितले, त्या मानसिक व शारिरिक व्याधि होत; आणि प्रज्वार म्हणून सांगितला, तो त्वरित मृत्यु आणणारा शीत व उष्ण ज्वर होय. प्राचीनबर्हि राजा, जीवात्मा वास्तविक निर्गुण असतांही अज्ञानानें क्षुधा, तृषा इत्यादि प्राणधर्मांचा, अंधत्वादिक इंद्रियधर्मांचा व कामादिक मनोधर्मांचा स्वतांच्या ठिकाणीं आरोप करितो, व देहाचे ठिकाणीं ‘मी’ व ‘माझें’ हा अभिमान धारण करून आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक दु:खें भोगीत शंभर वर्षेंपर्यंत राहतो. बर्हिषद राजा, जेव्हां पुरुष आपलें कर्तव्य जाणत असतांही तिकडे दुर्लक्ष करितो, व श्रेष्ठ गुरु जो भगवान परमात्मा त्याच्याकडेही दुर्लक्ष करून गुणकार्यरूप प्रकृतीच्या गुणांत रममाण होतो, तेव्हां तो परस्वाधीन होऊन त्या त्या गुणानुरूप कर्में करितो; व सात्विक, राजस, किंवा तामस ह्या गुणांप्रमाणें देवमनुष्यादिक योनींत जन्म घेतो. सात्विक कर्मांच्या योगानें तो उज्ज्वल अशा देवयोनींत जन्म पावतो; राजस कर्मांच्या योगानें मनुष्ययोनींत जन्मास येऊन दु:ख व आयास भोगतो; व कधीं तिर्यग्योनींत जन्मून अखंड अज्ञान व नित्य यातना ह्यांस पात्र होतो. शिवाय तो पामर कधीं पुरुष, कधीं स्त्री व कधीं नपुंसक बनतो. सारांश, कर्म व गुण ह्यांप्रमाणें त्याला भिन्न भिन्न स्थिति प्राप्त होतात. भुकेलेला कुत्रा घरोघरीं फिरत असतां दैवानुरूप कोठें गोड खाद्य मिळवितो व कोठें शिक्षा भोगतो; तद्वत्, कामाधीन झालेला जीव विधिनिषेधरूप मार्गांनीं देवलोक, मनुष्यलोक किंवा नरकलोक हे फिरत असतां आपल्या दैवानुरूप बरीं वाईट फळें भोगतो. राजा, आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक दु:खें त्यास अशीं चिकटून बसतात कीं, त्यांपैकीं कोणतें ना कोणतें तरी एक त्यास प्राप्त झालेलें असतेंच, व त्यामुळें त्यास त्यांचा प्रतिकार करितां येत नाहीं. तेव्हां, राजा, दु:खाचा प्रतिकार करावयाचा म्हणजे डोक्यावरचें ओझें खांद्यावर घ्यावयाचें इतकेंच: तीं दु:खें केवळ आपल्या कर्मांचींच फळें असल्यामुळें त्यांचा कायमचा प्रतिकार करणें कठिण आहे. आपण निद्रेंत असतां आपल्यास स्वप्न पडलें, तर तें जसें जागृत झाल्याशिवाय कायमचें नष्ट होत नाहीं, तशीं अज्ञानानें उत्पन्न झालेलीं दु:खें ज्ञानावांचून कायमचीं नष्ट होत नाहींत. मनानें संचार करणाऱ्या पुरुषाला स्वप्नांत दृष्टीस पडलेल्या व्याघ्र, सर्प, चोर इत्यादि वस्तूंपासून भय वगैरे वास्तविक मुळींच नसतें, परंतु त्या एकदा दृग्गोचर झाल्या असतां स्वप्न दूर होईपर्यंत त्यांचें निवारण होत नाहीं; त्याप्रमाणें, जागृत अवस्थेमध्यें हा प्रपंचरूप अर्थ आत्म्याच्या ठिकाणीं वास्तविकपणें मुळींच नसतो, परंतु तो जो अज्ञानानें एकदा भासूं लागतो, तो अज्ञान दूर होईपर्यंत नष्ट होत नाहीं. ह्याकरितां, प्रपंचांतील अनर्थ दूर करावयाचा मार्ग म्हटला म्हणजे गुरूच्या ठिकाणीं उत्तम भक्ति बाळगून ज्ञान प्राप्त करून घेणें हाच आहे. भगवान वासुदेवाच्या ठिकाणीं निष्कामबुद्धीनें केलेला भक्तियोग उत्तम प्रकारचें ज्ञान व वैराग्य हीं उत्पन्न करितो. प्राचीनबर्हि राजा, भक्तिमान पुरुषाला वासुदेवाच्या कथा श्रवण करण्याविषयीं गोडी तेव्हांच उत्पन्न होते; व

एकदा तो त्या श्रद्धापूर्वक श्रवण करूं लागला, म्हणजे त्याची भक्ति उत्तरोत्तर अधिकाधिक दृढ होते. राजा, भगवद्भक्त पुरुष वासुदेवाची कथा ऐकण्यांत व सांगण्यांत जसजसे निमग्न होतात, तसतशा त्यांच्या वासना क्षीण होत जाऊन, साधुलोकांनीं वर्णन केलेल्या मधुसूदनाच्या चरित्ररूप सुधेनें भरलेल्या व चोहोंकडून वाहणाऱ्या नद्यांचें अमृत ते अधिकाधिक प्राशन करूं लागतात. तें त्यांनीं कितीही प्राशन केलें तरी त्यांची तृप्ति होत नाहीं; आणि ह्याप्रमाणें त्यांचे कर्ण कृष्णकथेंत तल्लीन झाल्यावर त्यांस क्षुधा, तृषा, भय, शोक व मोह हीं कधींही बाधा करीत नाहींत. राजा, क्षुधा, तृषा इत्यादि स्वभावतः प्राप्त झालेल्या विकारांनीं ग्रस्त करून टाकिलेलीं मनुष्यें दुर्दैवामुळें श्रीकृष्णाच्या सुधातुल्य गुणकीर्तनांत रममाण होत नाहींत, व त्यामुळें आपला सर्वस्वीं घात करून घेतात!

नारद म्हणताताः—प्रजापतींचा अधिपति ब्रह्मदेव, साक्षात् भगवान कैलासनाथ शिव, मनु, दक्षादिक प्रजापति, सनकादिकांसारखे नैष्ठिक ब्रह्मचारी, मरीचि, अत्रि, अंगिरस्, पुलस्त्य, पुलह, क्रतु, भृगु, वसिष्ठ व मी असे आम्ही सर्व ब्रह्मज्ञानी असून दुसऱ्यांनां बोध करण्यांत कुशल आहों; आणि तप, विद्या व समाधि ह्यांच्या योगानें भगवद्दर्शनाविषयीं प्रयत्न करीत आहों, तरी आम्ही सर्वसाक्षी अशा त्या परमेश्वराला पाहूं शकत नाहीं. राजा, परमेश्वराचें स्वरूप जाणणें फार अवघड आहे. मोठमोठे विद्वान व ज्ञानी पुरुषही मंत्रांनीं प्रतिपादन केलेल्या इंद्रादि देवांच्या रूपानें भिन्नभिन्न भासणाऱ्या परमेश्वराच्या स्वरूपाला जाणत नाहींत. जेव्हां अंतःकरणांत चिंतिलेला परमात्माच पुरुषावर अनुग्रह करितो, तेव्हां तो पुरुष लोकव्यवहारांत किंवा वैदिक कर्मांत आसक्त झालेल्या बुद्धीचा त्याग करितो. ह्याकरितां, कर्मापासून पुरुषार्थप्राप्ति होईल असें जें आपण ऐकतों व सत्य मानतों, तें व्यर्थ आहे हें लक्षांत आण. असें मानणें हें आपल्या अज्ञानामुळें घडतें. राजा, वेद हे स्वर्गादि सुख साध्य करून देण्याकरितां कर्ममार्गाचें प्रतिपादन करितात असें म्हणणाऱ्या लोकांच्या बुद्धि मलिन झाल्या असल्यामुळें, त्यांस वेदांचें रहस्य कळलें नाहीं असें समजावें. राजा, आतां स्वतः तूं आपल्याविषयीं विचार कर. पूर्वेकडे अग्रें केलेल्या दर्भांनीं भूमंडल आच्छादून टाकून बहुत पशूंस मारून, मी मोठा यज्ञकर्ता, असा तुला अभिमान झाला असल्यामुळें, तुला कर्मांचें तत्त्व काय, ह्याचें मुळींच ज्ञान नाहीं. राजा, परमात्म्याचा संतोष करून घ्यावा हाच कर्मांचा हेतु, व परमात्म्याच्या ठिकाणीं स्थिर चित्त लागावें हाच विद्येचा उद्देश असें पक्कें समज. तो व्यापक प्रभु सर्व प्राण्यांचा आत्मा आहे. कारण, ज्याच्यापासूनच सर्व प्राण्यांची उत्पत्ति होते. त्या भगवंताचे पाय हे लोकांचें आश्रयस्थान असून त्यांच्या आश्रयानें सर्वांचें कल्याण होतें. लोकांस अत्यंत प्रिय जो आत्मा तो प्रत्यक्ष परमेश्वरच आहे, व त्यापासून कोणास किंचित् सुद्धां भीति नाहीं, असें जो जाणतो, तोच विद्वान, तोच गुरु व तोच प्रत्यक्ष परमेश्वर समजावा. प्राचीनबर्हि राजा, तुझ्या प्रश्नाचें उत्तर देऊन मीं तुझी शंका निवारण केली आहे. आतां आपल्या उद्धारासाठीं त्वां काय करावें, ह्याबद्दल मोठमोठ्यांनीं निश्चित केलेला व गुप्त असा एक उपाय तुला सांगतों, तो तूं ऐक. राजा, मिताहारी असा एक हरिण, फुलांच्या बागेमध्यें आपल्या स्त्रीच्या समागमांत सक्त झालेला आहे; सामगायनाप्रमाणें मंजुळ गुंजारव ऐकण्यांत त्याचे कर्ण गुंग झाले आहेत; त्याच्या पाठीस लांडगे लागले असतां त्यांस तो न जुमानतां पुढें चालला आहे; व अशा स्थितींत त्यास पारध्याचे बाण लागले आहेत; तर अशा त्या हरिणास शोधून काढ. राजा, माझ्या दृष्टांतांतील अभिप्राय तुझ्या ध्यानांत आलासें दिसत नाहीं, तर तो स्पष्ट करून दाखवितों. पुष्पांच्या सारखे ज्यांचे धर्म, अशा स्त्रियांमध्यें गृहस्था-

श्रमी पुरुष असतात; पुष्पांत जसा गंध किंवा मकरंद, तशीं काम्यकर्मांतील फळें जिव्हा किंवा उपस्थादिक अवयवांकडून उपभोगण्याची खटपट सुरू असते; भ्रमराप्रमाणें मनोहर अशा स्त्रीपुत्रादिकांच्या भाषणांत मनुष्य रमून जातो; काल हा लांडग्याप्रममाणें दिवस, रात्र, घटका इत्यादिकांच्या योगानें आयुष्य हरण करीत असतां त्यास न जुमानतां मनुष्य आपलीं कर्मे करीतच असतो; व मृत्युरूप पारधी कोणालाही न जुमानतां बेलाशक त्याजवर बाण टाकीतच असतो. राजा, हा हरिण म्हणजे तूं स्वतः आहेस, हें ध्यानांत आण. ह्या मृगाच्या वृत्तांतावरून आपलें चित्त विषयांपासून निवृत्त करून अंतरात्म्याच्या ठिकाणीं स्थापन कर; सर्व इंद्रियांची बहिर्वृत्ति नाहींशी करून त्यांचा आत्म्याच्या ठिकाणीं लय कर; व संसारसुखाविषयीं वैराग्य धरून अंतीं भगवत्प्राप्ति करून घे.

प्राचीनबर्हि राजा म्हणालाः—हे ब्रह्मज्ञानसंपन्न मुने! आपण जें भाषण केलें, तें मीं श्रवण करून त्याचा विचारही केला. महाराज, आपण जें आत्मतत्त्व सांगितलें, तें, ज्यांनीं मला कर्माचा बोध केला, त्या माझ्या गुरूंना खास माहीत नव्हतें. जर त्यांस तें माहीत असतें, तर त्यांनीं मला तें निःसंशय सांगितलें असतें. ऋषे, उपाध्यायांनीं वेदवाक्यांचा विरोध दाखवून वेद प्रवृत्तिपर आहेत किंवा निवृत्तिपर आहेत ह्याचा मला मोठा संशय उत्पन्न केला होता. आतां आपण तो संशय समूळ नष्ट केला, हें फार चांगलें केलें. परंतु मला अद्याप दुसरी एक शंका आहे, तिचें आपण निराकरण करावें; कारण, ज्यांच्या ठिकाणीं इंद्रियांची प्रवृत्ति नसते, असे मोठमोठे विद्वान सुद्धां त्या गोष्टीविषयीं निश्चयात्मक असें कांहींच सांगत नाहींत! महाराज, मनुष्य ह्या जन्मीं ज्या स्थूलदेहानें कर्मे करितो, तो देह एथेंच सोडून देऊन सूक्ष्मदेहानें तो परलोकीं जातो; तर तेथें तो जीं कर्मफळें भोगतो, तीं कोणत्या देहानें? कर्मे करणाऱ्या स्थूलदेहाचा तर ह्या लोकींच नाश होतो, व सूक्ष्मदेह तर कर्मे करीतच नाहीं; तेव्हां जीव फळें भोगतो, तीं कोणत्या प्रकारें? बरें, कर्मे ह्या लोकांत तेवढें करण्यांत येतें, मग फल मात्र दुसऱ्या लोकांत कां?

नारद म्हणतातः—प्राचीनबर्हि राजा, पुरुष ह्या लोकीं सूक्ष्मदेहानें कर्मे करितो व परलोकीं तो सूक्ष्मदेहानेंच त्यांचीं फळें भोगतो; कारण, स्थूलदेहाचा जरी नाश झाला, तरी सूक्ष्मदेहाचा नाश होत नाहीं. जसा पुरुष, जिवंत पण व्यवहाररहित अशा निद्रिस्त देहाचा अभिमान सोडून स्वप्नामध्यें त्यासारख्याच दुसऱ्या एका देहानें कर्मफळांचा उपभोग घेतो, तसा तो मृत झाल्यावर, परलोकीं दुसऱ्या एका देहानें कर्मफळांचा उपभोग घेतो. राजा, 'हे पुत्रादिक माझे आहेत' व 'हा मी आहें' असें बोलणारा मनुष्य मनानें त्या त्या देहाचा स्वीकार करून तदनुरूप कर्मफळ भोगण्याकरितां पुनर्जन्म घेतो. ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें ह्यांनीं केलेल्या वासनांवरून प्राणी पुढें कोणत्या योनींत जन्म घेणार ह्याचें जसें अनुमान करितां येतें, तसें मनाच्या वृत्तींवरून तो पूर्वी कोणत्या योनींत होता ह्याचेंही अनुमान करितां येतें. राजा, विद्यमान देहानें ज्या रूपाचा अनुभव कधींच घेतला नाहीं, किंवा जें रूप कधींही पाहिलें नाहीं, किंवा ज्या रूपाविषयीं कधींच ऐकिलें नाहीं, त्या विलक्षण रूपाचा अनुभव तो स्वप्नांत वगैरे घेतो असा प्रत्यय आहे; तर हा अनुभव पूर्वजन्मांत सूक्ष्मदेहास आला होता असेंच मानिलें पाहिजे; कारण, पूर्वी न अनुभवलेली वस्तु पुढें कधींच मनांत यावयाची नाहीं असा सिद्धांत आहे. राजा, तुझें कल्याण असो. माझ्या सांगण्यातलें तात्पर्य चांगलें ध्यानांत धर. पूर्वी मनुष्यानें कोणता जन्म घेतला होता, पुढें तो कोणत्या जन्मास जाईल, व कोणत्या जन्मास जाणार नाहीं, हें त्यास मनानेंच कळेल. पूर्वी कधीं न

पाहिलेलें व कधीं न ऐकिलेलें असें केव्हां केव्हां मनांत येतें, तें देश, काल अथवा कर्म ह्यांच्या योगानें मनुष्यास असत्य असें भासतें. एखाद्या दरिद्री पुरुषाला, स्वप्नांत, मी राजा आहें, असा भास होतो, किंवा एखाद्या राजाला, मी दरिद्री आहें, असा भास होतो; ह्याचें कारण, मनें तेथून सारखींच असल्यामुळें इंद्रियांचे विषय त्यांस क्रमानें प्राप्त होऊन निघून जातात हें आहे. राजा, ज्याप्रमाणें न दिसणारा राहु चंद्रग्रहणीं अनुभवास येतो, त्याप्रमाणें सत्वगुणानें युक्त व भगवद्ध्यानपरायण अशा योग्याच्या मनामध्यें हें सर्व जग अनुभवास येतें, असें प्रसिद्ध आहे. जोंपर्यंत बुद्धि, मन, इंद्रियें, शब्दस्पर्शादिक विषय ह्यांचें ग्रहण करण्याच्या योगानें हा सूक्ष्म देह जिवंत राहिला आहे, तोंपर्यंत 'मी' व 'माझें' हा भाव नाहींसा होत नाहीं, ही गोष्ट फार प्राचीन कालापासून ठरलेली आहे. आतां तूं म्हणशील कीं, निद्रा, मृत्यु इत्यादिकांच्या वेळीं हा अहंभाव कोठें असतो? तर, त्यांच्या वेळीं हा अहंभाव इंद्रियादिकांच्या व्याकुलतेमुळें आपल्या अनुभवास येत नाहीं इतकेंच; बाकी तेव्हां सुद्धां तो स्पष्टपणें वास करीत असतोच! तसेंच, गर्भावस्थेमध्यें किंवा बाल्यावस्थेमध्यें इंद्रियें सूक्ष्म असल्यामुळें मनोवृत्ति तितक्या अनुभवास येत नाहींत. परंतु त्यांचें वास्तव्य अमावास्येच्या चंद्राप्रमाणें तेथें ठाम असतें. स्वप्नांत दृष्टीस पडणारा अनर्थ वस्तुतः खरा नसतां जसा जागृतीशिवाय नष्ट होत नाहीं, तसा संसार वास्तविक खरा नसतांही तो आत्मज्ञान झाल्याशिवाय नष्ट होणार नाहीं. पंचमहाभूतात्मक व षोडश प्रकारांनीं वाढलेला हा लिंगदेह चैतन्यानें युक्त झाला म्हणजे त्यास जीव असें म्हणतात. पुरुष सूक्ष्मदेहानेंच स्थूलदेहाचा स्वीकार करितो; व मग सुख, दुःख, भय, हर्ष, शोक इत्यादि अनुभवितो. ज्याप्रमाणें गवतावरची कीड दुसऱ्या काडीला घट्ट धरल्याखेरीज पहिली काडी सोडीत नाहीं, त्याप्रमाणें प्राणी वासनेनें दुसऱ्या देहाला धरीपर्यंत पहिल्या देहाचा अभिमान सोडीत नाहीं. ह्यास्तव वासनारूप मन हेंच सर्व प्राण्यांच्या जन्ममरणरूप संसाराचें कारण आहे. अभिमानरूप अज्ञान मनाच्या ठिकाणीं असलें, म्हणजे प्राण्याच्या हातून बरीं वाईट कर्में घडतात, तीं घडलीं म्हणजे त्यास तदनुरूप भोग भोगावे लागतात, व त्या भोगांच्या ठिकाणीं त्याची आसक्ति जडली कीं फिरून त्यास संसारांत पडावें लागतें. ह्याकरितां, राजा, सर्व विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय करणारा परमात्मा सर्व विश्वभर व्याप्त आहे असें मानून तूं त्या श्रीहरीचें परमनिष्ठेनें भजन कर.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, भगवद्भक्तांमध्यें श्रेष्ठ अशा भगवान नारदांनीं आत्मा व जीव ह्यांची स्थिति प्राचीनबर्हि राजाला निवेदन केली, व त्या राजाचा निरोप घेऊन ते सिद्धलोकास गेले. नंतर प्राचीनबर्हि राजा प्रजेचें पालन करण्याचें काम पुत्रांकडे सोंपवून आपण कपिलाश्रमीं तपश्चर्येकरितां चालता झाला. तेथें तो पराक्रमी राजा एकाग्रतेनें आपलें मन श्रीहरीच्या पदकमलीं लीन करून विषयांपासून निवृत्त झाला व सरूपता मुक्ति पावला. विदुरा, नारदांनीं अन्योक्तीनें वर्णन केलेलें असें हें अध्यात्मपर आख्यान जो कोणी स्वतः ऐकेल किंवा दुसऱ्यास सांगेल, तो सूक्ष्मदेहापासून विमुक्त होईल. देवर्षिश्रेष्ठ नारदांच्या मुखावाटे निघालेली व सर्व त्रैलोक्यास अंतर्बाह्य पावन करणारी ही भगवत्कथा जो श्रवण करील, तो संसारबंधनापासून मुक्त होऊन फिरून कधींही त्यांत पडणार नाहीं. विदुरा, हें अध्यात्मपर अपूर्व रूपक मीं संपादन केलेलें तुला सांगितलें आहे. जो पुरुष ह्याचें मनन करील, त्याच्या बुद्धीच्या ठिकाणीं असलेला अभिमान नष्ट होईल, व परलोकीं कर्माचें फल कसें मिळतें ह्याचा संशय पूर्णपणें फिटेल.

# अध्याय तिसावा.

—:०:—

## प्रचेत्यांना भगवद्दर्शन.

विदुर म्हणाला:—ब्रह्मनिष्ठ मुने, प्राचीनबर्हि राजाच्या प्रचेते नामक पुत्रांना शंकराचें प्रत्यक्ष दर्शन घडून रुद्रगीताची प्राप्ति झाली व त्यांनीं त्या गीताचा जप करून परमेश्वरास संतुष्ट केलें म्हणून आपण सांगितलें; तर असे पुण्यवान पुरुष भगवंताच्या समीप राहून मोक्षपदाला गेले असलेच पाहिजेत; परंतु त्यांना इहपरलोकीं कोणते भोग आणि सिद्धि प्राप्त झाल्या, तें आपण मला सांगावें.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ते प्रचेते पित्याची आज्ञा घेऊन तपश्चर्येनें परमेश्वराला वश करून घेण्याकरितां समुद्रांत गेले, व तेथें त्यांनीं दहा हजार वर्षें तप केलें असतां षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वर शुद्धसत्त्वरूप धारण करून त्या ठिकाणीं प्रकट झाला; आणि त्याच्या दर्शनानेंच, तपश्चर्येपासून झालेले त्यांचे सर्व क्लेश दूर झाले. विदुरा, तेव्हां परमेश्वर गरुडाच्या स्कंधावर बसलेला होता. गरुडाची कांति सुवर्णासारखी असून भगवान विष्णूची मेघासारखी होती; त्यामुळें, सुवर्णमेरूवर मेघच बसला आहे कीं काय, असा भास होत होता. कटिप्रदेशीं पीतांबर परिधान केलेला असून कंठांतील कौस्तुभ मण्याची कांति दशदिशांच्या ठिकाणीं फांकली होती. कर्णांमध्यें देदीप्यमान व सुवर्णमय कुंडलें शोभत असून त्यांच्या योगें मुखकमलाला लोकोत्तर दीप्ति प्राप्त झाली होती. मस्तकावर तेजःपुंज किरीट झळकत असून अष्टभुजांच्या ठायीं आठ आयुधें शोभत होतीं व बरोबर असलेले पार्षद व मुनि सेवा करण्यांत तत्पर असून गरुडरूप किन्नरानें स्तुतिपाठ चालविला होता. कंठांतील वनमाला इतकी विलक्षण शोभा देत होती कीं, वक्षस्थलावरील लक्ष्मीही एकसारखी तिची स्पर्धा करीत होती! असो. विदुरा, भगवंतानें प्रचेत्यांकडे कृपादृष्टीनें अवलोकन केलें आणि म्हटलें:—हे राजपुत्रहो, तुमच्या निस्सीम बंधुप्रीतीनें व एकनिष्ठ तपश्चर्येनें मला अतिशय संतोष वाटत आहे. तुमच्या सर्व कामना मी पूर्ण करितों. तुम्हांला काय हवें असेल तें मागून घ्या. राजपुत्रहो, जो पुरुष नित्य सायंकालीं तुमचें स्मरण करील, त्याला आपल्या बांधवांविषयीं प्रीति उत्पन्न होईल; व जे जन नित्य सकाळसंध्याकाळ रुद्रगीताच्या योगानें माझें स्तवन करतील, त्यांना मी सद्बुद्धि देऊन त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण करीन. राजपुत्रहो, तुम्हीं आपल्या पित्याची आज्ञा संतोषानें पालन केलीत, त्यामुळें तुमची सर्वत्र कीर्ति होईल आणि तुम्हांला ब्रह्मदेवासारखाच सर्वगुणसंपन्न पुत्र होऊन, त्याच्या संततीनें सर्व त्रैलोक्य भरून जाईल. बर्हिषदपुत्रांनो, पुत्रप्राप्तीकरितां तुम्हांस पत्नी मिळाली पाहिजे, ह्यास्तव ती प्राप्त करून घेण्याचा मार्ग सांगतों, तो ऐका. कंडु ऋषीपासून प्रम्लोचा नांवाच्या अप्सरेला एक कन्या झालेली आहे. तिला प्रम्लोचेनें झाडाखालीं टाकून दिलें. तेव्हां ती भुकेनें रडूं लागली असतां, ओषधींचा राजा जो सोम त्याला करुणा येऊन त्यानें आपली तर्जनी तिच्या तोंडांत घातली, आणि त्या तर्जनींतून स्रवत असलेल्या अमृतावरच तिचा निर्वाह चालत आहे. राजपुत्रहो, तुमचा पिता माझा परमभक्त असून त्यानें तुम्हांस प्रजा उत्पन्न करण्याची आज्ञा दिली आहे, तर आतां तुम्ही वेळ न घालवितां त्या सुंदर कन्येबरोबर विवाह करा. तुम्ही सर्व नांवानें आणि रूपगुणांनीं सारखे आहां; आणि तिचाही स्वभाव व रूपगुण तुमच्या स्वभावाशीं व रूपगुणांशीं मिळते आहेत; ह्यास्तव ती एकटी माझ्या आज्ञेनें तुम्हां सर्वांची पत्नी होवो! ह्या गोष्टीस माझी अनुज्ञा असल्यामुळें धर्माधर्मविचार करण्याचें प्रयोजन नाहीं. तुम्ही देवांच्या

सहस्र वर्षांचे सहस्र फेरे होत तोंपर्यंत पृथ्वीवरचे व देवलोकींचे नानाविध भोग अव्याहतपणें भोगाल. माझ्या ठिकाणीं तुमची निश्चल भक्ति असल्यामुळें तिच्या योगानें तुमच्या अंतःकरणांतील कामादि मळ नष्ट होतील; ऐहिक व पारलौकिक सुखोपभोग तुम्हांस नरकतुल्य वाटूं लागतील; आणि तुम्ही अंतीं मोक्ष पदास प्राप्त व्हाल. राजपुत्रहो, "आम्हीं गृहस्थाश्रम स्वीकारला म्हणजे आमच्या मनांत स्त्रीपुत्रादिकांविषयीं अनुराग उत्पन्न होऊन त्या आसक्तीनें आम्हांस पुनः संसारबंधनांत पडावें लागेल" अशी भीति तुम्हांस वाटत असल्यास, ती भीति निराधार आहे, हें ध्यानांत ठेवा. कारण, गृहस्थाश्रमांत देखील जो पुरुष भक्तियुक्त अंतःकरणानें आपलीं सर्व कर्में मला अर्पण करितो, व सर्वकाळ माझ्या चरित्राचें परिशीलन करण्यांत व्यग्र होतो, त्यास कधींच बंधन प्राप्त होत नाहीं. मीच ब्रह्म असून जो माझें नित्य चिंतन करीत राहतो, त्याला मुक्ति सहज मिळते; म्हणून तुम्हांस कोणतेंही बंधन प्राप्त न होतां तुम्ही सदैव माझें चिंतन कराल, व संसारांत बद्ध न होतां अंतीं माझ्या पदास याल, हा निश्चय समजा.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, भगवान विष्णूचें आशीर्वादात्मक भाषण श्रवण करून प्रचेत्यांना फार आनंद झाला, आणि त्यांनीं भगवंताची स्तुति केली.

## प्रचेत्यांनीं केलेली भगवत्स्तुति.

प्रचेते म्हणाले:—

नमो नमः क्लेशविनाशनाय निरूपितो दारगुणाह्वयाय ।
मनोवचोवेगपुरोजवाय सर्वाक्षमार्गैरगताध्वने नमः ॥
शुद्धाय शांताय नमः स्वनिष्ठया मनस्यपार्थं विलसद्द्वयाय ।
नमो जगत्स्थानलयोदयेषु गृहीतमायागुणविग्रहाय ।
नमो विशुद्धसत्त्वाय हरये हरिमेधसे ॥
वासुदेवाय कृष्णाय प्रभवे सर्वसात्वताम् ॥
नमः कमलनाभाय नमः कमलमालिने ।
नमः कमलपादाय नमस्ते कमलेक्षण ॥
नमः कमलकिंजल्कपिशंगामलवाससे ।
सर्वभूतनिवासाय नमोऽनुयुक्ष्महि साक्षिणे ॥

'हे सकलदुःखनिवारका परमेश्वरा', तुज जगन्निवासाला आमचा नमस्कार असो. हे देवाधिदेवा, तुझी महती काय वर्णावी! तुझ्या उत्तम गुणांचें आणि नांवांचें कीर्तन केलें असतां मनुष्यांचें सर्व प्रकारें कल्याण होतें, असें श्रुति सुद्धां प्रतिपादितात; मनाला आणि वाणीला तुझ्या गतीचें यथार्थ ज्ञान होणें सर्वथा दुष्कर होय; कोणत्याही इंद्रियाला तुझा थांग लावणें दूरापास्त आहे; देवा, तुला आम्हीं अभिवंदन करितों. हे विश्वमूर्ते, तूं आत्मस्वरूप असल्यामुळें शांत आणि निर्मल आहेस. खरें पाहूं गेलें तर तुझ्या ठिकाणीं द्वैतभाव मुळींच नाहीं, परंतु केवळ मनाच्या योगानें तो असल्याचा भास मात्र होतो. हे नारायणा, सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व लय करण्याचे वेळीं तूं अनुक्रमें रज, सत्त्व आणि तम ह्या गुणांनीं युक्त अशीं शरीरें स्वीकारतोस; तुझें रूप शुद्धसत्त्वमय असून तूं आपल्या भक्तांचीं सकल दुःखें दूर करितोस; ज्यांना तुझ्या स्वरू-

पार्चे यथार्थ ज्ञान झालें, त्यांचा भवबंध पार तुटून जातो; सर्वांतर्यामीं वास्तव्य करून सर्वांना ज्ञान देणारा तूंच आहेस; आणि तुझें स्वरूप परमानंदानें परिपूर्ण भरलेलें असून तूंच सत्पुरुषांचें पालन करितोस. पुरुषोत्तमा, आमचा तुला नमस्कार असो. हे आदिपुरुषा, तुझ्याच नाभीपासून हें ब्रह्मांडरूप कमळ उत्पन्न झालें. हे कमलचरणा कमलनयना अनंता, आमचे तुला अनंत प्रणिपात असोत. हे कमलमालिन्, कमलतंतूंसारखें तुझें वस्त्र पिंगट असून, तूं सर्व भूतांचे अंतरीं वास करितोस, आणि त्यांकडून घडून येणाऱ्या कृत्यांचें अवलोकन करून त्यांस सदसद्गति देतोस. हे विभो, तुला आमचा नमस्कार असो.'

विदुरा, ह्याप्रमाणें त्या प्रचेत्यांनीं स्तुति करून भगवंतास नमस्कार केला, आणि उठून उभे राहून हात जोडून म्हटलें, "भगवंता, तपश्चर्येनें आम्हांस जे क्लेश झालेले होते, ते तूं आपलें दर्शन देऊन दूर केलेस, ह्यामुळें आमच्या चित्तास फारच आनंद झाला आहे. हे परममंगला, दीनवत्सल महात्मे दीनजनांविषयीं अनुकंपा धारण करून त्यांच्या कल्याणाविषयीं नेहमी अग्रेच तत्पर असतात; आणि ह्या त्यांच्या औदार्यानें क्षुद्र जीव देखील शांति व सुख पावतात. देवाधिदेवा, आमच्या मनांतील सर्व इच्छा तूं जाणतच आहेस; पण आमच्याकडून त्या वदविण्याची तुझी इच्छा आहे, ह्यास्तव आम्ही त्या तुला सांगतों: हे जगन्नियंत्या परमेश्वरा, तुझ्या दर्शनाचीच आम्ही इच्छा करीत होतों, व तें दर्शन तूं आम्हांस दिलें आहेसच. आतां आम्हांस आणखी एक इच्छा आहे: ती ही कीं, तुझ्या मायेनें व आमच्या कर्मानुसार ह्या जगांत कितीही वेळां जरी आम्हांस फिरावें लागलें, तरी प्रत्येक जन्मामध्यें तुझ्या ठिकाणीं अत्यंत रत असलेल्या साधूंचा समागम आम्हांला नित्य घडावा. हे विश्वाधिपते, भगवद्भक्तांच्या समागमापेक्षां स्वर्गसुखाचीचशी काय पण मोक्षाची देखील आम्हांला जास्त परवा वाटत नाहीं. भगवद्भक्तांनीं गाइलेल्या भगवंताच्या निर्मल कथा ऐकिल्या म्हणजे अंतःकरण निर्वैर आणि निर्भय होऊन सर्व भोगेच्छा तृप्त होतात! हे परेशा, तुझे भक्त, लोकांचें कल्याण व्हावें ह्या इच्छेनें, संसारापासून भय पावलेल्या पुरुषांना दर्शन देऊन तुझ्या लीला त्यांना वर्णन करून सांगतात; तेव्हां त्यांचा समागम कोणाला बरें अप्रिय होईल? साधूंच्या संगतीचें फल इतर उदाहरणांनीं सिद्ध करून दाखविण्यापेक्षां आम्हांला आलेला अनुभवच तें सिद्ध करीत आहे. देवा, तुझा परमभक्त जो शंकर, त्याच्या यत्किंचित् समागमानें आज आम्हांस तुझें प्रत्यक्ष दर्शन झालें! तेव्हां आतां अधिक प्रमाणांची काय आवश्यकता आहे बरें? ईश्वरा, आजपर्यंत आम्हीं जें कांहीं अध्ययन केलें असेल, आणि गुरु, ब्राह्मण व वृद्ध ह्यांची जी कांहीं सेवा केली असेल, श्रेष्ठजन, मित्र, बंधुजन आणि सर्व भूतें ह्यांचा आदर केला असेल, व आजपर्यंत उदकांत बसून जी कांहीं तपश्चर्या केली असेल, ती सर्व तुला अर्पण असो! हे जगन्नायका, तुझा महिमा अपार आहे. ब्रह्मदेव, शंकर ह्यांना देखील त्याचा अंत नाहीं; आणि असें असून ते देखील तुझी स्तुति करितात. तेव्हां आम्हांस आमच्या सामर्थ्याप्रमाणें तुझी स्तुति करण्यास प्रत्यवाय नाहीं, हें उघड आहे. असो; भगवंता, तुला आमचा नमस्कार असो."

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, प्रचेत्यांनीं केलेल्या स्तुतीपासून भगवान संतुष्ट झाले. प्रचेते निश्चल अंतःकरणानें भगवन्मूर्तीकडे पाहत तटस्थ उभे राहिले. प्रचेत्यांची अपूर्व भक्ति अवलोकन करून त्यांस सोडून जातांना भगवंतासही अवघड वाटलें. परंतु शेवटीं ते "बरें आहे" असें म्हणून अंतर्धान पावले. विदुरा, नंतर प्रचेते उदकांतून बाहेर आले, तों पृथ्वीवरील वृक्ष इतके उंच वाढलेले त्यांच्या दृष्टीस पडले कीं, त्यांनीं

आकाशाला उचलूनच धरिलें आहे कीं काय, असें त्यांना वाटलें. विदुरा, त्या प्रचेत्यांना त्या वृक्षांचा राग आला आणि ते सर्व जाळून टाकण्याच्या उद्देशानें त्यांनीं आपल्या मुखांतून अग्नि आणि वायु बाहेर सोडण्यास सुरवात केली. हे प्रचेते आपल्या क्रोधाग्नीनें पृथ्वीवरील सर्व ओषधि जाळून टाकणार, असें पाहून कमलासन ब्रह्मदेव तेथें आला आणि त्यानें त्यांचें सांत्वन केलें. नंतर ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून वृक्षांनीं आपली कन्या मारिषा (कंडु ऋषीपासून प्रम्लोचेला झालेली मुलगी) त्या प्रचेत्यांना अर्पण केली; आणि ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें प्रचेत्यांनीं तिजशीं विवाह केला. हिच्याच उदरीं पुढें दक्ष प्रजापति जन्मास आला. हाच दक्ष पूर्वीं ब्रह्मदेवाचा पुत्र म्हणून जन्मला होता; पण त्यानें महादेवाचा अपमान केल्यामुळें त्याला हा दुसरा जन्म घेणें भाग पडलें. ह्याच दक्ष प्रजापतीनें चाक्षुष मन्वंतरांत ईश्वराच्या प्रेरणेवरून पुष्कळ प्रजा उत्पन्न केल्या हें प्रसिद्ध आहे. विदुरा, प्रचेत्यांचा पुत्र दक्ष हा मोठा पराक्रमी व आपल्या कर्तव्यांत दक्ष होता. ब्रह्मदेवानें त्याला अभिषेक करून प्रजांची उत्पत्ति आणि रक्षण करण्याचा अधिकार दिला; पुढें त्या दक्षानें मरीचिप्रभृति प्रजापतींची निरनिराळ्या कामावर योजना केली.

# अध्याय एकतिसावा.

---:०:---

## प्रचेत्यांना वैराग्यप्राप्ति व त्यांस नारदांचा उपदेश.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, पुढें दहा लक्ष दिव्य वर्षांनीं प्रचेत्यांना विवेकज्ञान प्राप्त होऊन भगद्वचनाची आठवण झाली, व त्यांनीं आपल्या पत्नीला पुत्राच्या स्वाधीन करून पश्चिमसमुद्राच्या तीरावर प्रयाण केलें; आणि जेथें जाजलि ऋषींना सिद्धि प्राप्त झाली, तेथें ब्रह्मसत्राची ( सतत आत्मविचार करण्याची ) दीक्षा घेऊन, त्यांनीं प्राण, मन, वाणी, व दृष्टि ह्यांचें नियमन केलें, आणि आसन साधून शुद्ध परब्रह्मस्वरूपीं आत्म्याची एकाग्रता करण्याचा अभ्यास चालविला. पुढें तेथें, देव, दैत्य आदिकरून सर्व ज्यांना पूज्य मानितात, ते नारद मुनि प्राप्त झाले. नारदांची स्वारी आलेली पाहून प्रचेत्यांना परमानंद झाला. त्यांनीं त्यांचें मनोभावानें यथाशास्त्र पूजन केलें, आणि हात जोडून त्यांस म्हटलें, "अहो मुनिश्रेष्ठ, आपल्या दर्शनानें आज आम्हीं कृतार्थ झालों. सूर्यदर्शनानें जसें जगाचें भय दूर होतें, तसें आमचें सर्व भय दूर झालें. आतां आमची इतकीच विनंती आहे कीं, भगवान शंकर आणि विष्णु ह्यांनीं आम्हांस केलेला उपदेश, आम्ही संसारांत गुंतल्यामुळें विसरून गेलों आहों; तर ज्यामध्यें मुख्य पुरुषार्थाची प्राप्ति करून देणारें आत्मविषयक ज्ञान होतें, अशा त्यांच्या त्या उपदेशाचें आपण फिरून उज्ज्वलन करावें; म्हणजे ह्या दुस्तर भवसागरांतून आम्ही तरून जाऊं." मैत्रेय म्हणाले:—विदुरा, प्रचेत्यांची प्रार्थना श्रवण करून परब्रह्मचिंतनांत सदैव निमग्न असणाऱ्या भगवान नारदांनीं प्रचेत्यांना उपदेश केला.

नारद म्हणाले:—प्रचेतेहो, मनुष्यांनीं आपल्या आयुष्यांत केलेलीं सर्व कर्में त्या सच्चिदानंद परमेश्वराला भक्तिपूर्वक अर्पण करावीं, म्हणजे त्यांना सर्व अर्थ साध्य होतात; तसें न केल्यास, शौक्र ( ब्राह्मणकुलांतील ) जन्म, सावित्र ( उपनानंतर प्राप्त होणारें ) जन्म, व याज्ञिक ( यज्ञदीक्षेमुळें मिळणारें ) जन्म हीं लाभलीं तरी त्यांचा उपयोग नाहीं. कर्माचें फल लोकनायक प्रभूस अर्पण न करितां, मनुष्यानें देवांच्या आयुष्याइतकीं वर्षें जरी तपश्चर्या केली आणि वेदांचें अध्ययन केलें, तरी तें सर्व व्यर्थ होय. भाषणचातुर्य, सावधान वृत्ति, उत्तम बुद्धि, शारीरबल, ऐंद्रियपटुत्व इत्यादि गुण कितीही संपा-

दिक्षे, अथवा योग, सांख्य, संन्यास, व्रतवैकल्यें इत्यादि कितीही मंगलकारक साधनें साध्य केलीं, तरी तीं निरर्थकच समजावीं. कारण, त्यांत कितीही प्रकारचीं जरी कल्याणें असलीं, तरी आत्मप्राप्तीपुढें त्यांची मुळींच मातब्बरी नाहीं. आत्मज्ञान हें सर्व अविद्येचा नाश करून अत्यंत आनंदाला पोंहोंचविणारें आहे. हें सर्व जग आत्ममय असल्याकारणानें, त्या अच्युताचीच आराधना केली असतां सर्व विश्वाचें पूजन केल्यासारखें होतें. ज्याप्रमाणें वृक्षाच्या मुळाशीं पाणी घातलें असतां सर्व वृक्षाला पोंहोंचतें, त्याप्रमाणें परमेश्वराची आराधना केली असतां सर्वांचें पूजन केल्याप्रमाणें श्रेय येतें. कारण, त्यानेंच हा सर्व चेतनाचेतन प्रपंच निर्माण केला आहे, आणि त्याच्याच ठिकाणीं हा सदोदीत लय पावतो; म्हणून तुम्ही शांत वृत्तीचा अंगीकार करून एकनिष्ठेनें व निष्कामबुद्धीनें आत्म्याचेंच चिंतन करीत रहा. प्रचेतेहो, सच्चिदानंद भगवान महाविष्णूचें पद उपाधिरहित आहे. सृष्टीच्या उत्पत्तिसमयीं जरी सर्व विश्व पृथक् भासलें, तरी तें वस्तुतः भगवद्रूपच आहे. सूर्याची प्रभा जशी सूर्यापासून भिन्न नाहीं, तशीच स्थिति परमात्म्याची आहे. ह्या जगाचा ओघ परमेश्वरापासूनच उत्पन्न होतो, व शेवटीं त्याच्यांतच लय पावतो. आकाशांत अभ्रें येतात, अंधकार पडतो, व प्रकाश उत्पन्न होतो; तद्वतच परब्रह्माच्या त्रिविध गुणांची उत्पत्ति होते, परिपोषण होतें, व शेवटीं लय होतो. परब्रह्म हें सृष्टीपासून आकाशाप्रमाणेंच असंग व उपाधिहीन आहे. सृष्टीचें निमित्त कारण काल, उपादान कारण प्रकृति, व कर्ता पुरुष हीं सर्व परमेश्वराचींच रूपें होत. ह्यास्तव सर्वांच्या अंतर्यामीं स्फुरण पावणाऱ्या परब्रह्माची अद्वैतभावनेनें आराधना करा. प्राणिमात्रावर दया करणें, यादृच्छिक लाभामध्यें संतुष्ट असणें, व इंद्रियें सदैव शांत राखणें ह्या गोष्टींनीं भगवान विश्वनियंता सर्वेश्वर प्रसन्न होतो. ह्यास्तव तुम्ही सर्वत्र समबुद्धि धारण करून परमेश्वराच्या भक्तींत निमग्न असा. भगवद्भक्तीनें मनुष्याच्या चित्ताची पूर्णपणें शुद्धि होते; चित्त शुद्ध झालें असतां वासनादि मळ दूर होतात; अंतःकरणांत भगवंताचा निदिध्यास चालला म्हणजे तो दीनवत्सल प्रभु तेथें प्रकट होतो; आणि अशा प्रकारें सत्पुरुषांच्या अंतरांत भगवन्मूर्ति प्रकट झाली म्हणजे ती कधींही अदृश्य होत नाहीं. प्रचेतेहो, भगवद्भक्तांची योग्यता फारच मोठी आहे. परमेश्वर त्यांस नेहमीं आपलेसे मानितो. त्यांचा योगक्षेम कसा चालेल ह्याची चिंता त्या भक्तपालक लोकाधिपतीला एकसारखी लागलेली असते. जर कोणी दुष्टानें त्या भगवद्भक्तांची हेलना केली, किंवा त्यांस अन्य प्रकारें उपसर्ग दिला, तर तें परमेश्वरास मुळींच सहन होत नाहीं, व तो त्या दुष्टाच्या दंडनासाठीं सदोदीत सिद्ध असतो. प्रचेतेहो, लक्ष्मी ही नेहमीं भगवान महाविष्णूच्या सेवेंत तत्पर असते, आणि अनेक राजे व देव कामना धारण करून भगवंताची आराधना करितात; परंतु तो निष्काम भक्तांच्या जसा स्वाधीन होतो, तसा त्यांच्या स्वाधीन होत नाहीं. ह्यास्तव, तुम्ही निष्कामबुद्धीनें त्या परमात्म्याची भक्ति करा, म्हणजे सर्वांत श्रेष्ठ असें भगवत्पद तुम्हांस प्राप्त होईल.

मैत्रेय म्हणाले:—विदुरा, ब्रह्मपुत्र नारद मुनींनीं प्रचेत्यांना भगवंताच्या आणखीही कित्येक कथा सांगितल्या, व ते ब्रह्मलोकीं निघून गेले. पुढें प्रचेत्यांनीं हरिचरणांचें ध्यान चालविलें व शेवटीं ते विष्णुलोकास गेले. विदुरा, तूं विचारल्याप्रमाणें हें परमेश्वराच्या लीलांनीं भरलेलें प्रचेत्यांचें अपूर्व चरित्र मीं तुला सांगितलें आहे.

शुकाचार्य म्हणाले:—हे नृपश्रेष्ठा परीक्षित राजा, मनूच्या उत्तानपाद आणि प्रियव्रत ह्या दोन पुत्रांपैकीं उत्तानपादाच्या वंशाचें वर्णन मीं तुला

सांगितलें; आतां प्रियव्रताचा वंश सांगतों: प्रियव्रतानें नारदांपासून आत्मज्ञानाचा उपदेश मिळविला, पुन: पृथ्वीचें राज्य भोगिलें, आणि शेवटीं पुत्रांना राज्य वांटून देऊन तो ईश्वेश्वरपदीं गति पावला. परीक्षिता, असें हें ईश्वरगुणानुवादांनीं भरलेलें पवित्र आख्यान मैत्रेय मुनींनीं विदुरास सांगितलें. तें ऐकून विदुराचें अंत:करण सद्गदित होऊन त्याच्या नेत्रांतून आनंदाश्रुधारा वाहूं लागल्या; त्यानें मैत्रेयांच्या चरणावर मस्तक ठेविलें; आणि त्यांचा निरोप घेऊन हस्तिनापुरास गमन केलें. परीक्षित राजा, ह्या आख्यानांत सांगितलेले राजे ईश्वराचे परमभक्त असल्यानें, जो त्यांचीं चरित्रें श्रवण किंवा पठन करील, अथवा दुसऱ्यांस ऐकवील, त्यास विद्या, आयुष्य, बल, कीर्ति, ऐश्वर्य इत्यादि सर्व प्राप्त होऊन अंतीं तो कैवल्यपदास जाईल!



# श्रीमद्भागवत.

## पंचमस्कंध.

### अध्याय पहिला.

—:०:—

#### प्रियव्रत राजास ब्रह्मदेवाचा प्रवृत्तिपर उपदेश.

परीक्षित राजा शुकाचार्यांस म्हणालाः—मुने, प्रियव्रत राजा तर मोठा भगवद्भक्त असून नेहमी आत्मज्ञानविचारांत रममाण असे; असें असतां, महाराज, त्यानें संसाराचा अंगीकार कसा केला? कारण, संसारामध्यें तर पुरुषाला कर्माधीन व्हावें लागतें, व त्याला आत्मज्ञानाची विस्मृति होते. ब्रह्मचर्या, प्रियव्रतासारख्या सर्वसंगपरित्याग करणाऱ्या पुरुषांना गृहादिकाच्या ठिकाणीं प्रेम उत्पन्न होणें खरोखर संभवत नाहीं. कारण, ज्यांचीं मने पुण्यकीर्ति भगवंताच्या चरणाश्रयानें तृप्त झालीं, त्यांना स्त्रीपुत्रादिकांच्या ठिकाणीं कधींही अभिलाष उत्पन्न होणार नाहीं. महामुने, आपण तर असें सांगितलें कीं, प्रियव्रत राजा संसारांत आसक्त असूनही त्यास मोक्ष व परमात्म्याची अचल भक्ति प्राप्त झाली; तेव्हां मला ह्याविषयीं मोठी शंका उत्पन्न झाली आहे, ती आपण कृपा करून दूर करावी.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा, ठीक विचारिलेंस. जे पुरुष पुण्यश्लोक भगवंताच्या चरणकमलांतील मकरंद सेवन करण्यांत निमग्न झालेले असतात, त्यांस तोच मार्ग श्रेयस्कर आहे असें निःसंशय वाटतें; व दैवयोगानें जरी मध्यंतरीं कांहीं विघ्न उपस्थित झालें, तरी त्यास न जुमानतां भगवत्कथाश्रवणांतच ते रममाण होऊन राहतात. राजा, प्रियव्रत मोठा भगवद्भक्त होता. त्यानें नारद मुनींच्या चरणसेवेनें आत्म्याचें यथार्थ स्वरूप जाणून वासुदेवाच्या ठिकाणीं अखंडित समाधि लाविला, व आपल्या सर्व इंद्रियांचे व्यापार तदर्पण करून आत्मविचार करण्याचा संकल्प केला; परंतु राजाच्या ठिकाणीं जे जे गुण असावे म्हणून शास्त्रांत सांगितलें आहे, ते सगळे गुण प्रियव्रताच्या ठिकाणीं आहेत असें पाहून, मनूनें त्याला भूमंडलाचें रक्षण करण्याची आज्ञा केली. तेव्हां, पित्यानें केलेली आज्ञा मोडणें योग्य नाहीं असें जाणून, त्यानें मनूच्या आज्ञेप्रमाणें राज्य स्वीकारिलें; परंतु तें स्वीकारलें असतां, आपल्या ब्रह्मज्ञानाचा लोप होईल असें मनांत येऊन, तें स्वीकारितांना त्यास आनंद झाला नाहीं. हा त्याचा अभिप्राय भगवान ब्रह्मदेवास समजला. कारण, त्रिगुणांपासून उत्पन्न झालेल्या सृष्टीची वाढ कशी होईल ह्या विचारांत तो मग्न असल्यामुळें, सर्व जगाच्या अंतर्यामीं काय चाललें आहे हें तो नेहमीं जाणत असतो. तो स्वयंभू ब्रह्मदेव आपल्याबरोबर सर्व वेद व मरीच्यादिक सर्व गण घेऊन सत्यलोकांतून खालीं आला. तो येत असतां वाटेंत आकाशमार्गांत मोठमोठ्या देववृंदांनीं विमानांतून येऊन त्याची पूजा केली; सिद्ध, गंधर्व, साध्य, चारण व मुनि ह्यांचे थवेचे थवे त्याच्याजवळ येऊन त्याची स्तुति करूं लागले. अशा

प्रकारें तो ब्रह्मदेव आपल्या यशानें चंद्राप्रमाणें सर्व मार्ग प्रकाशित करीत, गंधमादन पर्वताच्या गुहेमध्यें ज्या ठिकाणीं प्रियव्रत बसला होता तेथें प्राप्त झाला. त्या वेळीं प्रियव्रताच्या जवळ नारद मुनि व स्वायंभुव मनु हे होते. हंसवाहन दृष्टीस पडतांच देवर्षि नारदानें आपला पिता ब्रह्मदेव येत आहे असें जाणलें, व लागलीच तो स्वतः, स्वायंभुव मनु व प्रियव्रत हे सर्व एकदम उभे राहून हात जोडून त्याची स्तुति करूं लागले. नंतर त्यांनीं ब्रह्मदेवाची पूजा केली; व नारदानें मनोहर वाणीनें त्याच्या गुणसमुदायांचें वर्णन करून त्याच्या अवतारांचा व यशाचा जयजयकार केला. तेव्हां ब्रह्मदेव कृपापूर्वक स्मित करून प्रियव्रताला म्हणाला, “ बाळा, तुला मी जें कांहीं सांगणार आहें, तें नीट ध्यानांत आण. बा प्रियव्रता, मी तुला जें सांगणार, तें माझ्या मुखानें प्रत्यक्ष ईश्वरच तुला आज्ञापीत आहे असें समजून त्यावर पूर्ण श्रद्धा ठेव. कालानें किंवा स्थलानें ज्याचें अनुमान करितां येत नाहीं, तो परमात्मा सदोष असें कांहीं सांगेल, हें कालत्रयीं होणार नाहीं. शिव, तूं, तुझा पिता स्वायंभुव मनु, हा महर्षि नारद व मी हे आपण सर्व त्या प्रभूच्या स्वाधीन आहों व त्याचीच आज्ञा शेवटास नेत आहों. देह धारण करणारा कोणताही प्राणी तपश्चर्येनें किंवा विद्येनें, योगबलानें किंवा बुद्धीनें, अर्थानें किंवा धर्मानें, अथवा स्वतः किंवा दुसऱ्याकडून त्याच्या कृतीला अन्यथा करण्यास समर्थ होणार नाहीं. बाळा, हा प्राणिसमुदाय जन्म, मरण, शोक, मोह, भीति, दुःख किंवा सुख भोगण्यासाठीं ईश्वरानें नेमून दिलेला देह नेहमीं धारण करितो. वत्सा, आपण सर्व वेदवाणीरूप दावणीमध्यें सत्त्वादिक गुण व सदसदादिक कर्मे ह्या बळकट दाव्यांनीं बांधून टाकलेलों आहों. ज्याप्रमाणें वेसण घातलेले चतुष्पाद प्राणी मनुष्याची सेवा करितात, त्याप्रमाणें आपण सर्व ईश्वराचीं कामें करून त्याची सेवा करितों. बाळा, डोळस मनुष्य आंधळ्याला उन्हांत, सावलींत वगैरे जिकडे नेईल तिकडे जसा तो जातो, तसे, गुण व कर्म ह्यांना अनुसरून देव आपणांस ज्या बऱ्या वाईट जन्मास घालील, त्या जन्मांत आपण जातों; व त्याच्याच इच्छेनें सुख किंवा दुःख ह्यांपैकीं जें आपल्या वांट्यास येईल तें अनुभवितों. प्रियव्रता, जे कोणी संसारांत असतात, त्यांसच ह्या गोष्टी लागू आहेत असें नव्हे, तर मुक्तांना देखील ह्या लागू आहेत. प्राक्तनकर्म क्षीण होईपर्यंत मुक्तांना सुद्धां देह धारण करावा लागतो. झोंपेंतून उठलेल्या मनुष्यास स्वप्नांतील गोष्टी आठवत असतात; पण त्यास जसा त्यांविषयीं अभिमान नसतो, तद्वतच, प्राक्तनकर्माचें अस्तित्व उपलब्ध असूनही मुक्तांना आपल्या शरिराविषयीं अभिमान नसतो, व त्यामुळें ते वासनारहित होऊन पुढें दुसरा जन्म घेत नाहींत. वासनारहित होणें हें वासनेच्या विषयांपासून दूर राहिल्यानें साधतें, असें समजूं नको. कारण, जे जितेंद्रिय नसतात, ते वनांत जाऊन राहिले तरी त्यांचे कामक्रोधादिक षड्विकार जागृत असल्यामुळें तेथेंही त्यांस विषयादिकांची इच्छा होतेच. परंतु जितेंद्रिय पुरुष गृहस्थाश्रमांत असला तरीही त्यास कामक्रोधादिकांपासून उपद्रव होत नाहीं. ह्यास्तव, प्रियव्रता, राजा किल्ल्याचा आश्रय करून प्रबळ शत्रूंना जिंकतो, व शत्रूंचा नाश झाल्यावर मग खुशाल हवा तेथें जातो येतो, तद्वत् शहाण्या पुरुषानें षड्रिपूंना जिंकण्याकरितां प्रथम गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून हळू हळू कामक्रोधादिकांस जिंकण्याचा प्रयत्न करावा, व त्यांस जिंकल्यावर मग त्यानें पाहिजे तर गृहस्थाश्रमांतच रहावें अथवा दुसरा एखादा आश्रम घ्यावा. प्रियव्रता, तूं जरी परमात्म्याच्या चरणकमलरूप बळकट त्याचा आश्रय करून कामक्रोधादिक षड्रिपु जिंकून टाकिले आहेस, तरी यानेंच दिलेल्या विषयोपभोगांचा कांहीं काल-

पर्यंत उपभोग घे, व नंतर सर्वसंगपरित्याग करून मग आत्मनिष्ठ हो. ”

श्रीशुकाचार्य परीक्षितास म्हणतातः—राजा, भगवान ब्रह्मदेव हे त्रैलोक्याचे गुरु असल्यामुळें त्यांनीं केलेली आज्ञा श्रवण करून, अज्ञानास्तव त्या महाभगवद्भक्त प्रियव्रतानें खालीं मान घातली, व ‘ बरें आहे’ असें म्हणून त्यांच्या आज्ञेचा आदरपूर्वक स्वीकार केला. पुढें स्वायंभुव मनूनें ब्रह्मदेवाची पूजा केली. प्रियव्रत व नारद ह्या दोघांच्याही मनांत ब्रह्मदेवाच्या प्रवृत्तिपर उपदेशामुळें कांहीं वैषम्य उत्पन्न न होतां त्यांनीं त्याकडे मोठ्या प्रसन्न मुद्रेनें पाहिलें, व नंतर ब्रह्मदेव वाणीला व मनाला अगोचर व सर्वव्यवहाररहित अशा ब्रह्माचें चिंतन करीत सत्यलोकास गेला. इकडे स्वायंभुव मनुही, ब्रह्मदेवानें आपल्या पुत्राच्या मनांत राज्य स्वीकारण्याविषयीं उल्हास उत्पन्न केल्यामुळें फार संतुष्ट झाला; व नारदांच्या अनुमोदनानें प्रियव्रताकडे सर्व भूमंडळाचें पालन करण्याचें काम सोंपवून, अति भयंकर अशा विषयरूप विषाच्या डोहापासून आपण दूर झाला.

## प्रियव्रताचें चरित्र.

परीक्षिता, ह्याप्रमाणें प्रियव्रताकडे राज्यकारभार आल्यावर तो ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणें तत्संबंधी सर्व कामें यथास्थितपणें करूं लागला. आदिपुरुष ब्रह्मदेव हा सर्व जगाचीं संसारबंधनें तोडण्यास समर्थ आहे, अशी श्रद्धा ठेवून त्यानें रात्रंदिवस त्याच्या चरणकमलाचें ध्यान चालविलें; त्या योगानें कामक्रोधादिक सर्व मळ नाहींतसे होऊन त्याचें अंतःकरण अगदीं शुद्ध झालें; व त्यानें निष्कामबुद्धीनें सर्व पृथ्वीचें राज्य केलें; आणि ब्रह्मदेव, नारद व स्वायंभुव मनु ह्यांनीं त्याच्याकडे जो अधिकार सोंपविला होता, त्याचें त्यानें चीज करून दाखविलें. पुढें त्यानें विश्वकर्मा प्रजापतीच्या बर्हिष्मती नामक कन्येशीं विवाह केला. तिच्यापासून त्याला शील, गुण, कर्म, रूप, शौर्य इत्यादि त्याच्या उत्तम गुणांस अनुरूप असे दहा पुत्र व शेवटीं ऊर्जस्वती नामक एक कन्या झाली. त्या पुत्रांना अनुक्रमें आग्नीध्र, इध्मजिव्ह, यज्ञबाहु, महावीर, हिरण्यरेता, घृतपृष्ठ, सवन, मेधातिथि, वीतिहोत्र आणि कवि अशीं अग्नीचीं नांवें ठेविलीं होतीं. ह्यांपैकीं कवि, महावीर व सवन हे तिघे नैष्ठिक ब्रह्मचारी होते. त्यांनीं लहानपणापासूनच आत्मज्ञानाचा अभ्यास चालवून परमहंसांच्या आश्रमाचा स्वीकार केला. पुढें त्या आश्रमामध्येंच, जितेंद्रिय असे ते तिघे महर्षि, सर्व प्राणिमात्राचा मुख्य आधार जो श्रीहरि, त्याच्या चरणारविंदांचें एकसारखें ध्यान करूं लागले; कोणताही भयप्रसंग उत्पन्न झाला असतां त्याचें निवारण करण्याकरितां श्रीकृष्णासच शरण गेलें पाहिजे, अशी त्यांच्या मनाची खातरी होऊन त्यांची परमात्म्याच्या ठिकाणीं दृढ भक्ति उत्पन्न झाली; व त्यामुळें त्यांचें अंतःकरण शुद्ध होऊन त्या ठिकाणींच त्यांस भगवत्स्वरूपाचें प्रत्यक्ष दर्शन होऊं लागलें; आणि त्यामुळें देहादि उपाधींचा निरास होऊन परमेश्वर व आपण भिन्न आहों ही त्यांची अद्वैतबुद्धि समूळ नष्ट झाली, व ते भगवत्स्वरूप बनले ! परीक्षिता, प्रियव्रत राजाला दुसऱ्या स्त्रीपासून उत्तम, तामस व रैवत नांवाचे झालेले तिघे पुत्र पुढें मन्वंतरांचे अधिपति झाले. असो. प्रियव्रतानें एकशें दहा कोटि वर्षेपर्यंत पृथ्वीचें राज्य केलें. त्याचा पराक्रम असा कांहीं लोकोत्तर होता कीं, त्यानें कोणतेंही कृत्य आरंभिलें असतां, त्यांत त्यास यशप्राप्ति झाली नाहीं असें कधींच घडलें नाहीं. त्याच्या बाहूंची शक्ति केवळ अवर्णनीय होती; इतकी कीं, त्यानें नुसती धनुष्याची दोरी ओढिली असतां, केवळ टणत्कारानेंच पाखंडवादी लोक निर्मूळ होत. असो. प्रियव्रताचा व बर्हिष्मतीचा विवाह झाल्यानंतर राणी बर्हिष्मतीचा आनंद उत्तरोत्तर वाढत चालला. स्त्रियांचे शृंगारादिक

विलास तिच्या ठिकाणीं उन्नत होऊं लागले: राजाकडे तिनें प्रणयानें अनेकवार चोरून पहावें, मोठ्या लज्जेनें व संकोचानें हळूच स्मित करावें, व विनोदपर भाषणें करावीं. आपल्या स्त्रीचे हे मनोहर विलास अवलोकन करून इकडे राजानेंही आपण कामाधीन व अनुरक्त आहों असें दाखवावें; परंतु वास्तविकपणें त्याच्या मनावर त्या विलासांचा तादृश परिणाम झाला नाहीं. कारण, त्यानें ऐहिक उपभोगातील आशय मनामध्यें परिपूर्ण जागृत ठेविला होता. ह्याप्रमाणें राजाचा क्रम चालू असतां एकदा त्याच्या मनांत आलें कीं, मेरु पर्वताच्या सभोंवतीं प्रदक्षिणा करून भगवान सूर्यनारायण भूमंडलावर प्रकाश पाडितो खरा, परंतु तो सर्वत्र एकदम पाडीत नाहीं;—अर्ध्या पृथ्वीवर मात्र प्रकाश व राहिलेल्या अर्ध्या पृथ्वीवर अंधकार! ही गोष्ट कांहीं बरी नाहीं. परमेश्वराच्या उपासनेमुळें प्रियव्रताचा पराक्रम फारच वाढला होता. त्यानें लागलाच सूर्याच्या रथासारखा वेगवान व तेजःपुंज असा एक रथ सिद्ध केला; व जगावरील रात्रीचा आतां दिवस करावयाचा असा निर्धार करून, सूर्याच्या मागोमाग मेरु पर्वताच्या भोंवतीं तो सात वेळां प्रदक्षिणा करीत फिरला. तेव्हां लोकांस तो दुसरा सूर्यच वाटला; व त्याच्या देदीप्यमान तेजामुळें पृथ्वीवर कोठेंही अंधकार म्हणून झाला नाहीं.

### सप्तद्वीपें व सप्तसमुद्र.

राजा, ह्याप्रमाणें प्रियव्रत राजानें मेरु पर्वताच्या भोंवतालीं सात प्रदक्षिणा केल्या; तेव्हां त्याच्या रथचक्रांच्या धांवेनें जे सात खाडे पडले, ते सप्तसमुद्र होत; व त्यांच्यामुळेंच पृथ्वीवर सप्तद्वीपें झालीं. त्या द्वीपांचीं नांवें—जंबु, प्लक्ष, शाल्मलि, कुश, क्रौंच, शाक आणि पुष्कर हीं होत. त्यांचीं प्रमाणें—पहिल्याच्या दुप्पट दुसरें, दुसऱ्याच्या दुप्पट तिसरें, अशीं अनुक्रमानें चढतीं असून, तीं एकाच्या बाहेर दुसरें, अशा क्रमानें अनुक्रमें रचिलेलीं आहेत. क्षारसमुद्र, इक्षुरसमुद्र, मद्यसमुद्र, घृतसमुद्र, दुग्धसमुद्र, दधिमंडसमुद्र व शुद्धोदकसमुद्र हे सप्तसमुद्र होत. हे आतील द्वीपांप्रमाणें एकाच्या बाहेर दुसरा, असे असून अनुक्रमें एकेकाच्या दुप्पट असे, जणूं काय द्वीपांच्या बाहेरील खंदकच आहेत! प्रियव्रत राजानें जंबुद्वीपादि सात ठिकाणीं आग्नीध्र, इध्मजिव्ह, यज्ञबाहु, हिरण्यरेता, घृतपृष्ठ, मेधातिथि आणि वीतिहोत्र ह्या पुत्रांपैकीं एकेकाची स्थापना करून, त्यांजकडे त्या त्या द्वीपाचा राज्यकारभार सोंपविला. प्रियव्रत राजानें आपली दुहिता ऊर्जस्वती ही शुक्राचार्यास दिली. शुक्राचार्याला हिच्यापासून देवयानी नांवाची कन्या झाली. राजा परीक्षिता, ईश्वराच्या चरणधूलीनें ज्यांनीं आपले मनोविकार जिंकले आहेत, अशा पुरुषांच्या ठिकाणीं लोकोत्तर पराक्रम असणें ह्यांत कांहीं नवल नाहीं. कारण, परमात्म्याच्या भक्तांच्या अंगीं सामर्थ्यच विलक्षण असतें. राजा, मनुष्य अगदीं हीन जातीचा जरी असला, तरी त्यानें भगवंताचें एकवार स्मरण केलें असतां तो तात्काळ संसारबंधनांतून मुक्त होतो. असो. त्या प्रियव्रत राजानें आपल्या बुद्धिवैभवानें व शरीरबळानें मोठमोठाले पराक्रम केल्यानंतर एकदा त्याच्या मनांत आलें कीं, भगवान नारद मुनींच्या पायांचा आश्रय करून मला ज्ञान प्राप्त झालें असतां, मागाहून माझ्यावर हा राज्यरूपी संसार येऊन पडला, व आजपर्यंत मीं तदनुरूप कार्य केलीं; परंतु आतां ह्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. ह्या संसाराचा बंध जर मीं तोडून टाकिला नाहीं, तर माझ्या आत्म्याचें सुख नष्ट होईल ह्याचा विचार मीं केला पाहिजे. अरेरे! मीं हें फारच अनुचित कृत्य केलें. सुखोपभोगाच्या ठायीं कपट झालेल्या ह्या माझ्या इंद्रियांना मीं मूर्खपणानें स्वैर वर्तन करूं दिलें! अरेरे!

ह्यांनीं मला अंधकारानें परिपूर्ण अशा भयंकर कूपांत लोटून दिलें; आतां मीं ह्याच्या बाहेर कसें पडावें? असो. झालें तेवढें पुरे आतां! मीं आजपर्यंत सर्वस्वीं आपल्या स्त्रीच्या स्वाधीन होऊन तिच्या इच्छेप्रमाणें केवळ खेळांतील माकडासारखा वागलों, तेव्हां ह्याला काय म्हणावें! माझें सर्व ज्ञान नष्ट कसें झालें? धिक्कार असो मला!

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षिता, ह्याप्रमाणें प्रियव्रतास राज्याचा अगदीं वीट येऊन गेला. त्याच्या अंतर्यामीं भगवच्चिंतन चालू होतेंच; त्यामुळें त्यास सद्बोध होऊन, त्यानें आपल्या आज्ञाधारक पुत्रांना यथान्याय पृथ्वीचें राज्य विभागून दिलें. तसेंच, जिच्याबरोबर त्यानें ह्या वेळेपर्यंत अनेक प्रकारचे विलास केले, ती राणी व साम्राज्यसंपत्ति ह्यांस त्यानें धिक्कारपूर्वक प्रेतवत् समजून त्यांचा त्याग केला, व तो फिरून परमेश्वरभक्तींत निमग्न झाला; आणि पूर्वीं नारदांनीं जो मार्ग त्यास सांगितलेला होता, त्याचें त्यानें पुनः अवलंबन केलें. परीक्षित राजा, प्रियव्रतानें जें लोकोत्तर कृत्य केलें, तें परमात्म्याशिवाय दुसरा कोणीही करण्यास समर्थ नाहीं. त्यानें कोणतें कृत्य केलें तें नीट ध्यानांत आण: पृथ्वीवरील अंधकार नाहींसा करण्याकरितां त्यानें रथांत बसून सूर्याच्या मागून सात प्रदक्षिणा केल्या, व चक्रांच्या धावांनीं खाडे पाडून सप्तसमुद्र निर्माण केले; तेव्हां हें आश्चर्य नव्हे काय? शिवाय, पृथ्वीवर सप्तद्वीपांची रचना केली, व प्राणिमात्राच्या सुखाकरितां त्यानें प्रत्येक द्वीपामध्यें नद्या, पर्वत, अरण्यें इत्यादि निर्माण करून मर्यादा स्थापन केल्या. ह्याप्रमाणें सर्व लोकांच्या सुखासाठीं झटणाऱ्या प्रियव्रतानें स्वर्ग, मृत्यु व पाताळ ह्या लोकांतील वैभवास नरकतुल्य मानून विष्णुभक्तीचा स्वीकार केला, तेव्हां केवढा हा त्याचा प्रभाव बरें!

## अध्याय दुसरा.

—:०:—

### आग्नीध्र राजा व पूर्वचित्ति अप्सरा ह्यांची भेट.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—राजा, अशा प्रकारें प्रियव्रत राजा नारदांच्या उपदेशाप्रमाणें भगवच्चिंतनांत निमग्न झाल्यावर, त्याचा पुत्र आग्नीध्र हा आपल्या पित्याच्या आज्ञेप्रमाणें जंबुद्वीपाचें राज्य करूं लागला. त्यानें आपल्या प्रजेचें पोटच्या लेंकराप्रमाणें संगोपन केलें. आग्नीध्राला पितृलोक प्राप्त व्हावा अशी इच्छा होती, व तो प्राप्त होण्यास पोटीं पुत्रसंतान असावें लागतें, म्हणून त्यानें तपश्चर्या करण्याचा निश्चय केला; व मंदर पर्वताच्या गुहेंत पूजासाहित्य जमवून एकाग्र चित्तानें त्यानें ब्रह्मदेवाची आराधना सुरू केली. तेव्हां ती गोष्ट लक्ष्यांत आणून आदिपुरुष ब्रह्मदेवानें आपल्या सभेंत गायन करणाऱ्या पूर्वचित्ति नांवाच्या अप्सरेला संभोगासाठीं त्याच्याकडे पाठविलें. तेव्हां ती, आग्नीध्र राजा ज्या आश्रमांत होता, त्याच्या समीप प्राप्त झाली. तेथें एक अतिशय सुंदर उपवन होतें. त्यांत नानाप्रकारच्या वृक्षांची दाट गर्दी होऊन गेलेली होती. त्याच्या शाखासमुदायांवर, मनोरम अशा सुवर्णवल्ली आंतून व बाहेरून गुंफून टाकल्याप्रमाणें खुलत होत्या. त्या उंचसखल वृक्षवल्लींवर मयूरादिक पक्ष्यांचीं जोडपीं बसून सुस्वर शब्द करीत होतीं त्या उद्यानामध्यें कमळांनीं भरलेलीं अशीं अनेक निर्मळ सरोवरें असून त्यांमध्यें कुक्कुट, कारंडव, राजहंस वगैरे पक्षी होते. मयूरादिकांच्या शब्दांनीं त्यांस स्फुरण येऊन तेही विचित्र स्वर काढीत होते. अशा त्या उपवनामध्यें ती अप्सरा हंसगतीनें इकडे तिकडे फिरत असतां, तिच्या पायांतील नूपुरादिक अलंकारांचा मधुर शब्द होऊं लागला. आग्नीध्र राजा किलकिले डोळे ठेऊन समाधि लावून बसला होता. अप्सरेच्या पावलांचा शब्द

कानीं पडतांच त्यानें किंचित् नेत्र उघडले. त्याची दृष्टि तात्काळ त्या सुंदरीच्या अति मनोहर विलासांवर गेली. तीही कांहींशी अधिक जवळ आली; व मधुकरी ज्याप्रमाणें पुष्पांच्या भोंवतीं घिरटया घालीत राहते, त्याप्रमाणें त्या राजाच्या आसमंतात् ती घिरटया घालूं लागली! परीक्षिता, अप्सरा म्हटली म्हणजे ती दृष्टीस पडतांच तिच्या चालण्याची ढब, हावभाव, प्रेमकटाक्ष, मधुर भाषण व निर्कोप अवयव ह्यांना देवांस सुद्धां मोह पडावयाचा, मग मनुष्यांची कथा काय! त्या सुंदरीची मूर्ति दृष्टीस पडतांच आग्नीध्राच्या हृदयांत कामदेवानें संचार केला. तिच्या मंदहास्ययुक्त मुखांतून निघणाऱ्या मधुर भाषणाच्या योगानें तर राजाच्या मनानें फारच उचल खाल्ली. त्या अप्सरेच्या शरिरास इतका सुगंध होता कीं, त्यास लुब्ध होऊन भ्रमरांचे थवेचे थवे तल्लीन होऊन तिच्याभोंवतीं गरगर फिरूं लागले; त्या भ्रमरांचा प्रतिकार करण्याकरितां ती पहिल्यापेक्षां अधिक जलद चालूं लागली, आणि त्यामुळें कंपायमान झालेले तिचे कुचकलश, वेणीपाश व कमरपट्टा अवलोकन करून राजाचें मन अधिकच मोहित झालें. तेव्हां तो गोंधळून जाऊन त्या अप्सरेला वश करण्याकरितां वेडगळासारखें तिच्याशीं बोलूं लागला.

### आग्नीध्राचें पूर्वचित्तीशीं भाषण.

आग्नीध्र राजा पूर्वचित्तीस म्हणाला:—अहो मुनिमहाराज, आपण कोण आहां? व आपल्या मनांत ह्या पर्वतावर काय करावयाचें आहे? आपण भगवंताची विलक्षण मायाच आहां असें मला वाटतें? (तो त्या अप्सरेच्या भुंवयास लक्षून तिला म्हणतो,) "गडया, तुझ्याजवळ सज्ज न केलेलीं अशीं दोन धनुष्यें आहेत; हीं तूं स्वताच्या संरक्षणाकरितां घेतलीं आहेस, किंवा संसाररूप अरण्यांत विषयासक्त झालेला माझ्यासारख्या मृगांना विद्ध करण्याकरितां घेतलीं आहेस?" (तिच्या नेत्रांस लक्षून तिला म्हणतो,) "महाराज, आपलें सामर्थ्य मोठें विलक्षण दिसतें. हे आपल्याजवळ बाण दिसत आहेत; ह्यांना पातीं कमलाप्रमाणें आहेत, पण दांडा वगैरे कोठें दिसत नाहीं तो? हे बाहेरून तर मोठे रम्य व सुंदर भासतात; परंतु ह्यांचीं अग्रें फार तीक्ष्ण आहेत. मुने, ह्या वनांत फिरून आपल्या मनांत हे बाण कोणावर टाकावयाचे आहेत बरें! कृपा करून माझ्यासारख्या मंदावर आपला पराक्रम गाजवूं नका म्हणजे झालें!" (त्या अप्सरेच्या दैहिक सुगंधाला भुलून भ्रमरांचा घोळका तिच्याभोंवतीं जमला होता त्याकडे पाहून तो तिला म्हणतो,) "भगवन्, हे पहा आपले शिष्य आपल्या सभोंवतीं मोठ्या मार्मिकपणानें सामवेदाचा पाठ गात गात फिरत आहेत. ऋषींनीं ज्याप्रमाणें वेदशाखांचा स्वीकार केला, त्याप्रमाणें आपल्या जटेंतून गळणाऱ्या पुष्पांचें हे ग्रहण करीत आहेत. अहो ब्रह्मनिष्ठ, आपल्या पायांमध्यें बांधलेल्या पिंजऱ्यांमधील सारिकांचा स्पष्ट शब्द तर ऐकूं येत आहे; पण त्यांतल्या सारिका कुठें दिसत नाहींत त्या! मुनिवर्य, आपल्या नितंबमंडळावर कदंबाच्या फुलाप्रमाणें देदीप्यमान असें अग्निवलय (सोन्याचा कमरपट्टा) चमकत आहे, पण आपलें वल्कल कोठें गेलें?" (नंतर तो त्या अप्सरेच्या उच्च स्तनांकडे पाहून तिला म्हणतो,) "ऋषे, आपण आपल्या सुंदर शृंगांत काय भरून ठेविलें आहे हो! महाराज, ह्यांत आपण कांहीं तरी अमोल व दुर्मिळ वस्तु भरून ठेविली असावी असें वाटतें. कारण, हा पहा आपला कटिभाग इतका कृश असतांही आपण हें एवढें मोठें ओझें वागविण्याचा प्रयास करीत आहां. महाराज, आपण ह्या शृंगांना तांबूस व सुवासिक असा जो पंक लाविला आहे, त्यानें तर माझा हा सर्व आश्रम सुगंधित करून सोडला आहे! परमप्रियमित्रा, तुझें राहण्याचें स्थान मला दाखीव. माझ्यासारख्यांच्या मनाची चलबिचल करून

सोडणारे असले हे अपूर्व अवयव धारण करणारे, व मधुर भाषणें, हृदयंगम विलास, तेजस्वी अधरोष्ठ, हास्यविनोद इत्यादिकांच्या योगानें माझ्यासारख्यांस वश करून टाकणारे लोक ज्या स्थलीं आहेत, त्या स्थलीं जाण्याविषयीं मी अतिशय उत्कंठित झालों आहें." (तांबूलचर्वणानें रंगलेल्या तिच्या तोंडाकडे पाहून तो तिला म्हणतो,) "गड्या, तूं आपल्या उपजीविकेसाठीं कोणता पदार्थ भक्षण करितोस बरें? पहा, तूं ज्या पदार्थाचें चर्वण करीत आहेस, त्याचा होमद्रव्यासारखा सुगंध सुटला आहे. मला वाटतें, तूं विष्णूचीच प्रतिमा आहेस. कारण, विष्णूप्रमाणें तुझ्या कानांत सुंदर व रत्नजडित मकराकार कुंडलें शोभत आहेत. तुझें मुख पाहून तर मला सरोवराचीच आठवण होते. सरोवरांत माशांचीं युग्में जशीं चंचल असलेलीं दिसतात, तसे तुझे नेत्र चंचल दिसत आहेत. सरोवरें जशीं द्विजांच्या (पक्ष्यांच्या) ओळींनीं शोभतात, तशाच तुझ्या मुखांत द्विजांच्या (दांतांच्या) ओळी शोभत आहेत. सरोवरावर, कमलगंधाला लुब्ध झालेले भ्रमरांचे थवेचे थवे जसे इतस्ततः भ्रमण करीत असलेले दिसतात, तसे तुझे कुरळकेश तुझ्या मुखकमलावर भ्रमण करीत असलेले म्हणजे विखुरलेले दिसत आहेत! तूं आपल्या नाजुक हातानें फेंकलेला हा चेंडू दशदिशा फिरत आहे व माझ्या नेत्रांस फिरवीत आहे! अरे! तुझा केशकलाप सुटला आहे, इकडे अजून तुझें लक्ष नाहीं कसें? अरेरे! तुला स्पर्श करण्यास लंपट झालेला हा वायु तुझें वस्त्रही हरण करीत आहे, तेव्हां आतां काय म्हणावें? हे तपोधना, तपस्व्यांच्या तपाचा भंग करणारें असें हें रूप तुला कोणत्या खडतर तपश्चर्येनें प्राप्त झालें बरें? मित्रा, त्वां माझ्याबरोबर येथें तपश्चर्या करावी हेंच प्रशस्त; अरे—पण कदाचित् सृष्टीची वृद्धि करणारा जो ब्रह्मदेव, त्याच्या मनांत माझ्यावर तर कृपा करण्याचें आलें नसेलना? सुंदरी, मला वाटतें, ब्रह्मदेवाच्या तपश्चर्येचेंच हें फल असावें;—तुला ब्रह्मदेवानेंच मजकडे पाठविलें आहे, ह्यांत संशय नाहीं. तुझ्या ठिकाणीं आसक्त झालेलें माझें मन व नेत्र हीं लवमात्र देखील दुसरे ठिकाणीं जाऊं इच्छित नाहींत. सुंदरी, तूं माझें मन इतकें वश करून घेतलें आहेस कीं, मी आतां तुला मुळींच सोडणार नाहीं. प्रिये, तुला वाटेल तिकडे तूं मला आपल्याबरोबर घेऊन चल. मी तुझ्या मर्जीप्रमाणें वागण्यास एका पायावर तयार आहें. सुंदरी, तुझ्या सख्यांनीं सुद्धां ह्या वेळीं माझें कार्य साधून देण्यास मला मदत करावी, अशी माझी इच्छा आहे."

श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा, आग्नीध्र हा स्त्रियांना वश करून घेण्यांत फारच चतुर होता. तो देवांसारखा बुद्धिमान असल्यामुळें त्यानें रतिविषयक मधुर भाषणांनीं त्या देवांगनेचा गौरव करून तिचें मन आपल्याकडे इतकें वळविलें कीं, बुद्धि, शील, रूप, वय, संपत्ति व औदार्य ह्यांनीं त्या महाबलाढ्य राजाला ती पूर्णपणें वश झाली; व शेवटीं त्या जंबुद्वीपाच्या अधिपतीपाशीं राहून सहस्त्रावधि वर्षेंपर्यंत पृथ्वीवरील व स्वर्गांतील नानाप्रकारचे भोग तिनें भोगिले.

### आग्नीध्राची संतति.

परीक्षिता, त्या राजश्रेष्ठ आग्नीध्राला तिजपासून नाभि, किंपुरुष, हरिवर्ष, इलावृत्त, रम्यक, हिरण्मय, कुरु, भद्राश्व आणि केतुमाल ह्या नांवांचे नऊ पुत्र झाले. हे नऊ पुत्र तिला प्रतिवर्षी एक एक ह्याप्रमाणें झाल्यावर त्या पुत्रांना राजाच्या घरीं ठेवून ती पूर्वचित्ति फिरून ब्रह्मदेवाजवळ जाऊन पूर्ववत् त्याची सेवा करूं लागली. इकडे ते नऊही पुत्र आपल्या मातेच्या अनुग्रहानें स्वभावतांच मोठे बळकट व पराक्रमी निपजले. पुढें आग्नीध्रानें जंबुद्वीपाचे नऊ विभाग केले; व प्रत्येकाला आपल्या एकेका पुत्राचें नांव ठेवून ज्याच्या त्याच्या नांवाचा विभाग ज्याला त्याला देऊन टा-

किला. आग्नीध्राची विषयवासना अजून तृप्त झाली नव्हती. ती अप्सरा म्हणजे त्याला परमपुरुषार्थ वाटत असल्यामुळें, तिच्या प्राप्तीकरितां वेदोक्त कर्मे करून त्यानें तिचा लोक मिळविला. परीक्षित राजा, आग्नीध्रानें जो लोक मिळविला, त्या लोकांत पितर आनंदानें राहतात. आग्नीध्र मरण पावल्यावर नाभि आदिकरून त्याच्या नऊ पुत्रांनीं मेरूच्या नऊ कन्यांशीं विवाह केले. ह्या कन्यांचीं नांवें मेरुदेवी, प्रतिरूपा, उग्रदंष्ट्री, लता, रम्या, शाम्या, नारी, भद्रा आणि देववीति अशीं होतीं.

## अध्याय तिसरा.

—:०:—

### नाभिराजाचें चरित्र.

शुकाचार्य म्हणतात:—परीक्षिता, नाभिराजाला पुत्रप्राप्तीची फार इच्छा होती, आणि मेरुदेवीला तर संतान होईना; तेव्हां त्यानें आपल्या पत्नीसहवर्तमान एकाग्र चित्तानें यज्ञपुरुषाच्या प्रसादाकरितां यज्ञ आरंभिला. त्यानें निर्मल चित्तानें परमेश्वरावर पूर्ण श्रद्धा ठेवून यज्ञसंबंधी प्रवर्ग्य नांवाचीं कर्मे करण्यास सुरुवात केली. राजा, ईशप्राप्ति होण्याकरितां द्रव्य, देश, काल, मंत्र, ऋत्विज, दक्षिणा व विधान हे सात उपाय सांगितले आहेत; परंतु ह्या उपायांचें अवलंबन करणाऱ्या पुरुषाच्या ठिकाणीं श्रद्धा व चित्तशुद्धि नसेल, तर हे उपाय करूनही ईश्वरप्राप्ति होणार नाहीं हें ध्यानांत ठेव. नाभिराजाची अमर्याद भक्ति पाहून त्याच्याविषयीं भगवंताच्या मनांत करुणा उत्पन्न झाली,व भक्ताची कामना पूर्ण करण्याचा निश्चय करून त्यानें आपलें सुंदर व स्वतंत्र असें रूप प्रकट केलें. भगवंताची मूर्ति पाहून त्या यज्ञांतील ऋत्विज, सदस्य व यजमान नाभिराजा ह्यांस जो आनंद झाला, तो काय सांगावा! भगवंताची परमदेदीप्यमान मूर्ति चतुर्भुज असून त्या भुजांच्या ठिकाणीं शंख, चक्र, कमल व गदा हीं आयुधें होतीं. कटिप्रदेशीं पिवळा पितांबर परिधान केलेला असून वक्षस्थलावर श्रीवत्सलांछन शोभत होतें. कंठामध्यें वनमाला असून तिच्या मध्यभागीं कौस्तुभ मण्याची प्रभा फांकत होती. मस्तकावर मुकुट झळकत असून इतर अवयवांच्या ठिकाणीं कुंडलें, कडीं, करगोटा, हार, बाजूबंद, नूपुरें इत्यादि अलंकार धारण केले होते. त्या पुरुषोत्तमाचें असें मनोरम स्वरूप पाहून, दारिद्र्याला द्रव्याची ठेव सांपडली असतां जसा आनंद होतो, तसा तेथील ऋत्विजादिकांस आनंद झाला; व त्यांनीं भगवंताच्या चरणकमलीं आपलीं मस्तकें लीन करून भक्तिपुरःसर त्याची स्तुति करण्यास आरंभ केला.

### यज्ञपुरुषाची स्तुति.

ऋत्विज म्हणाले:—हे देवाधिदेवा, आम्हां सेवकांची पूजा त्वां वारंवार ग्रहण करणें अवश्य आहे. देवा, आम्ही संसारांत निमग्न झालों असल्यामुळें, आमच्या अंगीं तुझें गुणवर्णन करण्याचें सामर्थ्य कोठून असणार! तुला वारंवार नमस्कार करावा म्हणून आम्हांला गुरूंनीं शिकविलें आहे, तें अगदीं योग्य होय. देवा, तुझें नाम, रूप इत्यादिकांचें वर्णन करावयास तुझ्याशिवाय कोणीही समर्थ नाहीं. वास्तविक तुला नामरूप नाहींच. कारण, तू प्रकृति व पुरुष ह्यांहूनही पलीकडे आहेस; तेव्हां प्रपंचांतील नांवें, रूपें व आकृति ह्या तुझ्या ठिकाणीं संभवतील तरी कशा? ह्याकरितां, देवा, आम्ही तुला केवळ नमस्कार मात्र करीत आहों, त्याचा तूं स्वीकार कर. देवा, संसारी लोकांच्या दृष्टीनें जरी तुझ्या अद्भुत चरित्राचा आम्ही विचार केला, तरी तुझ्या ठिकाणीं इतके उत्तमोत्तम गुण आढळून येतात कीं, त्या सर्वांचा पाठ आम्हांस करितां येईल असें मानणें व्यर्थ आहे. भगवंता, तुझ्या ठिकाणीं जे कांहीं लोकोत्तर गुण आहेत, त्यांचें मुख्य लक्षण—सर्व लोकसमुदायाचीं पातकें नष्ट करणें हेंच आहे. देवा,

तुझा उदारपणा किती म्हणून वर्णन करावा? तुझ्या दासानें भक्तिपूर्वक सद्गदित होऊन यथाशक्ति तुझी स्तुति केली, किंवा उदक, शुद्ध पल्लव, तुलसी, दूर्वा इत्यादिकांनीं तुझी पूजा केली, तरी तूं संतुष्ट होतोस. तेव्हां, भगवन, सांप्रत नाभिराजानें विपुल सामुग्री जमवून जो हा यज्ञ चालविला आहे, त्याचें, वास्तविक पाहिलें असतां तुला कांहींच विशेष नाहीं. कारण, तुझ्या स्वरूपाचा विचार केला असतां असें स्पष्ट दिसतें कीं, सर्व पुरुषार्थ तुझ्या ठिकाणीं नित्य मूर्तिमंत सिद्ध आहेत; तेव्हां अमुक एक गोष्ट तुला दुसऱ्याकडून प्राप्त झाली पाहिजे असा अर्थ नाहीं. आम्ही भक्ति करितों व यज्ञयागादिक जीं कर्मे आचरितों, त्यांचा हेतु केवळ आमच्या भोगेच्छा तृप्त व्हाव्या एवढाच असतो. आमचें बरें कशापासून होईल, व आमचा नाश कशापासून होईल हेंही आम्हांस कळत नाहीं इतके आम्ही मूर्ख आहों. आम्हीं जी तुझी आराधना केली, तिची तर तुला वस्तुतः अपेक्षा नाहींच. ह्यावरून, तूं ह्या ठिकाणीं प्रकट झालास ह्याचें कारण तुला आमची अतिशय करुणा आली हेंच आहे. मूर्ख लोकांस असेंही वाटण्याचा संभव आहे कीं, तूं आमच्या पूजेनें प्रसन्न होऊन प्रकट झालास; परंतु हा त्यांचा भ्रम होय. देवा, ह्या पूजेचें फल तुला कांहींएक नाहीं; पण आम्हांस तिजपासून किती मोठें फल मिळालें पहा! देवा, आतां तुझ्या प्रसादानें आम्हांस मोक्ष मिळून आमची योग्यता तुझ्याप्रमाणें होणार ह्यांत संशय नाहीं. हे यज्ञपुरुषा, नाभिराजाच्या यज्ञांत तूं आम्हांस प्रत्यक्ष दर्शन दिलेंस, हाच आम्हांला फार मोठा वर मिळाला. आतां आम्हांस तुझ्यापाशीं दुसरा वर मागण्याची अपेक्षाच उरली नाहीं. देवा, आमचें केवढें भाग्य म्हणून सांगावें! मोठमोठे मुनि वैराग्याच्या योगानें तीव्र ज्ञान संपादितात, त्या ज्ञानाग्नीनें आपल्या अंगचे सर्व मल दग्ध करून टाकितात, तुझ्यासारखी चित्तशुद्धि करितात, व सर्वत्र अद्वैताचा प्रत्यय घेतात, तरी त्यांस तुझें प्रत्यक्ष दर्शन घडत नाहीं. त्यांस रात्रंदिवस तुझ्या अमोघ व कल्याणकारण गुणांचें वर्णन मात्र करून तृप्त असावें लागतें. पुरुषोत्तमा, तुझ्या दर्शनानें आम्ही कृतार्थ झालों आहों, तरी आम्ही एक वर तुझ्यापाशीं मागतों तो आम्हांस दे. स्खलन, क्षुधा, पतन, जृंभण, संकट इत्यादि आपत्तींमध्यें, ज्वरितावस्थेंत, किंवा मरणकालीं आम्ही परस्वाधीन झालों असतां, तुझें स्मरण होण्याकरितां, तुझ्या गुणांवरून तुला पडलेलीं नांवें नेहमीं आमच्या जिव्हेच्या ठिकाणीं असावीं. कारण, तुझ्या नामस्मरणानें आमचीं सर्व पातकें नष्ट होऊन आम्हांस आपत्कालीं धैर्य उत्पन्न होईल. भगवंता, आणखी आमचें असें मागणें आहे कीं, हा नाभिराजा पुत्रप्राप्तीची इच्छा करीत आहे त्याची इच्छा तुझ्यासारखा पुत्र व्हावा अशी आहे. हे भक्तकामकल्पद्रुमा, तुझी कृपा झाल्यास ऐहिक व पारलौकिक असें पाहिजे तें सुख प्राप्त होईल; इतकेंच नव्हे, तर मोक्षाची सुद्धां प्राप्ति होईल. ह्याकरितां, भिकाऱ्यानें कुबेरापाशीं जाऊन कण्या मागाव्या, तशा प्रकारें हा तुझ्यासारख्या प्रभूजवळ हीं क्षुद्र वस्तु मागत आहे, तरी त्याबद्दल आश्चर्य करण्याचें कारण नाहीं. कां कीं, नारायणा, तुझी माया तशीच विलक्षण आहे; तिचा पराजय कोणाच्यानेंही झाला नाहीं, व कोणालाही तिच्या गतीचें यथार्थ ज्ञान होत नाहीं. जोंपर्यंत मनुष्याच्या हातून सत्पुरुषाच्या चरणांची सेवा घडली नाहीं, तोंपर्यंत त्याच्या बुद्धीवर ब्रह्मज्ञानाचा प्रकाश पडत नाहीं, व त्यामुळें ऐहिक विषयांच्या अंगचे विषारी गुण त्याच्या प्रत्ययास येत नाहींत. देवा, तुला अनेक महत्त्वाचीं कार्यें असतांना आम्हीं तुला ह्या क्षुद्र कृत्यासाठीं बोलाविलें ह्याजबद्दल क्षमा कर. परमेश्वरा, आम्ही विषयासक्त, अज्ञानी

व मंद आहों हें मनांत आणून, आमच्या हातून जे प्रमाद घडले असतील त्यांकडे दुर्लक्ष कर. हे त्रैलोक्यपते, ज्ञानी व अज्ञानी ह्या दोघांवरही तुझी सारखी दृष्टि असते; ह्याकरितां, आमच्या प्रमादांकडे तूं लक्ष देणार नाहींस, असा आम्हांस पुरता भरंवसा आहे.

### भगवद्भाषण.

श्रीशुकाचार्य म्हणतातः–परीक्षित राजा, ऋत्विजांनीं परमात्म्याची अशा प्रकारें स्तुति केल्यावर नाभिराजानें भगवंताच्या पायांवर मस्तक ठेवलें. तेव्हां मोठ्या करुणेनें तो भक्तवत्सल प्रभु म्हणालाः "ऋषींहो, मी व माझेसारखा दुसरा ही "कल्पना, मी ब्रह्मस्वरूप असल्यामुळें, संभवत "नाहीं. आतां, द्विज म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व "वैश्य ह्यांमध्यें श्रेष्ठ जे ब्राह्मण, त्यांच्या मुखावाटे "जें कांहीं निघतें, तें माझ्या मुखांतूनच निघाल्या-"प्रमाणें आहे; कारण ब्राह्मण हें माझें मुख होय. "माझ्यासारखा पुत्र व्हावा म्हणून तुम्हीं प्रार्थना "केली. हें अवघड तर खरेंच; परंतु ब्राह्मणांचें "वचन कदापि अन्यथा व्हावयाचें नाहीं; ह्यास्तव, "माझ्यासारखा दुसरा मिळणें शक्य नसल्यामुळें, "मी स्वतांच नाभीच्या उदरीं अवतार घेईन."

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षिता, मेरुदेवी हा सर्व प्रकार पहात होतीच. नाभीच्या उदरीं मी स्वतः अवतार घेईन, असा वर देऊन भगवान गुप्त झाले. राजा, भगवंताची लीला मोठी अगाध आहे. भगवंताचे मनांत नग्न तपस्व्यांचे, ज्ञानी लोकांचे व नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यांचे धर्म सांगण्याकरितां अवतार घ्यावयाचा होताच. नाभिराजाकडील यज्ञामध्यें महान महान ऋषींनीं परमेश्वराला प्रसन्न करून घेतलें, तेव्हां त्यांचे व राजाचे मनोरथ पूर्ण करण्याचें आयतेंच निमित्त साधून, नाभिराजाच्या अंतःपुरांत मेरुदेवीच्या उदरीं भगवंतानें शुद्धसत्त्वस्वरूप अवतार घेतला!

---

# अध्याय चौथा.

—:०:—

## नाभिपुत्र ऋषभदेवाची बाललीला व नाभिराजाची जीवन्मुक्ति.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षिता, नंतर भगवंतानें मेरुदेवीच्या उदरीं जन्म घेतलें. जन्मतांच त्या मुलाच्या हस्तपादादिक अवयवांच्या ठिकाणीं वज्रांकुशादि चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. जसजसें तें बालक मोठें होऊं लागलें, तसतसा, सर्व भूतांविषयीं समता, शांति, वैराग्य व ऐश्वर्य ह्या महाविभूतींचा प्रभाव त्याच्या ठिकाणीं अधिकाधिक दृग्गोचर होऊं लागला. तेव्हां मंत्री, प्रजा, ब्राह्मण व देव ह्या सर्वांस, त्या पुत्रानें राज्यासनावर बसून भूतलाचें संरक्षण करावें, अशी फारच इच्छा होऊं लागली. त्या पुत्राचें दिव्य शरीर पाहून सर्वजण त्याची फार प्रशंसा करीत. त्याचें शरीर जसें लोकोत्तर होतें, तसेंच त्याचें तेज, बल, ऐश्वर्य, यश, पराक्रम, आवेश इत्यादि सर्व लोकोत्तर असल्यामुळें पित्यानें त्याचें ऋषभ (श्रेष्ठ) असें नांव ठेविलें. ऋषभाची ही लोकोत्तर कीर्ति श्रवण करून इंद्रालाही त्याच्या भाग्याबद्दल मत्सर उत्पन्न झाला, आणि त्यानें त्याच्या राज्यांत अवर्षण पाडिलें! इंद्राचें हें वर्तन पाहून भगवान ऋषभदेव मनांत हसला, व त्यानें आपल्या योगबलानें अजनाभवर्षांत पर्जन्याची वृष्टि केली. असो. परीक्षिता, इकडे, आपल्या इच्छेनुरूप पुत्र झाल्यामुळें नाभिराजास जो आनंद झाला, तो सांगतां पुरवत नाहीं. त्याला आनंदाचें भरतें आल्यामुळें तो गहिंवरून गेला, व त्याच्या मुखावाटे अक्षरही निघेनासें झालें. हे कुरुकुलावतंसा परीक्षिता, भगवन्मायेचा प्रभाव मोठा कठिण! अद्यापही नाभिराजा मायिक दृष्टीनेंच वागत होता. त्या मनुष्यरूपधारी पुराणपुरुषास, प्रपंचांत निमग्न झालेला तो नाभिराजा, बाळा, वत्सा, अ-

सेंच म्हणत असे. अशा प्रकारें अतिशय आवडीनें त्या पुत्राचे लाड व लालनपालन करीत असतां नाभिराजास फारच समाधान वाटे. पुढें भगवत्कृपेचा परिणाम लवकरच नाभिराजाच्या मनावर झाला. राज्यांतील लहानथोर सर्व मंडळी आपल्या पुत्राच्या ठिकाणीं अनुरक्त आहे असें पाहून, नाभिराजानें त्यास ब्राह्मणांच्या हवालीं केलें, व धर्मरक्षणाकरितां त्यांजकडून त्याला अभिषेक करविला; आणि आपण मेरुदेवीसहवर्तमान बदरिकाश्रमास गेला. तेथें शमदमादि साधनें संपादून त्यानें घोर तपश्चर्या चालविली, व नरनारायणांची उपासना करून कालगतीनें तो जीवन्मुक्त झाला. परीक्षित राजा, त्या थोर नाभिराजानें जें कांहीं करून दाखविलें, तें कोणाही पुरुषाकडून होणें कठिण आहे. नाभिराजाचीं कर्मे इतकीं निर्मल होतीं कीं, प्रत्यक्ष श्रीहरीस त्याचा पुत्र व्हावें लागलें! राजा, नाभिराजानें ब्राह्मणांवर एवढी एकनिष्ठ भक्ति ठेविली कीं, त्याच्या यज्ञांत ब्राह्मणांनीं आपल्या अद्वितीय सामर्थ्यानें त्यास प्रत्यक्ष यज्ञपुरुषाचें दर्शन करून दिलें! तेव्हां असा ब्रह्मभक्त राजा दुसरा सांपडेल काय?

### ऋषभसंतति व तिचा आचार.

परीक्षित राजा, भगवान ऋषभदेव आपल्या वर्षाला ( खंडाला ) कर्मभूमि मानीत असे. त्यानें प्रथम गुरुगृहीं राहून विद्याध्ययन केलें. ऋषभदेवाची गुरुगृहांतील दिनचर्या म्हणजे विद्याध्ययनाविषयींचा कित्ताच होता. त्याचा विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर आचार्यांनीं त्यास अनेक वर देऊन गृहस्थाश्रम स्वीकारण्यास अनुज्ञा दिली. ऋषभदेवास, विषयसुखाकरितां किंवा कर्ममार्गाचें आचरण करून पारलौकिक साधनाकरितां गृहस्थाश्रम स्वीकारावयाचा होता, असा मुळींच अर्थ नाहीं. त्याचा प्रधान उद्देश—आपलें गृहस्थाश्रमांतील वर्तन पाहून लोकांनीं त्याचें अनुकरण करावें, हा होता. गृहस्थाश्रम स्वीकारण्याविषयीं आज्ञा होतांच त्यास देवेंद्रानें आपली कन्या जयंती दिली. तिला वरून त्यानें श्रुति व स्मृति ह्यांना अनुसरून शास्त्रोक्त रीतीनें गृहस्थाश्रम चालविला. ऋषभदेवास जयंतीच्या ठिकाणीं त्याच्यासारखेच शंभर पुत्र झाले. त्यांत भरत नांवाचा पुत्र सर्वांत वडील होता. तो महायोगी असून त्याच्या अंगीं अत्युत्तम गुण होते. परीक्षित राजा, ह्या देशाला भारतवर्ष नांव पडण्याचें कारण तोच होय. कुशावर्त, इलावर्त, ब्रह्मावर्त, मलय, केतु, भद्रसेन, इंद्रस्पृक्, विदर्भ व कीकट हे त्याच्या पाठचे नऊ पुत्र होत. हे दहा पुत्र बाकीच्या नव्वदांपेक्षां श्रेष्ठ होते. त्यांपैकीं कवि, हरि, अंतरिक्ष, प्रबुद्ध, पिप्पलायन, आविर्होत्र, द्रुमिल, चमस व करभाजन हे नऊजण महाभगवद्भक्त होत. त्यांनीं लोकांना भागवतधर्म दाखवून दिला. भगवंताच्या माहात्म्यानें भरलेलें असें त्यांचें उत्तम चरित्र म्हणजे शांतीचें केवळ निधानच होय. तें वसुदेव व नारद यांच्या संवादरूपानें पुढें (एकादशस्कंधांत) वर्णन करूं. त्यांचे कनिष्ठ बंधु जयंतीचे एक्यायशीं पुत्र, पित्याच्या आज्ञेप्रमाणें महाकर्मठ ब्राह्मण बनले. ह्यांचें शील फार उत्तम असून ते मोठे वैदिक होते. ते वारंवार यज्ञ करीत असून त्यांचें आचरणही फारच पवित्र होतें.

### ऋषभदेवाचें अवतारचरित्र.

भगवान ऋषभदेव हा स्वतंत्रच होता. तो पूर्ण परब्रह्म असल्यामुळें, प्रापंचिक लोकांना पीडा करणाऱ्या अनर्थपरंपरा त्याच्यापासून आपण होऊनच दूर सरलेल्या होत्या. तो केवळ सच्चिदानंदमूर्ति परमात्माच होता; तथापि मायापाशांत सांपडलेल्या जनांप्रमाणें त्यानें कर्मे करण्यास आरंभ केला. कालपरंपरेनें चालत आलेल्या धर्माप्रमाणें वागण्यांत त्याचा हेतु असा होता कीं, अज्ञ लोकांस धर्ममार्ग सुलभ व सुनिश्चित करून द्यावा. त्यानें आपली वृत्ति सर्वत्र समान व शांत अशी ठेविली. त्यानें सर्वांशीं मित्रभाव धरिला

भूतदया तर त्याच्या ठिकाणीं ओतप्रोत भरलेली होती. सारांश, त्यानें स्वतः धर्म, अर्थ, कीर्ति, प्रजा, भोग व मोक्ष हीं संपादून, आपल्या आचरणानें लोकांस गृहस्थाश्रमाचा उत्तम कित्ता घालून दिला. वेद हे परमात्म्यापासूनच निर्माण झाले असल्यामुळें त्यांतील आज्ञा व गूढार्थ हीं वस्तुतः ऋषभदेवास माहीत होतीं; तथापि तें ज्ञान त्यानें ह्या वेळीं गुप्त ठेविलें. तो वेळोवेळीं प्रत्येक गोष्ट ब्राह्मणांस विचारी, व ते सांगतील तसे उपाय योजून आपल्या प्रजेचें प्रतिपालन करी. त्यानें ब्राह्मणांच्या उपदेशाप्रमाणें सर्व यज्ञांचें शंभर वेळां अनुष्ठान केलें; व द्रव्य, देश, काल, वय, श्रद्धा, ऋत्विज इत्यादिकांपैकीं ज्या यज्ञास ज्याची आवश्यकता असेल, त्याची यथास्थित सिद्धता करून ते सर्व पार पाडिले. भगवान ऋषभदेव ह्या खंडाचें पालन करीत असतां, दुसऱ्यापासून आपल्याला अमुक वस्तु मिळावी, अशी इच्छा कोणास कधींही होत नसे. प्रत्येकाला, आपल्याजवळ जें नाहीं तें जगांत कोठेंच नाहीं, असें वाटत असे; फक्त आपल्या राजाच्या ठिकाणीं आपलें प्रेम वाढत जावें, एवढीच काय ती हाव प्रत्येकाला सुटलेली होती. भगवान ऋषभदेव एके प्रसंगीं फिरतां फिरतां ब्रह्मावर्त क्षेत्रीं गेला. तेथें मोठमोठ्या ऋषींची सभा भरली होती. त्याच्या प्रजाजनांपैकींही पुष्कळ जण त्याच्या दर्शनाकरितां त्या ठिकाणीं जमले असून त्याचे पुत्रही त्या ठिकाणीं आले होते. तेव्हां ऋषभाच्या मनांत आलें कीं, आपले पुत्र जरी जितेंद्रिय आहेत व नम्रतेमुळें आणि प्रेमभरानें ह्यांचें वर्तन जरी व्यवस्थित आहे, तरी ह्यांच्या निमित्तानें आपल्या प्रजेसही शिक्षण मिळेल, ह्यास्तव ह्यांस ह्या प्रसंगीं उपदेश करावा; असा विचार करून त्यानें भाषण करण्यास आरंभ केला.

# अध्याय पांचवा.

-:०:-

## ऋषभदेवाचा उपदेश.

ऋषभदेव म्हणतोः—मुलांनो, मनुष्यदेहाचें इतिकर्तव्य विषयांचा उपभोग घेणें हें नव्हे. विषयोपभोगांपासून परिणामीं कष्ट भोगावे लागतात. विष्ठा भक्षण करून उदरपूर्ति करणारे कृमिकीटक देखील विषयसुख भोगतात. तें भोगावयास मिळालें म्हणजे मनुष्यानें मोठा पुरुषार्थ साधला असा मुळींच अर्थ नाहीं. ह्याकरितां, मनुष्यानें कांहीं असाधारण कृत्य करण्याची हाव बाळगिली पाहिजे. मुलांनो, मनुष्यदेह प्राप्त झाल्यावर तपश्चर्या करावी हेंच श्रेयस्कर आहे; ह्यास्तव तुम्ही दिव्य तप करा. तपश्चर्येनें तुमची चित्तशुद्धि होईल, व चित्तशुद्धि झाली म्हणजे तुम्हांस ब्रह्मस्वरूप अवगत होईल. बाबांनो, मनुष्यजन्म मिळाल्यावर प्राण्यानें ज्ञानवृद्धि करण्यास झटलें पाहिजे. त्याकरितां त्यानें सत्पुरुषांची सेवा करावी. सत्पुरुषांची सेवा म्हणजे मुक्तिमार्गाचें द्वारच होय. स्त्रीपुत्रादिकांच्या पाशांत गुंतून गेलेल्या ऐहिकसुखावलंबी पुरुषांचा आश्रय म्हणजे नरकाचें द्वार होय. ह्याकरितां त्यांपासून दूर रहा. सत्पुरुष ओळखावे कसे म्हणून म्हणाल, तर त्यांच्या खुणा लक्षांत ठेवा. सत्पुरुषांचा सर्व भूतांविषयीं समभाव असतो. त्यांच्या अंतःकरणांत कामक्रोधादिक मनोविकार कधींच उचंबळत नाहींत. सर्वांचेंच कल्याण व्हावें हा विचार त्यांच्या अंतर्यामीं सदासर्वकाळ वसत असतो. त्यांचें आचरण नित्य उत्तम प्रकारचें असतें. त्यांना परमेश्वराच्या ठिकाणीं लय लावणें हाच परमपुरुषार्थ वाटतो. आपली व आपल्या आप्तेष्टांची शरीरप्रकृति नीट राखून नानाप्रकारचीं सुखें संपादन करावीं, हीच वासना धारण करणाऱ्या लोकांवर सत्पुरुष कधींही प्रेम करीत नाहींत.

ते लोकांशीं अगदीं कामापुरता संबंध ठेवितात. मुलांनो, इंद्रियतृप्ति करणें म्हणजे आपलें ज्ञान नष्ट करणें आहे. मनुष्य इंद्रियांच्या संतोषासाठीं उद्योग करूं लागला कीं त्याची विवेकबुद्धि शिथिल झाली म्हणून समजावें. ह्याप्रमाणें एकदा त्याचा विवेक शिथिल झाला कीं तो भलतीं कर्मे करण्यास प्रवृत्त होतोच. मुलांनो, इंद्रियें तृप्त करून ज्या देहाच्या सुखासाठीं झटावयाचें, तो देह कसा आहे, ह्याचा नीट विचार करा. एक तर ह्याचें तुम्हीं कितीही रक्षण केलें तरी हा नष्ट होणारा आहे; व दुसरें असें कीं, हा नष्ट झाला तरी ह्याच्या सुखाकरितां जीं पापें तुम्हीं केलीं असतील, त्यांचीं फळें भोगल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ह्याकारितां, बाबांनो, ह्या देहांतून कायमची सुटका होईल असा प्रयत्न करणेंच इष्ट आहे. फिरून दुसऱ्या देहाकरितां आतां तयारी करूं नका. परमेश्वराच्या सत्स्वरूपाची जोंपर्यंत जागृति असते, तोंपर्यंत देहादिकांची प्राप्ति होत नाहीं; परंतु त्या सत्स्वरूपाचा विसर पडला म्हणजे कर्म करण्याकडे मनाची प्रवृत्ति होते, व तत्काल शरीरबंधन भोगावें लागतें. ह्याप्रमाणें मनावर अज्ञानाचें आवरण पडलें म्हणजे पुरुष कर्माधीन होतो; व फिरून जोंपर्यंत माझ्या ठायीं ( परमेश्वराच्या ठायीं ) त्याची निष्ठा दृढ होत नाहीं, तोंपर्यंत तो जन्ममरणाच्या फेऱ्यांत गुंतून राहतो. मुलांनो, एकदा शरीरबंधन प्राप्त झालें, म्हणजे ज्या अज्ञानामुळें मनुष्यास तें प्राप्त झालेलें असतें, तें अज्ञान अधिकाधिक वाढत जातें. त्यास मग देहाभिमान उत्पन्न होतो; इंद्रियांचे व्यापार यथार्थ भासूं लागतात; व इंद्रियांच्या वासना तृप्त करण्याच्या भरीस पडून तो त्रिविध ताप भोगतो. वासनांमध्यें विषयसुखाची वासना ही फारच बलवत्तर आहे. ह्या वासनेच्या योगानें, ही माझी स्त्री, व हा माझा पति, अशी मनुष्याच्या मनाची दृढ भावना होते; व ह्यामुळेंच पुढें गृह, क्षेत्र, पुत्र, आप्त, द्रव्य इत्यादिकांच्या ठिकाणीं 'हीं माझीं आहेत' असा मोह उत्पन्न होतो. जेव्हां मनुष्याच्या मनांतील हा कर्मजन्य अभिमानग्रंथि पूर्णपणें शिथिल होतो, तेव्हां तो स्त्रीपुत्रादिकांच्या मोहापासून मुक्त होऊन सायुज्यपद पावतो. बाबांनो, हा

### वृथाभिमान सुटण्यास उपाय

सांगतों तो तुम्ही ऐका: " हंसरूपी गुरु जो मी ( परमेश्वर ), त्या मजवर भक्ति ठेवा; माझ्या सेवेंत तत्पर रहा; भोगेच्छा सोडा; शीतोष्णादिक द्वंद्वें सहन करा; ह्या लोकीं व परलोकींही प्राण्याला संकटेंच भोगावीं लागतात असें माना; ज्ञानाची इच्छा धरा; तपश्चर्या करा; काम्यकर्मे करूं नका; जीं कर्मे कराल तीं मला अर्पण करा; माझ्या कथा गात जा; माझ्या भक्तांचा सहवास करा; माझे गुण वर्णन करा; कोणाशींही वैर करूं नका; सर्वभूतीं समदृष्टि ठेवा; शांति धरा; शरीर व गृह ह्यांच्यावरील आसक्ति सोडण्याची इच्छा ठेवा; अध्यात्मशास्त्राचा अभ्यास चालवा; एकांतवास स्वीकारा; प्राण, इंद्रियें व मन ह्यांचें पूर्णपणें आकलन करा; गुरूंच्या व वेदांच्या आज्ञा प्रमाण माना; ब्रह्मचर्य पाळा; कर्तव्य करण्यास चुकूं नका; मिथ्या भाषण करूं नका; परमेश्वर सर्वत्र आहे, असा अनुभव तुम्हांला येईपर्यंत ज्ञानाची पाठ सोडूं नका; आणि समाधीचा अभ्यास करा. पुत्रांनो, जर तुम्ही ह्या गोष्टी कराल, तर तुमच्या अंगीं धैर्य धरण्याची, प्रयत्न करण्याची व मनन करण्याची शक्ति येईल, व तुम्ही अनायासानें अहंकाररूपी लिंगदेहास सोडून देण्यास समर्थ व्हाल. मुलांनो, ज्या गोष्टी करा म्हणून तुम्हांस सांगितल्या, त्या म्हणजे तुम्हीं अगदीं नित्य केल्या पाहिजेत असें नाहीं. ज्या अज्ञानामुळें तुम्ही ह्या जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडलां, तें अज्ञान नष्ट झालें, व फिरून त्याचा संसर्ग होणार नाहीं अशी तुमच्या मनाच्या ठिकाणीं दक्षता उत्पन्न झाली, म्हणजे तुम्हीं

त्या सोडून दिल्या तरी चालतील. ज्या राजाच्या, पित्याच्या किंवा गुरूच्या मनांत माझी कृपा व्हावी व माझा लोक मिळवावा अशी इच्छा असेल, त्यानें प्रजांना, पुत्रांना किंवा शिष्यांना असाच उपदेश करावा. शिकविलेली गोष्ट त्यांनीं केली नाहीं तरी क्रोधाविष्ट होऊं नये;—त्यांना फिरून उपदेश करावा. जे अज्ञ लोक कर्ममार्गांत निमग्न झाले असतील, त्यांचा तो कल हळू हळू कमी करावा. सारांश, त्यांच्या हातून काम्यकर्में होणार नाहींत, असा प्रयत्न चालू ठेवावा. एखाद्याला कर्ममार्गास प्रवृत्त करणें म्हणजे अंधळ्याला खड्डयांत ढकलण्यासारखें आहे. ह्याकरितां, कर्ममार्गास प्रवृत्त करण्यासारखें अयोग्य कृत्य तुमच्या हातून होऊं देऊं नका."

ऋषभदेव पुढें म्हणाला, "बाबांनो, माझ्या सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, लोकांस आपला स्वार्थ कशांत आहे हें आपोआप समजत नाहीं; ते विषयोपभोगाच्या ठिकाणीं नेहमीं लुब्ध असतात; अल्प सुखाकरितां ते दुसऱ्यांचा द्रोह करितात; आणि आपणांस पुढें भयंकर दुःखें भोगावीं लागतील, हें त्यांस अज्ञानामुळें मुळींच कळत नाहीं; ह्यास्तव, ज्ञात्यानें लोकांचें अज्ञान दूर करण्याचा प्रयत्न करावा; व अंधळा मार्ग चुकत असतां त्यास जसें मार्गास लावावयाचें, तसेंच ज्ञात्यानें कामासक्त पुरुषांस निवृत्तिमार्गास लावावें. संसाररूप मृत्यूच्या तावडींत सांपडलेल्या पुरुषाला जो सोडवीत नाहीं, तो गुरु नव्हे, तो आप्त नव्हे, ती माता नव्हे, तें दैवत नव्हे, अथवा तो पतिही नव्हे, हें पक्कें ध्यानांत धरावें.

"पुत्रहो, माझें हें शरीर मीं स्वेच्छेनें धारण केलें आहे; ह्यामुळें हें तुमच्या तर्कशक्तीच्या पलीकडलें आहे. सत्वगुण हें माझें हृदय असून माझ्या हृदयाच्या ठिकाणीं मूर्तिमंत धर्म वास करितो. अधर्माचा मीं पूर्णपणें त्याग केला आहे; व ह्यामुळेंच मला ज्ञाते लोक ऋषभ म्हणतात. मुलांनो, तुम्ही माझ्या शुद्धसत्त्वात्मक हृदयापासून झालां आहां, ह्यामुळें तुम्ही स्वभावतः थोर आहां. माझें तुम्हांस असें सांगणें आहे कीं, तुम्ही आपला ज्येष्ठ बंधु भरत ह्याची निष्कपटबुद्धीनें सेवा करा. तुम्हीं भरताची आज्ञा मानिली असतां माझी शुश्रूषा केल्याप्रमाणें होईल, व त्या योगें प्रजेचेंही पालन होईल.

### श्रेष्ठाश्रेष्ठनिर्णय.

"मुलांनो, सचेतन व अचेतन अशा दोन प्रकारच्या सृष्टीमध्यें मृत्तिका, पाषाण इत्यादि अचेतन स्थावर पदार्थांपेक्षां वृक्षादिक सचेतन स्थावर पदार्थ श्रेष्ठ होत. सचेतन स्थावर पदार्थांपेक्षां जंगम पदार्थ ( प्राणी ) श्रेष्ठ होत. त्यांमध्यें कृमिकीटकांपेक्षां पश्वादिक श्रेष्ठ; पश्वादिकांपेक्षां मनुष्यें श्रेष्ठ; त्यांच्याहून प्रमथ ( देवयोनिविशेष ) श्रेष्ठ; प्रमथांहून गंधर्व श्रेष्ठ; त्यांहून सिद्ध श्रेष्ठ; आणि त्यांहून किन्नरादि देवपरिचारक श्रेष्ठ होत. किन्नरांपेक्षां असुर श्रेष्ठ, त्यांपेक्षां इंद्रादिक देव श्रेष्ठ, देवांच्यापेक्षां दक्षादिक ब्रह्मपुत्र श्रेष्ठ, त्यांमध्यें शंकर मोठा, तो ब्रह्मदेवापासून झाला असल्यामुळें त्याच्यापेक्षां ब्रह्मदेव मोठा, ब्रह्मदेवाला मीच पूज्य असल्यामुळें ब्रह्मदेवाहून मी परमेश्वर मोठा, आणि ब्राह्मण हे मला पूज्य असल्यामुळें ते मजहूनही श्रेष्ठ होत. अहो ब्राह्मणहो, तुमच्याशीं तुलना करण्यासारखा मला कोणीच आढळत नाहीं. लोकांनीं श्रद्धेनें ब्राह्मणांस अन्न दिलें असतां त्यांच्या मुखानें तें मी जितक्या आनंदानें भक्षण करितों, तितक्या आनंदानें अग्निहोत्रामध्यें अग्निमुखीं अर्पण केलेलें अन्नही मी भक्षण करीत नाहीं. पुत्रहो, माझें वेदरूपी सुंदर व पुरातन शरीर ब्राह्मणांमुळेंच सुरक्षित राहिलें आहे. ब्राह्मणांच्या ठायीं परम पवित्र सत्त्व, शम, दम, सत्य, अनुग्रह, तप, तितिक्षा ( सहनशीलता ) आणि अनुभव हे आठ गुण उत्तम प्रकारेंकरून वास करितात. त्यांना माझ्या भक्तीशिवाय दुसऱ्या म्हणजे धनादिक वस्तूंत कांहींच अर्थ वाटत नाहीं. बाबांनो, ब्राह्मणांच्या

मनाची उन्नति इतकी झालेली असते कीं, त्यांना मजपाशीं सुद्धां कांहीं मागावयाचें नसतें. मी देवाधिदेव आहें आणि स्वर्ग व मोक्ष देण्यासही मी समर्थ आहें. असें असतां मजपासून कांहींएक प्राप्त व्हावें असा मोह त्यांस कधींही उत्पन्न होत नाहीं. पुत्रहो, स्थावरजंगम सर्व वस्तु माझीं स्थानें आहेत, असें समजून क्षणोक्षणीं सन्मानपुरस्सर त्यांचा विचार करावा, म्हणजे माझी ( परमेश्वराची ) पूजा केल्याचें फल मिळेल.

"सभासदहो, मन, वाणी, दृष्टि किंवा दुसरीं इंद्रियें ह्यांचें मुख्य कार्य माझी आराधना करणें हेंच होय. मनुष्य जर माझी आराधना करणार नाहीं, तर तो महामोहरूपी यमपाशापासून सुटणार नाहीं."

## ऋषभदेवाची अंतिम दिनचर्या.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—राजा परीक्षिता, ऋषभदेवाचे पुत्र आधींच आत्मानात्मविचारांत निष्णात होते. परंतु आपण बोध केल्याशिवाय तो लोकांच्या मनांत उत्तम प्रकारें प्रतिबिंबित होणार नाहीं, ही गोष्ट मनांत आणून ऋषभदेवानें मोठ्या कळकळीनें आपल्या मुलांस बोध करण्याचें निमित्त करून सर्व लोकांस उपदेश केला. ऋषभदेवाच्या मनांत आतां एक कार्य करावयाचें राहिलें होतें: तें, शांतचित्त व निवृत्तिपर अशा मुनींना भक्ति, ज्ञान व वैराग्य ह्यांचीं लक्षणें सांगून परमहंसधर्माचा उपदेश करणें हें होय. हें काम त्यानें आपल्या भरत नांवाच्या पुत्रावर सोंपविलें. ऋषभदेवाच्या शंभर पुत्रांत भरत हा ज्येष्ठ असून तो महाभगवद्भक्त होता. साधुसंतांच्या ठिकाणीं त्याची अत्यंत निष्ठा असे. ऋषभदेव हा, पृथ्वीचा प्रतिपाल करण्याकरितां भरतास राज्याभिषेक करून व आपण सर्वसंगपरित्याग करून ब्रह्मावर्तांतून बाहेर पडला. ह्या वेळीं एक शरीर मात्र त्याचें शिल्लक राहिलें होतें;—बाकी सर्व कांहीं परब्रह्मीं लीन झालें होतें. तो दिगंबर असून त्याचे केंस अस्ताव्यस्त झालेले होते. त्यानें आहवनीय नामक अग्नीचा आपल्या ठिकाणीं समारोप केला असून त्याची वृत्ति लौकिकदृष्ट्या वेड्यासारखी बनली होती. तो ब्रह्मावर्तांतून बाहेर पडल्यावर त्या अवधूताच्या मागें पुष्कळ लोक गेले. पुष्कळांनीं त्याला बोलाविण्याचा प्रयत्न केला, परंतु तो अंधळ्या, मुक्या, बहिऱ्या किंवा पिशाचानें झपाटलेल्या अशा अतिमंद मनुष्याप्रमाणें वागूं लागला. त्यानें जें एकदा मौनव्रत घेतलें, तें तसेंच चालविलें. नगरें, गांव, खाणी, खेडीं, बागा, डोंगर, वाड्या, सैन्याच्या छावण्या, गोठे, गौळवाडे, व्यापाऱ्यांचे तळ, पर्वत, वनें, आश्रम इत्यादि स्थलीं तो फिरत असतां जागोजागीं नीच लोक त्याला त्रासवून सोडीत; परंतु त्या महात्म्याला त्यापासून कांहींच अपकार होत नसे. हत्तीला माशांनीं त्रास दिला असतां तो ज्याप्रमाणें त्यास मुळींच जुमानीत नाहीं, त्याप्रमाणें ऋषभदेवानें त्या क्षुद्र लोकांनीं दिलेल्या त्रासास मुळींच जुमानिलें नाहीं. परीक्षित राजा, ऋषभदेवाला दुष्ट लोकांनीं दिलेला त्रासच तसा शुष्क असेल, असें तुला वाटेल, तर तसें मात्र नव्हेहो. ते त्याला मोठी भीति घालीत; मारीत; त्याच्या अंगावर मुतत; खाकरे टाकीत; दगड, विष्टा व धूळ फेंकीत; त्याच्यापुढें अधोवायु सोडीत; व त्याला शिव्याही देत; परंतु तो तिकडे मुळींच लक्ष देत नसे. ऋषभदेव पूर्णपणें समजून होता कीं, देह म्हणून ज्याला म्हणावयाचें, तो मिथ्या आहे; देहाचें स्वरूप सत्य आहे असें म्हणणें हा केवळ भास होय; ह्यास्तव देहावर ममत्वाभिमान ठेवणें अगदीं अयोग्य. परीक्षिता, अभिमान कशाविषयीं धरावा व कशाविषयीं धरूं नये, ह्याचा पूर्ण विचार करूनच त्यानें 'हें माझें आहे' किंवा 'हा मी आहें' इत्यादि अहंकार झाडून टाकिल्यामुळें तो आत्मानंदापासून न ढळतां एकटा भूमंडलावर भ्रमण करीत असे. परीक्षित राजा, ऋषभदेवाची अशी अवस्था पाहून लोक आपल्यावरून त्याची परीक्षा करूं लागले.

त्याची आत्मैकनिष्ठा व देहनिरहंकृति लोकांच्या मनांत उतरेना. त्याच्या केवळ बाह्यस्थितीवरून ते त्याजबद्दल अनुमानें बांधूं लागले. त्याचे कोमल हातपाय, भरदार छाती, बळकट खांदे, लठ्ठ मान, तेजःपुंज मुख इत्यादि अवयव पाहून प्रेक्षकाचें मन अगदीं लुब्ध होई. हास्य हें मुळचेंच सुंदर, व तें तर त्याच्या मुखावर नेहमींच खेळे; ह्यामुळें त्याच्या मुखाची कांति अतिशय अवर्णनीय दिसे. त्याचे नेत्र नवीन फुललेल्या कमळदलांप्रमाणें मनोहर असून त्यांतील आरक्त तारा पाहून प्रेक्षकाच्या मनास फारच आल्हाद होई. त्याचे गाल, कंठ, कान व नासिक हे अवयवही तसेच सुबक होते. त्याच्या मुखांत जें गूढ हास्य होतें, त्याचा प्रभाव तर इतका होता कीं, नागरिक स्त्रियांच्या मनांत तत्काल कामोद्दीपन होई. परंतु त्याच्या कुरळ पिंगट जटांचा भार पाठीवर लोळत असे; व शरीर अवधूतासारखें मळलेलें असे. अशी विसंगत स्थिति पाहून, लोकांनीं, त्यास भूतबाधा झाली असावी असें ठरविलें! परीक्षिता, लोकांनीं ऋषभदेवाला वेडा मानून जो त्रास दिला, त्याचा प्रतिकार करणें सर्वथा अयोग्य आहे असें त्यास वाटलें, व त्यानें अजगरव्रत स्वीकारून, कोणी कांहीं करीना, आपण एके ठिकाणीं बसून आपलें प्रारब्धकर्म भोगावयाचें, असा नियम केला. परीक्षित राजा, ऋषभदेवाची पुढील दशा काय सांगावी! तो पडल्या जागीं जें मिळेल तें भक्षण करी; त्याचें खाणेंपिणें, मलमूत्रोत्सर्ग वगैरे विधि त्याच ठिकाणीं होत; तो विष्ठेमध्यें लोळे; त्यामुळें त्याच्या देहावर मळाचीं पुटें बसलीं होतीं! राजा, ह्या वर्णनावरून तुला किळस उत्पन्न होईल, परंतु तसें होऊं देऊं नको. त्याच्या विष्ठेला इतका सुवास येत असे कीं, त्यामुळें आसमंतात् भागीं दहा योजनेंपर्यंत सर्व प्रदेश सुगंधित झाला होता! अशाच प्रकारें तो गाई, हरणें, कावळे ह्यांच्याप्रमाणें चालतांना, उभा असतांना, बसून किंवा निजून, पान, भक्षण अथवा मूत्रोत्सर्ग इत्यादि व्यवहार करीत असे. राजा, भगवान ऋषभदेवानें ह्याप्रमाणें जें योगमार्गाचें अवलंबन केलें, त्याचा हेतु योग्यांनीं कसें वागावें हें दाखवून देण्याचाच होता. वास्तविकपणें तो मोक्षाधिपति असून, श्रुतींमध्यें मनुष्यगंधर्वादिकांना उत्तरोत्तर जो शंभरपट अधिकाधिक आनंद होतो म्हणून सांगितलें आहे, त्या सर्व आनंदाचा त्यास अनुभव होता. सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणीं वास्तव्य करणाऱ्या षड्गुणैश्वर्यसंपन्न वासुदेवाच्या परब्रह्मरूपाचें चिंतन करून देहादिक उपाधींचा निरास केल्यामुळें त्याचे सर्व पुरुषार्थ सिद्ध झाले होते. योगसाधनांनीं त्याची शक्ति इतकी अपूर्व व अद्वितीय झाली होती कीं, त्यानें मनांत आणिलें असतें तर आकाशांत फिरणें, मनाच्या वेगासारखी देहाची गति असणें, गुप्त होणें, परदेहांत प्रवेश करणें, दूरचा पदार्थ ग्रहण करणें इत्यादि गोष्टी त्यास सहजीं करितां आल्या असत्या; परंतु त्या योगसिद्धींचा त्यानें मनानें सुद्धां स्वीकार केला नाहीं.

## अध्याय सहावा.

—:०:—

### ऋषभदेवाचा देहत्याग.

परीक्षित राजानें शुकाचार्यास प्रश्न केलाः—अहो महाभाग, आत्मस्वरूपांत रममाण होऊन व योगरूप वायूनें ज्ञानाग्नि प्रज्वलित करून ज्यांनीं कर्मबीजें जाळून टाकिलीं आहेत, त्या पुरुषांना सहजगत्या प्राप्त झालेल्या योगसिद्धींपासून कधींही क्लेश होत नाहींत, असें जर आहे, तर मग ऋषभदेवानें योगसिद्धींचा मनानें सुद्धां स्वीकार केला नाहीं तो कां बरें?

श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा, तूं म्हटलेंस तें खरें आहे. परंतु बुद्धिमान लोक चंचळ मनाचा मुळींच भरवंसा धरीत नाहींत. ज्याप्रमाणें मृगादिक

श्वापदें जाळ्यांत पकडलीं असतांही, धूर्त पारधी, तीं कदाचित् पळून जातील असें मानीत असतो, त्याप्रमाणें ज्ञानी लोक, मन केव्हां बहकेल ह्याचा नियम नाहीं, असें मानीत असतात. राजा, पहा, मन हें फार अस्थिर आहे. कोणीही ह्याच्याशीं मैत्री करूं नये. ह्याच्यावर विश्वास ठेविल्यामुळेंच शंकरांची बहुत दिवसांची तपश्चर्या व्यर्थ गेली! जशी जारिणी स्त्री जार पुरुषांना आश्रय देऊन त्यांजकडून आपणावर विश्वास ठेवणाऱ्या पतीचा घात करविते, तसें हें दुष्ट मन कामक्रोधादिक रिपूंस आश्रय देऊन त्यांजकरवीं योग्याचा नाश करवितें. ह्यास्तव काम, क्रोध, मद, लोभ, शोक, मोह, भय इत्यादिक शत्रु व कर्मबंधन ह्यांस आदिकारण जें मन, तें एकदा आपल्या स्वाधीन झालें म्हणजे फिरून त्यास न बहकूं देण्याविषयीं कोण बरें दक्षता ठेवणार नाहीं?

श्रीशुकाचार्य पुढें म्हणतातः—परीक्षित राजा, ऋषभदेव हा इंद्रादि लोकपालांनाही भूषणभूत होता; परंतु त्याचा वेष, भाषण व आचरण हीं वेडगळाप्रमाणें असल्यामुळें त्याचा खरा प्रभाव कोणालाच कळून आला नाहीं. त्याच्या मनांत, योगी देहत्याग कशा प्रकारें करितात, ही गोष्ट लोकांना शिकवावयाची होती; म्हणून आपण देहत्याग करून दाखवावा अशी इच्छा त्यास उत्पन्न झाली, आणि परमात्मा व जीवात्मा ह्यांचा अभेद आहे अशी भावना करून, व जीवात्म्यास विषयांतून काढून घेऊन तो स्वस्थ राहिला. राजा, जसें कुंभाराचें चाक, त्याला फिरवणारी काठी काढून घेतली तरी मागून कांहीं वेळ फिरत राहतें, तसें देहाभिमानापासून मन मुक्त झाल्यावरही देहाचे व्यापार कांहीं वेळपर्यंत चालत राहतातच. ऋषभदेवानें अभिमानरूप लिंगदेह सोडून दिला, तरी योगमायेच्या वासनेनें त्याचा देह पृथ्वीवर फिरत राहिलाच. फिरतां फिरतां तो सहजगत्या कोंक, वेंक, कुटक, दक्षिण-कर्नाटक इत्यादि देशांत गेला. तेथें तो कुटक पर्वताच्या उपवनामध्यें तोंडांत पाषाणाचा ग्रास घेऊन, केंस मोकळे सोडून व अगदीं नग्न असा, वेड्यासारखा भटकत राहिला. पुढें वाऱ्याच्या सोसाट्यानें तेथील वेळू एकमेकांवर घासून भयंकर वणवा लागला, व त्या वणव्यांत तें उपवन व ऋषभदेवाचें शरीर हीं जळून खाक झालीं!



### अर्हत् राजा पाखंडी निघेल.

परीक्षित राजा, कोंक, वेंक व कुटक देशांत अर्हत् नांवाचा राजा राज्य करणार आहे. ऋषभदेवाचें सर्व आश्रमांपलीकडलें (परमहंसधर्माचें) आचरण त्याच्या कानीं जाईल. तो त्याचा अभ्यास करील. कलियुगामध्यें अधर्माचा उत्कर्ष व्हावयाचा असल्यामुळें दुर्दैवानें अर्हत् राजाच्या बुद्धीला मोह उत्पन्न होईल. तो निर्भय असा स्वधर्म सोडून देईल, व स्वतांच्या बुद्धीनेंच पाखंडमताची प्रवृत्ति करील. कलियुगामध्यें अगोदर लोक ईश्वराच्या मायेनें मूढ होऊन गेलेले असावयाचे; त्यांतून हा राजा अधर्माचा प्रसार करूं लागला, म्हणजे त्याच्या अनुरोधानें लोक अर्थात् स्वधर्मांतील वर्णाश्रमानुरूप पवित्र आचार सोडून देतील, व देवांचा अपमान करणारीं कृत्यें म्हणजे स्नान न करणें, आचमन न करणें, अमंगलपणा करणें, केंस उपटणें किंवा कातरणें इत्यादिक भलभलतीं कृत्यें मनसोक्त करूं लागतील. कलि म्हणजे अधर्माचें माहेरघर. तो लोकांच्या बुद्धि मूढ करून सोडील, व असें झालें म्हणजे देव, वेद, ब्राह्मण, सत्पुरुष ह्यांच्या ठिकाणची लोकांची श्रद्धा उडून जाऊन ते नास्तिक बनतील. राजा, त्या अर्हतानें स्वबुद्धीनें काढिलेल्या धर्मपंथास वेदाचा आधार असणार नाहीं हें उघडच आहे. त्या अर्वाचीन धर्मावर अर्हताच्या मागून दुसरे लोक अंधपरंपरेनें विश्वास ठेवतील, व आपण होऊन शेवटीं अंधतम नरकामध्यें अचानक जाऊन पडतील! परीक्षिता, हा ऋषभावतार

रजोगुणानें व्याप्त झालेल्या लोकांना मोक्षमार्गाचें शिक्षण देण्यासाठींच भगवंतानें घेतला होता. त्या अवतारासंबंधानें पुरातन काळापासून जे उद्गार निघतात ते सांगतों: “ अहो ! सप्तसमुद्रांकित पृथ्वीच्या पाठीवर जितकीं द्वीपें किंवा वर्षें आहेत, त्या सर्वांत भारतवर्ष फारच मोठें पुण्यस्थान होय; कारण ह्या भारतवर्षांतील लोकास मुरारीचीं कल्याणकारक अवतारचरित्रें गावयास सांपडतात. अहो ! धन्य तो प्रियव्रताचा वंश ! कारण, त्यांत पुराणपुरुषानें अवतार घेऊन मोक्षधर्म सांगितल्यामुळें त्या वंशाची शुद्ध कीर्ति चोहोंकडे गाजत आहे ! अहो ! ऋषभानें जें योगसाधन करून दाखविलें, त्याचें थोड्याबहुत अंशानें अनुकरण करून दाखवीन, असें नुसतें म्हणणाराही कोणी योगी सांपडणार नाहीं. कारण जे योगी म्हणून म्हणवितात, ते, ऋषभदेवानें खऱ्या नव्हत म्हणून टाकून दिलेल्या योगसिद्धींची इच्छा करून त्या प्राप्त करून घेण्याकरितां प्रयत्न करितात. राजा, सकल लोक, वेद, ब्राह्मण व गाई ह्यांमध्यें परमश्रेष्ठ जो भगवान ऋषभदेव, त्याचें परमपावन असें चरित्र मीं तुला निवेदन केलें. ह्यापासून मनुष्यांच्या सर्व दुरितांचा नाश होईल. जो पुरुष एकाग्रचित्तानें श्रद्धापूर्वक हें मंगलकारक आख्यान ऐकेल व दुसऱ्यास सांगेल, त्याची त्या भगवान वासुदेवाच्या ठिकाणीं निश्चित भक्ति जडेल. राजा, भगवद्भक्तांचा महिमा किती तरी वर्णावा ! ज्ञानी लोक भक्तिगंगेंत नित्य स्नान करूनच, अनेक पातकांमुळें प्राप्त झालेला हा संसार व त्यामधील दुर्धर ताप ह्यांपासून मुक्त होतात. एकदा त्यांच्या हातांत भक्ति आली, म्हणजे परमपुरुषार्थ जो मोक्ष तो आपण होऊन त्यांजप्रत आला असतांही ते त्याचा आदर करीत नाहींत; कारण भक्तीमुळें ते भगवंताचे आप्त बनल्यावर त्यांस पुरुषार्थाची आवश्यकताच रहात नाहीं. परीक्षित राजा, भगवान मुकुंद तुम्हां पांडवांचा व यादवांचा पालनकर्ता, धर्मोपदेशक, उपास्यदेवता, मोठा मित्र व क्वचित् प्रसंगीं सेवकही झाला, ही गोष्ट राहूं द्या; परंतु सामान्यतः देखील विचार करितां असें दिसतें कीं, तो भक्ताला फार तर मुक्ति देईल, परंतु भक्ति देणार नाहीं. राजा, ऋषभदेवानें केवढें लोककार्य संपादिलें त्याचा विचार कर. आपल्याला आत्मलाभाचा नित्य अनुभव असल्यामुळें, भोगेच्छा निवृत्त झाल्या असतांही, देहादिकांच्या वासनेनें बुद्धिभ्रष्ट झालेल्या लोकांची कींव येऊन, त्यानें त्रिविध तापांपासून निर्भय करणाऱ्या अशा आत्मस्वरूपाचें लोकांस निरूपण केलें, व त्यांस सद्गतीचा मार्ग दाखविला; तेव्हां हें काय लहानसहान कृत्य आहे ? त्या भगवान ऋषभदेवाला नमस्कार असो !

## अध्याय सातवा.

--:o:—

### भरताचीं यज्ञयागादिक कृत्यें.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, महाभगवद्भक्त अशा भरताला पृथ्वीच्या पालनाकरितां ऋषभदेवानें अभिषेक केला म्हणून सांगितलें, तो राज्याभिषेक त्यानें संकल्पमात्रानेंच केला होता. पित्याकडून राज्य करण्याची आज्ञा होतांच त्या आज्ञेला अनुसरून भरतानें विश्वरूपाची कन्या पंचजनी हिला वरिलें. अहंकारापासून ज्याप्रमाणें पांच सूक्ष्मभूतें जन्मास येतात, त्याप्रमाणें त्या पंचजनीच्या ठिकाणीं भरतापासून अगदीं तत्तुल्य असे पांच पुत्र जन्मास आले. त्यांचीं नांवें सुमति, राष्ट्रभृत्, सुदर्शन, आवरण व धूम्रकेतु अशीं होतीं. पूर्वी ह्या खंडाला अजनाभवर्ष असें नांव होतें, परंतु भरत राज्य करूं लागल्यापासून त्याला भरतवर्ष असें नांव मिळालें. भरत हा महाविद्वान व स्वधर्माला अनुसरून वर्तन करणारा होता. त्यानें आपल्या बापाप्रमाणें व आज्याप्रमाणें आपल्या प्रजेचें मोठ्या दयाळूपणानें

पालन केलें. त्याची प्रजाही आपापलीं कामें योग्य प्रकारें करीत असे. अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, चातुर्मास्य, पशु व सोम अशा सर्व यज्ञकर्मांच्या प्रकृतिविकृतींचें पूर्णपणें ज्ञान संपादून, व चातुर्होत्रविधीच्या योगानें वेळोवेळीं श्रद्धापूर्वक ल्हानमोठे यज्ञ करून त्यानें यज्ञपुरुषाची आराधना केली. नानाप्रकारचे यज्ञ चालू असतां, त्यांचीं अंगें व उपांगें ह्यांचें अनुष्ठान झाल्यावर त्या त्या क्रियांचें जें फळ प्राप्त होई, तें तो परब्रह्मरूप यज्ञपुरुषास अर्पण करीत असे. सूर्य, चंद्र इत्यादि देवतांचे जे मंत्र त्या अनुष्ठानांत म्हणण्यांत येत असत, त्यांचा हेतु त्या देवतांच्या द्वारें प्रत्यक्ष जगत्कर्त्या भगवान वासुदेवाला तृप्त करण्याचा आहे, असें तो मानीत असे. त्याच्या ठिकाणीं परब्रह्मज्ञानाचा प्रकाश आविर्भूत झाल्यामुळें कामक्रोधादिकांचा अंधकार अगदीं नष्ट झाला होता. अध्वर्यूंनीं त्या त्या देवतांना अर्पण करण्याकरितां होमद्रव्यें हातांत घेतलीं, म्हणजे तो त्या त्या देवतांचीं रूपें यज्ञपुरुषाच्या हस्त, पाद, नेत्र इत्यादि अवयवांच्या ठिकाणीं चिंतीत असे. ह्याप्रमाणें भरतानें सर्व कर्में परमात्म्यास अर्पण केल्यामुळें त्याच्या चित्ताची शुद्धि झाली, व नंतर त्याच्या हृदयरूप आकाशांत महापुरुष भगवान वासुदेव ह्याची मूर्ति प्रकट झाली. भगवंताच्या हातांत शंखचक्रादि आयुधें व वक्षस्थळावर श्रीवत्सलांछन असून गळ्यांत कौस्तुभ व वनमाला हीं शोभत होतीं. भगवंताची दिव्य मूर्ति अंतरात्म्याच्या ठिकाणीं दृढ वास करूं लागल्यामुळें भरताची भक्ति दिवसानुदिवस अधिकाधिक वाढत गेली. ह्याप्रमाणें दहा सहस्र वर्षेंपर्यंत काल लोटल्यावर, आतां आपला राज्योपभोग करण्याचा काल समाप्त झाला असें जाणून, वाडवडिलांपासून चालत आलेल्या व आपण स्वतः उपभोगिलेल्या राज्याचे यथायोग्य भाग करून त्यानें आपल्या पुत्रांस ते वांटून दिले; व तो स्वतः राज्यलक्ष्मीनें भरलेलें आपलें घर सोडून पुलहाश्रमीं चालता झाला.

### भरताचा भक्तियोग.

परीक्षित राजा, त्या पुलहाश्रमाचें माहात्म्य फारच अगाध आहे. तेथें भगवान देवाधिदेव श्रीकृष्ण अद्यापही आपल्या भक्तांना दर्शन देऊन त्यांचे मनोरथ पूर्ण करीत असतो. त्या पुलहाश्रमांत गंडकी नांवाची महानदी आहे. ती आपल्या पवित्र उदकानें सर्व आश्रम पावन करिते. तिच्या उदकांत पाषाणमयचक्रें ( शालिग्राम ) अनेक असल्यामुळें तिला चक्रनदी असेंही म्हणतात. भरत राजा त्या आश्रमांतील एका उपवनामध्यें एकटाच रहात असे. विविध प्रकारचीं पुष्पें, पल्लव, तुलसी, उदक इत्यादिकांनीं भगवंताची आराधना करून, व कंदमूळें इत्यादिकांचे नैवेद्य भगवंतास समर्पण करून त्यानें विषयोपभोगांचे अभिलाष नष्ट करून टाकिले, आणि मनोनिग्रह करून शांति संपादिली. ह्याप्रमाणें बरेच दिवस लोटल्यावर भगवंतावरील प्रेमभर अतिशय वृद्धिंगत होत जाऊन त्याचें हृदय इतकें द्रवलें कीं, आराधनेविषयीं सुद्धां त्याच्या मनास उदासीनता उत्पन्न झाली. भगवच्चिंतनानें त्याला इतकें आनंदाचें भरतें यावें कीं, त्याच्या देहावर रोमांच उभे रहावे! भगवद्दर्शनाविषयीं अशी अपूर्व उत्कंठा उत्पन्न व्हावी कीं, प्रेमाश्रूंनीं नेत्र गच्च भरून येऊन त्यास डोळ्यांपुढें दुसरें कांहींही दिसूं नये! अशा रीतीनें परमप्रिय भगवंताच्या चरणकमलांचें ध्यान करितां करितां भक्तियोग अतिशय दृढ होऊन त्याच्या हृदयरूप गंभीर डोहांत परमानंद परिपूर्ण भरला; व त्या आनंदपुरांत त्याची बुद्धि बुडून जाऊन चालू असलेल्या पूजेचेंही त्याला भान राहीनासें झालें! आणि ह्याप्रमाणें भरतानें योग्यासारखा समाधि लावला असतां, आच्छादनार्थ धारण केलेलें मृगचर्म व त्रिकाल स्नानामुळें

निम्न ओला असणारा कुरळ व पिंगट असा जटाभार ह्यांच्या योगानें त्याला लोकोत्तर कांति प्राप्त होई. असो. सूर्यबिंब उदयाचलावर येत असतां, त्यामध्यें असलेल्या भगवान हिरण्मय पुरुषाची स्तुति करण्याकरितां भरत सूर्यमंत्राचा जप करीत असे. त्या मंत्राचा अर्थ असा: "रजोगुणात्मक प्रकृतीच्या पलीकडे असणाऱ्या शुद्धसत्त्वात्मक, व कर्मांचें फल देणाऱ्या अशा सूर्यनारायणाच्या तेजाला आम्ही शरण जातों. हें तेज संकल्पमात्रेंकरूनच जग निर्माण करितें; उत्पन्न केलेल्या ह्या जगामध्यें अंतर्यामिरूपानें प्रवेश करून विविध कामना करणाऱ्या जीवांचें आपल्या चिच्छक्तीनें पालन करितें; व प्राण्यांच्या ठिकाणीं उपाधिरूपानें राहणाऱ्या बुद्धीला गति देतें."

## अध्याय आठवा.

—:०:—

### भरताच्या भक्तियोगांत विघ्न व त्यास हरिणाचा जन्म.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—हे परीक्षित राजा, भरताचा अगदीं कडकडीत भक्तियोग चालू असतांना एकदा असें झालें कीं, त्यानें मलमूत्रविसर्जनादि आवश्यक विधि आटोपून गंडकीमध्यें स्नानसंध्यादिक नित्य कर्में व दुसरीं नैमित्तिक कर्में केलीं; व पुढें तो तीन मुहूर्त ( सहा घटका ) त्या पुण्यनदीच्या कांठीं प्रणवाचा जप करीत बसला. इतक्यांत एक हरिणी अतिशय तृषाक्रांत होऊन एकटी त्या नदीच्या कांठीं आली; ती मोठ्या आवेशानें उदकपान करीत आहे, तों जवळच सिंहाची भयंकर गर्जना झाली! सिंहाचा शब्द कानीं पडतां सर्वच प्राणी भयभीत व्हावयाचे; मग ही तर हरिणी,—स्वभावतांच अतिशय भित्री; ती कावरीबावरी होऊन अतिशयित घाबरून गेली! सिंहाच्या भयानें तिचें देहभान नष्ट झालें! ती नेत्र गरगरां फिरवूं लागली व तहान न भागवितां भयानें एकदम उडी मारून चालती झाली! राजा, परीक्षिता, त्यापासून काय अनर्थ उद्भवला पहाः ती हरिणी गरोदर होती; ह्यास्तव तिनें अवचित उडी मारल्यामुळें व धास्तीमुळें तिचा गर्भ स्वस्थानांतून भ्रष्ट होऊन नदीच्या प्रवाहांत पडला! तेव्हां गर्भपातामुळें, उडी मारण्यामुळें, व जिवाच्या भीतीमुळें ती हरिणी अगदीं व्याकूळ झाली. तिचा कळप दूर निघून गेला व अखेरीस धावतां धावतां ती एका दरींत पडून मरण पावली! इकडे तें बिचारें हरिणाचें पाडस प्रवाहाबरोबर वाहात चाललेलें भरताच्या दृष्टीस पडलें. बंधूची दीन स्थिति पाहून जसा बंधूला कळवळा यावा, तसा त्या निराधार पाडसाला पाहून भरताला कळवळा आला; व त्यानें त्या पोरक्या पोराला आपल्या आश्रमांत नेलें. पुढें त्या हरिणबालकावर भरताची अतिशय ममता बसली. प्रथम त्यास, हें माझें पाडस आहे, असा अभिमान उत्पन्न झाला. तो त्यास तृणादिक खावयास घालूं लागला; लांडग्यांनीं वगैरे त्यास धरूं नये म्हणून जपूं लागला; त्याचें चुंबन वगैरे घेऊं लागला; आणि गोंजारून व खाजवून त्यास खुप करूं लागला. ह्या कामांत त्याचें मन इतकें व्यग्र झालें कीं, अहिंसा, सत्य इत्यादि यम आणि स्नान, संध्या, भगवत्पूजन इत्यादि नियम ह्यांकडे त्याचें दुर्लक्ष झालें; व त्यांपैकीं एकेक गोष्ट हळू हळू सुटत जाऊन कांहीं दिवस गेल्यावर त्याचा पूर्वक्रम अजीबात नाहींसा झाला. त्याला रात्रंदिवस तें हरिणाचें पाडस मात्र दिसूं लागलें. त्याला वाटे कीं, "अरेरे! काय रे ह्या हरिणाची दुःस्थिति ही! कालचक्राच्या फेऱ्यांत सांपडून एका क्षणांत हें स्वकीय जनांस अंतरलें! आतां ह्यास आई, बाप, भाऊबंद, कळपांतले संवगडी वगैरे सर्व मीच आहें. ह्याला माझ्याशिवाय दुसरें कोणी माहीत सुद्धां नाहीं. ह्याचा सर्वस्वीं भंरवसा काय तो माझ्यावर! आतां मला

ह्याचें लालनपालन केल्यावांचून गत्यंतर नाहीं. शरणागताचें सर्वतोपरी रक्षण करणें हें माझें कर्तव्य आहे. हें जर मीं केलें नाहीं, तर मीं पातक केलें असें होईल, हें मला कळत आहे. फार कशाला? अशा प्रसंगीं थोर थोर साधु व मोठमोठे इंद्रियनिग्रही सत्पुरुषही दीनजनांच्या कळवळ्यानें आपले मोठमोठे स्वार्थ सोडून देतात!" परीक्षिता, अशा प्रकारें त्या पाडसावर भरताची विलक्षण आसक्ति जडली. निजणें, बसणें, उठणें, फिरणें, राहणें, खाणें, पिणें इत्यादिक त्याचीं सर्व कृत्यें त्या मृगबालकाबरोबर होऊं लागलीं. दर्भ, फुलें, समिधा, पानें, फळें, मुळें किंवा उदक आणण्याकरितां जेव्हां तो बाहेर जाई, तेव्हां लांडगे, कोल्हे वगैरे त्या अर्भकाला धरतील अशी शंका मनांत आणून, तो आपल्याबरोबर त्यासही बाहेर नेत असे. मार्गांत अल्लडपणामुळें तें इकडे तिकडे पाहूं लागलें, म्हणजे भरताचें मन ममतेनें अगदीं कालवून जाई; आणि मग तो मोठ्या आवडीनें त्यास खांद्यावर घेऊन चाले. असो. ह्याप्रमाणें भरतानें त्या पाडसास अंगाखांद्यावर घेतलें म्हणजे त्यास कांहीं अपूर्व आनंद होत असे. परीक्षित राजा, स्नानसंध्या, पूजन, अर्चन इत्यादि नित्य कृत्यें करीत असतांही भरताचें चित्त एकसारखें त्या हरिणाकडेच लागे. तो मध्येंच उठून त्या पाडसाला पाही, व "बाळा तुझें बरें होवो" असा मोठ्या प्रसन्न मुद्रेनें आशीर्वाद देई. एके वेळीं तें बराच वेळपर्यंत भरताच्या नजरेस पडलें नाहीं. तेव्हां एखाद्या कंजुष माणसाचें डबोलें हरवलें असतां तो जसा कष्टी होतो, तसा तो कष्टी होऊन मोठ्या केविलवाण्या मुद्रेनें व उत्कंठेनें त्या हरिणाचा शोध करूं लागला, आणि मोहजालांत निमग्न होऊन म्हणतो, "अहो! मी किती दुष्ट बरें! अरेरे! म्यां ह्या पातक्यानें केवढा अपराध केला? त्या पोरक्या हरिणबालकाचा मीं दुष्ट पारध्याप्रमाणें घात केला मा! त्या बिचाऱ्यानें माझ्यावर भरवंसा ठेविला, त्याचा असा परिणाम व्हावा काय? देवा! तें पोर आतां माझ्यावर फिरून विश्वास कसें ठेवील? अरे, माझ्या अपराधाकडे दुर्लक्ष करून तें मजकडे येईल काय? बाळा, आतां तुला देवावांचून दुसरा कोण राखणार? देवा, तूं त्याला जवळच्या उपवनांत स्वस्थपणें चरतांना माझ्या दृष्टीस पाडशील काय? अरेरे! लांडगा, कोल्हा, अथवा वाघ ह्यांपैकीं कोणी त्यास खात नसेल ना? अरे! उदय पावून सर्व जगाचें क्षेम करणारा भगवान सूर्यनारायण—वेदत्रयीचा आत्मा—अस्तास चालला, परंतु त्या दीन मृगीनें माझ्या हवालीं करून ठेवलेली ठेव—तिचें पाडस—अजून मजकडे येत नाहीं, तेव्हां आतां काय करावें? देवा, मला मंदभाग्याला तें कसचें सांपडणार! तो मृगकुमार आपणच जर मजकडे येईल, व आपल्या जातीला अनुरूप असे नानाप्रकारचे सुंदर व विनोदकारक खेळ करून दाखवील, तर माझा खेद दूर होईल. त्याची ती लीला किती विचित्र म्हणून सांगावी? तो खेळूं लागला, म्हणजे त्या खेळाकडे चित्त ठेवून म्यां लटकाच समाधि लावावा! समाधींत मीं मध्येंच डोळे उघडून त्याच्याकडे पाहावें, व तेव्हां लागलीच त्यानें मोठ्या प्रेमानें दबत दबत येऊन जलबिंदूप्रमाणें कोमल अशा आपल्या शिंगांनीं मला ढुशा द्याव्या! एखादे वेळीं मीं दर्भावर होमद्रव्यें मांडून ठेविलीं असतां त्यानें तीं विसकटून टाकावीं, व मीं दटावलें म्हणजे भिऊन जाऊन त्यानें आपले सर्व खेळ एकदम बंद करून ऋषिपुत्राप्रमाणें आपले हस्तपादादिक अवयव स्तब्ध ठेवून बसावें!" परीक्षित राजा, अशा प्रकारें नानाविध विलाप करून तो भरत बाहेर जाऊन पाहतो, तों त्यास त्या हरिणशिशूचीं पावलें उठलेलीं दृष्टीस पडलीं. तेव्हां तो फिरून गहिंवरून म्हणूं लागला, "अहो, धन्य ही वसुंधरा! हिनें कोणती एवढी तपश्चर्या केली, कीं जिच्या योगानें हिजवर सुशील हरिणशिशूचीं चिमुकलीं, सुंदर,

आल्हादकारक व मृदु अशीं पावलें रांगेनें उमटून हिला अशी अपूर्व शोभा यावी! ह्या मृगपदपंक्तीच्या योगानें दोन कार्यें घडत आहेत: एक, मला त्या पाडसाचा शोध लागेल अशी आशा उत्पन्न होऊन, कृपणाचें द्रव्य नष्ट झालें असतां तें सांपडण्याचा संभव दिसूं लागतांच त्यास आनंद होतो तद्वत् मला आनंद होत आहे; व दुसरें, स्वर्गाची किंवा मोक्षाची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणांना देवांकरितां यज्ञ करण्यास अनुकूल स्थल प्राप्त होत आहे."

श्रीशुकाचार्य पुढें म्हणतात:—राजा परीक्षिता, इतक्यांत भरताची दृष्टि आकाशांत चंद्राकडे गेली. तेव्हां तो म्हणाला, "अहो, सिंहाच्या भयानें माता मरण पावून पोरका झालेला हरिणकुमार ह्या आश्रमांतुन चुकून गेला, तो ह्या दयाळू भगवान नक्षत्राधिपतीपाशीं सुरक्षित आहे. अहो, हरिणबालकाच्या वियोगामुळें उत्पन्न झालेल्या विरहरूप अग्नीच्या ज्वालांनीं माझें कोमल अंत:करण दग्ध न व्हावें म्हणून, मांत्रिक जसा विषाचा उपशम व्हावा म्हणून दयायुक्त अंत:करणानें थंड पाण्याचें सिंचन करितो, तसा हा भगवान अमृतकर चंद्र मजवर शीत किरणांचें सिंचनच करीत आहे!" परीक्षिता, ह्याप्रमाणें असंभवनीय कल्पनांचे तरंग वाढत जाऊन भरताचें मन फारच व्याकूळ झालें. असो. पुढें तो मृगशिशु सांपडला व सर्व क्रम पूर्ववत् यथास्थित चालू झाला. राजा, ह्या मृगशिशूच्या रूपानें त्याच्यापुढें त्याचें प्रारब्धकर्मच उभें राहून त्याचा सर्व योगाभ्यास सुटला व भगवद्भक्ति नष्ट झाली! कारण, असें नसतें तर, मोक्षाच्या शत्रूंचा म्हणजे त्याग करण्यास कठिण अशा आपल्या औरस पुत्रांचाही ज्यानें पूर्वी त्याग केला, त्या भरताच्या ठिकाणीं, ज्याशीं अर्थाअर्थी कांहींच संबंध नाहीं अशा हरिणबालकाविषयीं आसक्ति कशी बरें उत्पन्न झाली असती? सारांश, त्या राजर्षीचा योगाभ्यास त्या विघ्नामुळें भग्न होऊन, त्यास आत्मसुखाचा अगदींच विसर पडला, व त्याचें प्राक्तनकर्म त्याच्यापुढें मूर्तिमत उभें राहिलें! असो. परीक्षित राजा, इतक्यांत, उंदराच्या बिळाजवळ सर्प येऊन पोहोंचावा, तद्वत् त्याच्या मरणाची वेळ समीप येऊन ठेपली! आपण आतां मरणार ही गोष्ट त्याच्या ध्यानांत आली, तेव्हां सन्निधभागीं असणाऱ्या मृगाबद्दल तो दु:ख करूं लागला; तो मृगही पुत्राप्रमाणें आक्रोश करूं लागला; आणि अशा स्थितींतच त्यानें आपला देह ठेविला, परीक्षिता, भरताचें शरीर नष्ट झालें, परंतु त्याच्याबरोबर, भगवदाराधनाच्या सामर्थ्यानें त्याची पूर्वस्मृति नष्ट झाली नाहीं. अंतकाळीं हरिणाचे ठिकाणीं आसक्ति राहून गेल्यामुळें त्या भरताला पुढें हरिणाचा जन्म प्राप्त झाला. त्या योनींत जन्मल्यावर, पूर्वजन्मांतल्या भक्तिप्रभावामुळें त्यास सर्व पूर्वचरित आठवलें, व आपण ह्या हरिणाच्या जन्मास कां आलों हें मनांत येऊन तो फार पश्चात्ताप करूं लागला. तो म्हणाला, "अरेरे! मी हें काय केलें! ज्ञानी लोकांच्या मार्गापासून मीं भ्रष्ट झालों! अहो, माझा अधिकार किती मोठा होता. मीं सर्वसंगपरित्याग केला! एकांतवासासाठीं पवित्र अरण्याचा आश्रय केला! ब्रह्मचिंतनांत निमग्न झालों! सर्व स्थावरजंगम वस्तूंच्या अंतर्यामीं गूढ असणाऱ्या षड्गुणैश्वर्ययुक्त प्रभु वासुदेवाच्या ठिकाणीं मन लाविलें! त्याविषयीं श्रवण, मनन, निदिध्यास करण्यांत सर्व वेळ घालविला! आणि अशा प्रकारें मीं आपलें मन पूर्णपणें परमात्म्याच्या ठिकाणीं अभिष्ठित केलें असूनही तें पुन: तेथून काढून हरिणाच्या पाडसावर गुंतविलें, तेव्हां केवढें

१ हरणें जेथें फिरतात, तो प्रदेश शास्त्रानें यज्ञकर्मास योग्य मानिला आहे.

हें माझें सौंदर्य!" राजा परीक्षिता, ह्याप्रमाणें अंतर्यामीं वैराग्य उत्पन्न होऊन त्यानें आपल्या हरिणी मातेस सोडून दिलें, व तो फिरून काळंजर पर्वतावरून भगवंताचें वसतिस्थान व शांत स्वभावाच्या मुनींना परमप्रिय अशा पुलहाश्रमीं प्राप्त झाला, आणि शालवृक्षाच्या राईमध्यें मृत्यूची वाट पहात बसला. कोणाशींही सहवास करण्यासंबंधानें त्याला पराकाष्ठेचा वीट आला असल्यामुळें तो तेथें एकटाच फिरत असे, आणि सुकलेलीं पानें, वेली व गवत खाऊन आपली उपजीविका करी. त्याचें सर्व लक्ष हरिणजन्म प्राप्त होण्यास कारणीभूत झालेलें प्राक्तनकर्म केव्हां सरेल, इकडेच काय तें लागलें होतें; आणि अखेरीस आपला मृत्युकाल जवळ आला असे कळतांच, तीर्थोदकांत आकंठ बसून त्यानें त्या मृगशरिराचा त्याग केला!

## अध्याय नववा.

—:०:—

### जडभरताची कथा.

श्रीशुकाचार्य म्हणतात—परीक्षित राजा, पुढें असें झालें कीं, अंगिरा गोत्रांत कोणी एक फार चांगला ब्राह्मण नांदत होता; त्याच्या ठिकाणीं शमदमादि गुण उत्तम असून तपश्चर्या, वेदाध्ययन, सत्पात्रीं दान, नित्यानंद, सहनशीलता, विनय, कर्मविद्या, निर्मत्सरता, आत्म्याविषयीं अद्वैतज्ञान व धर्माचरणापासून होणारें समाधान हीं मूर्तिमंत वास करीत होतीं. त्याला दोन स्त्रिया होत्या. पहिल्या स्त्रीपासून त्याला त्याच्याप्रमाणेंच वेदाध्ययनशील, सदाचारसंपन्न, सुंदर व उदार असे नऊ पुत्र झाले; व दुसऱ्या स्त्रीपासून एक पुत्र व कन्या अशीं दोन मुलें झालीं. त्यांपैकीं जो मुलगा होता, तो, मृगतनूचा त्याग करून ब्राह्मणत्व पावलेला राजर्षिश्रेष्ठ भरत होय असें म्हणतात. राजा, भरताचें हें शेवटलेंच जन्म;–त्यास ह्यापुढें फिरून जन्म प्राप्त झालें नाहीं. भगवंताच्या अनुग्रहामुळें त्याला पूर्वजन्मपरंपरा आठवत होतीच. स्वजनांचा समागम केला तर आपणाला फिरून जन्म घ्यावा लागेल, हा गोष्ट तो विसरला नव्हता; व ह्यामुळें आपल्या बंधुजनांपासून तो अगदीं निराळा राहूं लागला. ईश्वराच्या चरणयुगलाचें स्मरण व कीर्तन केल्यानें प्राण्यांचें कर्मबंधन नाश पावतें, ही गोष्ट मनांत वागवून त्यानें तो क्रम सतत चालविला. कोणावरही आपण प्रेम ठेविलें तर आपला नाश होईल, असें जाणून तो आपलें आचरण असें ठेवूं लागला कीं, लोकांनीं त्यास वेडा, मंदबुद्धीचा, अंधळा व बहिरा असें म्हणावें. त्याची अशी स्थिति असतांही त्या ब्राह्मणाचें मन त्या पुत्राविषयीं प्रेमयुक्त होऊन, त्यानें आपल्या मुलाचे समावर्तनापर्यंत (गृहस्थाश्रमाच्या स्त्रीकारापर्यंत) सर्व विधि यथाशास्त्र करण्याचें योजून त्याचें उपनयन केलें. पुढें शौच, आचमन इत्यादि कर्मांचे नियम त्यानें त्यास शिकविण्यास आरंभ केला, परंतु ते मुलास आवडतना; तथापि पित्यानें मुलास सुशिक्षण द्यावें असें धर्मशास्त्र असल्यामुळें, त्यानें त्यास तें बळेंच शिकविण्याचा क्रम चालू ठेविला. आपल्या मुलास कांहींएक येण्याचा संभव नाहीं, अशी पित्याची खातरी व्हावी व त्यानें आपल्यास शिकविण्याचा आग्रह सोडावा, अशा हेतूनें तो पित्याच्या समक्ष वेडेंवाकडें आचरण करूं लागला. बापाच्या मनांत मुलास वेद यावे ही उत्कट इच्छा असल्यामुळें, त्यानें अगोदर व्याहृति, प्रणव व शिर ह्यांसह त्रिपद गायत्रीमंत्राचा त्यास पाठ दिला. त्यानें चैत्र, वैशाख, ज्येष्ठ व आषाढ ह्या चार महिनेपर्यंत एकसारखा त्याजकडून तो पाठ तयार करविला; परंतु मुलास तो स्वरादिकांनीं युक्त असा नीट आला नाहीं. ब्राह्मणाला आपला पुत्र म्हणजे केवळ प्राणच वाटे. तो चांगला विद्वान व्हावा

अशी त्याला फार हौस होती. पण त्याला तर बाप जें कांहीं सांगे तें मुळींच आवडत नसे. तथापि बापानें, शुद्धाचार, अध्ययन, व्रतनियम गुरु आणि अग्नि ह्यांची शुश्रूषा इत्यादि, अध्ययनानंतर गृहस्थाश्रम घेऊं इच्छिणाऱ्या ब्रह्मचाऱ्याला आवश्यक अशा गोष्टी आपल्या हेक्यानें त्यास शिकविल्या; परंतु मुलास त्या धडपणें न आल्यामुळें बापाचे सर्व मनोरथ वायां गेले. इकडे पुत्राच्या अध्ययनांत गुंतून राहिल्यामुळें स्वतांच्या आत्मोन्नतीकडे बापाचें दुर्लक्ष होऊन, भगवद्भक्ति, अद्वैतविचार इत्यादि कृत्यें त्याच्या हातून घडावयाचीं राहिलीं; व इतक्यांत, त्याचें आयुष्य कधीं संपतें ह्याची सावधानचित्तानें वाट पहात बसलेल्या काळानें त्यास उचलून नेलें! तेव्हां त्याची कनिष्ठ स्त्री महासाध्वी पतिव्रता आपलीं दोन्ही मुलें आपल्या सवतीच्या स्वाधीन करून त्याबरोबर सती गेली! ह्याप्रमाणें पिता मरण पावल्यावर, भरताच्या भावांनीं, आपला भाऊ जड बुद्धीचा आहे असें समजून, त्याला पुढें शिकविण्याचा आग्रह सोडून दिला. ते वेदत्रयीमध्यें मोठे निष्णात होते; परंतु त्यांस आत्मानात्मविचार मुळींच नव्हता. ह्यामुळें त्यांस भरताची योग्यता कळून आली नाहीं. परीक्षिता, त्या जडभरताच्या बंधूंना दोन पायांचे पशुच म्हटलें तरी चालेल. ते त्यास, हे उन्मत्ता, जडा, बहिरटा, अशा अपशब्दांनीं हांका मारीत असत. तोंही त्यांस तशाच प्रकारचीं वेडगळ उत्तरें देत असे. कोणी कांही काम करून घेऊं लागला, तर तो तें जसें सांगितलें असेल तसें करी, त्यांत तो आपली कल्पना वगैरे कांहीं चालवीत नसे; तो कधीं वेठीला जाई; कधीं मजुरी करी; कधीं भिक्षा मागे; व अशा प्रकारें आपला उदरनिर्वाह करी. कधीं कधीं त्यास यत्नावांचूनही थोडें–फार व बरें–वाईट अन्न मिळे, तें तो खाऊन राही. परंतु तो तें इंद्रियांच्या संतोषासाठीं खात नसे, तर केवळ शरिराच्या रक्षणाकरितां खात असे; कारण, ज्याचा उत्पादक कोणी नाहीं, जो केवळ स्वतः-सिद्ध, आनंदरूपी व अनुभवरूप असा आत्मा, तो मीच आहें, असें त्याला ब्रह्मज्ञान प्राप्त झालें असल्यामुळें, मानापमान, जयापजय इत्यादि द्वंद्वांपासून उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखांबद्दल त्यास बिलकूल अभिमान राहिला नव्हता. थंडी, ऊन, वारा, पाऊस, कांहीं असो; भरत आपला बैलासारखा उघडा असावयाचा; त्याचें शरीर पुष्ट व बळकट होतें; तो भुईवरच निजे; शरिराची बरदास्त राखण्याकरितां मर्दन किंवा स्नान हें कांहींएक करीत नसे; व त्याच्या अंगावर धुळीचीं पुटें चढलीं होतीं; ह्यास्तव, मोठा हिरा असला तरी तो स्वच्छ राखिला नाहीं तर जसें त्याचें दिव्य तेज बाहेर दिसत नाहीं, तसें त्या जडभरताचें कोकोत्तर ब्रह्मतेज त्याच्या अस्वच्छतेमुळें बाहेर दिसलें नाहीं. त्याच्या अमंगळ वस्त्रावरून व गळ्यांतील घामट जानव्यावरून, हा केवळ जातीचा ब्राह्मण आहे असें मानून, त्याच्या हीन आचरणामुळें लोक त्यास अधम म्हणत, व त्याच्यांतील अपूर्व प्रभाव न जाणतां त्याचा अपमान करीत. जेव्हां तो अन्न मिळविण्याकरितां दुसऱ्याची मजुरी करावयाची इच्छा करी, तेव्हां तो आपल्या भावांच्या भाताच्या शेतांत सुद्धां कामास लागे. त्याचे भाऊ जें काम सांगत, तें तो करी; परंतु शेत सारखें झालें किंवा उंचसखल झालें, मध्येंच खळगा झाला किंवा उंचवटा झाला, ह्या गोष्टींचा मुळींच विचार करीत नसे; व त्याचे भाऊ कण्या, पेंड, कोंडा, किडके उडीद, करपलेलें अन्न वगैरे जें कांहीं त्यास देत, तें तो अमृतासारखें मानून भक्षण करी!

### जडभरतावर मृत्यूचा प्रसंग.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—हे परीक्षित राजा, पुढें एकदा, कोणी एका शूद्र लोकांच्या राजानें पुत्रप्राप्तीच्या इच्छेस्तव भद्रकाली देवीला नरबलि

देण्याचा विचार केला. त्यानें बलि देण्याकरितां एक मनुष्य धरून आणिला, परंतु तो त्याच्या हातांतून सुटून गेला. तेव्हां त्याच्या मागून त्याचा माग काढीत त्या राजाचे सेवक धावूं लागले. रात्र पडली तरी त्यांनीं आपलें काम तसेंच चालविलें. परंतु मध्यरात्र झाली, अगदीं अंधार पडला, तरी त्यांस त्या पुरुषपशूचा शोध लागला नाहीं. कर्मधर्मसंयोग असा विलक्षण घडला कीं, त्या रात्रीं भरत एका शेतांत माळ्यावर बसून हरणें व डुकरें ह्यांपासून त्यांतील पिकाचें रक्षण करीत होता. त्यावर त्या राजदूतांची दृष्टि गेली! त्यांनीं त्या अंगिरापुत्राला नीट न्याहाळून पाहिलें; व बलि देण्याकरितां जीं लक्षणें पुरुषाच्या अंगीं असावीं लागतात, तीं सर्व त्याच्या ठिकाणीं यथास्थित आहेत, असें त्यांस दिसून आलें. ह्या पुरुषास बलि दिलें असतां आपल्या धन्याचा कार्यभाग सिद्ध होईल, अशी त्यांस खातरी वाटून त्यांनीं मोठ्या उल्हासानें त्यास दोरीनें बांधून चंडिकेच्या देवालयांत नेलें. पुढें त्यांनीं आपल्या विधीप्रमाणें त्यास स्नान घातलें; त्यास नवीन वस्त्र नेसविलें; त्याला अलंकार, उटी, माळा, टिळे इत्यादि शृंगार केला; भोजन घातलें; व धूप, दीप, फुलें, लाह्या, आम्रपल्लव, दूर्वांकूर, फळें, नैवेद्य वगैरे सिद्ध करून त्याच्या वधाची तयारी केली; आणि गायन, स्तुति, मृदंग, ढोल, नौबदी इत्यादिकांचा मोठा घोष करून त्या पुरुषपशूला भद्रकालीच्या अग्रभागीं नेऊन बसविलें; आणि नंतर त्या क्षुद्र राजाच्या उपाध्यायानें त्या जडभरताच्या रक्तरूप आसवानें देवीची तृप्ति करण्याकरितां अति भयंकर व तीक्ष्ण अशा खड्गावर देवीच्या मंत्राचें अभिमंत्रण करून तो खड्ग हातांत घेतला! परीक्षित राजा, त्या रजोगुणी व तमोगुणी अधम चोरांचें मन द्रव्य व संतति ह्यांकरितां अतिशय बहकून गेल्यामुळें, भगवदंशानें युक्त अशा ब्राह्मणकुळाची योग्यता त्यांच्या ध्यानांत मुळींच आली नाहीं;--त्यांस तो ब्राह्मण अगदीं तुच्छ वाटून ते त्याच्या वधास प्रवृत्त झाले. आपत्कालीं हिंसा करण्यास शास्त्राची मोकळीक आहे, परंतु ब्राह्मणाचा वध करण्यास शास्त्राची आज्ञा नाहीं; त्यांतून हा ब्राह्मण म्हणजे महातेजस्वी ब्राह्मणाचा पुत्र, स्वतः ब्रह्मस्वरूप झालेला, सर्व वस्तुमात्राच्या ठिकाणीं अद्वैत मानणारा, आणि सर्व प्राण्यांवर अनुकंपा करणारा; तेव्हां अशा ब्राह्मणाचा वध करणें तर फारच निंद्य होय. असें लक्षांत आणून ब्राह्मणाच्या प्रभावामुळें देवी चवताळून गेली, व बऱ्या-वाईटाचा विचार न करणारे ते दुष्ट चोर हिंसेमध्यें आनंद मानून आतां त्या ब्राह्मणाचा वध करणार, तों ती एकदम आपल्या मूर्तीतून प्रकट झाली! त्या चोरांनीं केलेल्या अपराधामुळें तिला फार क्रोध चढला, संतापामुळें फार आवेश आला, व तिनें आपल्या भुंवया चढविल्या; हीं सर्व चिन्हें व तिच्या वक्रदाढा आणि लाल गरगरणारे डोळे पाहून, ही आतां आपल्यास खाणार अशी चोरांना धास्ती पडली! त्या वेळा, ही आतां सर्व जगाचा विध्वंस करते कीं काय, असा भास झाला. तिनें मोठी गर्जना करून आपल्या स्थानावरून एकदम उडी मारिली व अभिमंत्रण केलेला खड्ग पुरोहितापासून हिसकून घेऊन त्या दुष्टांचीं मस्तकें तोडलीं! त्यांच्या कंठनालांतून गळणारें उष्ण उष्ण रक्तासव आपल्या गणासहवर्तमान यथेच्छ प्राशन करून धुंद झाल्यामुळें ती त्या सर्वांसह गात व नाचत सुटली, आणि त्या चोरांच्या मस्तकांचे चेंडू करून खेळू लागली! परीक्षित राजा, थोरांचा घात करण्याचा प्रयत्न सर्वतोपरी घात करणारालाच भोंवतो. असो. परीक्षित राजा, प्रत्यक्ष आपलें शिर तुटण्याचा प्रसंग आला असतां भरताची मुळींच गडबड झाली नाहीं, ह्याचें तुला आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. कारण, महाभगवद्भक्त पुरुष भगचरणारविंदांचा आश्रय

करून देहादिकांविषयीं अभिमानग्रंथि तोडून टाकितात, व सर्व प्राण्यांविषयीं ममत्वबुद्धि बाळगून अगदीं निर्वैर बनतात, ह्यामुळें साक्षात् भगवान परमेश्वर नेहमीं कालचक्ररूपी उत्तम आयुधानें प्रसंगीं भद्रकालीसारख्या व्यक्तींकडून त्यांचें रक्षण करीत असतो; व ह्यास्तव त्यांस कधीं कोणत्याही प्रकारची भीति रहात नाहीं.

## अध्याय दहावा.

—:०:—

### जडभरत व रहूगण राजा ह्यांचा संवाद.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, पुढें काय घडलें तें ऐक. एकदा सिंधुसौवीर देशाचा राजा रहूगण हा कपिलाश्रमास ब्रह्मज्ञानाचा उपदेश ग्रहण करावयास जात होता. तो इक्षुमती नदीच्या कांठावर येऊन पोहोंचला; तेव्हां तेथील अधिपतीला राजाची पालखी पुढें नेण्याकरितां भोईलोक वेठीस धरणें प्राप्त झालें. कर्मधर्मसंयोगानें हा ब्राह्मण तेथें त्यास आढळला. तो बळकट, तरुण, कणखर व रासभ किंवा बैल ह्यांप्रमाणें मजबूत आहे असें पाहून, हा पालखी उचलण्यास बरा आहे असें त्यानें ठरविलें; व दुसरे लोक वेठीस धरले होते, त्यांबरोबर ह्यालाही वेठीस धरून, त्या सर्वांकडून ती पालखी पुढें चालविली. परीक्षित राजा, महाज्ञानी जडभरत, तें काम करण्यास आपण योग्य नाहीं वगैरे कांहींएक कुरकुर न करतां, ती पालखी वाहूं लागला. पालखी नेत असतां जडभरताची चाल इतर वाहकांच्या चालीशीं जमेना. इतर वाहक त्वरित चालत, व हा बाणाइतकी जागा न्याहाळून पाहून तेथें कीड, मुंगी वगैरे कांहीं नाहीं अशी खातरी करून घेऊन, मग पुढें पाऊल टाकी. त्यामुळें ती पालखी वेडीवाकडी होऊन तिला हिसके बसूं लागले. तेव्हां रहूगण राजा त्या वाहकांस म्हणाला, "अरे, पालखी अशी वाकडीतिकडी होऊं देऊं नका, नीट चालवा." राजाचें तें धमकीचें भाषण ऐकतांच, आतां हा आपणांस ताडन करील अशी भीति वाटून, त्या भोयांनीं राजास विनयपूर्वक म्हटलें, "महाराज, ह्यांत आमचा मुळींच अपराध नाहीं. आपल्या आज्ञेप्रमाणें आम्ही आपल्याकडून पालखी नीट चालवीत आहों. परंतु हा नवा लावलेला भोई नुकताच कामास लावला असूनही जलद चालत नाहीं. म्हणून आम्हांस ह्याच्याबरोबर पालखी नीट चालवितां येणें कठिण आहे." ह्याप्रमाणें भोयांचें भाषण ऐकून, संसर्गनिमित्त एकाचा दोष, त्याच्याबरोबर संबंध ठेवणाऱ्या सर्व लोकांस बाधक होतो असा विचार करून, रहूगण राजानें जडभरताला उपरोधिक शब्दांनीं ताडन केलें. वास्तविक रहूगण राजाचा स्वभाव वृद्ध पुरुषांची सेवा करून पुष्कळ शांत व उदार झालेला होता. परंतु ह्या वेळीं मूळ क्षत्रियस्वभावाचें वर्चस्व होऊन त्याच्या ठिकाणीं रजोगुण स्फुरण पावला, व त्यामुळें तो संतप्त होऊन, भस्माच्छादित अग्नीच्याप्रमाणें ब्रह्मतेज गुप्त असलेल्या त्या ब्राह्मणाला म्हणाला, "हे बंधो, मोठ्या दुःखाची गोष्ट आहे! खरोखरी तूं फारच थकलास! कारण, पुष्कळ वेळपर्यंत तूं एकट्यानेंच ही पालखी इतक्या दूर वाहून आणिलीस! त्यांतून तूं फारसा बळकटही नाहींस! तुझे अवयव अगदीं कृश आहेत! शिवाय म्हातारपणानेंही तुला घेरलेलें आहे! आणखी, गड्या, हे तुझे जोडीदार आहेत व नाहींत सारखेच!" परीक्षित राजा, ह्याप्रमाणें त्या रहूगण राजानें त्या जडभरताचा फार उपहास केला. परंतु चमत्कार असा कीं, त्या उपहासाकडे त्या ब्राह्मणानें बिलकुल लक्ष न देतां निमूटपणें पूर्ववत् पालखी पुढें चालविली. तो ब्रह्मनिष्ठ पुरुष हें पूर्ण जाणत होता कीं, "पृथिव्यादि द्रव्यें, चक्षुरादिक इंद्रियें, बरीं-वाईट कर्में व अंतःकरण हीं सर्व अविद्येचीं फळें आहेत. ह्या जन्मीं मला ही जी विशिष्ट

तनु प्राप्त झाली आहे, ती माझी आतां शेवटचीच झाली पाहिजे. ह्या देहावर जर मी अहंभाव ठेवीन, तर माझा हेतु सिद्धीस जाणार नाहीं. शरिरादिकांविषयीं अभिमान बाळगणें हा अगदीं अविचार आहे." असो. हे परीक्षिता, ती पालखी पूर्ववत् हेलकावे खाऊं लागली! तेव्हां रहूगण जास्तच संतापला आणि म्हणाला, "अरे! तूं जिवंत आहेस कीं मेला आहेस? तूं माझी आज्ञा तुच्छ मानून ती मोडीत आहेस, पण विचार कर; तुझा हा अलगरजीपणा पाहून यमाप्रमाणें मी तुला ताडन करीन, आणि मग तुझे डोळे उघडतील!" रहूगण राजानें अशा प्रकारें पुष्कळ तोंडसुख घेतलें. त्याला 'मी राजा' असा अभिमान झालेला असून, रजोगुणानें व तमोगुणानें त्याचा तो अभिमान दुणावला होता. रहूगणाचा सदसद्विवेक त्या अभिमानानें नष्ट होऊन, भगवंताला अत्यंत प्रिय अशा त्या भरताची त्यानें निर्भर्त्सना केली. त्याला शहाणा काय तो मी, असें वाटत होतें. मोठमोठे योगी कशा प्रकारें वागतात हें त्यास माहीत नव्हतें; व त्यामुळें, त्या ज्ञानसंपन्न, आत्मवान, सर्व भूतांविषयीं ममता व समता धारण करणाऱ्या ब्राह्मणाची योग्यता त्यास कळली नाहीं. रहूगण राजाचीं दुरुत्तरें ऐकून जडभरत किंचित् हसून हळूच म्हणाला, "हे बलाढ्य राजा, तूं जें कांहीं म्हणालास, तें खरें आहे. त्यांत खोटेपणा किंवा उपरोधक अंश मुळींच नाहीं. हे वीरा, जर भार म्हणून कांहीं पदार्थ असेल, तरच तो वाहकाला वाटेल; मला तो वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. माझा व शरिराचा जर कांहीं संबंधच नाहीं, आणि अमुक ठिकाणीं जावयाचें व तेथें जाण्याचा मार्ग अमुक, असा जर मला विचारच नाहीं, तर पालखी लांबून आणिली वगैरे शब्दांनीं मला कां बरें वाईट वाटेल? आतां, माझ्या पुष्टतेबद्दल जो तूं टोला मारलास, तोही सुज्ञांच्या मतें मला लागत नसून, ह्या पंचमहाभूतात्मक जडदेहाला लागू आहे; तेव्हां मला त्यापासून विषाद वाटण्याचें कारण नाहीं. राजा, स्थूलता, कृशता, मानसिक पीडा, क्षुधा, तृषा, भय, कलह, इच्छा, निद्रा, ग्लानि, क्रोध, अहंकार, गर्व आणि शोक हे सर्व धर्म देहाभिमानी पुरुषाळाच असतात; मी देहाभिमानरहित असल्यामुळें ते माझ्या ठिकाणीं मुळींच नाहींत. राजा, जन्म व मरण ह्या गोष्टी केवळ मलाच आहेत असें नाहीं; तर जितके मिळून विकारी पदार्थ आहेत, त्या सर्वांच्या ठिकाणीं त्या गोष्टी नियमानें दिसून येतात. आतां मी तुझी आज्ञा मोडली म्हणून तुझें म्हणणें; परंतु, हे मान्या, जेथें सेव्यसेवकभाव कायमचा निश्चित असेल, तेथें धन्यानें आज्ञा करावी व सेवकानें ती पाळावी हें योग्य होईल. राजा, जर कदाचित् तूं राज्यापासून च्युत झालास व मी राज्यपदावर आरूढ झालों, तर मग कसें होईल बरें? राजा, व्यवहारांत मात्र सेव्यसेवक हा भेद दृष्टीस पडतो, परंतु वास्तविक विचार केला असतां हा भेद मानण्यास किंचित् सुद्धां जागा नाहीं. ह्यास्तव, राजा कोण, त्याचा अधिकार कोणता वगैरे गोष्टींचा विचार करण्याचें प्रयोजनच उत्पन्न होत नाहीं. राजा, खरोखरी प्रकार असा आहे. इतक्यावरही, जी काय तुझी आज्ञा असेल ती कळू दे. ती पाळण्यास मी सिद्ध आहें. आतां, ताडन केल्यावर माझे डोळे उघडतील म्हणून जें तुझें म्हणणें, त्यासंबंधानें ऐक: हे थोर पुरुषा, उन्मत्त, जड व वेडा ह्यांप्रमाणें मी बाहेरून वागत आहें, परंतु वास्तविक मी ब्रह्मस्वरूपीं निमग्न झालों आहें; तेव्हां मला शिक्षा करून तुला काय लाभ होणार आहे? बरें, मी ब्रह्मस्वरूपीं लीन झालों नाहीं, केवळ उन्मत्त व वेडा मात्र आहें, इतकें जरी तुला मान्य झालें, तरीही मला शिक्षा करण्यांत कांहीं हाशील नाहीं, हेंच

ठरतें. कारण, अशा स्थितींत मला शिक्षा करणें, म्हणजे पिष्टपेषण करण्यासारखेंच आहे."

श्रीशुकाचार्य म्हणाले:—राजा परीक्षिता, त्या मुनिश्रेष्ठ जडभरतानें अशा प्रकारें रहूगण राजाच्या भाषणाचा अनुवाद करून उत्तर दिलें, व नंतर फिरून पहिल्याप्रमाणें पालखी वाहण्याचा क्रम चालविला. परीक्षिता, त्या जडभरताच्या ठिकाणीं पूर्ण वैराग्य वास करीत असून, त्याचा देहादिकांविषयींचा अभिमान समूळ नष्ट झालेला होता. प्रारब्धकर्म भोगल्याशिवाय गत्यंतर नाहीं, म्हणून तें भोगून तो तें क्षीण करीत होता. राजा, सिंधुसौवीरपति रहूगण, त्या महात्म्याचें तें भाषण श्रवण करून तत्काल चकित होऊन गेला. त्याच्या ठिकाणीं तत्त्वजिज्ञासा व साधुश्रद्धा आधींच उत्पन्न झालेली होती; व त्यामुळें तात्त्विक विचार करावयाचा त्यास अधिकार प्राप्त झाला होता. ह्यास्तव, मनांतील अभिमानग्रंथि तोडून टाकणारें असें तें ब्राह्मणाचें भाषण ऐकून, व तें अनेक शास्त्रग्रंथांस संमत आहे असें पाहून, 'मी राजा' असा त्याचा अभिमान एकदम नाहींसा झाला; व त्यानें पालखींतून उतरून तत्काल त्या ब्राह्मणाचे पाय धरिले, आणि क्षमा मागितली. नंतर तो म्हणाला, "भगवन्, गुप्तपणें संचार करणारे आपण कोण आहां? आपण यज्ञोपवीत धारण केलें आहे, ह्यावरून ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या त्रिवर्गांपैकीं कोणी तरी असाल; तर कोण आहां तें कृपा करून सांगा. अथवा तुम्ही दत्तात्रेयादिकांपैकीं अवधूत आहां काय! महाराज, तुमचा देश कोणता? आपला जन्म वगैरे कोणत्या कुळांत झाला? ह्या ठिकाणीं येण्याचें कारण कोणतें? मुने, माझ्या कल्याणासाठीं प्राप्त झाला असल्यास, आपण शुद्धसत्त्वमूर्ति कपिल मुनि तर नाहींना? ऋषिश्रेष्ठा, मी इंद्राच्या वज्राला भीत नाहीं, शंकराच्या त्रिशूलास भीत नाहीं, व यमाच्या दंडास भीत नाहीं; त्याचप्रमाणें अग्नि, सूर्य, चंद्र, वायु अथवा कुबेर ह्यांच्या शस्त्रांनाही भीत नाहीं; परंतु ब्राह्मणकुलाच्या अपमानाला फार भितों. ह्यास्तव, हे साधो, अपरोक्षज्ञानरूपी आपला प्रभाव गुप्त राखून, सर्वसंगपरित्याग करून आत्मरूपानें फिरणार तुम्ही कोण आहां बरें? योगशास्त्रास अनुसरून असणारीं तुमचीं वचनें इतकीं गूढ आहेत कीं, त्यांचा अर्थ माझ्यासारख्यांस कळणें तर एकीकडेस राहिलें, परंतु मोठमोठ्या सूक्ष्मविचारी पुरुषांनाही तो समजणें अशक्य आहे! महाराज, मी तर ज्ञानप्राप्तीची उत्कट इच्छा धरून, आत्मतत्त्व जाणणाऱ्या मुनींमध्यें परमश्रेष्ठ व योगमार्गाचे प्रवर्तक जे कपिल मुनि, त्यांना, कोणाच्या आश्रयानें भवसमुद्र तरून जावा हें विचारण्याकरितां जात आहें. मुने, कपिल मुनि हा साक्षात् विष्णूचा ज्ञानकलारूप अवतार होय. हे साधो, आपण तेच कपिल मुनि, लोकस्थिति अवलोकन करण्याकरितां स्वतांचें रूप प्रकट न करितां फिरत आहां काय? संसारांत आसक्त होऊन विवेकशून्य झालेल्या पुरुषाला योगीश्वरांचे मार्ग कसे कळतील बरें? कळणार नाहींत हें उघड आहे."

परीक्षिता, पुढें रहूगण राजानें, जडभरतानें पूर्वीं जीं उत्तरें दिलीं होतीं त्यांवर शंका घेऊन म्हटलें, "मुने, युद्धादिक कर्में केल्यापासून श्रम होतो ह्या गोष्टीचा अनुभव आहे, आणि भार वाहतांना व चालतांना तुम्हांला श्रम होत आहेत असें मला अनुमान करितां येतें. आतां, हा केवळ व्यवहार असून त्याच्या ठिकाणीं सत्यत्व नाहीं असें तुमचें म्हणणें, पण मला त्यांत तथ्य दिसत नाहीं; कारण व्यवहार जर असत्य मानला, तर त्यापासून होणारीं कार्येंही असत्यच मानावीं लागतील. पहा—जर घट खोटा आहे असें मानिलें, तर त्यापासून पाणी आणणें इत्यादि कृत्यें होतात तीं खोटींच, असें म्हणावें लागणार नाहीं काय? अर्थात् लागेल. ह्यास्तव, सर्व

व्यवहार सत्यच आहेत असें माझें मत आहे. ज्याप्रमाणें चुलीवर भांडें ठेवून त्याच्याखालीं अग्नि प्रदीप्त केला म्हणजे त्याच्या योगानें प्रथम तें भांडें तापतें, नंतर त्यांतील पाणी सळसळतें, व पुढें त्यांतील तांदूळ शिजतात, त्याप्रमाणें देह, इंद्रियें, प्राण व मन ह्यांच्या संबंधामुळें क्रमाक्रमानें उपाधींचे धर्म पुरुषावर येऊन पोहोंचतात व त्या योगानें त्याला संसार प्राप्त होतो. पहा, शरिराला ताप झाला कीं इंद्रियें तापतात, व नंतर प्राण तापतात, पुढें मनाला संताप होतो, व शेवटीं परमात्म्याच्या अंशभूत जीवालाही ताप होतो. मुने, तुझ्या म्हणण्याप्रमाणें सेव्यसेवकभाव अशाश्वत असला तरी, ज्या वेळीं जो राजा असतो त्या वेळीं तो प्रजेस शिक्षण लावतो व तिचें पालन करितो. राजा हा तरी प्रजेच्या रक्षणाकरितां भगवंतानें नेमिलेला एक अधिकारीच आहे. तो पिष्टपेषणासारखें निरर्थक काम कधींही करणार नाहीं. कारण, उन्मत्त पुरुषांस शिक्षा करून जरी त्यांचा उन्मत्तपणा गेला नाहीं, तरी त्या राजानें आपलें विहित कर्म केल्यामुळें त्याबद्दल त्याला पातक लागत नाहीं. हे दीनदयाळा, माझ्या अज्ञानत्वास अनुसरून जो पूर्वपक्ष मला युक्त वाटला, तो आपणांस विदित केला आहे. आतां, माझ्या हातून राज्याधिकाराविषयीं अहंकार उत्पन्न होऊन जो प्रमाद घडला व आपल्यासारख्या सत्पुरुषाचा अपमान झाला, त्याजबद्दल कृपादृष्टीनें क्षमा करावी; म्हणजे सत्पुरुषाचा अपमान केल्याच्या पातकापासून मी मुक्त होईन. भगवन्, कदाचित् आपण असें म्हणाल कीं, मला देहाहंकृति मुळींच नाहीं, ह्यामुळें मला सर्व जग आत्मभावानेंच दिसतें, व ह्यास्तव तुझ्या भाषणानें माझा अपमान झालाच नाहीं व त्यामुळें तुला पातकही लागलें नाहीं; परंतु ह्यावर मी असें सांगतों कीं, माझ्या हातून आपला अपमान घडला, हें इतकें घोर पातक झालें आहे कीं, त्याच्या योगानें साक्षात् शंकरासारखा महासमर्थ पुरुषही तत्काळ नाश पावेल !"

# अध्याय अकरावा.

—:०:—

## रहूगण राजास जडभरतानें केलेला ज्ञानोपदेश.

जडभरत म्हणतो:—राजा, ज्या विषयावर वाद करण्याची तुझी योग्यता नाहीं, त्या विषयावर तूं पंडितासारखा पूर्वपक्ष करितोस हें युक्त नाहीं. जे पंडित आहेत, ते लौकिक व्यवहारांचा तात्त्विक विचारांत कधींही उल्लेख करीत नाहींत. राजा, फार कशाला? वैदिक कर्मव्यवहारही गौणच होय. वेदांमध्यें, गृहस्थांनीं अमुक अमुक यज्ञयागादिक कर्में करावीं, अशी स्पष्ट वचनें आहेत खरीं; परंतु त्यांमध्यें हिंसा व स्वार्थपरता असल्यामुळें त्या कर्मांची योग्यता फारच कमी समजली पाहिजे. आतां तूं कदाचित् असें म्हणशील कीं, वेदांतशास्त्र ऐकणाऱ्या पुरुषाचीही कर्माकडे प्रवृत्ति होते, ह्यास्तव कर्मास गौण मानणें अप्रशस्त होय; तर ह्यावर मी सांगतों कीं, बाबा, त्या पुरुषाची कर्माकडे प्रवृत्ति होते, हा त्याच्या अनधिकारित्वाचा परिणाम समजावा. गृहस्थाश्रमांतील कर्मजन्य सुख स्वप्नांतील सुखाप्रमाणें त्याज्य आहे, असें ज्याला आपलें आपण अनुमानानें ठरवितां येत नसेल, त्याला तत्त्वज्ञान करून देण्यास उपनिषद्वाक्यें तरी कशीं समर्थ होणार! जोंपर्यंत मनामध्यें सात्त्विक, राजस किंवा तामस विकार बळावलेला असतो, तोंपर्यंत तें कर्मेंद्रियांकरवीं व ज्ञानेंद्रियांकरवीं बरीं अथवा वाईट कर्में निःशंकपणें करवीत असतें. प्रथम मनांत विषयवासना उत्पन्न होते; नंतर विषयादिकांपासून होणाऱ्या सुखांत तें आसक्त होतें; पुढें सत्त्वादिक गुण प्रबळ होतात; मग कामक्रोधादिक विकार जोरावतात; नंतर पंचमहाभूतें, पंचज्ञा-

नेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें व अंतःकरण अशीं सोळा रूपें मनास प्राप्त होऊन, त्या सोळा रूपांत अंतःकरणास सर्वांचें चालकत्व प्राप्त होतें; व अखेरीस हें मन, देवतिर्यगादि भिन्न भिन्न नांवांचे अनेक देह धारण करून उत्तम, मध्यम अथवा कनिष्ठ जीवकोटींत जन्म घेतें. राजा, मन हें संसारचक्रांत व्यापक रीतीनें असणारें होय. हें संसारचक्र अज्ञानरूपी मायेनें मनास प्राप्त होतें. संसारांत वासनायुक्त मन ज्या ज्या जीवात्म्यास चिकटून राहतें त्या त्या जीवात्म्यास, सुख, दुःख किंवा मोह इत्यादि फळ तें कालानुसार प्राप्त करून देतें. जोंपर्यंत मनाचा हा स्थूलसूक्ष्म कारभार चालू असतो, तोंपर्यंत जीवात्म्याची सुटका होत नाहीं; ह्याकरितां, त्रिगुणमय निकृष्ट संसाराचें किंवा त्रिगुणातीत उत्कृष्ट मोक्षाचें आदिकरण मनच होय. मन विषयासक्त झालें, कीं प्राण्याला जन्ममरणपरंपरा येते, व तें विषयपराङ्मुख झालें, कीं मोक्ष प्राप्त होतो. पहा—दिव्यांत तूप असलें म्हणजे त्यावर काजळी धरते, परंतु तेंच तूप संपलें म्हणजे त्याचें शुद्ध रूप प्रकट होतें; तद्वत्, राजा, मनामध्यें गुणकर्मवृत्ति उत्पन्न झाल्या म्हणजे त्यास अनेक विकार प्राप्त होतात, व त्या नष्ट झाल्या म्हणजे तें शुद्ध चैतन्यास जाऊन मिळतें.

पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें व अभिमान ह्या मनाच्या अकरा वृत्ति होत. राजा, त्या वृत्तींचे विषय पांच कर्में, पांच सूक्ष्मभूतें व शरीर हे आहेत. मलत्याग, संभोग, गमन, भाषण व कुशलता हीं पांच कर्में होत; शब्द, स्पर्श, रस, रूप व गंध हीं पांच सूक्ष्मभूतें होत; व देहादिकांविषयीं जी ममत्वबुद्धि, तो अभिमान होय. कांहीं लोक हा देह वगैरे माझा असें जेव्हां म्हणतात, तेव्हां त्यांच्या दृष्टीनें देहादिकांशीं अभेदानें असणारी "मी" अशी आणखी एक वृत्ति असते हें उघड होतें; ह्याजकरितां अहंकार नांवाची एक बारावी वृत्ति मानून, तिचा शरीर हाच शय्यासंज्ञक बारावा विषय समजतात, व त्या शरिराच्या ठिकाणीं अहंकारासहवर्तमान जीव निजतो, म्हणून त्यास पुरुष असें म्हणतात. मनाच्या ह्या अकरा अथवा बारा वृत्ति, विषय, स्वभाव, संस्कार, कर्म व काळ ह्यांच्या योगानें परिपक्व होऊन मग त्यांच्यापासून प्रथम शेंकडों, नंतर हजारों व अखेरीस कोट्यवधि वृत्ति बनतात. ह्या इतक्या वृत्ति बनतात, त्या मूळ मनापासून बनतात किंवा परस्परांच्या संयोगापासून बनतात असा अर्थ नाहीं; तर त्या जीवात्म्याच्या सत्तेनें बनतात. मनाच्या ठिकाणीं अज्ञानानें वासनादिक विकार उत्पन्न होऊन कर्मबंधन जडलें, म्हणजे त्यासच जीवदशा प्राप्त होते म्हणून पूर्वीं सांगितलें आहेच. एकदा मनास जीवोपाधि प्राप्त झाला, म्हणजे त्या जीवाच्या ठिकाणीं असलेल्या अनेक प्रकारच्या वृत्ति कधीं स्पष्ट दिसतात व कधीं स्पष्ट दिसत नाहींत. जागृतावस्थेंत व स्वप्नांत त्या वृत्ति स्पष्ट दिसतात व झोंपेंत त्या स्पष्ट दिसत नाहींत. ह्या तिन्ही अवस्था व त्यांमधील वृत्ति जीव जाणतो. जीवाचें वास्तविक स्वरूप शुद्ध आहे. क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा हा दोन प्रकारचा आहे. एक 'त्वंपदार्थ' जीव व दुसरा 'तत्पदार्थ' ईश्वर. जीव कसा बनतो व तो काय करितो हें पूर्वीं सांगितलेंच आहे; ह्याकरितां त्वंपदार्थाची कल्पना तुला करितां येईलच; आतां तत्पदार्थ कोणता, तें सांगतों. रहूगण राजा, तत्पदार्थ म्हणजे सर्वव्यापक, जगज्जनक, पूर्ण, प्रत्यक्ष, स्वयंप्रकाश, जन्मरहित, ब्रह्मदेवादिकांचा नियंता व आपल्या स्वाधीन असलेल्या मायेकडून आपणास सर्व वस्तुमात्राच्या ठिकाणीं स्थापन करणारा असा भगवान नारायण, असें समज. ज्याप्रमाणें वायु स्थावरजंगम पदार्थांत आत्मस्वरूपानें प्रवेश करून शिवाय बाहेर स्वतंत्रपणानें असतो, त्याप्रमाणें षड्गुणैश्वर्यसंपन्न प्रभु वासुदेव विश्वांत प्रवेश करून शिवाय तद्व्यतिरिक्त स्वतंत्रपणानें आहे. राजा, जोंपर्यंत ह्या जीवानें सोपाधिक मन

म्हणजे माया असें जाणून मनाच्या ठिकाणीं असलेल्या वासना वगैरे झाडून टाकिल्या नाहींत, कामक्रोधादिक षड्रिपु जिंकून सर्वसंगपरित्याग केला नाहीं, व आत्मतत्त्व जाणलें नाहीं, तोंपर्यंत त्यास जन्ममरणाचा फेरा व तदनुसार सुखदुःख हीं सुटावयाचीं नाहींत. तसेंच, जोंपर्यंत हा जीव, आपला सूक्ष्मदेह जें मन तेंच संसारांतील त्रिविध ताप पिकविणारें शेत आहे, असें उमजत नाहीं, तोंपर्यंत त्याला संसारांत भ्रमण करावें लागतें, व त्यामुळेंच त्याचा शोक, मोह, रोग, प्रीति, लोभ व वैर ह्यांशीं संबंध घडून त्यांविषयीं प्रेम उत्पन्न होतें. राजा, ह्याकरितां तूं सावध होऊन मनोरूप प्रबळ शत्रूचा नाश कर. बाबा, उपेक्षा केली असतां हा शत्रु फारच जोरावतो; ह्यास्तव तूं ह्याची अगदीं उपेक्षा करूं नको. राजा, हा दुष्ट जर बळावला, तर प्रत्यक्ष आत्म्याला चोरून नेतो, हें लक्षांत ठेव. ह्याला मारून टाकण्याचें उत्तम शस्त्र म्हणजे सद्गुरूच्या व परमेश्वराच्या चरणांची सेवा करणें हेंच होय. म्हणून तूं तें शस्त्र स्वाधीन करून घेऊन वासनारूप महाशत्रूचा त्वरित वध करून टाक.

## अध्याय बारावा.

—:०:—

### रहूगणाच्या शंकांचें निवारण.

रहूगण राजा जडभरत ब्राह्मणास म्हणाला:—हे अवधूता, तूं साक्षात् ईश्वर असून संसाररूप महासंकटापासून लोकांचें संरक्षण करण्याकरितां हें शरीर धारण केलें आहेस. साधो, तुझ्या ठिकाणीं आत्मावबोध नांदत असल्यामुळें तूं लौकिक तनूची मुळींच परवा करीत नाहींस. महाराज, आपण जो वेष धारण केला आहे, त्यावरून आपला आत्मानुभव लोकांस प्रतीत होत नाहीं; इतकेंच नव्हे, तर आपणांविषयीं उलट अपूज्यता मनांत उत्पन्न होते. भगवन्, आपल्यास मी शरण आलों आहें, तर कृपाप्रसाद करावा. मुने, ज्वरित मनुष्याला जसें गोड औषध मिळावें, अथवा ग्रीष्मऋतूंत उन्हानें तप्त झालेल्या मनुष्याला जसें थंडगार उदक मिळावें, तसें, अज्ञानमूलक शरिरादिकांविषयीं अहंकाररूपी सर्पानें दंश केलेल्या मला, आपलें वचन हें अमृततुल्य दिव्यौषध प्राप्त झालें आहे ! महाराज, आपण जी देहादिकांची उपपत्ति सांगितली, तिजविषयीं मला कांहीं शंका आल्या आहेत त्या मी पुढें विचारीन; परंतु आपण अध्यात्मशास्त्रांतील ज्या चार गोष्टी सांगितल्या, त्यांचा अधिक खुलासा आपल्याकडून व्हावा अशी माझ्या मनास आवड उत्पन्न झाली आहे; तर ती माझी आवड कृपा करून आपण पुरवावी. योगिराज, आपण सांगितलें कीं, क्रिया व त्यांचीं फळें दिसतात व खरीं भासतात, तरी तीं केवळ व्यवहाराला मात्र आधार आहेत; त्यांचा तात्त्विक रीतीनें विचार केला असतां तत्काल त्याचें मिथ्यात्व दृग्गोचर होतें; ह्या गोष्टीबद्दल माझें मत अद्याप साशंक आहे.

जडभरत म्हणाला:—राजा, देह हा पृथ्वीचाच विकार आहे. हा पार्थिव पदार्थ कांहीं कारणानें चलित झाला, म्हणजे त्यास मनुष्य हें नांव प्राप्त होतें. ह्या पार्थिव पदार्थावर पाय, घोटे, पोटऱ्या, गुडघे, मांडया, कमर, वक्षस्थळ, मान, खांदे वगैरे दुसरे पार्थिव पदार्थ आहेत. ह्याप्रमाणें हें शरीर जर जड आहे, तर त्यास ओझें किंवा श्रम ही भावना कोठून असेल बरें? राजा, आणखी असें पहा: खांद्यावर एक लांकडाची पालखी असून तींत सौवीर देशचा रहूगण राजा ह्या नांवाचा एक मातीचा गोळा ठेवलेला आहे राजा. ह्या मातीच्या गोळ्याविषयीं तुला अभिमान वाटून तूं मूर्खपणानें, "मी सिंधुदेशचा राजा" असें मानितोस; दुसरें काय? राजा, ह्या गरीब बिचाऱ्या भोयांना तूं वेठीला धरून दामटीत नेत आहेस, व मी लोकांचें संरक्षण करीत आहें, अशी व्यर्थ बढाई मिरवीत

आहेस; तेव्हां तूं प्रजेविषयीं सदय आहेस किंवा निर्दय आहेस? राजा, तुझें निर्दय वर्तन पाहून कोणीही ज्ञाता तुला बरें म्हणणार नाहीं हें ध्यानांत ठेव. राजा, स्थावरजंगम सर्व पदार्थ ह्या पृथ्वीपासूनच उत्पन्न होतात व पृथ्वींतच लय पावतात, असें जर आपण प्रत्यक्ष पाहत आहों, तर त्या पदार्थांच्या नांवापलीकडे व्यवहाराला सत्य कारण आहे असें कसें मानावें तें सांग. आतां, पृथ्वीला सत्यत्व आहे असें तुला वाटत असेल, तर पृथ्वी शब्दानें जो पदार्थ मनांत आणावयाचा, तोही श्रुतीमध्यें मिथ्या म्हणूनच सांगितला आहे; कारण पृथ्वी ही संज्ञा परमाणूंच्या समुदायास असल्यामुळें, पृथ्वी ही असत्य ठरून परमाणूंस सत्यत्व येऊं पाहतें; परंतु परमाणु हे देखील कल्पितच आहेत. पृथ्वीरूप कार्याची उपपत्ति करण्याकरितां प्रतिपादकांनीं ही एक कल्पना केली आहे, परंतु ती भ्रममूलक होय; कारण प्रपंच हा जर भगवन्मायेचा खेळ आहे, तर परमाणूंची कल्पना सत्य कशी असावी? राजा, ह्याप्रमाणेंच, दुसरें जें कांहीं आंखूड, लांब, बारीक, जाड, कारण, कार्य, सचेतन, अचेतन असें दिसत असेल, तें सर्व द्वैतमायामूलक आहे. विषय, स्वभाव, आशय, काल व कर्म हीं सर्व त्या भासमान द्वैताचीं नांवें होत.

जडभरत पुढें म्हणतो:—राजा, आत्मस्वरूपाचें ज्ञान हें मात्र सत्य होय. हें अति शुद्ध, अंतर्बाह्य भेदरहित, परिपूर्ण, अंतर्मुख व निर्विकार आहे. ह्यालाच षड्गुणैश्वर्यसंपन्न वासुदेव असें म्हणतात. हे रहूगण राजा, हें ज्ञान तपश्चर्येनें प्राप्त होत नाहीं; यज्ञयागादिक वैदिक कर्मांनीं, अन्नदानानें किंवा परोपकारानें हें मिळत नाहीं; व वेदाभ्यास करून किंवा उदकाची, अग्नीची अथवा सूर्याची उपासना केल्यानेंही हें संपादितां येत नाहीं. हें मिळविण्यास उत्तम साधन म्हणजे महासमर्थ सत्पुरुषांच्या चरणतीर्थांत स्नान करणें हेंच होय. राजा, सत्पुरुषांच्या पादसेवेनें हें कार्य घडतें, ह्याचें कारण, ते भगवंताच्या पुण्यकारक कथा नेहमीं गात असतात; व त्या कथा श्रवण करून मुमुक्षूचें चित्त संसारपर गोष्टींतून निवृत्त होऊन तें भगवच्चरित्रांत अधिकाधिक लीन होतें. विषयांवर आसक्ति ठेविली म्हणजे योगी सुद्धां योगमार्गापासून भ्रष्ट होतो, हें लक्षांत ठेव. राजा, ह्याला उदाहरण स्वतः माझेंच आहे. मी पूर्वजन्मीं भरत नांवाचा राजा होतों. दृश्यादृश्य वस्तूंविषयीं आसक्ति सोडून देऊन मी भगवत्कथेंत उत्तम प्रकारें निमग्न असतांना माझें चित्त एका मृगाकडे लागलें, व त्यामुळें माझ्या पुरुषार्थाची हानि होऊन मला पुढें मृगजन्म प्राप्त झालें. राजा, मी भरतदेहांत जी कृष्णोपासना केली होती, तिच्यामुळें, मला मृगतनु प्राप्त झाल्यावरही पूर्वजन्मीची माझी स्मृति इतर पुरुषांप्रमाणें नष्ट झाली नाहीं. राजा, आतां मी जनसंगास फारच भीत असतों, व त्यामुळें आपलें स्वरूप प्रकट न करितां लोकांत वागत आहें. ह्यास्तव, राजा, साधूंचा समागम करून अद्वैतज्ञानाची प्राप्ति करून घ्यावी व ज्ञानखड्गानें ह्या जन्मींच मोहपाश छेदून टाकावा. भगवंताच्या चरित्राचें कीर्तन व श्रवण केलें असतां आत्मसाक्षात्कार अखंड राहतो, व मुमुक्षु पुरुष संसारमार्गाच्या शेवटास पोहोंचून भगवत्पदास मिळतो.

# अध्याय तेरावा.

—:०:—

## भवाटवीचें वर्णन.

जडभरत ब्राह्मण म्हणाला:–रहूगण राजा, हा संसार भयंकर व दुःखमय आहे. ज्याप्रमाणें अर्थ मिळविण्याकरितां तत्पर असणारा व्यापाऱ्यांचा तांडा फिरतां फिरतां वाट चुकून अरण्यांत यावा, त्याप्रमाणें मायेमुळें ज्ञानभ्रष्ट होऊन सात्विक, राजस व तामस कर्में करून सुख मिळविण्याकरितां तत्पर असणारा जीवांचा तांडा ह्या भवरूप

अरण्यांत येतो व नानाप्रकारचीं दुःखें भोगितो. राजा, वासनारूपी मनानें ( पुढाऱ्यानें ) चुकी केल्यामुळें जीव ह्या भवाटवीमध्यें सांपडला म्हणजे ज्ञानेंद्रियरूपी सहा चोर त्यास लुटितात व त्याच्याजवळ आत्मज्ञानरूपी धन असेल नसेल तेवढें बुचाडून घेतात. लांडगा जसा मेंढरास ओढून नेतो, तसे कामक्रोधादिक विकाररूपी कोल्हे त्यास ओढून नेऊन आपल्या हस्तगत करून ठेवितात. राजा, जीव ह्या अरण्यांत असतां, पुष्कळ वेली, गवत, जाळ्या ह्यांत ( काम्यकर्मांत ) गुरफटून जातो, व मग त्यास ( नानाप्रकारच्या संकटरूपी ) रानमाशा गांजून सोडतात; तेव्हां देहादिकांच्या सत्यतेविषयीं त्याचा ग्रह दृढ होतो व कोलतीसारख्या अनर्थोत्पादक सुवर्णरूपी पिशाचास धरावें असें त्यास वाटतें. जीवाच्या बुद्धीचा कल स्वभावांतच राहावयाला घर, पिण्याला पाणी, अर्थसंचय इत्यादिकांकडे असल्यामुळें तो अरण्यांत इतस्ततः धावूं लागतो. पुढें त्यास रजस्वलारूपी ( सुंदर, तरुण व उपभोग्य स्त्रीरूपी ) वावटळ गांठते, आणि मग त्यास कर्मसाक्षी व आत्मस्वरूपी दिग्देवतेचें भान मुळींच रहात नाहीं. मग जीवाचे जे हाल होतात, ते काय सांगावे? जननिंदारूपी मशकाच्या कठोर शब्दांनीं त्याचें डोकें भणाणून जातें. त्या मशकांस तो शोधूं लागतो; पण ते त्यास सांपडत नाहींत. शत्रुरूपी घुबडांचे हृदयभेदक शब्द त्याच्या कानीं येतांच त्याचें काळीज चरारून जातें, व क्षुधाकुल होऊन शेवटीं तो अशा वृक्षांचा ( दुष्ट कामक्रोधादिकांचा ) आश्रय करितो कीं, त्यांच्या केवळ सावलीनेंच त्यास बाधा होते. ( पातक लागतें. ) राजा, विषयसुखाविषयीं त्याची मनोवृत्ति इतकी उचंबळून जाते कीं, मृगजलासारख्या मिथ्या विषयांविषयीं लोलुप होऊन तो त्यांच्यामागें धावत सुटतो. त्याची ज्ञानकला नष्ट झालेली असते, ह्यामुळें कोरड्या पडलेल्या नद्यांतच ( पाखंडवादांत ) तो बुडया मारूं लागतो. मग त्याचे जे हाल होऊं लागतात, ते चुकविण्याकरितां त्यास आपल्या बांधवांजवळ अन्नादिकांसाठीं तोंड वेंगाडणें भाग पडतें. राजा, कधीं कधीं तो त्या अरण्यामध्यें वणव्यांत सुद्धां सांपडतो; ( त्यास आप्त-इष्टांच्या मरणाचें दुःख होतें; ) कधीं कधीं राक्षस त्याचें प्राणरूपी सर्वस्व हरण करितात; कधीं बलिष्ठ पुरुष त्यास गांठून ‘ दे माय धरणी ठाय ’ करून सोडतात; तेव्हां तो इतका दीन होतो कीं, त्यास कोणत्याही गोष्टीचें भान रहात नाहीं. अशा स्थितींत आप्तादिकांपासून त्यास क्षणभर धीर मिळतो, परंतु त्याचा फारसा उपयोग होत नाहीं. राजा, जीव भवाटवींतून हिंडत असतां त्याच्या पायांत कांटे मोडतात व खडे रुपतात; ( विघ्नें येतात; ) तो पर्वतावर वगैरे चढूं लागला, ( यज्ञयागादिक कर्में करूं लागला, ) व त्यास नीट चढतां आलें नाहीं, ( त्याच्या हातून तीं कर्में नीट घडलीं नाहींत, ) तर त्यास फार खेद होतो. पत्नीपुत्रादिक कुटुंबपरिवाराचें त्याच्या हातून नीट संगोपन होईनासें झालें, म्हणजे ती मंडळी त्याच्यावर कातावून जाते व मग त्यास उपाशीं मरण्याची पाळी येऊन ठेपते. मग हा उलट त्यांच्यावर संतापतो ! रहूगण राजा, कधीं कधीं त्याला निद्रारूपी अजगर नकळत गिळून टाकितो; कधीं कधीं तो मेला असें समजून त्याचे स्वकीयजन त्यास अरण्यांत फेंकून देतात; मग त्यास तेथें सर्प चावतात, व त्या विषारानें तो अंधळा होऊन एखाद्या अंधाऱ्या विहिरींत कोसळून आक्रोश करूं लागतो ! राजा, कधीं कधीं तो क्षुद्ररस ( परस्त्री ) शोधूं लागतो; मग त्या क्षुद्ररसावरील मशक ( त्या स्त्रीचा रक्षक, पति इत्यादि ) त्याच्यावर तुटून पडतात; इतक्याउपरही त्या क्षुद्ररसाची त्यास प्राप्ति झाली, तर भलतेच कोणी त्याच्यापासून तो हिरावून नेतात ! एखादे प्रसंगीं त्याला थंडी, ऊन, वारा,

पाऊस ह्यांपासून आपलें रक्षण करण्याची शक्ति नसते. कधीं कधीं लोकांशीं व्यवहार करीत असतां तो लबाडी करून लोकांस फसवितो व मग ते लोक त्याचा द्वेष करितात. अरण्यामध्यें तो जीव नागविला गेल्यावर, त्यास निजावयास शय्या, बसावयास आसन व रहावयास घर सुद्धां कोणी देत नाहीं. मग तो लोकांच्या वस्तूंचा अभिलाष करूं लागतो, व अखेरीस लोक त्याची फजिती करितात. राजा, द्रव्यादिकांविषयीं जीवांचा आपसांत कलह सुरू असतां, तशांत ते आणखी एकमेकांत विवाहसंबंध वगैरे करितात, व ह्या संसाराटवींत सुखोपभोग करूं लागतात! पुढें त्यांस नानाप्रकारचीं संकटें, द्रव्याचा नाश व उपसर्ग ह्यांच्यापासून पुष्कळ पीडा होऊन कालक्रमानुसार मरण प्राप्त होतें. जो कोणी मरेल त्यास टाकून द्यावयाचें, व जो जन्मास येईल त्यास बरोबर घ्यावयाचें, असें करीत करीत हा तांडा पुढें पुढें जात राहतो; व इतकें झालें तरी, तो ज्या ठिकाणाहून निघाला, त्या ठिकाणीं परत येण्याची इच्छा त्यास उत्पन्न होत नाहीं! बरें, त्या तांड्यापैकीं कोणी भवाटवीच्या बाहेर सुखरूप स्थळीं जाऊन पोहोंचेल, तर ठीक; परंतु तेंही घडत नाहीं! राजा, प्रत्यक्ष दिग्गजांना जिंकून टाकणारे शूर पुरुष ह्या पृथ्वीवर माझें माझें करीत राहून शेवटीं युद्धांत मरून पडतात; परंतु सर्वसंगपरित्याग करणारा पुरुष कोणाशीं वैर करून त्यास शासन करण्याच्या भरीस न पडतां सहजीं सायुज्यपद मिळवितो!

सारांश, राजा, हा जीवसमुदाय भवाटवीमध्यें वेलींच्या पल्लवांचा ( स्त्रियांच्या बाहूंचा ) आश्रय करून, त्या वेलींच्या आश्रयास राहणाऱ्या व अर्धबोबडे शब्द करणाऱ्या पक्ष्यांवर (मुलांबाळांवर) लुब्ध होतो. कदाचित् कधीं कधीं सिंहांच्या टोळीला ( कालचक्राला ) भिऊन, बचावासाठीं बक, कंक, गृध्रपक्षी ( पाखंडी लोक ) ह्यांच्या बरोबर सख्य करितो. पुढें त्यांच्या आश्रयानें फसल्यावर हंसांच्या ( धार्मिक लोकांच्या ) आश्रयार्थ धावतो. परंतु हंसांबरोबर त्याच्यानें दिवस निघत नाहींत. मग तो वानरांकडे ( भ्रष्ट शूद्रांकडे ) जातो. तेथें त्यास विषयादिकांत सुख वाटून, त्यांमध्यें तो इतका मग्न होतो कीं, आपलें आयुष्य किती संपलें व किती शिल्लक आहे, ह्याचें देखील त्यास विस्मरण पडतें. तात्पर्य, गृहरूप वृक्षांवर क्रीडा करण्याच्या वासनेमुळें स्त्रीपुत्रादिकांवर आसक्त होऊन तो इतका गाफिल बनतो कीं, आपल्या संसारबंधनाचा त्याच्या मनांत मुळींच विचार न राहतां तो त्या वृक्षावरून खालीं पर्वताच्या दरींत ( रोगादि दुःखांत ) पडतो. तेथें पडल्यावर, त्या दरींतील हत्तीला ( मृत्यूला ) पाहून त्याची पांचावर धारण बसते व मग तो अंतरालांत एका वेलीला ( प्रारब्धकर्माला ) धरून निमूट राहतो! राजा, दैवयोगानें तो त्या संकटांतून सुटला, तर तो फिरून आपल्या मेळ्यांत प्रवेश करून पूर्वीप्रमाणें रमतो, तेव्हां ह्याला काय म्हणावें? एकंदरींत मायेनें ह्या भवाटवीमध्यें सांपडलेला जीव आपला पुरुषार्थ न जाणतां इतस्ततः गोते खात भटकत असतो!

रहूगणा, तूंही ह्या भवाटवींत आला आहेस हें मनांत आण. इतरांस शासन करण्याची आपली इच्छा सोडून दे; सर्व प्राण्यांशीं सख्य कर; आपला आत्मा भगवत्सेवेंत गुंतवून इतर वस्तुमात्रापासून पराङ्मुख हो; व पाजळलेल्या ज्ञानरूप खड्गानें हा भवाटवी तोडून टाक.

रहूगण राजा म्हणालाः—महाराज, ह्या मनुष्यजन्माची केवढी थोरवी सांगावी! देवादि जन्मांपेक्षांही मनुष्यजन्म श्रेष्ठ होय! देवादिकांच्या जन्मांत आपल्यासारखे कृष्णभजनांत सर्व आयुष्य घालविणारे महात्मे पुष्कळ वेळपर्यंत सहवासास मिळतील काय! खचीत नाहीं. मुनिवर्य, आपला जो मला दोन घटका समागम

झाला, त्यांतच माझा कुतर्कमूलक अविवेक पार नाहींसा झाला; मग जे लोक आपल्या पादरजांत नित्य लोळतील, त्यांच्या ठिकाणीं पूर्ण विवेक उत्पन्न होऊन परमात्म्याविषयीं शुद्धभक्ति वास करूं लागेल ह्यांत आश्चर्य तें कोणतें? साधो, आपल्या चरित्रावरून, सत्पुरुष कोणत्या रूपानें व वेषानें ह्या भूतलावर संचार करीत असतात, हें कांहींच सांगता येत नाहीं; ह्याकरितां, अगदीं लहानापासून थोरापर्यंत ज्ञात किंवा अज्ञात अशा सर्व ब्रह्मज्ञानसंपन्न पुरुषांना मी नमस्कार करितों, व त्यांनीं राजांचें कल्याण करावें म्हणून इच्छितों.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा परीक्षिता, रहूगण राजानें उपमर्द केला असतांही तिकडे दुर्लक्ष करून जडभरतानें मोठ्या काकुळतीनें त्यास आत्मज्ञानाचा उपदेश केला हें लक्षांत ठेव. सत्पुरुष जगाचें बरें व्हावें हेंच इच्छित असतात; स्वतांचा मानापमान हा त्यांच्या ध्यानींमनीं सुद्धां नसतो. रहूगण राजानें सद्बोध ग्रहण करून मोठ्या गाहिंवरानें त्या ब्रह्मश्रेष्ठाचे पाय धरिले; व त्याच्या ठायीं आत्मविचार रूढ झाला, असें पाहून जडभरतास समुद्राप्रमाणें आनंदाचें भरतें आलें; आणि नंतर तो पुनः पूर्ववत् निर्विकाररूपानें भूमीवर संचार करूं लागला. असो. रहूगणाची देहाविषयीं अहंकारबुद्धि नष्ट होऊन, देहावर आत्मबुद्धीचा आरोप करणें हें अविद्येचें फल होय, असें त्यास पूर्ण ज्ञान झालें. राजा, भगवद्भक्तांचा आश्रय केला असतां मनुष्यास केवढा अधिकार प्राप्त होतो, ह्याचा तूं विचार कर.

परीक्षित राजा म्हणालाः—हे महाभगवद्भक्त मुने, आपल्या अगाध ज्ञानाचें महत्त्व काय सांगावें? आपण व्यापाऱ्यांच्या तांड्याच्या रूपानें जीवसमुदाच्या संसारमार्गाचें वर्णन केलें खरें; पण तें माझ्यासारखा सामान्य मनुष्याला चांगलें समजण्यासारखें नाहीं. ह्यास्तव, आपण संसारमार्गाचें दुर्बोध स्वरूप, फिरून उघड अर्थ सांगून स्पष्ट करून दाखविण्याची कृपा करावी.

## अध्याय चौदावा.

—:०:—

### भवाटवीचें सविस्तर निरूपण.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा परीक्षिता, अखिल चराचरावर सत्ता चालविणाऱ्या श्रीभगवान महाविष्णूच्या स्वाधीन असणाऱ्या मायेनें ह्या जीवसमुदायाच्या ठायीं, देहादिक आपले आहेत अशी जी एकदा भावना उत्पन्न केली, तिचा परिणाम असा झाला कीं, जीव हे सत्त्व, रज व तम ह्या गुणांपैकीं एक अथवा अनेक गुणांच्या योगानें बरीं वाईट कर्मे करून नानाप्रकारच्या देहांचा स्वीकार व त्याग करूं लागले; श्रोत्र, त्वचा, नेत्र, घ्राण, जिव्हा व मन हीं इंद्रियें तृप्त कशीं होतील, हाच मात्र त्यांस निदिध्यास उत्पन्न झाला; व त्यामुळें ते आज अनादि कालापासून ह्या संसाराचा अनुभव घेत आहेत. राजा, घोर अरण्यांतील मार्गाप्रमाणें ह्या संसारांतील मार्ग अति भयंकर आहेत. व्यापाऱ्यांचा तांडा जसा द्रव्यलोलुप होऊन चुकून अरण्यांत शिरतो, तसा हा जीव केवळ आपल्या कर्मानें ह्या स्मशानाप्रमाणें अमंगल व भयंकर भवारण्यांत शिरला आहे. अजून त्याला, आपण जीं कर्मे करीत आहों तीं व्यर्थ असल्यामुळें सोडून द्यावीं, अशी इच्छा होत नाहीं; श्रोत्रादिक षडिंद्रियें शत्रूप्रमाणें आपणास विपत्तींत घालीत आहेत, हें अजून त्यास कळत नाहीं; आणि परमात्मा व सद्गुरू ह्यांच्या पदकमलीं मधुकर होऊन राहिल्यानें संसारांतील त्रिविध ताप नष्ट होतील, असा त्यास अजून विश्वास उत्पन्न होत नाहीं! राजा, मन, नेत्र, त्वचा इत्यादि इंद्रियें ह्यांस त्यांच्या कर्मावरून संसाररूप अरण्यांतील चोरच म्हणण्यास काय हरकत आहे? एकदा जीव सहा चोरांच्या तावडींत सांपडला, म्हणजे त्यानें ईश्वर-

प्राप्तीकरितां मोठे कष्ट करून जो धर्मरूप धन-संचय केलेला असेल, तो ते हिरावून घेतात. एखाद्या श्रीमंत मनुष्याला दुर्व्यसनाच्या नादीं लावून तो बेताल झाला म्हणजे दुष्ट लोक जसें त्याचें सर्वस्व लुटतात, तशीं नेत्र, त्वचा इत्यादि इंद्रियें सुंदर रूप पाहणें, स्त्रियांस स्पर्श करणें, गाणें ऐकणें, पक्वान्नें सेवन करणें, सुगंध ग्रहण करणें, ऐहिक सुखाविषयीं विचार करणें इत्यादि घरांतील क्षुद्र गोष्टींच्या नादीं जीवाला लावून, त्या जीवाचें परमार्थसाधनरूपी धन लुटतात! राजा, स्त्रीपुत्रादिक हीं नांवानें मात्र स्वकीय होत; परंतु त्यांची कृति लांडग्यांप्रमाणें व कोल्ह्यांप्रमाणेंच असते. कारण, धनगरानें राखलेल्या मेंढ्यांना लांडगे जसे त्याच्या देखत बळजबरीनें हरण करितात, तशीं स्त्रीपुत्रादिक हीं जीवानें केलेला धर्मसंग्रह त्याच्या देखत व बळजबरीनें हरण करितात. राजा, गृहस्थाश्रम म्हणजे कर्मक्षेत्रच होय. शेतांत ज्याप्रमाणें सालोसाल नांगरणी होत असूनही, त्यांतील बीजें नष्ट झालीं नसल्यास तीं प्रतिवर्षी पर्जन्य पडतांच उगवून जिकडे तिकडे जाळ्या, गवत, वेली वगैरेंची दाटी होऊन जाते, त्याप्रमाणेंच ह्या गृहस्थाश्रमांतील कर्मांचीं बीजें कधीं नष्ट न होतां वासनारूपानें राहून प्रसंगोपात्त फिरून उत्कटावस्थेस येतात. राजा, कापुराच्या करंडयांतील कापूर संपला तरीही त्यांतील वास जसा नाहींसा होत नाहीं, तसे गृहस्थाश्रमांत विषय मिळत नाहींतसे झाले तरी त्यांच्या वासना अवशिष्ट राहतात; व ह्या वासनाच पुढील जन्मांतील कर्मांचीं बीजें होतात.

राजा, जीव ह्या गृहस्थाश्रमांत येऊन पडला, म्हणजे डांसांसारखे व माशांसारखे नीच असे दुष्ट लोक व टोळ, पक्षी, चोर, उंदीर इत्यादिक, त्याच्या बाह्य प्राणांना त्रासवून सोडतात; व इतका त्रास झाला तरी तो जीव त्या मार्गांत फिरत राहतो. त्याच्या ठिकाणीं जो मायामोह उत्पन्न होतो, त्यामुळें त्यास नानाप्रकारच्या विषयसुखांच्या इच्छा उत्पन्न होऊन तो अनेक कर्मे करण्यास प्रवृत्त होतो व त्या कर्मांत त्यास गोडी वाटून गंधर्वनगराप्रमाणें मिथ्याभूत असलेल्या ह्या मृत्युलोकाला सत्य मानितो. कधीं कधीं तो उदकपान, भोजन, मैथुन इत्यादिकांमध्यें लुब्ध होऊन, मृगजळासारख्या प्रथमदर्शनीं रम्य परंतु वास्तविक व्यर्थ अशा विषयांकडे धाव घेतो. राजा, क्वचित् प्रसंगीं सुवर्ण त्याच्या दृष्टीस पडतें. सोनें म्हणजे एक प्रकारची अग्नीची विष्टाच होय. जगांतील सर्व दोष ह्या सोन्याच्या आश्रयानें राहतात. हा जीव रजोगुणाच्या स्वाधीन होऊन तें सुवर्ण संग्रहीं ठेवावें म्हणून इच्छा करितो; आणि थंडीनें कुडकुडणारा पुरुष अग्नि मिळण्याविषयीं उतावळा होऊन ज्याप्रमाणें कोलतीसारख्या पिशाचाला धरावयास जातो व फसतो, त्याप्रमाणें हा जीव सुवर्ण संग्रहीं ठेवण्याचा प्रयत्न करून शेवटीं फसतो. सारांश, त्या सोन्याकरितां क्वचित् प्रसंगीं ह्याचे प्राणही जातात. राजा, कधीं कधीं राहावयास जागा, प्यावयास पाणी, निर्वाहास द्रव्य इत्यादि उपजीविकेच्या साधनांच्या भरीस पडून ह्या संसाराटवींत जीव एकसारखा इकडे तिकडे भटकत असतो. तरुण स्त्री म्हणजे केवळ वावटळ होय. कधीं कधीं ती जीवाला अंकावर घेते. तेव्हां तत्काळ तिच्याविषयीं प्रीतिरूपी धूळ चोहोंकडे उडून त्यास सर्वत्र अंधार भासूं लागतो, व तो अनाचार करण्यास प्रवृत्त होतो. त्या धुंदींत, आपलें दुष्कर्म दिग्देवता पहात आहेत, हें त्याच्या लक्षांत मुळींच येत नाहीं. एखादे वेळीं संसारसुखांतील निरर्थकता त्याच्या लक्षांत येते, परंतु देहाभिमानांत गुंग होऊन त्या निरर्थकतेचीत्यास पुढें स्मृति होत नाहीं, व त्या विस्मरणामुळेंच तो फिरून मृगजळासारख्या संसारसुखांच्या पाठीस लागतो. कित्येक वेळीं घुबडें व रानमाशा ह्यांप्रमाणें अतिशय त्रासदायक व भयंकर

शब्द करून, शत्रु किंवा अधिकारी पुरुष प्रत्यक्ष किंवा पर्यायानें त्यास धमकी वगैरे देतात, व त्यामुळें त्याचें अंतःकरण अगदीं घाबरून जातें. राजा, त्याचें पूर्वसुकृत जेथवर असतें, तेथवर त्याची सद्दी ठीक चालते; परंतु तें नष्ट होतांच तो सुखप्राप्तीसाठीं धनिक लोकांच्या मागें लागतो. ते लोक काजरा, श्वेतकावळी इत्यादि पापवृक्ष, पापलता व विषकूप ह्यांसारखेच निरुपयोगी असतात. ते आपल्या द्रव्याचा व्यय ऐहिक किंवा पारमार्थिक अशा कोणत्या ही कृत्यांकडे करीत नसल्यामुळें ते जिवंत असून मेल्याप्रमाणेंच असतात; व हा त्या धनिकांच्या मागें लागून आपणही जिवंत असून मेल्यासारखाच बनतो. एखादे वेळीं नीच लोकांच्या संगतीला लागून त्याची बुद्धि चकते, व उदकरहित प्रवाहांत अडखळून पडल्याप्रमाणें तो पाखंडांत जाऊन आदळतो; त्या पाखंडापासून तो इहलोकीं तर फसतोच, पण परलोकींही फसतो! दुसऱ्याला त्रास दिल्यामुळें केव्हां केव्हां त्यास अन्नही मिळत नाहीं. मग तो आपल्या बापाची किंवा मुलाची एखादी दर्भाची काडी देखील ज्याच्याजवळ असेल त्यास खावयास उठतो. फार कशाला? आपल्या पित्याला किंवा पुत्राला देखील खाऊन टाकण्यास तयार होतो! राजा, कधीं कधीं संसारांत त्यास खडतर प्रसंग येऊन, संसार हा वणव्याप्रमाणें दुःखमय आहे, अशी त्याची खातरी होते व त्यास फार विरक्ति उत्पन्न होते. कधींकधीं त्यास असा विपरीत काल प्राप्त होतो कीं, राजपुरुष हे राक्षसांप्रमाणें त्याचें सर्वस्व बुचाडून नेतात व मग त्यास अतिशय दुःख होऊन तो मूर्छित पडतो! कधीं कधीं तो, आपला पिता व पितामह हे अमर आहेत, असें वेडयासारखें मानून स्वप्नांप्रमाणें खोटया सुखाचा अनुभव घेतो; कधीं कधीं आपल्या भोंवतालच्या लोकांच्या यातना पाहून त्यास फार दुःख होतें; कधीं कधीं संसारांतील कर्मविधींचा पर्वत चढून जावें असें त्यास वाटतें; व तीं कर्मे त्याच्यानें होतनाशीं झालीं, म्हणजे रस्त्यांतील कांट्यांनीं व खड्यांनीं त्रासून गेल्याप्रमाणें होऊन तो मध्येंच खोळंबतो; कधीं कधीं जठराग्नि प्रदीप्त होऊन त्याच्या शांतीची सोय जमली नाहीं, तर तो आपल्या कुटुंबांतील मनुष्यांवर कातावतो; तीच फिरून निद्रारूप अजगराकडून ग्रस्त झाल्यावर गाढ अंधकारांत निमग्न होऊन निर्जन अरण्यांत टाकलेल्या प्रेताप्रमाणें पडून राहतो. एखादे वेळीं दुर्जनरूप सर्प त्यास चावतात, व मग त्याची गर्वरूप दाढ पडून जाते; तेव्हां त्यास अगदीं चैन पडत नाहींसें होतें; त्याचें काळीज तिळतिळ तुटूं लागतें, व अखेरीस ज्ञानकला नष्ट होऊन अंधळ्याप्रमाणें तो एखाद्या कूपांत कोसळतो. केव्हां केव्हां कामरूप मधूचा बिंदु मिळण्याकरितां परस्त्री किंवा परधन ह्यांजकडे तो वाकड्या नजरेनें पाहतो; व मग त्यास राजा किंवा त्या स्त्रीचा पति अथवा धनाचा मालक ह्यांनीं ठार मारिलें, म्हणजे तो भयंकर नरकांत जाऊन पडतो. राजा, ह्या कर्मांमुळेंच जीव ह्या लोकीं व परलोकीं फिरून फिरून जन्म घेतो. यदाकदाचित् राजा किंवा अन्य पुरुष ह्यांच्या कचाटींतून जीव सुटला, तरी त्यानें मिळविलेली परस्त्री अथवा परधन हीं त्याच्याजवळ थोडींच राहतात? दुसराच कोणी ती उपटतो, व त्या दुसऱ्यापासून तिसरा हिसकावतो, आणि अशा प्रकारें सर्व अव्यवस्था माजते. कधीं कधीं थंडी, वारा, ऊन इत्यादि आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक दुःखांच्या फेऱ्यांत हा जीव सांपडतो; व नंतर त्यांतून सुटका होण्याचा कांहीं उपाय चालत नाहींसा होतो, तेव्हां अपार चिंतेंत निमग्न होऊन अगदीं दीन होतो. राजा, एखादे वेळीं ह्याचा दुसऱ्यांशीं व्यवहार चालत असतां, दमडीच्या कवड्या देखील दगलबाजीनें दुसऱ्यापासून हिरावून घेण्याची त्यास बुद्धि

उपजते; व ह्याप्रमाणें त्यानें ठकबाजी केली, म्हणजे मग त्यास लोक पाण्यांत पाहूं लागतात. असो. ह्या संसारांत असे पुष्कळ उपसर्ग असून शिवाय सुख, दुःख, प्रीति, द्वेष, भय, अभिमान, उद्धटपणा, उन्माद, (पिशाचबाधा) शोक, मोह, लोभ, मत्सर, ईर्ष्या, अपमान, क्षुधा, तृषा, आधि, व्याधि, जन्म, जरा, मृत्यु इत्यादि दुसरेही पुष्कळ उपसर्ग आहेत.

राजा, स्त्री म्हणजे परमेश्वराची मायाच होय. तिची व जीवाची गांठ पडली, म्हणजे ती आपल्या भुजलतांनीं त्याला दृढ आलिंगन दिल्याशिवाय रहात नाहीं; आणि मग ह्याची अक्कलहुशारी तात्काळ लटपटून जाते! नंतर जीव तिला क्रीडेसाठीं घर बांधून देण्याचा विचार करूं लागतो. जीवाला स्त्रीच्या आश्रयापासून पुत्र व कन्या होतात. मग तो पत्नी व अपत्यें ह्यांचें भाषण, अवलोकन, विलास ह्यांच्या योगानें पूर्ण नादावून जाऊन अखेरीस आपण होऊन स्वतांस अपार अधतमस् नरकांत लोटितो! राजा, काल हें षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीमहाविष्णूचें चक्र होय. ह्याचे परमाणूपासून दोन परार्धपर्यंत भेद आहेत. हें कालचक्र फिरत असतां, ब्रह्मदेवापासून तों तृणस्तंबापर्यंत, बालतारुण्यादिरूप वयाच्या स्वरूपानें शीघ्रगतीनें सर्व प्राणिमात्राचा देखत देखत संहार करितें; हा प्रकार पाहून जीव घाबरतो व इतका भांबावून जातो कीं, तें कालचक्र धारण करणाऱ्या सनातन प्रभूचा अनादर करून अनार्य व कृत्रिम अशा नास्तिक धर्माचा तो स्वीकार करितो. नास्तिक धर्म हा केवळ कंकपक्षी, गिधाडें, बगळे व बडबाचुळे ह्यांसारखा नीच व तुच्छ होय. राजा, ज्याची सनातन धर्मावर मुद्धां श्रद्धा नाहीं, त्याची पाखंडावर तरी कशी श्रद्धा बसेल बरें? मग जीवाचें मन अस्थिर पाहून पाखंडी लोक त्यास सोडून देतात; नंतर तो त्या मेळ्यांतून निघून फिरून ब्राह्मणांत राहूं लागतो; परंतु मग ह्या मूर्खाला ब्राह्मणांचें उपनयनादि श्रौतस्मार्त कर्मानुष्ठान कोठून आवडणार? शेवटीं तो ब्राह्मणांचा आचार सोडून देऊन शूद्रांप्रमाणें वागूं लागतो. शूद्रांस वेदोक्त कर्मांचा अधिकार नसल्यामुळें ते वानरांप्रमाणें केवळ कुटुंबभरण व स्त्रीसमागम ह्यांतच रममाण असतात; ह्यास्तव त्यांचें व ह्याचें ठीक जमतें. राजा, शूद्राचार करूं लागल्यावर मग त्यास मुळींच प्रतिबंध नाहींसा होतो; मनसोक्त वर्तन करण्याची संवय होऊन तो अगदींच बहकतो; व मैथुनादि विषयसुखांत इतका तल्लीन होतो कीं, आपण मरणाधीन आहों, ही गोष्ट त्याच्या स्मरणांतून पार निघून जाते. वानर जसे झाडांवर स्त्रीपुत्रादिकांत खेळत बागडत असतात, तसा हा जीव घरांत ऐहिक सुखोपभोगार्थ आपल्या स्त्रीपुत्रांमध्यें खेळत बागडत असतो. ह्याप्रमाणें ह्या संसारमार्गांत सुखदुःखांचा अनुभव घेणारा जीवसमुदाय, एखाद्या पर्वताच्या गुहेसारख्या भयंकर रोगादि संकटांमध्यें पडतो, व तेथें त्यास मृत्युरूप हत्ती मारण्यास उभा असतो. त्या विपन्न स्थितींत थंडी, वारा इत्यादि त्रिविध तापांपासून बचाव करण्याची शक्ति त्याच्या अंगीं मुळींच रहात नाहीं; व घोर चिंतेंत निमग्न होऊन तो सर्वस्वीं हताश होतो. एखादे वेळीं एकमेकांशीं व्यवहार करितांना दुसऱ्यापासून तो लबाडीनें पैसा काढितो; जवळचा पैसा संपला म्हणजे शय्या, आसन, भोजन इत्यादि उपभोग त्यास मिळत नाहींतसे होतात; पुढें तो दुसऱ्याकडे याचना करूं लागतो; पण याचना करून मनोरथ पूर्ण होत नाहीं; तेव्हां चोरी वगैरे गुन्हे करण्यास तो मागेंपुढें पहात नाहीं; व मग लोक त्याची निंदा, अपमान, मारझोड वगैरे करण्यास कमी करीत नाहींत. राजा, ह्याप्रमाणें लोकांशीं त्याचें वैर वाढत असतांही प्राक्तनानुसार तो विवाहादिक नवीन संबंध जोडतो, व ते दुःसह झाल्यास तोडूनही टाकतो! मिळून ह्या संसारमार्गामध्यें नानाविध दुःखांनीं व

उपसर्गांनीं जेर झालेला जीव अनेक संकटें भोगून मृत्यु पावतो; व त्याचा सोबती त्यास तेथेंच टाकून नवीन जन्मास आलेल्या पुत्रादिकांचा स्वीकार करून रडत, पडत, भीत, बडबडत, ओरडत, खिदळत, गात व मार खात पुढें जातो; ज्या परमात्मस्वरूपापासून भ्रष्ट झाल्यामुळें ह्या भवाटवींत हिंडावें लागलें, व ज्या परमात्म्याचें स्वरूप-ज्ञान म्हणजेच भवाटवीचा शेवट, अशा मूलस्थानाला तो अद्यापिही परत येत नाहीं. राजा, भगवद्भक्त मात्र ह्या गोष्टीला अपवाद होत. ते प्रारब्धकर्मामुळें ह्या संसारांत आले असल्यास, परमात्मस्वरूपाचा विचार करून प्रारब्धकर्म संपतांच फिरून पूर्वस्थळीं निवृत्त होतात. जीव ह्या संसारचक्रांत सांपडतो ह्याचें कारण, तो, भवाटवींतून पार पडणारा जो योगमार्ग, त्यास अनुसरून वागत नाहीं हें आहे. जे पुरुष प्राण्यांचा द्रोह करीत नाहींत, ज्यांचीं षाडिंद्रियें स्वाधीन व अंतर्मुख असतात, आणि जे योगशास्त्र जाणतात, ते ह्या संसारचक्रांत सांपडत नाहींत. राजा, दिग्गजांना जिंकून टाकणारे व यज्ञयागादिक अनुष्ठानें करणारे महान महान राजे सुद्धां, ' ही भूमि माझी आहे, तुझी नाहीं ' असा जोंपर्यंत अहंकार बाळगून परस्परांमध्यें वैर करीत आहेत, व योगमार्गाचें ज्ञान मिळून वासनारहित झाले नाहींत, तोंपर्यंत त्यांस युद्धांमध्यें अन्योन्यांकडून प्रहार होऊन मरण येईल, परंतु त्यांची वासना क्षीण न झाल्यामुळें त्यांस सायुज्य मिळणार नाहीं. सत्कर्माच्या आधारानें जीव कसा तरी नरकांतून सुटेल, पण फिरून संसारांत फिरत राहील; पुण्यसंचयानें तो स्वर्गांत जाईल व पुण्य संपल्यावर फिरून मृत्युलोकांत येईल. बाबारे, आजपर्यंत पुष्कळांची अशा प्रकारें वाट लागली आहे!

ह्याप्रमाणें भरतानें सांगितलेल्या भवाटवीचें सविस्तर निरूपण केल्यावर श्रीशुकाचार्य परीक्षितास म्हणाले:—राजा, ऋषभपुत्र भरत हा ज्या मार्गानें गेला, त्या मार्गाचें अवलंबन इतर राजांकडून होणें अशक्य आहे. पहा—मी गरुडाइतकी उंच उडेन असें माशी म्हणाली, तर शोभेल काय? भरताचें वैराग्य किती विलक्षण होतें ह्याचा विचार कर. पुण्यकीर्ति भगवंताविषयीं एकाग्र चित्त करून त्या महात्म्यानें तरुणपणांतच सुंदर स्त्रिया, सद्गुणी पुत्र, प्रेमळ मित्र व अखिल राज्य ह्यांचा विष्टेप्रमाणें त्याग केला; व ज्या गोष्टी करणें अगदीं अशक्य, त्या गोष्टी स्वतः करून दाखविल्या; तेव्हां त्याचें केव्हढें सामर्थ्य सांगावें! परीक्षित राजा, विचार केला असता ह्यांत कांहींएक आश्चर्य करण्यासारखें नाहीं; कारण भगवत्सेवेंत ज्यांचीं मनें आसक्त असतात, त्यांस प्रत्यक्ष मोक्षसुद्धां तुच्छ वाटतो; मग ऐहिक सुखसंपत्ति तुच्छ वाटली, तर त्यांत नवल कोणतें बरें? हे राजा, भरतानें हरिणदेहाचा त्याग करितांना जें परमात्मस्वरूप मनांत आणिलें, त्याचें मनन कर. मृगदेहावसान होतेवेळीं भरत महात्म्याचे तोंडून असे उद्गार बाहेर पडले:

" प्रभो, तूं यज्ञरूप आहेस; धर्माचें संरक्षण तूंच करितोस; कर्मविधींत खरा निष्णात तूंच. तूं म्हणजे केवळ मूर्तिमंत अष्टांगयोग; वेदांतशास्त्राचा प्रतिपाद्य विषयही तूंच; तुझ्यापासूनच मायेचा निरोध होतो; व सर्व जगाचें जन्म, स्थिति व लय हीं तरी तुझ्याच स्वाधीन; देवा, तुला मी नमस्कार करितों. "

हे भारता, भरत महात्म्याचे गुण भगवद्भक्त नित्य गात असतात. त्या राजर्षीच्या कल्याणकारक, आयुष्यवर्धक, कीर्तिपर, भाग्यदायक, स्वर्गमोक्षसंपादक अशा ह्या चरित्राचें जो अनुदिन श्रवण करितो, व्याख्यान करितो व गौरव करितो, त्याचे सर्व मनोरथ आपोआप सिद्धी जातात;—त्यास दुसऱ्यापासून कांहींएक मिळविण्याची इच्छा रहात नाहीं.

## अध्याय पंधरावा.

—:०:—

### भरताचा पुढील वंश.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा परीक्षिता, भरत राजाचा पुत्र सुमति नांवाचा होता. हा ऋषभदेवाच्या मार्गास अनुसरून त्याच्याप्रमाणें जीवन्मुक्त झाला. राजा, कलियुगामध्यें कित्येक नीच नास्तिक लोक पापबुद्धि धारण करून श्रुतीचा वगैरे आधार नसतांही केवळ कुतर्क करून ह्याला आपली इष्टदेवता मानतील. परीक्षिता, त्या सुमतीपासून वृद्धसेना नामक स्त्रीच्या ठिकाणीं देवताजित् नांवाचा, व आसुरी नामक स्त्रीच्या ठिकाणीं देवद्युम्न नांवाचा पुत्र जन्मास आला. ह्या देवद्युम्नाला धेनुमतीपासून परमेष्ठी नांवाचा पुत्र झाला. परमेष्ठीला सुवर्चलेच्या उदरीं प्रतीह पुत्र जन्मला. ह्या प्रतीहानें पुष्कळांस स्वतः आत्मविद्येचा उपदेश करून व शेवटीं आपण पवित्र होऊन परमात्मसुखाचा प्रत्यक्ष अनुभव मिळविला. प्रतीहाला सुवर्चलेच्या पोटीं प्रतिहर्ता, प्रस्तोता व उग्दाता असे तीन पुत्र झाले. हे तिघेही यज्ञादि कर्मांत निपुण होते. प्रतिहर्त्यापासून स्तुतीच्या ठिकाणीं अज आणि भूमा असे दोन पुत्र जन्मले. भूमाला ऋषिकुल्येपासून उद्गीथ, उद्गीथाला देवकुल्येपासून प्रस्ताव, व प्रस्तावापासून नियुत्सेच्या ठिकाणीं विभु नामक पुत्र झाला. विभूपासून रतीला पृथुषेण, पृथषेणाला आकूतीपासून नक्त, व नक्ताला द्रुतीपासून गय नांवाचा कीर्तिमान पुत्र झाला.

### गय राजाचें चरित्र.

राजा परीक्षिता, गय हा भगवान विष्णूचा अंश होता. हा फार सात्त्विक असून प्रजापालन करण्यांत फारच दक्ष असे. ह्याच्या ठायीं अध्यात्मज्ञान मूर्तिमंत वास करीत होतें, म्हणून ह्यास 'महापुरुष' अशी संज्ञा प्राप्त झाली होती. प्रजांचें पालनपोषण करणें, त्यांना संतुष्ट राखणें, व त्यांचें लालन करून त्यांस योग्य मार्गानें वर्तविणें हा राजाचा धर्म होय. गय ह्याप्रमाणें वागत असे. तो यज्ञयागादिक करून त्यांचें फल षड्गुणैश्वर्यसंपन्न महापुरुष परब्रह्माच्या ठिकाणीं सर्वात्मभावेंकरून अर्पण करीत असे. मोठमोठ्या ज्ञानी पुरुषांच्या सेवेनें भगवद्भक्तिभोग जोडून, गय राजानें आपली बुद्धि सुसंस्कृत व पवित्र केली होती. त्याचा देहादिकांवरील अहंभाव अगदीं सुटला होता, व त्यामुळें त्याच्या अंतर्यामीं ब्रह्मज्योति उत्तम प्रकारें प्रज्वलित झाली होती; आणि असें असूनही अभिमानरहित राहून तो पृथ्वीचें राज्य करीत होता. हे पांडवेया, पूर्वींचे थोर लोक त्याची कथा गात असत, ती तुला सांगतोंः—

### गय राजाचें वर्णन.

"गय राजा ज्याप्रमाणें यज्ञयागादिक कर्मे करीत असे, त्यानें जशी शुद्ध कीर्ति मिळविली होती, तो जसा ज्ञानसंपन्न होता, त्यानें जसें धर्माचें परिपालन केलें होतें, त्यानें जशी अतुल लक्ष्मी जोडली होती, तो जसा सज्जनांमध्यें अग्रणी होता, व तो जसा भगवद्भक्तांचा एकनिष्ठ दास होता, तसा ह्या भूतलावर दुसरा कोणीही पुरुष झाला नाहीं. गय राजा ईश्वराचाच अवतार होता, म्हणून त्यास सर्व गोष्टी संपादितां आल्या. गय राजाचें भाग्य केवढेंहो सांगावें! प्रत्यक्ष दक्षाच्या पतिव्रता कन्या श्रद्धा, मैत्री, दया इत्यादिकांनीं मोठ्या उल्हासानें गंगादि पुण्यतीर्थांच्या उदकांनीं त्यास अभिषेक करून आपले अमोघ आशीर्वाद दिले! गय राजाचा केवढा प्रताप बरें! कीं जो निरीच्छ असतांही त्याच्या गुणरूप वत्सामुळें गोरूप धरा इतकी पान्हवली कीं, प्रजाजनांचे सर्व मनोरथ तत्काल पूर्ण झाले! गय राजाला कोणत्याही उपभोगाची अपेक्षा नव्हती; तरी वेद व वैदिक कर्मे ह्यांपासून त्याला अनेक उपभोग प्राप्त होत; धर्मयुद्धांत जिंकलेले राजे

त्यास करभार आणून देत; व तो राजा ब्राह्मणांची जी संभावना करी, तिजबद्दल, परलोकीं प्राप्त होणाऱ्या धर्मफलांचा सहावा भाग ते ब्राह्मण त्यास अर्पण करीत. गयाच्या यज्ञामध्यें इंद्रास इतकें सोमपान करावयास सांपडे कीं, त्यामुळें इंद्र उन्मत्त होऊन जाई! गय राजा श्रद्धेनें आणि निर्मळ व अढळ अशा भक्तीनें यज्ञांचें फल परमेश्वराला अर्पण करी, व साक्षात् यज्ञमूर्ति परमात्मा आपलें स्वरूप प्रकट करून तें यज्ञफल ग्रहण करी! त्या भगवंताच्या संतोषानें ब्रह्मदेवादिक देव, पशुपक्षी इत्यादि तिर्यग्योनि, मनुष्य, वेली व तृण सुद्धां तृप्त होतें, तो जगाचा जीव भगवान यज्ञनारायण ज्याच्याकडील यज्ञांत तृप्त होऊन परम संतोष पावला, त्या गय राजाचें अनुकरण करण्यास कोणताही राजा समर्थ नाहीं."

परीक्षिता, पुढें गय राजाला गयंतीच्या ठिकाणीं चित्ररथ, सुगति व अवरोधन असे तीन पुत्र झाले. चित्ररथापासून ऊर्णेच्या उदरीं सम्राट् नामक पुत्र जन्मला. सम्राटाला उत्कलेपासून मरीचि झाला. मरीचीपासून बिंदुमतीच्या उदरीं बिंदुमान जन्मला. त्याच्यापासून सरवेला मधु नांवाचा पुत्र झाला. मधूपासून सुमनेच्या ठिकाणीं वीरव्रत जन्म पावला. त्यापासून भोजेच्या ठायीं मंथु आणि प्रमंथु असे पुत्र झाले. मंथूपासून सत्येच्या उदरीं भौवन पुत्र जन्मला. त्यापासून दूषणेला त्वष्टा झाला. त्वष्ट्यापासून विरोचनेच्या ठिकाणीं विरज नामक पुत्र जन्मास आला. विरजाला विषूचीच्या ठायीं शंभर पुत्र व एक कन्या झाली; ह्या पुत्रांमध्यें शतजित् नांवाचा पुत्र मुख्य होता. परीक्षिता, विरजाचें वर्णन अशा प्रकारें करितात: "श्रीमहाविष्णूपासून जशी सर्व देवांस शोभा येते, तशी विरजापासून सर्व प्रियव्रतवंशाला शोभा आली."



# अध्याय सोळावा.

—:०:—

## भुवनकोशाचें वर्णन.

परीक्षित राजा म्हणाला:—शुक मुने, जितक्या लांबपर्यंत सूर्याचे किरण पोहोंचतात व जेथवर नक्षत्रादिकांसह चंद्र दृग्गोचर होतो, तितका भूमंडलाचा विस्तार असें आपण सांगितलें; त्यामध्येंही प्रियव्रत राजाच्या रथाच्या चक्रांनीं सात खड्डे पडून सात समुद्र झाले, व सात विशिष्ट द्वीपांची रचना झाली, वगैरे गोष्टी आपण संक्षिप्तपणें निरूपण केल्या; भगवन्, आतां त्या सप्तद्वीपांची लांबी, रुंदी, स्वरूप, नांवें वगैरे सविस्तर माहिती कळावी, अशी माझी इच्छा आहे. महाराज, भगवंताच्या सगुण विराट्स्वरूपाच्या ठिकाणीं मन स्थिर केल्याशिवाय, निर्गुण, अति सूक्ष्म, स्वयंप्रकाश, परब्रह्मस्वरूप अशा वासुदेवाच्या ठिकाणीं तें स्थिर करितां यावयाचें नाहीं; तर आपण त्या ब्रह्मांडात्मक स्थूल विराट्स्वरूपाचें कृपा करून निरूपण करावें.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—राजश्रेष्ठा, सृष्टिरचना हा भगवन्मायेचा खेळ आहे. देवांचें आयुष्य प्राप्त झालें तरी भगवन्मायेच्या गुणविस्ताराची मर्यादा मनुष्यास सांगतां येणें अशक्य आहे. फार कशाला? त्या मर्यादेची कल्पना करणेंही मनुष्याच्या शक्तीच्या बाहेर आहे. ह्याकरितां, भूगोलाची लांबी, रुंदी, स्वरूप व नांवें ह्यांचें वर्णन ठोकळ रीतीनें सांगितल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ह्यास्तव, मी जें कांहीं आतां सामान्यत: सांगेन, तें तू सावधान चित्तानें ऐक.

### जंबुद्वीपवर्णन.

राजा, आपण ज्या द्वीपांत आहों, तें हें द्वीप भूमंडलरूप कमलाच्या सात कोशांच्या आंतील कोश होय. ह्याचा विस्तार एक लक्ष योजनें असून आकार कमलाच्या पत्राप्रमाणें समवर्तुल

आहे. ह्या द्वीपांत, नऊ नऊ हजार योजनें विस्तीर्ण अशीं नऊ वर्षें किंवा खंडें असून त्यांच्या सरहद्दींवर आठ पर्वत आहेत. ह्या नऊ वर्षांमध्यें इलावृत नांवाचें वर्ष सर्वांच्या मध्यभागीं असून त्याच्या नाभिस्थानीं, कुलपर्वतांमध्यें श्रेष्ठ जो मेरु पर्वत, तो आहे. तो मुळापासून शिखरापर्यंत सुवर्णमय असून भूमंडळरूप कमळाच्या अगदीं केंद्रस्थानीं आहे. मेरु पर्वताचा विस्तार जंबुद्वीपाइतका असून, तो मस्तकावर बत्तीस हजार योजनें व पायथ्याशीं सोळा हजार योजनें विस्तृत आहे, आणि सोळा हजार योजनें भूमींत गेलेला आहे. इळावृताच्या उत्तर बाजूला एका पलीकडे एक नील, श्वेत आणि शृंगवान् हे तीन पर्वत अनुक्रमें रम्यक, हिरण्मय आणि कुरु ह्या वर्षांच्या मर्यादांवर आहेत. ह्यांचा विस्तार पूर्वपश्चिम असून दोन्ही टोकें क्षारसमुद्रापर्यंत पोहोंचलेलीं आहेत. ह्या पर्वतांची रुंदी दोन दोन हजार योजनें असून, लांबी अनुक्रमें पहिल्याच्या दहाव्या हिश्शापेक्षां कांहीं अधिक इतकी दुसऱ्याची, व दुसऱ्याच्या दहाव्या हिश्शापेक्षां कांहीं अधिक इतकी तिसऱ्याची, अशी कमी कमी होत गेली आहे; म्हणजे नीलापेक्षां त्याच्या दहाव्या हिश्शाहून कांहीं अधिक इतका श्वेत, व श्वेतापेक्षां त्याच्या दहाव्या हिश्शाहून कांहीं अधिक इतका शृंगवान्, असें होत होत गेलें आहे. उंची व रुंदी मात्र सर्वांची सारखीच आहे. ज्याप्रमाणें इलावृताच्या उत्तरेकडे नीलादिक पर्वत आहेत, त्याचप्रमाणें दक्षिणेकडेही निषध, हेमकूट व हिमालय हे तीन पर्वत आहेत. त्यांची उंची दहा दहा हजार योजनें असून रुंदी दोन दोन हजार योजनें आहे. त्यांची लांबी किंवा विस्तार पूर्वपश्चिम असून, ते हरिवर्ष, किंपुरुष आणि भारत ह्या वर्षांच्या सरहद्दींवर आहेत. तसेंच इलावृताच्या पूर्वेकडे व पश्चिमेकडे अनुक्रमें माल्यवान् व गंधमादन हे दोन पर्वत दक्षिणोत्तर लांबवर गेले असून, नील व निषध ह्या पर्वतांपर्यंत पसरलेले आहेत. ह्यांचा विस्तार दोन दोन हजार योजनें असून हे केतुमाल व भद्राश्व ह्या वर्षांच्या मर्यादांवर आहेत. मंदर, मेरुमंदर, सुपार्श्व आणि कुमुद हे चार पर्वत, मेरूला आधार देण्यासाठीं चार दिशांकडे स्तंभांसारखे करून ठेवले आहेत. ह्यांतील प्रत्येकाचा विस्तार व उंची दहा सहस्र योजनें आहे. ह्या चार पर्वतांवर अनुक्रमें आंबा, जांभूळ, कदंब आणि वड हे चार प्रचंड वृक्ष आहेत. जणूं काय हे वृक्ष त्या पर्वतांवरील ध्वजच होत! त्यांची उंची अकराशें योजनें, शाखांचा विस्तारही अकराशें योजनें व खोडांचे घेरही शंभर योजनेंच आहेत. हे भरतकुलश्रेष्ठा, ह्या चार पर्वतांवर अनुक्रमें दूध, मध, उसाचा रस व स्वच्छ उदक ह्यांनीं भरलेले चार डोह असून, त्यांतील दुग्धादिकांचें सेवन करणाऱ्या सिद्धकिन्नरप्रभृति उपदेवांच्या समुदायांस अणिमा, लघिमा इत्यादिक शक्ति योगसाधन केल्यावांचून आपोआप प्राप्त होतात. राजा, त्या चार पर्वतांवर अनुक्रमें नंदन, चैत्ररथ, वैभ्राजक आणि सर्वतोभद्र ह्या नांवांचीं चार उपवनें आहेत. ह्या उपवनांत मोठमोठे देव—बरोबर अप्सरा व सिद्धचारण ह्यांस घेऊन येतात, व सिद्धादिक स्तुतिपाठ करीत असतां ते देव अप्सरांसमवेत तेथें विहार करितात. मंदर पर्वतावर अकराशें योजनें उंचीचा एक आम्रवृक्ष आहे. त्याच्या मस्तकावरून पर्वताच्या शिखरांसारखे मोठे व अमृतासारखे मधुर असे आंबे खालीं त्या पर्वताच्या उतरणीवर पडतात. ती फळें फुटतात व आंतून अतिशय गोड, सुवासयुक्त व फार आरक्त अशा रसाचा प्रवाह चालत असतो. अरुणोदा नांवाची नदी हीच होय. ही मंदर पर्वतावरून खालीं येऊन इळावृत वर्षाच्या पूर्वभागाला भिजवून टाकते. भवानीची सेवा करणाऱ्या यक्षस्त्रिया ह्या नदीचें उदक सेवन करितात, व त्यामुळें त्यांचीं शरीरें सुगंधित होऊन त्या

यक्षिणींच्या अवयवांचा स्पर्श पडला कीं वायूमध्यें तो सुगंध शिरतो, व तो वायु जिकडे तिकडे पसरून आसपासच्या दहा योजनें प्रदेशाला सुगंधानें भरून टाकितो ! त्याप्रमाणेंच, हत्तीच्या अंगाएवढाल्या व अतिसूक्ष्म बियांनीं युक्त अशा, आणि फार उंचावरून पडल्यामुळें फुटलेल्या जंबूफलांच्या रसानें उत्पन्न झालेली जंबू नांवाची नदी, दहा हजार योजनें उंचीच्या मेरुमंदर नामक पर्वताच्या शिखरावरून भूतलावर पडते, व दक्षिणेकडील सर्व इलावृत वर्षांतून वाहते. त्या नदीच्या दोन्ही तीरांच्या ठिकाणीं असलेली माती त्या नदीच्या उदकानें भिजते; आणि ती सूर्यकिरण व वायु ह्यांच्या संयोगानें वाळल्यावर तिजपासून जांबूनद नांवाचें सोनें तयार होतें. देवलोकांत ह्या जांबूनद नामक उत्तम सोन्याचेच नित्य अलंकार करितात. देवांचे गंधर्वादिक गण व त्यांच्या स्त्रिया ह्यांचीं मुकुट, कडीं, कटिसूत्रें इत्यादि भूषणें ह्याच सोन्याचीं असतात. सुपार्श्व पर्वतावर वाढलेला जो मोठा कदंबवृक्ष आहे, त्याच्या ढोलीतून पांच वांवांएवढाल्या मोठया पांच मधाच्या धारा बाहेर निघतात. त्या सुपार्श्व पर्वताच्या शिखरावरून खालीं पडतात; व आपल्या पश्चिमेकडील सर्व इलावृत वर्षाला शोभा आणितात. ह्या नद्यांचें उदक प्राशन करणाऱ्यांच्या मुखांतून निघालेला वायु इतका सुवासिक असतो कीं, तो भोंवतालच्या शंभर योजनें प्रदेशाला सुगंधित करितो. कुमुद पर्वतावर वाढलेला जो शतवल्श नांवाचा वटवृक्ष, तोही असाच आहे. त्याच्या शाखांपासून दूध, दहीं, मध, घृत, गूळ, अन्न, वस्त्र, शय्या, आसनें, अलंकार इत्यादिकांचे प्रवाहरूप पुष्कळ नद निघतात; व ते सर्व इच्छित कामना पूर्ण करणारे असून उत्तरेकडील इलावृत वर्षांत वाहात जातात. ह्या नदांतील वस्तूंचा उपभोग घेणारांना, अंगावर सुरकुत्या पडणें, पांडुरता, ग्लानि, घाम, दुर्गंधि, जरा, रोग, मृत्यु, शैत्य, उष्णता, फिकटपणा वगैरे दुःखकारक गोष्टी कधीं घडत नाहींत; त्यांस यावज्जीव अतिशय सुख प्राप्त होतें. मेरूच्या पायथ्याजळ आसमंतात् कुरंग, कुरर, कुसुंभ, वैंकक, त्रिकूट, शिशिर, पतंग, रुचक, निषध, शिनीवास, कपिल, शंख, वैदूर्य, जारुधि, हंस, ऋषभ, नाग, कालंजर, नारद आणि आदि हे वीस पर्वत आहेत. मेरु हा पृथ्वीरूप कमलाचा गाभा असून, हे पर्वत त्या गाभ्याच्या भोंवतालचे केसर असावे असा भास होतो. मेरु पर्वताच्या पूर्वेकडे दक्षिणोत्तर अठरा हजार योजनें लांब व दोन दोन हजार योजनें रुंद व तितकेच उंच असे जठर व देवकूट ह्या नांवांचे दोन पर्वत आहेत. तसेंच, मेरूच्या पश्चिमेकडे दक्षिणोत्तर लांबीचे पवन आणि पारियात्र ह्या नांवांचे दोन पर्वत आहेत. शिवाय, दक्षिणेकडे पूर्वपश्चिम लांबीचे कैलास व करवीर, आणि उत्तरेकडे तसेच त्रिशृंग व मकर हे दोन दोन पर्वत आहेत. ह्या आठ पर्वतांच्या योगानें सभोंवतीं परिस्तरणें घातलेल्या अग्नीप्रमाणें मेरु पर्वत शोभतो ! मेरु पर्वताच्या मस्तकावर मध्यभागीं चतुष्कोण आकाराची भगवान ब्रह्मदेवाची नगरी वसली आहे; हिचें क्षेत्रफळ दहा सहस्र चौरस योजनें असून ही सोन्याची आहे असें म्हणतात. त्या ब्रह्मपुरीच्या भोंवतालीं पूर्वादिक दिशांस इंद्रादिक आठ लोकपालांच्या आठ नगऱ्या, त्या त्या लोकपालांच्या वर्णाप्रमाणें असून, त्या, ब्रह्मदेवाच्या नगरीच्या चतुर्थांश मानानें म्हणजे अडीच हजार चौरस योजनें आहेत. ब्रह्मदेव, इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, सोम व ईशान ह्या नऊ दिक्पालांच्या पुरींचीं नांवें अनुक्रमें मनोवती, अमरावती, तेजोवती, संयमिनी, कृष्णांगना, श्रद्धावती, गंधवती, महोदया व यशोवती अशीं पुराणांतरीं आहेत.

## अध्याय सतरावा.

—:०:—

### गंगेची उत्पत्ति, महती व ओघ.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, बलीच्या यज्ञांत. साक्षात् भगवान महाविष्णूनें उजव्या पायानें सर्व भूमंडळाचें आक्रमण करून डाव्या पायानें वरचे स्वर्गादिक सर्व लोक व्यापून टाकले; तेव्हां त्या वामपादाच्या नखांनीं ब्रह्मांड-कटाहाची वरची कवची फुटली, व ब्रह्मांडाच्या बाहेर असणारी जलधारा त्या विवरांतून आंत आली. त्या धारेनें ईश्वराचीं चरणकमळें धुतल्यामुळें त्याचें तांबूस केशर लागून त्या धारेस रक्तिमा प्राप्त झाली. राजा परीक्षिता, त्या जलधारेचें सामर्थ्य किती विलक्षण म्हणून सांगूं ! तिचें स्नान किंवा आचमन केलें असतां ती सर्व जगाचा पापमळ नाहींसा करते, परंतु स्वतः त्या मळापासून दूर राहते ! ह्या जलधारेस ब्रह्मांडांत प्रवेश करितेवेळीं प्रत्यक्ष भगवत्पदी हेंच नांव मिळालें. तेव्हां तिला भागीरथी, जान्हवी इत्यादि नांवें नव्हतीं. हे कुरुकुलभूषणा, ती जलधारा ब्रह्मांडांत आल्यानंतर सहस्रावधि युगांनीं स्वर्गलोकाच्या मस्तकावर उतरली. स्वर्गाचें मस्तक म्हणजे ज्यास विष्णुपद असें नांव आहे, तेंच. ह्या ठिकाणीं महान भगवद्भक्त व दृढनिश्चयी उत्तानपादपुत्र ध्रुव हा राहतो. त्या विष्णुपदीला पाहून 'ही भगवद्भक्तांच्या कुळदेवतेचें चरणारविंदोदक आहे' या विचारानें त्याच्या अंतर्यामीं भक्तीच्या लहरीच्या लहरी उसळतात, व अंतःकरणास विलक्षण पाझर फुटून तो त्या भगवत्पदीच्या स्पर्शासाठीं इतका उतावळा होतो कीं, त्याचें देहभान नाहींसें होऊन त्याचे नेत्र किंचित् मिटतात व त्यांतून निर्मल अश्रुधारा चालूं लागून सर्व शरिरावर दाट रोमांच उभे राहतात; व अशा प्रकारें सद्गदित होऊन तो त्या परमपावन जलधारेला अत्यंत आदरपूर्वक मस्तकीं धारण करितो. त्या ध्रुवपदाच्या खालीं सप्तर्षि राहतात. त्यांस गंगेचा प्रभाव माहीत आहे. त्यांस आपल्या तपश्चर्येची सर्वोत्कृष्ट सिद्धि काय ती हीच असें वाटतें. षड्गुणैश्वर्यसंपन्न सर्वांतरयामी वासुदेवावर एकसारखी दृढ भक्ति ठेवणें हाच त्यांस परमपुरुषार्थ वाटत असल्यामुळें, धर्मादिक अन्य पुरुषार्थ व प्रत्यक्ष आत्मज्ञान ह्यांचीही परवा न करितां, मुमुक्षु जसे मोक्षाला, तसे ते गंगेला आपल्या जटाभारांच्या ठिकाणीं बहुमानपुरःसर धारण करितात. पुढें त्या सप्तर्षींच्या स्थानापासून निघाल्यावर, देवांचीं सहस्रावधि विमानें ज्या मार्गानें संचार करीत असतात, त्या मार्गानें खालीं उतरून चंद्रमंडळाला भिजवून मेरु पर्वताच्या मस्तकावर ब्रह्मपुरींत ती गंगा अवतीर्ण होते. ब्रह्मपुरींत ह्या प्रवाहाचे चार भाग होतात, व ते चार दिशांकडून वाहत जाऊन समुद्राला मिळतात. ह्या चार प्रवाहांना सीता, अलकनंदा, चक्षु आणि भद्रा अशीं चार नांवें आहेत. सीता ब्रह्मपुरींतून निघाल्यावर केसर पर्वतांच्या उंच शिखरांवर पडून तेथून खालीं उतरत उतरत गंधमादन पर्वताच्या मस्तकावर पडते; व भद्राश्व वर्षांतून वहात जाऊन पूर्वदिशेकडे क्षारसमुद्राला मिळते. अशाच रीतीनें चक्षु नदी माल्यवान् पर्वताच्या शिखरावरून केतुमाल वर्षाच्या बाजूला उडी टाकून आपला वेग कमी न होऊं देतां पुढें जाऊन पश्चिमेकडे समुद्राला मिळते. तशीच मेरु पर्वताच्या शिखरावरून भद्रा नदी उत्तर दिशेला जाते, व एका पर्वताच्या शिखरावरून दुसऱ्या पर्वताच्या शिखरावर, अशा प्रकारें त्यांचें उल्लंघन करून खालीं उडी टाकते, व उत्तरकुरुवर्षांतून उत्तर दिशेकडे समुद्रांत प्रवेश करिते. ह्याप्रमाणेंच अलकनंदा ब्रह्मपुरीच्या दक्षिणेकडून निघून अनेक गिरिशि-

खरें ओलांडून हेमकूट पर्वतावर उतरते व तेथून सुवर्णशृंगावरून खालीं उडी टाकून आपल्या अति तीव्र वेगानें भरतवर्षांत जाऊन दक्षिणेकडे समुद्रांत प्रवेश करिते. राजा, तिच्यामध्यें स्नान करण्याकरितां जाणाऱ्या पुरुषाला पदोपदीं अश्वमेध, राजसूय इत्यादि यज्ञांचें फल अनायासें प्राप्त होतें. असो. ह्याशिवाय प्रत्येक वर्षामध्यें मेरु पर्वतापासून व इतर पर्वतांपासून उगम पावून वाहणाऱ्या दुसऱ्या नद्या व नद पुष्कळ आहेत. हे परीक्षित राजा, सगळ्या वर्षांत भारतवर्ष हेंच कर्मक्षेत्र होय. इतर आठ वर्षें हीं स्वर्गवासी लोकांच्या अवशिष्ट पुण्यफलाचा उपभोग घेण्याचीं स्थानें आहेत, म्हणून त्यांना

भूमीवरील स्वर्गस्थलें

असें म्हणतात. ह्या वर्षांतील लोक देवांप्रमाणें निरोगी व तेजस्वी असतात. त्यांस मनुष्यमानानें दहा सहस्र वर्षें आयुष्य असून बळही दहा सहस्र हत्तींचें असतें. त्यांचीं शरिरें वज्रासारखीं बळकट असून त्यांच्या ठिकाणीं शक्ति, तारुण्य व आवेश ह्या गुणांचें इतकें एकीकरण झालेलें असतें कीं, तेथील दंपत्यांच्या सुरतक्रीडा पुष्कळ काळपर्यंत चालून त्यांच्या आयुष्याचें एक वर्ष शिल्लक राहिलें म्हणजे स्त्रियांना एक वेळ गर्भसंभव होतो. तात्पर्य, त्या वर्षांतील काळ हा त्रेतायुगांतील काळाप्रमाणें केवळ सुखोत्पत्तिकारकच असतो. राजा, कृतयुगांत ध्याननिष्ठ असणें, त्रेतायुगांत विषयसुखाची परमावधि होणें, व द्वापर आणि कलि ह्यांत उत्तरोत्तर दुःखातिशय प्राप्त होणें, अशी काळाची स्थिति असते. त्या आठही वर्षांमधून अनेक गुहांमध्यें जागोजाग मोठमोठे आश्रम आहेत. त्या आश्रमांच्या भोंवतालीं सर्व ऋतूंमध्यें असणारीं पुष्पें, फळें, पल्लव इत्यादिकांनीं लवलेल्या वेली, व वृक्ष वगैरे दाट लागून गेल्यामुळें, त्या आश्रमांच्या आसमंतात् वनश्री फारच हृदयंगम आहे. तशींच तेथें निर्मल उदकानें भरलेलीं अनेक सरोवरें असून त्यांमध्यें प्रत्यहीं नानाविध कमळें फुलतात व त्यांच्या सुवासानें आनंदित झालेले राजहंस, जलकुक्कुट, कारंडव, सारस, चक्रवाक् इत्यादि पक्षी व अनेक जातींचे भ्रमरसमुदाय आपआपले मधुर शब्द करितात. त्या स्थलीं देवांचे समुदाय आपल्या सेवकांसहवर्तमान जलक्रीडादि विचित्र विनोद करण्याकरितां येतात. तेथें प्राप्त झाल्यावर, अति सुंदर देवांगना, अंतरीं कामवासना जागृत झाल्यामुळें विलास, हास्य, लीलाकटाक्ष इत्यादि भाव करूं लागतात, व ते दृग्गोचर होतांच देवांचीं मनें व नेत्र हीं तिकडे ओढलीं जाऊन ते रतिसुखांत यथेच्छ रममाण होतात. राजा, ह्या नऊही वर्षांमध्यें षड्गुणैश्वर्यसंपन्न महापुरुष नारायण, तेथील लोकांवर अनुग्रह करण्याकरितां वासुदेव, प्रद्युम्न, अनिरुद्ध व संकर्पण ह्या मूर्तींच्या समूहानें स्वतांचें रूप अद्याप प्रकट करीत असतो.

## इलावृत वर्षाचें वर्णन.

इलावृत वर्षामध्यें भगवान शंकर हा एकटाच पुरुष राहतो. कारण, तेथें जो कोणी इतर पुरुष प्रवेश करील, त्यास स्त्रीरूप प्राप्त होईल असा पार्वतीचा शाप आहे. राजा, हा असा शाप पार्वतीनें कां दिला हें पुढें सांगेन. ज्या पुरुषाला ह्या शापाची माहिती आहे, तो कधींही एथें पाऊल ठेवीत नाहीं. इलावृत वर्षांत पार्वतीच्या कोट्यवधि दासी शंकराच्या सेवेसाठीं भोंवतालीं उभ्या असतात. भगवान शंकर, महापुरुष परमात्म्याच्या चतुर्मूर्तींत चौथी तमोगुणी जी संकर्षणमूर्ति तिचें समाधियोगानें मनांत चिंतन करून परमेश्वराची स्तुति करितो. राजा, ती स्तुति अशी असते:—

## श्रीशंकर संकर्षणाची स्तुति करतात ती.

श्रीशंकर म्हणतात:—

ॐ नमो भगवते महापुरुषाय सर्व गुणसंख्यानायानंतायाव्यक्ताय नम इति ॥
भजे भजन्यारणपादपंकजम् । भगस्य कृत्स्नस्य परं परायणम् ॥
भक्तेष्वलंभावितभूतभावनम् । भवापहं त्वा भवभावमीश्वरम् ॥
न यस्य मायागुणचित्तवृत्तिभि । र्निरीक्षतो ह्यण्वपि दृष्टि रज्यते ॥
ईशे यथा नोऽजितमन्युरंहसां । कस्तं न मन्येत जिगीषुरात्मनः ॥
असद्दृशो यः प्रतिभाति मायया । क्षीबेव मध्वासवताम्रलोचनः ॥
न नागवध्वोऽर्हण ईशिरे ह्रिया । यत्पादयोः स्पर्शनधर्षितेंद्रियाः ॥
यमाहुरस्य स्थितिजन्मसंयमं । त्रिभिर्विहीनं यमनंतमृषयः ॥
न वेद सिद्धार्थमिव क्वचित्स्थितम् । भूमंडलं मूर्धसहस्रधामसु ॥
यस्याद्य आसीद्गुणविग्रहो महान् । विज्ञानधिष्ण्यो भगवानजः किल ॥
यत्संभवोऽहं त्रिवृता स्वतेजसा । वैकारिकं तामसमैंद्रियं सृजे ॥
एते वयं यस्य वशे महात्मनः । स्थिताः शकुंता इव सूत्रयंत्रिताः ॥
महानहंवैकृततामसेंद्रियाः । सृजाम सर्वे यदनुग्रहादिदम् ॥
यन्निर्मितां कर्ह्यपि कर्मपर्वणीम् । मायां जनोऽयं गुणसर्गमोहितः ॥
न वेद निस्तारणयोगमंजसा । तस्मै नमस्ते विलयोदयात्मने ॥

'हे महापुरुषा भगवंता, तुला मी वारंवार नमस्कार करितों. देवा, तुझें स्वरूप कळण्यास मोठें अवघड आहे, तुझा अंत लागत नाहीं, व तुझ्यापासूनच सर्व गुण प्रकाशमान होतात. देवा, भक्तीचा खरा खरा विषय तूंच होस. तुझें चरणकमल सर्वांचा आधार असून, जगतांतील अखिल वैभवें तुझ्यापासूनच उत्पन्न होतात. देवा, भक्तांच्या ठिकाणीं अद्वैतरूप सिद्धभाव, व अभक्तांच्या ठिकाणीं द्वैतरूप भवबंध तूंच उत्पन्न करितोस. देवा, भक्तांना भवपाशांतून सोडविणारा व अभक्तांना त्या पाशांत टाकणारा तरी तूंच आहेस. भगवन्, आम्हांला आमचे मनोविकार प्रबळ झाल्यावर ते आवरतां येत नाहींत, ह्यामुळें आमची दृष्टि ऐहिक विषयादिकांवर जातांच ती तत्काल तेथें लिप्त होते; परंतु तुझें सामर्थ्य असें लोकोत्तर आहे कीं, तूं जगाचें नियमन करण्याकरितां त्यांतील प्रत्येक विषयाकडे, गुणाकडे व विकाराकडे नित्य अवलोकन करीत असूनही, अपूर्व इंद्रियशक्तीमुळें तुझी दृष्टि त्यांत अणुमात्र देखील लिप्त होत नाहीं; तेव्हां तुझ्याविषयीं प्रत्येक मुमुक्षूच्या ठिकाणीं आदर उत्पन्न झाल्याशिवाय कसा राहील बरें? देवा, लोक अज्ञानामुळें तुझें वास्तव स्वरूप ओळखीत नाहींत ह्यामुळें ते तुझ्याविषयीं विपरीत भावना करितात. विषयासक्त लोकांस तुझें निर्विकार चित्स्वरूप न समजतां, त्यांस मायेच्या योगानें मत्त झाल्यासारखा आणि मद्य, आसव इत्यादिकांनीं धुंद झाल्यासारखा तूं भासतोस. देवा, नागस्त्रिया जेव्हां तुझी पूजा

करण्यास प्राप्त झाल्या, तेव्हां तुझ्या चरणांचा स्पर्श होतांच त्यांचीं मनें काममोहित होऊन लज्जेनें त्यांच्या हातून तुझी पूजा शेवटास गेली नाहीं; तेव्हां तुझ्या मायेचा केवढा प्रभाव बरें! ईश्वरा, जगाची उत्पत्ति, पालन व नाश ह्यांस कारण तूंच असून, स्वतः तूं ह्या तिन्ही गुणांपासून दूर असल्यामुळें तुला अनंत असें श्रुतींत म्हटलें आहे. देवा, सहस्रमस्तकरूपी आधारावर हें प्रचंड भूमंडल मोहरीसारखें कोणत्या स्थलीं चिकटून राहिलें आहे ह्याची तुला दादही नाहीं! भगवन्, तुझा पहिला गुणयुक्त मोठा अवतार म्हटला तर महत्तत्त्व हा होय. त्याला आश्रय सत्त्वगुणाचा. भगवन्, स्वयंभू ब्रह्मा तो हाच. मी रुद्र त्या ब्रह्मयापासून उत्पन्न झालों; व आपल्या त्रिगुणात्मक तेजानें सात्विक देवतासमूह, तामस भूतवर्ग व राजस इंद्रियसमुदाय उत्पन्न करितों. देवाधिदेवा, तुझें सामर्थ्य अगाध आहे. पक्ष्यांना दोरीनें बांधून जसें आपल्या स्वाधीन ठेवावें, तसें तूं महत्तत्त्व, अहंकार, देवता, भूतें व इंद्रियें ह्या सर्वांना आपल्या क्रियाशक्तीच्या योगानें बांधून स्वाधीन ठेविलें आहेस. ह्यास्तव, देवा, आम्ही तुझ्या अधीन असून तुझ्या कृपेनें सृष्टि चालवितों. सत्त्वादिक गुणांच्या उत्पत्तीच्या योगानें मोहित झालेले जन तूं उत्पन्न केलेल्या कर्मग्रंथिरूप मायेला मात्र अनायासानें जाणतात; परंतु त्या मायेंतून तरून जाण्याचा मार्ग जाणत नाहींत. देवा, तो कर्मग्रंथि उत्पन्न करणें व त्याचा नाश करणें हें सर्वस्वी तुझ्याच स्वाधीन आहे. प्रभो, तुला नमस्कार असो!'

# अध्याय अठरावा.

—:०:—

## खंडांचें व तदंतर्गत उपास्यादिकांचें वर्णन.

### भद्राश्व.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा परीक्षिता, भद्राश्व वर्षामध्यें धर्मपुत्र भद्रश्रवा नामक राजा व त्याचे मुख्य मुख्य सेवक राहतात. भगवान वासुदेवानें पूर्वी हयग्रीव नांवाचा अवतार घेतला होता, ती हयग्रीवमूर्ति धर्ममय असल्यामुळें भगवंतास फारच प्रिय होती. भद्रश्रवा व त्याचे सेवक उत्तम प्रकारें समाधि लावून त्या मूर्तीचें चिंतन करून तिची स्तुति करितात.

### भद्राश्व वर्षांतील उपास्याची स्तुति.

"देवा, तूं मूर्तिमंत धर्म आहेस. जे कोणी तुझ्या स्वरूपाचा विचार करूं लागतात, त्यांच्या अंतःकरणाची शुद्धि होते. देवा, आमचा नमस्कार ग्रहण कर. अहो, भगवन्मायेचा खेळ किती विचित्र सांगावा! मनुष्य आपला पुत्र, पिता वगैरे मरण पावतात हें पाहूनही उमजत नाहीं, तेव्हां काय म्हणावें? अरेरे! आपल्या पितापुत्रांस जाळून टाकून त्यांचें धनादिक जें कांहीं असेल त्याचा स्वीकार करावा, व आपण ऐहिक विषयांचा उपभोग घ्यावा, असली तुच्छ वासना मनुष्याला व्हावी हें आश्चर्य नव्हे काय? देवा, हें विश्व नश्वर आहे असें विद्वान लोक शास्त्राधार दाखवून प्रतिपादन करितात; व आत्मज्ञानी लोकांस त्या गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव येतो; तथापि तुझ्या मायेनें सर्वांना मोह उत्पन्न होतो; तेव्हां तुझी लीला किती विलक्षण आहे बरें! देवा, तुझ्या स्वरूपाला वास्तविकपणें कोणतेंही आवरण नाहीं; तूं कांहींएक कार्य करीत नाहींस; तथापि विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं कार्यें तुझ्यापासूनच होतात' असें वेद सांगतात; तेव्हां हा विरोध कसा दूर करावा? भगवन्, हा विरोध तुझ्या मायेचें ज्ञान होतांच आपोआप दूर होतो. मायेच्या द्वारें तूं सर्वांचा आत्मा आहेस व वस्तुतः सर्वांपासून तूं पाहतां व्यतिरिक्त आहेस. प्रलयकालीं जिकडे तिकडे अंधकार झाला असतां दैत्यांनीं वेद चोरून नेले; त्या कालीं मुख अश्वासारखें, व शरीर मनुष्यासारखें, असा एक अवतार घेऊन त्वां ते रसातलांतून

परत आणिले व ते ब्रह्मदेवास समर्पण करून त्याची मनीषा पूर्ण केली हें तुझें सामर्थ्य किती अपूर्व आहे बरें? देवा, तुला आमचा नमस्कार असो.''

हरिवर्ष.

परीक्षित राजा, हरिवर्षामध्यें भगवान परमात्मा नृसिंहरूपानें राहतो. हा अवतार भगवंतानें कां घेतला, हें मी तुला पुढें सांगेन. ह्या वर्षांत महाभगवद्भक्त प्रऱ्हाद आहे. त्याच्या ठिकाणीं महापुरुषाचे सर्व गुण वास्तव्य करितात. प्रऱ्हादाच्या स्वभावानें व आचरणानें दैत्यांच्या व दानवांच्या अपवित्र कुलासही पवित्रता प्राप्त झाली. तो दैत्यश्रेष्ठ प्रऱ्हाद त्या वर्षांतील इतर लोकांसह नेहमीं भगवद्भक्तीमध्यें निमग्न असून नरहरीची अशी स्तुति करीत असतो.

हरिवर्षांतील उपास्याची स्तुति.

"हे भगवंता नरसिंहा, अंधकाराचा नाश करणाऱ्या अग्नि वगैरे तेजांचा उत्पादक तूंच आहेस. देवा, तूं प्रकट हो. हे वज्रनखा, हे वज्रदंष्ट्रा, तूं आमच्या वासना जाळून टाक; आमचें अज्ञान (माया) नष्ट कर; भगवन्, आमच्या आत्म्याला अभय दे; हे प्रभो, सर्व जगाचें कल्याण कर; दुष्ट लोक आपला दुष्टपणा सोडून देतील अशी व्यवस्था लाव; प्राणिमात्राच्या ठिकाणीं परस्परांविषयीं दया उत्पन्न कर; त्यांचें मन शांत होऊन त्यांच्या ठिकाणीं निष्काम कर्में करण्याची वासना उत्पन्न होऊं दे; गृह, स्त्रिया, पुत्र, द्रव्य, बंधु ह्यांविषयीं आम्ही आसक्त होणार नाहीं असें कर; आम्हांला जर आसक्ति उत्पन्न झाली, तर ती भगवद्भक्तांच्या ठिकाणीं मात्र व्हावी. कारण, जो पुरुष भगवद्भक्तांच्या संगतीनें विषयांत निमग्न न होतां प्राण वांचविण्यास आवश्यक तितक्याच आहारादिकांनीं संतुष्ट असतो, तो, इंद्रियांच्या बाह्य प्रवृत्तींचें आकलन करून जसा तत्काल मुक्त होतो, तसा गृहादिकांच्या ठिकाणीं रममाण होणारा पुरुष होत नाहीं. प्रभो, भगवद्भक्तांचा प्रभाव अनुपम आहे! त्यांच्या सहवासानें परमेश्वराच्या अद्भुत कथा श्रवण करावयास सांपडल्यामुळें परमेश्वर कर्णरंध्रांतून अंतर्यामीं प्रवेश करून मनाचा मळ दूर करितो, व मन निर्मळ होतांच प्राणी वासनारहित होऊन ह्या संसारांतून उत्तीर्ण होतो. गंगादिक तीर्थें मळ दूर करणारीं आहेत खरीं; पण तीं बाह्य मळ मात्र नष्ट करितात. ज्या पुरुषाची ईश्वरावर निष्कामभक्ति असते, त्याला ईश्वर प्रसन्न होतो. ईश्वराचा प्रसाद झाला असतां धर्मज्ञानादि सर्व गुणांसहवर्तमान देव त्याच्याजवळ नित्य राहतात. जो ईश्वराची भक्ति करीत नाहीं व केवळ सकृद्दर्शनीं रम्य भासणाऱ्या विषयसुखाकडे धाव घेतो, त्याला ज्ञानवैराग्यादि सद्गुण कोठून प्राप्त होतील बरें! ज्याप्रमाणें मत्स्यांचें जीवन उदकावर अवलंबून असल्यामुळें उदक हें मत्स्यांचा आत्मा होय, त्याप्रमाणें शरीर धारण करणाऱ्या प्राण्यांचें जीवन प्रत्यक्ष भगवंतावर अवलंबून असल्यामुळें षड्गुणैश्वर्यसंपन्न परमात्मा हा प्राण्यांचा आत्माच होय. प्राण्यास मोठेपणा जो प्राप्त होतो, तो अचिंत्य प्रभूच्या कृपेमुळेंच; ह्याकरितां, जर कोणी पुरुष ह्या महत्त्वदायक खऱ्या कारणाकडे दुर्लक्ष करून संसारांत आसक्त होईल, तर ज्ञानकला ही मोठेपणाचें खरें अधिष्ठान, ही भावना नाहींशी होऊन केवळ स्त्रीपुरुषांच्या वयावरून व शक्तीवरून अमुक मोठे व अमुक लहान असें होईल!"

प्रऱ्हाद पुढें म्हणतोः—अहो दैत्यबंधूंनो, हा संसार म्हणजे जन्ममरणात्मक चक्र आहे हें लक्षांत आणा. तृष्णा, प्रीति, खेद, क्रोध, अहंपणा, काम, दीनता, चिंता इत्यादि सगळ्या विकारांचें मुख्य कारण हें संसारबंधनच आहे. ह्यास्तव ह्या संसाराचा लोभ सोडून तुम्ही भगवान नरहरीचे पायांचा आश्रय करा, म्हणजे तुम्हांस कसलीही विवंचना राहणार नाहीं.

### केतुमाल वर्ष.

परीक्षित राजा, केतुमाल वर्षामध्यें लक्ष्मीचें आणि संवत्सर नामक प्रजापतीच्या कन्यांचें व पुत्रांचें प्रिय करण्याच्या इच्छेनें भगवान कामदेवाच्या रूपानें राहतो. त्या कन्या व ते पुत्र ह्यांजकडे त्या वर्षाचें आधिपत्य असून त्यांची संख्या मनुष्याच्या शंभर वर्षांच्या अहोरात्रांइतकी आहे. त्या कन्या म्हणजे रात्रीच्या अभिमानी देवता छत्तीस हजार व ते पुत्र म्हणजे दिवसाच्या अभिमानी देवता छत्तीस हजार ह्या होत. प्रत्येक वर्षाच्या अखेरीस विष्णुचक्राच्या तेजानें त्या कन्यांच्या मनांत भीति उत्पन्न होऊन, त्यांचे गर्भ गर्भाशयांतून गळून पडतात. तेथें राहणाऱ्या कामदेवाचें चरित्र फारच विस्मयावह आहे. कामदेवाची मुखश्री आधींच मोठी सुंदर, व त्यांत जेव्हां त्याच्या विलक्षण गतीची भर पडते, तेव्हां त्याच्या मुखावरील मंदस्मित अधिकच खुलूं लागतें. तशा स्थितींत तो जेव्हां आपले नेत्रकटाक्ष इतस्ततः फेकूं लागतो, तेव्हां त्याच्या सुंदर भ्रुकुटी किंचित् वर उचलल्या जाऊन त्याच्या मुखकमलाला अद्वितीय शोभा प्राप्त होते. अशा प्रकारें भगवान कामदेव लक्ष्मीला रमवून आपल्या इंद्रियांनाही संतुष्ट करितो. लक्ष्मी देवी रात्रीस संवत्सराच्या कन्यांना बरोबर घेऊन, व दिवसास त्या कन्यांच्या पतींना बरोबर घेऊन उत्तम समाधियोगानें भगवंताच्या मायामय रूपाची उपासना करिते. उपासना करीत असतां ती जी स्तुति करिते, ती तुला सांगतों:

### केतुमाल वर्षांतील उपास्याची स्तुति.

"भगवन् कामदेवा, तूं इंद्रियांचा नियंता आहेस; जगांतील उत्तम वस्तूंवरून तुझें स्वरूप कळतें; क्रियाशक्ति, ज्ञानशक्ति, अंतःकरणाचे संकल्पादिक धर्म व विषय ह्यांचा अधिपति तूंच; अकरा इंद्रियें व पांच विषय हे सोळा अंश तुझेच; वेदोक्त कर्मे केलीं असतां ज्याची प्राप्ति होते, तो तूंच; देवा, अन्नरूप, अमृतरूप, सर्वरूप, मनःशक्तिरूप, इंद्रियशक्तिरूप, देहशक्तिरूप, सौंदर्यरूप असें जें कांहीं, तें सर्व तुझेंच स्वरूप आहे. हे कामदेवा, तुला इहलोकीं व परलोकीं वारंवार नमस्कार असोत ! हे भगवन्, स्त्रिया नानाप्रकारचीं व्रतें करून तुझी आराधना करितात, व तुझ्याखेरीज अन्य पति मागतात, पण ते पति सर्वस्वी पराधीन असल्यामुळें त्यांच्याकडून त्या स्त्रियांच्या प्रिय अपत्यांचें, धनाचें व आयुष्याचें संरक्षण होत नाहीं. देवा, ज्याला स्वतः कोणाचेंही भय नसून जो भयातुर प्राण्यांचें सर्वतोपरी रक्षण करूं शकतो, तोच खरा पति होय. अशा प्रकारचा पति तूं एकटाच आहेस. कारण, देवा, तुला आत्मलाभाहून कशाचीही अधिक महती वाटत नाहीं. बिचाऱ्या विषयाभिलाषी जनांना स्वतंत्रता नसल्यामुळें, त्यांस मांडलिक राजांप्रमाणें एकमेकांपासून भय प्राप्त होतें. देवा, सकाम भजनापेक्षां निष्काम भजनाची योग्यता विशेष आहे. पहा—जी स्त्री तुझ्या चरणकमलांची सेवा निष्काम बुद्धीनें करिते, तिला सर्व सुखें आपोआप प्राप्त होतात. परंतु जी स्त्री कांहीं कामना मनांत धरून सेवा करिते, तिला तूं तिच्या कामनेचा पदार्थ मात्र प्राप्त करून देतोस; दुसरें कांहीं देत नाहींस; ह्यामुळें, तूं दिलेला पदार्थ भोगून संपतांच पुनः तिची स्थिति पूर्ववत् होऊन ती पश्चात्ताप करूं लागते. देवाधिदेवा, ब्रह्मदेव, शंकर, देव, दैत्य इत्यादिक सर्व इंद्रियसुखाविषयीं उत्सुक होऊन, तीं सुखें माझ्यावर (लक्ष्मीवर) अवलंबून असल्यामुळें नित्य माझ्या प्राप्तीकरितां झटत असतात; परंतु तुझ्या ठिकाणीं माझें मन आसक्त असल्यामुळें, जे कोणी तुझी भक्ति करितील, त्यांसच मी प्राप्त होतें. भगवन्, तुझ्या भक्तीसारखा श्रेष्ठ पुरुषार्थ दुसरा कोणताच नाहीं. जे कोणी एकाग्रतेनें तुझी भक्ति करितात, त्यांवर प्रसाद करण्याकरितां तूं आपलें हस्तकमल जसें

त्यांच्या मस्तकीं ठेवितोस, तसें माझ्या मस्तकीं ठेव. देवा, तूं आपल्या वक्षस्थळावर मला चिन्हरूपानें धारण केली आहेस खरी; परंतु भक्तांवर तूं जेवढी कृपा करितोस, तेवढी मजवर करीत नाहींस हें अनुचित होय. भगवन्, तुझ्या मायेचा प्रभाव असा लोकोत्तर आहे कीं, त्याची नुसती कल्पना करणेंही कठिण आहे."

रम्यक वर्ष.

परीक्षित राजा, रम्यक वर्षामध्यें वैवस्वत मनूला ईश्वरानें आपलें अत्यंत प्रिय स्वरूप (मत्स्यरूप) दाखविलें होतें. रम्यक वर्षाचा अधिपति वैवस्वत मनुच होय. तो सांप्रतही त्या वर्षामध्यें मत्स्यावताराची आराधना करितो. तो भगवंताची स्तुति करितो, ती अशी:

रम्यक वर्षातील उपास्याची स्तुति.

"हे मत्स्येश्वरा, तुला माझा नमस्कार असो. हे अधिपते, ह्या सर्व विश्वामध्यें तूं श्रेष्ठ आहेस. तुझी मूर्ति सत्त्वगुणमय असून तूं सर्वांचा प्राण आहेस. देवा, इंद्रियांचें बळ, शरिराची शक्ति व मनाचा उत्साह हीं सर्व तुझींच रूपें होत. ईश्वरा, तूं अंतर्बाह्य सर्वत्र भरलेला असून अष्टलोकपालांसही तुझ्या स्वरूपाचें ज्ञान होत नाहीं. तुझा वेदरूप शब्द फारच गंभीर व व्यापक आहे. देवा, मनुष्य ज्याप्रमाणें लांकडाच्या बाहुलीला सूत्रांच्या कळा करून सर्वस्वीं आपल्या अधीन ठेवितो, त्याप्रमाणें तूं सर्व प्राण्यांना ब्राह्मणक्षत्रियादि वर्णव्यवस्थेनें किंवा देवतिर्यगादि योनिविशेषांनीं बद्ध करून आपल्या अधीन ठेवितोस, व आपआपलीं कामें करावयास लावितोस. पूर्वी इंद्रादि लोकपालांस तुझ्या सत्तेविषयीं वैषम्य वाटून त्यांनी तुझा अधिकार झुगारून दिला, व ते स्वतः द्विपद, चतुष्पद इत्यादिकांनीं व्याप्त असलेल्या ह्या विश्वाचें रक्षण करूं लागले, तेव्हां त्यांच्या हातून तें काम सिद्धीस गेलें नाहीं, व त्यांस स्वतांचें पारतंत्र्य उत्तम कळून आलें, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. देवा, प्रलयकालीं जेव्हां समुद्र अति क्षुब्ध होऊन त्याच्या पर्वतप्राय लाटा उसळूं लागल्या, तेव्हां तुझ्यामुळेंच ह्या नानाओषधींनीं व वेलींनीं भरलेल्या पृथ्वीचें व माझें संरक्षण झालें. भगवन्, तूं अनादि व अनंत असून सर्व प्राणिसमूहाचा चालक आहेस. देवा, मी तुला नमस्कार करितों."

हिरण्मय वर्ष.

परीक्षिता, हिरण्मय वर्षामध्यें भगवान परमात्मा कूर्मशरीर धारण करून राहतो. पितृगणांचा अधिपति अर्यमा हिरण्मय वर्षातील जनांसह ईश्वराच्या त्या अत्यंत प्रियमूर्तीची पूजा करितो. तो ईश्वराचें भजन करितो, तें असें:

हिरण्मय वर्षातील उपास्याची स्तुति.

"हे कूर्मरूपी ईश्वरा! तुला नमस्कार असो. तुझी व्याप्ति सर्वत्र असून तूं सर्वांचा आधार आहेस. तुला काळाची वगैरे कांहींएक मर्यादा नाहीं. देवा, तुझ्या मायेमुळें हें अनंत पदार्थांनीं भरलेलें जग निर्माण झालें आहे. सृष्टींतील पदार्थांचीं अनेक रूपें दिसतात खरीं; परंतु त्या सर्वांच्या ठिकाणीं तुझें एकरूपानेंच वास्तव्य आहे. हें मायामय जग केवळ भासमान असल्यामुळें मृगजळाप्रमाणें ह्याचें मान वगैरे सांगतां येत नाहीं. हे भगवन्, गर्भाशयांतून जन्म पावणारे मनुष्य, पशु इत्यादि, घामापासून उत्पन्न होणारे ढेंकूण, उवा इत्यादि, अंडज पक्षी वगैरे, उद्भिज्ज वृक्षतृणादि, आणि स्थावरजंगम वस्तु, देव, ऋषि, पितर, भूतें, इंद्रियसमुदाय, स्वर्ग, आकाश, पृथ्वी, पर्वत, नद्या, समुद्र द्वीपें, ग्रह, नक्षत्रें इत्यादि अनंत पदार्थ ह्या विश्वांत भरले आहेत, हे सर्व तुझेच अंश आहेत. भगवन्, अशा प्रकारचीं तुझीं रूपें, नांवें व आकार अनंत असतांना, कपिलादि विद्वानांनीं त्यांची संख्या एक ( चोवीस तत्त्वात्मक ) ठरविली आहे; पण ब्रह्मस्वरूप जाणणारांस ही संख्या केवळ काल्पनिकच वाटते.

देवा, जगतांतील अखिल अद्वैताचा ऱ्हास करून टाकणारें जें सांख्यशास्त्र, तें तरी तुझेंच रूप होय."

उत्तरकुरु वर्ष.

हे परीक्षित राजा, उत्तरकुरु वर्षामध्यें भगवान यज्ञपुरुष वराहरूप घेऊन राहतो. ही भूदेवी कुरुवर्षांतील रहिवासी जनांसहवर्तमान अखंडभक्तिपूर्वक वराहराजाची उपासना करिते. तो प्रकार असा:

उत्तरकुरु वर्षांतील उपास्याची स्तुति.

" देवा, तुझ्या खुणा आम्हांस वेदमंत्रांवरून समजून येतात. यज्ञ व क्रतु हीं तुझींच रूपें होत. नानाविध याग हे तुझे अवयव आहेत. तुझी मूर्ति अत्यंत पवित्र असून तूं तिन्ही युगांत प्रसिद्ध आहेस. देवा, आमचा प्रणाम ग्रहण करावा. भगवन्, अनेक प्रकारचीं कर्मे केलीं व त्यांचीं फलें प्राप्त झालीं, तरी तुझ्या स्वरूपाचें त्यापासून ज्ञान होत नाहीं. ब्राह्मण यज्ञाकरितां अरणींचें मंथन करून तींतून अग्नि काढितात, तद्वत् मनोरूपी रवीच्या योगानें देहेंद्रियादिकांचें मंथन करून विद्वान व विचारी पुरुष तुझ्या स्वरूपाचें ज्ञान संपादितात. देवा, विद्वान लोक यमनियमादि साधनांनीं तुझें ब्रह्मरूप जाणण्यास समर्थ होतात, व विषय, इंद्रियांचे व्यापार, देवता, देह, काळ, अहंकार हीं सर्व तुझ्या मायेमुळें भासमान होतात असें जाणतात. भगवंता, तुला स्वतःला कशाशीच आवश्यकता नसते. तूं नानाप्रकारच्या इच्छा धारण करितोस, त्या जीवांकरितांच. लोखंड ज्याप्रमाणें लोहचुंबकाच्या अनुरोधानें फिरतें, त्याप्रमाणें माया ही तुझ्या इच्छेच्या अनुरोधानें सर्वत्र फिरते. ईश्वरा, जगांतील गुणकर्मांचा तूं केवळ साक्षी आहेस. तुझ्यामुळें हें सर्व जग आज दृग्गोचर होत आहे. ज्या वेळीं दैत्यानें मला समुद्रांत ओढून नेलें, त्या वेळीं तूंच वराह अवतार घेऊन माझा फिरून उद्धार केलास. देवा, तुझें काय सामर्थ्य सांगावें बरें! तूं मला आपल्या दाढेवर बसवून जेव्हां समुद्रांतून वर आणलेस, तेव्हां तुला श्रम तरी पडावयाचे होते! हत्ती दांताला माती लागली असतां ज्याप्रमाणें तिची मुळींच परवा करीत नाहीं, त्याप्रमाणें तूं माझ्या भाराची मुळींच परवा न करितां, उलट वाटेंत हिरण्याक्ष दैत्य आडवा आला असतां त्याच्यांशीं युद्ध करून त्याचा सहज नाश केलास; तेव्हां तुझा प्रभाव किती लोकोत्तर आहे बरें! देवाधिदेवा, मी ह्या लोकांसहवर्तमान तुझ्या पदीं लीन होतें, तूं आमच्यावर कृपा कर."

# अध्याय एकोणिसावा.

—:०:—

## किंपुरुष वर्षाचें वर्णन.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—परीक्षित राजा, किंपुरुष वर्षामध्यें महान भगवद्भक्त श्रीमारुति हा सर्व लोकांसहवर्तमान भगवान सीतापति रामचंद्राच्या भक्तींत नित्य निमग्न असतो. तेथें गंधर्वादिक उपदेव श्रीरामाचें पवित्र यश नेहमीं गात असतात, व मारुति तें आर्ष्टिषेणासह एकाग्रचित्तानें श्रवण करितो. त्या ठिकाणीं राहून भगवान मारुति

श्रीरामचरित्राचें सार

गात असतो: मारुति म्हणतो, " महाराज, आपला अवतार फारच आश्चर्यकारक होय. आपल्या चरित्रावरून लोकांस अत्युत्तम कित्ता मिळतो. आपला स्वभाव, लक्षणें, इंद्रियनिरोध हीं पाहिलीं असतां आपण म्हणजे उत्तम गुणांची परम मर्यादा असें म्हणणें प्राप्त होतें. देवा, ब्राह्मणांचा कैवार घेणें व जनतेस ज्ञान प्राप्त करून देणें, ह्या गोष्टींचा विचार केला म्हणजे आपण ईश्वराचें रूप आहां ह्याची अधिकाधिक प्रतीति येते. महाराज, आपल्या ठिकाणीं द्वैताचा लेशही नाहीं; जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या अवस्थांपासून आपण दूर असल्यामुळें पूर्ण शांतीचें आपण केवळ निधान

आहां. आपणांस नामरूपादि आहे असें मानणें ही केवळ अज्ञ लोकांची करमणूक होय. भगवन्, आपण राक्षसांचा संहार करण्याकरितां अवतार घेतला, हें वास्तविक कारण नव्हे; वास्तविक कारण—स्त्रियांवर प्रेम केलें असतां कशीं दुःखें भोगावीं लागतात, हें सर्वांस उत्तम रीतीनें कळावें हें होय. महाराज, जर मी म्हणतों हें कारण मानिलें नाहीं, तर नित्य, निर्विकार व चिन्मयरूपी परमात्म्यास सीतेकरितां दुःख प्राप्त झालें, ही कल्पना विसंगत दिसते. जो भगवान धीर पुरुषांचा आत्मा व त्रैलोक्यांतील कोणत्याही पदार्थाविषयीं अनासक्त, त्याला स्त्रीसाठीं मोह पडला व त्यानें लक्ष्मणाचा त्याग केला, हें म्हणणें कसें संभवावें! देवा, तूं ज्यांच्यावर प्रेम करितोस, ते उत्तम कुळांत जन्मास आले पाहिजेत अथवा सुंदर दिसले पाहिजेत किंवा सुबुद्ध असले पाहिजेत, असें कांहींएक नाहीं. देवा, असें असतें तर मजसारख्या धडधडीत वनांत राहणाऱ्या वानराला तूं कसें मित्र केलें असतें बरें! रामा, तुझा प्रभाव फारच अलौकिक आहे ह्यांत संशय नाहीं. तूं देवांचें कार्य करण्याकरितां मनुष्यरूप धारण केलेंस व अवतारसमाप्तीच्या वेळीं सर्व उत्तरकोसल देश स्वर्गास नेलास, तेव्हां हें केवढें आश्चर्य सांगावें! भगवन्, कोणीं तुझी प्रेमानें जरी थोडीशी भक्ति केली, तरी ती तूं पुष्कळ मानून घेतोस व त्याला सद्गति देतोस; ह्याकरितां देव, दैत्य, वानर अथवा मनुष्य अशा कोणत्याही योनींत जन्म घेतलेल्या प्राण्यानें तुझी सेवा करावी हें अत्यंत इष्ट आहे."

### भारतवर्षाचें वर्णन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, भारतवर्षामध्येंही नर-नारायण नांवाची परमात्म्याची मूर्ति, आत्मज्ञ पुरुषांवर अनुग्रह करण्याकरितां तपश्चर्या करीत बसली आहे. हें तप कल्पाच्या समाप्तीपर्यंत असेंच चालावयाचें. राजा, नर-नारायण हे कोठें आहेत, काय करितात वगैरे कोणास कांहींएक कळून येत नाहीं. हे जी तपश्चर्या करितात, तिच्या योगानें धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, शांति व विषयोपरति हे गुण वाढत जाऊन शेवटीं भगवत्स्वरूपाचा साक्षात्कार होतो. भारतवर्षामध्यें भगवान नारद मुनि अखिल लोकांसहवर्तमान 'सांख्य व योग' ह्या मार्गास अनुसरून

### नरनारायणांची उपासना

करितात. तो उपासनाप्रकार असाः "भगवन्, आपल्या स्वरूपाचें वर्णन करणें मोठें कठिण आहे. महाराज, इंद्रियांचा जय करणें हें तर आपलें मोठें ब्रीद होय. सर्व लोकांस मूढ बनविणारा जो मायामोह, त्याचा आपले ठिकाणीं लेश सुद्धां नाहीं. आपली संपत्ति म्हणजे लौकिक दृष्टीनें तुच्छ मानले जाणारे भगवद्भक्त ही होय. महाराज, जगांत मोठमोठे ज्ञानी पुरुष म्हणून ज्यांची वाखाणणी होते, ते आपल्या तुलनेनें कांहींच नाहींत. देवाधिदेवा, आपण परमहंसांचेही परमहंस आणि ब्रह्मज्ञानाचे केवळ अपूर्व निधिच आहां. आम्ही आपणांस वारंवार नमस्कार करितों, तो ग्रहण करावा. नारायणा, ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति व संहार आपल्याकडून होत असतां, आपणांस ह्या कर्तृत्वाबद्दल अभिमान मुळींच नाहीं; आपण देह धारण करितां, तथापि क्षुधा, तृषा इत्यादि विकार आपणांस मुळींच पीडा करीत नाहींत; जगांतील यच्चयावत् सर्व वस्तुस्थिति आपण पहात असतां, तथापि तीविषयीं आपणांस लोभ, राग, भय इत्यादि विकार मुळींच उत्पन्न होत नाहींत; तेव्हां हें मोठें गूढ नव्हे काय? हे योगेश्वर, भगवान ब्रह्मदेवानें जें योगमार्गाचें रहस्य सांगितलें, तें आपल्या ठिकाणीं उत्तम प्रकारें अनुभवास येतें. प्रत्येक मनुष्य देहाभिमान सोडून जन्मभर भगवद्भक्तीमध्यें रममाण होईल, व अंतकालीं निर्गुण निर्विकार अशा आपल्या स्वरूपीं लीन होऊन जाईल, त्याचा केवढा परमार्थ सा-

घेल बरें! भगवन्, इहलोकींच्या व परलोकींच्या विषयोपभोगांची इच्छा करणें, आणि स्त्री, पुत्र, द्रव्य इत्यादिकांच्या मोहांत गुरफटून जाऊन, माझ्या पश्चात् माझ्या स्त्रीपुत्रांचें वगैरे कसें चालेल ही विवंचना करणें, हा निवळ वेडेपणा होय. विद्वान पुरुष जर का ह्या विवंचनेंत पडेल, तर त्याची सर्व विद्वत्ता 'पालथ्या घागरीवर पाणी' अशी म्हटली पाहिजे. ह्याकरितां, हे परमेश्वरा, आम्हांला तुझ्या अखंडभक्तीमध्यें लालसा उत्पन्न कर; म्हणजे तिच्या योगानें आम्ही ह्या मायामोहांतून पार पडूं."

### भारतवर्षांतील पर्वत व नद्या.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—हे परीक्षित राजा, ह्या भारतवर्षामध्यें पर्वत व नद्या पुष्कळ आहेत. त्यांमध्यें मलय, मंगलप्रस्थ, मैनाक, त्रिकूट, ऋषभ, कुटक, कोल्लक, सह्य, देवगिरि, ऋष्यमूक, श्रीशैल, वेंकट, महेंद्र, वारिधार, विंध्य, शुक्तिमान, ऋक्षगिरि, पारियात्र, द्रोण, चित्रकूट, गोवर्धन, रैवतक, ककुभ, नील, गोकामुख, इंद्रकील आणि कामगिरि हे पर्वत मुख्य असून दुसरेही सहस्रावधि पर्वत आहेत, व त्यांपासून निघालेले नद व नद्याही अगणित आहेत. राजा, ह्या नद्यांचें नुसतें नामस्मरण केलें असतांही पाप नष्ट होतें; मग त्यांमध्यें स्नानादिक क्रिया केल्या असतां पवित्रता उत्पन्न होईल ह्यांत काय नवल आहे? ह्या नद्यांपैकीं चंद्रवशा, ताम्रपर्णी, अवटोदा, कृतमाला, वैहायसी, कावेरी, वेणी, पयस्विनी, शर्करावर्ता, तुंगभद्रा, कृष्णा, वेण्या, भीमरथी, गोदावरी, निर्विंध्या, पयोष्णी, तापी, रेवा, सुरसा, नर्मदा, चर्मवती, सिंधु, महानदी, वेदस्मृति, ऋषिकुल्या, त्रिसामा, कौशिकी, मंदाकिनी, यमुना, सरस्वती, दृषद्वती, गोमती, सरयु, रोधस्वती, सप्तवती, सुषोमा, शतद्रु, चंद्रभागा, मरुद्वृधा, वितस्ता, असिक्नी व विश्वा ह्या नद्या आणि अंध व शोण हे नद अशीं चवेचाळीस पुण्यतीर्थें आहेत. असो; हे परीक्षित राजा,

### भारतवर्ष ही कर्मभूमि होय.

ह्या वर्षामध्यें जे पुरुष जन्मास येतात, ते आपल्या सात्त्विक, राजस किंवा तामस कर्मांप्रमाणें दिव्य, मानुष किंवा नरकाची गति मिळवितात. तसेंच, ब्राह्मणादि वर्णांना जीं जीं कर्में मोक्षदायक म्हणून सांगितलीं आहेत, तीं तीं कर्में करून ते येथें मोक्षही मिळवितात. राजा, तो

### मोक्षप्राप्ति कशी होते

म्हणून म्हणशील, तर ऐकः सर्व भूतांच्या अंतर्यामीं वास करणारा, चराचरामध्यें व्यापून राहणारा, स्वतंत्र वाणीनें वर्णन करण्यास अशक्य व विकारहीन अशा परमात्म्याच्या ठिकाणीं निष्काम बुद्धीनें प्राण्याचें मन अखंड जडलें, कीं त्यास मोक्ष प्राप्त झाला म्हणून समजावें. ही गोष्ट घडण्यास प्राण्याचा अभिमान आधीं नष्ट झाला पाहिजे, आणि तो नष्ट होण्याला सुलभ उपाय, भगवद्भक्तांचा व सत्पुरुषांचा नित्य सहवास घडणें हाच होय.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, ह्या भारतवर्षांत प्राण्याला हा जो अनुपम लाभ घडतो, त्याजबद्दल देवही त्याचा हेवा करितात. ते म्हणतात कीं, ह्या भारतवर्षांत आम्हांस जन्म घडेल, तर आम्हांसही सायुज्य प्राप्त करून घेतां येईल; परंतु हें घडावें कसें? परीक्षिता, देवादिकांना स्वर्गादि सुख प्राप्त झालें असतांही अशी तळमळ लागते कीं, 'अरेरे! आम्हीं अनेक यज्ञयागादिक केले, तपें केलीं, व्रतें आचरलीं, दानधर्म केले व ह्या स्वर्गांत आलों; परंतु उपयोग काय! येथें आम्ही नारायणाच्या चरणकमलांस मुकलों व शिवाय दिव्य भोगांत निमग्न होऊन परमार्थसाधनास अंतरलों; तेव्हां आतां काय करावें?' हे परीक्षित राजा, स्वर्गामध्यें राहणाऱ्या पुरुषांस युगेंच्या युगें आयुष्य असतें व

भारतवर्षांत काय तें शंभर वर्षें आयुष्य असतें; असा आयुर्मानांत भेद आढळतो, व त्यामुळें स्वर्ग आपणांस श्रेष्ठ वाटतो; पण त्यावर जाऊन उपयोग नाहीं. बाबारे, स्वर्गांत हजारों वर्षें आयुष्य असतें खरें; परंतु तें संपल्यावर तेथील पुरुषांस फिरून जन्म घ्यावा लागतो. तसा प्रकार भारतवर्षांत घडत नाहीं. जर भारतवर्षांतील पुरुष परब्रह्मस्वरूपीं लीन होऊन कालक्षेप करील, तर आपल्या अल्प आयुष्यांतच भगवत्स्वरूपीं मिळून पुनर्जन्म चुकवील. राजा, ज्या स्थलीं भगवद्गुणांचें गायन चालू नाहीं, ज्या स्थलीं साधकांचें वास्तव्य नाहीं, व ज्या स्थलीं यज्ञपुरुषाची उपासना होत नाहीं, तें स्थल प्रत्यक्ष सत्यलोकीं असलें तरी तुच्छ होय. राजा, भारतवर्षामध्यें परमार्थप्राप्तीचीं अनेक साधनें व भगवद्भक्तांचें वास्तव्य असल्यामुळें त्याची योग्यता विशेष आहे. जे लोक अशा स्थलीं जन्मास येऊन आपलें सार्थक्य करीत नाहींत, व संसारादिकांत निमग्न होतात, ते किती तरी मूढ! पहा, पक्षी एकवार जाळ्यांतून सुटून फिरून जाळ्यांत पडावा, तद्वत् हें त्यांचें आचरण होतें, ह्यांत संशय नाहीं.

### सकामभक्तीचें वैयर्थ्य.

श्रीशुकाचार्य पुढें सांगतात:—राजा परीक्षिता, भरतभूमींतील लोक यज्ञादिक क्रिया करून इंद्रादिक देवांना संतुष्ट करितात; परंतु इंद्रादिक देव हीं त्या परमात्म्याचीं भिन्न नांवें होत. त्या देवांच्या रूपानें प्रत्यक्ष परमात्मा यज्ञांतील हविर्भाग स्वतः ग्रहण करितो व प्राण्यांचे इष्ट हेतु सिद्धीस नेतो. अशा वेळीं, यज्ञयागांनीं आपणास कोणतें फळ मिळवावयाचें ह्याचा निश्चय फार सावधगिरीनें केला पाहिजे. ईश्वर जें मागावें तें देईल, परंतु मागणी अशी असावी कीं, तिच्या योगानें दात्याचा व आपला ऋणानुबंध समाप्त होऊं नये; व ह्या दृष्टीनें विचार करितां, सकामभक्तीपेक्षां निष्कामभक्तिच श्रेष्ठ ठरते. कारण, सकामभक्तीनें आपली कामना पूर्ण झाली कीं आपलें भगवंताकडे कांहीं येणें निघत नाहीं; परंतु असा प्रकार निष्कामभक्तीचा नाहीं. निष्कामतेनें सेवा करणाऱ्या पुरुषाविषयीं भगवंतास नित्य काळजी वाहावी लागते, व ह्यामुळें भक्तांस कोणतेंही संकट प्राप्त होणार नाहीं अशी व्यवस्था ठेवून अखेरीस त्यास सायुज्य दिल्याशिवाय त्याला गत्यंतरच नसतें. आतां, सकामभक्तांची स्थिति किती विपरीत होते पहा: तो जी कामना करितो, ती सिद्धीस गेल्यानंतर कधीं तरी असा काल येतो कीं, उपभोगाच्या योगानें त्याचें तें सकामभक्तीचें फल नष्ट होतें व फिरून त्याची अगदीं पहिल्याप्रमाणें दीन स्थिति होऊन जाते. सारांश, सकामभक्ति ही निष्कामभक्तीपुढें केवळ तुच्छ व व्यर्थ होय. परीक्षिता, हा सर्व विचार मनांत आणूनच इंद्रादि देव परमात्म्याची प्रार्थना करितात कीं, "हे देवाधिदेवा, आम्हीं यज्ञयागादिक, व्रतवैकल्यादिक किंवा वेदपठनादिक गोष्टी करून जें पुण्य जोडिलें व हा स्वर्गलोक मिळविला, त्यांतून कांहीं पुण्य अवशिष्ट राहिलें असल्यास आम्हांस भारतवर्षांत जन्म प्राप्त होवो, व तेथें गेल्यावर आम्हांस तुझ्या भक्तींत रममाण होण्याविषयीं स्मरण राहो. कारण, देवा, तूं आपल्या भक्तांना जसें सुख देतोस, तसें सुख अन्यांस देत नाहींस."

### जंबूद्वीपाचे आठ भाग.

परीक्षित राजा, पूर्वी सगर राजाच्या पुत्रांनीं घोडा शोधण्याकरितां ही पृथ्वी खणली, त्या वेळीं जंबूद्वीपाचे आठ वेगळे भाग झाले; म्हणून कित्येक लोक त्या भागांस जंबूद्वीपाचीं आठ उपद्वीपें असें म्हणतात. त्यांचीं नांवें—स्वर्णप्रस्थ, चंद्रशुक्ल, आवर्तन, रमणक, मंदरहरिण, पांचजन्य, सिंहक व लंका हीं होत.

## अध्याय विसावा.

—:०:—

### सप्तद्वीपांचें व तदंतर्गत पर्वतादिकांचें वर्णन.

#### प्लक्षद्वीप.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, आतां प्लक्षादिक द्वीपांचीं खंडें व त्यांच्या लांबी-रुंदीचीं मानें वगैरे सांगतों, तीं ऐक. जंबूद्वीपाच्या मध्यभागीं मेरु पर्वत असून भोंवतालीं जसे जंबूद्वीपाचे भूप्रदेश पसरलेले आहेत, तसा ह्या जंबूद्वीपाच्या सभोंवार ह्या द्वीपाच्या इतकाच क्षारसमुद्राचा वेढा पडलेला आहे. खंदकाच्या भोंवतालीं ज्याप्रमाणें उपवनें असावीं, त्याप्रमाणें ह्या क्षारसमुद्राच्या सभोंवतीं प्लक्ष नांवाचें द्वीप असून त्याचें क्षेत्र त्या समुद्राच्या दुप्पट आहे. ह्या द्वीपांत एक सुवर्णमय प्लक्ष (पिंपरणी) वृक्ष असून त्याचा विस्तार जंबूद्वीपांतील जंबूवृक्षाएवढाच आहे. राजा, ह्या द्वीपाला प्लक्षद्वीप असें नांव पडण्याचें कारण हा प्लक्षवृक्षच होय. ह्या वृक्षाच्या आधारानें सप्तजिव्ह अग्नि राहतो. प्रियव्रत राजाचा पुत्र इध्मजिव्ह ह्यानें ह्या द्वीपाचे सात विभाग करून ते आपल्या सात पुत्रांना वांटून दिले, व स्वतः आत्मयोग करून तो परमेशरूपीं जाऊन मिळाला. इध्मजिव्हानें जीं सात खंडें केलीं, त्यांस त्याच्या पुत्रांचींच नांवें पडलीं. तीं नांवें शिव, यवयस, सुभद्र, शांत, क्षेम, अमृत व अभय हीं होत. ह्या सप्तखंडांमध्यें पर्वत व नद्या ह्या सातसातच प्रसिद्ध आहेत. मणिकूट, वज्रकूट, इंद्रसेन, ज्योतिष्मान्, सुपर्ण, हिरण्यष्ठीव व मेघमाल हे त्या खंडांच्या हद्दीवरील पर्वत होत; आणि अरुणा, नृम्णा, आंगिरसी, सावित्री, सुप्रभाता, ऋतंभरा व सत्यंभरा ह्या अनुक्रमें प्रत्येक खंडांतील एक एक ह्याप्रमाणें सात महानद्या आहेत. ह्या खंडांत जे लोक राहतात, त्यांचे हंस, पतंग, ऊर्ध्वायन व सत्यांग असे चार वर्ण आहेत. हे लोक स्नान, आचमन इत्यादि करून आपले रजोगुण व तमोगुण घालवितात, व वेदमंत्रांनीं सूर्याची उपासना करितात. प्लक्षद्वीपांतील लोकांची आयुर्मर्यादा सहस्र वर्षे असून त्यांचीं शरीरें व संतति हीं देवांच्याप्रमाणें सुंदर आहेत. ते

#### सूर्याचा स्तव

करितात, तो असाः "हे भगवन् सूर्यनारायणा, तूं केवळ विष्णूचें देदीप्यमान रूप होस. देवा, नानाविध धर्मांचें अधिष्ठान जे वेद, ते केवळ तुझी प्रतिमा होत. मोक्षरूप शुभ फल व मृत्युरूप अशुभ फळ प्राण्यांना प्राप्त होतें, त्यास आदिकारण तूंच आहेस. हे हिरण्यगर्भा, आमचा नमस्कार ग्रहण कर." परीक्षित राजा, प्लक्षादि पांच द्वीपांमध्यें आयुष्य, इंद्रियें, इंद्रियांचें पटुत्व, कांति, सहनशीलता, बळ, बुद्धि आणि पराक्रम ह्यांची स्वभावतांच सर्वांना सारखी प्राप्ति होते.

#### शाल्मलद्वीप.

श्रीशुकाचार्य पुढें सांगतातः—राजा परीक्षिता, प्लक्षाच्या सभोंवतीं त्याच्या इतका लांब रुंद असा इक्षुरसाचा समुद्र वेष्टित आहे. त्याच्या भोंवतालीं त्याच्या दुप्पट शाल्मलद्वीप असून त्याच्या सभोंवतीं सुरासमुद्र आहे. ह्या शाल्मलद्वीपांत शाल्मलिवृक्ष (शेंवरीचें झाड) असून त्यावर पक्षिराज गरुड वास करितो. गरुडाचे पंख वेदरूपी असून तो त्यांच्या योगानें ईश्वराची स्तुति करितो. ह्या शाल्मलिवृक्षावरून ह्या द्वीपास शाल्मलद्वीप असें म्हणतात. प्रियव्रताचा पुत्र यज्ञबाहु हा ह्या द्वीपाचा अधिपति होय. ह्यासही सात पुत्र होते, व त्यास त्यानें ह्या द्वीपाचे सात भाग करून वांटून दिले. त्या सात पुत्रांचीं जीं नांवें, तींच त्यानें ह्या सात भागांस दिलीं. तीं अशीं: सुरोचन, सौमनस्य, रमणक, देववर्ष, पारिभद्र, आप्यायन व अविज्ञात. ह्या सात भागांच्या मर्यादांवर सात पर्वत व सात नद्या आहेत. पर्वतांचीं नांवें स्वरस, शतशृंग,

वामदेव, कुंद, मुकुंद, पुष्पवर्ण व सहस्रश्रुति; आणि नद्यांचीं नांवें अनुमति, सिनीवाली, सरस्वती, कुहू, रजनी, नंदा आणि राका अशीं आहेत. श्रुतधर, वीर्यधर, वसुंधर व इषंधर ह्या नांवांचे ह्या भागांतील पुरुष भगवान वेदमय आत्मस्वरूप

**चंद्राची आराधना**

करितात. ह्या आराधनेचा आशय तुला सांगतों: "हे रोहिणीपते, तूं आपल्या किरणांनीं शुद्धपक्षांत देवांना व कृष्णपक्षांत पितरांना अन्नाचे विभाग पोहोंचवितोस व त्यांना संतुष्ट करितोस, तसें तूं आम्हांला संतुष्ट कर."

## कुशद्वीप.

परीक्षित राजा, सुरासमुद्राच्या बाहेरून त्याच्या दुप्पट लांब रुंद असें कुशद्वीप आहे. ह्या द्वीपालाही त्याच्या इतक्याच प्रमाणाचें घृतसमुद्राचें वेष्टन आहे. ह्या द्वीपांत कुशांचें (दर्भांचें) एक बेट देवांनीं उत्पन्न केलें आहे, म्हणून ह्यास कुशद्वीप असें नांव मिळालें आहे. ह्या कुशस्तंबाचे कोमल अंकुर अग्नीसारखे तेजस्वी असल्यामुळें, त्या योगानें सर्व दिशा प्रकाशित झाल्या आहेत. परीक्षिता, प्रियव्रत राजाचा पुत्र जो हिरण्यरेता, तो ह्या द्वीपाचा अधिपति होय. ह्यासही सात पुत्र होते. हिरण्यरेत्यानें आपल्या पुत्रांस ह्या द्वीपाचीं सात खंडें करून वांटून दिलीं. त्या खंडांचीं नांवें वसु, वसुदान, दृढरुचि, नाभिगुप्त, स्तुत्यव्रत, विविक्त, आणि वामदेव हीं होत. चक्र, चतुःशृंग, कपिल, चित्रकूट, देवानीक, ऊर्ध्वरोमा व द्रविण हीं त्यांतील सात पर्वतांचीं नांवें होत. कुशद्वीपांतही नद्या सातच आहेत. त्यांचीं नांवें—रसकुल्या, मधुकुल्या, मित्रविंदा, श्रुतविंदा, देवगर्भा, घृतच्युता व मंत्रमाला. ह्या द्वीपांत कुशल, कोविद, अभियुक्त आणि कुलक ह्या चार प्रकारचे लोक आहेत. हे लोक अग्नीची आराधना करून पवित्र आचरणानें कालक्षेप करितात. ते भगवान

**अग्नीची स्तुति**

करितात, ती अशी: "हे अग्ने, तूं परमात्म्याला हविर्भाग पोहोंचविण्याचें साधन आहेस. आम्ही इंद्रादिक देवांच्या नांवांनीं जे हविर्भाग देतों, ते तूं परमेश्वराला पोहोंचव."

## क्रौंचद्वीप.

परीक्षित राजा, घृतसमुद्राच्या बाहेर क्रौंचद्वीप आहे. त्याच्या भोंवतालीं क्षीरसमुद्राचा वेढा आहे. ह्या द्वीपांत क्रौंच नांवाचा एक पर्वत आहे, त्यावरून ह्या द्वीपास क्रौंचद्वीप असें नांव पडलें. राजा, कार्तिकेयानें ह्या क्रौंच पर्वतावर शस्त्रप्रहार करून त्याचे तुकडे उडविले, परंतु वरुणानें कृपा करून क्षीरसमुद्राच्या सिंचनानें त्याचें संरक्षण केलें. ह्या द्वीपाचा अधिपति प्रियव्रत राजाचा पुत्र घृतपृष्ठ हा होय. त्यालाही सात पुत्र होते. त्या महासमर्थ राजानें ह्या द्वीपाचे सात विभाग करून आपल्या पुत्रांना ते दिले व त्यांस त्या पुत्रांचींच नांवें ठेविलीं. घृतपृष्ठाच्या पुत्रांचीं नांवें—आम, मधुरुह, मेघपृष्ठ, सुधामा, भ्राजिष्ठ, लोहितार्ण व वनस्पति अशीं होतीं. ह्या सात विभागांच्या हद्दींवर सात पर्वत व सात नद्या आहेत. पर्वतांचीं नांवें—शुक्ल, वर्धमान, भोजन, उपबर्हिण, नंद, नंदन व सर्वतोभद्र; आणि नद्यांचीं नांवें अमया, अमृतौघा, आर्यका, तीर्थवती, वृत्तिरूपवती, पवित्रवती व शुक्रा हीं होत. ह्या द्वीपांत चार वर्णांचे लोक राहतात. त्यांचीं नांवें पुरुष, ऋषभ, द्रविण आणि देवक हीं होत. हे सर्व लोक ह्या नद्यांचें उदक प्राशन करून

**जलदेवतेची स्तुति**

करितात: "हे जलदेवते, तूं स्वर्ग, अंतरिक्ष व पृथ्वी ह्या तिहींला पवित्र करितेस. पाप दूर करणें हा तुझा स्वाभाविक धर्म आहे. आम्ही तुझी सेवा करितों, तर आमचीं शरीरें पवित्र कर."

## शाकद्वीप.

परीक्षित राजा, ह्याप्रमाणेंच पुढें क्षीरोदाच्या

भोंवतालीं शाकद्वीप आहे, त्याची लांबी बत्तीस लक्ष योजनें असून त्याच्या सभोंवतीं त्याच्याच इतका विस्तीर्ण असा दधिमंडाचा समुद्र आहे. ह्या द्वीपास शाकद्वीप असें म्हणण्याचें कारण, त्यांत शाक नांवाचा वृक्ष आहे, हें होय. हा वृक्ष मोठा सुवासिक असून ह्याच्यामुळें सर्व द्वीप सुगंधित झालें आहे. प्रियव्रत राजाचा पुत्र मेधातिथि हा ह्या द्वीपाचा अधिपति होय. ह्यानें ह्या द्वीपाचे सात भाग करून आपल्या सात पुत्रांच्या हवालीं केले, व आपल्या पुत्रांचीं नांवें त्या भागांस दिलीं. मेधातिथीच्या पुत्रांचीं नांवें—पुरोजव, मनोजव, पवमान, धूम्रानीक, चित्ररेफ, बहुरूप व विश्वाधार अशीं होतीं. मेधातिथीनें शाकद्वीपाचे भाग करून ते आपल्या पुत्रांच्या स्वाधीन केल्यावर तो स्वतः भगवत्पदीं लीन होऊन तपश्चर्या करूं लागला. ह्या द्वीपांतही सात पर्वत व सात नद्या आहेत. पर्वतांचीं नांवें—ईशान, उरुशृंग, बलभद्र, शतकेसर, सहस्रस्रोत, देवपाल व महानस अशीं असून, नद्यांचीं नांवें अनघा, आयुर्दा, उभयस्पृष्टि, अपराजिता, पंचपदी, सहस्रस्तुति व निजधृति अशीं आहेत. त्या वर्षांत राहणाऱ्या लोकांचे ऋतव्रत, सत्यव्रत, दानव्रत व अनुव्रत असे चार भेद आहेत. ते प्राणायामानें राजस व तामस गुणांचा निरोध करून

### वायूची उपासना

करितात: ते म्हणतात, "हे वायुदेवते, तूं आपल्या प्राणापानादिक गतींनीं सर्व भूतांच्या अंतरीं प्रवेश करून त्यांचें पोषण करितेस; ह्यास्तव हें सर्व जग वस्तुतः तुझ्या स्वाधीन आहे. तूं आम्हांवर अनुग्रह कर."

### पुष्करद्वीप.

परीक्षित राजा, दधिमंड समुद्राच्या भोंवतालीं त्याच्या दुप्पट लांबीरुंदीचें पुष्करद्वीप आहे. पुष्करद्वीपाच्या सभोंवार शुद्धोदकाच्या समुद्राचें वेष्टन आहे. ह्या द्वीपांत ब्रह्मदेवाचें पुष्करावर (कमलावर) आसन आहे, ह्यावरून ह्या द्वीपास पुष्करद्वीप असें नांव पडलें. ह्या कमलाला असंख्य पत्रें असून त्याला अग्नीसारख्या ज्वाला आहेत. ह्या द्वीपाचे भाग अथवा खंडें दोनच आहेत. एकास अर्वाचीन खंड व दुसऱ्यास पराचीन खंड अशा संज्ञा आहेत. ह्या दोन खंडांच्या दरम्यान पुष्करद्वीपाच्या मध्यभागीं मानसोत्तर नांवाचा पर्वत आहे. ह्याची उंची व घेर दहा सहस्र योजनें आहे. ह्या पर्वताच्या चोहोंबाजूंस इंद्रादि चार लोकपालांचीं नगरें आहेत. भगवान सूर्यनारायण मेरूच्या भोंवतालीं फेरी करीत असतां त्याच्या रथाचें एक चाक मानसोत्तर पर्वतावर फिरतें. त्या चाकाची एक फेरी झाली कीं मनुष्यांचें एक वर्ष व देवांचा एक अहोरात्र होतो. प्रियव्रत राजाचा पुत्र वीतिहोत्र हा ह्या द्वीपाचा अधिपति होय. त्यास दोनच पुत्र होते. एकाचें नांव रमणक व दुसऱ्याचें नांव धातकि. पुष्करद्वीपाच्या दोन खंडांपैकीं एकेक खंड एकेका पुत्राकडे आलें. वीतिहोत्र आपल्या पूर्वजांप्रमाणें भगवंताची उपासना करण्यांत मोठा दक्ष होता. ह्या खंडांतील लोक नेहमीं ब्रह्मप्राप्तीच्या कामांत गुंतलेले असतात. ते

### परब्रह्माची स्तुति

करितात, ती अशी "हे परमात्मन्, तुझी प्राप्ति व्हावी हेंच अखिल कर्माचें फळ होय. देवा, तुझ्या अनुग्रहानें जीवांना ब्रह्मसाक्षात्कार होतो. हे विश्वात्मन्, तूं निर्गुण निर्विकार असून केवळ ज्ञानस्वरूप आहेस. हे देवाधिदेवा, मुमुक्षु पुरुषाचें मुख्य कर्तव्य तुझी उपासना करणें हेंच होय. हे परमेश्वरा, आम्ही तुला नमस्कार करितों."

### लोकालोक पर्वताचें वर्णन.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—परीक्षित राजा, ह्या द्वीपाच्या पलीकडे लोकालोक पर्वत आहे. प्रकाशाच्या व अप्रकाशाच्या सांध्यावर हा पर्वत पसरला आहे. मेरूपासून मानसोत्तर पर्वतापर्यंत

जितका प्रदेश आहे, तितका प्रदेश शुद्धोदक समुद्राच्या पलीकडे आहे. त्यावर प्राणी राहतात. ह्या प्रदेशाच्या पलीकडे गुळगुळीत व तेजस्वी अशी आरशाप्रमाणें भूमि आहे, तिला सुवर्णभूमि म्हणतात. ह्या भूमीवर पदार्थ पडला कीं तो फिरून हातीं लागत नाहीं, म्हणून येथें प्राणी राहत नाहीं. लोकालोक पर्वत हा सर्व त्रैलोक्याच्या भोंवतालचें कुंपणच आहे असें म्हटलें तरी चालेल. सूर्यापासून ध्रुवापर्यंत सर्व तेजोनिधींचे किरण लोकालोक पर्वताच्या अलीकडील प्रदेशाला मात्र प्रकाशित करितात. लोकालोक पर्वत फार उंच असल्यामुळें त्याच्या पलीकडे सूर्यादिकांचे किरण जाऊ शकत नाहींत. विद्वान लोकांच्या मतें भूलोकाचा विस्तार पन्नास कोटि योजनें असून ह्या लोकालोक पर्वताचा विस्तार व उंची साडेबारा कोटि योजनें आहे. जगाचा आदिकारण ब्रह्मदेव ह्यानें त्या पर्वतावर चारी दिशांस ऋषभ, पुष्करचूड, वामन व अपराजित ह्या नांवांचे चार मोठे हत्ती स्थापिले आहेत. सर्व लोकांना स्थिर ठेवणें हें त्या दिग्गजांचें काम आहे. राजा, ह्या लोकालोक पर्वतावर भगवंताचें वास्तव्य आहे. इंद्रादि लोकपाल ह्या भगवंताच्याच विभूति होत. दिग्गजांचे व लोकपालांचे त्रिविध पराक्रम वृद्धिंगत व्हावे, ह्यासाठीं भगवान‧ शुद्धसत्त्वमय मूर्ति प्रकट करून येथें राहतो धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य इत्यादि महासिद्धि सदासर्वकाल भगवंताच्या सान्निध्यास वास करितात. विष्वक्सेनादि मुख्य मुख्य पार्षद त्याच्या सभोंवतीं नित्य उभे असतात. येथें भगवंताच्या हस्तांत त्याचीं श्रेष्ठ आयुधें असतात. कल्प संपेपर्यंत सृष्टिक्रम चालविण्याकरितां भगवान ह्या पर्वतावर वास करितो. ह्या पर्वताच्या पुढें योगेश्वरांची मात्र गति आहे. स्वर्ग व भूमि हीं ब्रह्मांडगोलाचीं दोन अर्धें होत. सूर्य हा ब्रह्मांडाच्या मधोमध आहे. सूर्यापासून दोन्ही बाजूला पंचवीस कोटि योजनें ब्रह्मांडगोल राहतो. सूर्य मृत म्हणजे अचेतन अंडांत प्रविष्ट झाला, म्हणून त्यास मार्तंड असें नांव पडलें; आणि त्याचा उद्भव सुवर्णमय म्हणजे हिरण्मय अंडांत झाला, म्हणून त्यास हिरण्यगर्भ अशी संज्ञा मिळाली. दिशा, आकाश, स्वर्ग, पृथ्वी वगैरे विभाग व स्वर्ग, मोक्ष, नरक, पाताळांतील स्थानें इत्यादि सर्व सूर्यापासून झालीं आहेत. सूर्य हा देव, तिर्यग्योनि, मनुष्य, सर्प, औषधि अशा सर्व जीवसमुदायांचा आत्मा होय. राजा, सर्व प्राण्यांच्या नेत्रेंद्रियाची अधिदेवता सूर्य हीच आहे.

## अध्याय एकविसावा.

—:०:—

### सूर्याचें परिभ्रमण.

मुनिश्रेष्ठ श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा परीक्षीता, ब्रह्मांडगोलाचीं स्वर्ग व पृथ्वी हीं दोन अर्धें आहेत असें सांगितलें, हें तुझ्या लक्षांत असेलच. द्विदल धान्याच्या एका दलाचें वर्णन केलें असतां तें जसें दुसऱ्यास लागू पडतें, तसेंच मी जें भूगोलाचें वर्णन केलें तेंच स्वर्गास लागू आहे. स्वर्ग व पृथ्वी ह्यांचा अंतरिक्षाच्या योगानें संयोग झाला आहे. सूर्यनारायण अंतरिक्षांत संचार करून सर्वत्र उष्णता व प्रकाश पुरवितो. सूर्याच्या गति मंद, शीघ्र व समान अशा तीन प्रकारच्या आहेतः एका गतीनें तो उत्तरेस जातो, तिला उत्तरायण असें म्हणतात; दुसऱ्यानें तो दक्षिणेस जातो, तिला दक्षिणायण असें म्हणतात; व तिसरी—तो विषुवावर असतो तेव्हांची, तिला वैषुवत असें म्हणतात. ह्या गतींच्या योगानें दिनमान व रात्रीमान कमजास्त होतें. जेव्हां सूर्य मेष व तूळ ह्या राशींस असतो, तेव्हां रात्र व दिवस हीं समान होतात. सूर्य वृषभ, मिथुन, कर्क, सिंह व कन्या ह्या राशींस असतां प्रत्येक महिन्यास एक घटिका ह्या क्रमानें दिवस

वाढत जातात; व तो वृश्चिक, धन, मकर, कुंभ, व मीन ह्या राशींस असतां त्याच क्रमानें रात्री वाढत जातात. दक्षिणायनास सुरुवात होईपर्यंत दिवस वाढत असतात, व उत्तरायणास सुरुवात होईपर्यंत रात्री वाढत असतात. राजा, मानसोत्तर पर्वताच्या सभोंवतालचा म्हणजे प्रदक्षिणेचा मार्ग नऊ कोटि एकावन लक्ष योजनें आहे. ह्या पर्वतावर मेरूच्या पूर्वेस देवधानी नामक इंद्राची राजधानी आहे; दक्षिणेस संयमनी नांवाची यमाची राजधानी आहे; पश्चिमेस निम्लोचनी नामक वरुणाची राजधानी आहे; व उत्तरेस विभावरी नांवाची सोमाची राजधानी आहे. ह्या राजधान्या मेरूच्या सभोंवतीं असल्यामुळें, सूर्य मेरूला प्रदक्षिणा घालीत असतां, एका राजधानींत प्रातःकाल, दुसरींत मध्यान्ह, तिसरींत सायंकाल व चौथींत मध्यरात्र असते. ज्या वेळीं एका ठिकाणीं प्रातःकाल होतो, त्या वेळीं त्याच्या समोर असलेल्या प्रदेशांत सायंकाल असतो; व ज्या वेळीं एका ठिकाणीं मध्यान्ह होतो, त्यावेळीं त्याच्या समोरच्या प्रदेशांत मध्यरात्र असते. ह्यांतील प्रातःकाल व मध्यान्ह हे प्राण्यांना आपआपलीं कर्मे करण्यास प्रवृत्त करितात; आणि सायंकाल व मध्यरात्र हे त्यांना कर्मांपासून निवृत्त करितात. मेरु पर्वतावर राहणाऱ्या लोकांना सूर्य नेहमीं मध्यान्हीं असल्याप्रमाणें प्रकाश देतो. तो मेरूला डावा घालून प्रदक्षिणा करितो, परंतु ज्योतिश्चक्र प्रदक्षिणावर्तप्रवह नामक वायूच्या वेगानें मेरूला उजवा घालून फिरत असल्यामुळें सूर्याला मेरूस उजवा घालून फिरणें भाग पडतें. राजा, पूर्वेकडील देवधानी नगरींतून सूर्य निघाला म्हणजे तो पंधरा घटकांत दोन कोटि सदतीस लक्ष पन्नास हजार व कांहीं अधिक इतकीं योजनें चालून दक्षिणेस यमाच्या संयमनी नगरीस पोहोंचतो. तेथून मग तो पश्चिमेस वळतो व फिरून पंधरा घटकांत पूर्ववत् अंतर आक्रमून वरुणाच्या निम्लोचनी पुरीस येतो. नंतर तो उत्तरेस वळून आणखी पंधरा घटकांनीं मागच्या इतका मार्ग चालून उत्तरेस विभावरी नगरीस दाखल होतो; आणि पुढें विभावरी नगरींतून सूर्य निघतो, तो मग आणखी दुसऱ्या कोठें न जातां पहिल्याच वेगानें व पहिल्याच वेळांत माघारा देवधानीस येतो. राजा, ह्याप्रमाणें सूर्य भिन्न भिन्न काळीं भिन्न भिन्न स्थळीं जात असल्यामुळें त्याच्या उदयअस्तांवरून प्रातःकाल, मध्यान्हकाल इत्यादि बदलत जातात; मेरु पर्वतावर मात्र हा दिवसरात्रींचा भेद उत्पन्न होत नाहीं; तेथें सदासर्वकाळ मध्यान्हच असतो. राजा, ज्योतिश्चक्रावर केवळ सूर्यच फिरत असतो असें नाहीं; तर चंद्रादि ग्रह व नक्षत्रें हींही त्यावर परिवर्तन करून उदय व अस्त पावतात.

परीक्षिता, सूर्य ज्या रथांतून हें अंतरिक्ष परिभ्रमण करीत आहे, तो रथ वेदत्रयात्मक आहे. तो रथ एका मुहूर्तांत म्हणजे दोन घटकांत, चौतीस लक्ष आठशें योजनें चालतो व रोज सर्व मंडल फिरून चारी राजधान्यांस प्रदक्षिणा करून येतो. ह्या रथाला संवत्सरात्मक एक चक्र आहे, त्या चक्राला मासात्मक बारा आरा आहेत, ऋतुरूप सहा नेमि ( धावा ) आहेत, आणि उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा हे कालभाग उत्पन्न करणारे तीन नाभि ( तुंबे ) आहेत.

राजा, सूर्याच्या रथाला जो आंस आहे, त्याचा एक ध्रुव मेरूच्या मस्तकावर आहे व दुसरा ध्रुव चक्रांत गुंतवलेला असून तो मानस पर्वतावर आहे. सूर्याच्या रथाची गति लक्ष्यांत येण्यास तेलाच्या घाण्याचा विचार कर. घाण्याचा बैल जसा फिरत असतो, तसाच सूर्याचा रथ फिरत असतो. घाण्याच्या बैलाचें अथवा यंत्राचें जूं जसें तैलस्तंभास पक्कें जोडलेलें असतें, तसाच सूर्याच्या रथाचा आंस मेरु पर्वतास जोडलेला आहे. तैलयंत्राला जसें दुसरें एक जूं किंवा दां-

डर्के तुरीय-यंत्राप्रमाणें खिळलेलें असतें, तसाच सूर्याच्या रथाला चक्राच्या जवळ आणखी एक आंस तुरीय-यंत्राप्रमाणें खिळलेला असून, तैल-यंत्राच्या दांड्याप्रमाणें तो ध्रुवावर वायुपाशानें बळकट बसविलेला आहे.

राजा, सूर्याच्या रथाची गर्भी छत्तीस लक्ष योजनें आहे. ह्या लांबीइतकेंच त्याच्या रथाचें जूं लांब आहे; व जुंवाची जाडी नऊ लक्ष योजनें आहे. ह्या जुंवाला गायत्री, उष्णिक्, अनुष्टुप् इत्यादि सप्तछंदोरूप सात घोडे लाविलेले आहेत. रथाच्या अग्रभागीं अरुण हा सूर्याच्या पश्चिमेस तोंड करून सारथ्याचें काम करीत आहे; व अशा प्रकारें भगवान सूर्यनारायण अंतरिक्ष आक्रमीत आहे. राजा, अंगुष्ठमात्र साठ सहस्र वालखिल्य मुनि सूक्तें म्हणून सूर्याची नित्य स्तुति करीत असतात. तसेच दुसरे ऋषि, गंधर्व, अप्सरा, नाग, ग्रामणी, यातुधान व देव ह्या सात वर्गांतील नित्य प्रत्येकापैकीं एकेक जोडी म्हणजे एकंदर चौदाजण दरमहा नानाविध कर्तव्यें करून, भगवान सूर्यनाराणाची आराधना करीत असतात.

राजा, बारा महिन्यांतील बारा सूर्यांचीं पृथक् पृथक् नांवें आहेत. सूर्याचे सेवकगण व स्तुतिपाठक हेही प्रत्येक महिन्यास भिन्न भिन्न नांवांचे असतात. असो.

राजा, सूर्याचा क्रमणमार्ग साडेनऊ कोटि व वर कांहीं लक्ष योजनें इतका असून, सूर्य एका क्षणांत सुमारें दोन हजार योजनें चालतो.

## अध्याय बाविसावा.

—:०:—

### ग्रहांचें भ्रमण व शुभाशुभ फलें.

#### अयनादिकांचें कालपरिगणन.

परीक्षित म्हणाला:—मुनिपुंगवा, सूर्य हा मेरूला व ध्रुवाला वास्तविकपणें डावी प्रदक्षिणा करीत असतां, तो राशिपुंजांतून जातांना उजवी प्रदक्षिणा करितो असें भासतें म्हणून आपण सांगितलें; तर हें असें कसें घडतें हें स्पष्ट करून सांगा.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा परीक्षिता, कुंभाराचें चाक फिरत असतां त्या चाकावर चालणारे मुंग्या वगैरे जीव जसे उलट दिशेनें चालत आहेत असें भासतें, तसेंच हें कालचक्र नक्षत्रांसहित फिरत असतां सूर्यादि ग्रह उलट दिशेनें चालत आहेत असें भासतें. भगवान सूर्यनारायण लोकांच्या कल्याणाकरितां वसंतादिक सहा ऋतु उत्पन्न करून, भिन्न भिन्न कर्मास उपयुक्त असे उन्हाळा, पावसाळा वगैरे काळ निर्माण करितो. सूर्याची वेदत्रयीरूप मूर्ति ही कर्मशुद्धीचें कारण आहे. ह्यास्तव सूर्याच्या मार्गक्रमणामुळें उत्पन्न झालेल्या ऋतूंमध्यें व काळांमध्यें अनेक लोक अनेक कर्मे करितातः कोणी वेदप्रणीत यज्ञयागादि क्रिया करितात, कोणी ध्यानधारणा इत्यादि अनेक प्रकारचीं अनुष्ठानें आचरितात, आणि आपलें श्रेय संपादितात. सारांश, सर्व लोकांच्या क्रियांचें मूळ सूर्य हा आहे. हा बारा महिन्यांत बारा राशींचा उपभोग घेतो. सूर्याला एक राशि आक्रमण्यास एक महिना लागतो. चांद्रमानानें एक महिन्याचे दोन पक्ष होतात. एक महिना म्हणजे पितरांचा एक अहोरात्र. एक राशि ह्याचा अर्थ सूर्याला सव्वादोन नक्षत्रें आक्रमून जाण्यास लागणारा काळ. वर्षाचा जो सहावा भाग, त्यास 'ऋतु' असें म्हणतात. जितक्या काळांत सूर्य अर्धा आकाशमार्ग चालतो, तितक्या काळास अयन अशी संज्ञा आहे; आणि सूर्य ज्या काळांत सर्व आकाशमार्ग आक्रमितो, त्यास वर्ष असें म्हणतात. राजा, वर्षें पांच प्रकारचीं आहेत. त्यांस संवत्सर, परिवत्सर, इडावत्सर, अनुवत्सर आणि वत्सर अशीं नांवें आहेत. ज्या वर्षी शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं संक्रांत येऊन सौर व चांद्र ह्या दोन्ही मासांचा एकदम आरंभ होतो, त्या वर्षाला संवत्सर असें म्हणतात. नंतर सौरमानानें प्रत्येक

वर्षांत सहा दिवस वाढत जातात व चांद्रमानानें प्रत्येक वर्षांत सहा दिवस कमी होत जातात; व असा फरक पडतां पडतां पांच वर्षे गेल्यावर सहाव्या वर्षी शुक्ल प्रतिपदेस संक्रांत येऊन संवत्सर पडतो. मधल्या चार वर्षांना अनुक्रमें परिवत्सर, इडावत्सर, अनुवत्सर व वत्सर अशीं नांवें आहेत.

### चंद्रमंडल.

परीक्षित राजा, चंद्र सूर्यमंडलाच्या वर एक लक्ष योजनें आहे. त्याची गति सूर्यापेक्षां फार शीघ्र आहे. तो सूर्याच्या पुढें चालतो. सूर्य एका वर्षांत बारा राशि फिरतो, पण चंद्र तितक्या सर्व एका महिन्यांत फिरतो. सूर्य एका महिन्यांत जितकीं नक्षत्रें भोगितो, तितकीं चंद्र सव्वादोन दिवसांत भोगितो. चंद्र हा कलानिधि आहे. तो वर्धमान कलांच्या योगानें देवांचीं व क्षीयमाण कलांच्या योगानें पितरांचीं अहोरात्रें करितो. सर्व जीवसमुदायाचें जीवन चंद्रावर अवलंबून आहे. तो एक नक्षत्र तीस मुहूर्तांत उल्लंघितो. चंद्राला मनोमय, अन्नमय, अमृतमय असें म्हणतात. देव, पितर, मनुष्यें, भूतें, पशु, पक्षी, सर्प व लता ह्यांचें संगोपन करणें हा चंद्राचा स्वभावधर्म आहे; व ह्या धर्मामुळें चंद्राला सर्वमय अशीही संज्ञा दिलेली आढळते.

### नक्षत्रमंडल.

चंद्रमंडलाच्या वरच्या प्रदेशीं तीन लक्ष योजनांवर नक्षत्रमंडल आहे. जगच्चालकानें ज्यांची कालचक्रावर योजना केली आहे, अशीं तीं अभिजितासह अठ्ठावीस नक्षत्रें मेरूला उजवी प्रदक्षिणा करीत फिरत आहेत.

### शुक्रमंडल.

नक्षत्रमंडलाच्या ऊर्ध्वभागीं दोन लक्ष योजनांवर शुक्र आहे. शुक्र हा कधीं सूर्याच्या पुढें, कधीं मागें व कधीं बरोबर असा कालचक्रांतून फिरत असतो. ह्याची गति कधीं मंद, कधीं त्वरित व कधीं समान असते. हा वृष्टि करणारा ग्रह आहे. नक्षत्रमंडलांतून भ्रमण करीत असतां वाटेंत अनावृष्टि करणारा ग्रह भेटल्यास त्यास हा प्रतिबंध करितो, म्हणून ह्यापासून लोकांचें सर्वदा कल्याणच होतें.

### बुधमंडल.

शुक्राच्या गतीप्रमाणेंच बुधाची गति आहे. बुध हा शुक्राच्या वर दोन लक्ष योजनें आहे. बुध हा चंद्राचा पुत्र होय. हा लोकांस शुभावह आहे. हा जेव्हां सूर्याच्या पुढें जातो, तेव्हां वारा, वादळ, अतिवृष्टि, अनावृष्टि वगैरे घडतील असें सुचवितो.

### भौममंडल.

बुधाच्या वर दोन लक्ष योजनें मंगळ आहे. हा वक्र गतीनें चालत नसल्यास तीन पक्षांत एकेक राशि भोगितो. हा ग्रह बहुधा दुःखसूचक व अनिष्ट करणारा आहे.

### गुरुमंडल.

मंगळाच्या ऊर्ध्वभागीं दोन लक्ष योजनांवर भगवान बृहस्पति आहे. हा वक्र गतीनें चालत नसल्यास एकेक राशि एका संवत्सरांत क्रमून जातो. हा ग्रह ब्राह्मणांस शुभप्रद आहे.

### शनैश्वरमंडल.

बृहस्पतीच्या वरतीं एक लक्ष योजनांवर शनैश्वर आहे. हा एकेका राशीस तीस महिने असतो; व तीस वर्षांत बारा राशी भोगितो. हा ग्रहही दुःखदायकच आहे.

### महर्षिमंडल.

राजा, ग्रहपरंपरेच्या वरतीं अकरा लक्ष योजनांवर महर्षिमंडल आहे. हे ऋषि भगवान विष्णूच्या पदाला प्रदक्षिणा करण्यांत निमग्न असून सर्व प्राणिमात्राचें नित्य अभीष्ट चिंतीत असतात.

## अध्याय तेविसावा.

—:०:—

### ध्रुवमंडल व भगवंताचें शिशुमारस्वरूप.

श्रीशुकाचार्य म्हणतात:–परीक्षित राजा, महर्षिमंडलाच्या वरतीं तेरा लक्ष योजनांवर श्रीविष्णूचें पद आहे. ह्या स्थळीं महाभगवद्भक्त ध्रुव हा अद्यापही राहतो. अग्नि, इंद्र, प्रजापति, कश्यप व धर्म हीं नक्षत्रें ध्रुवाच्या भोंवतीं प्रदक्षिणा करितात. भूर्लोकापासून महर्लोकापर्यंत असणारे लोक कल्पपर्यंत असतात व कल्पाच्या अंतीं त्यांचा समूळ नाश होतो, हें पूर्वी सांगितलेलें तुझ्या लक्षांत असेलच. ह्या कल्पपर्यंत टिकणाऱ्या लोकांचा ध्रुव हा मोठा आधार आहे. राजा, भगवंतानें उत्पन्न केलेलें कालचक्र इतकें विलक्षण आहे कीं, हें कधीं थांबत नाहीं; व नित्य चालत असतांही त्याचा वेग कोणाच्या प्रतीतीस येत नाहीं. ध्रुवाच्या भोंवतालीं परिभ्रमण करणारीं नक्षत्रें आपापल्या गतीनें नित्य चालत असतात. खळ्याच्या मेढीशीं बांधून ठेविलेले बैल जसे सकाळीं, दुपारीं व सायंकाळीं धान्य मळीत असतां एकसारखे वर्तुळाकार फिरत असतात, तसा हा ग्रहादि नक्षत्रसमूहही एकसारखा वर्तुळाकार फिरत असतो. पक्षी वायूच्या आधारावर आकाशांत निराधार फिरत राहतात, तद्वत् हीं नक्षत्रें ईश्वराच्या आधारावर निराधार फिरत राहतात व त्याच्या अनुग्रहामुळें कधींही पतन पावत नाहींत. त्यांचे मार्ग भिन्न भिन्न आहेत. विद्वान लोक, ज्योतिर्मंडळाचें वर्णन करितांना, तें भगवंताचें शिशुमारस्वरूप ( मकरस्वरूप ) आहे असें सांगतात. हा शिशुमारदेह खालीं डोकें व वर पुच्छ करून लांबच लांब पसरला आहे. ध्रुव हा मकराच्या पुच्छाच्या टोंकावर आहे. खालीं प्रजापति, अग्नि, इंद्र व धर्म हे आहेत. पुच्छाच्या मुळाशीं धाता आणि विधाता, व कमरेच्या जागीं सप्तर्षि आहेत. उजव्या बाजूला अभिजितापासून पुनर्वसूपर्यंत नक्षत्रें, व डाव्या बाजूला पुष्यापासून उत्तराषाढापर्यंत नक्षत्रें आहेत. ह्या शिशुमाराच्या पाठीवर रोहिणी,आर्द्रा व मृग असून उदरीं आकाशगंगा आहे; डाव्या कटीमध्यें पुनर्वसु असून उजव्या कटीमध्यें पुष्य नक्षत्र आहे. आर्द्रा उजव्या पायावर व आश्लेषा डाव्या पायावर आहेत;अभिजित् व उत्तराषाढा हीं अनुक्रमें उजव्या व डाव्या नाकपुड्यांच्या जागीं समजावीं; श्रवण उजव्या डोळ्याच्या ठिकाणीं व पूर्वाषाढा डाव्या डोळ्याच्या ठिकाणीं मानाव्या; धनिष्ठा उजव्या कर्णस्थळीं व मूळ डाव्या कर्णस्थळीं आहे; मघापासून आठ नक्षत्रें डाव्या बरगड्यांवर व मृगापासून आठ नक्षत्रें उजव्या बरगड्यांवर आहेत; शततारका व ज्येष्ठा हीं मकराच्या अनुक्रमें उजव्या व डाव्या स्कंधांच्या ठिकाणीं कल्पावीं; हनुवटीवर अगस्ति, अधरोष्ठावर यम, मुखांत मंगळ, उपस्थीं शनि, मानेच्या पोळीवर बृहस्पति, वक्षस्थळीं सूर्य, हृदयांत नारायण, मनावर चंद्र, नाभीवर शुक्र, स्तनांवर अश्विनीकुमार, प्राणापानस्थळीं बुध, कंठीं राहु, सर्वांगावर केतु व रोमांवर सकळ तारा मानाव्या. हे परीक्षित राजा, जो मनुष्य भगवंताच्या ह्या सर्वदेवतामय स्वरूपाचें त्रिकाल ध्यान करितो, त्याचीं सर्व पातकें तात्काळ नष्ट होतात.

## अध्याय चोविसावा.

—:०:—

### राहुमंडल.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—परीक्षित राजा, सूर्यमंडलाच्या खालीं दहा हजार योजनांवर राहु हा नक्षत्रासारखा फिरत असतो. वास्तविक हा दैत्य असल्यामुळें ह्या पदास अयोग्य आहे; परंतु भगवंताच्या कृपेनें अमरत्व मिळून त्यास ग्रहांत स्थान प्राप्त झालें आहे. ह्यानें कपटानें अमृतपान

करण्याचा प्रयत्न केलेला पाहून, सूर्य व चंद्र ह्यांनीं तो उघडकीस आणून दिल्यामुळें विष्णूनें ह्याचा शिरच्छेद केला; परंतु त्यास जो थोडाबहुत अमृताचा अंश प्राप्त झाला, त्यामुळें हा अमर झाला असून सूर्य व चंद्र ह्यांचा सूड घेण्याकरितां तो प्रत्येक अमावास्येस व पौर्णिमेस त्यांजवर चाल करून जात असतो. ही गोष्ट भगवान महाविष्णूच्या ध्यानीं येऊन त्यानें त्या उभयतांच्या संरक्षणाकरितां आपलें सुदर्शन चक्र अगदीं जय्यत तयार ठेविलें आहे. राहु आपल्याकडून सूर्य व चंद्र ह्यांस पीडा करण्याकरितां तयार होऊन ह्या चक्रापुढें नेटानें उभा राहतो; परंतु अखेरीस सुदर्शनाचें दुःसह तेज त्यास सहन न होऊन तो पळून जातो. राजा, राहु ह्या चक्रापुढें उभा राहिला, म्हणजे चंद्र-सूर्यांस ग्रहणें लागलीं असें लोक म्हणतात.

परीक्षिता, सूर्याच्या मंडळाचा विस्तार दहा सहस्र योजनें आहे; चंद्राच्या मंडलाचा विस्तार बारा सहस्र योजनें आहे; व राहूच्या मंडलाच्या विस्तार तेरा सहस्र योजनें आहे, हें लक्षांत असू दे. (ह्यावरून सूर्य व चंद्र ह्यांस पूर्णग्रास, अपूर्णग्रास वगैरे ग्रहणें कां लागतात, हें तुझ्या ध्यानांत येईल.)

### अंतरिक्ष आणि पृथ्वी.

राहूच्या खालीं दहा हजार योजनांवर सिद्ध, चारण व विद्याधर ह्यांचीं गृहें आहेत. त्यांच्या अधोभागीं यक्ष, राक्षस, पिशाच, प्रेत, भूतगण ह्यांच्या क्रीडा करण्याच्या जागा आहेत. ह्या जागांस अंतरिक्ष म्हणतात. अंतरिक्षाची मर्यादा मेघमंडलापर्यंत आहे. अंतरिक्षाच्या खालीं शंभर योजनांवर ही पृथ्वी आहे. ही पृथ्वीची म्हणजे भूर्लोकाची मर्यादा हंस, ससाणे, गरुड वगैरे पक्षी जितक्या अंतरावर लांब उडतात, तितकी होय.

### सप्तपातालें.

राजा, भूमीच्या खालीं एकाखालीं एक अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल व पाताल अशीं विवरें आहेत. हीं सर्व विवरें प्रतिस्वर्गच आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. तेथें नानाप्रकारचीं उपभोगस्थानें असून सर्व ऐश्वर्यें ओतप्रोत भरलेलीं आहेत. तेथें दैत्य, दानव व सर्प हे राहतात. तेथील स्त्रिया, मुलेंबाळें, आप्तस्नेही, सेवक वगैरे सदासर्वकाल आनंदी व धन्यावर अतिशय अनुरक्त असतात. हे सर्व कपटविद्येंत अतिशय निपुण आहेत. परीक्षिता, ह्या विवरांतील नगरें मयासुरानें बांधिलीं असून तेथील चित्रविचित्र मंदिरें, गोपुरें, सभागृहें इत्यादि रत्नखचित आहेत. मंदिरादिकांच्या सन्निध भागीं उपवनांमध्यें कृत्रिम भूमिकांच्या ठिकाणीं नाग, असुर, राघू, मैना व पारावत ह्यांच्या द्वंद्वांनीं अपूर्व शोभा दृग्गोचर होते. तीं उपवनें आपल्या सौंदर्यानें देवलोकींच्या सौंदर्याला लाजवून सोडितात. कारण, त्यांतील वृक्ष लतादिकांनीं आलिंगिलेले असून, फलपुष्पादिकांच्या भारानें अगदीं वाकलेले असतात; त्या उद्यानांतील सरोवरें म्हणजे विविध पक्षिगणांचीं क्रीडामंदिरेंच होत; त्यांतील मधुर उदकांत नक्रादि जलचर इतस्ततः स्वच्छंदानें संचार करीत असल्यामुळें उदक क्षुब्ध होऊन हालत असतें, व त्यामुळें तेथील कमलें, कुमुदें, कल्हारें आंदोलन करीत राहून त्या कमलादिकांवर वास्तव्य करणारे विहंगकलाप मधुर गायन करून श्रोतृवृंदास अत्यंत प्रोत्साहन देत असतात. तेथें रात्र, दिवस इत्यादि कालाचे विभाग मुळींच नसल्यामुळें, सुखोपभोगास कोणत्याही प्रकारचा व्यत्यय येत नाहीं. महान महान भुजंगांच्या मस्तकांतील माणि तेथील अंधकार नष्ट करितात. तेथें राहणारे प्राणी दिव्य ओषधि, रसायनें व अन्नें सेवन करितात; ह्यामुळें चिंता, व्याधि, जरा, ग्लानि वगैरे कधींही त्यांस प्राप्त होत नाहींत. भगवंताच्या सुदर्शन चक्राशिवाय तेथें दुसरी कशाचीही भीति म्हणून नाहीं. तें चक्र मात्र

त्या स्थलीं फार अनर्थ करितें. त्याच्या भयानें असुरस्त्रियांचे गर्भ विरतात किंवा पतन पावतात.

अतल.

परीक्षित राजा, अतल नांवाच्या विवरांत मयासुराचा पुत्र बळ नांवाचा दैत्य राहतो. बळानें त्या विवरांत शहाण्णव माया उत्पन्न केल्या आहेत. कपटी पुरुष अद्यापि त्या विद्या शिकतात. बळासुराच्या जांभईबरोबर स्वैरिणी, कामिनी व पुंश्चली नांवाच्या तीन प्रकारच्या व्यभिचारिणी स्त्रिया उत्पन्न झाल्या. कोणीही पुरुष ह्या विवरांत प्राप्त झाला असतां, ह्या स्त्रिया त्याला हाटक नांवाचा रस पाजून त्यास बेफाम करितात, व त्याच्याबरोबर रत होतात. राजा, हाटक रसाचें असें कांहीं अपूर्व सामर्थ्य आहे कीं, तो रस प्राशन करितांच पुरुष मदांध व उन्मत्त होतो आणि मी सिद्ध, मी ईश्वर, अशा वल्गना करूं लागतो !

वितल.

राजा, अतलाच्या खालीं वितल नांवाचें विवर आहे. ह्या विवरांत भगवान हाटकेश्वर शंकर, भवानीसह युग्मभावानें राहतो. येथें त्यांच्यासमवेत पार्षदसंज्ञक भूतगण असतात. ह्या दंपत्याच्या वीर्याची हाटकी नांवाची एक महानदी वहात आहे. अग्नि ती नदी पिऊन टाकतो, व फिरून खाकऱ्यासारखी थुंकतो. हें थुंकून टाकलेलें जें वीर्य, तें हाटक नांवाचें सुवर्ण होय. दैत्यांच्या स्त्रिया ह्या सुवर्णाचे अलंकार करितात.

सुतल.

परीक्षिता, वितलाच्या खालीं सुतल नांवाचें विवर आहे. ह्यांत विरोचनाचा पुत्र बलि अद्यापि राहतो. ह्या दानशूर बलीचें चरित्र फारच पुण्यकारक आहे. परमेश्वराच्या मनांत इंद्राचें पद कायम ठेवावयाचें येऊन त्यानें अदितीच्या उदरीं वामनाचा अवतार घेतला, व बलीपासून त्रैलोक्य हरण केलें. पुढें भगवंताच्या कृपेनेंच बलीचा ह्या विवरांत प्रवेश झाला. ह्या विवरांत बलि जें ऐश्वर्य भोगतो, तें ऐश्वर्य इंद्रादिक देवांना सुद्धां दुर्लभ आहे. बलीचें आराध्यदैवत वामनावतार हेंच आहे. बलीनें श्रीवामनास जें त्रैलोक्याचें दान दिलें, त्याच्या मोबदला सुतल विवर बलीस प्राप्त झालें, अशी कल्पना कित्येक लोक करितात; परंतु विचार केला असतां हें म्हणणें सयुक्तिक दिसत नाहीं. बलीनें जे कांहीं औदार्य प्रकट केलें, त्याचें फल बलीस मोक्ष मिळणें हेंच योग्य होतें. भगवंतानें बलीला विपुल भोग व ऐश्वर्य दिलें, हा त्याला मोठा लाभ झाला हें म्हणणें अप्रशस्त आहे; कारण, भोगैश्वर्यापासूनच प्राण्याला फिरून संसारांत पडावें लागतें. कोणतेंही ऐश्वर्य प्राण्यास आत्मज्ञानापासून पराङ्मुखच करीत असतें. राजा, ह्या शंकेचें निवारण करण्याकरितां स्वतः बलीनें त्या प्रसंगीं काय उद्गार काढिले, हें ध्यानांत आण. बलीला वरुणाच्या पाशांनीं घट्ट आंवळून पर्वताच्या गुहेंत टाकिलें, तेव्हां

बलीचे उद्गार

असे निघाले: "अरेरे ! इंद्र मोठा शहाणा आहे व त्याच्या आश्रयास बुद्धिवाद करणारा बृहस्पति हा आहे असें म्हणतात; परंतु मला तर वाटतें कीं, इंद्राला अक्कल मुळींच नाहीं. प्रत्यक्ष परमात्मा प्रसन्न झाला असतां इंद्रानें त्याच्या द्वारें मजपासून हें भिकार त्रैलोक्य हिरावून घेतलें, व भगवत्सेवा मागण्याची अमोलिक संधि दवडली, तेव्हां काय म्हणावें? इंद्रानें भगवंताला वांझ कामधेनु असें समजून नांगर ओढायाला लाविलें कीं हो ! ह्या अनंत कालाकडे दृष्टि दिली असतां, मन्वंतराची व इंद्राची ती काय मातबरी आहे! माझ्यासारखे जे कर्मासक्त पुरुष असतात, त्यांस भक्तिमार्गानें जाण्याची कशी बुद्धि होणार ! एक तर रागद्वेषादि विकारांचा त्यांच्यावर पगडा बसलेला असतो, आणि शिवाय भगवद्भक्तीच्या अभावामुळें

भगवत्कृपेचा अभाव असतो. अहो, खरा पुरुषार्थ करणारा माझा आजा प्रल्हाद हाच होय. अहाहा! काय त्याची महती सांगावी? पिता हिरण्यकशिपु मेल्यावर जेव्हां भगवान त्याला राज्य देऊं लागले, तेव्हां त्यानें तें साफ नको म्हणून सांगून भगवंताचें दास्य मागून घेतलें! तेव्हां त्या महासमर्थाच्या मार्गाला अनुसरण्याची मजसारख्या यःकश्चित् पुरुषाला कशी इच्छा होईल बरें? कारण, एक तर मजसारख्यांचे रागद्वेषादि मळ निर्मूल झालेले नसतात; व दुसरें—आम्हांला भगवत्प्रसादाचा लेशही प्राप्त होणें कठिण असतें." राजा, भगवद्भक्तांच्या संरक्षणाकरितां परमात्मा नित्य तत्पर असतो. पहा—एके वेळीं रावण दिग्विजयाला निघाला असतां बलीच्या द्वारांत शिरूं लागला; तेव्हां त्यापासून बलीला त्रास पोहोंचूं नये म्हणून बलीच्या द्वारीं त्याच्या संरक्षणार्थ गदा घेऊन स्थित असणाऱ्या परमेश्वरानें त्या रावणाला आपल्या पायानें लक्षावधि योजनांवर झोंकून दिलें!

### तलातल.

राजा, सुतलाच्या खालीं तलातलामध्यें त्रिपुराधिपति मय नांवाचा दानवेंद्र राहतो. भगवान शंकरानें ह्याचीं तीन पुरें जाळिलीं व शेवटीं त्याच्यावर कृपा करून त्यास हें स्थान दिलें. महादेवाचा ह्याच्यावर प्रसाद झाल्यामुळें त्यास सुदर्शनापासून पीडा होत नाहीं.

### महातल.

परीक्षिता, तलातलाच्या खालीं महातल आहे. त्यांत क्रोधवश नांवाचा सर्पसमुदाय राहतो. त्यांना अनेक फणा आहेत. ते कद्रूचे पुत्र होत. त्यांत कुहक, तक्षक, कालिय, सुषेण इत्यादि मुख्य आहेत. श्रीविष्णूचें वाहन जो पक्षिराज गरुड, त्यापासून ह्यांना फार भय वाटत असतें, व ह्यामुळें ते फार सावधगिरीनें वागत असतात. स्त्रिया, पुत्र, मित्र, परिवार इत्यादिकांशीं विहार व व्यवहार करितांना देखील ते सहसा अनवधान राहत नाहींत.



### रसातल.

राजा, महातलाच्या खालीं रसातलामध्यें दैत्य व दानव राहतात. त्यांचीं नांवें पाणि, निवातकवच, कालेय व हिरण्यपुरवासी हीं आहेत. हे जन्मापासून मोठे पराक्रमी व धाडसी असून देवांचे वैरी आहेत. राजा, सुदर्शन चक्रास हे फार भितात. सरमा नांवाच्या इंद्रदूतीनें ह्यांना 'इंद्रापासून मराल' असा शाप दिल्यामुळें ते सर्पाप्रमाणें ह्या विवरांत दडून राहतात.

### पाताल.

परीक्षिता, रसातलाच्या खालीं पातालामध्यें नागांचे अधिपति वासुकि वगैरे महान महान नाग राहतात. शंख, कुलिक, महाशंख, श्वेत, धनंजय, धृतराष्ट्र, शंखचूड, कंबल, अश्वतर व देवदत्त हे त्यांतील मुख्य होत. त्यांच्या फणा मोठाल्या असून त्यांपैकीं कोणास पांच, कोणास सात, कोणास दहा, कोणास शंभर, कोणास हजार अशीं मस्तकें असतात. त्यांवर तेजःपुंज मणि असल्यामुळें पातालांत अंधकार मुळींच नसतो.

## अध्याय पंचविसावा.

—:०:—

### शेषाची स्थिति.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा परीक्षिता, पातालाच्या खालीं तीस सहस्र योजनें अंतरावर भगवंताची अनंत नांवाची तामसी कला वास करिते. ह्या कलेस संकर्षण असें दुसरें नांव आहे. हें नांव प्राप्त होण्याचें कारण असें कीं, पाहणारा व पाहण्याचा विषय ह्या दोहोंचें 'संकर्षण करणारी मी' असा ह्या कलेच्या ठिकाणीं अभिमान असतो, असें सात्त्वतीय म्हणजे भगवद्भक्त पुरुष म्हणतात. ह्या अनंतरूपी शेषाला सहस्र मस्तकें आहेत. तो हें भूमंडळ आपल्या एका मस्तकावर मोहरीसारखें धारण करितो. त्याच्या मनांत जगाचा प्रलय करण्याची वासना उत्पन्न झाली,

म्हणजे तो आपली भ्रुकुटी वाकडी करितो, व तात्काळ त्या भ्रुकुटींतून एकादश रुद्रांपैकीं सांकर्षण नामें रुद्र त्रिशूल घेऊन बाहेर पडतो. राजा, ह्या संकर्षण नामक शेषाच्या विशाल पदारविंदांच्या नखांची कांति इतकी आरक्त व देदीप्यमान आहे कीं, तीं नखें म्हणजे महान महान रत्नांचे आदर्शच आहेत असें भासतें. मोठमोठाले सर्प इतर भक्तांसह त्या पदकमळीं लीन होतात, त्या वेळीं जी कांहीं अपूर्व शोभा दिसते, तिचें वर्णन काय करावें ? त्या उपासक सर्पांचीं मुखें तरी मूळचींच आतिशय मनोहर असतात, व शिवाय त्यांच्या कर्णांतील कुंडलांची प्रभा त्यांच्या कपोलप्रांतांवर झळाळत असते; ह्यास्तव त्या दिव्य कांतीचें प्रतिबिंब नागाधिराज शेषाच्या पादनखरूप आदर्शांत उमटलें म्हणजे ते अवनत झालेले सर्प आपल्याच मुखांची शोभा शेषाच्या पदकमळीं अवलोकन करीत त्यांतच दंग होऊन जातात ! राजा, नागकन्या विविध विलास भोगण्याकरितां शेषाच्या शरिरास व भुजांस चंदनादिकांच्या उट्या अर्पण करितात. उटी देतांना शेषाच्या शरिराचा स्पर्श झाल्याबरोबर मदनानें विव्हल होऊन, त्या स्त्रिया, मदानें धुंद झालेल्या व दयेनें ओतप्रोत भरलेल्या अशा त्या शेषाकडे सलज्ज मुद्रेनें पाहूं लागतात. परीक्षिता, तो सकलगुणांचा निधि भगवान आदिदेव अनंत सांप्रत लोकांचें कल्याण करण्याच्या इच्छेनें आपलें क्रोधरूप आवरून त्या स्थळीं राहत असतो. देव, दैत्य, सर्प, सिद्ध, गंधर्व, विद्याधर व मुनिगण हे शेषाच्या ध्यानांत नित्य निमग्न असतात. शेष हा आपल्या मधुर भाषणानें आपल्या परिचारकांस व देवांस संतुष्ट करितो. शेषाचें वस्त्र निळें असतें. त्याची मुद्रा आनंदमय असून नेत्र उग्र व चंचल दिसतात. तो एकच कुंडल धारण करितो, व नांगराच्या पृष्ठावर आपला सुंदर भुज ठेवून बसलेला असतो. ज्याप्रमाणें ऐरावताच्या गळ्यांत सुवर्णपदकांची माला असते, त्याप्रमाणें त्या लोकनायकाच्या गळ्यांत वैजयंती नामक कधींही म्लान न होणारी पुष्पमाला आहे. त्या मालेंतील तुळसीदलांच्या सुगंधानें व पुष्पांच्या मकरंदानें धुंद झालेले भ्रमर त्या ठिकाणीं बसून एकसारखे मंजुळ रव करीत असतात. राजा, जो कोणी शेषाची भक्ति करितो, त्याचा सत्त्व, रज व तम गुणांच्या योगानें उत्पन्न झालेला अभिमानग्रंथि तात्काळ तुटून जातो. ब्रह्मपुत्र नारदानें ब्रह्मसभेंत

**शेषाचें वर्णन**

केलें, तें असें: "जगाची उत्पत्ति, स्थिति व नाश उत्पन्न होण्याचें कारण सत्त्वादि गुण होत. त्या गुणांवर शेषाची दृष्टि गेल्याशिवाय ते आपापलीं कार्यें करण्यास समर्थ होत नाहींत. त्या महासमर्थ शेषाला आदि व अंत हे नाहींत. त्याच्या स्वरूपीं हें स्थूल व सूक्ष्म विश्व दिसून येतें. आम्हांसारख्या भक्तांवर अनुग्रह करण्यासाठीं तो शुद्धसत्त्वमय शरीर धारण करून राहिला आहे. त्याचें चरित्र मोठें अगाध आहे. त्यानें आपल्या भक्तांचीं मनें हरण करण्याकरितां जीं लोकोत्तर कृत्यें केलीं, त्यांवरून सिंहानें शौर्याचें शिक्षण संपादिलें. राजा, त्या दीनवत्सल प्रभूचा प्रभाव इतका आहे कीं, पतिताचीं सुद्धां सर्व पातकें त्याचें एकवार नामोच्चरण केलें असतां तात्काळ नष्ट होतात. त्याला सहस्र मस्तकें असून पर्वत, नद्या, समुद्र इत्यादिकांसुद्धां हा भूगोल त्याच्या मस्तकावर धुळीच्या कणाप्रमाणें असलेला दिसून येतो. राजा, त्या विश्वाधिपतीच्या अनंत गुणांचें वर्णन करणें अशक्य आहे. एखाद्याला सहस्र जिव्हा असल्या तरीही त्याच्यानें त्या महासमर्थाचे गुण साकल्येकरून वर्णिले जाणार नाहींत. भगवान शेष हा पृथ्वीच्या मुळाशीं असून, त्याला स्वतांचाच आधार आहे; आणि त्यानें धारण केल्यामुळें ही पृथ्वी सुस्थिर राहिली आहे."

परीक्षित राजा, प्रवृत्तिमार्गानें चालणाऱ्या

मनुष्याच्या हातून जीं कांहीं बरीं वाईट कर्मे होतात, त्यांस अनुसरून तो फलें भोगितो, हें माझ्या सर्व सांगण्याचें तात्पर्य ध्यानांत ठेव. आतां तुला दुसरें काय सांगूं तें सांग.

## अध्याय सव्विसावा.

—:०:—

### नरकांचें वर्णन.

परीक्षित राजा श्रीशुकाचार्यांस म्हणाला:— मुनिमहाराज, मनुष्यें कर्म करीत असतां त्यांस भिन्न फलें प्राप्त होतात तीं कां?

श्रीशुकाचार्य म्हणतात:—परीक्षित राजा, मनुष्यें जरी समान कर्मे करितात, तरी त्यांची श्रद्धा भिन्न भिन्न असल्यामुळें त्यांस फलें भिन्न भिन्न प्राप्त होतात. सात्त्विक श्रद्धेनें कर्म करणाराला सुख प्राप्त होतें, राजस श्रद्धेनें कर्म करणाराला सुख व दुःख प्राप्त होतें, व तामस श्रद्धेनें कर्मे करणाराला दुःख मात्र प्राप्त होतें. श्रुति व स्मृति ह्यांनीं वर्ज्य म्हणून सांगितलेलीं कर्मे हीं पातकें होत. पातकें करणारास हजारों नरक भोगावे लागतात.

### पातक्यांचें शासन व नरकांतील हालअपेष्टा.

परीक्षित राजा म्हणाला:—हे त्रिकालज्ञ मुने, नरक हे ह्या पृथ्वीवरच विशेष प्रदेश आहेत, किंवा ते ह्या पृथ्वीच्या बाहेर अंतराळांत आहेत, अथवा ते ह्या त्रैलोक्याच्याही बाहेर आहेत?

श्रीशुकाचार्य म्हणतात:—परीक्षित राजा, त्रैलोक्यामध्येंच दक्षिण दिशेकडे पाताळाच्या खालीं व उदकाच्या वर नरकस्थानें आहेत. दक्षिणेसच अग्निष्वात्तादिक पितृगण आपल्या गोत्रांतील प्राण्यांना विषयोपभोग मिळावे म्हणून चिंतन करीत भगवद्भजनीं निमग्न असतात. तसेंच पितृपति भगवान यमधर्म आपल्या सेवकांसह राहतो. तो मृत प्राण्यांच्या कर्मानुसार शिक्षा करितो. तेथें (१) तामिस्र, (२) अंधतामिस्र, (३) रौरव, (४) महारौरव, (५) कुंभीपाक, (६) कालसूत्र, (७) असिपत्रवन, (८) सूकरमुख, (९) अंधकूप, (१०) कृमिभोजन, (११) संदंश, (१२) तप्तसूर्मि, (१३) वज्रकंटकशाल्मलि, (१४) वैतरणी, (१५) पूयोद, (१६) प्राणरोध, (१७) विशसन, (१८) लालाभक्ष, (१९) सारमेयादन, (२०) अवीचि व (२१) अयःपान हे एकवीस नरक मुख्य असून, शिवाय (१) क्षारकर्दम, (२) रक्षोगणभोजन, (३) शूलप्रोत, (४) दंदशूक, (५) अवटनिरोधन, (६) पर्यावर्तन, व (७) सूचिमुख हे सात, असे एकंदर अठ्ठावीस नरक आहेत; त्यांतील दुःखें अनुक्रमें तुला सांगतों.

(१) तामिस्र—जो प्राणी परधन, परस्त्री व परापत्य हरण करितो, त्याला यमदूत ह्या तामिस्र नरकांत लोटून देतात. तेथें त्याला खायाला व प्यायाला कांहींएक मिळत नसून पाठीवर एकसारखे बडगे चालू असतात; व अशा अनेक यातनांच्या योगानें तो मूर्छित होऊन अचेतनासारखा तेथें पडून राहतो.

(२) अंधतामिस्र—जो प्राणी दुसऱ्याला फसवून त्याच्या धनाचा किंवा स्त्रीचा अपहार करितो, तो ह्या अंधतामिस्र नरकांत पडतो. तेथें त्याची बुद्धि नष्ट होते, डोळे जातात, व त्यास अनंत यातना होतात.

(३) रौरव—जो प्राणी देहाच्या अहंकारानें व पुत्रकलत्रांच्या अभिमानानें इतरांस दुःख देतो, व न्यायान्याय न पाहतां प्रपंच चालवितो, त्यास ह्या रौरव नरकांत लोळावें लागतें. ते इतर प्राणी त्याला ह्या ठिकाणीं रुरु नांवाचे भयंकर कृमि होऊन गांजून सोडतात.

(४) महारौरव—जो प्राणी दुसऱ्याचा द्रोह करून आपला चरितार्थ चालवितो, त्यास ह्या महारौरव नरक प्राप्त होतो. येथें क्रव्याद प्राणी त्याच्या मांसाचे लचके तोडतात व त्यामुळें त्यास अत्यंत वेदना होतात.

(५) कुंभीपाक—हा कुंभीपाक नरक फारच भयंकर आहे. जे लोक पशुपक्ष्यांना जिवंत शिजवितात, त्यांस येथें तेलांत घालून तळण्यांत येतें!

(६) कालसूत्र—जे लोक पित्याचा, ब्राह्मणांचा व वेदांचा द्वेष करितात, त्यांस हा कालसूत्र नामक नरक प्राप्त होतो. हा नरक म्हणजे दहा सहस्र योजनें लांब रुंद असें तापवून लाल केलेल्या तांब्याच्या पत्र्याचें मैदान आहे. खालून अग्नि व वरून सूर्य हे ह्या मैदानाला तापवीत असतात. ह्या नरकांत पडलेल्या प्राण्यास क्षुधा, तृषा आणि अग्नीचा भडका ह्यांच्या महाभयंकर यातना भोगाव्या लागतात. पशूच्या अंगावर जितके केंस असतात, तितकीं वर्षें प्राण्यास ह्या नरकांत काढावीं लागतात.

(७) असिपत्रवन—स्वधर्म सोडून पाखंड स्वीकारणाराला हा असिपत्रवन नरक प्राप्त होतो. येथें ताडाचें भयंकर रान आहे. त्यांचीं पानें तरवारीच्या धारेसारखीं आहेत. त्यांनीं प्राण्याचें शरीर कापतें व त्यास फार वेदना होऊन मूर्छा येते!

(८) सूकरमुख—राजा किंवा राजपुरुष अन्यायानें कोणास दंड करील, तर त्यास ह्या सूकरमुख नरकांतील दुःसह यातना भोगाव्या लागतात. येथें त्याचे अवयव उंसाच्या कांड्यांप्रमाणें पिळण्यांत येतात; त्या वेळीं तो मोठा आक्रोश करून अगदीं दीन होऊन जातो.

(९) अंधकूप—पशु, मृग, सर्प, माशा, पिसा, ढेंकूण इत्यादि अज्ञान प्राण्यांना जे मारतात, त्या लोकांना ह्या अंधकूप नरकांत पडावें लागतें. ते प्राणी ह्या नरकांत चोहोंकडून त्यांचा छळ करितात; व ह्या नरकांत पडलेल्या लोकांची स्थिति दुखणेकऱ्याप्रमाणें होऊन जाते.

(१०) कृमिभोजन—पंचमहायज्ञ केल्याशिवाय जे लोक आपल्या द्रव्याचा एकटेच उपभोग घेतात, त्यांस ह्या कृमिभोजन नामक नरकांत कृमि व्हावें लागून कृमींवर निर्वाह करावा लागतो.

(११) संदंश—आपत्काल नसतां जो मनुष्य ब्राह्मणाचें किंवा दुसऱ्याचें धन वगैरे चोरतो, त्यास ह्या संदंश नरकांतील तीव्र यातना भोगाव्या लागतात. येथें यमदूत अतिशय तापवून लाल केलेल्या सांडसांनीं प्राण्यास भाजतात व त्याच्या अंगाचे तुकडे काढितात.

(१२) तप्तसूर्मि—व्यभिचार करणाऱ्या स्त्रीपुरुषांस हा तप्तसूर्मि नरक प्राप्त होतो. येथें तापवून लाल केलेल्या पुतळ्यांशीं प्राण्यास बांधून चाबकाचे फटके देतात.

(१३) वज्रकंटकशाल्मलि—पश्वादिकांशीं गमन करणाऱ्या पुरुषास ह्या वज्रकंटकशाल्मलि नरकांत पडावें लागतें. येथें वज्रासारख्या कांट्यांच्या सांवरीवर चढवून फरफर ओढितात.

(१४) वैतरणी—हा नरक म्हणजे विष्ठा, पू, मूत्र, रक्त, केंस, हाडें, चरबी, मांस व वसा ह्यांची नदी आहे. जे राजे किंवा राजाश्रित पुरुष धर्ममार्गाचा उच्छेद करतात, त्यांस ह्या वैतरणी नदींत पडावें लागतें. येथें त्यांस जलजंतु जागोजाग तोडून खातात. मग त्यांस स्वतांच्या कर्मांचें स्मरण होऊन पश्चात्ताप होतो.

(१५) पूयोद—जे लोक भ्रष्टपणानें वागून शूद्रस्त्रियांशीं गमन करितात, त्यांस मेल्यावर पू, विष्ठा, मूत्र, कफ, मल ह्यांनीं भरलेल्या ह्या पूयोद नरकांत राहून ते घाणेरे पदार्थ खावे लागतात.

(१६) प्राणरोध—ब्राह्मणादिकांना कुत्रीं, गाढवें इत्यादि पाळणें, मृगया करणें व विहित कर्मांवांचून हिंसा करणें वर्ज्य आहे. जे ब्राह्मण हीं वर्ज्य कर्में करितात, त्यांस हा प्राणरोध नामक नरक प्राप्त होतो, व मग यमदूत त्यांची भयंकर हिंसा करितात.

(१७) विशसन—जे ढोंगी लोक यज्ञांचें मिष करून मांसभक्षण करण्याकरितां यज्ञयागादि करितात, त्यांस हा विशसन नरक प्राप्त होतो. येथें यमदूत त्यांस चरचरां कापितात.

(१८) लालाभक्ष—जो ब्राह्मण कामांध होऊन

समान वर्णाच्या अन्य स्त्रीला बलात्कारानें भोगितो, त्याला ह्या लालाभक्ष नरकांत पडून रेतप्राशन करावें लागतें.

( १९ ) सारमेयादन—जे राजे किंवा राजाधिकारी पुरुष चोरी करितात, आग लावितात, विष घालितात किंवा लोकांस लुटितात, त्यांना ह्या स्थळीं यमदूत कुत्र्यांकडून खाववितात. ह्या सारमेयादन नरकांत यमधर्मानें सातशें वीस कुत्रे ह्या कामासाठीं पाळिले आहेत.

( २० ) अवीचि—व्यवहारांत किंवा व्यापारांत खोटें बोलणारास हा नरक प्राप्त होतो. ह्या अवीचि नामक नरकांत केवळ पाषाणाची भूमि आहे. तेथें प्राणी पडला कीं त्याचे तिळाएवढे तुकडे होतात; पण तो मरत नाहीं. त्यास फार उंच अशा पर्वतावर चढवून पुनःपुनः त्या भूमीवर लोटतात व अशा प्रकारें त्याचे फार हाल करितात.

( २१ ) अयःपान—ब्राह्मणानें किंवा ब्राह्मणाच्या स्त्रीनें मद्यपान केलें असतां, अथवा क्षत्रियानें, वैश्यानें किंवा इतर कोणीं व्रत स्वीकारून सोमपान केलें असतां, त्यांना ह्या अयःपान नामक नरकांत नेऊन त्यांच्या तोंडांत लोखंडाचा सळसळीत रस ओतितात.

( २२ ) क्षारकर्दम—जो मनुष्य नीच असतां मोठेपणाचा गर्व वाहतो, व विद्वान, तापसी व सच्छील व श्रेष्ठ अशा पुरुषाचा अपमान करितो, त्याला ह्या क्षारकर्दम नरकांत दुर्धर यातना भोगाव्या लागतात.

( २३ ) रक्षोगणभोजन—जे पुरुष नरमेध करितात, व ज्या स्त्रिया नरमांस खातात, त्या पुरुषांना व स्त्रियांना, त्यांनीं मारिलेले पुरुष ह्या रक्षोगणभोजन नांवाच्या नरकांत राक्षसांप्रमाणें कुऱ्हाडीनें तोडतात व त्यांचें रक्त पितात.

( २४ ) शूलप्रोत—जे लोक वनांत किंवा अन्य ठिकाणीं प्राण्यांना विश्वास दाखवून फसावितात, छळतात किंवा मारितात, त्यांस हा शूलप्रोत नरक प्राप्त होतो. येथें त्यांस यमदूत सुळावर चढवून नानाप्रकारच्या शिक्षा देतात.

( २५ ) दंदशूक—ह्या लोकामध्यें जे पुरुष प्राण्यांना विनाकारण छळितात, त्यांस हा नरक प्राप्त होतो. ह्या नरकांत प्राण्यांना पांच पांच व सात सात फडांच्या भयंकर सर्पांकडून दंश करवितात.

( २६ ) अवटनिरोधन—जे लोक प्राण्यांना अंधारी विहीर, खाडा, गुहा इत्यादि ठिकाणीं कोंडून ठेवितात, त्यांना यमदूत ह्या अवटनिरोधन नरकांत लोटून देऊन, विषारी आगीनें व धुरानें गुदमरून मारितात.

( २७ ) पर्यावर्तन—जे लोक आपल्या घरीं आलेल्या अतिथींवर कातावून क्रूरपणानें त्यांच्याकडे पाहतात, त्यांस ह्या पर्यावर्तन नरकाची शिक्षा मिळते. ह्या नरकांत गिधाडें, कंक, कावळे, वट इत्यादि पक्षी त्या पुरुषांचे डोळे फोडून बाहेर काढितात.

(२८) सूचिमुख—जे लोक कृपणपणानें वागतात, त्यांस हा नरक प्राप्त होतो. कित्येक लोकांस 'आम्ही श्रीमंत' असा अभिमान होऊन ते आईबाप, गुरु इत्यादिकांविषयीं सुद्धां पूज्यबुद्धि ठेवीत नाहींत; द्रव्य खर्चेल ही नेहमीं त्यांना विवंचना असते; पिशाचांप्रमाणें ते द्रव्याचें रक्षण मात्र ते करितात; व द्रव्यप्राप्तीकरितां अनन्वित पातकें करण्यांत निमग्न होतात. असे सर्व लोक ह्याच सूचिमुख नरकांत पडतात; येथें त्यांस नानाप्रकारच्या भयंकर यातना भोगाव्या लागतात.

परीक्षित राजा, ह्याप्रमाणें शेंकडों नरक यमपुरींत आहेत. त्यांतले ठळक ठळक मीं तुला सांगितले; असो.

पुराणग्रंथामध्यें चौदा भुवनें म्हणून सांगितलीं आहेत, तीं हीं एवढींच होत. हें सर्व भगवंताचें स्थूल रूप आहे. ह्या स्थूल रूपाचें यथार्थ ज्ञान झालें असतां सूक्ष्म रूप कळण्यास विलंब लागत नाहीं.

# श्रीमद्भागवत.

## षष्ठस्कंध.

### अध्याय पहिला.

—:०:—

#### परीक्षिताची पृच्छा.

परीक्षित राजा म्हणाला:–मुनिश्रेष्ठा, ज्या मार्गानें गेलें असतां योग्याला क्रमाक्रमानें ब्रह्मपदाची प्राप्ति होऊन अंतीं मोक्ष मिळतो, तो निवृत्तिमार्ग तुम्हीं मला सांगितला; व ज्या मार्गानें गेलें असतां पुरुषाला त्रिगुणयुक्त स्वर्गादि लोक प्राप्त होतात, तो प्रवृत्तिमार्गही तुम्हीं मला सांगितला. ज्याचें अज्ञान नष्ट झालें नाहीं, तोच पुरुष प्रवृत्तिमार्ग स्वीकारितो व प्रवृत्तिमार्गांत पडलेल्या पुरुषाला कर्मफलाच्या भोगासाठीं वारंवार जन्म घ्यावे लागतात, हेंही मला कळलें. त्याचप्रमाणें, स्वायंभुवादिक मन्वंतरांचें वर्णन, प्रियव्रत व उत्तानपाद ह्यांचे वंश, भूमंडलाची रचना, त्याच्या भागांचें स्वरूप, लांबीरुंदी, त्यांतील द्वीपें, खंडें, पर्वत, समुद्र, नद्या, उद्यानें व वनस्पति आणि खगोल, पाताळविवरें इत्यादिकांचेंही मला आतां यथास्थित ज्ञान झालें; पण, महाराज, ह्या प्रवृत्तिमार्गांत मनुष्य असतांना त्याच्या हातून अधर्म घडत असल्यामुळें, त्याला भयंकर नरकयातना सोसाव्या लागतात, असें आपण सांगितलें. तेव्हां कोणत्या रीतीनें वागलें असतां मनुष्याला त्या नरकयातना भोगाव्या लागणार नाहींत, हें आपण मला निवेदन करावें.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, मनुष्याकडून काया, वाचा व मन ह्यांच्या द्वारें जें पाप झालें असेल, त्याबद्दलचें प्रायश्चित्त जर त्यानें ह्याच लोकीं केलें नाहीं, तर त्याला मरणोत्तर भयंकर नरकांत जावें लागणार हें खास समजावें! बाबा, नरकांतील भयंकर यातना कशा असतात, हें मीं पूर्वीं तुला सांगितलेंच आहे; म्हणून मनुष्यानें, शरीर व्याधिग्रस्त होऊन शक्ति क्षीण झाली नाहीं तर ह्या लोकींच पापकर्मांचा नाश लवकर होईल असा प्रयत्न करावा.

परीक्षित राजा म्हणाला:–मुनिवर्य, पापकर्मांचें फल वाईट आहे, हें मनुष्याला अनेक कारणांनीं कळतें. पाप केलें तर राजाकडून शिक्षा मिळते, हा अनुभव प्रत्यक्षच आहे; व पापकर्मामुळें नरकांत पडावें लागतें, असें धर्मशास्त्रही स्पष्ट सांगत आहे. असें असतां कित्येक मनुष्यें प्रायश्चित्त केल्यावरही फिरून उन्मत्त होऊन पापाचरण करूं लागतात, असें आढळतें; तेव्हां प्रायश्चित्ताचा काय उपयोग?

#### नरकयातना चुकविण्यास उपाय–ईशभक्ति.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, प्रायश्चित्त केल्यानें पापाचा समूळ नाश होतो असें नाहीं. कारण, प्रायश्चित्त करणारे कर्ममार्गांत आसक्त असल्यामुळें त्यांचें अज्ञान नष्ट झालेलें नसतें. ह्यास्तव, खरें प्रायश्चित्त म्हटलें म्हणजे पापकर्माचें ज्ञान होणें हेंच होय. म्हणून मनुष्यानें

आपापल्या धर्माप्रमाणें वागावें हें अत्यंत इष्ट आहे. धर्मशील मनुष्याला हळू हळू ज्ञानाधिकार प्राप्त होतो. पथ्यकारक अन्न सेवन केल्यानें जसा मनुष्याला रोग होत नाहीं, तसा, धर्मनियमानें वागणाऱ्या मनुष्याच्या हातून अधर्म घडत नाहीं. ह्याकरितां मनुष्यानें मन आणि इंद्रियें ताब्यांत ठेऊन ब्रह्मचर्यव्रताचें आचरण करावें. चित्त शुद्ध ठेवावें; असत्य बोलूं नये; यमनियमादि नियम पाळावे; दान करावें; हिंसा करूं नये; शुद्धता ठेवावी; आणि जपतपादिकांचें अनुष्ठान करावें. राजा, अशा रीतीनें वागणारा पुरुष, ज्याप्रमाणें अग्नि कळकांच्या प्रचंड बेटाचा नाश करितो, त्याप्रमाणें, शरिरानें, शब्दानें व मनानें घडलेल्या पापांचा नाश करितो. राजा, परमेश्वराची अंतःकरणपूर्वक भक्ति करून सर्व कर्मे त्यालाच अर्पण करणारा भगवद्भक्त ईश्वरसेवेनेंच आपल्या सर्व कर्मांचा नाश करितो. हें आचरण व हा कर्मनाश तपश्चर्येच्या योगानेंही होऊं शकत नाहीं. राजा, भक्तिमार्ग हा सर्वांत श्रेष्ठ होय. ह्यांत कोणत्याही प्रकारचें भय नाहीं. नारायणाचे एकनिष्ठ भक्त व दयाळू सत्पुरुष ह्या कल्याणकारक मार्गाचाच अंगीकार करितात. राजा, ईश्वराकडे ज्यानें आपलें चित्त लाविलें नाहीं, ज्यानें कितीही प्रायश्चित्तें घेतलीं, तरी तीं व्यर्थ होत. ज्याप्रमाणें मद्याच्या भांड्याला शुद्ध करण्यास हजारों नद्या समर्थ होत नाहींत, त्याप्रमाणें प्रायश्चित्तें हीं पातक्याच्या कर्मांचा नाश करण्यास समर्थ होत नाहींत. ज्याचें मन कृष्णचरणारविंदीं मिलिंदायमान झालें आहे, त्याला स्वप्नामध्येंही काळाचें भय नाहीं. ह्याबद्दल एक जुना इतिहास आहे, तो मी तुला सांगतों. ह्यांत विष्णुदूतांचा व यमदूतांचा संवाद आहे.

## अजामिलाची कथा.

परीक्षित राजा, कान्यकुब्ज देशांत परस्त्रीरत व अत्यंत दुराचरणी असा एक अजामिल नांवाचा ब्राह्मण रहात होता. तो चोरी, लबाडी, जुलूम, जुगार वगैरे निंद्य कृत्यांनीं आपला व आपल्या दुराचरणी प्रियतमेच्या कुटुंबाचा निर्वाह करीत असे. अशा प्रकारच्या आचरणांत त्याच्या वयाचीं ऐशीं वर्षें गेलीं. त्याला त्या दासीपासून दहा मुलगे झाले. त्यांत धाकट्या नारायण नांवाच्या पुत्रावर त्याचें अत्यंत प्रेम असे. नारायणावांचून त्याला एक क्षणही चैन पडत नसे. जागेपणीं व स्वप्नांतही एकसारखा त्याला तो नारायण दिसे, असा त्याला सदोदीत नारायणाचाच ध्यास लागलेला होता. ह्या त्याच्या प्रेमातिशयांत, आपला मृत्यु जवळ आला आहे ह्याचेंही त्याला भान राहिलें नाहीं. एके समयीं त्याला कांहीं आजार होऊन तो मरावयास टेंकला, तरी त्याचें मन त्या पुत्रावर होतेंच. त्याची शुद्धि नाहींशी झाली, तरी तो 'नारायणा, अरे नारायणा,' असा एकसारखा टाहो फोडीत होताच. शेवटीं त्याला असें दिसूं लागलें कीं, आपल्याला नेण्याकरितां कोणी भयंकर काळपुरुष हातांत पाश घेऊन आले आहेत. त्यांना पाहून त्याचे प्राण भयानें व्याकूळ होऊं लागले; तरी तो 'नारायणा, नारायणा,' अशा हांका मारीतच होता. परीक्षित राजा, तो मरणोन्मुख पुरुष नारायणाचें भजन करीत आहे असें पाहून नारायणाचे म्हणजे विष्णूचे दूत एकदम तेथें आले; आणि त्या अजामिलाचे प्राण ओढून काढणाऱ्या यमदूतांस त्यांनीं प्रतिबंध केला.

## यमदूतांचा व विष्णुदूतांचा संवाद.

श्रीशुकाचार्य सांगतातः—परीक्षित राजा, तेव्हां यमदूत विष्णुदूतांना म्हणाले, "अहो, यमधर्माच्या आज्ञेला प्रतिबंध करणारे असे तुम्ही कोण? तुमचीं रूपें सुंदर असून तुम्ही चतुर्भुज आहां, व विष्णुप्रमाणें शंख, चक्र, गदा, पद्म हीं आयुधें तुम्ही धारण केलीं आहेत. तुमच्या कांतीनें सर्व दिशा उज्ज्वल झाल्या आहेत, तेव्हां तुम्ही देव आहां, किंवा उपदेव आहां, अथवा सिद्धांतील श्रेष्ठ आहां? तसेंच,

धर्ममर्यादांचें पालन करणारा जो यम, त्याचे आम्ही सेवक, आपलें योग्य काम बजावीत असतां तुम्ही आम्हांस प्रतिबंध करितां, तो कां बरें ? "

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, यमदूतांचें तें भाषण ऐकून विष्णुदूत मोठ्यानें हसले, आणि गंभीर वाणीनें त्यांना म्हणाले, " अहो, तुम्ही धर्मराजाचे दूत आहां, तर आम्हांला धर्माचें तत्त्व आणि त्याचें लक्षण सांगा पाहूं. शिक्षेस पात्र कोण ? कोणतीं कर्में करणारांस दंड करावयाचा ? प्रत्येक प्राण्याला शिक्षा केलीच पाहिजे कीं काय ? अथवा कांहींजणांना मात्र शिक्षा करावयाची ? ह्याविषयीं तुमचे जे काय नियम असतील ते सांगा. "

### वेदप्रणीत धर्मनिरूपण.

यमदूत म्हणाले:—अहो, वेदप्रतिपादित जो आचार, तो धर्म; व तद्विरुद्ध जें आचरण, तो अधर्म. वेद हे साक्षात् नारायणस्वरूप होय. वेद हे स्वयंभू आहेत. ज्यानें आपल्या स्वरूपीं सत्त्व, रज आणि तम ह्या गुणांवरून दृश्य प्राण्यांची गुणकर्मविभागशः रचना केली, तो नारायणच होय. सूर्य, चंद्र, अग्नि, आकाश, भूमि, हृदय, यम, दिवस, रात्र, संध्य काळ आणि धर्म हे सर्व जीवांच्या पापपुण्यांचे साक्षी आहेत. ह्यांच्यामुळें अधर्माचें ज्ञान होतें. असे अधर्म करणारे जे प्राणी असतील, त्यांना त्यांच्या कर्माप्रमाणें शिक्षा होणें योग्य आहे. आतां, कर्मच न केलें तर पाप होणार नाहीं हें खरें; पण त्रिगुणांपासून प्राण्यांची उत्पत्ति आहे, म्हणून त्या गुणांप्रमाणें त्यांच्या हातून कर्में हीं व्हावयाचींच. ह्या लोकीं जसा धर्म किंवा अधर्म आचरिला असेल, तदनुरूप फल परलोकीं भोगावें लागतें. ह्या भूलोकीं गुणवैचित्र्यामुळें जसे तीन प्रकारच्या स्वभावांचे प्राणी आढळतात, तसे जन्मांतरींही ते असले पाहिजेत, हें उघड आहे. ज्याप्रमाणें एक ऋतु पाहिला म्हणजे पुढें येणाऱ्या व मागें गेलेल्या त्या ऋतूंच्या गुणधर्मांचें अनुमान होतें, त्याप्रमाणें एका जन्मावरून पुढील व मागील जन्मांचें ज्ञान होतें. जन्मरहित परमेश्वर जीवाच्या हृदयमंदिरांत राहून व त्याचें पूर्वकर्म लक्षांत आणून त्याला पुढें कोणतें जन्म द्यावयाचें ह्याचा विचार करून ठेवितो. हें अज्ञानी प्राण्याला कळत नाहीं. त्याला प्रस्तुतचा देहच ' मी ' असें वाटतें, व त्या देहाभिमानाच्या योगानें त्याला पूर्वीच्या किंवा पुढच्या जन्मांचें ज्ञान मुळींच होत नाहीं. प्राणी हस्तपादादि पंचकर्मेंद्रियांच्या योगानें कर्म करितो; पंचज्ञानेंद्रियांच्या योगानें शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध ह्या पांच विषयांस जाणतो; आणि वस्तुतः आपण अगदीं निराळा असतांना सोळा उपाधींच्या आंत राहून ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें व मन ह्यांच्या योगें विषयांचा उपभोग घेतो. तें हें षोडशकलांनीं युक्त असें अनादि लिंगशरीर, पुरुषाला शोक, भय व पीडा देणाऱ्या संसाराची प्राप्ति करून देतें. अज्ञानी प्राणी पांच ज्ञानेंद्रियांना व मनाला जिंकीत नाहीं, म्हणून त्याची इच्छा नसली तरी त्याजकडून कर्में होतच असतात; व तीं कर्में झालीं म्हणजे, कोळी जसा आपण केलेल्या जाळ्यानेंच आपण बद्ध होतो, तसा प्राणी आपल्या कर्मानेंच बद्ध होतो; आणि त्याची वासना अवशिष्ट राहिल्यामुळें त्याला पुनः जन्म घ्यावा लागतो. असें हें जन्ममृत्यूचें रहाटगाडगें सतत चालत राहतें, आणि प्राण्यास संसार प्राप्त होऊन त्याच्या पूर्वकर्माप्रमाणें मिळणाऱ्या सुखदुःखांचा तो उपभोग घेत राहतो. हा संसार सुटण्यास ईश्वराचें भजन हाच एक उत्तम उपाय आहे. अहो देवश्रेष्ठ, हा अजामिळ मूळचा शास्त्रसंपन्न असून सदाचरणी होता. ह्याच्या अंगीं दया, क्षमा, शांति, सत्य भाषण हे गुण असून हा इंद्रियनिग्रही होता. हा अतीत, अभ्यागत, वृद्धजन, अग्नि आणि गुरु ह्यांची सेवा करीत असे; आणि कोणाचेही दोष न काढितां सर्वांशीं मित्रत्वानें

वागे. एके दिवशीं हा पित्याच्या आज्ञेवरून समिधा दर्भ, फुलें वगैरे आणण्याकरितां वनांत गेला व तीं घेऊन परत फिरला, तों तेथें कामवासनेनें अंध झालेला एक शूद्र मद्यानें धुंद झालेल्या एका स्त्रीबरोबर विहार करीत असतांना ह्याच्या दृष्टीस पडला. त्या स्त्रीकडे पाहून हा ब्राह्मण काममोहित झाला. यानें आपल्या चंचल झालेल्या मनाचें आकलन करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु तो सर्व व्यर्थ झाला. पुढें त्या स्त्रीमुळें उद्भवलेल्या मदनरूप पिशाचानें ह्याला पूर्ण प्राशिलें, व शेवटीं मनानें त्या स्त्रीचेंच चिंतन करीत हा धर्ममार्ग सोडून वागूं लागला. नंतर त्यानें आपल्या सुशील पत्नीचा त्याग करून त्या दासीचें दास्य स्वीकारिलें, आणि तिच्या संतोषाकरितां पित्याचें सर्व द्रव्य उधळून टाकिलें. त्या दासीचें कुटुंब मोठें असल्यामुळें ह्याला तें द्रव्य पुरेसें झालें नाहीं; तेव्हां शेवटीं नानातऱ्हेचीं निंद्य कर्मे करून द्रव्य संपादन करावें व तिच्या कुटुंबाचें पोषण चालवावें, असा त्याचा क्रम सुरू झाला. असो. ह्या पातक्याला योग्य शिक्षा व्हावी म्हणून आम्ही ह्यास यमधर्माकडे घेऊन चाललों आहों. ह्यानें आपल्या पापकर्माबद्दल येथें कोणतेंही प्रायश्चित्त घेतलें नाहीं, म्हणून तेथें ह्यानें शिक्षा भोगिलीच पाहिजे!

## अध्याय दुसरा.

—:०:—

### अजामिलाची कथा.

### यमदूतांचा व विष्णुदूतांचा संवाद.

( हरिनाममहिमा. )

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, त्या न्यायनिपुण विष्णुदूतांनीं तें यमदूतांचें भाषण ऐकून घेतलें आणि ते म्हणाले, "अहो! ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे कीं, ज्या मनुष्याकडे यत्किंचितही पाप नाहीं, त्या पुण्यपुरुषाला धर्मराजाच्या दरबारांत दंड होतो! अहो, जे प्रजाजनांचे पिते, गुरु किंवा निष्पक्षपाती साधु, तेच जर असा अन्याय करूं लागले, तर प्राण्यांनीं शरण तरी कोणास जावें? स्वतः यमधर्मच जर असा अन्याय करूं लागला, तर त्याचे दूत अन्याय करतील ह्यांत कांहींच नवल नाहीं! अहो, थोर लोक जें कांहीं करितील तें प्रमाण, असें मानून अज्ञान लोक त्यांजवर विश्वास ठेवितात; आणि त्यांच्याच ठिकाणीं हा असा अंधेर! तेव्हां ह्याला काय म्हणावें? अहो, ह्या अजामिळानें मरणोन्मुखास्थितींत ईश्वराचें पुण्यप्रद नांव घेऊन अनंत जन्मींच्या पापांचें प्रायश्चित्त घेतलें आहे. जो पुरुष भगवंताच्या नांवाचा उच्चार करितो, त्याचीं कसलींही पापें असलीं तरी तीं भस्म होतात, आणि तो भगवान विष्णु ह्याचें सर्वस्वीं रक्षण करितो. अहो, ह्या अजामिळाच्या मुखांतून नारायण नामक चतुरक्षरी मंत्राचा जप झाला आहे, तेव्हां ह्याच्या ठिकाणीं पाप कसें अवशिष्ट राहील? अहो, पंचमहापातकी पुरुषाला सुद्धां भगवन्नामाहून अन्य प्रायश्चित्ताची अपेक्षा नाहीं. वेदवादी पुरुषांनीं पापाच्या नाशाकरितां अनेक प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत; परंतु तीं केल्यानें फिरून पाप करण्याकडे प्रवृत्ति होते. अहो, भगवंताच्या नामस्मरणाचा महिमा फार मोठा आहे. त्यापासून ईश्वराच्या गुणांचें ज्ञान प्राप्त होतें व त्यामुळें पापाकडे फिरून प्रवृत्ति होत नाहीं. म्हणून, दूतहो, ज्या अर्थी ह्या अजामिलानें भगवन्नामस्मरणरूपी सर्व प्रायश्चित घेतलें आहे, त्या अर्थी ह्याला तुम्ही नेऊं नका. वैकुंठवासी परमेश्वराचें नांव कोणत्याही मिषानें मनुष्याच्या मुखांतून निघालें, तरी, ज्याप्रमाणें चुकून अमृत घशांत गेलें असतां सर्व रोगांचा परिहार होतो आणि काया अमर होते, त्याप्रमाणें, त्या भगवन्नामाच्या योगानें मनुष्याचें सर्व पाप नाहींसें होतें, आणि तो मनुष्य पुण्यपुरुषांमध्यें श्रेष्ठता पावतो.

अहो वीरांनो, आम्हीं तुम्हांस जें हें सांगितलें आहे, त्याविषयीं तुम्हांस संशय येत असल्यास तुम्ही आपल्या धन्याला हें विदित करून संशयाची निवृत्ति करून घ्या. भगवान यमधर्माला धर्माचें रहस्य उत्तम अवगत आहे."

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, अशा प्रकारें, भगवन्नामोच्चारणाचा महिमा किती मोठा आहे, हें विष्णुदूतांनीं यमदूतांना सांगून, त्या अजामिळ ब्राह्मणाला मृत्यूपासून सोडविलें. नंतर यमदूत तें सर्व वर्तमान यमधर्माला सांगण्याकरितां यमलोकीं गेले. ब्राह्मण यमपाशांतून सुटल्यावर शुद्धीवर आला, आणि विष्णुदूतांना पाहून तो आनंदित झाला, व त्यानें त्यांना साष्टांग नमस्कार घातला. राजा, त्या अजामिळाचे मनांत कांहीं बोलावयाचें आहे, असें समजतांच ते विष्णुदूत त्या ठिकाणींच अंतर्धान पावले. अजामिळानें उभयपक्षांचा संवाद ऐकिला होताच; त्यावरून त्याला, वेदप्रणीत धर्म सगुण आहे, व भगवद्भक्तांचा धर्म निर्गुण आहे, असें स्पष्ट समजून आलें, आणि तात्काळ त्याची भगवंतावर भक्ति जडून गेली. भगवन्नाममाहात्म्य श्रवण केल्यामुळें पुढें त्या अजामिळाला आपल्या पापकर्माबद्दल पश्चात्ताप झाला, व तो आपलीच निर्भर्त्सना करून घेऊं लागला. परीक्षिता, त्या

## पश्चात्तप्त अजामिळाचे उद्गार

तुला सांगतों: तो म्हणाला," अहो, मीं मनोनिग्रह न करितां फार निंद्य कृत्यें केलीं, आणि शूद्रस्त्रीशीं रत होऊन ब्राह्मण्य नष्ट केलें; तेव्हां माझ्यासारख्या कुलांगाराला धिक्कार असो! अरेरे, मीं आपल्या तरुण आणि पतिव्रता स्त्रीचा त्याग करून व नीच दासीशीं रममाण होऊन किती तरी निंद्य कृत्यें केलीं हो! अहो, म्यां कृतघ्नानें आपल्या वृद्ध मातापितरांचा त्याग केला, तेव्हां मला घोर नरकांतील यातना प्राप्त होणारच, ह्यांत संदेह नाहीं! पण, अहो, मला आतां जें कांहीं दिसलें तें स्वप्न तर नव्हेना? कारण, मला ओढून नेणारे ते पाशधारी पुरुष कोठें आहेत? व ज्यांनीं ह्यांपासून मला मुक्त केलें,ते सुंदर चतुर्भुज चौघे सिद्ध तरी कोणीकडे गेले? अहो, ह्या जन्मीं मीं पापाचरण केलें आहे, तरी श्रेष्ठ अशा त्या देवांचें दर्शन मला व्हावें, हें पूर्वपुण्य फळास आलें, हें खचीत. कारण, वेश्येशीं रममाण होऊन राहणाऱ्या हतभाग्याला अंतीं नारायणाची आठवण पूर्वसंचिताशिवाय कोठून होणार? असो. ह्यापुढें मीं आपलें मन व इंद्रियें स्वाधीन ठेवून नरकयातना चुकवीन. अविद्या आणि कर्ममार्ग ह्यांपासून प्राणी बद्ध होतो; ह्यास्तव आतां त्या सर्वांचा त्याग करून, ह्या जारिणीनें खेळांतला पशु मानिलेला हा आत्मा मी स्वस्वरूपीं मिळवीन; आणि देहादिकांचा सर्व अहंकार सोडून देऊन भगवच्चरणीं लीन होईन!"

## अजामिळाची मुक्ति.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, किंचित् काळपावेतों सत्समागम झाल्यानें त्या अजामिळाला वैराग्य उत्पन्न झालें, व तो तत्काळ सर्वसंगपरित्याग करून गंगाद्वारीं गेला. तेथें त्यानें भक्तियुक्त अंतःकरणानें ईश्वराची आराधना केली, व इंद्रियदमन करून तो आत्मस्वरूपीं रममाण झाला. देह आत्म्यापासून भिन्न आहे हें ओळखून, त्यानें आत्म-समाधि-योगानें आत्म्याचें परब्रह्म-स्वरूपीं ऐक्य केलें. परब्रह्मस्वरूपीं ऐक्य झालें असतां तेच विष्णुदूत त्यास फिरून दिसले. त्यांस त्यानें नमस्कार केला, आणि तात्काळ त्या गंगातीर्थांत शरीर टाकून भगवंताच्या पार्षदाचें स्वरूप धारिलें, व विमानांत बसून तो आकाशमार्गें वैकुंठास गेला! राजा, अशा प्रकारें, त्या निंद्य कर्म करणाऱ्या अधर्मरत अजामिळाला यमदूत नरकांत टाकण्याकरितां नेत होते, तरी त्याच्या थोड्याशा नामस्मरणाच्या पुण्याईमुळें त्याच्या सर्व यातना चुकून,

त्याला वैकुंठलोकास जातां आलें. म्हणून, ज्याला मोक्षाची इच्छा आहे, त्यानें भक्तिपूर्वक अंतःकरणानें ईश्वराचें नामस्मरण करावें; म्हणजे तो कितीही पातकी असला तरी त्याला नरकाची भीति राहणार नाहीं. अजामिलाला पुत्राच्या मिषानें मरणसमयीं हरिनामस्मरण घडलें तरी तो विष्णुपदीं गेला; मग श्रद्धापूर्वक नारायणनामोच्चार करणारा पुरुष उत्तम लोकीं जाईल ह्यांत नवल तें कोणतें !

## अध्याय तिसरा.

—:०:—

### यमास त्याच्या दूतांची पृच्छा.

परीक्षित राजा म्हणाला:—मुनिवर्य, अजामिलाला नेण्यास यमदूत आले असतां त्यांस विष्णुदूतांनीं प्रतिबंध केल्यावर, ते दूत ती सर्व हकीकत सांगण्याकरितां यमधर्माकडे गेले; तेव्हां यमधर्मानें त्यांस काय सांगितलें, तें कृपा करून आपण मला सांगावें. महामुने, यमधर्माच्या आज्ञेचा भंग अमुक एकानें केला, असें मीं अद्याप ऐकिलें नाहीं; हास्तव, प्रस्तुत प्रकरणीं आपल्याकडून अधिक विस्तार न झाल्यास सर्व लोकांना फार मोठी शंका राहणार आहे.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, ते यमदूत यमधर्माकडे जाऊन म्हणाले, " हे प्रभो, प्राणिसमूहाला त्याच्या विविध कर्माप्रमाणें फल देणारे देव आहेत तरी किती? ते जर पुष्कळ असतील, तर कोणतें कर्म करणाऱ्या प्राण्यास कोणीं शासन करावयाचें, तें तरी आम्हांस सांगा. ह्या लोकांत कर्मकर्ते प्राणी अनेक आहेत, तसे शिक्षा करणारे जर अनेक असतील, तर सर्वांत श्रेष्ठ तरी कोण ? सर्व प्राण्यांच्या पापपुण्यांचें पृथक्करण आपणच करितां, म्हणून आपणच सर्वांत श्रेष्ठ आहां, असें आम्हांला वाटतें. हें जर खरें असेल, तर आज आपली आज्ञा चौघां अद्भुत पुरुषांनीं मोडिली ! तेव्हां असे ते आपणांहून श्रेष्ठ पुरुष होते तरी कोण ? हें आम्हांस कळल्यापासून जर कांहीं फायदा होईल असें आपणांस वाटत असेल, तर त्यांविषयींचा खुलासा आपण करावा. हे राजाधिराजा, आम्ही ज्या पुरुषास आणावयास गेलों होतों, त्यानें " नारायण " असा नामोच्चार केल्याबरोबर ते चौघे पुरुष " भिऊं नको, भिऊं नको, " असें म्हणत तेथें प्राप्त झाले, व त्यांनीं आम्हांस प्रतिबंध केला ! "

### यमकथित भक्तिमाहात्म्य.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, प्रजांना शिक्षण लावण्याचें काम यमदेवाचें होय. त्यानें आपल्या दूतांचें तें भाषण ऐकून घेऊन, नारायण नामाचा उच्चार करीत करीतच त्यांना म्हटलें, " दूतहो, स्थावरजंगमात्मक जगाचा अधिकारी मजहून दुसराच आहे. मी फक्त जंगम प्राण्यांतील पातकी पुरुषांचा शास्ता असून त्या ईश्वराचा सेवक आहें.वस्त्र जसें तंतूंनीं ओतप्रोत भरलेलें असतें, तसें हें सर्व विश्व त्याच्या स्वरूपानें ओतप्रोत भरलेलें आहे.उत्पत्ति,स्थिति,संहार हीं सर्व त्याच्याच शक्तीचीं कार्यें आहेत. जगांतील सर्व प्राणी नाकांत वेसण टोंचल्याप्रमाणें त्या अधिपतीच्या स्वाधीन आहेत. दावणीशीं बांधलेले बैल ज्याप्रमाणें धन्याचें पाहिजे तें काम करितात, त्याप्रमाणें, वेदरूप दावणींत बद्ध झालेले ब्राह्मणक्षत्रियादि व पशुपक्ष्यादि सर्व उच्चनीच जीव त्या जगच्चालकाचें पाहिजे तें काम करितात. मी यम, देवेंद्र, निर्ऋति, वरुण, सोम, अग्नि, शंकर, वायु, सूर्य, ब्रह्मदेव, विश्वेदेव, वसु, तसेच साध्य, मरुद्गण, सिद्ध, रुद्रगण, प्रजापति व केवळ सत्त्वगुणी असे भृग्वादिक ऋषि ह्यांना सुद्धां त्या परमेशाच्या चरित्राचा अंत लागत नाहीं; मग मायावश झालेल्या सामान्य जीवांना त्याचा अंत कसा लागणार ? ज्याप्रमाणें नेत्रांना सर्व पदार्थ पाह-

ण्याची शक्ति आहे, पण त्या पदार्थांना नेत्रांस पाहण्याची शक्ति नाहीं, त्याप्रमाणें, ईश्वराला प्राणिमात्राचीं सर्व कर्में म्हणजे इंद्रियादिकांचे व्यापार कळतात, पण प्राणिमात्राच्या इंद्रियादिकांना म्हणजे हस्तपादादिक व नेत्रकर्णादिक अवयव, मन व प्राण ह्यांना त्या ईश्वराचीं कर्में कळत नाहींत. तो जगदात्मा स्वतंत्र असून त्याची सत्ता सर्वांवर अव्याहत चालते. तो मायेचा अधिपति व जगताचा नियामक आहे. त्या महात्म्याचे दूत बहुधा येथें सर्वत्र फिरत असतात. त्यांचीं स्वरूपें व गुण तत्समान असल्यामुळें, त्यांच्या दर्शनानें लोकांचीं मनें हरण होतात. विष्णुदूतांच्या अद्भुत मूर्ति दृष्टीस पडणें मोठें दुर्लभ आहे. ह्यास्तव, त्या मूर्तींचें दर्शन झालें असतां देव देखील त्यांचें पूजन करितात. ते विष्णूचीं भक्ति करणारांचें मजपासून व इतर सर्वांपासून रक्षण करितात. साक्षात् भगवंतानें जो धर्म सांगितला आहे, त्याचें तत्त्व ब्रह्मदेव, नारद, शंकर, सनत्कुमार, कपिल, मनु, प्रल्हाद, जनक, भीष्म, बलि, व्यासपुत्र शुक आणि मी (यम) असे बाराजण मात्र जाणतों. इतर ऋषि, देव, मुख्य सिद्ध, असुर, व मनुष्यें हे सुद्धां तें जाणत नाहींत; मग विद्याधर, चारण इत्यादिक तें कोठून जाणणार! दूतहो, हा भागवतधर्म मोठा गूढ व दुर्बोध असून अत्यंत पवित्र आहे. ह्याचें यथार्थ ज्ञान झाल्यानें प्राण्याला मोक्ष मिळतो. नामग्रहणादि साधनांनीं भगवंताची भक्ति करणें हाच पुरुषांचा श्रेष्ठ धर्म होय. दूतांनो, ह्या

### हरिनामोच्चारणाचें फल

कसें आहे तें पहा: अजामिळासारख्या महापातक्याला, त्या नामोच्चारणाच्या योगानें मृत्यूपासून आपली सुटका करून घेतां आली! भगवंताच्या गुणांचें, चरित्राचें व नामांचें कीर्तन करणारांचीं सर्व पापें भस्म होतात. अजामिळानें मरणसमयीं आपल्या पुत्राला 'नारायणा' अशी हांक मारली, इतक्यामुळेंच सर्व पातकें दग्ध होऊन तो मुक्तीस गेला! अमृतसंजीवनी ज्यांना माहीत नाहीं, ते वैद्य ज्याप्रमाणें काढा, मात्रा वगैरे औषधें देत बसतात, त्याप्रमाणें, पापनाशनाचा योग्य उपाय माहीत नसलेले लोक नानाप्रकारचीं प्रायश्चित्तें देत बसतात; पण बुद्धिमान लोक असला कांहींएक खटाटोप न करतां, षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराची अंतःकरणपूर्वक भक्ति करितात. दूतहो, ब्रह्मदेव, नारद इत्यादिक आम्हां बाराजणांशिवाय इतरांना भगवन्नामोच्चारणाचें हें माहात्म्य बहुधा विदित नसावें. कारण त्यांस भगवन्मायेनें पूर्ण वेडें केलें आहे; आणि त्यामुळें ते पापक्षालनासाठीं व सद्गति मिळावी म्हणून वेदवचनांतील मोहक अशा उत्तानार्थावर भिस्त ठेवून मोठमोठ्या यज्ञयागादिक कर्मांस वेड्यांसारखे प्रवृत्त होतात! अहो दूतांनो, ह्याप्रमाणें भगवन्नामोच्चारणरूप भक्तियोगाचें महत्त्व मनांत आणून विवेकसंपन्न महान महान ज्ञाते निश्चयेंकरून पूर्ण श्रद्धेनें भक्तियोगच साधतात. तेव्हां अशा प्रकारच्या पुरुषांना दंड करण्याचें माझें सामर्थ्य नाहीं. त्यांनीं जर कांहीं पातक केलें असेल, तर त्याचा हरिनामोच्चारणानें नाश झालेला असतो. दूतहो, जे समदृष्टि साधुजन भगवंतास शरण जातात, त्यांचें जगत्पावन यश देव व सिद्धही नित्य गात असतात, आणि त्यांच्या संरक्षणार्थ भगवंताची गदा सदोदीत दक्ष असते; म्हणून अशा भगवद्भक्तांजवळ तुम्ही मुळीच जाऊं नका. त्यांना दंड करण्यास मी समर्थ नाहीं इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष काळाच्या अंगींही ती शक्ति नाहीं! दूतांनो, सर्वसंगपरित्याग करून परमहंसस्वरूपानें भगवत्पादारविंदांतील मकरंदाचा अव्याहतपणें आस्वाद घेणारे जे महात्मे आहेत, त्यांस कोणताही उपसर्ग न करितां, जे पुरुष पुत्रकलत्रादिकांत निमग्न होऊन भगवद्भक्तीपासून विमुख होत्साते नरकद्वारांत प्रवेश करण्यास उ-

शुक्र झालेले असतात, त्यांस मात्र तुम्ही मजकडे घेऊन येत जा. दूतहो, ज्या पुरुषांची जिव्हा भगवद्गुणवर्णनांत गुंतलेली नसते, ज्यांचें मन त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न जगदात्म्याच्या पदकमलीं आसक्त नसतें, आणि ज्यांचें मस्तक भगवत्पादारविंदीं कधींही नम्र होत नाहीं, अशा त्या नीच व भगवद्भक्तिपराङ्मुख पातकी जनांस मात्र तुम्ही मजकडे आणावें. अहो दूतांनो, तुम्हीं हें जें अयोग्य आचरण केलें, त्याजबद्दल तो भगवान पुराणपुरुष नारायण तुम्हांस क्षमा करील; कारण, तुम्ही माझे दूत असल्यामुळें व मी स्वतः त्या देवाधिदेवाचा दूतच असल्यामुळें, तुम्ही वास्तविकपणें त्या परमेश्वराचेच दूत आहां. ह्यास्तव तुम्ही मजबरोबर त्या लोकनायकास हात जोडा, म्हणजे तो दीनवत्सल प्रभु आपणांस क्षमा करील. असो. त्या सर्वव्यापक परमात्म्यास मी मनोभावानें अभिवंदन करितों."

श्रीशुकाचार्य म्हणतातः—हे परीक्षित राजा, भगवान श्रीहरीचें नामसंकीर्तन करणें हेंच जगताला कल्याणप्रद आहे. कितीही महान महान पातकें घडलीं असलीं तरी, त्या एकट्या नामसंकीर्तनाच्या योगें त्या सर्वांचा समूळ नाश होतो. भगवन्नामासारखें दुसरें कोणतेंही प्रायश्चित्त नाहीं. जे पुरुष श्रीहरीचीं उदात्त चरित्रें वारंवार श्रवण करितात व वर्णन करितात, त्यांच्या ठिकाणीं उत्तम भक्ति उत्पन्न होऊन तिच्या योगें त्यांस परमार्थाची प्राप्ति होते. राजा, भगवद्भक्तीच्या ठायीं चित्तशुद्धि करण्याचें जितकें सामर्थ्य आहे, तितकें सामर्थ्य कोणत्याही व्रतवैकल्यादिकांच्या ठायीं नाहीं. ज्या पुरुषानें भगवत्पादारविंदांतील मकरंदाचें पान केलें, तो मायेच्या गुणांविषयीं विरक्त बनतो; आणि अशा प्रकारें एकदा तो ऐहिक विषयांविषयीं उदासीन झाला, म्हणजे तो पुनः त्यांविषयीं आसक्ति धारण करीत नाहीं, व त्या योगें तो जन्माचें सार्थक्य संपादितो! परीक्षित राजा, जे पुरुष भगवत्पादपद्मापासून दूर राहतात, आणि पापक्षालनासाठीं यज्ञयागादिक किंवा व्रतोपवासादिक कर्में आचरितात, त्यांची पापपरंपरा नष्ट न होतां उलटी वाढतच जाते; आणि तद्द्वारा ते पुरुष स्वतांची कर्मग्रंथि सुदृढ करून आपणांस भवबंधांत अधिकाधिकच पाडितात! असो. राजा, भगवद्भक्तीचें माहात्म्य असें अगाध आहे! तें भक्तिमाहात्म्य श्रवण करून यमदूतांनीं त्याचें मनन केलें; आणि त्याच्या सत्यत्वाविषयीं अंतःकरणांत दृढ विश्वास धरून, भगवद्भक्तांस केव्हांही उपद्रव द्यावयाचा नाहीं, असा त्यांनीं निश्चय केला; व तेव्हांपासून ते अच्युताचा आश्रय करणाऱ्या भगवद्भक्तांना भिऊं लागले. राजा परीक्षिता, भगवान अगस्त्य ऋषि मलय पर्वतावर परमेश्वराची पूजा करीत बसले असतां त्यांनीं हा गुप्त इतिहास मला सांगितला.

# अध्याय चौथा.

—:०:—

## प्रचेत्यांचें वृत्त व दक्षाचें जन्म.

परीक्षित राजा म्हणालाः—शुक मुने, स्वायंभुव मन्वंतरांतील देव, दैत्य, मनुष्यें, नाग, पशु, पक्षी आदिकरून सृष्टीचें संक्षेपानें वर्णन मला आपण सांगितलें; पण त्या सृष्टीचा विस्तार पुढें त्या देवाधिदेव परमेश्वरानें कसा, कोणत्या शक्तीनें व कोणत्या प्रकारानें केला, तें ऐकावें अशी मला इच्छा आहे. तर तें कृपा करून सांगावें.

सूत म्हणालेः—मुनिवर्यहो, परीक्षित राजाचा तो प्रश्न श्रवण करून महायोगसंपन्न शुकाचार्यांनीं त्याचें अभिनंदन केलें, व उत्तर देण्यास प्रारंभ केला.

श्रीशुकाचार्य म्हणालेः—परीक्षित राजा, प्राचीनबर्हि राजाचे पुत्र दहा प्रचेते तपश्चर्या करण्याकरितां पश्चिमसमुद्रांत जाऊन राहिले इत्यादि वृत्तांत तुला सांगितलाच आहे. ते प्रचेते समु-

द्रांतून बाहेर आले, तों त्यांस असें दिसून आलें कीं, सर्व पृथ्वी वृक्षांनीं अगदीं भरून गेली आहे. तें पाहून त्यांस फार क्रोध आला, व ते वृक्ष जाळून टाकण्याच्या हेतूनें त्यांनीं आपल्या मुखापासून अग्नि आणि त्याच्या साहाय्यार्थ वायु हे उत्पन्न केले. तें पाहून, प्रचेत्यांचा क्रोध शांत करण्याकरितां, ओषधींचा राजा जो सोम तो प्रकट झाला व त्यांस म्हणाला, "अहो श्रेष्ठ प्रचेत्यांनो, तुमच्यासारख्या थोर महात्म्यांनीं वृक्षांसारख्या दीनांचा नाश करणें अनुचित आहे. कारण, तुम्ही प्रजापति असून सर्व सृष्टीची वृद्धि करण्याचा प्रयत्न करतां अशी प्रसिद्धि आहे. सर्वांचा अधिपति जो भगवान श्रीहरि, त्यानें प्रजांचें अन्न आणि भक्ष्य पदार्थ म्हणून ओषधि आणि वनस्पति निर्माण करून ठेविल्या आहेत. स्थावर पदार्थ जंगमांचें खाद्य होय; अहो, तृणादि पादरहितें पदार्थ पश्वादिक पादसहित प्राण्यांचें भक्ष्य होय; [ मत्स्य वगैरे ] हस्तरहित प्राणी हे हस्तवान प्राण्यांचें भक्ष्य होय; आणि मेंढरें वगैरे चतुष्पाद प्राणी [ मनुष्य वगैरे ] द्विपाद प्राण्यांचें भक्ष्य होय. अहो पुण्यपुरुषांनो, तुमच्या पित्यानें आणि ब्रह्मदेवानें तुम्हांस प्रजांची वृद्धि करण्याकरितां आज्ञा दिली असतां तुम्ही वृक्षांचा नाश करितां, याला काय म्हणावें? तुमचे पितृपितामहप्रपितामहादिक पूर्वज ज्या मार्गानें गेले, त्याच मार्गाचा स्वीकार करून तुम्ही आपला क्रोध शांत करा. ज्याप्रमाणें पापण्यानें नेत्रांचें, मातापितरांनीं मुलांचें, पतीनें आपल्या स्त्रीचें, गृहस्थाश्रम्यांनीं संन्याशांचें, आणि सुज्ञांनीं अज्ञांचें, त्याप्रमाणें; तुमच्यासारख्या प्रजापतींनीं प्रजांचें संरक्षण करावें. शिवाय दुसरें असें कीं, प्राणी, वृक्ष इत्यादि सर्व चराचर विश्वाचे ठिकाणीं ईश्वर भरलेला आहे; तेव्हां तुम्ही रागानें जर या वृक्षांचा नाश कराल, तर ईश्वराशीं द्वेष केला असें होईल; आणि जर तुम्ही त्यांचें संरक्षण केलें, तर ईश्वराला संतुष्ट केल्यासारखें होणार आहे; या गोष्टीचा तुम्ही आपल्या मनांत नीट विचार करा. तसेंच, हे प्रचेतेहो, एखादे वेळीं कोणत्याही कारणानें अतिशय क्रोध आला असतांही जो मनुष्य तो क्रोध आवरून धरितो, तोच मनुष्य सत्व, रज व तम या तीन गुणांचें अतिक्रमण करून भगवत्स्वरूपाला पोहोंचतो. म्हणून तुम्ही आपला क्रोध शांत करा, आणि या दीन वृक्षांचा नाश करूं नका. अवशिष्ट राहिलेल्या वृक्षांचें व तुमचें कल्याण असो. हे प्रचेतेहो, या वृक्षांनीं पाळन केलेल्या या प्रम्लोचा नांवाच्या अप्सरेच्या मुलीचा तुम्ही पत्नी या नात्यानें स्वीकार करा."

राजा परीक्षिता, याप्रमाणें सोमराजानें प्रचेतसांचें सांत्वन केलें, व प्रम्लोचा अप्सरेची ती मारीषा नांवाची मुलगी त्यांच्या स्वाधीन करून आपण निघून गेला. पुढें प्रचेतसांनींही त्या कन्येबरोबर धर्माप्रमाणें विधिपूर्वक विवाह केला. नंतर त्या मारीषेच्या ठिकाणीं प्रचेतसांपासून सुप्रसिद्ध दक्ष प्रजापति जन्मला. हा प्रचेतसांचा मुलगा म्हणून याला प्राचेतस असें म्हणतात. याच्या संततीनें हें त्रैलोक्य भरून गेलें आहे. आतां, त्या दक्षानें पुढें मानसिक व मैथुनजन्य सृष्टि कशी निर्माण केली तें तुला सांगतों. दक्ष प्रजापतीनें प्रथम देव, दैत्य, मनुष्य इत्यादि नभश्चर, स्थलचर व जलचर प्राणी मनानेंच निर्माण केले. ती प्रजा अगदीं थोडी असें पाहून, विंध्याद्रीच्या पायथ्याशीं अघमर्षण नांवाचें पवित्र तीर्थ आहे तेथें तो तपश्चर्या करण्याकरितां गेला; व तेथें हंसगुह्य स्तोत्राचा जप करून त्यानें ईश्वराला प्रसन्न करून घेतलें.

## हंसगुह्य स्तोत्र.

दक्ष म्हणालाः—

नमः परायावितथानुभूतये गुणत्रयाभासनिमित्तबन्धवे ।
अदृष्टधाम्ने गुणतत्त्वबुद्धिभिर्निवृत्तमानाय दधे स्वयंभुवे ॥
न यस्य सख्यं पुरुषोऽवैति सख्युः सखा वसन्संवसतः पुरेऽस्मिन् ।
गुणो यथा गुणिनो व्यक्तदृष्टेस्तस्मै महेशाय नमस्करोमि ॥
देहोऽसवोऽक्षा मनवो भूतमात्रा नात्मानमन्यं च विदुः परं यत् ।
सर्वं पुमान्वेद गुणांश्च तज्ज्ञो न वेद सर्वज्ञमनन्तमीडे ॥
यदोपरामो मनसो नामरूपरूपस्य दृष्टस्मृतिसंप्रमोषात् ।
य ईयते केवलया स्वसंस्थया हंसाय तस्मै शुचिसद्मने नमः
मनीषिणोऽन्तर्हृदि संनिवेशितं स्वशक्तिभिर्नवभिश्च त्रिवृद्भिः ।
वह्निं यथा दारुणि पाञ्चदश्यं मनीषया निष्कर्षन्ति गूढम् ॥
स वै ममाशेषविशेषमायानिषेधनिर्वाणसुखानुभूतिः ।
स सर्वनामा स च विश्वरूपः प्रसीदतामनिरुक्तात्मशक्तिः ॥
यद्यन्निरुक्तं वचसा निरूपितं धियाऽक्षभिर्वा मनसा वोत यस्य ।
मा भूत्स्वरूपं गुणरूपं हि तत्तत्सवै गुणापायविसर्गलक्षणः ॥
यस्मिन्यतो येन च यस्य यस्मै यद्यो यथा कुरुते कार्यते च ।
परावरेषां परमं प्राक् प्रसिद्धं तद्ब्रह्म तद्धेतुरनन्यदेकम् ॥
यच्छक्तयो वदतां वादिनां वै विवादसंवादभुवो भवन्ति ।
कुर्वन्ति चैषां मुहुरात्ममोहं तस्मै नमोऽनन्तगुणाय भूम्ने ॥
अस्तीति नास्तीति च वस्तुनिष्ठयोरेकस्थयोर्भिन्नविरुद्धधर्मयोः ।
अवेक्षितं किंचन योगसांख्ययोः समं परं ह्यनुकूलं बृहत्तत् ॥
योऽनुग्रहार्थं भजतां पादमूलमनामरूपो भगवाननन्तः ।
नामानि रूपाणि च जन्मकर्मभिर्भेजे स मह्यं परमः प्रसीदतु ॥
यः प्राकृतैर्ज्ञानपथैर्जनानां यथाशयं देहगतो विभाति ॥
यथाऽनिलः पार्थिवमाश्रितो गुणं स ईश्वरो मे कुरुतान्मनोरथम् ॥

'जो सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे, ज्याच्या चिच्छक्तीचा अनुभव केव्हांही असत्य ठरत नाहीं, जो जीव आणि माया यांचा चालक आहे, सत्त्वादिक त्रिगुणांस सत्य मानणाऱ्या जीवांना ज्याचें स्वरूप दृश्य नाहीं, ज्यास देशकाळादिकांची मर्यादा नाहीं, व जो आपण स्वतः उत्पन्न झालेला आहे, अशा त्या परमेश्वराला नमस्कार असो. जीव आणि ईश्वर हे दोघे मित्र असून एकाच ठिकाणीं म्हणजे शरिरामध्यें राहतात; परंतु जीवाला ईश्वर नामक आपल्या मित्राची ओळख पटत नाहीं; ह्याचें कारण जीवाचें दौर्बल्य व ईश्वराचें प्रभुत्व हेंच होय. ईश्वर हा जीवाचा म्हणजे सर्व प्रपंचाचा द्रष्टा आहे; व जीव म्हणजे सर्व प्रपंच हा केवळ दृश्य विषय होय; तेव्हां द्रष्ट्याला जरी दृश्याचें ज्ञान झालें, तरी दृश्याला द्रष्ट्याचें ज्ञान कसें होईल? पहा—इंद्रियांना शब्दस्पर्शादिक विषयांचें ज्ञान होतें; पण शब्दस्पर्शादिक विषयांना इंद्रियांचें ज्ञान होईल काय? असो. अशा त्या महासमर्थ ईश्वराला मी नमस्कार करितों. देह, प्राण, इंद्रियें, अंतःकरणें आणि

पांच स्थूल व सूक्ष्म भूतें यांना आपणा स्वतांचेंही ज्ञान नसतें, व दुसऱ्याचेंही नसतें; परंतु जीव ( पुमान् ) हा या सर्वांना व त्यांस कारणीभूत अशा तीन गुणांनाही जाणतो. पण तो इतकें जाणत असूनही ईश्वराचें ज्ञान त्याला होत नाहीं, ह्याचें कारण त्या ईश्वराचें अनंतत्वच होय. अशा त्या सर्वज्ञ परमेश्वराला माझा नमस्कार असो. मन हें एखादा विषय पाहून किंवा त्याचें स्मरण करून त्या त्याच्या नांवाचें आणि रूपाचें ज्ञान करून देतें; परंतु ज्याच्या सच्चिन्मय स्वरूपाचें ज्ञान होण्याला पाहणें आणि स्मरण करणें ह्या क्रिया बंद होऊन मन शुद्ध व्हावें लागतें म्हणजे समाधि लावावी लागतो, त्या परमेश्वराला मी नमस्कार करितों. ईश्वर सर्वांच्या हृदयामध्यें राहतो; परंतु तो आपल्या प्रकृति, पुरुष, महत्तत्त्व, अहंकार व पंचतन्मात्रा ( सूक्ष्म भूतें ) ह्या नऊ आणि पंचमहाभूतें, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें व मन ह्या सोळा, अशा एकंदर पंचवीस तत्त्वरूप शक्तींनीं गुप्त रहात असल्यामुळें सामान्य मनुष्याच्या अनुभवास येत नाहीं; पण जे विशेष बुद्धिमान लोक आहेत, ते आपल्या विचारशक्तीनें त्याला जाणतात; आणि ऋत्विज यज्ञामध्यें अरणींतून पंधरा सामिधेनी मंत्रांनीं प्रकाशित होणारा अग्नि जसा बाहेर काढितात, तसा ते ज्ञाते पुरुष तो ईश्वर पंचवीस शक्तींतून बाहेर काढितात व मग तो त्यांच्या अनुभवास येतो. सगळे चमत्कारिक पदार्थ हीं मायेचीं कार्यें आहेत; ईश्वर हा त्या मायेला दूर करून नेहमीं सुखाचा अनुभव घेतो; त्याला सर्व नांवें शोभतात व सर्व जग हें त्याचें रूप आहे; तो मायातीत परमेश्वर मला प्रसन्न होवो ! भगवंता, तुझ्या स्वरूपाचा, कृतीचा व अधिकाराचा विचार करितांना मति अगदीं कुंठित होऊन जाते! जगांतील कोणत्याही वस्तूच्या किंवा व्यक्तीच्या गुणधर्मांची अथवा कर्तृत्वाची प्रत्यक्ष किंवा पर्यायानें माहिती मिळविली, किंवा केवळ तर्कशक्तीनें त्यांचें ज्ञान संपादन केलें, तरी त्यापासून तुझ्या अधिकाराचें यथावत स्वरूप मनांत येत नाहीं. तें स्वरूप नीटपणें समजण्यास, गुणांची उत्पत्ति व उपसंहार करण्याचें तुझ्या ठिकाणीं जें सामर्थ्य आहे त्याचाच विचार केला पाहिजे. असो. हे देवाधिदेवा, असें अद्वितीयत्व तुझ्या ठिकाणीं आहे. विश्वेशा, ब्रह्मांडांतील अनंत वस्तु हें तुझेंच विराट् स्वरूप होय. जगांतील पदार्थांचा विचार करीत असतांना, अमुक पदार्थ अमक्या पदार्थापासून अमुक कारणानें झाला म्हणून म्हणतात, तो पदार्थ किंवा तें कारण तरी तूंच आहेस. विभो अनंतकोटि ब्रह्मांडांतील पदार्थांची उत्पत्ति ज्या ज्या लोकांच्या किंवा प्राण्यांच्या स्वामित्वाकरितां किंवा सुखाकरितां केलेली किंवा करविलेली दिसते, ते ते लोक किंवा प्राणी हीं तरी तुझींच रूपें आहेत. भगवन्, फार कशाला? वस्तुमात्राच्या अंगीं असणारे कालरूप किंवा स्थलरूप विकार किंवा स्वभावधर्म हेही तूंच आहेस. सारांश, हें सर्व मायानिर्मित जग तूंच निर्माण केलें असून त्याचा उपभोगही तूंच घेतोस; व ह्याउपर तूं सर्वांपासून उदासीनही आहेस. हे विश्वाधिपते, हें जें तुझें अद्वितीय स्वरूप, तेंच ह्या सर्व जगताचें आदिकारण होय, व ह्यासच ब्रह्म असें म्हणतात. परमेशा, संभाषण करणाऱ्या लोकांना व वादविवाद करणाऱ्या लोकांना तुझ्या शक्ति हेच विषय झालेले आहेत, व तुझ्या शक्तींमुळेंच त्यांच्या मनाला वारंवार मोह उत्पन्न होतो. अशा त्या अनंत शक्ति धारण करणाऱ्या तुला माझा नमस्कार असो. योगशास्त्रामध्यें म्हणजे उपासनाशास्त्रामध्यें परमेश्वराला हस्तपादादि अवयव आहेत असें सांगितलें आहे, व सांख्यशास्त्रांत परमेश्वराला हस्तपादादि अवयव नाहींत असें वर्णन आहे; तेव्हां अशा परस्परांशीं विरुद्ध व भिन्न गोष्टी ज्या एकाविषयीं सांगितल्या आहेत, व जें दोन्ही शास्त्रां-

च्या विषयप्रतिपादनाला अनुकूल आहे, तेंच ब्रह्म होय. त्यास नमस्कार असो. ईश्वराच्या शक्ति अनंत असून त्याचें ऐश्वर्यही कल्पनेपलीकडे आहे, ह्यास्तव त्याला नांवें व रूपें नाहींत; परंतु आपली सेवा करणाऱ्या भक्तांवर दया करण्याकरितां त्यानें अनेक जन्म घेऊन नांवें व रूपें धारण केलीं आहेत; तशींच अनेक प्रकारचीं चरित्रेंही करून दाखविलीं आहेत; तर असा जो दयाळू परमेश्वर, तो मला प्रसन्न होवो. हे देवाधिदेवा, सर्वव्यापक वारा जसा जमिनीच्या ज्या भागावरून येईल त्या प्रकारचा असतो, म्हणजे सुवासिक फुलझाडांवरून आला तर सुवासिक भासतो, किंवा खरखरीत मैदानावरून आला तर खरखरीत वाटतो, तसा तूं सर्वांच्या अंतर्यामीं रहात असूनही अर्वाचीन उपासनामार्गांच्या अनुरोधानें उपासकांच्या वासनेप्रमाणें त्यांना भिन्न भिन्न स्वरूपांचा भासतोस. सारांश, हे परमेश्वरा, तुझीं जीं अनेक रूपें आहेत, त्यांपैकीं कोणत्याही रूपाची उपासनामार्गानें भक्ति केली असतां तूं भक्तांचे मनोरथ पूर्ण करितोस; म्हणून माझी अशी प्रार्थना आहे कीं, मी तुझ्या कोणत्याही सगुण रूपाची भक्ति न करितां प्रत्यक्ष तुझीच म्हणजे तुझ्या परब्रह्मरूपाची स्तुति करीत आहें, तर तूं माझे मनोरथ पूर्ण कर.'

### दक्षास परमेश्वरदर्शन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, त्या अघमर्षण तीर्थी दक्षानें परमेश्वराची अशी स्तुति चालविली असतां, भक्तवत्सल प्रभु गरुडावर बसून तेथें प्राप्त झाले. त्या वेळीं भगवंतांनीं त्रैलोक्याला मोह उत्पन्न होण्यासारखें रूप धरिलें होतें. त्यांस आठ दीर्घ बाहु होते; त्यांनीं चक्र, शंख, खड्ग, चर्म ( ढाल ), बाण, धनुष्य, पाश व गदा हीं आठ आयुधें हस्तांत धारण केलीं होतीं; त्यांनीं पीत वस्त्र परिधान केलें असून त्यांच्या देहाचा वर्ण घनश्याम होता; त्यांची मुद्रा व नेत्र हीं स्मितहास्यानें प्रफुल्लित दिसत होतीं; त्यांच्या शरीरावर आपादलंबी वनमाला विलसत होती; वक्षस्थलावर श्रीवत्सलांच्छन झळकत असून कंठांत कौस्तुभ मणि विराजत होता; मस्तकावर भव्य मुकुट होता; हातांत कांतिमान कडीं होतीं; कानांत मकराकार कुंडलें तळपत होतीं; कमरेला कमरपट्टा झळाळत होता; बोटांत अंगठ्या होत्या; पायांत पैंजणें होतीं; व भुजांच्या ठिकाणीं अंगदें होतीं; आणि त्यामुळें तें दिव्य रूप कोणाचीही चित्तवृत्ति हरण करील, असें भासत होतें! भगवंतांच्या भोंवतीं नारद, नंद-सुनंद आदिकरून पार्षदगण, व सर्व देव उभे होते; आणि सिद्ध, गंधर्व, चारण व अप्सरा गायन करीत होत्या. असो. जगन्नायकाचें तें रूप पाहतांच दक्ष प्रजापतीला अत्यंत आनंद झाला; त्यानें परमेश्वराच्या चरणांवर लोटांगण घातलें; आनंदातिशयामुळें त्याच्यानें एक शब्दही बोलवेना; आणि तो भगवंताकडे पहात स्तब्ध उभा राहिला! असो. भगवंताच्या लक्षांत त्याचा हेतु आला, आणि त्यांनीं

### दक्षास आज्ञा

केली: भगवान म्हणाले:—हे प्राचेतस दक्षा, तूं श्रद्धायुक्त अंतःकरणानें सृष्टीच्या वृद्धीकरितां माझी तपश्चर्या केलीस. तिनें मी संतुष्ट होऊन तुजवर प्रसन्न झालों आहें. ब्रह्मदेव, शंकर, मनु, देव व तुम्ही प्रजापति ह्या माझ्या विभूति आहेत. त्या सर्वांचें कर्तव्य भूतांची सृष्टि करणें हेंच होय. तपश्चर्या हें माझें हृदय आहे; विद्या म्हणजे सांगमंत्राचा जप हें माझें शरीर आहे; ध्यान ही माझी आकृति आहे; यज्ञ हे माझे अवयव होत; धर्म हें माझें मन आहे; व यज्ञभोक्ते देव माझे प्राण होत. हे प्राचेतसा, प्रथम मी एकच होतों, व माझें स्वरूप इंद्रियांना अगोचर असें केवळ चैतन्यमय होतें. नंतर मी आपल्या ठिकाणीं मायेच्या योगें गुणमय ब्रह्मांड-

देह कल्पिला, आणि मग अयोनिसंभव ब्रह्मदेव उत्पन्न झाला. नंतर त्या ब्रह्मदेवाला सृष्टि उत्पन्न करावी अशी इच्छा झाली, तों त्याला कांहींच सुचेना! तेव्हां माझ्या आज्ञेवरून त्यानें उग्र तप केलें, आणि त्या तपाच्या योगानें त्याला सृष्टि करण्याचें सामर्थ्य येऊन त्यानें तुम्हां नऊ प्रजापतींना उत्पन्न केलें. हे दक्ष प्रजापते, तूं ह्या पंचजन नामक प्रजापतीच्या असिक्नी नामक कन्येशीं विवाह कर. मिथुनरति हा जो तुझा धर्म, तोच हिच्याही अंगीं पूर्ण वसत आहे; म्हणून तूं हिजपासून अनेक प्रकारची सृष्टि उत्पन्न करशील. हे दक्षा, स्त्री ही माझी माया आहे; याकरितां, ह्या असिक्नीपासून जी प्रजा उत्पन्न होईल ती सर्व मायारूप स्त्रीशीं समागम करून पुत्रादि रूपांनीं जन्मास येईल, व मला बलि अर्पण करील.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—राजा परीक्षिता, जगत्पालक परमात्म्यानें दक्षाला असें सांगितलें; आणि तो अकस्मात् स्वप्नांतील पदार्थाप्रमाणें एकदम गुप्त झाला.

## अध्याय पांचवा.

—:०:—

### हर्यश्वांचें जन्म व तप.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, विष्णूच्या मायेनें शक्तिसंपन्न झालेल्या दक्षाला पांचजनीच्या उदरीं हर्यश्व नांवाचे दहा हजार पुत्र झाले. त्या सर्वांचे आचार व स्वभाव एकसारखे होते. दक्ष प्रजापतीनें त्यांना प्रजा उत्पन्न करण्याची आज्ञा केली असतां, ते पश्चिम दिशेकडे निघून गेले. त्या दिशेस सिंधु नदी जेथें समुद्राला मिळाली आहे तेथें जाऊन, त्या ठिकाणीं असलेल्या नारायण नामक महातीर्थावर उग्र तपश्चर्या करण्याचा त्यांनीं निश्चय केला. त्या ठिकाणीं अनेक मुनि व सिद्धजन रहात असतात. त्या पुण्यतीर्थाचा केवळ स्पर्श झाल्याबरोबर त्यांचें अंतःकरण शुद्ध झालें, आणि परमहंस धर्मानें वागण्याची त्यांना बुद्धि उपजली; परंतु त्यांना सृष्टि उत्पन्न करण्याविषयीं पित्याची आज्ञा असल्यामुळें ते तप करावयास लागले. हे मोक्षाचे अधिकारी असून कर्ममार्गाच्या नादानें नाश पावत आहेत असें पाहून नारद मुनींनीं तेथें येऊन त्यांना कूटोपदेश केला.

### नारदांचा हर्यश्वांस कूटोपदेश.

भगवान नारद म्हणाले:—हर्यश्वांनो, तुम्ही थोर असूनही मूर्ख कसे झालां? तुमची मला फार कींव येते! तुम्ही भूमीच्या अंताचा विचार न करितां प्रजोत्पत्तीच्या उद्योगांत आहां, हें अनुचित होय! ह्या राष्ट्रांत एकच पुरुष राहतो; त्यांत एक बीळ आहे, त्यांतून बाहेर निघण्यास मार्ग नाहीं; येथें अनेक रूपें घेणारी एक स्त्री आहे; जारिणीचा पति असा एक पुरुष आहे; दोहोंकडे वाहणारी एक नदी आहे; पंचविसांचें एक अद्‌भुत घर आहे; चमत्कारिक गोष्टी सांगणारा हंस आहे; आणि क्षुर व वज्र यांनीं निर्मिलेलें एक स्वतंत्र व सतत फिरणारें चक्र आहे; ह्याची तुम्हांला कांहीं माहिती नाहीं काय? तुमच्या ज्ञानसंपन्न पित्यानें तुम्हांस जी आज्ञा दिली, तिचें स्वरूप तुम्हांला कळलें नाहीं; आणि ह्यामुळेंच तुम्ही प्रजा उत्पन्न करण्याच्या भरीस पडलां आहां!

श्रीशुक म्हणाले:—परीक्षित राजा, हर्यश्वांनीं असें हें नारदाचें भाषण ऐकून ते आपल्याशींच विचार करूं लागले, आणि त्यांनीं आपल्या स्वाभाविक कुशाग्र बुद्धीनें त्या

### कूटोपदेशाचा अर्थ

जाणिला: त्यांनीं विचार केला कीं, "'भूमि' म्हणजे लिंगशरीर नामक क्षेत्र असावें. त्यामुळेंच जीवात्म्याला अनादि बंधन प्राप्त झालें आहे. त्याचा नाश जर कळला नाहीं, तर मोक्षप्राप्तीला निरुपयोगी अशीं कर्में करून तरी काय फळ? 'एक

पुरुष ' म्हणजे तीन अवस्थांहून निराळा, सर्वसाक्षी व स्वतःसिद्ध असा भगवान परमेश्वर होय. त्या नित्यमुक्त प्रभूचें जर ज्ञान झालें नाहीं, तर हीं तुच्छ कर्में करून काय होणार आहे? ' जेथून परत येतां येत नाहीं तें बीळ ' म्हणजे तेजोरूप ब्रह्म होय. ज्याप्रमाणें पाताळांत गेलेला मनुष्य परत येत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मरूपीं मिळालेला जीव संसारांत परत येत नाहीं. त्या ब्रह्मरूपाचें जर ज्ञान नसेल, तर ह्या अनेक कर्मांचा काय उपयोग ? 'अनेक रूपें घेणारी स्त्री' म्हणजे बुद्धि असावी. तिला स्वेच्छाचारी स्त्रीप्रमाणें पाहिजे तितकीं सोंगें घेतां येतात, व तिच्या अंगीं अनेक गुणही आहेत. तिचा नाश झाला नाहीं म्हणजे विवेक उत्पन्न झाला नाहीं, तोंपर्यंत अनेक कर्में केलीं तरी काय उपयोग ? ' जारिणीचा पति असा एक पुरुष ' म्हणजे जीव असावा. बुद्धीच्या तंत्रानें वागत असल्यामुळें जारिणीपतीप्रमाणें त्याचें सर्व ऐश्वर्य नष्ट होतें, आणि सुखदुःखादि अनेक गति त्याला भोगाव्या लागतात. म्हणून, जीवाचें यथार्थ ज्ञान झाल्यावांचून अविवेकानें केलेल्या कर्मांचा काय उपयोग ? ' दोहींकडे वाहणारी नदी ' म्हणजे माया असावी. कारण ती सृष्टि उत्पन्न करिते आणि तिचा संहारही करिते. तेव्हां तिच्या वेगांत सांपडून जो पुरुष तदंकित झाला असेल, आणि तिचें ज्ञान ज्याला नसेल, त्यानें केलेलीं सर्व कर्में व्यर्थ होत. ' पंचविसांचें एक अद्भुत घर ' म्हणजे पंचवीस तत्त्वांचा आधार जो आत्मा तो होय. त्याचें ज्ञान जर झालें नाहीं, तर या कर्मांचा काय उपयोग? ' चमत्कारिक गोष्टी सांगणारा हंस ' म्हणजे ईश्वरी ज्ञानाचा आणि मोक्षाचा मार्ग दाखविणारें शास्त्र होय. त्याचें ज्ञान नसतां या असत्कर्मांपासून काय होणार आहे ? ' क्षुर आणि वज्र यांनीं निर्मिलेलें एक सतत फिरणारें चक्र ' म्हणजे काळ; तो स्वतंत्र असून सर्व जगाला ग्रासून क्षीण करीत आहे. तेव्हां हें न ओळखितां फुकट कर्मांचें आचरण करून काय होणार आहे ? ' पित्यानें दिलेली आज्ञा ' म्हणजे ' संसारापासून निवृत्त हो ' ही शास्त्राज्ञा; ती ज्याला कळत नाहीं, त्याला प्रवृत्तिमार्गाच्या अनुरोधानें चाललें असतां काय बरें फायदा होणार आहे ? "

श्रीशुकाचार्य म्हणालेः—परीक्षित राजा, त्या सर्व हर्यश्वांचे एकच विचार होते. ते सर्वजण याप्रमाणें निश्चय ठरवून व नारद मुनींस नमस्कार करून निवृत्तिमार्गाकडे वळले. नंतर नारद मुनिही हरिगुणानुवाद गात गात निघून गेले.

### शबलाश्वांचे जन्म व तप.

परीक्षित राजा, हर्यश्वांनीं निवृत्तिमार्ग स्वीकारिला ही गोष्ट दक्षाच्या कानावर गेली, तेव्हां त्याला फार राग आला व दुःख झालें. परीक्षित राजा, हर्यश्वांसारखे सत्पुत्र जन्मास येणें हें ऐहिकदृष्ट्या दुःखाचें कारण खरेंच ! असो; त्या कालीं ब्रह्मदेवानें चार उपदेशाच्या गोष्टी सांगितल्यावरून, दक्षानें पुनः पांचजनीच्या उदरीं शबलाश्व नांवाचे हजारों पुत्र उत्पन्न केले, व त्यांनाही प्रजा उत्पन्न करण्याची आज्ञा दिली. नंतर तेही त्याच नारायण तीर्थावर तपश्चर्या करण्यास निघून गेले; आणि त्या ठिकाणीं ते ' प्रणव ' मंत्राचा जप करीत जलपान व वायुभक्षण करून तपश्चर्या करूं लागले. तो मंत्र असाः—

ॐनमो नारायणाय पुरुषाय महात्मने।
विशुद्धसत्त्वधिष्ण्याय महाहंसाय धीमही ॥

### नारदाचा शबलाश्वांस उपदेश व त्यांची मुक्ति.

श्रीशुकाचार्य म्हणालेः—परीक्षित राजा, शबलाश्वही प्रजावृद्धीकरितांच तप करीत आहेत, असें पाहून नारद मुनि फिरून तेथें आले. पूर्वी त्यांच्या भावांना त्यांनीं जे कूट प्रश्न विचारिले होते, तेच त्यांनीं यांनाही विचारिले आणि म्हटलें, " दक्षपुत्रहो, मी तुम्हांस कांहीं उपदेश करि

तो लक्षपूर्वक ऐका. भावांवर तुमचें निःसीम प्रेम आहे, म्हणून तुम्ही भावांचेंच अनुकरण करा. जो धर्मज्ञ पुरुष आपल्या भावांच्या चांगल्या आचरणाचें अनुकरण करितो, तोच खरा पुण्यवान होय. त्या त्याच्या आचरणानें त्यास व देवांस आनंद होतो !"

परीक्षित राजा, ह्याप्रमाणें उपदेश करून नारद मुनि निघून गेले;आणि इकडे त्या अमोघ उपदेशाप्रमाणें शबलाश्वांनींही आपल्या बंधूंचेंच अनुकरण करून निवृत्तिमार्गाचा अंगीकार केला. राजा, हा परब्रह्मस्वरूपीं मिळणारा निवृत्तिमार्ग उत्तम परंतु दुर्घट आहे ! गेलेला काळ जसा परत येत नाहीं, तसा या मार्गाला गेलेला मनुष्य फिरून संसारांत येत नाहीं. असो.

### नारदाची निर्भर्त्सना व त्यास शाप.

श्रीशुक मूळ कथेकडे वळून म्हणतात:— राजा परीक्षिता, पूर्वींप्रमाणें याही मुलांना नारदानें मोक्षमार्गास लाविलें, तेव्हां दक्ष प्रजापतीस पुष्कळ अपशकुन झाले व लवकरच तें वर्तमान त्या प्रजापतीस कळलें; त्या समयीं त्याला नारदाचा फार राग आला, व त्याचें अगदीं देहभान सुटलें ! त्या क्रोधावेशांतच तो नारदाकडे जाऊन त्यास म्हणाला, " दुष्टा नारदा, तूं साधूचा वेष घेऊन अज्ञान मुलांना संन्याशांचा मार्ग दाखविलास, तेव्हां तुला काय म्हणावें ? अरे! जन्मतःच मनुष्याला जीं तीन ऋणें असतात, त्यांतून माझे पुत्र मुक्त झाले नसतां व त्यांनीं विहित कर्मांचा विचार देखील केला नसतां, त्यांना तूं मोक्षमार्गाचा उपदेश केलास, आणि इहपरलोकीं मिळणाऱ्या सुखांस त्यांना सर्वस्वीं मुकविलेंस! अरे, तूं निर्लज्ज आणि निर्दय असून मुलांना भलतीच बुद्धि सांगतोस; आणि असें असतां श्रीहरीच्या पार्षदांमध्यें तुझी गणना आहे; तेव्हा ह्याचा अर्थ मला कळत नाहीं ! कारण, भगवद्भक्त नेहमीं मनुष्यांवर दया करितात, आणि तुझें वर्तन तर त्याच्या अगदीं उलट आहे! तुला भगवत्पार्षद किंवा महान भगवद्भक्त असें म्हणावयाचें म्हणजे भगवंताच्या कीर्तीस काळिमाच लावावयाची! अरे, तूं सुहृदांचा बिघाड करणारा व मित्रांना शत्रु बनविणारा पक्का ढोंगी आहेस ! या तुझ्या कृत्यांनीं माझ्या पुत्रांना ज्ञान होईल, असें मात्र नाहीं. ज्ञान उत्पन्न होण्यास स्नेहपाश तुटले पाहिजेत; मनाची स्थिरता झाली पाहिजे; व अंगीं वैराग्य बाणलें पाहिजे. विषय दुःखदायक आहेत हें तत्त्व प्रत्यक्ष अनुभव आल्यावांचून कळत नाहीं; तोच एकवार अनुभव आला म्हणजे जसें आपोआप वैराग्य उत्पन्न होतें, तसें लोकांनीं बुद्धि फिरवून होत नाहीं. कर्म करणें हीच ज्यांची धर्ममर्यादा, अशा आम्हां गृहस्थाश्रमी साधूचें तूं अप्रिय केलेंस तें एक वेळ आम्हीं सोसलें; पण, हे वंशच्छेदका नारदा, ज्या अर्थीं तूं फिरून आमचें अकल्याण केलेंस, त्या अर्थीं, मूर्खा, तूं असाच भटकत फिरशील. तुला कोठेंही थारा मिळणार नाहीं !"

श्रीशुकाचार्य म्हणाले:—राजा, नारद मुनींनीं 'तथास्तु' असें म्हणून दक्षाच्या त्या शापवचनाचा स्वीकार केला. राजा, त्यालाच साधु म्हणावें, कीं जो सामर्थ्य असूनही दुसऱ्यांनीं दिलेलें दुःख आनंदानें सहन करितो !

## अध्याय सहावा.

—:०:—

### दक्षकन्यांचे जन्म व त्यांचे विवाह.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, ह्याप्रमाणें नारदानें दोन वेळां दक्षाचे पुत्रांना संतति होण्यापूर्वींच संसारांतून काढून मोक्षाच्या मार्गास लाविलें, तेव्हां ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून दक्ष प्रजापतीनें आपल्या असिक्नी नांवाच्या स्त्रीपासून साठ कन्या उत्पन्न केल्या.त्या सर्व अत्यंत पितृवत्सल होत्या. त्यांपैकीं धर्माला दहा, कश्यपाला तेरा,

चंद्राला सत्तावीस, भूत, अंगिरा व कृशाश्व यांपैकीं प्रत्येक ऋषीला दोन दोन, आणि बाकीच्या चार कन्या तार्क्ष्य नांवाच्या कश्यपाला दिल्या. या कन्यांपासून पुढें पुष्कळ संतति झाली, आणि तिनें सर्व त्रिभुवन व्यापून टाकलें!

## धर्माचा वंश.

श्रीशुक सांगतातः—परीक्षित राजा, आतां प्रथम तुला धर्माचा वंश सांगतों. धर्माला दहा कन्या दिल्या होत्या. त्यांचीं नांवें—भानु, लंबा, ककुभ्, जामी, विश्वा, साध्या, मरुत्वती, मुहूर्ता, संकल्पा आणि वसु हीं होत. यांपैकीं भानूपासून देवऋषभ व देवऋषभापासून इंद्रसेन नांवाचा मुलगा झाला. लंबेपासून विद्योत, व विद्योतापासून स्तनयित्नु नांवाचे मुलगे झाले. ककुभेपासून संकट नांवाचा मुलगा झाला. या संकटाला कीकट नांवाचा मुलगा झाला, व कीकटापासून पुढें पृथ्वीवरील दुर्गाभिमानी देव उत्पन्न झाले. जामीपासून स्वर्ग व स्वर्गापासून नंदि नांवाचा मुलगा झाला. विश्वेपासून विश्वेदेव नांवाचे पुत्र उत्पन्न झाले; यांना पुढें संतति झाली नाहीं. साध्येपासून साध्य नांवाचे गण, व त्यांपासून अर्थसिद्धि नांवाचा मुलगा झाला. मरुत्वतीपासून मरुत्वान् आणि जयंत असे दोन पुत्र झाले; त्यांपैकीं जयंत हा वासुदेवाचा अंश असून याला उपेंद्र असें म्हणतात. मुहूर्तेपासून मुहूर्ताभिमानी देवगण उत्पन्न झाले. हेच प्राण्यांना आपापल्या मुहूर्तमात्र कालापासून उत्पन्न झालेलें फल देतात. संकल्पेपासून संकल्प नांवाचा मुलगा व त्यापासून काम नांवाचा मुलगा झाला. वसूपासून द्रोण, प्राण, ध्रुव, अर्क, अग्नि, दोष, वसु आणि विभावसु असे आठ पुत्र झाले; यांना 'अष्टवसु' असें म्हणतात. यांपैकीं द्रोणाला त्याच्या अभिमति नांवाच्या स्त्रीपासून हर्ष, शोक, भय इत्यादि पुत्र झाले. प्राणाच्या ऊर्जस्वती नांवाच्या स्त्रीपासून सह, आयु व पुरोजव असे तीन मुलगे झाले. ध्रुवाला धरणि नांवाच्या स्त्रीपासून नानाप्रकारचे नगराभिमानी देव उत्पन्न झाले. अर्काची वासना नांवाची स्त्री होती, तिला तर्षादिक पुत्र झाले. अग्नीला वसोर्धारा नांवाच्या स्त्रीपासून द्रवणक वगैरे पुत्र झाले, व कृत्तिका नांवाच्या स्त्रियांपासून स्कंद नांवाचा मुलगा झाला. स्कंदाला पुढें विशाखादिक पुत्र झाले. दोषाची स्त्री शर्वरी हिजपासून त्याला शिशुमार नांवाचा मुलगा झाला. हा मुलगा श्रीहरीचा अंश होता. वसूची स्त्री अंगिरसि हिजपासून शिल्पाचार्य विश्वकर्मा, व विश्वकर्म्यापासून चाक्षुष मनु नांवाचा मुलगा झाला. या मनूपासून विश्वेदेव व साध्यगण हे मुलगे झाले. विभावसूची स्त्री उषा हिला व्युष्ट, रोचिष आणि आतप असे तीन पुत्र झाले; व पुढें आतपाला पंचयाम (दिवस) नांवाचा मुलगा झाला. या पंचयाम कालांतच सर्व प्राणी नानाविध कर्मांस प्रवृत्त होतात. अहोरात्राचे आठ यामांतून (प्रहरांतून) पंचयाम दिवसाचे पांच याम (प्रहर) कमी केले म्हणजे त्रियाम (तीन प्रहर) अवशिष्ट राहतात, व म्हणूनच रात्रीस त्रियामा असें नांव आहे. रात्रीच्या चार प्रहरांपैकीं आवशीच्या तीन घटका व पहांटेच्या पांच घटका दिवसांत धरीत असतात; असो. याप्रमाणें धर्माला दिलेल्या दहा कन्यांचा विस्तार होय.

## भूत, अंगिरा व कृशाश्व यांची संतति.

भूत नामक ऋषीला सरूपा आणि भूता या दोन कन्या दिल्या होत्या. त्यांपैकीं सरूपेपासून कोट्यवधि रुद्र उत्पन्न झाले, आणि भूतेपासून रैवत, अज, भव, भीम, वाम, उग्र, वृषाकपि, अजैकपाद, अहिर्बुध्न्य, बहुरूप आणि महान् या अकरा रूपांनीं युक्त अशा रुद्राचे भूत, प्रेत, विनायक इत्यादिक जे भयंकर पार्षद ते उत्पन्न झाले. अंगिरा नांवाच्या ऋषीला स्वधा आणि सती या दोन कन्या दिल्या होत्या; त्यांपैकीं स्वधेपासून पितर झाले, व सतीपासून अथर्वांगिरस

नांवाचा वेद झाला. कृशाश्व ऋषीला आर्चिस् व शिषणा अशा दोन कन्या दिल्या होत्या; त्यांपैकीं आर्चिषेला धूम्रकेश व शिषणेला वेदशिरस्, देवल, वयुन आणि मनु असे चार पुत्र झाले.

### तार्क्ष्य कश्यपाची संतति.

तार्क्ष्य नांवाच्या कश्यपाला विनता, कद्रू, पतंगी व यामिनी या चार कन्या दिल्या होत्या. यांपैकीं विनतेचें दुसरें नांव सुपर्णा असें होतें. हिजपासून गरुड व अरुण असे दोन पुत्र झाले. अरुणाचें दुसरें नांव अनूरु असें आहे. हें नांव पडण्याचें कारण असें आहे कीं, याचा गर्भ पूर्ण न वाढल्यामुळें याच्या शरिराची आकृति मांड्यांपर्यंतच तयार झालेली होती. तार्क्ष्याची दुसरी स्त्री कद्रू हिजपासून अनेक सर्प ( नाग ) उत्पन्न झाले. तिसरी स्त्री पतंगी हिजपासून पक्षी, व चौथी स्त्री यामिनी हिजपासून टोळ ( शलभ ) उत्पन्न झाले.

### चंद्राचें वृत्त.

चंद्राला ज्या सत्तावीस कन्या दिल्या होत्या, त्या कृत्तिकादिक सत्तावीस तारका होत. यांपैकीं रोहिणीवर चंद्राची अतिशय प्रीति असल्यामुळें तो इतरांची उपेक्षा करूं लागला. तेव्हां दक्षाला राग येऊन त्यानें चंद्राला शाप दिला. त्या शापानें चंद्र क्षयरोगी झाला, यामुळें त्याला संतति झाली नाहीं. पुढें संतति होण्याकरितां चंद्रानें दक्षाला प्रसन्न करून घेऊन उच्छाप मागितला, परंतु त्यानें कृष्णपक्षामध्यें क्षय पावणाऱ्या व शुक्लपक्षामध्यें वाढत जाणाऱ्या अशा सोळा कला मात्र चंद्राला दिल्या; संतति दिली नाहीं !

### कश्यपाची संतति.

कश्यपाला ज्या तेरा कन्या दिल्या होत्या, त्यांचीं नांवें—आदिति, दिति, दनु, काष्ठा, अरिष्टा, सुरसा, इला, मुनी, क्रोधवशा, ताम्रा, सुरभि, सरमा आणि तिमि हीं होत. या तेरा कन्यांपासून जो मोठा वंशविस्तार झाला, तो सांगतों: तिमीपासून पाण्यांत वास करणारे प्राणी, व सरमेपासून वाघ आदिकरून रानांत राहणारे प्राणी उत्पन्न झाले. सुरभीपासून—ज्यांच्या पायाला दोन गेळें आहेत असे म्हशी, गाई इत्यादि प्राणी उत्पन्न झाले. ताम्रेपासून श्येन, गृध्र इत्यादिक क्रूर पक्षी, व क्रोधवशेपासून दंदशूकादिक सर्प उत्पन्न झाले. मुनीपासून अप्सरांचे समुदाय, व इलेपासून सर्व प्रकारचे वृक्ष उत्पन्न झाले. सुरसेपासून यातुधान नांवाचा राक्षसगण उत्पन्न झाला. अरिष्टेचे गंधर्व, व काष्ठेचे एक खुराचे घोडा आदिकरून पशु हे पुत्र होत. दनूला एकसष्ट पुत्र; त्यांपैकीं अठरा मुख्य होते. त्यांचीं नांवें—द्विमूर्धा, शंबर, अरिष्ट, हयग्रीव, विभावसु, अयोमुख, शंकुशिरा, स्वर्भानु, कपिल, अरुण, पुलोमा, वृषपर्वा, एकचक्र, अनुतापन, धूम्रकेश, विरूपाक्ष, विप्रचित्ति आणि दुर्जय हीं होत. यांपैकीं स्वर्भानूच्या स्वप्रभा नांवाच्या कन्येशीं नमुचीनें विवाह केला, व वृषपर्व्याच्या शर्मिष्ठा नांवाच्या मुलीशीं, नहुष राजाचा महापराक्रमी पुत्र ययाति राजा यानें विवाह केला. दनूचा वैश्वानर नांवाचा मुलगा होता; त्याला, रूपानें अतिशय सुंदर अशा उपदानवी, हयशिरा, पुलोमा आणि कालका अशा चार मुली होत्या. त्यांपैकीं उपदानवीशीं हिरण्याक्षानें, व हयशिरेशीं क्रतूनें विवाह केला; आणि दुसऱ्या दोन कन्यांबरोबर कश्यप नांवाच्या प्रजापतीनें ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून विवाह केला. या दोन कन्यांचे ठिकाणीं पौलोम व कालकेय असे निवातकवच नांवाचे साठ हजार दानव उत्पन्न झाले. हे युद्धकलेमध्यें मोठे निष्णात होते. हे यज्ञांचा नाश करीत असत; म्हणून, हे परीक्षित राजा, तुझा आजा अर्जुन यानें स्वर्गांत जाऊन ह्या यज्ञध्वंसक दानवांचा एकट्यानें संहार करून टाकिला, व यामुळें इंद्राला मोठें समाधान वाटलें! तसेच विप्रचित्तीला सिंहिका नांवाचे स्त्रीपासून

एकशें एक पुत्र झाले, त्यांत राहु नांवाचा मुलगा वडील होता; व त्यापेक्षां लहान केतु नांवाचे शंभर मुलगे होते. हे राहु व केतु ग्रह होऊन राहिले आहेत. कश्यपाची जी अदिति नांवाची स्त्री, तिच्या वंशामध्यें प्रत्यक्ष भगवान नारायण आपल्या अंशानें उत्पन्न झाला. हिला बारा पुत्र झाले, त्यांचीं नांवें—विवस्वान, अर्यमा, पूषा, त्वष्टा, सविता, भग, धाता, विधाता, वरुण, मित्र, शक्र आणि उरुक्रम. यांना 'द्वादशादित्य' म्हणतात. ह्यांपैकीं विवस्वानाची महाभाग्यशाली स्त्री संज्ञा हिला श्राद्धदेव नांवाचा मनु आणि यमदेव व यमुना हें जुळें अशीं दोन मुलें झालीं. पुढें ही संज्ञा स्त्री घोडीचें रूप घेऊन पृथ्वीवर गेली असतां तिला अश्विनीकुमार नांवाचे दोन मुलगे झाले. विवस्वानाची दुसरी स्त्री छाया नांवाची होती, तिला शनैश्चर व सावर्णि नांवाचा मनु असे दोन मुलगे व तपती नांवाची मुलगी अशीं तीन मुलें झालीं. या तपतीनें संवरणाबरोबर विवाह केला. अर्यमा आदित्याची स्त्री मातृका होय. हिला कृताकृतज्ञानानें युक्त असे पुष्कळ पुत्र झाले, व त्या पुत्रांनाही पुढें पुष्कळ संतति झाली. या संततींमध्यें पूर्वापर अनुसंधान राखण्याचें ज्ञान असल्यामुळें ब्रह्मदेवानें या वंशाला मनुष्यजाति असें म्हटलें आहे. दक्ष प्रजापतीवर रागावलेल्या शंकराला दांत बाहेर काढून जो हसला, आणि यामुळें त्याचे दांत पडले व तेणेंकरून ज्याला नेहमीं पीठ खाणें भाग पडलें, असा पूषा नांवाचा आदित्य मीं तुला [ चौथ्या स्कंधामध्यें ] सांगितला, तोच हा अदितीचा मुलगा होय. याला संतति झाली नाहीं. त्वष्टा नांवाच्या आदित्यानें दैत्यांची धाकटी बहीण रचना हिजबरोबर लग्न केलें. याला सन्निवेष आणि विश्वरूप असे दोन मुलगे झाले. विश्वरूप हा मोठा पराक्रमी होता. जेव्हां देवांचा गुरु बृहस्पति यानें आपला अपमान झाल्यामुळें देवांचा पक्ष सोडून दिला होता, तेव्हां देवांनीं या विश्वरूपाला—जरी तो शत्रूंचा म्हणजे दैत्यांचा नातू होता तरी—आपला गुरु केला होता.

# अध्याय सातवा.

—:०:—

## देवगुरूचा अपमान.

परीक्षित राजा म्हणालाः—मुनिवर्य, देवांनीं असा कोणता अपराध केला होता, कीं त्यामुळें त्यांच्या गुरूनें त्यांचा पक्ष सोडिला ?

श्रीशुकाचार्य म्हणतातः—राजा, इंद्रानें त्रिभुवनाच्या ऐश्वर्यामुळें उन्मत्त होऊन सभेंत गुरूचा अपमान केलाः एके वेळीं मरुद्गण, वसु, रुद्र, आदित्य, ऋभु, विश्वेदेव, साध्य, अश्विनीकुमार, सिद्ध, गंधर्व, चारण व ब्रह्मवेत्ते मुनि असे सर्व सभेमध्यें बसले होते. इंद्रही आपल्या उच्च सिंहासनावर इंद्राणीसह बसला होता. त्याच्या मस्तकावर चंद्रमंडलासारखें शुभ्र छत्र विराजत असून चामरादिक दुसरीं राजचिन्हें आसमंताद्भागीं शोभत होतीं. सभोंवतीं विद्याधर, अप्सरा, गंधर्व, किन्नर हे मनोहर गायन करीत होते; आणि पक्षी व नाग हेही आपापल्यापरी इंद्राच्या शुश्रूषेंत निमग्न होते. इतक्यांत, इंद्रादि सर्व देवांचे गुरु श्रेष्ठ बृहस्पति तेथें प्राप्त झाले; पण ज्याला सर्व देव व दैत्य वंदन करितात, तो गुरुवर्य समीप आला असतां इंद्र आपल्या आसनावरून हालला नाहीं ! आणि तें पाहून, ऐश्वर्यमदाधत्वाचा परिणाम ओळखणारा तो महासमर्थ व महाज्ञानी बृहस्पति निमूटपणें तेथून निघून गेला ! ह्याप्रमाणें तो निघून गेल्यावर इंद्राच्या लक्षांत आलें कीं, आपल्याकडून गुरूचा अवमान झाला हें ठीक झालें नाहीं. परीक्षित राजा, तेव्हां

### इंद्राला पश्चात्ताप

झाला; आणि त्यानें स्वमुखानें आपली निर्भर्त्सना करून घेतली ! तो म्हणाला, "अहो, मीं ऐश्वर्य-

मदानें उन्मत्त होऊन आज केवढा तरी अपराध केला ! प्रत्यक्ष गुरु बृहस्पति सभेंत आले असतां मीं त्यांचा उपमर्द केला, तेव्हां किती माझ्या बुद्धीला भ्रंश झाला हा ! मला आतां त्याबद्दल फार वाईट वाटतें. कोणीही सुज्ञ पुरुष ह्या इंद्रपदाची इच्छा करील काय ? कारण ह्या पदाला येऊन पोहोंचलेल्या मला, लक्ष्मीनें दैत्यांच्या स्थितीला नेऊन पोहोंचविलें ! ह्या सिंहासनावर बसणारांनीं कोणालाही उत्थापान देऊं नये, असें जर कोणी सांगेल, तर त्याला धर्मतत्त्व कळत नाहीं, असें मी म्हणतों; असा सांगणारा अधोगतीस जाईल, आणि त्याचा उपदेश ऐकणाराचीही तीच स्थिति होईल. आतां मी त्यांजकडे जातों, आणि त्यांचे चरण घट्ट धरून मजकडून घडलेल्या अपराधाची क्षमा मागतों." परीक्षित राजा, इंद्र आपल्याकडे येणार आहे, हें जाणून भगवान बृहस्पति आत्ममायेनें गृहांतून गुप्त झाले. स्वर्गाधिपति इंद्रानें गुरु कोठें आहेत म्हणून मनांत विचार केला, त्यानें त्यासंबंधानें इतर देवांसही विचारिलें, पण व्यर्थ; आणि अखेरीस इंद्रास मोठी चिंता पडली !

### देवांचा पराभव.

परीक्षित राजा, इकडे सर्व हकीकत दैत्यांच्या कानावर गेली, तेव्हां त्यांनीं शुक्राचार्यांचें अनुमत घेऊन आपलीं शस्त्रें उचललीं, आणि ते देवांचा पराभव करण्यास निघाले. त्यांनीं तत्काल देवलोकीं येऊन देवांवर आपल्या तीक्ष्ण बाणांचा प्रहार करण्यास आरंभ केला, व त्यामुळें कित्येक देव घायाळ झाले; तेव्हां ते सर्व देव इंद्रासहवर्तमान ब्रह्मदेवाला शरण गेले. त्यांची ती दुर्दशा पाहून ब्रह्मदेवाच्या अंतःकरणांत करुणा उत्पन्न झाली; आणि त्यानें

### देवांचें सांत्वन

करून म्हटलें, "देवहो, ऐश्वर्यामुळें मदांध होऊन तुम्हीं एका इंद्रियनिग्रही ब्राह्मणाचा अवमान केला, ही गोष्ट तुमच्याकडून फार वाईट घडली. तुमच्यापेक्षां दैत्य निर्बळ असतां त्यांनीं तुमचा पराभव केला, हें त्या अपराधाचेंच फळ आहे. इंद्रा, तुझ्या शत्रूंची स्थिति पहा. तेही एकदा आपल्या गुरूंचा अवमान केल्यामुळें निर्बळ झाले होते; परंतु पुनः त्यांनीं त्यांची एकनिष्ठपणें सेवा करून त्यांस प्रसन्न करून घेतलें; आणि त्यामुळेंच ते इतके बळाढ्य झाले आहेत कीं, ते माझेंही स्थान घेऊं शकतील ! ज्यांना शुक्राचार्यांनीं मंत्र शिकविले आहेत, व ज्यांची मसलत कधींही बाहेर फुटत नाहीं, त्यांना कशाचें भय आहे ? तथापि ब्राह्मण, विष्णु आणि गाई ह्यांची ज्यांच्यावर पूर्ण कृपा असेल, त्यांचें कधींही अकल्याण होणार नाहीं; याकरितां, तुम्हीं आतां त्वष्टयाचा पुत्र जो आत्मज्ञानी ब्राह्मण विश्वरूप, त्याचा लवकर आश्रय करा; त्याचा ओढा दैत्यांकडे जरी विशेष आहे, तरी ती गोष्ट सहन करून तुम्ही त्याची उत्तम शुश्रूषा ठेवा, म्हणजे तो तुमचें कार्य सिद्धीस नेईल."

### विश्वरूपास पुरोहित होण्याविषयीं विनंती.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, ब्रह्मदेवाचें हें भाषण ऐकून देवांना धीर आला. नंतर ते तत्काल त्वष्टयाच्या पुत्राकडे गेले, आणि त्याला आलिंगन देऊन म्हणाले, "आम्ही तुझ्याकडे पाहुणे आलों आहों. तुझें कल्याण असो. ह्या वेळीं तूं पितरांची इच्छा पूर्ण कर. ब्राह्मणा, पितरांची सेवा करणें हाच ब्रह्मनिष्ठ सुपुत्राचा धर्म होय. आचार्य हा मूर्तिमान वेद; पिता म्हणजे प्रत्यक्ष ब्रह्मदेव; भाऊ म्हणजे इंद्राची मूर्ति; माता म्हणजे पृथ्वीचा अवतार; बहीण ही केवळ दया; अतिथि हा प्रत्यक्ष धर्माचा अवतार; अभ्यागत हा अग्निमूर्ति; आणि सर्व भूतें हीं आपलीं रूपें होत. ब्राह्मणा, शत्रूपासून पराभव होतो म्हणून तुझे वडील पीडित झाले आहेत; ह्यास्तव त्यांची पीडा दूर व्हावी म्हणून तूं एक काम पतकर.

आम्ही तुला आपला उपाध्याय करितों, म्हणजे तुझ्या प्रभावानें आम्हांला आमच्या शत्रूंचा पराभव करण्याचें सामर्थ्य येईल. तूं आमचा उपाध्याय झालास म्हणजे, तूं लहान असल्यामुळें आम्हीं तुला वंदन करणें योग्य नाहीं, अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. कारण, ज्याला मंत्रज्ञान आहे असा ब्राह्मण केवढाही असला तरी त्याला सर्वांनीं वंदन करावें असें शास्त्रच आहे."

**विश्वरूपाकडून पौरोहित्यस्वीकार.**

परीक्षित राजा, देवांनीं त्या तपस्वी विश्वरूपाची अशी प्रार्थना केली, तेव्हां त्याचें मन प्रसन्न झालें; आणि तो देवांना म्हणाला, "देवहो ! आम्हीं शिलवृत्तीनें किंवा उंछवृत्तीनें राहून या गृहस्थाश्रमांत आनंदानें आपला निर्वाह करून साधूंचा सत्कार करितों. तेव्हां ती शिलोंछवृत्ति सोडून, धार्मिक पुरुष ज्याची निंदा करितात आणि ज्यापासून ब्रह्मतेजाचा क्षय होतो, तें तुमचें उपाध्यायत्व स्वीकारणें मला अयोग्य वाटतें. पण ज्या अर्थी आपण माझे धनी आणि लोकांचे पालक असून मजपाशीं एवढीशी मागणी करितां, त्या अर्थी मी 'नाहीं' म्हणत नाहीं. मी स्वतांचे प्राण आणि पुरुषार्थ खर्ची घालून तुमचे हेतु पूर्ण करीन."

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, त्या विश्वरूपानें देवांना वचन दिल्याप्रमाणें दक्षतापूर्वक त्यांचें पुरोहितत्व करून, विष्णुविद्येच्या सामर्थ्यानें इंद्राचें रक्षण केलें; आणि त्या विद्येच्या प्रभावानें इंद्राकडून दैत्यांचा पराभव करवून दैत्यांची सर्व संपत्ति हरण केली. राजा, विश्वरूप मोठा उदार होता. शेवटीं त्यानें ती वैष्णवी विद्या इंद्राला सांगितली !

# अध्याय आठवा.

—:०:—

## नारायणकवचाचें परीक्षितास निवेदन.

परीक्षित म्हणाला:—शुक मुने, ज्या विद्येच्या योगानें इंद्रानें आपल्या शत्रूंचा सहज पराभव केला, व त्रैलोक्याची संपत्ति मिळविली, ती नारायणकवच नांवाची विद्या आपण मला सांगावी.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—राजा, विश्वरूपानें इंद्राला ज्या 'नारायणकवच' नामक मंत्राचा उपदेश केला, तो मी तुला सांगतों, ऐक.

विश्वरूप म्हणाला:—हे इंद्रा, पुरुषानें हातपाय धुऊन उत्तरेकडे मुख करून बसावें, आचमन करून पवित्रक घालावें, आणि चित्त शुद्ध करून मौनव्रत धरावें. मंत्राच्या योगेंकरून हस्तपादादिक अवयवांच्या ठिकाणीं न्यास करावा, आणि भय प्राप्त झालें असतां नारायणकवच धारण करावें. पाय, गुडघे, मांड्या, उदर, हृदय, वक्षस्थल, मुख व शिर ह्या अवयवांवर, ॐकारापासून आरंभ करून "ॐनमो नारायणाय" हीं अक्षरें अनुक्रमें उलटीं किंवा सुलटीं न्यासावीं. नंतर "ॐ नमो भगवते वासुदेवाय" या द्वादशाक्षरी मंत्रानें करन्यास करावे. प्रणवापासून आठ अक्षरें उजव्या तर्जनीपासून डाव्या तर्जनीपर्यंत न्यासावीं, आणि बाकीचीं चार दोन्हीं अंगुष्ठांच्या पहिल्या व शेवटच्या पेऱ्यांवर स्थापन करावीं. "ॐ विष्णवे नमः" या मंत्रांतील 'ॐ' कार हृदयीं न्यासावा; मस्तकावर 'वि' कार स्थापावा; भ्रुकुटीमध्यें 'ष' कार न्यासावा; शिखेमध्यें 'ण' कार स्थापावा; नेत्रांवर 'वे' कार न्यासावा; सर्व सांध्यांवर 'न' काराचा न्यास करावा; व 'म' कार हें अस्त्र आहे असें कल्पावें. त्या 'म' काररूप अस्त्राला विसर्ग जोडून व शेवटीं 'फट्' हा शब्द लावून त्याची सर्व दिशांकडे योजना करावी; म्हणजे "ॐमः फट् इति दिग्बंधः" असें दिशांचें बंधन करावें. असें केलें म्हणजे तो पुरुष "ॐ विष्णवेनमः" ह्या मंत्रानें युक्त होतो. नंतर त्यानें परमात्म्याचें ध्यान करावें. इंद्रा, परमात्मा हाच ध्यानाचा मुख्य विषय होय. षड्गुण ऐश्वर्यांनीं तो युक्त आहे; आणि विद्या, तेज व तप ह्यांची तो मूर्तिच आहे. परमात्म्याचें ध्यान केल्यावर त्या पुरुषानें 'नारायणकवच' मंत्राचा पाठ करावा. तो मंत्र असा:—

## नारायणकवच मंत्र.

ॐ हरिर्विदध्यान्मम सर्वरक्षां न्यस्तांघ्रिपद्मः पतगेंद्रपृष्ठे ।
दरारिचर्मासिगदेषुचापपाशान्दधानोऽष्टगुणोऽष्टबाहुः ॥
जलेषु मां रक्षतु मत्स्यमूर्तिर्यादोगणेभ्यो वरुणस्य पाशात् ।
स्थलेषु मायावटुवामनोऽव्यात्त्रिविक्रमः खेऽवतु विश्वरूपः ॥
दुर्गेष्वटव्याजिमुखादिषु प्रभुः पायान्नृसिंहोऽसुरयूथपारिः ।
विमुंचतो यस्य महाट्टहासं दिशो विनेदुर्न्यपतंश्च गर्भाः ॥
रक्षत्वसौ माऽध्वनि यज्ञकल्पः स्वदंष्ट्रयोन्नीतधरो वराहः ।
रामोऽद्रिकूटेष्वथ विप्रवासे सलक्ष्मणोऽव्याद्भरताग्रजो स्मान् ॥
मामुग्रधर्मादखिलात्प्रमादान्नारायणः पातु नरश्च हासात् ।
दत्तस्त्वयोगादथ योगनाथःपायाद्गुणेश कपिलः कर्मबंधात् ॥
सनत्कुमारोऽवतु कामदेवाद्धयशीर्षा मां पथि देवहेलनात् ।
देवर्षिवर्यः पुरुषार्चनांतरात्कूर्मो हरिर्मा निरयादशेषात् ॥
धन्वंतरिर्भगवान्पात्वपथ्याद्द्वंद्वाद्भयादृषभो निर्जितात्मा ।
यज्ञश्च लोकादवताज्जनांताद्बलो गणात्क्रोधवशादहींद्रः ॥
द्वैपायनो भगवानप्रबोधाद्बुद्धस्तु पाखंडगणात्प्रमादात् ।
कल्किः कलेः कालमलात्प्रपातु धर्मावनायोरुकृतावतारः ॥
मां केशवो गदया प्रातरव्याद्गोविंद आसंगवमात्तवेणुः ।
नारायणः प्राह्ण उदात्तशक्तिर्मध्यंदिने विष्णुररींद्रपाणिः ॥
देवोऽपराह्णे मधुहोग्रधन्वा सायं त्रिधामाऽवतु माधवो माम् ।
दोषे हृषीकेश उताऽऽर्धरात्रे निशीथ एकोऽवतु पद्मनाभः ॥
श्रीवत्सधामाऽपररात्र ईशः प्रत्यूष ईशोऽसिधरो जनार्दनः ।
दामोदरोऽव्यादनुसन्ध्यं प्रभाते विश्वेश्वरो भगवान्कालमूर्तिः ॥
चक्रं युगांतानलतिग्मनेमि भ्रमत्समंताद्भगवत्प्रयुक्तम् ।
दंदग्धि दंदग्ध्यरिसैन्यमाशु कक्षं यथा वातसखो हुताशः ॥
गदेऽशनिस्पर्शनविस्फुलिंगे निष्पिंढि निष्पिंढ्यजितप्रियाऽसि ।
कूष्मांडवैनायकयक्षरक्षोभूतग्रहांश्चूर्णय चूर्णयारीन् ।
त्वं यातुधानप्रमथप्रेतमातृपिशाचविप्रग्रहघोरदृष्टीन् ।
दरेंद्र विद्रावय कृष्णपूरितो भीमस्वनोऽरेर्हृदयानि कंपयन् ॥
त्वं तिग्मधारासिवरारिसैन्यमीशप्रयुक्तो मम छिंधि छिंधि ।
चक्षूंषि चर्मन् शतचंद्र छादय द्विषामघोनां हर पापचक्षुषाम् ॥
यन्नो भयं ग्रहेभ्योऽभूत्केतुभ्यो नृभ्य एव च ।
सरीसृपेभ्यो दंष्ट्रिभ्यो भूतेभ्योंऽहोभ्य एव वा ॥
सर्वाण्येतानि भगवन्नामरूपास्त्रकीर्तनात् ।
प्रयांतु संक्षयं सद्यो येनः श्रेयःप्रतीपकाः ॥
गरुडोभगवान्स्तोत्रस्तोभश्छंदोमयः प्रभुः ।
रक्षत्वशेषकृच्छ्रेभ्यो विष्वक्सेनः स्वनामभिः ॥
सर्वापद्भ्यो हरेर्नामरूपयानायुधानि नः ।
बुद्धींद्रियमनःप्राणान्पांतु पार्षदभूषणाः ॥

यथा हि भगवानेव वस्तुतः सदसच्च यत्।
सत्येनानेन नः सर्वे यांतु नाशमुपद्रवाः॥
यथैकात्म्यानुभावानां विकल्परहितः स्वयम्।
भूषणायुधलिंगाख्या धत्ते शक्तिः स्वमायया॥
तेनैव सत्यमानेन सर्वज्ञो भगवान्हरिः।
पातु सर्वैः स्वरूपैर्नःसदा सर्वत्र सर्वगः॥
विदिक्षु दिक्षूर्ध्वमधःसमंतादंतर्बहिर्भगवान्नारसिंहः।
प्रहापयँल्लोकभयं स्वनेन स्वतेजसा ग्रस्तसमस्ततेजाः॥

'जो पक्षिराज गरुडावर बसून फिरणारा, ज्याला आठ हात असून त्या हातांमध्यें जो शंख, चक्र, ढाल, तलवार, गदा, बाण, धनुष्य आणि पाश हीं धारण करणारा, आणि जो अष्ट-सिद्धींनीं युक्त, तो श्रीहरि सर्व ठिकाणीं सर्व काळीं माझें रक्षण करो. उदकामध्यें वरुणपाशरूप जलचर प्राण्यांपासून मत्स्यावतार धारण करणारा विष्णु जमिनीवर स्वमायेनें वामनरूप धारण करणारा त्रिविक्रम, व आकाशामध्यें विश्वरूप घेणारा परमेश्वर माझें रक्षण करो. ज्याच्या प्रचंड अट्टहासाचे (खिदळण्याच्या) शब्दानें दाही दिशा दणाणून गेल्या व असुरांच्या स्त्रियांचे गर्भ गळून पडले, तो हिरण्यकशिपूला मारणारा नृसिंह, अरण्य व युद्ध यांमध्यें आलेल्या संकटांपासून माझें रक्षण करो. तसेंच, वराहाचें रूप धारण करून आपल्या दाढेवर पृथ्वीला वेऊन वर येणारा परमेश्वर मार्गामध्यें माझें रक्षण करो. पर्वतांचे शिखरांवर परशुराम, आणि प्रवासांत लक्ष्मणासह दाशरथि राम माझें रक्षण करो. जारणमारणादिक उग्र धर्माचें आचरण व इतर अनेक दोष यांपासून श्रीनारायण माझें रक्षण करो. गर्वापासून नर व योगभ्रंशापासून दत्तात्रेय माझें रक्षण करो. कर्मबंधापासून कपिल महामुनि, व कामवासनेपासून सनत्कुमार माझें रक्षण करोत. वाटेनें जात असतांना, मध्यें एखादे ठिकाणीं देव असल्यास, येथें देव आहे हें मला माहीत नसल्यामुळें, माझे हातून त्या देवाची अवज्ञा होईल तर म्हणजे त्याला नमस्कार वगैरे करणें माझे हातून चुकलें तर अशा प्रकारच्या अपराधांपासून हयग्रीव माझें संरक्षण करो. देवपूजेसंबंधी होणाऱ्या अपराधांपासून महान ऋषि नारद, व सर्व नरकांपासून कूर्म अवतार घेणारा श्रीहरि माझें रक्षण करो. माझ्या हातून जे कुपथ्य होईल, त्यापासून भगवान धन्वंतरि मला राखो. थंडी, उष्णता इत्यादिकांच्या भयापासून ऋषभ योगी, लोकांच्या अपवादापासून यज्ञमूर्ति परमात्मा, लोकोपद्रवापासून बलराम, आणि थोडा धक्का लागला तरी चवताळून मारण्याची इच्छा करणारे जे सर्पादिक प्राणी, त्यांपासून भगवान शेष माझें रक्षण करो. अज्ञानापासून भगवान वेदव्यास, पाखंडी लोकांच्या समुदायापासून व इतर अपराधांपासून बुद्ध, आणि प्रत्येक वेळीं होणाऱ्या पापांपासून धर्म रक्षण करणारा कल्कि माझें रक्षण करो. दिवसाच्या तीस घटकांपैकीं प्रातःकाळीं पांच घटिका दिवसपर्यंत गदाधारी केशव, पांचपासून दहा घटिका दिवसपर्यंत मुरलीधर गोविंद, दहापासून पंधरा घटिकांपर्यंत शक्ति नांवाचें आयुध धारण करणारा नारायण, पंधरांपासून वीस घटिका दिवसपर्यंत हातामध्यें चक्र घेणारा विष्णु, विसांपासून पंचवीस घटिकांपर्यंत मधुसूदन, व पंचवीसपासून तीस घटिका दिवसपर्यंत ब्रह्मादि

तिन्ही मूर्ति धारण करणारा माधव माझें रक्षण करो. तसेंच, रात्रौ प्रदोषकालपर्यंत म्हणजे तीन घटका रात्रपर्यंत हृषीकेश, पुढें अर्धरात्रीपर्यंत पद्मनाभ, अर्धरात्रीपासून सव्वीस घटिका रात्रपर्यंत श्रीवत्सलांच्छन, नंतर अरुणोदयाचे वेळीं म्हणजे अठ्ठावीस घटिका रात्रपर्यंत खड्ग धारण करणारा जनार्दन, पुढें सूर्योदयापर्यंत श्रीदामोदर, आणि दिवस व रात्र यांच्या संधीच्या वेळीं भगवान विश्वेश्वर माझें रक्षण करो. हे सुदर्शन चक्रा, तुला भगवंतानें आमच्या भोंवतीं फिरण्याची आज्ञा केली आहे, त्याप्रमाणें त्वां आमच्या सभोंवतीं फिरावें. तूं प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें चपळ आहेस. तेव्हां अग्नीला वाऱ्याचें साहाय्य मिळालें असतां ज्याप्रमाणें तो वाळून गेलेलें गवत तात्काळ जाळून टाकितो, त्याप्रमाणें तूं आमच्या भोंवतीं फिरून आमच्या शत्रूंच्या सैन्याला जाळून त्याची राखरांगोळी करून टाक. हे गदे, तुझ्या नुसत्या ठिणगीचा स्पर्श झाला तर इंद्राच्या वज्राचा आघात झाला असें वाटतें, इतकी तूं पराक्रमी आहेस; तूं परमेश्वराला आवडतेस व मीही त्याचा दास असल्यामुळें त्याला आवडतों; तेव्हां कूष्मांड, वैनायक, यक्ष, राक्षस, भूत व ग्रह हे जे माझे शत्रु, यांचे तूं भगदों पीठ करून टाक. हे पांचजन्य शंखा, भगवान श्रीकृष्णानें तुला फुंकिलें असतां त्या आवाजानें शत्रूंचीं हृदयें थरथर कांपावयास लागतात; तर यातुधान, प्रमथ, प्रेत, मातृगण, पिशाच, ब्रह्मराक्षस व आणखीही अशाच तऱ्हेचे भयंकर कृत्यें करणारे जे असतील, त्यांना तूं पळवून लाव. हे तीक्ष्ण खड्गा, ईश्वरानें तुला सांगितल्याप्रमाणें तूं माझ्या शत्रूंच्या सैन्याला कापून टाक. हे शतचंद्र चर्मा, तूं माझ्या शत्रूंच्या डोळ्यांना दिपवून सोड; व पातकें करण्याकडे ज्यांची दृष्टि आहे, त्यांना अंध बनव. हे भगवन्, सूर्यादिक ग्रहांपासून, उल्कापातादि केतूंपासून, दुष्ट लोकांपासून, साप, विंचू इत्यादि विषारी प्राण्यांपासून, वाघ, सिंह इत्यादि क्रूर श्वापदांपासून, भूतप्रेतादिकांपासून, आणि पातकांपासून मला जीं भयें प्राप्त झालीं आहेत, तीं, आणि जे माझ्या इच्छित हेतूंच्या आड येणारे यक्षराक्षसादिक असतील तेही सर्व, तुझें नांव, रूप आणि अस्त्र यांचा उच्चार केला असतां समूळ नाश पावोत. त्याचप्रमाणें, स्तोत्रादिकांनीं ज्याची स्तुति केली आहे, तो वेदमूर्ति गरुड व विष्वक्सेन नांवाचा पार्षद आपल्या नामादिकांनीं सर्व संकटांपासून माझें रक्षण करो. तशींच श्रीहरीचीं नांवें, रूपें, वाहनें, आयुधें व पार्षद हे आमच्या बुद्धीचें, इंद्रियांचें, मनाचें आणि प्राणांचें सर्व संकटांपासून संरक्षण करोत. डोळ्यांनीं जें दिसतें व दिसत नाहीं, तें सर्व जग ईश्वरस्वरूप आहे, हें जर खरें आहे, तर त्याच्या योगानें आम्हांस होणारे सर्व उपद्रव नाश पावोत. ईश्वर, सर्व ठिकाणीं आत्मस्वरूपाचें चिंतन करणाऱ्या ज्ञानी पुरुषांना, एकरूप असतांना, आपल्या मायेच्या योगानें निरनिराळीं भूषणें, आयुधें, मूर्ति व नांवें हीं धारण करणारा भासतो; हें जर खरें असेल, तर त्याच्या योगानें सर्व जाणणारा व सर्व ठिकाणीं गमन करणारा असा श्रीहरि आपल्या निरनिराळ्या स्वरूपांनीं आमचें सदोदीत सर्वत्र रक्षण करो; आणि आपल्या शब्दानें सर्व लोकांची भीति दूर करणारा व आपल्या तेजानें इतर सर्व तेजें ग्रासून टाकणारा महापराक्रमी नरसिंह, सर्व दिशा, ऊर्ध्व प्रदेश, अधःप्रदेश, सभोंवार, आंत व बाहेर अशा सर्व ठिकाणीं आमचें रक्षण करो.'

श्रीशुक म्हणाले:—परीक्षित राजा, ह्याप्रमाणें विश्वरूपानें इंद्राला नारायणकवचाचा उपदेश केला व म्हटलें, "इंद्रा, हें कवच तूं धारण कर, म्हणजे दैत्यांचा तूं सहज पराभव करशील. हें कवच जो धारण करील, त्याला कसलीही भीति उरणार नाहीं. इंद्रा, एका

**नारायणकवचधृत ब्राह्मणाची गोष्ट** तुला सांगतों: पूर्वी कौशिक नांवाचा एक तपोनिष्ठ ब्राह्मण या कवचाचा जप करीत असे. त्यानें योगधारणेच्या योगानें मरुधन्व देशांत आपल्या शरिराचा त्याग केला. एके वेळीं चित्ररथ गंधर्व विमानांत बसून आपल्या स्त्रियांसह फिरत असतां, जेथें त्या ब्राह्मणानें आपल्या शरिराचा त्याग केला होता, त्या जागेच्या वर आकाशांत तो आला. तेथें येतांक्षणींच तो विमानासह उलटा होऊन खालीं भूमीवर पडला. तेव्हां तेथें असलेल्या वालखिल्य ऋषींनीं, त्या गंधर्वाला, त्या स्थळीं मृत झालेल्या कौशिक ऋषीच्या अस्थि पूर्ववाहिनी सरस्वती नदींत टाकण्यास सांगितलें; आणि त्यांच्या आज्ञेप्रमाणें चित्ररथानें करून स्नान केल्यावर त्याला स्वर्लोकीं गमन करितां आलें!

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, असा ह्या नारायणकवचाचा प्रभाव आहे. जो ह्याचें श्रवण अथवा पठन करितो, त्याला सर्व भूतें वंदन करितात व त्याची सर्व भीति नष्ट होते. हीच विद्या विश्वरूपाजवळून इंद्रानें मिळविली, आणि हिच्या योगानेंच त्यानें दैत्यांचा पराभव करून त्रैलोक्याचें ऐश्वर्य भोगिलें!

# अध्याय नववा.

—:०:—

## इंद्राच्या हस्तें विश्वरूपाचा वध.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—हे भारता, विश्वरूपाला मानेच्या वर सोमपीथ, सुरापीथ व अन्नाद अशीं तीन शीर्षें असल्यामुळें, त्याला तीन मुखें प्राप्त होऊन, एकानें तो सोम पीत असे, दुसऱ्यानें सुरा पीत असे, व तिसऱ्यानें अन्न भक्षण करीत असे, असें म्हणतात. देव हे त्याचे पितर असल्यामुळें, "इंद्राय स्वाहा। अग्नये स्वाहा" असे उघडपणें मंत्र म्हणून तो देवांस मोठ्या नम्रतेनें यज्ञांत हविर्भाग अर्पण करी. तसेंच, त्याची माता असुरकन्या असल्यामुळें तो तिच्या संतोषाकरितां यज्ञांतील हविर्भाग गुप्त रीतीनें असुरांसही पोहोंचवी. हें विश्वरूपाचें कपट मनांत घेऊन इंद्रास असें वाटलें कीं, "अशा प्रकारें विश्वरूप हा असुरांचा पराक्रम वाढवील, व त्यामुळें आमचा पुढें घात होईल; ह्यास्तव ह्या वेळीं विश्वरूपास मारून टाकणें हेंच आपणांस हितकारक आहे." असा विचार करून इंद्रानें लागलीच त्या विश्वरूपाचीं तीन्ही शिरें तोडून टाकिलीं! तेव्हां असा चमत्कार झाला कीं, विश्वरूपाच्या सोमपीथ मस्तकापासून कपिंजल नांवाचा, सुरापीथ मस्तकापासून कलविंक नांवाचा, व अन्नाद मस्तकापासून तित्तिरि नांवाचा असे तीन पक्षी उत्पन्न झाले. परीक्षित राजा, विश्वरूपाला मारल्यामुळें इंद्रास जें हें ब्रह्महत्येचें पातक लागलें, त्याची त्याला आधींच निवृत्ति करितां आली असती; परंतु त्यानें तसें न करितां त्या ब्रह्महत्येचा स्वीकार केला. एक संवत्सरपर्यंत त्यानें तिच्या निराकरणाचा प्रयत्न केला नाहीं. परंतु पुढें, इंद्र हा ब्रह्मघ्न आहे असें सर्वतोमुखीं झालें, व शेवटीं "हे ब्रह्मघ्ना इंद्रा" असेंही लोक त्याला म्हणूं लागले. तेव्हां आतां मात्र ही ब्रह्महत्या दूर केल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें ठरवून, इंद्रानें त्या

**ब्रह्महत्येच्या पातकाची वांटणी**

केली: त्यानें त्या पातकाचे चार भाग केले. त्यांतील एक भाग त्यानें भूमीला दिला, दुसरा भाग वृक्षांनीं घेतला, तिसरा भाग स्त्रियांस अर्पण केला, व चौथा भाग उदकानें स्वीकारिला. इंद्र हा त्या पातकाचा एक भाग जेव्हां भूमीस देऊं लागला, तेव्हां ती तो भाग खुषीनें घेईना. ती म्हणाली कीं, "माझ्यावरील खळगे आपोआप भरून येतील असें जर तूं करशील, तर मी हा पापभाग घेतें." इंद्रानें लागलेंच पृथ्वीच्या मनाप्रमाणें केलें, तेव्हां तिनें तें पातक ग्रहण केलें. परीक्षित राजा, भूमीनें घेतलेलें हें पातक अद्याप क्षारमृत्तिकेमध्यें उकिरड्याच्या

रूपानें दृष्टिगोचर होतें; व म्हणूनच, जेथें अशी उखर जमीन असेल, तेथें अध्ययन वगैरे करूं नये असा नित्यनिषेध आहे. परीक्षिता, वृक्षांनीही भूमीप्रमाणें इंद्राचें पाप संतोषानें घेतलें नाही. त्यांनीही त्या पातकाचा स्वीकार करण्यापूर्वी इंद्रापासून एक वर मागून घेतला: "कोणीं आमचें छेदन केलें असतां आम्हांस फिरून अंकुर उत्पन्न व्हावे, असें करशील, तर आम्ही हें पातक घेतों," अशी वृक्षानीं इंद्रापाशीं अट घातली; व ती इंद्रानें मान्य केल्यावर वृक्षांनीं पातकाचा दुसरा भाग कबूल केला. परीक्षिता, वृक्षांनीं जें हें पातक ग्रहण केलें, तें त्यांच्या ठिकाणीं डिंकाच्या रूपानें आढळून येतें; व म्हणून, वृक्षांचा डिंक भक्षण करूं नये असा धर्मशास्त्राचा नियम आहे. स्त्रियांनीं इंद्राच्या पातकाचा भाग घेतला, तेव्हांही हाच प्रकार झाला: त्या म्हणाल्या कीं, "देवा, गरोदर असतां जरी आम्ही प्रसूतिकाळापर्यंत संभोग केला, तरी आमच्या गर्भास विकृति होऊं नये, अशी विशेष शक्ति आमच्या गर्भास प्राप्त होईल, तर आम्ही हें पातक घेण्यास तयार आहों." परीक्षित राजा, स्त्रियांची विनंती कबूल करून इंद्रानें पातकाचा एक भाग त्यांस देऊन टाकिला. हें पातक स्त्रियांच्या ठिकाणीं रजोरूपानें प्रत्येक महिन्यास प्रकट होत असतें, म्हणून स्त्रिया ऋतुस्नात असतां त्यांशीं संभोग वर्ज्य केला आहे. नंतर ब्रह्महत्येचा एक चतुर्थांश शिलक राहिला, तो इंद्रानें उदकास अर्पण केला; व उदकास असा वर दिला कीं, "दुग्ध वगैरे द्रव्यांत तुझी मिसळ झाली असतां त्या पदार्थासारखें तुझें रूप होईल." राजा, हें पातक उदकामध्यें फेंस व बुडबुडे यांच्या रूपानें रहात असल्यामुळें, फेंस व बुडबुडे दूर केल्याशिवाय उदकाची शुद्धि होत नाहीं; असो.

## वृत्रासुराची उत्पत्ति व देवांचा पराजय.

परीक्षित राजा, विश्वरूपाचा वध झाल्यावर, त्वष्ट्यानें इंद्राचा नाश करण्याकरितां दक्षिणाग्नींत हवन केलें. हवन समाप्त होतांच त्या दक्षिणाग्नीपासून भयंकररूपधारी वृत्रासुर उत्पन्न झाला. राजा, त्या वृत्रासुराचें शरीर प्रलयकाळच्या कृतांताप्रमाणें अक्राळविक्राळ होतें. तो प्रतिदिवशीं बाणाच्या पल्ल्याइतका चौंफेर वाढे. तो वणव्यानें दग्ध झालेल्या पर्वतासारखा उंच व संध्याकाळच्या मेघसमुदायासारखा काळाकभिन्न होता. त्याची शेंडी, दाढी व नेत्र हीं मध्यान्हींच्या चंडरश्मीप्रमाणें लाल व उग्र होतीं. त्याच्या हातांत त्रिशूल असून, तो नाचूं लागला तेव्हां जणू काय त्याच्या त्रिशूलावर स्वर्ग व पृथ्वी हीं थरथर कांपत आहेत असा भास होत होता! त्या वेळीं, हा आतां आकाश गिळून टाकणार व ह्याच्या कंदरप्राय दाढांत सर्व ब्रह्मांड गट्ट होणार असें वाटूं लागलें! वृत्रासुरास पाहतांच देवांस महाभय उत्पन्न झालें, व त्यांची त्रेधा उडून जाऊन ते दशदिशांस पळत सुटले! परीक्षित राजा, त्या असुराला वृत्र म्हणजे वेढणारा असें नांव पडण्याचें कारण—तो असुर तमोमय होता हेंच होय. देवांनीं शस्त्रास्त्रांसहित त्याजवर चाल केली, परंतु त्यांचीं तीं सर्व शस्त्रास्त्रें त्या असुरानें गिळून टाकिलीं. तेव्हां देवांचे सर्व उपाय हरले. मग त्यांनीं शेवटचा उपाय म्हणजे एकाग्रचित्तानें

## आदिपुरुषाचा धावा

केला: देव म्हणाले:—हे आदिदेवा, आतां आम्हांस तुझ्यावांचून गति नाहीं. देवा, पृथिव्यादिक पंचमहाभूतांचा कर्ता तूंच आहेस. तुझ्यापासूनच हें त्रैलोक्य उत्पन्न झालें आहे. ब्रह्मदेवादिक आम्ही सर्व देव तुझीच सृष्टि आहों. भगवन्, तुझ्याच काळरूप आज्ञेनें आम्ही नानाविध कर्में करीत आहों. ईश्वरा, त्या काला-

चा नियंता तरी तूंच आहेस; ह्यास्तव आमचें प्रस्तुत प्रसंगीं तूंच संरक्षण करावेंस. महापुरुषा, ह्या वेळीं दुसऱ्याच्या हातून आमचें तारण होईल अशी कल्पना करणें म्हणजे श्वानपुच्छाचा आश्रय करून महासागर तरून जाणें होय! भगवंता, पूर्वी ज्याप्रमाणें मत्स्यरूप धारण करून, व आपल्या शृंगाच्या ठिकाणीं पृथ्वीरूप नौका बांधून सत्यव्रत मनूला तूं प्रलयसमुद्रांतून पार पाडिलेंस, अथवा कल्पाच्या अंतीं क्षुब्ध झालेल्या समुद्रांत तूं ब्रह्मदेवाचें संरक्षण केलेंस, त्याचप्रमाणें ह्या प्रसंगीं ह्या वृत्रासुरापासून आमचें संरक्षण कर. ईश्वरा, आजपर्यंत आमच्यावर जे असले अनेक प्रसंग आले, त्या सर्वांतून तूंच आमची मुक्तता केली आहेस. देवा, तुझ्या मायेचा प्रभाव फारच अद्भुत आहे. तुझ्या मायेनेंच आम्हा सर्वांची उत्पत्ति आहे; तुझ्या मायेनेंच आम्ही विश्वसृष्टि करितों; व तुझ्या मायेनेंच आम्हांस, "आम्ही स्वतांच ह्या विश्वाचे कर्ते" असा अभिमान उत्पन्न होतो. भगवन्, ह्या अद्वितीय मायेपासून मुक्त असा काय तो तूं एकटाच आहेस. ईश्वरा, जरी हें जग सर्वस्वीं मायेनें ग्रस्त झालेलें आहे, तरी देव, ऋषि, मनुष्यें, अन्य प्राणी इत्यादिकांच्या ठिकाणीं उपेंद्र, परशुराम, राम, मत्स्य वगैरे अवतार घेऊन युगायुगीं तूं आमचें रक्षण करीत आला आहेस. भगवंता, तुझ्या व्यापक स्वरूपाची नुसती कल्पना करणेंही अवघड आहे. तूं सर्व ब्रह्मांडभर अभेदरूपानें भरलेला असून स्वतः त्यापासून अलिप्तही आहेस. परमेश्वरा, ह्या प्रसंगीं तुझ्याशिवाय अन्य कोणी आमचें संरक्षण करण्यास समर्थ नाहीं, ह्यास्तव आमच्यावर करुणा कर.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, देव ह्या प्रकारें आदिपुरुषाची प्रार्थना करीत असतां ह्या

**देवांस भगवद्दर्शन**

झालें: प्रथम त्यांच्या अंतरात्म्यांत भगवत्तेज प्रकट झालें; व त्यांनीं पुढें पाहिलें तों, पश्चिम दिशेस शंख, चक्र, गदा इत्यादिकांनीं युक्त अशी परमात्म्याची मूर्ति त्यांच्या दृष्टीस पडली. भगवन्मूर्तीच्या समीप सोळा पार्षद भगवत्सेवेंत निमग्न असून, तेही आपल्या रुचिर कांतीनें परमात्म्यासारखेच शोभायमान दिसत होते. त्यांच्या देहावर श्रीवत्सलांच्छन व कौस्तुभ मणि हीं मात्र नव्हतीं. अग्रभागीं नारायणास पाहून ब्रह्मादिक देव चकित झाले. त्यांस इतका आनंद झाला कीं, त्यांचें देहभान सुटलें. नंतर कांहीं वेळानें सर्व देवांनीं भगवंतास साष्टांग नमस्कार घातला, व फिरून स्तवनास आरंभ केला.

## वृत्रासुरवधप्रसंगीं देवांनीं केलेली परमेश्वराची स्तुति.

देव म्हणाले:—

नमस्ते यज्ञवीर्याय वयसे उत ते नमः ।
नमस्ते ह्यस्तचक्राय नमः सुपुरुहूयते ॥
यत्ते गतीनां तिसृणामिशितुः परमं पदम् ।
नार्वाचीनो विसर्गस्य धातर्वेदितुमर्हति ॥

ॐ नमस्तेऽस्तु भगवन्नारायण वासुदेवादिपुरुष महापुरुष महानुभाव परममंगल परमकल्याण परमकारुणिक केवल जगदाधार लोकैकनाथ सर्वेश्वर लक्ष्मीनाथ परमहंसपरिव्राजकैः परमेणाऽऽत्मयोगसमाधिना परिभावितपरिस्फुटापरमहंस्यधर्मेणोद्घाटिततमःकपाटद्वारे चित्तेऽपावृत आत्मलोके स्वयमुपलब्धनिजसुखानुभवो भवान् ॥ दुरवबोध इव तवायं विहारयोगो यदशरणोऽशरीर इदमनवेक्षितास्मत्समवाय आत्मनैवाविक्रियमाणेन सगुणमगुणः सृजसि पासि हरसि ॥

अथ तत्र भवान्किं देवदत्तवदिह गुणविसर्गपतितः पारतंत्र्येण स्वकृतकुशलाऽकुशलं फलमुपाददात्याहोस्विदात्माराम उपशमशीलः समंजसदर्शन उदास्त इति ह वा व न विदामः ॥
न हि विरोध उभयंभगवत्यपरिगणितगुणगण ईश्वरेऽनवगाह्यमाहात्म्योऽर्वाचीनविकल्पवितर्कविचारप्रमाणाभासकुतर्कशास्त्रकलिलांतःकरणाश्रयदुरवग्रहवादिनां विवादानवसर उपरतसमस्तमायामये केवल एवात्ममायामंतर्धायकोऽन्वर्थो दुर्घट इव भवति स्वरूपद्वयाभावात् ॥
समविषममतीनां मतमनुसरसि यथा रज्जुखंडः सर्पादिधियाम ॥
स एव हि पुनः सर्ववस्तुनि वस्तुस्वरूपः सर्वेश्वरः सकलजगत्कारणकारणभूतः सर्वप्रत्यगात्मत्वात्सर्वगुणाभासोपलक्षित एक एव पर्यवशेषितः ॥
अथ हवाव तव महिमामृतरससमुद्रविप्लुषा सकृदवलीढया स्वमनसि निष्यंदमानानवरतसुखेन विस्मारितदृष्टश्रुतविषयसुखलेशाभासाः परमभागवता एकांतिनो भगवति सर्वभूतप्रियसुहृदि सर्वात्मनि नितरां निरंतरं निर्वृत्तमनसः कथमुह वा एते मधुमथन पुनः स्वार्थकुशला ह्यात्मप्रियसुहृदः साधवस्त्वच्चरणांबुजानुसेवां विसृजंति न यत्र पुनरयं संसारपर्यावर्तः ॥

'परमेश्वरा, स्वर्गादिकांच्या प्राप्तीकरितां तूं यज्ञयागादिक विधींमध्यें अपूर्व वीर्य उत्पन्न केलें आहेस. जे कोणी ते विधि यथासांग करितात, त्यांवर कृपा करून तूं त्यांचें उद्दिष्ट कार्य सिद्धीस नेतोस; व जे दैत्यादिक त्या यज्ञादिक क्रियांस विघ्नें करितात, त्यांच्यावर आपलें अमोघ चक्र टाकून तूं त्यांचा निःपात उडवितोस. देवा, सगुणरूपानें मात्र आम्हांस तुझ्या कृतीचें ज्ञान झालें आहे; कारण, तुझ्या मायातीत स्वरूपाचें ज्ञान आम्हांसारख्या अर्वाचीनांस होणें परम दुष्कर होय. हे भगवंता, नारायणा, वासुदेवा, आदिपुरुषा, महापुरुषा, महानुभावा, परममंगला, परमकल्याणा, परमदयाळो, केवळा, जगदाधारा, लोकेशा, सर्वेश्वरा, लक्ष्मीपते, तुझीं कितीही नांवें घेऊन तुला आम्ही हांका मारिल्या, तरी तुझें यथार्थ वर्णन आमच्यानें होणार नाहीं. प्रभो, तुझ्या निर्गुण स्वरूपाचें वास्तविक ज्ञान, जे परमहंस महात्मे हा संसारबंध सोडून देऊन भगवद्भजनांत सदासर्वकाळ गढून जातात व आत्मज्ञानानें मायामोह दूर सारितात, त्यांसच प्राप्त होतें. देवाधिदेवा, तुझी लीला मोठी अगाध आहे; कारण तूं स्वतः निर्गुण, निर्विकार, निर्देह, निराश्रय व निरिच्छ असा असून सगुण, सविकार, सदेह, साश्रय व सेच्छ अशा ह्या जगताची उत्पत्ति, पालन व संहार करितोस. देवाधिदेवा, तुझी व्याप्ति अखिल ब्रह्मांडांत सर्वत्र समवायरूपानें असल्यामुळें, जीव आपापल्या कर्मानुसार जीं सुखदुःखादिक फळें भोगितात, तीं तुलाही भोगावीं लागतात; व तुझी व्याप्ति सर्वत्र व्यतिरेकरूपानें मनांत आणिली म्हणजे, तूं सुखदुःखरहित आहेस असा निश्चय करितां येतो. भगवंता, तुझी स्वतंत्रता मनांत आणिली, म्हणजे तुझ्याविषयीं विकल्प[1] वितर्क[2], विचार[3] व प्रमाणाभास[4] हे करणें व्यर्थ होय असाच निर्णय करावा लागतो. नारायणा, विकल्पवितर्कादिक गोष्टी ह्या मर्यादित शक्तीच्या

१ अमुक करावें किंवा अमुक न करावें हें ठरविण्याचा प्रकार. २ काय बरें करावें ह्याचें मनन करणें. ३ अमुकच करणें इष्ट असा निश्चय. ४ प्रमाणें देणें.

वस्तूंसच लागू करितां येतात; वाटेल त्याप्रमाणें करण्याची ज्याची शक्ति, अशा तुला अलीकडील भौतिक शास्त्रें कशीं लागू करितां येतील बरें! परमेश्वरा, जे कोणी तुझे अपरिमित गुण व अतर्क्य शक्ति मनांत न आणितां दुराग्रहानें कार्यकारणपरंपरा तुलाही लावूं पाहण्याचा प्रयत्न करितात, त्यांस तुझें सत्स्वरूप कधींही कळत नाहीं; तें कळण्यास तुझ्यासारखा द्वंद्वातीत पुरुषच पात्र आहे. भगवन्, रज्जूचें यथार्थ ज्ञान झालेला पुरुष रज्जूस रज्जुरूपानेंच ओळखितो; परंतु तें ज्ञान न झालेला पुरुष त्या रज्जूस सर्पादिरूपानें जाणतो; तसा, तुझें निर्गुणस्वरूपात्मक ज्ञान झालेला ब्रह्मज्ञ पुरुष तुझें गुणातीत रूप ओळखितो; परंतु तुझें सगुणात्मक ज्ञान झालेला अर्वाचीन ( संसारी ) पुरुष तुझें सगुणरूपच जाणतो. हे परमात्मन्, सर्व पदार्थांमध्यें तुझें अस्तित्व आहे, आणि त्यामुळेंच ह्या अखिल पदार्थांचें अस्तित्व अनुभवास येतें. सर्व विश्वाचें आदिकरण तूंच होस. महत्तत्त्वादिक तुझ्यापासूनच उत्पन्न झालीं, व त्यांस सृष्ट्युत्पादक शक्ति तुझ्यामुळेंच मिळाली. तुझी व्याप्ति सर्वत्र आहे. नानाविध गुणांची विशिष्ट शक्ति हें तुझेंच कार्य होय. श्रुतींनीं त्वद्व्यतिरिक्त इतर वस्तूंचा निषेध केला असून एकट्या तुझीच सत्ता कबूल केली आहे. ह्यास्तव, हे परात्परा, तुझ्या सत्स्वरूपाचें ज्ञान होण्याचा उत्तम उपाय म्हणजे मायेची निवृत्ति हाच होय; व ती निवृत्ति होण्यास तुझ्या चरणकमळांची अखंड सेवाच घडली पाहिजे. हे मधुसूदना, तुझ्या माहात्म्यरूप अमृतादधींतून एकवार एक बिंदु जरी ग्रहण केला, तरी त्यापासून अंतःकरणांत सुखाचे पाझर नित्य चालू होतात; आणि स्त्रीपुत्रादिक ऐहिक व स्वर्गादिक पारलौकिक विषयसुखें तुच्छ भासूं लागून त्यांजपासून चित्ताचें परावर्तन होतें. अशा प्रकारें जे पुरुष तुझ्या महिम्यांत सदैव रममाण होतात, त्यांस तुझें वास्तव स्वरूप कळूं लागतें; सर्व प्राण्यांविषयीं खरी कळकळ बाळगणारा एक तूंच आहेस, अशी त्यांची खातरी होते; सर्व वस्तूंचा आत्मा तूंच, असा त्यांस अनुभव येतो; आपला खरा स्वार्थ कोणता, हें त्यांस उत्तम समजतें; मग, सर्वत्र तुझेंच स्वरूप आहे, असें जाणून ते सर्व प्राण्यांवर प्रेम करूं लागतात; आणि निरंतर तुझ्या पदकमलांच्या चिंतनांत गढून जाऊन त्वद्रूप बनतात, व संसाराचा बंध कायमचा तोडून टाकितात!'

देव पुढें म्हणाले, " हे भवनाशका, हे विश्वाधिपते, त्रैलोक्याचा मुख्य आधार तूंच होस. वामनावतारीं सर्व ब्रह्मांडाचें तीन पावलांत तूंच आक्रमण केलेंस. तुझी मनोहर लीला अवलोकन करून सर्व त्रिभुवन चकित होतें. देव व दानव ह्या तुझ्याच विभूति होत तुझ्याच इच्छेनें ह्यांचा उत्कर्ष व अपकर्ष होत असतो. ज्या ज्या वेळीं दैत्यांच्या हातून घोर अनर्थ होऊं लागतात, त्या त्या वेळीं तूं सुरनरमृगजलचरादि भिन्न भिन्न रूपें धारण करून त्यांचा उच्छेद करीत असतोस. भगवंता, आतां ह्या वृत्रासुरापासून मोठा भयंकर अनर्थ होत आहे, तर ह्याचा नाश करून ह्या प्रसंगांतून आमची मुक्तता कर. ईश्वरा, तूं आम्हांपुढें प्रकट होऊन आपल्या दिव्य रूपानें आम्हांस दर्शन दिलेंस, यामुळें आम्ही कृतार्थ झालों आहों. आतां, तुझ्या पदकमळांच्या ठिकाणीं आसक्त होऊन बद्ध झालेल्या आम्हां दासांची वासना इतकीच आहे कीं, तूं आपल्या सदय, निर्मल, मनोहर व हास्ययुक्त अवलोकनानें व अमृततुल्य भाषणानें आमच्या अंतःकरणांतील चिंताज्वर नष्ट कर. हे भगवंता, तुझ्या अपूर्व मायेनें सर्व विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं होतात सर्व जीवांच्या अंतर्यामीं परब्रह्मरूपानें व जीवात्मरूपानें आणि बाहेर देहरूपानें तूं वास्तव्य करितोस. घटाला जशी माती, तसा देशकालदेहादिकांला तूं मुख्य आ-

श्रय होस; त्यामुळें, देशकालादिकांस प्राप्त होणारे सर्व अनुभव तुलाही साहजिकपणें प्राप्त होतात. बुद्धि वगैरे सर्व इंद्रियांचा साक्षी तूंच असून तूं आकाशाप्रमाणें सर्वांपासून अलिप्त आहेस. आदिपुरुषा, तूं सर्वव्यापक असल्यामुळें तुला ह्याहून अधिक कांहीं सांगण्याची आवश्यकता नाहीं; आमच्या मनांतील सर्व कांहीं तूं उत्तम प्रकारें जाणतच आहेस; असो. भगवन् ,वृत्रासुराचा वध त्वरित झाल्याशिवाय आमचा तरणोपाय नाहीं. त्यानें आमचीं सर्व शस्त्रास्त्रें व तेज गिळून टाकून आम्हांस अगदीं दीन करून सोडिलें आहे; ह्यास्तव आम्हांवर करुणा कर, व त्या दुष्टाचा लवकर नाश कर. हे हृदयनिवासा, सर्वसाक्षिन् , मंगलकीर्ते, सच्चिन्मूर्ते, तुला आम्ही अभिवंदन करितों." परीक्षित राजा, ह्याप्रमाणें देवांची स्तुति श्रवण करून भगवान श्रीहरि संतुष्ट झाला, व त्यानें त्यांस

### वृत्रासुरवधाचा उपाय

सांगितला: तो देवाधिदेव म्हणाला, "देवहो, तुम्हीं माझें वर्णन केलें, तें सत्य आहे. जे कोणी माझ्या भक्तींत तत्पर असतात, त्यांस 'आपण स्वतः परब्रह्म आहों' असें ज्ञान होतें; व ते मायामोहसमुद्र तरून जातात. देवांनो, माझे भक्त हे माझ्या भक्तीशिवाय दुसऱ्या कशाची अपेक्षा करीत नाहींत; व जर ते दुसऱ्या कशाचा अभिलाष करूं लागले, तर त्यांचा तो मनोरथ मी पूर्णही करीत नसतों; कारण तसें केल्यास, माझ्यावरही त्यांच्याप्रमाणेंच अज्ञानपणाचा दोष आल्यावांचून राहणार नाहीं. असो. अमरहो, तुम्ही आतां दधीच नामक श्रेष्ठ ऋषीजवळ त्वरित जाऊन विद्या, व्रत व तपश्चर्या ह्यांनीं महान शक्तिमान झालेलें त्याचें शरीर मागा. इंद्रा, दधीच ऋषीचा अधिकार फार मोठा आहे. अश्वशिर नांवाचें शुद्ध ब्रह्म हें दधीच ऋषीला विदित आहे. तें त्याच्यापासून अश्विनीकुमारांनीं संपादन केलें, व त्यामुळेंच अश्विनीकुमार जीवन्मुक्त झाले. इंद्रा, त्या दधीच ऋषीला नारायण नामक अभेद्य कवचही माहीत आहे. त्यानेंच तें त्वष्ट्याला दिलें. त्वष्ट्यापासून तें विश्वरूपाला मिळालें, व विश्वरूपापासून तुला प्राप्त झालें. देवहो, दधीच ऋषि आपलें शरीर देईल किंवा नाहीं, ह्याबद्दल संशय घेऊं नका. तो मोठा धर्मज्ञ आहे. तुम्ही त्याजपाशीं प्रार्थना केली असतां—त्यांतून विशेषतः अश्विनीकुमारांनीं तें मागितलें असतां—तो नाहीं म्हणणार नाहींच. तुम्ही दधीच ऋषीच्या अस्थींचें विश्वकर्म्याकडून एक श्रेष्ठ आयुध सिद्ध करा. इंद्रा, हें आयुध तुझ्या हातीं येतांच, तुमची शक्ति अतिशय वाढेल. मग त्या आयुधानें वृत्रासुराचें शिर तोड, म्हणजे तुम्हांस तुमचें तेज, शस्त्रें, अस्त्रें, संपत्ति वगैरे सर्व कांहीं प्राप्त होईल. देवांनो, तुम्ही, वृत्रासुर आमचा वध करील अशी व्यर्थ भीति बाळगूं नका. तुम्ही माझे भक्त आहां, ह्याकरितां तुमचा नाश करण्यास कोणीही समर्थ नाहीं, हें पूर्णपणें लक्षांत ठेवा!"

## अध्याय दहावा.

—:०:—

### दधीचाची अस्थींकरितां प्रार्थना.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, भगवान श्रीनारायण इंद्राला दधीच ऋषीकडे जाण्यास सांगून तेथेंच गुप्त झाले. पुढें ते देव दधीच ऋषीकडे गेले, आणि त्यांनीं त्याजपाशीं त्याच्या अस्थींची याचना केली. देवांना पाहून दधीच ऋषीला आनंद झाला; परंतु त्यानें देवांना सांगितलें कीं, "देवहो! प्राण्याला मरणकालीं किती दुःसह यातना होतात, ह्याची कल्पना तरी तुम्हांला आहे का? हें शरीर जरी प्रत्यक्ष विष्णूनें मागितलें, तरी सुद्धां तें देण्यास कोणी तयार होणार नाहीं!"

देव म्हणाले:—मुनिश्रेष्ठ, स्वार्थसाधु जे आहेत, त्यांना ‘परदुःखशीतळ’ वाटतें. तसें नसतें तर आपणांपाशीं आम्ही अशी वस्तु मागितलीच नसती. परंतु सर्व भूतांवर दया करणाऱ्या आपल्यासारख्या पुण्यशीळ पुरुषाला कोणती वस्तु सोडण्यास कठिण आहे? त्यांतूनही, जे दानशूर आहेत, त्यांची गोष्ट कांहीं निराळीच! कोणी स्वार्थदृष्टीनें मागो वा परमार्थदृष्टीनें मागो, त्यांजकडून नकार कधीं यावयाचाच नाहीं!

## देवांना अस्थींची प्राप्ति.

दधीच ऋषि म्हणाला:–देवहो, मीं पहिल्यानें नकार दर्शविला त्याचा उद्देश इतकाच होता कीं, तुमच्या मुखांतून धर्म ऐकावा. आतां ज्या अर्थी हा नश्वर देह तुमच्या उपयोगीं पडणार आहे, त्या अर्थी मी याला सोडून देण्यास तयार आहें. या अशाश्वत शरीराकडून जर धर्म साधत असेल आणि कीर्ति मिळत असेल, तर जो मनुष्य त्यांचें साधन करून घेणार नाहीं तो मूर्खच समजला पाहिजे! अशा मनुष्यापेक्षां जड पदार्थ पुष्कळ चांगले! कारण वृक्षपाषाणादि सर्व पदार्थ नेहमीं लोकांच्या उपयोगीं पडण्यास तत्पर असतात! वास्तविक पाहिलें तर धन, दारा, पुत्र, आप्त व स्वतांचें शरीर हीं सर्व नश्वर आहेत; तीं केव्हां नष्ट होतील ह्याचा मुळींच भरवंसा नाहीं; म्हणून यांजकडून परोपकार घडण्याची संधि आली असतां प्राण्यानें यत्किंचितही विलंब लावूं नये."

श्रीशुकाचार्य म्हणाले:–परीक्षित राजा, दधीच ऋषीनें देवांशीं असें भाषण केलें, आणि तत्क्षणीं समाधि लाविला; व जीवाचें परब्रह्माशीं ऐक्य करून देहाचा त्याग केला. त्यानें आपलीं इंद्रियें, प्राण, मन, बुद्धि हीं आवरून, अहंताममतादि सर्व पाश तोडिले होते, व आत्मा ब्रह्मांडीं स्थिर केला होता; यामुळें, आपला देह केव्हां पडला हें त्याला कळलें सुद्धां नाहीं! असो.

## वज्राची उत्पत्ति व इंद्रवृत्रांचें युद्ध.

परीक्षिता, पुढें विश्वकर्म्यानें त्या मुनीच्या अस्थींचें एक वज्र तयार केलें. तें इंद्रानें आपल्या हातांत घेतल्याबरोबर, त्याच्या अंगांत अतर्क्य शक्ति उत्पन्न होऊन ईश्वराचें तेज त्याच्या अंगांत संचरलें. त्या समयीं देवांनीं परिवेष्टित असलेला तो इंद्र फारच शोभूं लागला, व मुनिगणांनीं त्याची स्तुति चालविली. नंतर तो देवेंद्र गजेंद्रावर बसून मोठ्या वेगानें वृत्रासुराला मारण्याकरितां त्याच्या अंगावर धावून गेला, व त्या योगें सर्व त्रैलोक्यास परमानंद झाला. वृत्रासुरही आपल्या मोठमोठ्या पराक्रमी सेनापतींसह युद्धास तयार होताच. मार्कंडेयाकरितां शंकर जसे क्रोधायमान होऊन यमाच्या अंगावर धावले, तसा देवेंद्र वृत्रासुराच्या अंगावर धावला! हा देवदैत्यांचा संग्राम त्रेतायुगाच्या आरंभीं नर्मदा नदीच्या तीरावर झाला. त्या प्रसंगीं तेथें इंद्राच्या समीप रुद्र, वसु, आदित्य, अश्विनीकुमार, पितर, अग्नि, मरुद्गण, ऋभु, साध्य व विश्वेदेव हे सर्व असून, सर्वांच्या पुढें इंद्र हा दधीच ऋषीच्या अस्थींचें केलेलें वज्र हातांत घेऊन लोकोत्तर शौर्यानें युद्ध करीत होता. वृत्रासुराला हें इंद्राचें ऐश्वर्य बघवेना. नमुचि, शंबर, अनर्वा, द्विमूर्धा, ऋषभ, अंबर, हयग्रीव, शंकुशिरा, विप्रचित्ति, अयोमुख, पुलोमा, वृषपर्वा, प्रहेति, हेति, उत्कल, सुमाली, माली आदिकरून सहस्रावधि दैत्य आणि दानव, व यक्षराक्षस हे सुवर्णाचीं कवचें व किरीटकुंडलादिक धारण करून तयार होते. त्यांनीं एकदम नेट केला, व इंद्राच्या सैन्याचें कंदन करीत ते पलीकडे गेले. त्यांनीं आपल्या शस्त्रास्त्रांचा देवांवर इतका भडिमार चालविला कीं, त्या योगानें देवसैन्य झांकून गेलें. देवांनींही आपल्या पराक्रमाच्या योगानें त्या शस्त्रास्त्रांचे वाटेंतच तुकडे उडविले. दैत्यांनीं पुढें देवांवर पर्वत, वृक्ष, पाषाण टाकण्यास सुरुवात केली; पण त्यांचेंही

देवांनीं पीठ करून टाकिलें. इतकीं शस्त्रास्त्रें आणि पर्वत देवांवर टाकिले, तरी देवसैन्य सुरक्षित आहे असें पाहून वृत्रासुराचे सेनानी भय पावले; त्यांचें धैर्य खचलें; आणि पराक्रमाविषयींचा त्यांचा गर्व नष्ट झाला. भगवान श्रीहरीच्या भक्तांवर क्षुद्र लोकांनीं शापांचा व तीव्र भाषणांचा भडिमार केला असतां जसा तो सर्व व्यर्थ होतो, तसा दैत्यांच्या शस्त्रास्त्रांचा व पर्वतादिकांचा भडिमार देवांवर व्यर्थ झाला; तेव्हां ते एकामागून एक वृत्रासुराला सोडून युद्धाच्या अगदीं आरंभींच रणांगणांतून पळूं लागले!

वृत्राचा दैत्यांना उपदेश.

परीक्षित राजा, सैन्याची ती स्थिति पाहून वृत्रासुराला हसूं आलें, आणि तो सेनापतींस म्हणाला, "हे विप्रचित्ते! हे नमुचे! हे पुलोमन्, हे मया! हे अनर्वन्, हे शंबरादि वीरांनो, मी काय सांगतों तें ऐकून घ्या: प्राणी जन्मास आला कीं त्याला मृत्यु हा यावयाचाच. तो कोणत्याही उपायानें टळला जाणार नाहीं. म्हणून मी तुम्हांला सांगतों कीं, ज्या ठिकाणीं मरण आलें असतां कीर्ति मिळून शेवटीं मुक्ति प्राप्त होणार आहे, तेथून माघार घेऊन आपलें जिणें व्यर्थ होऊं देऊं नका. ह्या लोकांत मरणाचे सर्वमान्य असे दोनच प्रकार आहेत: एक योगाभ्यासानें प्राणवायु जिंकून आत्मा स्वस्वरूपीं मिळवून देहत्याग करणें; आणि दुसरा समरांगणांत पाठ न दाखवितां पराक्रम करीत करीत वीरशय्येवर देह ठेवणें!"

## अध्याय अकरावा.

—:०:—

### वृत्राचें देवांस उद्देशून भाषण व त्यांचा संग्राम.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, भयभीत झालेल्या दैत्यांना वृत्रासुरानें पुष्कळ प्रकारानें धीर दिला, पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. देवांनीं दैत्यांवर शस्त्रास्त्रांचा सारखा प्रहार चालू ठेविल्यामुळें, दीनांप्रमाणें ते पळूं लागले. सैन्याची ती सर्व फाटाफूट झालेली पाहून वृत्रासुराचा कोप अनावर झाला, व मोठ्या पराक्रमानें देवांचें निवारण करून तो त्यांना म्हणाला, "देवहो, हे सर्व दैत्य केवळ आपल्या मातांच्या उदरांतून बाहेर पडलेले मळाचे गोळे आहेत! हे पळत असतां पाठीमागून तुम्ही त्यांना मारितां यांत तुम्हाला काय पुरुषार्थ वाटतो? जे खरे शूर असतात, ते भय पावलेल्यांवर शस्त्र चालवीत नाहींत. तुमच्या अंगांत जर खरें शौर्य वसत असेल, तर माझ्यासमोर येऊन युद्ध करा!" परीक्षिता, अशा प्रकारें क्रोधावेशानें भयंकर गर्जना करून वृत्रासुर बोलत असतां, त्याच्याकडे पाहून देवांना भय वाटलें. वृत्रासुराच्या गर्जनेनें कित्येक देव गर्भगळित होऊन मूर्छित पडले, आणि वृत्रासुराला स्फुरण येऊन तो गर्जना करीत देवसैन्याला तुडवीत पुढें चालला! व त्याच्या दणदणाटानें पृथ्वी कांपूं लागली! वृत्रासुरानें केलेला हा थयथयाट पाहून इंद्राला त्वेष आला, व त्यानें आपली गदा त्याच्या अंगावर फेंकून मारिली. ती अत्यंत दुःसह गदा आपल्या अंगावर येत आहे असें पाहून त्या पराक्रमी असुरानें आपल्या डाव्या हातानें ती सहज झेलली, आणि मोठ्यानें त्रैलोक्याला कांपविणारी आरोळी ठोकून त्याच गदेनें ऐरावताच्या गंडस्थळावर प्रहार केला! त्याबरोबर ऐरावताला चक्कर येऊन तो रक्त ओकूं लागला, आणि 'चीं चीं' करीत वर बसलेल्या इंद्रासहित सात धनुष्यें मागें सरला! परीक्षिता, इंद्राचें वाहन घायाळ झालें आहे आणि इंद्राचें चित्त खिन्न झालें आहे, असें पाहून वृत्रासुरानें त्यावर गदेचा प्रहार केला नाहीं. नंतर इंद्रानें आपला अमृतकर ऐरावतावरून फिरवून त्याचें दुःख दूर केलें, आणि तो

फिरून युद्धास सिद्ध झाला. राजा, भावाचा ( विश्वरूपाचा ) वध करणारा शत्रु समोर दृष्टीस पडतांच, त्याच्या त्या पापकर्माचें स्मरण होऊन वृत्रासुराला वाईट वाटलें, आणि त्यानें हसत हसत

## इंद्राची निर्भर्त्सना

करून त्याला म्हटलें, "दुष्टशिरोमणे गुरुघातका इंद्रा! तुला अग्रभागीं पाहून मला फार आनंद होत आहे. आतां मी आपल्या शूलानें तुझें दगडासारखें कठिण असलेलें हृदय दुभंग करून टाकितों, आणि बंधूच्या ऋणांतून मुक्त होतों. अरे, माझा भाऊ ज्ञानसंपन्न ब्राह्मण असून तो तुझा गुरु होता. शिवाय, हे नीचा, तुला त्यानें नारायणकवचाचा उपदेश केला! असे त्याचे तुजवर उपकार असतां, ज्याप्रमाणें स्वर्गाची इच्छा करणारा पुरुष निर्दयपणें यज्ञांत पशूचा वध करितो, त्याप्रमाणें तूं विश्वास दाखवून खड्गानें त्या विश्वरूपाचा वध केलास काय? तुझी लाजलज्जा अगदीं कोठें गेली? तुझ्याइतका नीच त्रिभुवनांत तरी असेल काय? नरमांस खाणारांनीं देखील तुझी निंदा करावी इतकी तुझी योग्यता आहे! आतां ह्या शूलानें मी तुझे तुकडे तुकडे उडवितों. तुझ्या या अशुद्ध शरिराला अग्नि सुद्धां शिवणार नाहीं; तुला गिधाडें तोडतोडून खातील! त्याचप्रमाणें, इंद्रा, तुझा पक्ष धरून जे कोणी मजशीं लढण्याकरितां येथें आले असतील, त्यांचेही गळे कापून त्या योगानें मी आतां भैरवाची आराधना करणार! आतां, कदाचित् तूं जरी आपल्या वज्रानें मला मारिलेंस, तरी मी कर्मबंधनांतून मुक्त होऊन स्वतांच्या शरिरानें भूतगणांची तृप्ति करून उत्तम गतीस जाईन! देवेंद्रा, मी तुझा शत्रु तुझ्या छातीवर उभा असतां, तूं आपले वज्र अद्यापि मजवर कां सोडीत नाहींस? तुझी गदा व्यर्थ गेली म्हणून तूं भीत असशील, पण तुझें हें वज्र व्यर्थ जाणार नाहीं. कारण, हें विष्णूच्या तेजानें आणि दधीच ऋषीच्या तपश्चर्येनें तीक्ष्ण झालेलें आहे. म्हणून या वज्रानें तूं माझा सहज नाश करिशील. बा इंद्रा, जिकडे भगवान विष्णु, तिकडेच लक्ष्मी, विजय वगैरे सर्व कांहीं असावयाचें! संकर्षणानें सांगितल्याप्रमाणें मी त्याच्या चरणकमलीं मन लावीन. तुझ्या वज्रानें माझे विषयोपभोगादि सर्व पाश तुटून जातील; आणि नंतर मी देहत्याग करून मुनींच्या गतीस जाईन. आपल्या ठिकाणीं निश्चल बुद्धि ठेवणारांना परमेश्वर नश्वर ऐश्वर्य देत नाहीं; तर जें कधीं नाश पावत नाहीं असें सच्चिदानंदरूप ऐश्वर्य तो देतो. यावरूनच तूं कल्पना कर कीं, आमच्यासारख्यांवर परमेश्वराची कृपा किती आहे. हा प्रसाद—जे जे सर्वसंगपरित्याग करितात, त्यांनाच काय तो मिळतो." परीक्षिता, नंतर तो वृत्रासुर हात जोडून

## ईश्वराची प्रार्थना

करूं लागला: तो म्हणाला, "भगवन्, मी तुझ्या दासांचा दास आहें, आणि पुढेंही तसाच राहीन. तुझी व तुझ्या दासांची नेहमीं चरणसेवा करावी, तुझे गुण गावे, आणि तुझें स्मरण व चिंतन करावें, एवढीच माझी इच्छा आहे. यापेक्षां मला कशाचीही इच्छा नाहीं. मला सार्वभौमपद, स्वर्ग, ब्रह्मलोक किंवा मोक्ष सुद्धां नको; इतकेंच नव्हे, तर जेथें तुझा समागम घडणार नाहीं, असें कोणतेंही स्थल किंवा ऐश्वर्य ह्याची मला अपेक्षा नाहीं. हे परमेश्वरा, पंख न फुटलेले पक्षी जसे आपल्या मातेची, भुकेलेलें मूल जसें आपल्या आईची, आणि पतिव्रता स्त्री जशी प्रवासास गेलेल्या पतीची मार्गप्रतीक्षा करीत बसते, तसा मी तुझ्या दर्शनाची मार्गप्रतीक्षा करीत आहें. तर, हे भक्तवत्सला, मला दर्शन दे."

# अध्याय बारावा.

—:०:—

## वृत्रासुराचें व इंद्राचें युद्ध.

( इंद्रवज्रपतन. )

शुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, वृत्रासुर युद्धांत विजय मिळविण्यापेक्षां मरण मिळवावें अशी इच्छा करणारा होता. त्यानें ईश्वराची स्तुति करून आपला शूळ हातीं घेतला; आणि पूर्वी जसा मधुकैटभ दैत्य प्रलयकालच्या उदकांत विष्णूवर धावला, तसा तो इंद्राच्या अंगावर धावून गेला. त्या प्रचंड वीरानें तो शूळ गरगर फिरविला, आणि मोठ्या क्रोधानें दांतओंठ खात 'दुष्टा, मेलास! मेलास!' अशी भयंकर गर्जना करून इंद्राच्या अंगावर फेंकला. ग्रहाप्रमाणें किंवा उल्केप्रमाणें दुष्प्रेक्ष्य असा तो शूळ अंगावर येत असतांही इंद्र मुळींच भ्याला नाहीं. त्यानें मोठ्या चपळाईनें आपल्या वज्रानें त्या वृत्रासुराच्या एका हातावर वार करून तो खालीं उतरला, आणि शूळाचें निवारण केलें. आपला हात तुटका असें पाहून वृत्रासुर अधिकच संतापला, व त्यानें दुसऱ्या हातानें परिघ उचलून मोठ्या त्वेषानें तो इंद्राच्या हनुवटीवर आणि ऐरावताच्या मस्तकावर मारिला. त्याबरोबर इंद्राच्या हातांतील वज्र खालीं पडलें! वृत्रासुराच्या या पराक्रमाबद्दल देव, दैत्य, चारण व सिद्ध ह्यांच्या समुदायांनीं त्याची वाहवा केली; पण इंद्र संकटांत पडला आहे असें पाहून देवादिक 'हाय! हाय!' म्हणत आक्रोश करूं लागले. शत्रु समोर असतां आपल्या हातांतून शस्त्र गळून पडलें, यामुळें इंद्राला फार खेद झाला; व लज्जेमुळें तो तें वज्र उचलून घेईना. तेव्हां वृत्रासुरानें त्याचें सांत्वन करून त्यास प्रोत्साहन दिलें.

### वृत्राचा इंद्राला उपदेश.

वृत्रासुर म्हणालाः—"इंद्रा, ही वेळ खेद करण्याची नव्हे. लवकर आपलें वज्र हातांत घे आणि शत्रूचा वध कर. एकदा युद्ध करण्यास उभें राहिलें, म्हणजे सदोदीत जयप्राप्तिच होते असें नाहीं. त्या वेळीं पुरुषाला देहभान नसल्यामुळें, त्याचे अवयव त्याच्या स्वाधीन नसतात. एक ईश्वराला मात्र ह्या गोष्टी लागू नाहींत. कारण तो उत्पत्ति, स्थिति आणि संहार स्वतंत्रपणें चालवितो; तो त्रिकालज्ञ आहे. जाळ्यांत बांधिलेले पक्षी ज्याप्रमाणें पारध्याच्या तंत्रानें राहून आपापले व्यापार करितात, त्याप्रमाणें सर्व लोक आणि लोकपाल त्या ईश्वराच्या तंत्रानेंच आपापले व्यापार करितात; जय किंवा अपजय यांस तोच देवाधिदेव कारण आहे; म्हणून, हें वज्र पडण्यास कारण तुझा जड हात आहे, असें तू समजूं नको. बा इंद्रा, लांकडाची पुतळी नाचविणाऱ्या सूत्रधाराप्रमाणें, ह्या सर्व भूतांचीं सूत्रें त्या ईश्वराच्या अधीन आहेत. पुरुष, प्रकृति, महत्तत्त्व, अहंकार, भूतें, इंद्रियें व वासना हीं स्वतंत्रपणें जग उत्पन्न करीत नाहींत. हें सर्व सामर्थ्य त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न प्रभूचेंच आहे. म्हणून, पुरुषाची इच्छा नसतांही त्याला अल्पायुष्य, विपत्ति, अपकीर्ति इत्यादि गोष्टी प्राप्त होतात, आणि आयुष्य, कीर्ति, उपभोग हीहीं भोगावयास मिळतात. याकरितां, हे स्वर्गाधिपते, कीर्ति-अपकीर्ति, जय-अपजय सुख-दुःख इत्यादि कोणतेही प्रसंग आले, तरी पुरुषानें हर्ष किंवा खेद मानूं नये. सत्त्व, रज, तम हे गुण प्रकृतीचे आहेत; आत्म्याचे नव्हत. तो केवळ साक्षी आहे. इंद्रा, तूं मजकडे पहाः तूं माझा बाहु आणि शस्त्रें तोडून टाकिलीं आहेस, तरी मी तुझा प्राण घेण्याचा प्रयत्न करीत आहें. युद्धांत सोंगट्याच्या खेळाप्रमाणें प्राण पणाला लाविलेले असतात. बाण हे फांसे व वाहनें ह्या सोंगट्या होत. ज्याप्रमाणें खेळांत कोण डाव

जिंकील हें आधीं कळत नाहीं, त्याप्रमाणें, युद्धांतही जय कोणास मिळणार हें आधीं कळत नाहीं.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षिता, तें निष्कपट भाषण ऐकून इंद्रानें वृत्राचें अभिनंदन केलें, आणि अभिमान सोडून वज्र उचाललें. नंतर तो हसत हसत वृत्रासुरास म्हणाला, "बा दानवा, तूं मोठा उदार असून परमेश्वराचा पूर्ण भक्त आहेस. सर्व लोकांना ज्याची माया मोह पाडिते; पण तूं दैत्यांचा धर्म सोडून साधूंचे विचार स्वीकारिलेस, म्हणून तूं त्या मायेलाही तरून गेलास; तूं कृतार्थ आहेस. तूं रजोगुणी असतां सत्त्वगुणी परमेश्वराच्या स्वरूपीं जडून राहिला आहेस व त्याजवर तुझी पूर्ण निष्ठा आहे हें एक आश्चर्यच होय!"

**वृत्रासुराचा वध व त्यास मोक्षप्राप्ति!**

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, ह्याप्रमाणें त्या दोघांचें संभाषण झाल्यावर, महावीर वृत्रासुरानें राहिलेल्या एका हातानें भयंकर परिघ उचलून इंद्रावर फेंकला. इंद्रानेंही तात्काळ आपल्या वज्रानें तो परिघ आणि वृत्राचा दुसरा हात खालीं पाडिला. तेव्हां तो असुर पंख तुटलेल्या पर्वताप्रमाणें दिसूं लागला. त्यानें आपला खालचा ओठ जमिनीस व वरचा ओठ स्वर्गास लावून भयंकर काळासारखें मुख पसरिलें, आणि इंद्राजवळ येऊन त्याला त्याच्या ऐरावतासुद्धां गिळून टाकिलें! तें पाहून ब्रह्मदेवासह सर्व देव व ऋषि वगैरे मोठा आक्रोश करूं लागले. पण, परीक्षिता, नारायणाचें मंत्रमय कवच इंद्राच्या अंगावर असल्यामुळें, दैत्यानें त्यास जरी गिळिलें तरी तो मेला नाहीं; वृत्रासुराचें हृदय फाडून तो वाहनासुद्धां बाहेर आला, आणि मोठ्या शौर्यानें त्यानें शत्रूचें मस्तक कापून काढिलें! वृत्रासुराची मान तोडण्यासाठीं तें वज्र त्याच्या मानेवर इंद्र एकसारखा वर्षभर फिरवीत होता, तेव्हां त्याची मान तुटली! त्या वेळीं आकाशांत दुंदुभि वाजूं लागल्या; इंद्रावर पुष्पवृष्टि झाली; आणि सर्व देव इंद्राची स्तुति करूं लागले. हे परीक्षित राजा, वृत्रासुराचें देहावसान झालें, त्या वेळीं त्याच्या शरिरांतून आत्मतेज निघून, सर्वांसमक्ष भगवत्स्वरूपीं मिळालें!

# अध्याय तेरावा.

—:०:—

## ब्रह्महत्याभयानें इंद्राचें मानस सरोवरीं गमन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, वृत्रासुराचा वध झाल्यामुळें इंद्राशिवाय सर्व लोकांचे ताप दूर झाले व त्यांस मोठा आनंद झाला. नंतर देव, ऋषि, पितर, भूतें, दैत्य, देवांचे गण, ब्रह्मा, शंकर व इतर सर्व मंडळी इंद्राच्या अस्वस्थपणामुळें त्याचा निरोप न घेतां आपआपल्या स्थानीं गेले.

परीक्षित म्हणाला:—मुनिवर्य, ज्यानें सर्वांचें दुःख निवारण केलें, त्या इंद्राला दुःखी असण्याचें कारण काय बरें?

श्रीशुक म्हणाले:—परीक्षित राजा, वृत्रासुराच्या भीतीनें सर्व देव आणि ऋषि यांनीं त्याचा वध करण्याविषयीं इंद्राची प्रार्थना केली; पण ब्रह्महत्या घडेल ह्या भीतीनें इंद्र ती गोष्ट मनावर घेईना. तो त्यांना म्हणाला, "विश्वरूपाच्या वधामुळें घडलेलें ब्रह्महत्येचें पाप पृथ्वी, उदक, वृक्ष व स्त्रिया यांनीं वांटून घेतलें. पण आतां आणखी ह्या वृत्रासुराला मारून त्या पापाची वाट काय लावूं?"

तेव्हां ऋषींनीं इंद्राला सांगितलें कीं, "तूं भिऊं नको. आम्ही तुजकडून अश्वमेध यज्ञ करवूं. अश्वमेध यज्ञ करून परमेश्वराची आराधना केलीस, म्हणजे तूं सर्व जगाचा जरी वध केला असलास तरी त्या दोषापासून मुक्त होशील." परीक्षित राजा, अशा प्रकारें ब्राह्मणांनीं इंद्राला सांगित-

त्यामुळें त्यानें वृत्रासुराच्या वधाचा विचार ठरविला. मग त्याला मारल्याबरोबर ब्रह्महत्या पुढें येऊन उभी राहिली. जेथें तेथें ती त्याला चांडाळणीसारखें रूप घेऊन त्रास देई. तिचें शरीर वृद्धपणामुळें कांपत असून क्षयरोगानें ग्रासलेलें होतें. तिनें तांबडें वस्त्र पांघरलें होतें; आणि आपले पांढरे केश मोकळे सोडले होते. ती तोंडानें 'थांब, थांब' म्हणत सारखी इंद्राच्या मागें धावत होती. तिच्या श्वासाला मासळीसारखी दुर्गंधि येत होती, आणि त्यामुळें सर्व मार्ग बिघडला होता. या ब्रह्महत्येचें निवारण करावें म्हणून इंद्र चहूंकडे फिरला; पण त्याच्या मागचा पाठलाग कांहीं केल्या सुटेना. तेव्हां तो मानस सरोवरांत जाऊन लपला; परंतु त्याला हविर्भाव आणून देणारा जो अग्नि, त्याचा उदकांत प्रवेश होणें अशक्य असल्यामुळें तेथें तो उपाशीं मरूं लागला! तेव्हां कमलनालांतील तंतूंवर आपला निर्वाह होईल या हेतूनें त्यानें सूक्ष्म रूप धरिलें, आणि कमळांत शिरून तेथील तंतूंवर तो आपला निर्वाह करूं लागला. ब्रह्महत्येपासून आपली मुक्तता कशी होईल हा विचार करीत, इंद्र त्या ठिकाणीं हजार वर्षें लपून बसला होता! असो.

### नहुषास इंद्रपद व सर्पजन्म यांची प्राप्ति.

परीक्षित राजा, इंद्र मानस सरोवरीं जाऊन लपल्यावर इकडे ब्राह्मणांनीं नहुष राजास इंद्रपदीं बसविलें. नहुष राजा मोठा विद्वान, सामर्थ्यवान, तपस्वी आणि योगी असल्यामुळें, स्वर्गाचें राज्य करण्याची त्याची योग्यता होती; परंतु संपत्तीच्या आणि ऐश्वर्याच्या मदानें त्याची बुद्धि भ्रष्ट झाली; आणि इंद्राणीचा अभिलाष केल्यामुळें तिनें त्याला सर्पयोनीस नेऊन पोहोंचविलें! असो.

### इंद्रास स्वपदप्राप्ति.

परीक्षित राजा, नहुष स्वर्गातून खालीं पडल्यावर ब्राह्मणांनीं इंद्राला हांक मारिली; तेव्हां इंद्र स्वर्गलोकीं आला. इंद्रानें कमळांत राहून परमेश्वराचें ध्यान केलें, म्हणून मानस-सरोवर-प्रदेशांत वास करणाऱ्या रुद्र देवतेनें ब्रह्महत्येचा

---

१ ही कथा श्रीन्महाभारतांत आहे, ती अशीः–एके दिवशीं नहुष राजा इंद्राणीस म्हणाला, "सांप्रत मी इंद्र आहें, त्या अर्थी तूं माझी सेवा करावीस, हें योग्य होय." इंद्राणीनेंही सर्व हकीकत बृहस्पतीला कळविली, व पुढें काय करावें, असें त्यास विचारिलें. तेव्हां बृहस्पतीनें इंद्राणीस अशी युक्ति सांगितली कीं, "आजपर्यंत ज्या वाहनांत कोणीही बसला नाहीं, अशा वाहनांत बसून तूं मजकडे ये, म्हणजे मी तुला वश होईन, असें तूं त्याला सांग." त्याप्रमाणें इंद्राणीनें नहुषाला सांगितलें. तेव्हां नहुषानें त्यासंबंधी पुष्कळ विचार केला; पण त्यास अपूर्व असें एकही वाहन आढळेना. शेवटीं, ब्राह्मणांना पालखी वहावयास लावून त्या पालखींत आजपर्यंत कोणीही बसला नाहीं, असा विचार करून, त्याच वाहनांत बसून आपण इंद्राणीकडे जावें, असा नहुष राजानें निश्चय केला. नंतर त्यानें पालखीस महान महान ऋषि लाविले; व त्यास तिकडे जाण्याची अतिशय उत्कंठा असल्यामुळें तो ब्राह्मणांस 'सर्प, सर्प,' (लवकर चला, लवकर चला,) असें वरचेवर म्हणून लत्ताप्रहार करूं लागला! त्या वेळीं पालखीस लाविलेल्या ऋषींपैकीं अगस्त्य मुनींस त्याचा लत्ताप्रहार लागतांच त्यांस फार त्वेष आला; व त्यांनीं नहुष राजास 'सर्पच हो!' असा शाप दिला. त्यामुळें तो तात्काल सर्प झाला; व हिमालयाच्या यामुनगिरि नामक शिखरावर पडला! पुढें, पांडव वनवासांत असतां, त्या शिखरावरील 'विशाखयूप' नामक स्थळीं त्यांचा कांहीं कालपर्यंत वास होता. त्या अवधींत एके दिवशीं भीमसेन त्याच यामुनगिरीवर मृगयेस गेला असतां त्या नहुषसर्पानें (अजगरानें) त्यास गिळिलें. इकडे, भीमास आश्रमीं येण्यास उशीर लागल्यामुळें त्याच्या शोधाकरितां स्वतः धर्मराज निघाला. तेव्हां हा प्रकार पाहून त्यानें त्या अजगराची पुष्कळ स्तुति केली असतां, त्या अजगररूप नहुषानें मनुष्यवाणीनें धर्मराजास कांहीं प्रश्न केले, आणि त्यांचीं यथायोग्य उत्तरें मिळतांच धर्मराजाच्या दर्शनानें त्याची सर्पजन्मांतून मुक्तता झाली.

प्रभाव क्षीण केला; व लक्ष्मीचें 'कमळ' हें राहण्याचें स्थान असल्यामुळें तिनें आपल्या आश्रयास राहिलेल्या इंद्राचें संरक्षण केलें. परीक्षित राजा, इंद्र स्वर्गलोकीं आल्यावर ब्रह्मर्षींनीं त्याजकडून अश्वमेध यज्ञाची दीक्षा घेवविली व विष्णूची आराधना चालविली; आणि त्या आराधनेच्या योगानें इंद्रानें केलेलें ब्रह्महत्येचें पातक भस्म झालें

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, हें आख्यान परमेश्वराच्या गुणानुवादांनीं भरलेलें असल्यामुळें, याचें नित्य पठन करणारास संसारांत विजय मिळून अंतीं मोक्षपद प्राप्त होतें.

# अध्याय चौदावा.

—:०:—

## वृत्रासुराचा पूर्वजन्मेतिहास.

### ( चित्रकेतु राजाची कथा )

राजा परीक्षित म्हणतोः—मुनिवर्य, वृत्रासुर हा रजोगुणी व तमोगुणी असतां, त्याची ईश्वरावर भक्ति कशी जडली ? देव व ऋषि हे सत्वगुणी व निर्मळचित्त असतां त्यांचीही ईश्वरावर भक्ति जडणें कठिण पडतें. हे ऋषिपुंगव, पृथ्वीच्या रजःकणांप्रमाणें अनंत प्राणी ह्या जगामध्यें आहेत; परंतु त्यांत मनुष्यादि कित्येक प्राणी मात्र, आपलें श्रेय कशांत आहे, त्याचा विचार करून तदनुरूप आपलें वर्तन ठेवितात. हे विप्रवर्या, त्यांत तरी, सर्वच पारमार्थिक हिताचा विचार करितात, असें नाहीं. मोक्ष मिळवून देहाचें साफल्य करण्यास इच्छिणारे पुरुष फारच थोडे. सहस्रावधि मुमुक्षु पुरुषांतून एखादाच पुत्रकलत्रादिकांच्या मोहांतून पार पडतो व भगवच्चरणीं मिळतो. महामुने, कोट्यवधि मुक्त व सिद्ध पुरुषांत सुद्धां भगवन्नारायणाची शांत मनानें व एकनिष्ठेनें भक्ति करणारा पुरुष सांपडणें कठीण; मग वृत्रासुर तर धडधडीत पापी, व सर्व लोकांस दुःख देणारा असा असतांना त्याची बुद्धि भयंकर युद्धामध्यें श्रीहरिपदीं इतकी आसक्त कशी झाली बरें ? महर्षे, मला वाटतें कीं, वृत्रासुराची योग्यता मोठी अपूर्व असावी. पहा, त्यानें परमेश्वराच्या ठिकाणीं निस्सीम भक्ति ठेविली व युद्धांत आपल्या पराक्रमानें इंद्रालाही संतुष्ट केलें!

सूत म्हणतातः—ऋषीहो, भगवान शुकाचार्यांनीं त्या श्रद्धालु परीक्षिताचा प्रश्न श्रवण करून मोठ्या गौरवानें त्याची जिज्ञासा परिपूर्ण केली.

**अंगिरा ऋषींचें चित्रकेतूच्या घरीं आगमन.**

श्रीशुकाचार्य म्हणालेः—परीक्षित राजा, भगवान व्यास, नारद आणि देवल या मुनींच्याकडून याविषयीं कांहीं इतिहास मीं ऐकिला आहे, तो तुला सांगतों, ऐक. पूर्वी एके वेळीं शूरसेन देशांत चित्रकेतु या नांवाचा एक सार्वभौम राजा होऊन गेला. ही पृथ्वी कामधेनूप्रमाणें त्याला इच्छित वस्तु देत असे.त्याला एक कोटि स्त्रिया होत्या; परंतु एकीच्याही पोटीं त्याला संतान झालें नाहीं; यामुळें तो रात्रंदिवस चिंतातुर असे. एवढें मोठें ऐश्वर्य व सत्ता असून त्याला त्यापासून यत्किंचितही सौख्य होईना. अशा स्थितींत तो असतां, एके दिवशीं सहज फिरत फिरत अंगिरा ऋषि त्याच्या येथें आले. राजानें त्यांचा योग्य सत्कार केला, आणि त्यांची सेवा करण्यासाठीं तो त्यांच्या जवळ बसला. परीक्षित राजा, अंगिरा ऋषि फार कृपाळू होते. राजा आपल्यापुढें भुईवर नम्रपणें बसला आहे, असें पाहून ते त्याला दयायुक्त अंतःकरणानें म्हणाले, "हे चित्रकेतु राजा, तुझें कुशल आहेना? ज्याप्रमाणें महत्तत्व, अहंकार व पंचमहाभूतें ह्या सात प्रकृति पुरुषाच्या राज्याचें पालन करितात, त्याप्रमाणें गुरु, अमात्य, देश, दुर्ग, कोश, दंड व मित्र ह्या तुझ्या सात प्रकृति तुझ्या राज्याचें पालन करितातना? तुझ्या मांडलिक राजांचें तुझ्यावर प्रेम आहेना? स्त्रिया, प्रजा, प्रधान, सेवक, मंडळ्या, मंत्री, नाग-

रिक व देशाधिकारी हे सर्व तुझ्या इच्छेप्रमाणें वागत आहेतना? चित्रकेतो, राजानें प्रजेवर विश्वास ठेवून व प्रजेनें राजावर विश्वास ठेवून वागल्यानें उभयतांसही सुखप्राप्ति होते. राजा, ज्या पुरुषाचें मन स्वाधीन असतें, त्यास सर्व कांहीं अनुकूल होतें; फार काय, पण लोकपाल सुद्धां आपआपल्या कामांत तत्पर राहून अशा राजाला करभार देतात! राजा, हें सर्व जर यथास्थित असेल, तर तुझ्या मुखावर चिंतेची पूर्ण छाया दिसते, त्याचें कारण काय बरें?"

परीक्षिता, हें ऐकून चित्रकेतु अंगिरा ऋषीस म्हणाला:—मुनिवर्य! आपण त्रिकालज्ञ असून हें विचारितां, त्या अर्थी मजकडूनच तें ऐकावें अशी आपली इच्छा दिसते. तर मी आपणांस सांगतों: मुनिश्रेष्ठ, मला सर्व कांहीं अनुकूल आहे, पण संतति नाहीं; ह्यामुळें पूर्वजांमुद्धां आम्हांला नरकवास भोगावा लागणार असें पाहून माझें मन अगदीं उदास झालें आहे. तेव्हां कृपा करून संतति होईल असा कांहीं तरी उपाय आपण मला सांगावा.

## चित्रकेतूला पुत्रप्राप्ति.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, चित्रकेतूची प्रार्थना ऐकून दयाळू अंगिरा ऋषींनी त्वाष्ट्र चरु एक करविला, व त्या योगें त्वष्ट्याची आराधना केली. नंतर, राजाची पट्टराणी जी कृतद्युति, तिला यज्ञांतील शेष भाग दिला आणि ते म्हणाले, 'ज्याच्या जन्मामुळें आनंद आणि मरणामुळें शोक होईल, असा एक पुत्र तुला होईल!" परीक्षित राजा, इतकें सांगून ब्रह्मपुत्र अंगिरा ऋषि निघून गेले. पुढें त्या पट्टराणीच्या उदरीं गर्भ राहून योग्य काल गेल्यावर ती पुत्र प्रसवली. आपल्या राजाला पुत्र झाला ही वार्ता प्रजाजनांना कळतांच जिकडे तिकडे आनंद झाला. सर्वांनीं गुढ्यातोरणें उभारिलीं. राजानें मोठ्या थाटानें विद्वान ब्राह्मणांकडून त्या पुत्राचें जातकर्म करविलें. विद्वान ब्राह्मणांना गाई, हत्ती, घोडे, सुवर्ण, अलंकार, वस्त्रें वगैरे अर्पण केलीं; व साठ कोटि गोप्रदानें दिलीं. पर्जन्य ज्याप्रमाणें सर्व जगास आनंदवितो, त्याप्रमाणें या वेळीं प्रत्येकाला कांहीं ना कांहीं तरी देऊन चित्रकेतूनें प्रजेला आनंदविलें; आणि या पुण्यकर्मानें पुत्राचें आयुष्य, ऐश्वर्य व यश हीं वृद्धिंगत व्हावीं, म्हणून प्रयत्न केला. कष्टानें मिळविलेल्या द्रव्याविषयीं दरिद्र्याचें प्रेम जसें फारच वाढतें, तसें त्या मुलाविषयीं राजाचें प्रेम फारच वाढूं लागलें. त्याप्रमाणेंच त्या मुलावर कृतद्युतीचीही प्रीति अधिकाधिक वाढत चालली. राजाचें प्रेम मुलावर जसें वाढत गेलें, तसें त्याच्या आईवरही वाढत गेलें; आणि त्यामुळें तो नेहमीं तिच्याच सहवासांत राहूं लागला.

## चित्रकेतूच्या पुत्राचें मरण!

परीक्षित राजा, कृतद्युतीचें महत्त्व वाढल्यामुळें तिच्या सवतींना तिचा मत्सर वाटूं लागला. त्यांना ती गोष्ट सहन होईना. त्यांचा तीन कारणांनीं संताप वाढला: एक, आपल्याला मूल होत नाहीं म्हणून; दुसरें, राजा आपला अवमान करूं लागला म्हणून; आणखी तिसरें, सवतीची वडेजावी जास्त झाली म्हणून! त्या म्हणत कीं, "पोटीं संतान नसणें ह्यासारखें दुसरें पाप नाहीं! पुत्रहीन स्त्रियेचें जीवित म्हणजे दुःखाची केवळ मूर्ति होय. अशा पत्नीचा पतीकडून आदर होत नाहीं. पुत्रवान सवती पुत्रहीन सवतींना अगदीं दासींप्रमाणें मानितात; अहो, दासींप्रमाणेंही आमची स्थिति नाहीं; आम्हांसारख्या हतभाग्य जगांत कोणीही नसतील!" परीक्षित राजा, अखेरीस त्या सवतींना वाटलें कीं, या सर्व गोष्टींस हा मुलगा कारण आहे; आणि शेवटीं त्यांनीं त्याला विष घातलें! मुलगा फार वेळ निजलेला पाहून कृतद्युतीनें त्याला आपणाकडे आणण्याविषयीं दासीला सांगितलें. दासी उठून पाळण्याजवळ गेली, तों त्याचे डोळे

पांढरे दिसत आहेत, अंग थंड पडलेलें आहे, व मुख निस्तेज झालेलें आहे, असें तिच्या दृष्टीस पडलें! तें पाहतांच तिचें काळीज चर्र झालें, आणि ती ऊर बडवीत धावत धावत यजमानणी-कडे आली. तेव्हां तिचें तें स्वरूप पाहून कृत-द्युतीच्या मनाला एकदम चरका बसला, व ती तट्कन् उठून दासीला कांहींएक न विचारतां पाळण्याजवळ गेली व आपल्या पुत्राची ती स्थिति पाहतांच एकदम बेशुद्ध पडली! इकडे राजाला ही वार्ता समजल्याबरोबर तोही एकदम मूर्छा येऊन पडला! जिकडे तिकडे कल्लोळ झाला! सर्व लोक दुःख करूं लागले! त्याबरोबर त्या पुत्राच्या दुष्ट सावत्र माताही तेथें येऊन मोठमोठ्यानें हेल काढून रडूं लागल्या! पुढें थोड्या वेळानें राजा-ची मूर्छा कमी झाल्यावर तो महालांत आला, आणि त्यानें त्या मृत मुलापाशीं लोळण घेतली! परीक्षिता,

कृतद्युतीचा शोक

तर अगदीं अनावर झाला; आणि ती नानाप्रकारें ईश्वराला दोष देऊं लागली: ती म्हणाली, "हे विधात्या, तू अगदीं मूर्ख कसा रे झालास! हें तुझें करणें तुला योग्य दिसतें का! वृद्ध मनु-ष्यांच्या देखत तरुण माणसं मरावीं, अशी तुझी विपरीत करणी आहे, त्या अर्थी निःसंशय तू प्राण्यांचा शत्रु आहेस! अरे, प्राण्यांच्या जन्माचा आणि मृत्यूचा क्रम नसेल आणि ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें ज्याला त्याला जन्म किंवा मृत्यु ये-ईल, तर तुझी काय गरज आहे! हे देवा, सृ-ष्टीच्या वृद्धीसाठीं जो स्नेहपाश तूं उत्पन्न केला आहेस, तो तूंच तोडीत आहेस, ह्यास काय म्हणावें?" परीक्षिता, नंतर ती मुलाच्या तोंडा-वरून हात फिरवून म्हणूं लागली, "बाळा! तू मज दीन गाईला सोडून कुठें रे गेलास! ए-कदा तरी या तुझ्या दुःखानें व्याकुळ झालेल्या मातापितरांकडे पहा! मनुष्यांना संतति नसल्या-मुळें नरकवास भोगावा लागतो, तो तूं जिवंत राहिल्यास तुझ्यामुळें आम्हांस भोगावा लागणार नाहीं, म्हणून तूं त्या दुष्ट यमा-बरोबर जाऊं नको. बाळा, ऊठ! ऊठ! तुझें तें हास्यमुख मला एकवार पाहूं दे. हे पहा तुझे खेळगडी तुला खेळावयास बोलावीत आहेत. बाळा, ऊठ, स्तनपान कर व सर्वांना सुख दे. बाळा, नाहींच कारे उठत? मला वाटतें तूं पर-लोकीं गेलास!" परीक्षिता, असा विलाप करि-तां करितां कृतद्युति फिरून मूर्छा येऊन पडली! राजाही मोहानें व्याप्त होऊन बेशुद्ध झाला! राजवाड्यांत एकच हलकल्लोळ होऊन राहिला! कोणीही कोणास समजविण्यास समर्थ झालें नाहीं! असो. अशी स्थिति पाहून भगवान अंगिरा ऋषि आणि नारद मुनि तेथें प्राप्त झाले.

## अध्याय पंधरावा.

—:०:—

### वृत्रासुराचा पूर्वजन्मेतिहास.

( चित्रकेतूला सांत्वनपर उपदेश )

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, चित्र-केतु आपल्या मृत पुत्राजवळ शोकाकुल होऊन पडला असतां अंगिरा ऋषि व नारद मुनि त्याला उठवून म्हणाले, "अरे राजा, ज्याच्याकरितां तूं शोक करीत आहेस, हा तुझा कोण बरें असावा? शिवाय, तूं पूर्वजन्मीं याचा कोण होतास, हल्लीं कोण आहेस, आणि पुढच्या जन्मीं कोण होशील, या सर्व गोष्टींची तुला कांहीं कल्पना आहे का? अरे, हें सर्व मायेचें गारुड आहे. पाण्याच्या प्रवाहानें वाळूचे कण ज्याप्रमाणें वरचेवर एकमेकांशीं वियोग पावतात आणि फिरून कदाचित् संयुक्त होतात, त्याप्रमाणें, प्राण्यांचाही कधीं कधीं संयोग होतो आणि कधीं वियोगही होतो. बीजापासून बीज उत्पन्न होतें, पण कांहीं बीजापासून कांहींच होत नाहीं; त्याप्रमाणें कित्येक

स्त्रीपुरुषांना मुलें होतात व कित्येकांना होत नाहींत. ह्या सर्व गोष्टी कोणाच्याही हातच्या नाहींत. त्या केवळ ईश्वराधीन आहेत. आम्ही, तूं व हे सर्व चराचर पदार्थ जसे उत्पत्तीच्या पूर्वी नव्हते व मृत्यूनंतर नसतील, तसेच आतांही नसल्यासारखेच आहेत. मग ह्या मिथ्या वस्तूंबद्दल शोक तरी काय म्हणून करावयाचा? भूताधिपति परमेश्वर स्वतः पंचमहाभूतांना उत्पन्न करितो; आणि त्यांच्याकडून ही तदात्मक सृष्टि रचितो, त्यांच्याकडून तिला पाळितो, व त्यांच्याकडूनच तिचा नाश घडवितो. कोणतेंही कार्य करण्यास भूतें स्वतंत्र नाहींत; पण इतकें असूनही तो परमेश्वर निरिच्छ आहे; असो. लहान मुलें जसा संसार मांडतात आणि फिरून गुंडाळून ठेवितात, तसा ईश्वर हा खोटा संसार मांडितो, आणि गुंडाळून ठेवितो! राजा, बीजापासून जसें बीज उत्पन्न होतें, तशीच पुरुषापासून स्त्रीच्या शरिरांत पुत्राची उत्पत्ति होते. ज्याप्रमाणें बीजें उत्पन्न होणारी भूमि निर्विकार असते, त्याप्रमाणें हा जीवही निर्विकारच असतो. परब्रह्म एक असतांही जशी वेगवेगळ्या जातींची कल्पना रूढ झाली आहे, तसा पुरातन काळापासून शरीर आणि शरीरी (जीव) हा भेद अज्ञानानें कल्पिलेला आहे."

श्रीशुकाचार्य म्हणतात:—परीक्षित राजा, अंगिरा ऋषि व नारद मुनि ह्यांच्या ह्या भाषणानें चित्रकेतूच्या मनाचें थोडें सांत्वन झालें. नंतर त्यानें आपले डोळे पुसून त्यांना प्रश्न केला, "अहो ज्ञानसंपन्न मुनिवर्य, आपण कोण आहां? मला वाटतें, आपण ईश्वर आहां, व हीं निरनिराळीं रूपें घेऊन मजसारख्या मूढांना बोध करण्याकरितां फिरत आहां; किंवा आपण कोणी तरी त्या ईश्वराचे भक्त आहां. सनत्कुमार, नारद, ऋभु, अंगिरा, देवल, असित, अपांतरतम, व्यास, मार्कंडेय, गौतम, वसिष्ठ, परशुराम, कपिल, शुक, दुर्वासा, याज्ञवल्क्य, जातूकर्ण्य, आरुणि, लोमश, च्यवन, दत्त, आसुरि, पतंजलि, वेदशिरा, बोध्य, पंचशिरा, हिरण्यनाभ, कौसल्य, श्रुतदेव व ऋतध्वज हे मुनि आणि दुसरेही कित्येक सिद्ध, अज्ञान जीवांना ज्ञानोपदेश करण्यासाठीं फिरत असतात, त्यांपैकीं तर आपण कोणी नाहींना? अहो, मी अज्ञानांधकारांत अगदीं बुडत आहें; माझी बुद्धि अगदीं नाहींशी झाली आहे. आपण माझ्या ठिकाणीं ज्ञानरूप दीप प्रज्वलित करावा!"

### चित्रकेतूला ऋषींचा ज्ञानोपदेश.

अंगिरा ऋषि म्हणाले:—राजा चित्रकेतो, तुला ज्यानें पुत्र दिला, तो मी अंगिरा; आणि हे दुसरे ब्रह्मपुत्र नारद मुनि होत. पुत्रशोकामुळें तूं दुस्तर अंधकारांत बुडत आहेस, असें योगबलानें जाणून आम्ही तुजकडे आलों आहों. राजा, तूं ईश्वराचा व ब्राह्मणांचा भक्त आहेस. ह्यास्तव, अशा प्रकारें तुझा नाश व्हावा, हें योग्य नाहीं. मी पूर्वी तुझ्याकडे आलों, तेव्हांच तुला ज्ञानोपदेश करणार होतों; पण तुला पुत्राची फार इच्छा होती, म्हणून त्या वेळीं तुला पुत्र दिला. पुत्रवानांना कसें दुःख भोगावें लागतें, हें हल्लीं तुला कळलें आहे. याचप्रमाणें स्त्री, गृह व नानाप्रकारचीं ऐश्वर्यें यांचे परिणाम आहेत. राजा' शब्दस्पर्शादि विषय, विविध ऐश्वर्य, पृथ्वी, राज्य, सैन्य, धन, सेवक, अमात्य, मित्र वगैरे सर्व कांहीं अशाश्वत आहे. ह्यांच्यापासून शोक, मोह, भय व यातना हीं मात्र प्राप्त होतात. ह्यांना जादूची, स्वप्नाची किंवा मनोराज्याची उपमा दिली असतां चांगली शोभेल. ह्या वस्तु जर खऱ्या असत्या, तर कधीं तरी नाहींतशा झाल्या असत्या का! आणि त्या जर दिसतां दिसतां नाहींतशा होतात, तर त्या खोट्या आहेत असं म्हणण्यास काय प्रत्यवाय आहे? त्या केवळ काल्पनिक नव्हेत काय? या संसारांत पुत्र, स्त्रिया, संपत्ति हीं ज्याच्या त्याच्या पापपुण्याप्रमाणें प्राप्त होतात, असें कित्येकांचें म्हणणें आहे, व

तें अक्षरशः खरें आहे; पण पापपुण्य तरी कसें होतें, याचा विचार केला म्हणजे कळून येईल कीं, मनुष्य आपल्या पूर्वकर्माच्या वासनांस अनुसरून नानाप्रकारच्या विषयांचें चिंतन करूं लागतो, व त्यामुळें त्याच्या ठायीं पाप किंवा पुण्य यांच्या कल्पना उत्पन्न होतात. तेव्हां पुण्य आणि पाप हींच जर मनानें कल्पिलेलीं आहेत, तर त्यांचीं फळें म्हणजे जिनें मुळींच जन्म घेतला नव्हता त्या वांझ स्त्रियेच्या मुलाप्रमाणें काल्पनिक नव्हत काय? मुळीं हा देह पंचमहाभूतें, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें आणि मन ह्यांचा बनलेला असून 'जीव' ह्यालाच 'माझें' आणि हाच 'मी' असें उगीच अभिमानानें म्हणतो. त्याला ह्या देहापासून नानाप्रकारचे क्लेश आणि संताप भोगावे लागतात; म्हणून, राजा, तूं आपलें चित्त स्थिर करून त्या स्थिर मनानें आत्म्याचें चिंतन कर. बाबारे, तो आत्माच सर्वत्र असून बाकी सर्व मिथ्या आहे असें ओळख."

### चित्रकेतूला मंत्रोपदेश.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षिता, अंगिरा ऋषींचें भाषण झाल्यानंतर नारद मुनि म्हणाले, "राजा चित्रकेतो, मी तुला एक मंत्र देतों, तो तूं शुद्ध मनानें ग्रहण कर. ह्या मंत्रांत कल्याणप्राप्तीचा मार्ग सांगितलेला आहे. ह्या मंत्राचा सात दिवस जप केलास म्हणजे संकर्षण प्रभूचें दर्शन होईल. राजा, शंकरादि देवही त्या संकर्षणाला शरण गेले, तेव्हां त्यांचा द्वैतभ्रम दूर होऊन त्यांना त्या संकर्षणासारखें दिव्य ज्ञान प्राप्त झालें. ह्यास्तव तुलाही या मंत्राच्या योगानें संकर्षणाच्या चरणांचें दर्शन होऊन त्याच्यासारखें दिव्य ज्ञान मिळेल.

~~~~~~~

# अध्याय सोळावा.

—:०:—

## वृत्रासुराचा पूर्वजन्मेतिहास.

### ( नारदांचें जीवात्म्यास उद्देशून भाषण. )

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, नंतर चित्रकेतु राजाच्या मृत पुत्राला नारद मुनींनीं योगसामर्थ्यानें जिवंत करून, त्याच्या आईबापांस व दुसऱ्या आप्तेष्टांस दाखविलें. त्या प्रसंगीं नारद त्या बालकाच्या जीवात्म्यास म्हणाले कीं, "हे जीवात्म्या, तुझें कल्याण होवो. बाबा, तूं आपल्या स्वकीय जनांना आपल्या मृत्यूनें किती दुःखी केलें आहेस तें पहा. बाळा, तूं सृष्टीच्या नियमाप्रमाणें वार्धक्यापर्यंत पोहोंचून ही तनु सोडून गेला नाहींस, व अपमृत्यूनें मेलास, ह्यामुळें तुझें पुष्कळ आयुष्य अवशिष्ट आहे; तर आपल्या सुहृदांसमवेत नानाप्रकारचे सुखविलास भोग व राज्याधिकार चालव; बाबा, ह्यासाठीं प्रथम आपल्या शरिरांत प्रवेश कर.

### चित्रकेतुपुत्राच्या जीवात्म्याचें ज्ञानपर भाषण.

परीक्षित राजा, नारदांचें भाषण ऐकून तो जीवात्मा तत्काल त्या मृत देहांत शिरला व चित्रकेतु राजाचा पुत्र म्हणून बोलूं लागला, "मुने, कर्मानुसार देव, पशु, मनुष्य इत्यादि योनींत मी एकसारखा फिरत आहें; मी म्हणजे केवळ ह्यांचा पुत्र म्हणून सदोदीत वागत नाहीं; ह्याकरितां, कोणत्या जन्मांत हे माझे पितर झाले होते त्याची मला स्मृति देखील नाहीं, व्रह्मेशा, हे मला यथार्थरूपानें जाणत नाहींत. ह्याचें मला फार दुःख वाटतें. पहा, हे मात्र माझ्याविषयीं आत्मीयता बाळगीत आहेत, पण मी ह्यांच्याविषयीं ती मुळींच बाळगीत नाहीं. महर्षे, मी ह्यांना सोडून गेल्यामुळें जर हे शोक करीत असतील, तर ह्यांनीं इतःपर माझ्यासारखा कृतघ्न
~~~~~~~

व वंचक शत्रु आपल्यापासून दूर झाला असें म्हणून हर्ष मानण्यास काय हरकत आहे ? अहो, बाजारांतील सुवर्णादिक वस्तु जशा एकाच्या हातून दुसऱ्याच्या हातीं नित्य जात असतात, व जोंपर्यंत त्या आपल्या हातीं असतात तोंपर्यंतच जशी त्यांवर आपली सत्ता असते, तसाच प्रकार जीवाचा आहे. जीवही कर्माप्रमाणें अनेक मातापितरांच्या हातीं पडतो; व जेथवर त्यांच्या स्वाधीन असतो, तेथवरच त्यांची त्यावर सत्ता असते. जीव हा स्वतः अहंकारहीन आहे. पित्रादिकांना मात्र त्याविषयीं अहंकार वाटत असतो. हे मुनिपुंगवा, जीव हा नित्य, अविनाशी व जन्मादिरहित आहे. मायेच्या योगानें हा नानाविध देह धारण करितो. ह्याला अमुक एक स्वकीय किंवा परकीय, अथवा आवडतें किंवा नावडतें ही भावना बिलकूल नाहीं. ब्रह्मपुत्रा, जीवाला शत्रु व मित्र हे दोन्ही सारखेच. अनेक शरिरांत ह्यानें प्रवेश केला, तरी त्यामध्यें हा केवळ साक्षी म्हणून असतो. हा सर्वत्र उदार असल्यामुळें सुखविलास किंवा राजवैभव ह्यांची त्याला कांहींच किंमत नसते. मातापितरांनो, ह्या माझ्या सत्स्वरूपाचा विचार करा, आणि तुमचा व माझा वस्तुतः कांहीं-एक संबंध नाहीं हें मनांत आणून माझ्याविषयीं अगदीं खेद करूं नका."

श्रीशुकाचार्य म्हणतात—राजा परीक्षिता नारदानें संजीवित केलेला तो चित्रकेतुपुत्र, ह्याप्रमाणें मातापितरांचें व अन्य स्वकीयांचें सांत्वन करून फिरून नष्ट झाला. त्या बालकाचें बोधपर भाषण ऐकून सर्वांस फार विस्मय वाटला; त्यांनीं सर्व गोष्टींचें यथास्थित मनन करून पुत्रशोक टाकून दिला; व मृत देहाचें और्ध्वदेहिक करून मनांत समाधान मानिलें. राजा, चित्रकेतु राजाच्या ज्या स्त्रियांनीं त्या पुत्राची हत्या केली होती, त्यांनाही मोठा अनुताप उत्पन्न झाला. अंगिरा ऋषींनीं, 'पुत्रादिक हे सर्व दुःखास कारण होतात' म्हणून जें पूर्वी सांगितलें होतें, तें त्यांच्यापुढें मूर्तिमंत उभें राहिलें. नंतर त्यांनीं त्या पुत्रहत्येच्या पातकांतून सुटका व्हावी म्हणून ब्राह्मणांस प्रायश्चित्त विचारिलें, व यमुनेच्या तीरीं जाऊन यथासांग प्रायश्चित्तविधि केला. राजा, चित्रकेतूलाही सद्बोध होऊन, आपण आजपर्यंत व्यर्थ मायापाशांत गुंतून गेलों होतों असें वाटलें; व ह्यांतून उशीरानें कां होईना, पण मुक्तता झाली ह्याजबद्दल मोठा आनंद झाला. पुढें चित्रकेतु राजाही यमुनेमध्यें स्नान व पितृतर्पणादिक क्रिया केल्यावर मौनपूर्वक इंद्रियनिग्रह करून अंगिरा व नारद ह्यांस शरण गेला. तेव्हां नारदानें त्यास भगवत्स्तुतिद्वारा ब्रह्मोपदेश केला तो असा:

## चित्रकेतुराजास नारदांनीं केलेला ब्रह्मोपदेश.

नारद म्हणाले:—

ॐनमस्तुभ्यं भगवते वासुदेवाय धीमहि ।
प्रद्युम्नायानिरुद्धाय नमः संकर्षणाय च ॥
नमो विज्ञानमात्राय परमानंदमूर्तये ।
आत्मारामाय शांताय निवृत्तद्वैतदृष्टये ॥
आत्मानंदानुभूत्यैव न्यस्तशक्त्यूर्मये नमः ।
हृषीकेशाय महते नमस्ते विश्वमूर्तये ॥
वचस्युपरतेऽप्राप्य य एको मनसा सह ।
अनामरूपश्चिन्मात्रः सोऽव्यान्नः सदसत्परः ॥

यस्मिन्निदं यतश्चेदं तिष्ठत्यप्येति जायते ।
मृन्मयेष्विव मृज्जातिस्तस्मै ते ब्रह्मणे नमः ॥
यन्न स्पृशंति न विदुर्मनोबुद्धींद्रियासवः ।
अंतर्बहिश्च विततं व्योमवत्तं नतोऽस्म्यहम् ॥
देहेंद्रियप्राणमनोधियोऽमी यदंशविद्धाः प्रचरंति कर्मसु ।
नैवान्यदा लोहमिवाप्रतप्तं स्थानेषु तद्द्रष्ट्रपदेशमेति ॥
ॐ नमो भगवते महापुरुषाय महानुभावाय महाविभूतिपतये सकल-सात्वतपरिवृढनिकरकमलकुड्मलोपलालितचरणारविंदयुगल परम-परमेष्ठिन्नमस्ते ॥

'हे भगवन्, वासुदेव, प्रद्युम्न, अनिरुद्ध व संकर्षण हीं तुझीं स्वरूपें होत. हे सच्चिदानंदा, तुझ्या ठायीं द्वैतविकार मुळीच नसल्यामुळें तूं नित्य परमानंदांत निमग्न असतोस. हे परमात्मन्, तुझ्या ठिकाणीं पूर्ण शांति वास करीत असल्यामुळें व तूं केवळ ज्ञानरूप असल्यामुळें, अज्ञानापासून उत्पन्न होणारे सुखदुःखादिक विकार तुझ्या ठिकाणीं अगदींच संभवत नाहींत. प्रभो, यच्चयावत् सर्व प्राण्यांच्या अंतर्यामीं तूं रहात असल्यामुळें, इंद्रियजन्य सर्व व्यापार तुझ्याकडूनच होत आहेत. भगवंता, स्थावरजंगम सर्व ब्रह्मांडांत तूं ओतप्रोत भरलेला आहेस. परमेश्वरा, जोंपर्यंत मन व अन्य इंद्रियें तुझ्या ब्रह्मस्वरूपांत लीन न होतां वासनेच्या अधीन आहेत, तोंपर्यंत मायारूपानें त्यांस देहविशिष्ट करून त्या त्या स्थितींत तूं त्यांचें संगोपन करितोस. भगवंता, हें सर्व कार्यकारणरूपी विश्व तुझ्यापासूनच उत्पन्न होतें व अंतीं तुझ्यामध्येंच लय पावतें. नारायणा, घट हा जसा मृत्तिकेपासून उत्पन्न होऊन परिणामीं मृत्तिकेंतच मिळून जातो, तसेंच ह्या सर्व मायामय सृष्टीचें आहे. ईश्वरा, घटादिकांच्या विकारांपासून मृत्तिकेचें रूप जसें सदासर्वकाळ अलिप्त असतें, तसाच देहादिकांच्या विकारांपासून तूं सदासर्वकाळ अलिप्त असतोस. विभो, देह, इंद्रियें व मन हीं तुझ्या ब्रह्मस्वरूपाला जाणण्यास अगदींच अपात्र आहेत; कारण ह्यांना मायेमुळें आपापलीं कार्यें करण्याचें कांहीं नियमित सामर्थ्य आलेलें असतें; मायेचें जेथवर अस्तित्व, तेथवरच ह्यांची शक्ति. मायेचा नाश झाल्याशिवाय परब्रह्मरूपाचें ज्ञान संभवत नाहीं. ह्यामुळें देहादिकांस केव्हांही ब्रह्मस्वरूप कळणें शक्य नाहीं. देवा, फार कशाला? जीव हा सुद्धां जेथपर्यंत वासनेमुळें जीवरूप आहे, तेथपर्यंत तो तुझें ब्रह्मरूप ओळखीत नाहीं; 'जीव हा सर्व अवस्थांचा साक्षी आहे' ह्याचा अर्थ, त्या जीवाबरोबर अन्वयरूपानें जें परब्रह्म वास करीत असतें, तें सर्व अवस्थांचें साक्षी आहे असें समजणें अवश्य होय. ह्यास्तव, हे महापुरुषा, हे महानुभावा, हे महाविभूतिपते, मोठमोठ्या ज्ञात्यांनीं तुझ्या यथार्थ ज्ञानाकरितां तुझ्याच चरणकमलांचा आश्रय केला हें योग्यच होय. हे परमेष्ठिन्, मी तुला वारंवार नमस्कार करितों, तो तूं कृपापूर्वक ग्रहण कर.'

### चित्रकेतूस शेषदर्शन.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित् राजा, ह्याप्रमाणें भगवत्स्तवन करून नारदानें चित्रकेतु राजाला ब्रह्मोपदेश केल्यावर, नारद व अंगिरा हे ब्रह्मलोकीं निघून गेले. पुढें चित्रकेतु राजानें केवळ उदक सेवन करून एकाग्रचित्तानें नारदप्रणीत ब्रह्मविद्येचा सात दिवसपर्यंत जप केला; सात दिवस झाल्यावर त्या राजाला विद्याधरांचें पूर्ण आधिपत्य प्राप्त झालें. नंतर कित्येक दिवसांनीं तो

चित्रकेतु राजा ह्या विद्येच्या बळानें श्रीशेषाच्या समीप गेला. तेथें गेल्यावर अनंताचें गौरवर्ण शरीर, दिव्य कांति, नीलांबर, देदीप्यमान मुकुट, सुंदर बाहुभूषणें, तेजस्वी कटिमेखला व वलयादिक अलंकार पाहून, आणि भोंवतालीं महान महान सिद्धांचे थवे स्तवन करीत बसलेले अवलोकन करून तो अगदीं चकित झाला. शेषनारायणाची प्रसन्न मुद्रा दृग्गोचर होतांच त्याच्या सर्व पातकांचा लय होऊन त्याचें निर्मल चित्त अत्यंत आह्लादित झालें; त्याच्या मुखावाटे शब्द निघेनासा झाला; नेत्रांतून प्रेमाश्रूंचे पूर वाहूं लागले; व सर्वांगावर रोमांच उभे राहिले! पुढें कांहीं अवकाशानें त्यानें संकर्षणास भक्तिपूर्वक प्रणाम मात्र केला. कारण त्याची चित्तवृत्ति भगवद्भक्तीनें परिप्लुत झाल्यामुळें त्याचें देहभान नष्ट होऊन, प्रभूचें स्तवन करण्यास अवश्य असणारी मानसिक स्थिति प्राप्त होण्यास त्यास बराच काळ लागला. परीक्षिता, नंतर चित्रकेतु राजानें आपल्या चित्ताचा निरोध करून भगवत्पदीं एकाग्रता केली, व स्तुति करण्यास आरंभ केला.

### संकर्षणाची स्तुति.

चित्रकेतु म्हणाला:—प्रभो, काय चमत्कार सांगावा, कीं तूं वास्तविक अजिंक्य असून आत्मनिग्रह करणाऱ्या समदृष्टि साधूंच्या सर्वथा हस्तगत झाला आहेस! भगवन्, दुसरा चमत्कार असा कीं, ज्या ज्ञानवंतांनीं तुला जिंकून टाकिलें, त्या जिंकणाऱ्यांनाही तूं जिंकलें आहेस! तात्पर्य, जे कोणी निष्कामभक्तीनें तुझी सेवा करितात, त्यांच्या ठिकाणीं तुझ्याविषयीं सेवकता किंवा तुझ्या ठिकाणीं सेव्यता हीं मुळींच अवशिष्ट रहात नाहींत. म्हणजे तुझे दास व तूं एकरूप बनून जातां, हें केवढें आश्चर्य बरें! भगवंता, वास्तविक पाहतां जगताची उत्पत्ति, स्थिति व लय हीं सर्व तुझ्याकडूनच होत आहेत. ब्रह्मादिक देव हे तुझ्या सत्तेनेंच आपआपलीं कर्तव्यें करीत आहेत. आदिपुरुषा, देवांना, "आम्ही सृष्टीचे नियंते" म्हणून जो अभिमान वाटतो, तो खरोखरी व्यर्थ होय. ईश्वरा, आदि, अंत व मध्य ह्या विकृति तुझ्या ठायीं मुळींच नाहींत. देवाधिदेवा, परमाणुरूप मूळ कारण व ब्रह्मांडरूप अति विस्तीर्ण कार्य ह्यांत सर्वत्र तूंच भरलेला आहेस; त्यामुळें ह्या सृष्टीला जरी आदि, मध्य व अंत असले, तरी तुला ते नाहींत हें व्यक्त आहे. विभो, तुला आदि, मध्य व अंत नसल्यामुळें तुला कालाचा उपाधि नाहीं; कारण ज्या ब्रह्मांडांतील अणुमात्राच्या ठायीं तुझें अस्तित्व आहे, असलीं कोट्यावधि ब्रह्मांडें तुझ्या ठिकाणीं परमाणुमात्र आहेत. ह्यास्तव, हे अनंता, तुला 'अनंत' ही संज्ञा फारच शोभते ह्यांत संदेह नाहीं. परमेश्वरा, विषयलोलुप पुरुष तुला न भजतां तुझ्या इंद्रादिक विभूतींना भजतात, हा खचीत वेडेपणा होय; परंतु, देवा, राजाचा नाश झाला असतां जसा त्याच्या सेवकांचा नाश होतच असतो, तसा मूळ उपास्य देवतेचा नाश झाला असतां उपासकांचा नाश झालाच म्हणून समजावें. भगवन्, जरी कोणाला विषयपूर्तीसाठीं आराधना करावयाची असली, तरी त्यानें तुझीच आराधना करावी. तुझ्या आराधनेच्या योगानें त्या विषयवासना आणखी न वाढतां हळू हळू नष्ट होत जातात. देवाधिदेवा, सकामबुद्धीनें तुझी उपासना करणारांनाही जर असें फळ प्राप्त होतें, तर निष्कामबुद्धीनें तुझ्या ठिकाणीं अहर्निश रममाण होणाऱ्या पुरुषांना मोक्षप्राप्ति होईल ह्याबद्दल संशय तो कोणता! महापुरुषा, जे तुझे भक्त आहेत, त्यांना देहादिकांविषयीं ममत्वबुद्धि केव्हांच उत्पन्न होत नाहीं, व ते नेहमीं सर्वत्र समबुद्धि ठेवितात. प्रभो, तुझ्या दर्शनापासून सकल पातकांचा नाश होतो. देवा, तुझें नुसतें नांव ऐकिलें असतां चांडालादिक सुद्धां संसारांतून तरतात. भगवन्, आज तुझ्या कृपाकटाक्षानें मी पावन झालों. आतां

मला वासना म्हणून राहिली नाहीं; व मी जन्मास येऊन कृतार्थ झालों, असें मला वाटतें. हे अनंता, तूं सर्व सृष्टीचा आत्मा आहेस; ह्यामुळें, जग काय करीत आहे हें सर्व तूं जाणतच आहेस. तेव्हां मीं तुला कांहीं विदित करावयाचें आहे, असा अर्थच नाहीं. काजव्यानें दिनमणीपुढें प्रकाश तो काय पाडावा ? देवाधिदेवा, तूं जेव्हां प्रथम कांहीं व्यापार करण्यास प्रारंभ करितोस, तेव्हां प्रजापति पुढील रचना करूं लागतात; इंद्रियांना आपआपलीं कामें करण्यास तुझ्यामुळेंच शक्ति आली आहे; हे विश्वाधिपते, तुला सहस्र फडा असून तूं आपल्या मस्तकावर हें सर्व भूमंडळ मोहरीसारखें धारण केलें आहेस. भगवंता, मी तुला विनयपूर्वक नमस्कार करितों, तो ग्रहण कर."

शेषाचें भाषण.

श्रीशुकाचार्य म्हणतात:–हे कुरुश्रेष्ठा, चित्रकेतु राजानें केलेली स्तुति श्रवण करून भगवान शेष प्रसन्न होऊन म्हणाले, "हे विद्याधराधिपते, नारद व अंगिरा ह्यांनीं तुला मजविषयीं जें ज्ञान कथन केलें, तें यथार्थ आहे. तुला प्राप्त झालेल्या ब्रह्मविद्येमुळें तूं उत्तम प्रकारें कृतार्थ झालास. चित्रकेतु राजा, यच्चयावत् सर्व पदार्थ मीच उत्पन्न करितों व त्यांत मीच भरलेला असतों. शब्दब्रह्म (वेद) व परब्रह्म हीं दोन्ही माझींच नित्यरूपें होत. पदार्थमात्रामध्यें भोग्य म्हणून जें कांहीं आहे, तेंही मीच; व त्या पदार्थांचा वास्तविक भोक्ताही मीच. चित्रकेतो, स्वप्नांत असतां ज्याप्रमाणें एखादा पुरुष अनेक वस्तु, देश, अवस्था वगैरे अवलोकन करून त्या स्वप्नांतच, मी निद्रा घेतों, जागा असतों, अनेक कृत्यें करितों इत्यादि मिथ्या गोष्टींचें अस्तित्व मानितो, त्याप्रमाणेंच जाग्रदावस्थेंतील लोकांची स्थिति असते. ही जाग्रदावस्था म्हणजे जीवाचा एक विशिष्ट उपाधि होय. स्वप्नगत पुरुषास स्वप्नरूप उपाधीनें जसे स्वप्नांतील बहुविध मिथ्या भोग भोगावे लागतात, तशीं संसारी पुरुषास जीवभूत उपाधीमुळें सुखःदुखादिक अनेक मिथ्या द्वंद्वें भोगावीं लागतात; असो. राजा चित्रकेतो, जाग्रत्स्वप्नसुषुप्ति हे सगळे जीवोपाधीचे विकार होत. ह्या सर्व अवस्थांमध्यें साक्षिरूपानें असणारा जो आत्मा ( परब्रह्म ), तो निर्विकार व चिन्मयच आहे. जोंपर्यंत जीव हा माझें परब्रह्मस्वरूप ओळखीत असतो, तोंपर्यंत त्यास संसारांत पडावें लागत नाहीं; परंतु माझ्या स्वरूपाचा विसर पडतांच तो जन्ममरणाधीन होऊन संसारांतील येरझारा भोगूं लागतो; ह्यास्तव माझ्या स्वरूपाचें ज्ञान होणें हाच मत्प्राप्तीचा सुलभ मार्ग होय. ज्ञान हें दोन प्रकारचें असतें: परोक्षज्ञान व अपरोक्षज्ञान. परोक्ष ज्ञान प्राप्त होण्यासाठीं मीं श्रुति व बहुविध शास्त्रें निर्माण केलीं आहेत; व त्यांच्या योगानें माझ्या ध्यानाचा नित्य निदिध्यास उत्पन्न झाला, म्हणजे अपरोक्षज्ञान होऊन माझा साक्षात्कार प्राप्त होतो. राजा, हीं दोन्ही ज्ञानें ह्या सृष्टींत मनुष्यास प्राप्त होतात, अन्य प्राण्यांस प्राप्त होत नाहींत; ह्याकरितां माझी प्राप्ति होणें हें फक्त नरयोनींत शक्य आहे. चित्रकेतो, माझ्या प्राप्तीचा मुख्य उपाय म्हटला म्हणजे संसारापासून निवृत्ति होणें हाच होय; व ती निवृत्ति घडून येण्यास, संसारांत सुखप्राप्तीकरितां व दुःखनाशाकरितां जीं कामें लोक करितात, त्यांपैकीं कितीकांपासून इष्टप्राप्ति होते ह्याचा विचार करावा. सारांश, विवेक व इंद्रियजय ह्यांच्या योगानें प्रत्येकानें परब्रह्मरूपाचें ज्ञान मिळवावें व माझ्या रूपांत मिळून जाऊन संसारांतील त्रिविध तापांपासून सुटावें हें अत्यंत श्रेयस्कर होय. चित्रकेतु राजा, ह्या माझ्या उपदेशाचें नीट मनन कर, म्हणजे तुला ज्ञान व विज्ञान हीं प्राप्त होऊन तूं सायुज्य मिळविशील."

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, ह्याप्रमाणें चित्रकेतु राजास बोध करून भगवान शेषनारायण अंतर्हित झाले.

## अध्याय सतरावा.

—:०:—

### वृत्रासुराचा पूर्वजन्मेतिहास.

( चित्रकेतूकडून शंकराचा उपहास. )

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, चित्रकेतूला आकाशांत फिरणाऱ्या विद्याधराचें रूप प्राप्त झालें होतें. ज्या दिशेला भगवान शेष गुप्त झाले, त्या दिशेला त्यानें नमस्कार केला; आणि तेथून, सर्व पर्वतांत श्रेष्ठ जो मेरु पर्वत, त्यावर तो गेला. त्यानें त्या पर्वताच्या गुहेमध्यें, जेथें सर्व सिद्धि इच्छिल्याबरोबर प्राप्त होतात तेथें, अप्सरांकडून ईश्वराचीं चरित्रें गाववीत लक्षावधि वर्षें आनंदांत काढिलीं. त्या स्थलीं सिद्ध, चारण व मुनि हे त्याची नेहमीं स्तुति करीत. त्याच्या अंगीं योगबळ पूर्ण असल्यामुळें त्याची शक्ति यत्किंचितही कमी झाली नाहीं. एकदा तो विष्णूनें दिलेल्या विमानांत बसून हिंडत असतां कैलास पर्वताकडे गेला, तों तेथें सिद्ध-चारणादिकांच्या समुदायामध्यें शंकर हे पार्वतीला आपल्या डाव्या मांडीवर घेऊन बसले आहेत, आणि त्यांनीं एक हात तिच्या स्कंधावर टाकिलेला आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां तो भगवान शंकराला उद्देशून सती ( पार्वती ) ऐकत असतां मोठ्यानें खदखदां हसला आणि म्हणाला, "अहो! हा शंकर आपल्यास वेदवादी लोकांचाही गुरु म्हणवितो, आणि भरसभेंत निर्लज्जाप्रमाणें आपल्या बायकोला मांडीवर घेऊन बसतो व तिला आलिंगन देतो, याला म्हणावें तरी काय? असलें हें कृत्य ह्याच्या जटांना आणि तपस्वीपणाला मुळींच शोभत नाहीं! अहो, अज्ञानी पुरुष देखील आपल्या बायकांस एकांतांतच मांडीवर घेऊन बसतात!"

श्रीशुक मुनि म्हणाले:—परीक्षित राजा, असें हें चित्रकेतूचें भाषण ऐकून भगवान शंकराला देखील पुष्कळ हसूं आलें, पण तो त्याला एक शब्दही बोलला नाहीं. मग शंकर जर स्वत: कांहीं बोलले नाहींत, तर बाकीचे सभासद तरी काय बोलणार? ते गप्पच बसले. चित्रकेतूला स्वताच्या इंद्रियनिग्रहणाबद्दल मोठा अभिमान होता, व शंकराच्या सामर्थ्यानें त्याला ज्ञान नव्हतें, म्हणून तो त्याला असें बोलला; पण हें त्याचें कृत्य सतीला सहन झालें नाहीं. तिनें प्रथम त्याबद्दल धिक्कार प्रदर्शित करून नंतर

#### चित्रकेतूस शाप

दिला! ती म्हणाली, "हा (चित्रकेतु) इतका उद्धटपणें आम्हांस बोलतो, यावरून, जगामध्यें आमच्यासारखे जे कोणी निर्लज्ज असतील, त्यांना शिक्षा देण्याचें काम याच्याकडे नेमून दिलें आहेसें वाटतें! ब्रह्मदेव, भृगु, नारदादिक मुनि, कुमार, कपिल, मनु असे महान महान ज्ञानी पुरुष या शंकराच्या वर्तनाला कांहीं दोष देत नाहींत, तेव्हां ते सर्व मूर्ख असून हाच एक अकलेचा खंदक निपजला आहे! ब्रह्मदेवादि सर्व देव आणि इतर महान महान सिद्ध पुरुष शंकराच्या चरणांचें नेहमीं ध्यान करितात, आणि हा दांडगा क्षत्रियाधम त्या सर्वांना मूर्ख ठरवून आम्हांला शिक्षण लावितो अं! याला चांगलीच शिक्षा केली पाहिजे! वैकुंठवासी भगवंताच्या सान्निध्याला हा मेला गर्विष्ठ मुळींच शोभत नाहीं! म्हणून, बाळा चित्रकेतो, तू पापी दैत्यजन्मास जा. अशी शिक्षा घडली म्हणजे फिरून तुला सज्जनांची अवहेलना करण्याची दुष्ट बुद्धि होणार नाहीं."

#### चित्रकेतूचें भाषण.

श्रीशुक म्हणाले:—परीक्षित राजा, हा शाप ऐकतांच चित्रकेतु विमानांतून उतरून सतीची नम्रपणें प्रार्थना करूं लागला: तो म्हणाला, "माते, मी हा शाप मस्तकीं धारण करितों. देव मनुष्यांस जी आज्ञा देतात, तें त्यांच्या पूर्वकर्मांचें फळ होय. हा जीव अज्ञानानें मोहित होऊन सुखदुःख

भोगीत संसारचक्रांत भ्रमण करीत असतो स्वतः कोणीही सुखदुःख प्राप्त करून घेत नाहीं, अथवा कोणी कोणाला तें देतही नाहीं; म्हणून स्वतांचें बरें किंवा वाईट करून घेतलें, किंवा अमक्यानें माझें बरें अथवा वाईट केलें, असें म्हणणें वेडेपणाचें होय. हा संसार मायेच्या गुणांचा प्रवाह आहे. ह्यांत शाप तो काय ? आणि अनुग्रह तो कसला ! स्वर्ग कसला आणि नरक कसचा ! त्याचप्रमाणें सुखदुःख; सगळेंच सारखें ! परमेश्वर एकटा सर्व भूतांना आपल्या मायेनें उत्पन्न करितो; बंध, मोक्ष व सुखदुःख हींही त्यानेंच निर्माण करून ठेविलीं आहेत; व इतकें करूनही तो स्वतः त्यांपासून अलिप्तच असतो. त्याला कोणी प्रिय नाहीं आणि कोणी अप्रियही नाहीं. कारण, त्याची कोणावर आसक्ति नसल्यामुळें तो सर्वांना समबुद्धीनें पाहतो; तथापि मायेमुळें उत्पन्न झालेलीं पुण्यपापकर्में प्राण्यांना संसारांत पाडून त्यांना सुखदुःखें भोगावयास लावितात. म्हणून, माते, मी आपल्या शापाचें निरसन व्हावें या हेतूनें तुझी प्रार्थना करीत नाहीं; परंतु मी तुला दुरुत्तरें बोललों असें जर वाटत असेल, तर तेवढ्यापुरती मला क्षमा कर."

परीक्षिता, इतकें बोलून, शंकर व पार्वती त्याकडे आश्चर्ययुक्त मुद्रेनें पहात असतां विमानांत बसून तो निघून गेला. नंतर आसमंताद्भागीं देव, ऋषि, दैत्य, सिद्ध, पार्षद वगैरे बसले होते, त्या सर्वांसमक्ष भगवान शंकर सतीला म्हणाले, "सुंदरी, विष्णूच्या सेवकांचे सेवकही किती निस्पृह व उदार मनाचे असतात, हें तुला या चित्रकेतूच्या उदाहरणावरून कळून आलेंच असेल. त्याच्या भक्तांना कशाचेंच भय वाटत नाहीं. ते स्वर्ग, मोक्ष, नरक सर्व सारखेंच मानितात. सुख-दुःख, जन्म-मरण, शाप-अनुग्रह हे जीवांना देहाभिमानानें प्राप्त होतात. आत्म्याच्या ठिकाणीं हे भेद मुळींच नाहींत. असें असतां, त्याच्या ठिकाणीं ते आहेत असें वाटतें, हें जीवाचें अज्ञान होय. परमेश्वराच्या भक्तांचें ज्ञान व वैराग्य हेंच सामर्थ्य आहे. त्यांना सुखदुःखादि गोष्टींचें मुळींच भय वाटत नाहीं. परमेश्वराचें कर्तृत्व ब्रह्मदेव, सनत्कुमार मुनि, मोठमोठे देव ह्यांना आणि मला स्वतांलाही कळत नाहीं. आम्ही सर्व त्याचेच अंश आहों; पण आम्हांला आम्हीच स्वतंत्र ईश्वर असा अभिमान असल्यामुळें त्या भगवंताचें यथार्थ स्वरूप कळून येत नाहीं. हा चित्रकेतु मजप्रमाणेंच परमेश्वराचा प्रिय भक्त आहे. परमेश्वराच्या ठायीं आपपरभाव किंवा भेदबुद्धि मुळींच नाहीं. तो सर्व जगताचा आत्मा असल्यामुळें त्यास सर्व कांहीं आत्मवत् वाटतें. सुंदरी, ईश्वराचे भक्त शांत, समदृष्टि आणि उदार मनाचे असतात. म्हणून, प्रिये, या त्याच्या निस्पृहतेबद्दल आश्चर्य मानण्याचें कांहीं कारण नाहीं."

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, असें हें शंकराचें भाषण ऐकून पार्वतीच्या मनाला समाधान वाटलें, व तिच्या मनाचा विस्मय दूर झाला. चित्रकेतु हा महाभगवद्भक्त असल्यामुळें त्याच्या अंगीं सतीला शाप देण्याचें सामर्थ्य होतें; पण तसें त्यानें केलें नाहीं. खऱ्या साधूचें हेंच लक्षण होय. राजा, पुढें हाच चित्रकेतु त्वष्टयाच्या दक्षिणाग्नीमध्यें दैत्यस्वरूप घेऊन उत्पन्न झाला. महापराक्रमी वृत्रासुर तो हाच. परीक्षिता, वृत्र हा दैत्य असतां तो भगवद्भक्त असण्याचें कारण तूं विचारलेंस, तें तुला मीं सविस्तर सांगितलें. हें पुण्यकारक चरित्र जो पुरुष शुद्ध मनानें प्रातःकाळीं ऐकेल, तो सुगतीस जाईल.

## अध्याय अठरावा.

—:०:—

### अदितीची व दितीची संतति.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, सवित्याच्या पृश्नि नामक पत्नीला साविश्री, व्याहृति,

त्रयी, अग्निहोत्र, पशुयाग, सोम, चातुर्मास्य, आणि पंचयज्ञ हीं मुलें झालीं; व भर्गाची पत्नी सिद्धि हिला महिमा, विभु, प्रभु, आशिष आणि एक रूपवती कन्या सुव्रता इतकीं अपत्यें झालीं. धात्याला चार भार्या होत्या. त्यांचीं कुहू, सिनिवाली, राका आणि अनुमति हीं नांवें होत. ह्यांना अनुक्रमें सायं, दर्श, प्रातः आणि पूर्णमास असे चार पुत्र झाले. विधाता या नांवाचा धात्याचा एक धाकटा भाऊ होता. त्याला त्याच्या क्रिया नामक पत्नीपासून 'पुरीष्य ' नांवाचे अग्नि झाले. ( ह्यांनाच 'पंचचित' असें म्हणतात. ) वरुणाच्या चर्षणी नामक पत्नीच्या उदरीं ब्रह्मदेवाच्या भृगु नामक पुत्रानें पुनः जन्म घेतलें. या वरुणाला आणखी एक मुलगा होता. त्यानेंच पुढें वारुळांत जन्म घेतला. तोच वाल्मीकि ऋषि. अगस्त्य आणि वसिष्ठ हे दोघे ऋषि मित्र आणि वरुण या दोघांचे मिळून पुत्र होत. उर्वशीला पाहून यांचें रेतस्खलन झालें होतें, तें त्या दोघांनीं ( मित्रानें व वरुणानें ) एका घटांत भरून ठेविलें, व त्यापासूनच अगस्त्य व वसिष्ठ यांची उत्पत्ति झाली. मित्राला रेवतीच्या उदरीं उत्सर्ग, अरिष्ट आणि पिप्पल हे तीन पुत्र झाले. बा परीक्षिता, इंद्र नामक श्रेष्ठ आदित्याला पौलोमी नामक भार्येच्या उदरीं जयंत, ऋषभ व मीढुष असे तीन पुत्र झाले, असें म्हणतात. ज्यानें मायेनें वामनरूप धरिलें होतें, त्या उरुक्रम देवाला त्याच्या कीर्ति नामक भार्येपासून बृहच्छ्लोक हा एक पुत्र झाला, व पुढें बृहच्छ्लोकाला सौभग इत्यादि अनेक पुत्र झाले. त्या महाथोर कश्यपपुत्र उरुक्रमाचीं ( वामनाचीं ) चरित्रें व त्यानें अदितीच्या उदरीं अवतार कसा घेतला तो वृत्तांत मी तुला मागाहून सांगेन.

आतां कश्यपाला दितीच्या ठिकाणीं कोणकोणते पुत्र झाले, तें तुला सांगतों. ह्या दितिवंशांत प्रल्हाद व बलि हे महाभगवद्भक्त निपजले. दितीला प्रथम हिरण्यकशिपु आणि हिरण्याक्ष हे दोन महाबलाढ्य पुत्र झाले असें मीं पूर्वी सांगितलेंच आहे. हिरण्यकशिपूला जंभाची मुलगी कयाधु इजपासून चार पुत्र झाले. त्यांचीं नांवें संन्हाद, अनुन्हाद, न्हाद व प्रन्हाद. कयाधूची बहीण सिंहिका ही विप्रचित्ति नामक दानवाला दिली होती. तिला राहु नांवाचा मुलगा झाला. हा अमृत पीत असतां विष्णूनें सुदर्शनानें याचें मस्तक तोडिलें. संन्हादाला त्याच्या कृति नामक भार्येपासून पंचजन नामक पुत्र झाला. न्हादाला धमनीपासून वातापि व इल्वल असे दोन पुत्र झाले. ह्या इल्वलानें अगस्त्य अतिथीकरितां वातापीला शिजविलें! अनुन्हादाला सूर्म्येच्या पोटीं बाष्कल व महिष हे दोन पुत्र झाले. प्रन्हादाला विरोचन हा मुलगा झाला. त्या विरोचनाला देवीच्या पोटीं बलि झाला. बलीला अशनेपासून शंभर पुत्र झाले. त्यांत बाण हा महासामर्थ्यवान व कीर्तिमान असून ह्यानें शंकराची आराधना केली, व त्याच्या गणांत श्रेष्ठ पद मिळविलें. भगवान विष्णु त्याच्या समीप राहून त्याच्या नगराचें अद्यापि रक्षण करीत असतात! बाण हा बलीचा वडील मुलगा होय. दितीला मरुत् नांवाचे एकुणपन्नास मुलगे झाले. त्यांपैकीं कोणाला संतति झाली नाहीं. त्या सर्वांना इंद्रानें आपल्यासारखीं रूपें प्राप्त करून दिलीं!

परीक्षित राजानें विचारिलें:—हे शुक मुने, मरुत् हे जन्मतः दैत्य असतां, इंद्रानें त्यांस स्वस्वरूप प्राप्त करून देण्याजोगें त्यांनीं कोणतें पुण्यकर्म केलें बरें?

### मरुद्गणांचा जन्मेतिहास.

श्रीशुक म्हणाले:—परीक्षित राजा, दितीचे पुत्र इंद्रानें मारिले, म्हणून सवतीमत्सरामुळें धुमसत असलेला क्रोधाग्नि पुत्रशोकामुळें भडकून तिच्या अंगाची लाही झाली, आणि ती मोठ्या विचारांत पडली. ती मनांत

म्हणाली, "ह्या दुष्ट निर्दय इंद्रानें विष्णू-कडून आपल्या भावांचा वध करविला अं ! ह्या दुष्टाला मारवीन, तेव्हांच मला सुखानें झोंप येईल ! त्याच्या शरिराला त्रैलोक्याचा राजा असें नांव मिळालें म्हणून काय झालें ? मेल्यावर त्याची राख, विष्ठा किंवा कृमिकीटकांचें भक्ष्यच होणार कीं नाहीं ? अशा नश्वर शरिरासाठीं हा प्राण्यांचा द्रोह करितो, तेव्हां या त्याच्या कृतीचें फल नरक हेंच होय ! त्या उच्छृंखल मनाच्या इंद्राला शरीर हें नित्य आहे असें वाटतें ! त्याची रग जिरविण्यासारखा पुत्र आपल्याला काय युक्ति केली असतां होईल बरें ?" परीक्षिता, असे विचार मनांत चालले असतां दितीनें ठरविलें कीं, पतिसेवा करणें हाच योग्य उपाय होय. दुसऱ्याचें मनोगत जाणण्यांत ती फार कुशल होती. तिनें आपल्या चतुरस्रपणानें त्या ज्ञानसंपन्न कश्यप मुनींचें मन वळविलें, आणि 'मी तुझे मनोरथ पूर्ण करीन' असें त्यांजकडून वचन घेतलें. परीक्षिता, स्त्रिया कोणाचें मन वळविणार नाहींत बरें ? पहा—ब्रह्मदेवानें आरंभीं भूतें उत्पन्न केलेलीं जेव्हां अगदीं उदासीन राहिलीं, तेव्हां त्यानें आपल्या अर्ध्या देहाची स्त्री बनविली, व मग तिनें तात्काळ पुरुषाचें मन वेधून टाकिलें ! राजा, पत्नीनें केलेल्या सेवेनें संतुष्ट होऊन कश्यप मुनि हसत हसत तिला गौरवून म्हणाले, "सुंदरी, तुझ्या उत्तम आचरणानें मी तुला प्रसन्न आहें, वर माग. प्रिये, पति संतुष्ट झाल्यावर स्त्रीला मिळणार नाहीं असा त्रैलोक्यांत एक तरी पदार्थ आहे का? सर्व भूतांच्या अंतरीं वास करणारा जो लक्ष्मीपति, त्यानेंच इंद्रादि सर्व रूपें आपल्या अंशानें घेतलीं आहेत. पतीची सेवा करणें हा पतिव्रता स्त्रियांचा धर्म आहे. म्हणून पतीलाच ईश्वररूप मानून त्या त्याची सेवा करितात. त्या सेवेनें पति प्रसन्न झाला असतां तिला परमेश्वर पावल्याप्रमाणेंच आहे. कारण, त्यानेंच पतीचें रूप घेतलेलें असतें."

दिति म्हणाली, "द्विजवरा, आपण जर वर देत आहां, तर ज्यानें माझे पुत्र विष्णूकडून मारविले, त्याचा वध करणारा अमर पुत्र मला द्यावा, एवढेंच मागणें आहे." तें भाषण ऐकून कश्यपाला फार वाईट वाटलें; आणि तो आपल्याशींच म्हणाला, "अहो, आज मजकडून केवढा अधर्म घडण्याचा प्रसंग आला आहे पहा ! मी इंद्रियांना रमविण्यांत गुंतल्यामुळें स्त्रीरूपी मायेनें मला दीन करून सोडिलें अं ! आतां मला खास नरकांत पडावें लागणार ! असो; यांत तिचा तरी काय अपराध ! आपल्या जातीला योग्य अशाच प्रकारें ती वागली. मी मात्र इंद्रियाधीन होऊन स्वकर्माला विसरलों ! धिक्कार असो मला ! ह्या स्त्रियांचें मुख कमलासारखें दिसतें, आणि भाषण अमृताप्रमाणें गोड लागतें ! पण हृदय मात्र वस्तऱ्याप्रमाणें कठिण असतें ! त्यांच्या कृति कोणाला कळणार नाहींत. त्यांचें खरें प्रेम कोणावरही नसतें. त्या आपलें कार्य साधण्यासाठीं इतक्या पोटांत शिरतात कीं, त्यांच्यापेक्षां जगांत कोणतीही वस्तु प्रिय नाहीं, असें पुरुषाला वाटतें. स्वार्थासाठीं पति, पुत्र, भाऊ, पाहिजे त्याला त्या मारतात किंवा मारवितात. अशीं उदाहरणें जगांत काय थोडीं आहेत? बरें, आतां मी तर 'वर देतों' असें म्हणून चुकलों; तेव्हां वर तर खोटा होतां उपयोगी नाहीं; आणि इंद्राचाही वध होऊं देणें चांगलें नाहीं; तेव्हां हीं दोन्ही साधतील अशी कांहीं तरी युक्ति योजिली पाहिजे."

परीक्षित राजा, क्रुद्ध झालेल्या त्या कश्यप मुनींनीं याप्रमाणें स्वतांची निंदा करून घेतली, आणि मग थोडेंसें भाषण केलें: ते म्हणाले, "हे प्रीके, मी तुला सांगतों त्या व्रताचें नीटपणें आचरण केलेंस, तर इंद्राचा वध करणारा पुत्र

तुला होईल; पण व्रतांत जर का यत्किंचित् न्यून पडलें, तर मात्र तो इंद्राला न मारतां त्याचा मित्र होऊन राहील." त्यावर दिति म्हणाली, "द्विजवरा, मी व्रत करण्यास तयार आहें. कोणत्या रीतीनें आचरण करावें तें मला सांगा."

### दितीला पुंसवनव्रताचा उपदेश.

कश्यप म्हणाले:—प्राणिमात्राला पीडा देऊं नये; आक्रोश करूं नये; असत्य बोलूं नये; नखें किंवा रोम छेदूं नये; घाणेरड्या पदार्थांना स्पर्श करूं नये; पाण्यांत उतरून स्नान करूं नये; रागावूं नये; दुष्ट लोकांशीं संभाषण करूं नये; मलिन वस्त्र नेसूं नये; एकदा धारण केलेली माळा पुनः घालूं नये; उच्छिष्ट, मुंग्या आलेलें, मांसयुक्त, भद्रकालीच्या नैवेद्याचें, रजस्वलेनें पाहिलेलें किंवा शूद्रानें स्पर्श केलेलें अन्न खाऊं नये; ओंजळीनें पाणी पिऊं नये; आंचवल्याखेरीज, सायंकाळीं, केंस मोकळे टाकून, अलंकाररहित, मौन सोडून, किंवा चोळी न घालतां बाहेर जाऊं नये; पाय धुतल्यावांचून, अपवित्र असतां, ओल्या पायांनीं, उत्तरेकडे उसें करून, पश्चिमेकडे डोकें करून, इतरांसह, नग्न, अथवा संध्याकाळीं निजूं नये; सदासर्वकाळ स्वच्छ वस्त्र नेसून शुचिर्भूत असावें; सर्व सौभाग्यालंकार धारण करावे; प्रातःकाळीं भोजनाच्या पूर्वी गाई, ब्राह्मण व लक्ष्मीनारायण यांचें पूजन करावें; माला, गंध, उपायनें, अलंकार इत्यादि साहित्यानें सुवासिनींचें पूजन करावें; आणि पतीचें पूजन करून नेहमीं त्याचें ध्यान करावें. हे साध्वी, या प्रकारें तूं एक वर्षपर्यंत बिनचूक पुंसवनव्रताचें आचरण केलेंस तर इंद्राचा वध करणारा पुत्र तुला प्राप्त होईल."

परीक्षित राजा, त्या मनोनिग्रही दितीनें 'बरें' असें म्हणून त्या विष्णुव्रताचा स्वीकार केला, व त्याच वेळीं तिला गर्भही राहिला. हे राजा, महाधूर्त इंद्राला आपल्या सापत्न मातेचा हा बेत कळला, आणि त्यानें दितीच्या आश्रमाजवळ सेवा करण्याच्या निमित्तानें राहण्याचा बेत केला. तो नित्य वेळोवेळीं तिला वनांतून फळें, फुलें, मुळें, समिधा, दर्भ, पत्रें, अंकुर, मृत्तिका वगैरे आणून देई. हरिण केव्हां चुकेल आणि आपल्या फांसांत येईल म्हणून पारधी जसा वाट बघत असतो, तसा इंद्र हा दिति केव्हां नियमांत चुकते यांची अगदीं सावधपणें वाट बघत होता; तरी त्याला दितीच्या व्रताचरणांत यत्किंचित् देखील उणें आढळलें नाहीं. त्यामुळें इंद्राला आपल्या जीवित्वाविषयीं संशय वाटूं लागला; पण, राजा, भवितव्यतेपुढें इलाज नाहीं! दिति व्रताच्या कष्टांमुळें अगदीं कृश होत चालली, व ती एके दिवशीं संध्याकाळीं जेवतां जेवतां अर्थात् हातपाय न धुतांच झोंपीं गेली! हें रंध्र इंद्राला सांपडतांच त्यानें योगमायेनें त्या निद्रिस्त दितीच्या उदरांत प्रवेश केला, आणि त्या तेजस्वी गर्भाचे वज्रानें सात तुकडे केले! प्रत्येक तुकडा पाडतांना गर्भ रडूं लागे, तेव्हां इंद्र 'रडूं नको बाळ!' असें म्हणून त्याची समजूत करी. शेवटीं फिरून त्यानें प्रत्येकाचे सात सात तुकडे केले; आणि असे इंद्रानें त्या गर्भाचे एकंदर एकुणपन्नास तुकडे केले. राजा, ते सर्वजण इंद्राला हात जोडून म्हणाले, "बा इंद्रा, तूं आम्हांला कां मारतोस! आम्ही 'मरुत्' तुझे भाऊ आहों." तेव्हां ते शरण आले आहेत असें पाहून इंद्र त्यांना म्हणाला, "बंधुहो, भिऊं नका." परीक्षित राजा, त्या एका गर्भाचे इंद्रानें अनेक तुकडे केले, तथापि प्रभूच्या कृपेमुळें तूं जसा अश्वत्थाम्यानें सोडिलेल्या ब्रह्मास्त्राच्या योगानें मरण पावला नाहींस, तसा दितीचाही गर्भ मरण पावला नाहीं. असो.

दितीनें एक वर्षपर्यंत कडकडीत व्रताचरण केलें होतें, यामुळें तिच्या गर्भाचे ते एकुणपन्नास भाग सुखरूप राहून ते एकुणपन्नास व एक इंद्र याप्रमाणें तिला पन्नास पुत्र झाले. [कारण सांप्रत

तोही तिच्या उदरांतूनच बाहेर आला. ईश्वरानें मातेपासून उत्पन्न झालेला त्यांचा दैत्यपणाचा दोष काढून टाकला, आणि त्यांना सोमप देवांची पदवी दिली. साध्वी दिति जागी होऊन पाहते तों अग्नीसारख्या तेजस्वी पुत्रांसह इंद्र आपल्या-पुढें उभा आहे, असें तिला आढळलें. तेव्हां ती इंद्राला म्हणाली, "बाळा, देवांना भय उत्पन्न करणारा एकच पुत्र व्हावा, या हेतूनें हें व्रत मी आचरिलें; पण येथें तर हे इतके दिसतात. तेव्हां याचें खरें कारण तुला ठाऊक असेल तर सांग." दितीनें भोळेपणानें विचारलेला तो प्रश्न ऐकून इंद्रा-नेंही सरळ मनानें उत्तर दिलें: तो म्हणाला, "आई, तुझा हेतु ओळखूनच मी तुजजवळ येऊन राहिलों होतों; आणि तुझ्या व्रतांत उणेपणा दृष्टीस पडल्याबरोबर मीं तुझ्या उदरांत शिरून तेथें असलेल्या एकाच गर्भाचे हे एकुणपन्नास तुकडे केले! हें कृत्य करितांना धर्माकडे बिलकूल लक्ष न देतां मीं तें केवळ स्वार्थबुद्धीनें केलें, हें मात्र मला कबूल आहे. आई, पहिल्यानें मी एका गर्भाचे सात तुकडे केले, तों ते सात मुलगे झाले. म्हणून फिरून प्रत्येकाचे सात सात तुकडे केले; तरी ते मेले नाहींत. तेव्हां मात्र मला आश्चर्य वाटलें, आणि मनाची खातरी झाली कीं, तूं केले-ल्या अवर्णनीय ईश्वरसेवेच्या सिद्धीचें हें फळ आहे. हे माते, तुझे हे सर्व पुत्र जिवंत आहेत, तेव्हां मूर्ख-पणामुळें केलेल्या अपराधाची तूं मला क्षमा कर."

शुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, इंद्राचा शुद्ध भाव पाहून दितीनें मोठ्या आनंदानें त्याची विनंती मान्य केली. नंतर इंद्रही तिला नमस्कार करून मरुद्गणांसह स्वर्गलोकीं निघून गेला. राजा, तुझ्या प्रश्नाचें उत्तर हें मीं तुला सांगितलें. आतां 'मरुत्' हे दैत्य असून इंद्रस्व-रूप कां पावले, हें तुझ्या लक्षांत आलेंच असेल.

~~~~~~~~

# अध्याय एकोणिसावा.

—:०:—

## पुंसवनव्रताचा विधि.

परीक्षित राजा म्हणाला:—मुने, आपण ज्याला पुंसवनव्रत (पुत्रप्राप्ति करून देणारें व्रत) असें नांव दिलें, व ज्याच्या आचरणानें विष्णु प्रसन्न होतात, त्या व्रताचा विधि मला सांगावा.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—राजा, स्त्रीनें पतीची आज्ञा घेऊन हें सकल कामना पूर्ण करणारें व्रत मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं आरंभावें. प्रथम मरुतांचें जन्माख्यान ऐकावें नंतर या व्रताचा ब्राह्मणांकडून विधि समजावून घ्यावा. दांत स्वच्छ धुवून स्नान करावें; शुभ्र वस्त्रें व अलंकार परिधान करावे, आणि भोजनापूर्वी लक्ष्मीनारायणांची पूजा करून नंतर प्रार्थना करावी; ती अशी:—

## प्रार्थनास्तोत्र.

अलं ते निरपेक्षाय पूर्णकाम नमोऽस्तु ते ।
महाविभूतिपतये नमःसकलसिद्धये ॥
यथा त्वं कृपया भूत्या तेजसा महिनौजसा ॥
जुष्ट ईशगुणैःसर्वैस्ततोऽसि भगवान्प्रभुः ।
विष्णुपत्नि महामाये महापुरुषलक्षणे ।
प्रीयेथा मे महाभागे लोकमातर्नमोऽस्तु ते ॥

'हे पूर्णकामा परमेश्वरा, तूं अगदीं निरपेक्ष आहेस. तुला कशाचीही जरूर नाहीं. तूं लक्ष्मी-चा पति आहेस, व अणिमादि आठही सिद्धि तुझ्याजवळ परिपूर्ण आहेत. तुला माझा नम-स्कार असो. हे ईश्वरा, ज्या अर्थी कृपा, श्री, ऐश्वर्य, मोठेपणा, वीर्य आणि सत्यसंकल्पादि इतर सर्व गुण यांनीं तूं भरलेला आहेस, त्या अर्थी तूं भगवान आणि सर्वांचा प्रभु आहेस. हे विष्णुपत्नि, हे महामाये, हे परमेश्वरलक्षणे, हे महाभागे, हे लोकमाते, माझा तुला नमस्कार असो. तूं मजवर प्रसन्न हो.'
~~~~~~~~

याप्रमाणें प्रार्थना केल्यानंतर, "नमो भगवते महापुरुषाय महानुभावाय महाविभूतिपतये सह महाविभूतिभिर्बलिमुपहराणि या मंत्रानें भगवंताचें प्रतिदिवशीं आह्वान करून, एकाग्रचित्तानें त्याचें अर्घ्यपाद्यादि षोडशोपचारें पूजन करावें; आणि अग्नींत, नैवेद्यांतील शेष राहिलेल्या द्रव्याच्या बारा आहुति द्याव्या. "नमो भगवते महापुरुषाय महाविभूतिपतये स्वाहा" असा होमाचा मंत्र म्हणावा.

राजा परीक्षिता, भगवान लोकनायक विष्णु व भगवती लोकमाता लक्ष्मी हीं सर्व उपभोगांचीं उद्गमस्थानें होत. नानाविध संपत्ति प्राप्त करून घेण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें एकाग्रतेनें त्या उभयतांची पूजा करावी, आणि त्यांच्या चरणीं लीन होऊन "नमो भगवते महापुरुषाय" इत्यादि मंत्र दहा वेळां म्हणावा, व मग त्यांची स्तुति करावी.

## परमेश्वरस्तुति.

युवां तु विश्वस्य विभू जगतः कारणं परम्।
इयं हि प्रकृतिः सूक्ष्मा मायाशक्तिर्दुरत्यया॥
तस्या अधीश्वरः साक्षात्त्वमेव पुरुषः परः।
त्वं सर्वयज्ञ इज्येयं क्रियेयं फलभुग्भवान्॥
गुणव्यक्तिरियं देवी व्यञ्जको गुणभुग्भवान्।
त्वं हि सर्वशरीर्यात्मा श्रीः शरीरेंद्रियाशया।
नामरूपे भगवती प्रत्ययस्त्वमपाश्रयः॥
यथा युवां त्रिलोकस्य वरदौ परमेष्ठिनौ।
तथा म उत्तमश्लोक संतु सत्या महाशिषः॥

'आपण उभयतां सर्व जगाला अंतर्बाह्य व्यापक आहां. सर्व जग तुम्हांपासूनच उत्पन्न झालें. सूक्ष्म-प्रकृति व दुर्निवार अशी जी मायाशक्ति ती तूं देवी होस; आणि तिचा अधिपति प्रत्यक्ष मायातीत परमेश्वर तो हा तूं देवाधिदेव होस. देवा, नानाविध यज्ञयाग हीं तुझीं रूपें होत, व त्यांतील इज्या म्हणजे यज्ञसंपादक क्रिया ही ही लोकमाता लक्ष्मी होय. पुरुषोत्तमा, यज्ञक्रिया ही देवी व यज्ञक्रियेचा फलभोक्ता तूं आहेस. गुणांची व्यक्त स्थिति ही माया व तिचा व्यंजक हा तूंच होस. सर्व भूतांचा आत्मा तूं आहेस; आणि शरिरें, इंद्रियें वगैरे सर्व लक्ष्मीचीं रूपें आहेत. ज्या अर्थी तुम्ही सर्व त्रैलोक्याला मनोरथ प्राप्त करून देतां, त्या अर्थी तुम्हां उभतांच्या कृपेनें चिरकाल टिकणारे उत्तम उपभोग मजला प्राप्त होवोत.'

अशा प्रकारें स्तुति केल्यावर नैवेद्याचे सर्व पदार्थ एका बाजूस सारून त्यांना आचमन द्यावें आणि पूजा पूर्ण करावी. नंतर भक्तियुक्त अंतःकरणानें स्तोत्र म्हणून स्तुति करावी; यज्ञशेष हुंगावा; व नंतर शेषद्रव्यांनीं पुनः भगवंताची पूजा करावी. नंतर, पतीला, तो परमेश्वर आहे असें मानून त्याचे प्रिय पदार्थ अर्पण करावे. पतीनेंही सर्व प्रकारें तिला प्रेमळपणें साहाय्य करावें. दंपत्यापैकीं कोणींही एकानें कर्म केलें तरी दोघांनीं केल्यासारखेंच आहे. पत्नी व्रत करण्यास अयोग्य असेल, तर पतीनें एकाग्रचित्तानें ह्या व्रताचें आचरण करावें. प्रतिदिनीं ब्राह्मण-सुवासिनींची माळा, गंध, बलि, अलंकार इत्यादिकांनीं पूजा करावी. देवीचें स्वस्थानीं विसर्जन केल्यावर नैवेद्यप्रसाद घ्यावा. ह्या प्रसादाच्या योगें माझें चित्त शुद्ध होऊन सर्व कामना परिपूर्ण होवोत, अशा बुद्धीनें तो ग्रहण करावा. अशा प्रकारें एक वर्षपर्यंत ह्या व्रताचें आचरण करावें; आणि कार्तिक वद्य अमावास्येचे दिवशीं उपोषित राहावें. दुसरे दिवशीं (प्रतिपदेच्या दिवशीं) स्नान करून नित्याप्रमाणें भगवंताची पूजा करावी. दुधामध्यें चरु शिजवावा, त्यांत तूप घालावें, आणि तिच्या पतीनें, अमावास्या पौर्णिमेला ज्याप्रमाणें स्थालीपाक करितात, त्याप्रमाणें बाराच आहुतींचा होम करावा. पुढें ब्राह्मणांना वस्त्र,

अलंकार, दक्षिणा इत्यादि देऊन संतुष्ट करावें. त्यांना भक्तियुक्त अंतःकरणानें नमस्कार करावा, आणि त्यांनीं दिलेले आशीर्वाद घेऊन भोजनाची तयारी करावी. आचार्याला प्रथम भोजनास बसवून नंतर आप्त-इष्टांसह आपण भोजन करावे भोजनाचे वेळीं मौन धरावें. पत्नीला अवशिष्ट चरु भक्षण करण्यास द्यावा; म्हणजे त्यापासून उत्तम संतति आणि ऐश्वर्य प्राप्त होतें. पुरुषानें ह्या व्रताचें आचरण केलें, तर त्याला इच्छित फळ मिळतें; स्त्रीनें हें केलें तर तिला सौभाग्य, लक्ष्मी, संतति, कीर्ति व गृह हीं मिळून तिच्या पतीला दीर्घ आयुष्य प्राप्त होतें; कुमारिकेनें हें व्रत केलें तर तिला सर्वगुणसंपन्न पति मिळतो; आणि गतधवा स्त्रीनें केलें तर तिचीं सर्व पापें नाश पावून तिला सद्गति मिळते. सारांश, कोणाही मनुष्यास कोणतीही इच्छा असल्यास ती भगवान परमेश्वर पूर्ण करितो. परीक्षित राजा, हें तुला सांगितलेलें मरुतांचें पुण्यकारक आख्यान व दितीचें महाव्रत जो पठन करील, त्याचे सर्व हेतु पूर्ण होतील.



# श्रीमद्भागवत.

## सप्तमस्कंध.

### अध्याय पहिला.

—:०:—

परीक्षित राजा म्हणाला:—शुक मुने, भगवान विष्णु सर्वांभूतीं समदृष्टि ठेवणारा व सर्वांचा हित करणारा असतां, त्यानें इंद्राचा पक्ष घेऊन दितीचे पुत्र कसे मारिले? तो तर निर्गुण, निर्विकार व सच्चिदानंदस्वरूप आहे; त्याला देवांचा पक्ष धरण्याचें, किंवा दैत्यांना भिण्याचें अथवा त्यांचा द्वेष करण्याचें कारण नाहीं. मुनिवर्य, ईश्वराच्या कृतीविषयीं हा जो मला संशय उत्पन्न झाला आहे, त्याचें आपण कृपा करून निवारण करावें.

श्रीशुक म्हणाले:—परीक्षित राजा, फार चांगलें विचारलेंस. कारण, ह्या प्रश्नाचें उत्तर देतांना म्हणजे

**दैत्यांविषयीं ईश्वराची विषमबुद्धि कां?**

हें सांगतांना, साहजिक रीतीनें भगवद्भक्त प्रल्हादाचें माहात्म्य वर्णन करण्याचा योग येणार आहे; व त्यामुळें श्रोत्यावक्त्यांची भगवंतावर भक्ति वाढत जाईल. राजा, हें प्रल्हादाचें पुण्यप्रद आख्यान नारदादि ऋषि मोठ्या प्रेमानें गात असतात. आतां मी भगवान व्यास मुनींना वंदन करून हरिकथेस आरंभ करितों.

परीक्षिता, त्रिगुणात्मक प्रकृतीहून भगवान निराळा असून तो निर्गुण व जन्मरहित आहे. तो स्पष्ट दिसत नाहीं, तरी मायेच्या सत्त्वादिक, गुणांचा अंगीकार करून, तो वध्य आणि वधकर्ता अशीं दोन्हीं रूपें धरितो. राजा, सत्त्व, रज व तम हे गुण प्रकृतीचे होत, आत्म्याचे नव्हत; ह्या सर्वांचा ऱ्हास किंवा वृद्धि एकदम होत नाहीं. सत्त्वगुणाचा उत्कर्ष होण्याची वेळ आली, म्हणजे परमेश्वर देवांचा आणि ऋषींचा पक्ष धरितो; रजोगुणाचा उत्कर्ष होण्याची वेळ आली, म्हणजे तो दैत्यांचा पक्ष धरितो; आणि तमोगुणाच्या उत्कर्षाच्या वेळीं यक्षराक्षसादिकांचा पक्ष धरितो. यावरून लक्षांत येण्यासारखें आहे कीं, ज्या वेळेस ज्या गुणाचा उत्कर्ष होत असतो, त्या वेळेस त्या गुणापासून उत्पन्न झालेल्या प्राण्यांचा पक्ष परमेश्वर धरितो. अग्नि ज्या काष्ठांत प्रज्वलित झाला असेल, त्याप्रमाणें तो वाटोळा किंवा विशाळ वगैरे दिसतो, अथवा उदक ज्यामध्यें मिसळावें, त्याचें रूप किंवा रुचि तें धारण करितें, तद्वत् सत्त्वादिक गुणांचा आश्रय करणाऱ्या प्राण्यांच्या अंतर्यामीं वसणारा परमात्मा त्या त्या प्राण्यांप्रमाणें भासतो; परंतु वास्तविकपणें तो कोणाचाही पक्ष धरीत नाहीं. तो सर्वत्र सारखा भरलेला असल्यामुळें, ज्या वेळीं ज्या गुणाचें आधिक्य होतें, त्या वेळीं त्या गुणानें विशिष्ट असा पक्ष बलवान होतो; हें तत्त्व विद्वान लोकांना कळतें. परमेश्वराला जेव्हां शरीरें उत्पन्न करण्याची इच्छा होते, तेव्हां तो मायेच्या योगें रजोगुणाची वृद्धि करितो; त्यांत विहार करण्याची

इच्छा झाली, म्हणजे तो सत्त्वगुणाची; आणि क्षय करावें असें वाटलें,म्हणजे तमोगुणाची वृद्धि करितो. 'परमेश्वराला इच्छा होते,' असें म्हटलें, ह्यावरून तो कालाच्या अधीन आहे,असें मात्र समजूं नये. प्रधान आणि पुरुष हीं सृष्टीचीं निमित्तें होत. त्यांच्या आश्रयरूपानें राहणारा काळ त्या परमात्म्यानें स्वतांच उत्पन्न केला आहे; तेव्हां कालाच्या अधीन ईश्वर नाहीं, हें उघड आहे. ज्याला काल म्हणतात, त्यापासूनच सत्त्वगुणाची वृद्धि होते, आणि तसें झालें म्हणजे ईश्वर देवांविषयीं प्रेम धारण करून त्यांचा उत्कर्ष करितो; आणि रजोगुण व तमोगुण ह्यांचा ऱ्हास होऊन तद्विशिष्ट दैत्यादिकांविषयीं द्वेष धारण करून ईश्वर त्यांचा विनाश करितो, असें भासतें.

## धर्मराज व नारद यांचा संवाद.

श्रीशुकाचार्य पुढें सांगतातः-परीक्षित राजा, पूर्वी राजसूय यज्ञ चालला असतां अजातशत्रु धर्मराजानें भगवान नारदांना प्रश्न केला असतां ह्या विषयाचें स्पष्टीकरण करणारा एक इतिहास त्यांनी सांगितला, तो असाः-परीक्षिता, चेदि देशचा राजा जो शिशुपाल, त्याला भगवान वासुदेवानें राजसूय यज्ञांत आपल्या स्वरूपीं मिळविलें, तेव्हां धर्मराजाला मोठें आश्चर्य वाटलें, व त्यानें त्या वेळीं नारदांला प्रश्न केला.

धर्मराज म्हणालाः-अहो नारद मुने, ईश्वराची निस्सीम भक्ति करणारांना देखील जी गति प्राप्त होत नाहीं, ती गति त्याचा सदैव द्वेष करणाऱ्या ह्या शिशुपालाला मिळाली हें आश्चर्य नव्हे का? पहा-वेन राजानें ईश्वराची निंदा केल्यामुळें त्याला ब्राह्मणांनीं ईश्वराकरवीं नरकांत पाडिलें! आणि ह्या न्यायानें पहातां शिशुपालाला नरकवासच प्राप्त झाला पाहिजे होता! शिशुपाल आणि दुष्ट वक्रदंत हे दोघे बोलावयास येऊं लागल्यापासून एकसारखा श्रीकृष्णाचा मत्सर करीत होते! कित्येक वेळां त्या जगदात्म्याला या दोघांनीं इतकीं दुर्भाषणें केलीं आहेत कीं, तीं ज्यांनीं ज्यांनीं ऐकिलीं असतील, त्यांच्या त्यांच्या डोक्यांतील त्या वेळची ती तिडीक अजूनही गेली नसेल! पण असें असतां ह्या दुरात्म्यांच्या जिव्हेला कोड फुटलें नाहीं, किंवा त्यांस अंधतमस् नरकही मिळाला नाहीं! इतकेंच नव्हे, तर उलट असे हे नीच सर्वांसमक्ष सायुज्य मिळवितात, तेव्हां ह्याचा अर्थ काय! देवर्षे, दिव्याची ज्योत वाऱ्यानें जशी हेलकावे खात असते, तसें माझें मन संशयानें हेलकावे खात आहे! याकरितां आपण माझा संशय दूर करावा.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, असें धर्मराजाचें भाषण ऐकून नारद मुनीस संतोष वाटला; आणि सर्व सभा ऐकत असतां त्यांनीं धर्मराजाचें समाधान केलें.

नारद म्हणालेः—धर्मराजा, भगवंताची निंदा करणाराला नरक प्राप्त व्हावा असें जें तुला वाटतें, त्याचें कारण काय बरें? ईश्वराची कोणी निंदा केली तर ईश्वराला वाईट वाटतें, असा का तुझा समज आहे? तुझा तसा समज असला तर तो चुकीचा आहे. कारण, स्तुति व निंदा यांपासून घडणारे परिणाम देहाभिमानी पुरुषांवर मात्र होतात; परमेश्वराला तर देहाभिमान मुळींच नाहीं, तेव्हां त्याला स्तुति किंवा निंदा ह्यांपासून काय होणार आहे बरें? धर्मराजा, 'मी' आणि 'माझें' ही विषम बुद्धि ज्या पुरुषांना असते, त्यांना, कोणीं मारिलें अथवा दुरुत्तरें केलीं, तर त्यांपासून सुखदुःख होतें; इतरांना त्यापासून कांहींएक होत नाहीं. हा सर्व प्रकार जीवांना लागू आहे, ईश्वराला नाहीं. ईश्वर हा सर्वांचा आत्मा आणि सर्वसाक्षी आहे; म्हणून कोणत्याही तऱ्हेनें त्याच्या ठिकाणीं मन लाविलें असतां त्या मन लावणाऱ्यास सायुज्यच मिळतें. प्रेमानें साखर खाल्ली असतां जसें तोंड गोड होतें, तसेंच रागानें खाल्ली असतांही गोडच

होतें! कारण, स्वत: ..रेला राग आणि लोभ हे विकार नाहींत. यास्तव, हे धर्मराजा, को णत्याही प्रकारें कां होईना, ईश्वराकडे लक्ष लागणें हीच गोष्ट हितकारक आहे; आणि ती गोष्ट साध्य होण्याला त्यांतल्या त्यांत जर कांहीं अधिक सुलभ उपाय असेल, तर तो परमेश्वराची विरोध-भक्ति करणें हाच होय. बाबारे, या

विरोधभक्तीचें माहात्म्य

फार श्रेष्ठ आहे. कोणत्याही प्राण्याच्या मनांत जसा पावलोपावलीं त्याचा शत्रु दिसतो, तसा त्याचा मित्र दिसत नाहीं. तेव्हां ईश्वराशीं शत्रुत्व केल्यानें प्राण्याला ईश्वराचा जास्त निदिध्यास लागतो, व त्या निदिध्यासाच्या योगानें त्याला लवकर सरूपता प्राप्त होते. धर्मराजा, तुला एक

विरोधभक्तीचें प्रचलित उदाहरण

सांगतो: कुंभारीण म्हणून एक सपक्ष कीटक आहे. तो कीटक भिंतीवर मातीचें घर करीत असतो. त्यांत तो आपल्याला खाण्यासाठीं एक आळी आणून ठेवितो. ती आळी मरावी म्हणून तो तिला जातां येतां आपल्या पायानें टोंचीत असतो. त्या टोंचण्यानें ती आळी लवकर मरत तर नाहींच; पण तिच्या मनांत इतकी धास्ती पडलेली असते कीं, तिला सतत ती कुंभारीणच डोळ्यांपुढें दिसत असते; तिला तिचा इतका ध्यास लागलेला असतो कीं, त्या कुंभारणीच्या टोंचण्यानें होत असलेल्या वेदनांचेंही तिला भान रहात नाहीं. तिची देहबुद्धि अगदीं नष्ट होऊन जाते; व परिणाम असा होतो कीं, ती आळीच कांहीं वेळानें स्वत: कुंभारणीचें स्वरूप पावून उडून जाते!

नारद पुढें म्हणतात:—धर्मा, यावरून तुझ्या लक्षांत येईलच कीं, शिशुपालादिकांनीं श्रीकृष्णाचा अतिशय द्वेष केल्यामुळें त्यांना जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं सर्व ठिकाणीं तो श्रीकृष्णच दिसूं लागला, या कारणानें त्यांना परमेश्वराचें सतत चिंतन घडून ते निष्पाप होत्साते तद्रूप झाले! राजा, ईश्वराचें चिंतन अमुकच एका कारणानें घडलें पाहिजे असें नाहीं. गोपींना कामामुळें, कंसाला भयामुळें, चैद्यादिकांना द्वेषामुळें, यादवांना आप्तपणामुळें, तुम्हांस प्रेमामुळें, आणि आमच्यासारख्यांना भक्तीमुळें ईश्वराचें चिंतन घडतें. धर्मा, तूं वेनाचें उदाहरण दिलेंस, पण त्याला ह्या पांच प्रकारांपैकीं कोणत्याच प्रकारानें ईश्वराचें चिंतन घडलें नाहीं, आणि यामुळें त्याला नरकवास प्राप्त झाला! धर्मराजा, तुझ्या मावसभावांचा म्हणजे

शिशुपाल दंतवक्त्रांचा पूर्वेतिहास

मला ठाऊक आहे, तो तुला सांगतों: हे दोघे पूर्वी श्रीविष्णूच्या पार्षदांतील मुख्य होते. एके वेळीं ब्रह्मदेवाचे पुत्र सनकादिक हे विष्णूच्या दर्शनास जात असतां, हीं पोरें आहेत असें समजून, त्या दोघां पार्षदांनीं त्यांस प्रतिबंध केला. राजा, ते सनकादि पांच सहा वर्षांच्या लहान मुलांप्रमाणें दिसत होते खरे; पण ते सकल सृष्टीच्या पूर्वजांचे देखील पूर्वज असून सर्व त्रैलोक्यांत फिरत असत. ते सहजगत्या भगवद्दर्शनास वैकुंठलोकीं प्राप्त झाले असतां द्वारावर असलेल्या ह्या पार्षदांनीं जेव्हां त्यांस प्रतिबंध केला, तेव्हां ह्यांच्या उद्धटपणाचा राग येऊन, त्या सनकादिकांनीं ह्या दोघांस शाप दिला: ते म्हणाले, "ज्या मधुसूदनाच्या चरणकमलीं सत्त्व, रज आणि तम या गुणांचा लेश देखील नाहीं, त्याच्या समीप राहण्याची तुमची योग्यता नाहीं; म्हणून, मूर्खांनो, या क्षणीं तुम्ही पापी दैत्ययोनींत चालते व्हा." धर्मराजा, पुढें सनत्कुमारांनीं कृपावंत होऊन त्यांना उच्छाप दिला कीं, "तीन जन्मांनंतर तुम्ही पुनः स्वपदास याल." राजा, तेच द्वारपाल पुढें दितीच्या उदरीं हिरण्यकशिपु आणि हिरण्याक्ष म्हणून जन्मास आले. त्यांपैकीं हिरण्यकशिपु हा वडील व हिरण्याक्ष हा लहान होता.

त्यांस दैत्य व दानव हे अत्यंत वंदनीय मानीत. भगवान विष्णूनें नृसिंहावतार धरून हिरण्यकशिपूचा वध केला; आणि वराहरूप धरून हिरण्याक्षाला मारिलें; व पृथ्वी रसातलांतून वर आणिली ! राजा, हिरण्यकशिपूचा पुत्र प्रल्हाद हा ईश्वराची भक्ति करीत असे, त्यास मारावें म्हणून हिरण्यकशिपूनें त्याला अनेक प्रकारच्या यातना दिल्या; पण ज्याच्या अंगीं ईश्वरभक्तीनें भगवंताचें तेज व्यापून राहिलें होतें, तो का या हिरण्यकशिपूच्या उपायांनीं मरणार ? कोणत्याही उपायांनीं त्याचा नाश झाला नाहीं ! पुढें या दोघांनीं विश्रव्याची पत्नी जी केशिनी तिच्या उदरीं जन्म घेतले. तेच रावण-कुंभकर्ण होत. हे राक्षस पुढें समस्त लोकांना पीडा देऊं लागले; तेव्हां ईश्वरानें रघुकुलांत रामचंद्रावतार घेऊन त्यांना मारिलें ! धर्मराजा, रामचंद्राचें चरित्र पुढें तुला मार्कंडेयांकडून कळेल. असो, तेच दोघे पुढें तुझ्या मावशीच्या उदरीं जन्मास आले. भगवान कृष्णाच्या चक्रानें त्यांचीं पापें नष्ट झालीं, आणि वैरबंधामुळें तीव्र ध्यानयोगी होऊन आतां ते पूर्वस्थितीला गेले व शापांतून मुक्त झाले!

धर्मराजा म्हणाला:—नारद मुने, हिरण्यकशिपूनें आपल्या प्रिय व उदार अशा पुत्राशीं काय म्हणून द्वेष केला, आणि प्रल्हादाची ईश्वरावर इतकी भक्ति कशी जडली, हें सर्व वृत्त आपण मला सांगावें. तें ऐकण्याची मला फार उत्कंठा लागली आहे.

## अध्याय दुसरा.

—:०:—

### भ्रातृवधामुळें हिरण्यकशिपूचा कोप व त्याची विष्णुवधाची प्रतिज्ञा.

नारद म्हणाले:—धर्मराजा, भगवंतानें वराह अवतार घेऊन हिरण्यकशिपूचा भाऊ हिरण्याक्ष हा मारिला, तेव्हां हिरण्यकशिपूच्या अंगाचा संताप झाला; त्याच्या क्रोधाग्नीच्या धुरानें आकाश अगदीं व्याप्त झालें; आणि बेफाम होऊन करकर दांतओठ चावीत शूळ हातांत घेऊन मोठ्या त्वेषानें तो सभेंत म्हणाला, “ दैत्यदानवहो, हें वर्तमान ऐकून, भावाच्या वधाचा सूड केव्हां घेईन असें मला झालें आहे ! या शूळानें त्या विष्णूचें मस्तक फोडून त्याच्या रक्तानें मी आपल्या भावाबद्दल तर्पण करीन, तेव्हांच माझ्या मनाला समाधान वाटेल! हा विष्णु आपल्याला मोठा समदृष्टि म्हणवितो, आणि देवांच्या तोंडपुजेपणाला भाळून पोरगळाप्रमाणें त्यांच्या नादानें वागतो ! यानें मायेच्या योगानें वराहरूप घेऊन माझ्या भावाला ठार मारलें काय ? त्या कपट्याचा सर्व प्राण त्या देवांवर आहे, ह्यास्तव त्याचाच नाश केला पाहिजे; म्हणजे वृक्षांच्या मुळ्या तोडल्यावर ते जसे सुकून जातात, तसे हे सर्व देव सुकून जातील. याकरितां, हे द्विमूर्धन्, हे त्रिनेत्रा, हे शंबरा, हे शतबाहो, हे हयग्रीवा, हे नमुचे, हे पाका, हे इल्वला, हे विप्रिचित्ते,हे पुलोमन्,अहो शकुनिप्रमुख वीरांनो, तुम्ही सर्व आतां पृथ्वीवर जा, आणि तुम्हांला जी ह्या

हिरण्यकशीपूचा ब्रह्मछलाची आज्ञा

होत आहे, तीप्रमाणें वागा. ब्राह्मणांनीं त्या देवांप्रीत्यर्थ आरंभिलेल्या यज्ञयागादि कृत्यांचा विध्वंस करा; कोणी तपश्चर्या करीत असतील, त्यांच्या तपश्चर्येंत विघ्नें आणा; व कोणी वेदाध्ययन करीत असतील, त्यांस उपद्रव द्या. ब्राह्मणांनीं आपला अन्याय केला नसतां त्यांचा छळ कसा करावा, ही शंका मनांत आणूं नका. कारण, ब्राह्मण हे अनेक धर्मकृत्यें करून विष्णूला बळवान करितात; आणि मग तो देवांना, ऋषींना, पितरांना व इतर भूतांना आश्रय देतो. तेव्हां शत्रुपक्षाला मदत करणारे ते आपले शत्रुच होत; म्हणून त्यांचा छळ हा केलाच पा-

हिजे. म्हणून जेथें जेथें गाई, ब्राह्मण, वेद, वर्ण, आश्रम व क्रिया हीं आढळतील, तेथें तेथें जा आणि त्या देशाला जाळून पोळून त्याची राखरांगोळी करा!"

नारद म्हणाले:—धर्मराजा, आधींच ज्या गोष्टीची हौस, तेंच कपाळीं आलें! मग काय पुसावें? ते दुष्ट दुरात्मे आनंदानें उड्याबागडूं लागले! ते तेथून लागलेच निघाले, आणि नगरें, गांवें, गौळवाडे, उद्यानें, शेतें, आरामभूमिका, मठ, खाणी, डोंगरवाड्या, राजधान्या वगैरे जाळीत सुटले! त्यांनीं ब्राह्मणांची, गाईंची व इतर प्रजाजनांची दुर्दशा केली, आणि त्यांस उपजीविकेचीं साधनें शिल्लक ठेविलीं नाहींत! युधिष्ठिरा, दैत्यांनीं चालविलेला हा सर्व प्रकार पाहून देवांनीं गुप्त रूपें घेतलीं, आणि ते लोकांची स्थिति व दैत्यांचें वर्तन बारीक रीतीनें पहात फिरूं लागले. इकडे भावाच्या मृत्यूमुळें दुःखी हिरण्यकशिपूनें त्याचें तिलांजलिश्राद्धादि क्रियाकर्म आटोपिलें; व आपलें स्वतःचें सर्व दुःख गिळून टाकून

हिरण्याक्षाच्या परिवारानें सांत्वन

केलें! धर्मराजा, हिरण्यकशिपु मोठा शहाणा होता. त्यानें शकुनि, शंबर, धृष्ट, भूतसंतापन वृक, कालनाभ, महानाभ, हरिश्मश्रु व उत्कच नामक हिरण्याक्ष पुत्रांना, त्यांच्या मातेला व आपल्या मातेला म्हणजे दितीला मधुर वाणीनें म्हटलें, "वहिनी! आई! मुलांनो, वीरपुरुषांच्या मृत्यूबद्दल शोक करणें योग्य नाहीं. शत्रूशीं युद्ध करितांना मरण यावें, अशी ते इच्छाच करीत असतात. पहा—या लोकीं प्राण्यांचें एकत्र राहणें म्हणजे केवळ पाणपोईवर वाटसरू भेटतात त्याप्रमाणें क्षणिक आहे! दैवयोगानें कधीं कधीं त्यांचा समागम होतो, व कधीं वियोगही होतो. शरीर हें पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें आहे. बुडबुडा केव्हां फुटेल याचा जसा भरंवसा नाहीं, तसें हें शरीर केव्हां पडेल याचा नियम नाहीं. ज्या चैतन्यशक्तीनें हा देह वागतो, ती त्यांतून नाहींशी झाली कीं तो पडतो. तो चैतन्यरूप आत्मा कधीं मरत नाहीं, कधीं क्षय पावत नाहीं, आणि कधीं वृद्धिंगतही होत नाहीं. तो सदासर्वकाळ सारखा असून निर्मल आहे. त्याला कोणताही उपाधि नाहीं. तो सर्वव्यापक व सर्वसाक्षी आहे. तो मायेच्या योगें अनेक रूपें धारण करितो. उदकांत वृक्षाचें प्रतिबिंब पडलें असतां तें हालल्यामुळें वृक्षच हालल्याचा भास होतो. पण वास्तविक तो वृक्ष ज्याप्रमाणें जशाचा तसाच असतो, त्याप्रमाणें आत्माही जशाचा तसाच असतो. आत्मा हा वास्तविकपणें शरीररहित असतांना, तो शरीराभिमानी आहे, असें भासतें. असें होणें ही सर्व त्या परमात्म्याचीच माया आहे. ती सर्वांस मोह पाडिते. या मोहानें आत्मा शरिराहून निराळा असतां शरीरच आत्मा असा भास होतो. यालाच आत्म्याचा विपर्यास म्हणतात. या संसारांतील नानाप्रकारचीं सुखदुःखें हें या विपर्यासाचेंच फळ होय. प्रिय वस्तूचा वियोग, अप्रिय वस्तूचा समागम, कर्म, संसारबंधन, जन्म, मृत्यु, शोक, भय, अविवेक, चिंता इत्यादिकांची प्राप्ति हें सर्व त्या आत्मज्ञानाच्या विपर्यासापासूनच घडतें. याविषयीं एक जुना इतिहास आहे, त्यांत यमाचा व प्रेतबंधूंचा संवाद आहे. तो मी तुम्हांस सांगतों.

## सुयज्ञ राजाचें कथानक.

एके काळीं उशीनर देशांत सुयज्ञ या नांवाचा प्रसिद्ध राजा होऊन गेला. त्याला युद्धांत त्याच्या एका शत्रूनें मारिलें. तेव्हां त्याचे आप्तगण त्याच्या सभोंवतीं जमले. त्या राजाचें रत्नमय कवच बाणप्रहारांनीं फुटून छिन्नभिन्न झालेलें होतें; त्याचें शरीर रक्तानें लाल होऊन अस्ताव्यस्त रीतीनें समरभूमीवर पडलें होतें; त्याच्यावरील अलंकार व पुष्पमाळा गळून गेल्या होत्या; केंस विखुरले होते; डोळे फुटले होते; ओष्ठप्रांत घट्ट आवळून धर-

त्यामुळें त्या मृत वीराचा क्रोध अद्यापि जिवंत च आहे असा भास होत होता; आणि दोन्ही हात तुटून गेलेले असून, तोंड धुळीनें भरलेलें होतें! अशी ही आपल्या पतीच्या शवाची दुर्दशा पाहून

सुयज्ञाच्या स्त्रियांचा शोक

अनावर झाला. त्यांना भडभडून आलें! हायरे नाथा! असा आक्रोश करून त्या गडबडां लोळूं लागल्या; त्यांनीं आपल्या अंगावरील अलंकार फेंकून दिले; त्या ऊर बडवूं लागल्या; आणि त्याचें एक एक कृत्य आठवून म्हणाल्या, "नाथा, आजपर्यंत तूंच आम्हांला जपलेंस, आम्हांवर माया केलीस व आमचे लाड पुरविलेस; राजा, ह्या उशीनर देशांतील प्रजाजनांचा योगक्षेम तुझ्यामुळेंच उत्तम चालला होता; परंतु ज्या दुष्ट काळानें तुला येथून ओढून नेलें, त्यानेंच ह्या सर्व प्रजांस व आम्हांस दीन करून सोडिलें! राजा, आतां तुझ्या मागें राहून आम्हांला या जगांत काय कर्तव्य आहे! आतां आमची इतकीच इच्छा आहे कीं, तूं जेथें असशील तेथें आम्हीं यावें आणि तुझी सेवा करावी!" मातें, याप्रमाणें आक्रोश करीत असतां त्या स्त्रियांनीं तें प्रेत घट्ट धरिलें व कांहीं केल्या त्या तें सोडीनात! यामुळें सायंकाळ होऊन गेला तरी अग्निसंस्कार तसाच राहिला. हा प्रकार पाहून यमानें लहान मुलाचें रूप घेतलें, व तेथें येऊन त्या स्त्रियांना व इतर आप्तजनांना बोध केला. त्या

शिशुरूपधारी यमाचा बोध

तत्त्वदृष्ट्या फार महत्त्वाचा आहे! यम म्हणाला, "अहो, येथें असलेले सर्व लोक मजपेक्षां मोठे आहेत.जन्ममृत्यु रोज घडत आहेत, हें ह्यांनीं पुष्कळ वेळां पाहिलें असेल; तरी ह्यांना अद्यापही मोह पडतो अं! अहो, मनुष्य जेथून आला तेथें गेला; ह्यांत शोक करण्याचें तें कारण काय? हा राजा जसा गेला, तसें ह्यांनाही जावयाचेंच आहे; आणि असें असून हे शोक करीत बसले आहेत, तेव्हां हें आश्चर्य नव्हे काय? मग त्यापेक्षां मी पुष्कळ बरा! अहो, आईबापांनीं मला टाकून दिलें, तरी मला त्याची काळजी वाटत नाहीं; मी जरी अशक्त आहें, तरी लांडग्यांनीं व इतर हिंसक प्राण्यांनीं मला पीडा दिली नाहीं! अहो, ज्यानें मला गर्भात राखिलें, तोच माझें सर्वत्र रक्षण करणारा आहे. स्त्रियांनो, जो निर्विकार प्रभु आपल्या इच्छेनें हें विश्व करितो, रक्षितो आणि लयासही नेतो, त्या ईश्वराचेंच, जग हें एक क्रीडा करण्याचें साधन होय; अर्थात् ह्या सर्व गोष्टी त्याच्याच स्वाधीन आहेत. एखादी वस्तु भर रस्त्यांत पडलेली असेना, ईश्वराची इच्छा असल्यास ती सुरक्षित राहील; पण तीच वस्तु घरांत अगदीं जपून ठेविली असतांही ईश्वराची इच्छा प्रतिकूल झाल्यास ती नष्ट होईल! घोर अरण्यांतही एखादा दुर्बळ प्राणी जिवंत राहील; पण घरांत मोठा सुरक्षित ठेविलेलाही प्राणी मृत्युमुखीं पडल्याशिवाय राहणार नाहीं! स्थूल शरिराच्या उत्पत्तीला कारण त्या प्राण्याचें सूक्ष्म शरीर होय. सूक्ष्म शरिराच्या प्राक्तनकर्माप्रमाणें त्यास अनेक जन्म प्राप्त होतात. हा नियम सार्वत्रिक आहे. विश्वांतील प्रत्येक प्राणी ह्या नियमाप्रमाणें कर्मबद्ध आहे. आत्मा देहांत असला तरी तो जन्ममरणादिक उपाधींपासून अलिप्त आहे. लोक देहालाच आत्मा मानितात, हें त्यांचें अज्ञान होय. देह हा दृश्य आहे; आत्मा हा दृश्य नाहीं. तेव्हां दृश्य म्हणजे जड अशा देहाला आत्मा म्हणणें सर्वथा अनुचित होय. आत्मा हा देहांत आहे, इतक्यावरूनच त्यास देह म्हणावयाचें असेल, तर प्राणी हा घरांत राहतो, इतक्यावरून त्या प्राण्यास घर असें म्हणावें लागेल! अहो, उदकाचा बुडबुडा जसा नष्ट होतो, घट जसा फुटतो, कटककुंडलादिक अलंकार जसे मोडतात, तसें उदक, मृत्तिका व तेज ह्या तीन द्रव्यांपासून

सिद्ध झालेलें हें शरीर कालशक्तीनें क्षीण होऊन नाश पावतें ! अहो स्त्रियांनो, अग्नि हा काष्ठादिकांत असतां दाहप्रकाशादि गुणांनीं काष्ठादिकांपासून भिन्न दिसतो, तसा आत्मा हा शरिरांत राहून प्राण, मुख, नासिका इत्यादिकांच्या ठिकाणीं चैतन्यरूप विशिष्ट गुणांनीं भिन्न दिसतो; आणि आकाश हें सर्वत्र व्याप्त असतांना जसें अलिप्त दिसतें, तसा आत्मा हा सर्व स्थिरचर पदार्थांत व्याप्त असतांना त्यांपासून अलिप्त दिसतो. शिवाय, मूढांनो, तुम्ही ज्याकरितां रडतां, तो सुयज्ञ तर येथेंच पडला आहे. मग तुम्ही रडतां कां ? आतां, तो तुमच्याशीं बोलत नाहीं, किंवा तुमच्याकडे पहात नाहीं, म्हणून तो मेला असें समजून तुम्ही रडत असाल, तर मला एवढें सांगा कीं, आजपर्यंत जो तुमच्याशीं बोलत होता व जो तुमच्याकडे पहात होता, तो अन्य तुमच्या कधीं तरी दृष्टीस पडला होता का ? सर्व इंद्रियांच्या व्यापाराचा मुख्य हेतु जो प्राण, तो देखील बोलणारा व पाहणारा नव्हे; देह आणि इंद्रियें ह्यांच्या योगानें त्यांचे त्यांचे विषय अवलोकन करणारा आत्मा प्राणाहून व देहाहून वेगळा आहे. भूतें, इंद्रियें व मन ह्यांच्या ऐक्यानें हीं उच्चनीच शरिरें उत्पन्न होतात. जोंपर्यंत जीवात्मा त्यांच्याविषयीं अभिमान धारण करितो, तोंपर्यंत तो जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडलेला असतो. पण तोच स्वस्वरूपाविषयीं ज्ञानवान होऊन शरिरादिकांविषयीं निरभिमानी झाला, म्हणजे सच्चिन्मयपदीं लीन होऊन परब्रह्मस्वरूपीं मिळून जातो. स्त्रियांनो, स्वप्नांतील व मनोराज्यांतील गोष्टी जशा खोट्या, तसेच इंद्रियांचे हे सर्व विषय खोटे होत. म्हणून, सुखदुःखादि कार्यें खरीं आहेत असें मानणें म्हणजे शुद्ध वेडेपणा समजावा. हे सर्व प्रकार मायेनें केलेले आहेत. आज सुयज्ञ राजा गेला म्हणून तुम्ही रडतां, पण तुम्ही केव्हां जाणार हें तुम्हांला कळलें आहे का ? तें जर तुम्हांला कळलें नाहीं, तर या रडण्यापासून उपयोग काय ? कारण, ह्या सर्व गोष्टी ईश्वराच्या अधीन आहेत. यावरून मला एका

### कुलिंग पक्ष्याची गोष्ट

आठवली, ती तुम्हांला सांगतों: अरण्यामध्यें पक्ष्यांना मारणारा एक पारधी ईश्वरानें उत्पन्न केला होता. जेथें जेथें पांखरें आढळत, तेथें तेथें जाळें पसरून व धान्याचें आमिष दर्शवून तो त्यांना फसवून धरीत असे. एके दिवशीं कुलिंग पक्ष्यांचा एक जोडा त्याच्या दृष्टीस पडला. त्यांपैकीं मादीला त्या पारध्यानें अवचित फसविलें, व ती त्याच्या जाळ्यांत गुंतली ! आपल्या पत्नीची ती विपन्न स्थिति पाहून, प्रेमातिशयामुळें कुलिंगाला फार दुःख झालें; पण करतो काय ? तिला सोडविण्याचें सामर्थ्य तर त्याला नव्हतें ! शेवटीं बिचारा एका झाडाच्या फांदीवर बसून आक्रोश करीत म्हणूं लागला, “ कितीहो हा देव तरी निर्दय ! अगोदर स्त्रियांची जात फार गरीब; त्यांतून, ही माझी स्त्री पहा कशी दीनासारखी रडत आहे ! परमेश्वर तर सर्वव्यापक आहे; मग त्याला ह्या दीन स्त्रीपासून काय लभ्यांश ? मला देखील त्यानें नेलें असतें तर चाललें असतें. ह्या विधुर स्थितींत दुःखानें राहण्यापेक्षां मेलेलें काय वाईट ! बिचाऱ्या पिलांना अजून पंख देखील फुटले नाहींत, तोंच त्यांची आई नाहींशी झाली ! मी आतां त्यांचें पोषण करूं तरी कसें ? तीं अभागी पिलें तिची वाट पहात असतील ! ” तो कुलिंग दीन स्वरानें असा विलाप करीत आहे, इतक्यांत लपून बसलेल्या त्याच पारध्यानें त्यालाही बाण मारून खालीं पाडिलें ! बायांनो, कुलिंगाप्रमाणें तुम्हांलाही बुद्धि नसल्यामुळें, तुम्हांला आपला मृत्यु दिसत नाहीं. शंभर वर्षें जरी रडत बसलां, तरी देखील हा तुमचा पति तुम्हांला फिरून मिळण्याचा संभव आहे का ? ”

हिरण्यकशिपु पुढें म्हणालाः—अशा प्रकारें

त्या मुलानें त्या सुयज्ञाच्या स्त्रियांचें व आप्तांचें समाधान केल्यावर तो बालरूपी यम गुप्त झाला. नंतर त्या सर्वांचा भ्रम दूर झाला, व हें विश्व खोटें आहे अशी त्यांना खातरी वाटली, आणि त्यांनीं लागलेंच सुयज्ञाचें और्ध्वदेहिक केलें. म्हणून, माते, मुली, मुलांनो ! माझें तुम्हांला इतकेंच सांगणें आहे कीं, तुम्ही स्वतांबद्दल अथवा दुसऱ्याबद्दल मुळींच खंत करूं नका. कारण येथें आपलें आहे काय ? प्राण्यांना मी आणि तूं हा अभिमान असतो, हें त्यांचें अज्ञान होय. तें अज्ञान नष्ट झालें म्हणजे शोकाला जागाच उरत नाहीं !

नारद म्हणाले:—धर्मराजा, दितीनें व तिच्या सुनेनें याप्रमाणें दैत्यराजाचें भाषण ऐकल्यावर शोक सोडून दिला, व तत्त्वरूपीं मन लाविलें !

## अध्याय तिसरा.

—:०:—

### हिरण्यकशिपूचें तप.

नारद म्हणाले:—धर्मराजा, हिरण्यकशिपूनें असा विचार केला कीं, आपल्याला कोणीं जिंकूं नये, जरा व मरण हीं येऊं नयेत, शत्रु उत्पन्न होऊं नये, आणि एकछत्री राज्य चालवितां यावें, अशी कांहीं तरी युक्ति योजिली पाहिजे. असा संकल्प करून तो मंदराचलाच्या गुहेंत जाऊन बाहु वर करून, आकाशाकडे दृष्टि लावून, व केवळ पायाच्या अंगठ्यावर उभा राहून उग्र तपश्चर्या करूं लागला. तो तपश्चर्या करूं लागला असतां आपल्या जटांच्या कांतीनें प्रलयकालच्या सूर्याप्रमाणें शोभूं लागला. त्याची तपश्चर्या चालू असतां देव आपापल्या स्थानीं जाऊन बसले. त्याच्या मस्तकांतून निघालेला जो तपोमय सधूम अग्नि चोहोंकडे पसरला, त्यानें त्रैलोक्य तापून गेलें; ग्रहांसह नक्षत्रें भराभरां रिचूं लागलीं; द्वीपें व पर्वत यांसह पृथ्वी थरथर कांपूं लागली; नद्या व समुद्र खवळले; आणि दशदिशा पेटल्या ! त्यानें आरंभिलेलें तें उग्र तप पाहून त्याच्या तेजानें तप्त झालेले सर्व देव ब्रह्मलोकीं गेले, आणि त्यांनीं ब्रह्मदेवाची प्रार्थना आरंभिली.

### देवांची ब्रह्मदेवास प्रार्थना.

देव म्हणाले:—हे देवाधिदेवा जगत्पालका ब्रह्मदेवा, हिरण्यकशिपूच्या उग्र तपश्चर्येमुळें आम्हांस फार ताप होत असून स्वर्गांत राहण्यास आम्ही असमर्थ झालों आहों. पृथ्वीवरही मोठा हाहाकार झाला आहे. आपल्याला हविर्भाग देणारे जोंपर्यंत जिवंत आहेत, तोंपर्यंत याचा कांहीं तरी प्रतिकार करा. असली दुर्घट तपश्चर्या करण्याचा हिरण्यकशिपूचा काय हेतु आहे, हें आपणांस कळलेंच असेल; पण आम्ही आणखी सांगतों: " योगाभ्यास आणि तपश्चर्या यांच्या योगानें ब्रह्मदेव सर्वांपेक्षां श्रेष्ठ स्थानावर सत्यलोकीं राहतो, आणि स्थावरजंगमात्मक विश्व उत्पन्न करितो, तर काल व आत्मा हे नित्य असल्यामुळें मीही ब्रह्मदेवाप्रमाणें तपोयोगनिष्ठा वाढवून केव्हांना केव्हां तरी तसें स्थान मिळवीन व आपल्या सामर्थ्यानें हें विश्व ब्रह्मदेवाच्या नियमांच्या विरुद्ध उत्पन्न करीन ! ध्रुवादिक विष्णुभक्तांचीं स्थानें कल्पांतीं नष्ट होणारीं असल्यामुळें मला तीं नकोत ! मला प्रत्यक्ष ब्रह्मपदच पाहिजे !" असा हिरण्यकशिपूचा रोख आहे, असें आमच्या कानीं आलें आहे. त्रिभुवनेश्वरा, याचा बंदोबस्त लवकर केला पाहिजे. कारण, हें आपलें स्थान म्हणजे गाई, ब्राह्मण यांचा मुख्य आधार होय. सुख, वैभव, चरितार्थ व विजय हीं यापासून प्राप्त होतात. हें पद जर गेलें, तर मग साधूंना फार दुःख होऊन त्यांना कोणीच त्राता उरणार नाहीं !

### हिरण्यकशिपूस ब्रह्मदेवदर्शन.

धर्मराजा, याप्रमाणें देवांचें भाषण ऐकून दक्ष, भृगु इत्यादिकांना बरोबर घेऊन भगवान ब्रह्म-

देव हिरण्यकशिपूच्या आश्रमास आला; परंतु तेव्हां तो तेथें दिसेना. कारण, त्याच्या शरिरावर मोठें वारूळ वाढलें असून, मुंग्यांनीं त्याच्या शरिरांतील वपा, रक्त, मांस, त्वचा वगैरे सर्व खाऊन टाकिलीं होतीं! इतकें असूनही, ढगाच्छादित सूर्याप्रमाणें तो लोकांना आपल्या तपोवीर्यानें तापवीतच होता! कारण, त्याचें तपःसामर्थ्य तसेंच होतें. त्याची ती अवस्था पाहून ब्रह्मदेवाला फार आश्चर्य वाटलें. त्या समयीं ब्रह्मदेव स्मित हास्य करून हिरण्यकशिपूला म्हणाला, "हे दैत्यराजा, ऊठ, ऊठ. तुझें कल्याण असो. तुझी ही प्रखर तपश्चर्या पाहून मी फार संतुष्ट झालों आहें. ही अशी उग्र तपश्चर्या मोठमोठ्या ऋषींच्या हातूनही घडणें कठीण! आजपर्यंत अनेक ऋषि होऊन गेले व पुढेंही पुष्कळ होतील, पण तुझ्या ह्या तपश्चर्येसारखी दिव्य तपश्चर्या आजवर कोणीं केली नाहीं, व पुढेंही कोणी करणार नाहीं! उदकही न पितां देवांचीं शंभर वर्षें प्राण धारण करून तप करणें अत्यंत दुर्घट आहे. पहा—डांसांनीं तुझें सर्व शरीर खाऊन टाकिलें आहे, तरी अजून तूं जिवंत आहेस; धन्य तुझी! हे दितिपुत्रा, तूं केवळ निर्धारानेंच मला जिंकिलेंस; तुझ्या ह्या अपूर्व तपामुळें मी तुझ्या अगदीं हस्तगत झालों आहें! ह्यास्तव तुला अपेक्षित असेल तें मागून घे. हिरण्यकशिपो, मी तुला सकल भोग अर्पण करण्यास सिद्ध आहें. बाबा, माझें दर्शन झालें असतां मर्त्य किंवा अमर्त्य अशा कोणत्याही जनाचे मनोरथ निश्चयानें सफल होतात."

नारद म्हणाले:—धर्मराजा, असें भाषण करून ब्रह्मदेवानें हिरण्यकशिपूच्या अस्थिगत शरिरावर आपल्या कमंडलूंतील दिव्य व अमोघ उदक शिंपिलें, आणि लागलाच हिरण्यकशिपु आपल्या अंगावर वाढलेल्या वारुळांतून वर उठला! धर्मा, त्या वेळीं उत्साह, सामर्थ्य आणि तेज हीं त्याच्या ठिकाणीं तात्काळ परिपूर्ण दिसूं लागलीं; व ब्रह्मदेवाला अवलोकन करितांच त्यानें त्यास साष्टांग नमस्कार केला, आणि सद्गदित वाणीनें तो

### ब्रह्मदेवाची स्तुति

करूं लागला. तो म्हणाला, "हे भगवंता, तुझी लीला अपार आहे. हें त्रिगुणात्मक जग तूंच आपल्या मायेनें निर्माण केलेंस. सर्व जगाला तूंच वागवितोस, व सर्व जगाचा संहार करणाराही तूंच आहेस. सर्व इंद्रियांचा चालक तूंच. हें सर्व जग तुझ्याच ब्रह्मरूपीं लीन झालेलें आहे. तुजवांचून या जगांत कोणतीही वस्तु नाहीं. सर्व जगाचें कारण व कार्य तूंच आहेस. तुझ्याच ठिकाणीं वेदत्रयीरूप सर्व विद्या परिपूर्ण भरलेल्या आहेत. त्या वेदत्रयीच्या योगानेंच अग्निष्टोमादिक सात प्रकारचे यज्ञयाग तूं विस्तृत करितोस. प्राण्यांच्या अंतर्यामीं आत्मा तूंच आहेस. तूंच सर्वज्ञ, अनंत व शाश्वत आहेस. अखंडदंडायमान जो काल तो तूंच; आणि पळ, लव इत्यादि रूपांनीं प्राण्यांचें आयुष्य तूंच क्षीण करितोस. हे परमेश्वरा, अशी जरी तुझी स्थिति आहे, तरी तूं स्वतः कोणत्याही मायाजन्य विकारापासून अगदीं अलिप्त आहेस. प्रभो, तूं अनादि, अमेय, अजन्मा व ज्ञानमय असून सर्व त्रैलोक्याच्या जीवनाला कारण आहेस. तुझ्यामुळेंच सकल विश्वाचें नियमन होतें. जगांत त्वद्व्यतिरिक्त असा कोणताही पदार्थ नाहीं. सर्व विद्या व कला हीं तुझींच रूपें आहेत. सुवर्णमय ब्रह्मांड तुझ्याच उदरीं वास करितें. हे परमात्मन्, सर्व विश्व हें तुझेंच शरीर होय; आणि त्यामुळें तूं इंद्रियांचे व मनाचे विषय उपभोगितोस. देवाधिदेवा, असें आहे तरी तूं सच्चिन्मयरूपीं सदैव रममाण असतोस; म्हणून तुला निरुपाधिक परब्रह्म व पुराणपुरुष अशी संज्ञा आहे. हे विश्वाधिपते, तुझी शक्ति मोठी अचिंत्य आहे. तुझ्या त्या अनि-

अवर्णनीय व अगम्य अशा सामर्थ्यानें हें सर्व ब्रह्मांड व्याप्त आहे; आणि, देवा, तुझ्या ठिकाणीं चित् ( निर्मल ज्ञान ) व ( माया ) ह्या दोन्ही शक्ति वसत आहेत. ज्ञान व विज्ञान हीं तुझींच रूपें. प्राण, इंद्रियें मन व बुद्धि ह्या विकारांवरून तुझीच व्याप्ति व्यक्त होते. भगवंता, तुला माझा नमस्कार असो. प्रभुवरा, या जगतांत जितक्या म्हणून वर देणाऱ्या विभूति आहेत, त्या सर्वांत तूंच श्रेष्ठ आहेस. तू प्रसन्न होऊन वर देण्यास तयार आहेस; तर, भगवन्, या आपल्या दासानुदास

हिरण्यकशिपूची वरयाचना

पूर्ण कर. देवा, तूं उत्पन्न केलेल्या कोणत्याही प्राण्याकडून मला मृत्यु नसावा; तसेंच दिवसा किंवा रात्रीं, आंत अथवा बाहेर, पृथ्वीवर किंवा आकाशांत, दैत्य, मनुष्य, देव, पशु, पक्षी, सर्प, सजीव किंवा निर्जीव वस्तु इत्यादि कोणाकडून कोठेंही मला मरण नसावें. माझ्या समोर युद्ध करण्यास कोणींही उभें राहूं नये. सर्व प्राण्यांवर माझ्या एकट्याचाच अधिकार चालावा; आणि लोकपालांचें आधिपत्य व तुझें स्वतांचें स्थान मला मिळून मी त्यांपासून कधींही भ्रष्ट होऊं नये !"

## अध्याय चौथा.

—:०:—

### हिरण्यकशिपूस वरप्राप्ति व त्रैलोक्यास पीडा.

नारद म्हणाले:—धर्मा, हिरण्यकशिपूनें मागितलेले वर अत्यंत दुर्लभ होते खरे; पण त्याची तपश्चर्या पाहून संतुष्ट झाल्यामुळे ब्रह्मदेवानें ते वर त्याला दिले. त्या समयीं ब्रह्मदेव हिरण्यकशिपूला म्हणाला, "हे दैत्यराजा, तूं जे वर मागत आहेस, हे सर्वथा दुर्देय आहेत. पण तुझ्या दिव्य तपश्चर्येमुळें मी ते तुला देतों !" धर्मराजा, ब्रह्मदेवापासून इच्छित वर मिळाल्यानंतर हिरण्यकशिपूनें त्याची पूजा केली, व नंतर ब्रह्मदेव मार्गांत प्रजापतींची स्तुति ग्रहण करून स्वस्थानीं निघून गेला. इकडे, वराच्या योगें हेममय देह धारण केलेल्या हिरण्यकशिपूच्या मनांत, आपल्या बंधूच्या वधाबद्दल सूड उगविण्याला आतां आपल्यास कसलीही भीति राहिली नाहीं, असा दृढ विश्वास उत्पन्न झाला; व ह्यानें भगवान विष्णूशीं द्वेष करण्यास सुरुवात केली. ब्रह्मदेवाच्या वरामुळें प्रबल झालेल्या दैत्यराजानें त्रैलोक्य जिंकून देव, दैत्य, मानव, गंधर्व, गरुड, सर्प, सिद्ध, चारण, विद्याधर, ऋषि, पितृपति, मनु, यक्ष, राक्षस, पिशाचपति, प्रेतपति, भूतपति आणि सर्व जातींच्या प्राण्यांतील मुख्य यांना जिंकून घेतलें; आणि लोकपालांचीं स्थानें हरण करून तो नंदनवनांत सकल ऐश्वर्यानें ओतप्रोत भरलेल्या व विश्वकर्म्यानें निर्मिलेल्या इंद्राच्या वसतिस्थानीं राहूं लागला. धर्मराजा, त्या

इंद्रभुवनाची शोभा

काय वर्णन करावी ? त्या मंदिराच्या पायऱ्या प्रवाळाच्या असून जोतें पाचेच्या मोठमोठ्या दगडांनीं बांधिलेलें आहे. भिंती शुद्ध स्फटिकाच्या असून, त्यांवर नानाप्रकारचीं मनोरम अशीं चित्रें काढिलेलीं आहेत. खांब, तुळया व पटई हीं वैदूर्य रत्नांचीं असून छताला मोत्यांची झालर लाविलेली आहे. आंत ठिकठिकाणीं पद्मराग मण्यांचीं आसनें असून सभोंवतीं अति विस्तीर्ण नंदनवन आहे. या स्थळीं मनोहर रूप धारण करणाऱ्या देवस्त्रिया नित्य क्रीडेकरितां येत असून आपल्या नूपुरांनीं तो प्रदेश दुमदुमून टाकितात व त्या आपलीं सुंदर मुखकमळें मणिमय भूमिकेंत अवलोकितात !

धर्मराजा, अशा त्या दिव्य भुवनाचा आणि वनाचा उपभोग हिरण्यकशिपु घेऊं लागला. त्या

प्रचंड शक्तिमान आणि धैर्यशाली दैत्यराजानें आपल्या तीव्र शासनाच्या योगानें त्रैलोक्य जर्जर करून सोडिलें. ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर यांशिवाय सर्व देव हे, मदिरेच्या पानानें धुंद, उन्मत्त व ताम्राक्ष झालेल्या त्या दुर्धर हिरण्यकशिपूची आज्ञा मान्य करण्यांत नजरनजराणे घेऊन तत्पर राहूं लागले. विश्वावसु, तुंबुरु, मी, गंधर्व आणि सिद्ध हे त्याच्यापुढें गायन करीत असूं. विद्याधर व अप्सरा तेथें नृत्य करीत. ऋषि त्यास स्तवीत. पृथ्वीवरील लोक यज्ञ वगैरे करून त्याची आराधना करीत; व तोही आपल्या सामर्थ्यानें हविर्भाव स्वीकारी! धर्मराजा, त्या पराक्रमी दैत्याच्या दराऱ्यानें ही सप्तद्वीपवती पृथ्वी नांगरल्यावांचून धान्य देऊं लागली; मेघ योग्य काळीं वृष्टि करूं लागले; सप्तसमुद्र आणि त्यांच्या पत्न्या, आपल्या लाटांनीं बहुमोल रत्नांच्या राशी वाहून आणून त्याला अर्पण करूं लागल्या; व पर्वतांनीं आपापल्या गुहांचीं क्रीडास्थानें बनविलीं! राजा, अशा प्रकारें तो सनत्कुमारांच्या शापानें दैत्यजन्म पावलेला गर्विष्ठ हिरण्यकशिपु स्वतः लोकपालांच्या ऐश्वर्यानें युक्त होऊन शास्त्रविरुद्ध वर्तन करीत असतां एकाहत्तर युगांपेक्षांही अधिक काळ निघून गेला! त्या मदोन्मत्त दैत्याच्या दुर्वर्तनानें व जुलमानें त्रासलेले देव, ऋषि, सर्व लोक व लोकपाल, आतां या संकटापासून सोडविण्यास भगवान विष्णूवांचून कोणी समर्थ नाहीं, असा विचार करून त्याला शरण गेले. त्यांनीं आपलीं बाह्येंद्रियें व मन ह्यांचें संयमन करून बुद्धीची एकाग्रता केली, आणि भगवत्पदीं अंतःकरण लीन करून त्या भक्तसंकटनिवारक प्रभूस स्तविलें. इतक्यांत मेघासारख्या गंभीर शब्दानें युक्त अशी अभयकारक

आकाशवाणी

दशदिशांकडून देवांना ऐकूं आली! ती अशीः "सुरश्रेष्ठहो, भिऊं नका. तुमचें सर्वांचें कल्याण असो. ज्यांना माझें भाषण ऐकावयास मिळालें, त्यांचीं सर्व संकटें नष्ट होतील हें ध्यानांत ठेवा. अहो, हा दैत्याधम हिरण्यकशिपु देव, वेद, गाई, ब्राह्मण, साधु आणि मी परमेश्वर ह्या सर्वांचा द्वेष करीत आहे हें मी जाणून आहें. ह्याचा नाश होण्याची वेळ आतां जवळ आली आहे, असा भरंवसा धरून थोडे दिवस दुःख सोसा. ह्या दुष्ट दैत्याचा प्रल्हाद या नांवाचा एक पुत्र माझा मोठा भक्त आहे. त्याचा हा पिता असतांही, आपला पुत्र ईश्वराची भक्ति करितो म्हणून त्याचा द्वेष करूं लागेल, आणि मग ब्रह्मदेवाच्या वरानें प्रबळ झालेल्या ह्या दैत्याचा मी वध करीन!"

### प्रल्हादाचें गुणवर्णन.

नारद म्हणाले:—धर्मराजा, अशी ही अभय देणारी आकाशवाणी ऐकून सर्वांचीं मनें स्थिर झालीं. त्या समयीं दैत्यराज हिरण्यकशिपु मेलाच, असें त्यांस वाटलें; आणि ते भगवान विष्णूच्या चरणकमळीं आपलीं मस्तकें नम्र करून आपापल्या स्थानीं निघून गेले.

हिरण्यकशिपूच्या महापराक्रमी चार पुत्रांपैकीं सर्वांत मोठा प्रल्हाद हा महान भगवद्भक्त होता. तो सुशील, सत्यवचनी व जितेंद्रिय असून ब्राह्मणांचा कैवारी व साधूंचा सेवक होता. त्याला आपल्या विद्येचा, ऐश्वर्याचा, थोर कुळाचा आणि सौंदर्याचा यत्किंचितही गर्व नव्हता. सर्वभूतीं एक परमेश्वर आहे, अशी त्याची बुद्धि होती. तो दीनांवर पित्याप्रमाणें लोभ करी; समानांशीं भावाप्रमाणें वागे; व गुरुजनांना ईश्वर मानी. कितीही संकटें प्राप्त झालीं, तरी त्याची शांतवृत्ति ढळत नसे. त्यानें इंद्रियें, प्राण, शरीर व बुद्धि ह्यांचें नियमन केलें असून दैत्यधर्म अगदीं सोडिला होता. तो सर्व विषयांना तुच्छ मानीत असे. तो दैत्यकुलांत जन्म पावला असतांही त्याच्या सद्गुणांमुळें आणि निस्सीम ईश्वरभक्तीमुळें, दैत्यांचे शत्रु जे देव, तेही त्याची स्तुति करून

त्याला मोठ्या प्रेमानें वंदितात. धर्मराजा, ह्या भगवद्भक्त प्रऱ्हादाचें लक्ष लहानपणापासूनच ईश्वरचरणीं लागलेलें होतें. त्याला कोणतेही लहानपणचे खेळ आवडले नाहींत. त्यानें आपलें मन ईश्वराला अर्पण केलें असल्यामुळें, सदासर्वदा त्याला ईश्वराशिवाय दुसरें कांहीं दिसत नव्हतें. भगवत्स्वरूपीं त्याचें चित्त इतकें लीन झालेलें होतें कीं, बसतांना, उठतांना, फिरतांना, खातांना, पितांना, निजतांना किंवा बोलतांना आपण काय करीत आहों, ह्याविषयीं त्याचें सर्व भान जाई. भगवच्चिंतनांत गर्क होऊन कधीं कधीं तो रडूंच लागे. कधीं कधीं तो परमानंदांत निमग्न होऊन हसतच सुटे. कधीं कधीं तो गातच असे. कधीं कधीं तो मोठ्यानें ओरडे. कधीं कधीं वेड्यासारखा नाचे. कधीं कधीं आपण प्रत्यक्ष ईश्वरच आहों, असें समजून तदनुरूप लीला करी. कधीं कधीं ईश्वरास आपण आलिंगन देत आहों, अशा भावनेनें त्याचा देह रोमांचित होई. कधीं कधीं त्याच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचे पूर वाहात आणि कधीं कधीं तो स्तब्धच बसे! राजा धर्मा, सर्वसंगपरित्याग केलेल्या महात्म्यांच्या सहवासानें त्याच्या ठायीं भगवंताविषयीं अशी अपूर्व भक्ति उत्पन्न झाली; व तिच्या योगानें तो स्वतः संतुष्ट राहून, इतर जे कोणी दुष्टांच्या सहवासानें दीन झालेले असत, त्यांसही तो संतुष्ट करी. राजा, हिरण्यकशिपूला हें त्याचें वर्तन अर्थात् खपलें नाहीं; आणि त्यानें त्याचा अत्यंत छळ आरंभिला; व त्या योगें शेवटीं तो मृत्युमुखीं पडला!

धर्म म्हणालाः—नारद मुने, अशा सदाचरणी पुत्राचा हिरण्यकशिपूनें छळ केला, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. मुलगे प्रतिकूल वागूं लागल्यास त्यांस वळण लावण्याकरितां त्यांचे वडील त्यांस शिक्षा वगैरे करितात; पण त्यांस शत्रूप्रमाणें छळीत नाहींत! प्रभो, पित्यानें पुत्राचा छळ केला, व ह्यामुळें त्या पित्याचा अंत झाला, हें मोठें विचित्र दिसतें! म्हणून, मुनिश्रेष्ठा, आपण तो साद्यंत वृत्तांत मला कथन करावा.

# अध्याय पांचवा.

—:०:—

## प्रऱ्हादाचें अध्ययन व परीक्षा.

नारद म्हणालेः—धर्मराजा, दैत्यांचा गुरु जो शुक्राचार्य, त्याला शंड आणि अमर्क ह्या नांवाचे दोन पुत्र होते. ते राजसदनाजवळच रहात असत. हिरण्यकशिपूनें त्यांजकडे प्रऱ्हादाला अध्ययन करण्याकरितां ठेविलें. प्रऱ्हाद हा राजनीतींत वगैरे आधींच निपुण होता; वास्तव, इतर दैत्यपुत्रांबरोबर दंडनीतीचे वगैरे जे पाठ ते शंडामर्क त्यास सांगत, त्यांच्या योगानें त्यास समाधान वाटत नसे. कारण, त्या पाठांत द्वैतप्रतिपादक गोष्टी व देहादिकांविषयीं अहंकार मात्र भरलेला असे. एके दिवशीं पित्यानें राजमंदिरांत लडिवाळपणानें प्रऱ्हादाला मांडीवर घेऊन मोठ्या कौतुकानें विचारिलें, "बाळ, तुला काय आवडतें?" तेव्हां प्रऱ्हाद म्हणाला, "हे दैत्याधिपते, प्राणी अहंममतेनें बद्ध होऊन या संसाररूप अंधकारांत बुडून जातात आणि आत्म्याचा नाश करून घेतात, म्हणून निवांत अशा वनांत जाऊन श्रीहरीचा आश्रय धरणें मला आवडतें!"

नारद म्हणालेः—धर्मराजा, मुलाचें तें भाषण ऐकून हिरण्यकशिपूस हसूं आलें; आणि मग तो म्हणाला कीं, "ब्राह्मणहो, दुसऱ्याच्या उपदेशानें मुलांच्या कोंवळ्या बुद्धीला फार लवकर भुरळ पडते; तर तुम्ही फार दक्ष असा. शत्रुपक्षाकडील लोक तुमच्या घरीं गुप्तरूपानें येऊन याच्या बुद्धीला विपर्यास पाडतील; तर असें न होऊं देण्याविषयीं खबरदारी घ्या."

१ यास 'उशना' असें नांव आहे. देवयानीचा बाप शुक्राचार्य तो हा नव्हे. हा वारुणि—कवीचा पुत्र असून देवयानीपिता वारुणि—भृगुचा पुत्र होय.

### प्रऱ्हादाचा व त्याच्या गुरूंचा संवाद.

नारद पुढें म्हणाले:—धर्मराजा, इतकें सांगितल्यावर दैत्यांनीं प्रऱ्हादास गुरूंच्या घरीं आणून पोहोंचविलें. तेव्हां गुरूंनीं गौरवयुक्त मधुर शब्दांनीं त्याला म्हटलें कीं, "बाळा प्रऱ्हादा, तुझें कल्याण असो. आम्ही तुला असें विचारितों कीं, या सर्व मुलांमध्यें तुझीच बुद्धि अशी विपरीत कशानें झाली ? हा तुझ्या बुद्धीचा विपर्यास कोणीं मुद्दाम केला आहे, किंवा हें तुझें स्वत:सिद्धच ज्ञान आहे ? बाळा, यांपैकीं काय खरें असेल तें आम्हांस सांग."

प्रऱ्हाद म्हणाला:—'मी' व 'दुसरा' हा मिथ्याभिमान ईश्वराच्या मायेनें निर्माण केला आहे; ह्यास्तव हा भेदभाव मायेच्या योगानें अंध झालेल्या पुरुषांना भासतो. मी मायेपासून अलिप्त असल्यामुळें तो भेद मला भासत नाहीं. त्या परमेश्वराला माझा नमस्कार असो. आचार्यहो, परमेश्वराच्या अनुकूलतेनेंच हा भेद नष्ट होऊन बुद्धि आत्मस्वरूपीं लागते. परमेश्वराचें चरित्र अगाध आहे. अविवेकी व अज्ञानी पुरुष ज्यास भेदभावानें पाहतात, व ज्याचें स्वरूप ओळखितांना ब्रह्मदेवासारखे वेदवेत्ते देखील मूढ होऊन जातात, तोच परमेश्वर माझी बुद्धि फिरवितो. ज्याप्रमाणें लोहचुंबकासभोंवतीं लोखंड आपण होऊन फिरत असतें, त्याप्रमाणें माझें मन चक्रपाणि श्रीहरीच्या भोंवतीं आपण होऊनच फिरत आहे. असें होण्याचें कारण काय, तें मला मुळींच समजत नाहीं.

नारद म्हणाले:—धर्मराजा, असें हें प्रऱ्हादाचें भाषण ऐकून गुरूजींना फार राग आला; आणि ते म्हणाले, "आण रे ती छडी इकडे ! ह्या कुलांगार कारट्याला चौदावें रत्न दाखविल्याशिवाय हा वठणीस येणार नाहीं ! हा कुऱ्हाडीचा दांडा दैत्यकुलरूप वृक्षाचीं मुळें तोडून टाकण्यास सिद्ध झाला आहे. ह्यास्तव ह्यास वेळींच शासन केलें पाहिजे !" धर्मराजा, अशा प्रकारें धाकदपटशा दाखवून त्या ब्राह्मणांनीं प्रऱ्हादाला धर्म, अर्थ व काम हीं तीन शास्त्रें शिकविलीं; आणि सामदामादिक चतुर्विध उपायांचें चांगलें ज्ञान करून देऊन त्याला परीक्षा देण्याकरितां दैत्यराजाकडे पाठविलें. राजमंदिरांत गेल्यावर प्रऱ्हादाच्या मातेनें त्यास न्हाऊं घालून वस्त्राभरणांनीं शृंगारिलें, आणि नंतर तो हिरण्यकशिपूच्या भेटीस गेला.

### प्रऱ्हादाचें व त्याच्या पित्याचें संभाषण.

नंतर प्रऱ्हादानें पित्यास वंदन केलें, तेव्हां हिरण्यकशिपूनें त्याला आशीर्वाद देऊन प्रेमानें घट्ट आलिंगन दिलें; आणि त्याचें मस्तक हुंगीत व आनंदाश्रूंनीं त्यास स्नान घालीत मोठ्या ममतेनें म्हटलें, "बाळा, दीर्घायु हो. आजपर्यंत आपल्या गुरूजींजवळ तूं जें अध्ययन केलेंस, त्यांपैकीं जें कांहीं तुला उत्तम येत असेल, तें मला म्हणून दाखीव पाहूं." प्रऱ्हाद म्हणाला, "हे तात,

श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।
अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥

अशा प्रकारची नवविधा भक्ति ज्या योगानें घडेल, तेंच अध्ययन श्रेष्ठ असें मी समजतों."

धर्मराजा, हें पुत्राचें भाषण ऐकल्याबरोबर हिरण्यकशिपु क्रोधानें लाल झाला; आणि त्या आवेशांतच तो गुरुपुत्रांना म्हणाला, "नीचांनो, अरे ! माझें यत्किंचितही भय न धरितां भलतीच विद्या या माझ्या पुत्राला शिकविलीत काय, तुम्ही खचीत आमच्या प्रतिपक्षाला अनुकूल आहां ! दुष्टहो, हें कपट आतां पूर्णपणें माझ्या लक्षांत आलें !"

हिरण्यकशिपूचें ह्याप्रमाणें क्रोधयुक्त भाषण ऐकून शुक्रपुत्रानें त्याला सांगितलें कीं, "हे इंद्रशत्रो, तूं आमच्यावर व्यर्थ संतापूं नको. तुझ्या

पुत्रानें जें कांहीं आतां म्हटलें, हें त्याला आम्हीं किंवा इतर कोणींही शिकविलें नाहीं. ही त्याची उपजतबुद्धिच आहे." असें हें गुरुजींचें भाषण ऐकून दैत्यानें आपल्या पुत्रास विचारिलें कीं, "हे मूर्खशिरोमणे, तुला जर कोणींही शिकविलें नाहीं, तर ही दुर्बुद्धि तुला कोठून उपजली?" तेव्हां प्रऱ्हादानें नम्रपणानें असें उत्तर दिलें.

प्रऱ्हादाचें उत्तर.

प्रऱ्हाद म्हणाला, "तात, जे लोक इंद्रियांच्या अधीन होऊन संसाराचेंच चिंतन करीत राहतात, त्यांच्या मनांत सद्गुरूच्या उपदेशानें, स्वतां होऊन, किंवा सहवासानें भगवद्भक्ति कधींही ठसणार नाहीं. संसार मिथ्या आहे आणि ब्रह्म सत्य आहे असें ज्यांना वाटतें, त्यांचे ठिकाणीं मात्र ती ठसेल. बाह्य विषयांचे ठिकाणींच सर्व पुरुषार्थ आहेत असें ज्यांना वाटतें, त्यांची ती बुद्धि लटकी आणि त्यांनीं केलेले ते गुरुही लटकेच! अंधळ्यांनीं अंधळ्यालाच पुढारी केलें असतां त्या पुढाऱ्यासुद्धां त्यांची जी स्थिति होते, तीच स्थिति अशा शिष्यांची आणि गुरूंची व्हावयाची! परमेश्वराची वेदरूप वाणी ही मोठी दावण आहे. ह्या दावणीला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चार वर्णरूपी दाव्यांनीं हे लोक आपापल्या कर्मामुळें बांधले जातात. अशा लोकांची बुद्धि विषयवासनेच्या पलीकडे कधींही जात नाहीं. त्यांची बुद्धि अद्वितीय परब्रह्माकडे लागण्यास योग्य उपाय हाच कीं, एखाद्या महात्म्या साधु पुरुषाशीं त्यांची गांठ पडून, त्याच्या चरणधूलीच्या स्पर्शानें ते शुद्ध झाले पाहिजेत. असें झालें म्हणजे मग मात्र ते परब्रह्मस्वरूपाचें ज्ञान प्राप्त करून घेण्यास योग्य होऊन, त्याच्या अनुग्रहानें या अनर्थकारक संसारापासून मुक्त होतात!" धर्मराजा, असें बोलून प्रऱ्हाद स्वस्थ बसला. पुत्राच्या भाषणानें हिरण्यकशिपूचें अंतःकरण अधिकच खवळलें; त्यानें तात्काळ त्याला आपल्या मांडीवरून खालीं ढकलून दिलें; आणि तो दैत्यांना म्हणाला, "राक्षसहो, मी तुम्हांला ह्या

प्रऱ्हादाचा वध करण्याची आज्ञा

करितों! ह्या कार्ट्याला आतांच्या आतां या जगांतून पार नाहींसा करा. ज्या अधमानें माझा प्रिय बंधु मारिला, त्या विष्णूच्या चरणांची हा सेवकाप्रमाणें पूजा करितो, त्या अर्थी हा माझा पुत्र नव्हे, शत्रु होय. अहो. ज्यानें केवळ पांचवे वर्षीं प्रत्यक्ष आपल्या आईबापांविषयीं प्रेम सोडिलें, असा हा दुष्ट अविश्वासू कार्टा त्या विष्णूचें तरी काय हित करणार आहे कोण जाणे! राक्षसहो, एखादा परकी सुद्धां जर आपलें हित करीत असेल, तर त्याला पुत्र समजलें पाहिजे; आणि आपला पुत्र असतांही तो जर आपला नाश करण्यास प्रवृत्त होईल, तर तो शत्रुच समजला पाहिजे! याकरितां भोजन, शयन, आसन इत्यादिकांमध्यें वाटेल तो उपाय योजा; पण या दुष्ट कुळांगाराचा वध करा! एखादा अवयव सडूं लागल्यास तो कापून टाकल्याशिवाय बाकीचें शरीर नीट राहणार नाहीं, हें लक्षांत धरा!"

नारद म्हणालेः—धर्मा, दैत्यराजाची ही आज्ञा श्रवण करितांच त्या दुष्ट दैत्यांनीं एकदम 'मारा, तोडा' असें म्हणत तेथें बसलेल्या प्रऱ्हादाच्या मर्मस्थानीं शूळाचे प्रहार केले; परंतु शस्त्रादिकांचा नियंता जो परमेश्वर त्याच्या ठिकाणीं ज्यानें आपलें मन लाविलें होतें, अशा त्या प्रऱ्हादावर दैत्यांनीं केलेले ते शस्त्रप्रहार, दैवहीन पुरुषाचे उद्योग निष्फळ होतात त्याप्रमाणें निष्फळ झाले! धर्मराजा, तो चमत्कार पाहून हिरण्यकशिपूच्या मनांत भय उत्पन्न झालें, आणि त्यानें

प्रऱ्हादाच्या वधाचे भयंकर उपाय

चालविले. त्यानें त्याला मस्त हत्तींकडून तुडविलें; मोठमोठ्या सर्पांकडून चावविलें; भयंकर कड्यांवरून ढकलून देवविलें; खाड्यांत पुरून ठेविलें; विष प्यावयास दिलें; उपास घातले; थंडी, वारा,

अग्नि, जल ह्यांच्या कक्षांत बसविलें; पर्वताच्या कड्यांखालीं चिरडिलें; आणि ऐंद्रजाल प्रयोग केले; तरी तो निष्पाप भगवद्भक्त प्रल्हाद बाळ मरण पावला नाहीं! असें पाहून दैत्यराज फार घाबरला; आणि त्याला अतिशय चिंता पडली. तो म्हणाला, "मीं इतके उपाय केले, तरी हा मरण पावला नाहीं, उलट जास्तच तेजःपुंज दिसत आहे; तेव्हां मीं केलेले अपकार शुनःशेपा-प्रमाणें न विसरतां हा माझाच नाश करील!"

धर्मराजा, अशा प्रकारें तो दैत्यराज अत्यंत चिंताग्रस्त होऊन बसला असतां, शुक्रपुत्र शंडामर्क त्याला म्हणाले, "दैत्यराज, आपण एकट्यानें हें समस्त त्रैलोक्य जिंकिलें! आपली भुवई किंचित् वाकडी होतांच समस्त लोकपाळ भयभीत होतात! तेव्हां ह्या पोराच्या आचरणापासून तें काय होणार! आपण इतकें चिंताग्रस्त व्हावें, असें ह्यांत कांहीं सुद्धां कारण दिसत नाहीं. सध्या शुक्राचार्य परत येत तोंपर्यंत ह्याला वरुणपाशानें बांधून ठेवावें. पुरुषांची बुद्धि महत्सेवेनें आणि वयोनुसार दिवसानुदिवस चांगली होत जाते!"

राजा धर्मा, हिरण्यकशिपूला ती युक्ति मानवली, व त्यानें प्रल्हादास राजधर्म व गृहस्थधर्म शिकविण्याकरितां पुनः गुरुपुत्रांच्या स्वाधीन केलें. नंतर त्यांनीं प्रल्हादाला धर्म, अर्थ व काम यांचा उपदेश सुरू केला; पण प्रल्हादाला तें शिक्षण मुळींच रुचेना! कारण, रागद्वेषादि विषयांत गुरफटून गेलेल्या गुरूंच्या उपदेशाचा ठसा आत्मस्वरूप बनलेल्या निःसीम भगवद्भक्तावर कितीसा उमटणार? असो. पुढें एके समयीं, गुरु गृहस्थाश्रमसंबंधीं कांहीं कामांत गुंतल असतां प्रल्हादाच्या सहाध्यायांस खेळावयाची संधि अनायासेंच मिळाली. तेव्हां ते प्रल्हादासही आपल्याबरोबर खेळावयास बोलावूं लागले. ह्या प्रसंगीं, त्यांच्या जन्ममरणाची परिस्थिति आणि तिचा त्या मुलांवर होणारा परिणाम लक्षांत घेऊन प्रल्हादास त्यांची फार दया आली; आणि त्यानें स्मितहास्ययुक्त मधुर वाणीनें त्यांस जवळ बोलावून उपदेश करण्यास प्रारंभ केला! राजेंद्रा, रागद्वेषादि विकारांचा पगडा त्या बालकांच्या मनावर अजून बसला नव्हता; ह्यास्तव त्या सर्व मुलांच्या मनांत प्रल्हादाविषयीं आदर असून ते त्यास फार मान देत असत; म्हणून त्यांनीं आपला खेळ सोडून देऊन ते सर्व प्रल्हादासभोंवतीं जमले, आणि ह्या महाभगवद्भक्ताचा उपदेश निश्चलपणें ऐकूं लागले!

१ स्कंध ९ अध्याय ७ 'हरिश्चंद्राची कथा' आणि स्कं. ९ अ. १६ 'शुनःशेपाचें वृत्त' पहा.

## अध्याय सहावा.

—:०:—

### प्रल्हादाचा आपल्या सोबत्यांस तत्त्वोपदेश.

प्रल्हाद म्हणालाः—मित्रहो, समंजस मनुष्यानें, हा मोक्षप्रद मनुष्यजन्म दुर्लभ आणि अशाश्वत आहे, असें पूर्ण ओळखून बालपणांतच भागवतधर्म आचरावे. इहलोकीं भगवंताला शरण जाणें हेंच मनुष्याचें मुख्य कर्तव्य होय; कारण तो भगवान सर्वांतर्यामीं वास करणारा असून सर्वांचें कल्याण करणारा आहे. मुलांनो, पूर्वकर्माच्या योगानें जसें प्रयत्न केल्याशिवाय मनुष्यास दुःख प्राप्त होतें, तसें सुखही प्राप्त होतें; म्हणून प्राण्यानें सुख प्राप्त होण्यासाठीं श्रम करूं नयेत; त्या योगें आयुष्याचा मात्र व्यर्थ क्षय होतो, आणि ईशपदाची प्राप्ति होत नाहीं. ह्यास्तव, विचारवंत संसारी पुरुषानें, अंगांत जोम आहे तोंपर्यंतच कल्याणप्राप्तीचा यत्न करावा. अहो, मनुष्याचें आयुष्य अवघें शंभर वर्षें; त्यांपैकीं अर्धें म्हणजे पन्नास वर्षें तर निद्रेंतच जातात! बाल्यावस्था व कौमारावस्था मिळून वीस वर्षें

खर्ची पडतात; वृद्धपणीं म्हणजे ऐशीं वर्षानंतर शरीर अशक्त झालें असतां वीस वर्षे उरतात; आणि बाकी राहिलेलें अत्यल्प आयुष्य म्हणजे दहा वर्षे तरुणपणांत नानाप्रकारचीं संकटें सोसून विषयोपभोग भोगण्यांत व सुखप्राप्तीचे यत्न करण्यांत तेव्हांच संपतात! ह्यास्तव, ज्याच्या हातून इंद्रियदमन मुळींच झालें नाहीं, असा कोणता पुरुष गृहासक्त आणि स्नेहपाशबद्ध अशा मनाला संसारापासून सोडविण्यास समर्थ होईल बरें? चोर, सेवक, वाणी वगैरे लोक प्राणाचीही पर्वा न करितां द्रव्यसंचय करितात! असें प्राणापेक्षांही प्रिय जें द्रव्य, त्या द्रव्याची आशा कोण सोडील? मधुरभाषणी जी प्रियपत्नी, तिच्या समागमसुखाचें स्मरण होतांच तिचा त्याग कसा करवेल? स्नेहपाशानें बद्ध झालेल्या मित्रांचा, पुत्रप्रेमामुळें बद्ध झालेल्या आपल्या कोमल बालकांचा, व आप्तप्रेमामुळें बद्ध झालेले भाऊ, बहिणी, आईबाप इत्यादिकांचा मोह त्याच्यानें कसा दूर करवेल बरें? सुंदर आणि उपभोग्य वस्तूंनीं भरलेलीं घरें, तसेंच आपलीं शेतें, पशु, सेवकजन इत्यादिकांवर आसक्त झालेलें मन त्यास कसें आवरतां येणार? कोळी जसा स्वतः केलेल्या तंतूंच्या घरांतच गुरफटून मरतो, तसा हा प्राणी आपल्या कर्मांतच गुरफटून मरतो. इंद्रियतृप्ति हेंच काय तें खरें सुख होय असें त्याला वाटतें. अशा पुरुषाचा मोह दूर होऊन त्यास वैराग्य कसें प्राप्त होणार? त्या विषयांध पुरुषाला, या संसारांतील कर्मांचें आचरण करितां करितां, आपलें आयुष्य क्षीण होत असून आपल्या पुरुषार्थाचा नाश होत आहे, याचें भान देखील नसतें! तो आपल्या कुटुंबांत इतका रममाण झालेला असतो कीं, तापत्रयानें त्याला अगदीं गांजिलें तरी त्यास वैराग्य उत्पन्न होत नाहीं. दुसऱ्याचें द्रव्य हरण केलें तर इहपरलोकीं शासन भोगावें लागत असूनही, तो पुरुष जितेंद्रिय नसल्यामुळें कुटुंबपोषणाकरितां परद्रव्याचें हरण करण्यास मागेंपुढें पहात नाहीं. मित्रहो, याप्रमाणें, ज्ञानवान पुरुष देखील संसारांत पडला तर त्यास आत्मविचाराचा विसर पडतो; व तेथें 'माझें' आणि 'दुसऱ्याचें' हा अभिमान उत्पन्न झाल्यामुळें, अज्ञान्याप्रमाणें अंध नरकास जातो! गड्यांनो, बालपणींच भक्ति करूं लागावें असें मी म्हणतों, याचें कारण हेंच कीं, स्त्रियांच्या नेत्रकटाक्षांत पुष्पबाण काम वास करीत असतो. म्हणून एकदा का पुरुष स्त्रीलंपट होऊन पुत्ररूप शृंखलेनें बद्ध झाला, कीं मग त्याला कधींही आत्म्याची मुक्तता करून घेण्याचें सामर्थ्य रहात नाहीं, असें नेहमीं आपल्यास आढळतें. ह्यास्तव, मुलांनो, तुम्ही ह्या विषयलंपट दैत्यांचा सहवास सोडून द्या; आणि सर्वसंगपरित्याग करणारे साधु लोक ज्याला मोक्ष म्हणून म्हणतात, त्या आदिनारायणाला शरण जा. गड्यांनो, त्या परमेश्वराला संतुष्ट करण्याला तुम्हांला मुळींच आयास पडणार नाहींत. कारण, तो सर्वांतर्यामी असल्यामुळें, येथेंही आहेच. स्थावरजंगमादि वस्तूंमध्यें, यच्चयावत् जीवांमध्यें, निर्जिव घटादिकांमध्यें, आकाशादि महाभूतांमध्यें, सत्त्वादि गुणांमध्यें, गुणसाम्यामध्यें, व महत्तत्त्वामध्यें निर्विकार परब्रह्मरूप ईश्वर भरलेला आहे. द्रष्टा व भोक्ता असा जीव अंतर्यामीं वास करितो, हें परमेश्वराचें व्यापक व अनिर्देश्य रूप होय; आणि दृश्य व भोग्य असें शरीर, हें व्याप्त व निर्देश्य रूप होय. तो परमेश्वर स्वतः भेदरहित असूनही हें निराळें स्वरूप घेतो, म्हणून तो व्याप्य, व्यापक व निर्देश्य असा भासतो. परमेश्वराचें खरें स्वरूप म्हटल म्हणजे शुद्धानुभवात्मक ब्रह्मानंद होय. गुणात्मक सृष्टि उत्पन्न करणारी जी माया, तिच्या योगानें त्याचें स्वरूप आच्छादित असल्यामुळें तो अशा भिन्न प्रकारचा वाटतो म्हणून,

मुलांनो, तुम्ही ह्या दैत्यांचा सहवास सोडून देऊन जीवमात्राचे ठायीं प्रेम ठेवा. भूतदयेनें त्या आदिनारायण परमेश्वरास फार संतोष होतो. तो भगवान परमेश्वर प्रसन्न झाला असतां काय मिळणार नाहीं ? गुणपरिणामामुळें अनायासें प्राप्त होणारे जे धर्म, अर्थ व काम, ते आपणांस काय उपयोगी ? आणि हरिगुणवर्णन करून जर सत्यसुखाचा उपभोग घ्यावयास सांपडतो, तर तो मोक्ष तरी हवा कशाला ? वेदांनीं उपदेशिलेल्या धर्म, अर्थ, काम, आत्मविद्या, तर्कशास्त्र, दंडनीति वगैरे गोष्टी जर परमेश्वरास आपल्या आत्म्याचें अर्पण करण्यास सहायभूत होतील, तरच त्या चांगल्या आणि सत्य आहेत असें मी समजेन. हें शुद्ध आणि दुर्लभ ज्ञान, नराचा सखा जो नारायण, त्यानें नारदास उपदेशिलें. भगवंताची अचल भक्ति करून त्याच्या चरणरजानें ज्यांचे देह पवित्र झाले आहेत, अशांनाच हें प्राप्त होतें. मुलांनो, ज्यांचें दर्शन होणें म्हणजे महद्भाग्य, अशा त्या देवर्षि नारदांच्या मुखानें, ज्यांत भगवद्भक्तांच्या शुद्ध धर्माचा अंतर्भाव झालेला आहे, असें हें ज्ञान मीं श्रवण केलें.

दैत्यबालक म्हणाले:—प्रऱ्हादा, अगदीं बाळपणापासून आपण सर्व या दोघां गुरूंजवळ अध्ययन करीत आहों; असें असतां तूं हें ज्ञान नारदांपासून कोठें शिकलास ? आणि नारद तुला कधीं भेटले होते ? बा सौम्या, तो सर्व वृत्तांत यथावत् सांगून आमचा संशय दूर कर.

# अध्याय सातवा.

—:०:—

## प्रऱ्हादास नारदोपदेश झाला तो वृत्तांत.

नारद म्हणाले:—धर्मा, अशा प्रकारें त्या दैत्यपुत्रांनीं साशंक होऊन कौतुकानें प्रऱ्हादास प्रश्न केला, तेव्हां त्या महाभगवद्भक्ताला माझें वचन स्मरत होतेंच. ह्यास्तव त्यानें तें इत्थंभूत वृत्त त्या दैत्यपुत्रांस सांगितलें.

प्रऱ्हाद म्हणाला:—मित्रहो, माझे वडील मंदराचलावर तपश्चर्येस गेले, त्या समयीं इंद्रादि देवांस फार संतोष झाला; आणि ते म्हणाले, "ही फार आनंदाची गोष्ट झाली. ह्या दुष्टानें लोकांना छळिलें, पण मुंग्या जशा सर्पाला खाऊन टाकतात, तसें ह्या पाप्याला ह्याच्या पापानेंच खाऊन टाकिलें!" मित्रांनो, असें म्हणून देवांनीं दैत्यांबरोबर युद्ध आरंभिलें. तेव्हां दैत्य फार घाबरले, आणि ते बायकामुलें, इष्टमित्र, घरदार इत्यादिकांची आशा सोडून स्वप्राणसंरक्षणार्थ दशदिशा पळत सुटले ! त्या वेळीं देवांनीं दैत्यराजाचा महाल वगैरे सर्व लुटिला. इंद्र तर माझी माता पट्टराणी कयाधु हिलाच घेऊन चालला ! तेव्हां ती अत्यंत भयभीत होऊन आक्रोश करूं लागली; तों अकस्मात् नारद मुनि त्या ठिकाणीं प्राप्त झाले आणि इंद्राला म्हणाले, "देवेंद्रा, ह्या निरपराधी स्त्रीला घेऊन जाणें अनुचित होय. ह्यास्तव ह्या पतिव्रतेला तूं सोडून दे." तेव्हां इंद्र म्हणाला, "देवर्षे, देवशत्रु जो हिरण्यकशिपु, त्याचें दुःसह तेज ( गर्भ ) हिच्या उदरीं आहे; म्हणून प्रसूतिकालपर्यंत हिनें मजकडे रहावें. त्या जन्म पावणाऱ्या पुत्राचा वध केल्यावर मी हिला सोडून देईन !"

प्रऱ्हाद पुढें सांगतो:—गडेहो, इंद्राचें हें भाषण ऐकून नारद म्हणाले, "हे इंद्रा, हिच्या उदरीं असणारा गर्भ परमेश्वराचा मोठा भक्त असल्यामुळें पापरहित व महासामर्थ्यवान आहे, म्हणून त्याचा वध होणें अशक्य आहे." मित्रहो, हें ऐकतांच इंद्रानें माझ्या आईला सोडून दिलें; व भगवद्भक्त जो मी, त्या माझ्या प्रेमामुळें तिला प्रदक्षिणा करून तो स्वर्गलोकीं निघून गेला. नंतर नारदांनीं माझ्या मातेला आपल्या आश्रमास नेलें, आणि 'पति परत येईपर्यंत तूं खुशाल येथें

रहा ' असें आश्वासन दिलें. तेव्हां 'बरें आहे' असें म्हणून, माझे वडील परत येत तोंपर्यंत माझी माता निर्भय अंतःकरणानें नारदांच्या आश्रमांत राहिली. त्या पतिव्रतेनें, गरोदरस्थितींत आपल्या गर्भाचें योग्य संरक्षण व्हावें व पति परत येतांच आपणास वाटेल तेव्हां प्रसूत होतां यावें म्हणून, त्या देवर्षींची एकनिष्ठपणें सेवा चालविली. त्या वेळीं त्या कृपावंत नारद मुनींनीं माझ्या हिताकरितां तिला धर्माच्या भक्तिरूपाचा आणि आत्मानात्मविवेकाचा उपदेश केला. त्या गोष्टीला पुष्कळ दिवस लोटल्यामुळें स्त्रीस्वभावानुसार माझी माता तें सर्व ज्ञान विसरून गेली; पण मजवर मुनींचा पूर्ण अनुग्रह असल्यामुळें माझी स्मृति अद्याप जागृत आहे. मुलांनो, तुम्ही जर माझ्या वचनावर विश्वास ठेवाल, तर तुमची बुद्धि देखील मजप्रमाणेंच होइल. इतरांनीही नारदांच्या या उपदेशावर विश्वास ठेविल्यास, त्यांना सुद्धां भगवंताची भक्ति उत्पन्न होईल. मित्रहो, नारदांनीं जो

## आत्मानात्मविचार

मला सांगितला,तो तुम्हांस सांगतों: वृक्ष अस्तित्वांत असे तोंपर्यंत त्याच्या फलांनाच उत्पत्ति, स्थिति, वाढ, परिणाम, संकोच आणि नाश हे सहा विकार होतात; परंतु त्या वृक्षावर त्यांचा कांहींच परिणाम होत नाहीं; त्याप्रमाणेंच, हे सर्व विकार देहाला मात्र होतात, आत्म्यावर मुळींच त्यांचा परिणाम होत नाहीं; आत्मा हा सदासर्वकाळ निर्विकारच असतो. आत्मा नित्य, निर्विकार, निर्मळ, अद्वितीय, देहसाक्षी, देहाधार, क्रियाशून्य, स्वयंप्रकाश, सर्वोत्पादक, सर्वव्यापी, अलिप्त आणि अवेष्टित असा आहे. ह्या विवेकोत्पादक बारा श्रेष्ठ लक्षणांवरून, पुरुषानें, देहाहून आत्मा भिन्न आहे असें ओळखून, मोहामुळें उत्पन्न होणारा देहावरील सर्व दुरभिमान सोडून द्यावा. मर्मज्ञ मनुष्य मातींत सोनें आहे असें ओळखितो; आणि नंतर भट्टी वगैरे लाविल्यानें त्याला सुवर्णाची प्राप्ति होते; त्याप्रमाणेंच, अध्यात्मज्ञानी मनुष्याला देहरूप क्षेत्रांत आत्मप्रतीति होते, व त्याला आत्मप्राप्तीच्या उपायांनीं आत्मलाभ म्हणजे मोक्ष प्राप्त होतो. प्रकृति, महत्तत्त्व, अहंकार, शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ह्या आठ प्रकृति; सत्त्व, रज, तम हे प्रकृतीचे तीन गुण; कर्ण, त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिका, पायु, उपस्थ, हस्त, पाद, वाणी व मन हीं अकरा इंद्रियें आणि पृथिव्यादिक पंचमहाभूतें मिळून षोडशविकार आहेत; व ह्या सर्वांचे ठायीं व्यापून राहणारा आत्मा एक आहे, असें महान महान प्राचीन आचार्यांनीं म्हटलें आहे. देह हा प्रकृत्यादि गुणांचा समुदाय असून त्यांत स्थावर व जंगम असे दोन भेद आहेत. यांतच वेदांनीं 'नेति, नेति' म्हणून वर्णिलेला आत्मा वास करितो; ह्यास्तव त्या

## आत्म्याचा अन्वय व व्यतिरेक

यांच्या योगानें शोध करावा. जसें मण्यांच्या माळेंत गोंविलेलें सूत एकच असून तें सर्व मण्यांना व्यापून असतें, तसाच आत्मा एकच असून सर्वांना व्यापून असतो हा आत्म्याचा अन्वय; आणि सूत जसें मण्यांत असूनही त्यांपासून भिन्न असतें, तसा आत्मा हा सर्व पदार्थांत असूनही त्याहून निराळा आहे, हा व्यतिरेक. ह्या अन्वयव्यतिरेकांचा विचार केल्यानें मन शुद्ध होतें. अशा प्रकारें मन शुद्ध झालें म्हणजे, ज्यापासून उत्पत्ति, स्थिति आणि लय होतात व जो त्या कार्यापासून अलिप्त असतो, त्या आत्म्याचा एकाग्रपणें शोध करावा.

## आत्म्याचें स्वरूप

दैत्यपुत्रहो, बुद्धीच्या तीन वृत्ति आहेत. त्या जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या होत. ह्या तीनही अवस्था आहेत असें ज्याच्यामुळें कळतें, तोच सर्वसाक्षी आत्मा होय. फुलांवरून वहात आलेला वारा जरी गंधवान असला, तरी तो ज्याप्रमाणें

फूल नव्हे, त्याचप्रमाणे जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति ह्या तीन वृत्ति जरी आत्म्याच्या योगानें उपलब्ध झाल्या, तरी तो आत्मा ह्या तीन वृत्ति नव्हे; तो त्या सर्वांहून अगदीं निराळा आहे. बुद्धि ही संसाराला मूळ कारण आहे. वस्तुतः अज्ञानमूलक आणि मिथ्या असणारा हा संसार गुणकर्मांच्या योगानें पुरुषाला स्वप्नाप्रमाणें भोगावा लागत आहे. म्हणून, मुलांनो, तुम्ही हें अज्ञान जाळून टाकणारें ज्ञान संपादन करा. त्याच्या योगानें बुद्धीचे जागृत्यादि प्रवाह बंद होतील. अहो, ज्ञान प्राप्त करून घेण्याचे हजारों उपाय आहेत; परंतु

नारदकथित ज्ञानप्राप्तीचा उपाय

हाच कीं, ज्याच्या योगानें षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वरावर अचल भक्ति जडेल, त्याच धर्माचें आचरण करावें; गुरूची सेवा आणि ईश्वराची व साधूंची भक्ति करावी; अनुकूल असलेल्या सर्व वस्तु त्यांस अर्पाव्या; त्यांजवर प्रेम ठेवावें; त्यांची मनोभावानें पूजा करावी; त्यांच्या चरणांचें ध्यान करावें; त्यांचीं चरित्रें गावीं; व सर्वभूतीं भगवान सर्वत्र भरलेला आहे, अशी दृढ बुद्धि ठेवून सर्वांना उत्तम प्रकारचा मान द्यावा; व सर्वांचे मनोरथ पुरवावे. जे लोक कामक्रोधादि षड्रिपूंना जिंकून इंद्रियांचें दमन करितात, आणि परमेश्वराची निष्काम सेवा आचरितात, त्यांची ईश्वरावर दृढ भक्ति जडते; अशा प्रकारें ज्याची परमेश्वरावर दृढ भक्ति जडली, तो पुरुष परमेश्वराचीं चरित्रें मोठ्या प्रेमानें गातो; त्या वेळीं त्याला आपल्या देहाचें सुद्धां भान रहात नाहीं; आणि त्या

निस्सीम भक्ताची वृत्ति

तल्लीन होऊन तो नाचूं लागतो; त्याच्या अंगावर रोमांच उभे राहतात; त्याचा कंठ आनंदानें सद्गदित होतो; त्याचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून येतात; आणि मनांत ईश्वराच्या ज्या ज्या लीला येतील, त्या त्या तो तशाच करूं लागतो; व यामुळें तो जगाच्या दृष्टीनें अगदीं वेड्यासारखा भासतो. कारण तो कधीं हसतो, कधीं रडतो, कधीं ओरडत सुटतो, कधीं टाळ्या वाजवितो, आणि कधीं नाचूं लागतो. त्याला ईश्वरावांचून दुसरें कांहींच दिसत नाहीं; मग जग आपल्याबद्दल हसतें आहे का रडतें आहे हें त्याला कशानें समजणार ? अशी वृत्ति झालेल्या पुरुषाचीं सर्व बंधनें तुटून जातात; संसाराचें मुख्य बीज जें त्याचें अज्ञान, तें दग्ध होतें; आणि शेवटीं तो आत्मस्वरूपीं मिळून त्याचें जन्ममरणाचें चक्र तुटतें व तो अत्यंत सुखरूपीं स्वस्थ राहतो !

प्रल्हाद सांगतोः—म्हणूनच, बालकांनो ! तुम्ही आपल्या हृदयांत राहणाऱ्या आत्म्याचें चिंतन करा. त्याची उपासना करणें फारच सोपें आहे. कारण, त्याच्या पूजेकरितां व त्याला वश करून घेण्याकरितां अनेक साधनें जुळविण्याची गरज नाहीं. फक्त अंतःकरण त्याला वाहिलें म्हणजे सर्व जगांतील वस्तु त्याला अर्पण केल्यासारख्या आहेत. द्रव्य, दारा, पुत्र, ऐश्वर्य आणि शरीर हें सर्व नाशिवंत होय. मनुष्याच्या क्षणभंगुर आयुष्यांत त्याचा उपभोग तो त्याला कितीसा मिळणार ! बरें, यज्ञयागादि कर्मे करून स्वर्ग प्राप्त करून घ्यावा, तर तोही नश्वर ! मग त्यापेक्षां आत्मप्राप्तीचेंच साधन एकदम केलें तर काय वाईट ? शिवाय दुसरें असें आहे कीं, या लोकीं सुख प्राप्त व्हावें म्हणून जीं जीं कर्मे करावीं, त्यांचें फळ हटकून विपरीत मिळतें ! आणि हेंही उघडच आहे कीं, कशाचीही इच्छा न करणारा पुरुष जर सुख पावतो, तर कशाची तरी इच्छा करणारा पुरुष दुःखच पावणार ! बरें, कदाचित् सुख प्राप्त झालें, तर तें भोगणारा जो देह, तो तरी शाश्वत आहे का ? मुळीच नाहीं. मग अशाश्वताकरितां अशाश्वताचा संग्रह करण्यांत अर्थ तरी काय ? प्रत्यक्ष पुरुष ज्याला आपला देह असें मानितो, त्याची ही स्थिति ! मग स्त्रिया, घर, पुत्र, ऐश्वर्य

यांची तर गोष्टच बोलावयास नको! यांची उलटापालट तर आपल्या एका जन्मांतच कितीदा होते! दैत्यपुत्रहो, तुम्ही विचार करा कीं, या संसारांत प्राण्याचा स्वार्थ तो काय आहे? गर्भवासापासून तों देहांतापर्यंत त्याला यत्किंचित् तरी सुख मिळतें का? पूर्वकर्माच्या योगानें हा प्राणी देह पावतो, आणि मनाच्या इच्छेप्रमाणें वागून फिरून तो देहद्वारा कर्मेंच करितो. यामुळें, जन्मास यावें आणि मरावें या घोंटाळ्यांतून तो कधींच बाहेर निघत नाहीं! म्हणून, या कर्माचाच नाश करणारें असें जें ईश्वराचें निष्काम भजन, तें तुम्ही करा म्हणजे तुमचें कल्याण होईल. मग तुम्ही दैत्य असा, देव असा, यक्ष असा, गंधर्व असा, किंवा कोणीही असा. ईश्वरापाशीं कसलाही भेदभाव नाहीं. तो निष्कामभक्ति करणाराला सर्व दुःखांपासून मुक्त करितो. दैत्यहो! आजपर्यंत यक्ष, राक्षस, स्त्रिया, शूद्र, गवळी, पशु पक्षी इत्यादि थोडे का या भक्तीच्या योगानें तरले आहेत? बाबांनो! ह्या लोकीं प्राण्याचा खरा स्वार्थ म्हटला म्हणजे इतकाच आहे कीं, सर्वाभूतीं ईश्वर आहे असें मानावें, आणि त्या जगन्नियंत्याची निःसीम भक्ति करावी!

## अध्याय आठवा.

—:०:—

### नृसिंहावतार.

#### प्रल्हादावर हिरण्यकशिपूचा कोप.

नारद म्हणाले:—धर्मराजा, या उपदेशाचा असा परिणाम झाला कीं, सर्व दैत्यबालकें गुरूनें शिकविलेले पाठ न शिकतां निर्मळ भक्तिमार्गाचेंच आचरण करूं लागलीं. त्यांचें असें आचरण पाहून गुरुपुत्रांना भय वाटलें, आणि त्यांनीं तें सर्व वर्तमान दैत्यराजाच्या कानांवर घातलें. मुलाच्या ह्या अशा विरुद्ध वर्तनाचा हिरण्यकशिपूस अत्यंत क्रोध आला; आणि त्यानें त्या नम्र, सुस्वभावी व इंद्रियनिग्रही प्रल्हादाला ठार मारण्याच्या इच्छेनें आपणासमोर आणविलें. नंतर, पायानें ताडन केलेल्या सर्पाप्रमाणें क्षुब्ध होऊन त्या उग्र हिरण्यकशिपूनें मोठ्या क्रोधानें व वक्र दृष्टीनें प्रल्हादाकडे अवलोकन केलें, आणि म्हटलें, "उद्धटा, मंदमते, चांडाळा, कुळघातका, माझें न ऐकतां तूं आपलाच हेका चालवितोस काय? थांब. तुला आतां यमसदनाचा मार्ग दाखवितों कारटया, ज्याच्या भयानें त्रैलोक्य थरथर कापतें, त्या माझी आज्ञा जी तूं उल्लंघन करतोस, ती कोणाच्या जोरावर रे? तुला कोणाचा रे आश्रय आहे?"

#### प्रल्हादाचें मार्मिक उत्तर.

प्रल्हाद म्हणाला:—राजा, ज्याच्या आश्रयानें हें सर्व स्थावरजंगमात्मक जग चालतें, त्याच भगवंताचा मला आश्रय आहे. तो केवळ माझाच आश्रय आहे असें नाहीं; तर इतर सर्व बलिष्ठ प्राण्यांचा, ब्रह्मादिक देवांचा, आणि तुझा सुद्धां तोच आश्रय आहे. शरीरबळ, धैर्य, शौर्य, उत्साह हीं सर्व त्याचींच उग्ररूपें होत. तोच गुणत्रयाचा नियंता परमेश्वर आपल्या सामर्थ्यानें जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं करितो. तूं हा सर्व दैत्यभाव सोडून दे व मनाची सर्वत्र सारखी बुद्धि ठेव. कुमार्गगामी मन हेंच प्रबळ शत्रु होय. तें समबुद्धीनें राखणें हीच दृढ उपासना समजावी. प्रथम षड्रिपूंना न जिंकितां 'आम्ही त्रैलोक्य जिंकिलें!' म्हणून जे लोक कोरडी फुशारकी मारतात, ते मूर्ख होत. सर्वांभूतीं समदृष्टि ठेवणाऱ्या ज्ञानी सत्पुरुषाला अज्ञानकल्पित शत्रु उद्भवणार कोठून? आणि मग जर शत्रुच नाहीं, तर त्याला जिंकावयाचें तरी काय?

हिरण्यकशिपु म्हणाला:—मूर्खा, तुझी जीभ फार चुरचुर करते आहे! तुझा अंतकाल समीप आला आहे असें वाटतें. कारण, ज्याचा मरण-

काल समीप आला असतो, ते ह्याप्रमाणें कांहीं तरी बरळतात. मूर्खा, मजहून दुसरा कोण रे जगन्नायक आहे ? तो सर्व ठिकाणीं आहे असें म्हणतोस, तर तो ह्या खांबांत रे कां नाहीं ?

प्रल्हाद म्हणाला:–हो, नाहीं कसा ? तो दिसतो आहे, पहा !

हिरण्यकशिपु म्हणाला:—कार्ट्या, काय रे बडबड चालविली आहेस ? थांब, आतां तुला ठारच करितों, आणि तुझा आवडता हरि तुझें कसें रक्षण करितो तें पहातों.

नारद म्हणाले:–धर्मराजा, असें म्हणून हिरण्यकशिपूनें एकदम खड्गानिशीं सिंहासनाखालीं उडी टाकिली, आणि, "कोठें रे तुझा रक्षणकर्ता हरि आहे ? ह्या खांबांत तो आहे काय ?" असें म्हणून त्या खांबावर जोरानें मुष्टिप्रहार केला ! राजा, त्या वेळीं त्या खांबांतून इतका भयंकर शब्द उठला कीं, त्याच्या योगानें ब्रह्मांडकटाह फुटून गेला कीं काय असा भास झाला ! आणि तो शब्द ऐकतांच ब्रह्मादि देवांना, आपले लोक कोसळून पडतात कीं काय अशी भीति पडली !

तो भयंकर शब्द श्रवण करितांच हिरण्यकशिपु चकित झाला, आणि तो इकडे तिकडे पाहूं लागला. त्या वेळीं सर्व दैत्यवीर घाबरून गेले. इतक्यांत, आपलें सर्व ठिकाणीं वास्तव्य आहे असें सिद्ध करून दाखविण्याकरितां, व आपल्या भक्तांचीं वचनें खरीं करून दाखविण्याकरितां, भगवान श्रीहरि

नृसिंहरूप

धारण करून त्या स्तंभाचे ठिकाणीं प्रकट झाले ! भगवंताचें तें अद्भुत व भयंकर रूप पाहून दैत्यराज फार विचारांत पडला कीं, हा धड मनुष्यही नव्हे, धड पशुही नव्हे; तेव्हां हें आहे तरी काय ? त्याच्या मनांत असे विचार चालले आहेत, तों भगवान त्याच्या जवळ आले. धर्मा, त्या वेळचें तें भगवंताचें रूप काय वर्णावें ? त्याच्या त्या उंच दाढा, तरवारीच्या पात्याप्रमाणें चंचल आणि वस्तऱ्याच्या धारेसारखी तिखट जिव्हा, व चढविलेल्या भ्रुकुटी यांच्या योगानें तें फारच भयंकर दिसत होतें. कान अगदीं ताठ होते; मुख आणि नाकपुडया पर्वताच्या गुहेप्रमाणें भयंकर होत्या; जबडा पसरल्यामुळें एकंदर स्वरूप जास्तच उग्र दिसत होतें; जणू काय आकाशालाच लागत आहे असें अति उंच शरीर, आखूड व पुष्ट मान, विशाल वक्षस्थळ, कृश उदर, व शतावधि हात यांच्या योगानें तें स्वरूप हिरण्यकशिपूला परमाश्चर्यकारक आणि भीतिप्रद वाटलें. धर्मराजा, नृसिंहरूप भगवंतानें आपल्या तीव्र नखांनीं व श्रेष्ठ आयुधानें सर्व दैत्यांस पळविलें; तेव्हां 'मायावी हरीनें ह्याकरवीं माझा वध करविण्याचें योजिलें असावें, परंतु यांच्यानें काय होणार आहे ?' असें मनांत म्हणून हिरण्यकशिपूनें गदा उचलली, आणि गर्जना करीत तो नृसिंहाच्या अंगावर धावून गेला. धर्मराजा, याप्रमाणें

हिरण्यकशिपूचें व नृसिंहाचें युद्ध

सुरू झालें. तो दैत्य भगवंतावर गदाप्रहार करण्यास धावला खरा; परंतु पतंग जसा विस्तवाच्या तेजांत लुप्त होतो, तसा भगवंताच्या तेजांत तो लुप्त झाला ! धर्मा, यांत आश्चर्य मुळींच नाहीं; कारण, प्रलयकालच्या अंधकाराचें जो आपल्या स्वयंप्रकाशाच्या योगानें निवारण करितो, त्या भगवंताच्या तेजापुढें दैत्याचा काय पाड ? असो; पुढें त्या दैत्यानें नृसिंहरूप भगवंताच्या शरिरावर पुष्कळ गदाप्रहार केले. तेव्हां गरुड ज्याप्रमाणें सर्पाला धरितो, त्याप्रमाणें नृसिंहानें त्या दैत्याला धरिलें; परंतु खेळतांना जसा सर्प गरुडाच्या हातून एखादे वेळीं निसटून जातो, तसा तो दैत्य नृसिंहाच्या हातून चटकन् निसटला. धर्मा, हें पाहून, मेघमंडलाच्या आड लपून असलेल्या लोकपालांना फार वाईट वाटलें; परंतु दैत्यराजाला

वाटलें कीं, हा नृसिंह आपल्या पराक्रमाला भ्याला. म्हणून त्यानें श्रमांकडे बिलकूल लक्ष न देतां ढाल तरवार घेऊन पुनः युद्धास आरंभ केला. तो इतक्या सफाईनें व चपलतेनें तरवार फिरवीत होता कीं, मध्यें हात शिरकवण्यास देखील जागा नव्हती; परंतु त्या नृसिंहरूप भगवंतानें इतक्या मोठ्यानें अट्टहास केला कीं, त्यामुळें त्या दैत्याची कानठाळीं बसून जाऊन त्याच्या डोळ्यांपुढें अंधारीच आली! धर्मा,

हिरण्यकशिपूचा वध

करण्याची वेळ जवळ आली असें जाणून भगवंतानें त्याला धरिलें, त्या वेळीं सर्पानें धरिलेल्या उंदराप्रमाणे दैत्याची स्थिति झाली. त्यानें आपल्याकडून सुटण्याविषयीं फार प्रयत्न केला, पण नृसिंहाच्या मिठीपुढें कांहीं उपाय चालेना. धर्मराजा, त्या दैत्याच्या त्वचेचा वज्रानें देखील भेद झाला नव्हता; अशा त्या दैत्याला नृसिंहानें सायंकाळीं, सभेच्या दारांत, उंबरठ्यामध्यें, मांडीवर आडवा वाढून, नखाग्रांनीं फाडून मारिलें! त्या भगवान नृसिंहाचे नेत्र मूळचेच अति भयंकर, आणि त्यांत कोप आलेला; मग काय विचारतां! त्याच्याकडे कोणाच्यानेंही पाहवेना. तो आपल्या तरवारीच्या पात्यासारख्या जिभेनें जबड्याच्या दोन्ही बाजू चाटीत होता. रक्ताच्या योगानें त्याचें तोंड आणि केश लालभडक झाले होते. मस्त हत्तीचा वध केल्यावर सिंह जसा शोभतो, तसा तो नृसिंह त्या दैत्याच्या आंतड्यांच्या माळांनीं शोभूं लागला. नंतर त्यानें विदारण केलेलें तें हिरण्यकशिपूचें शरीर मांडीवरून लोटून दिलें; आणि तेथें जे इतर दानव सशस्त्र उभे होते, त्यांचा शस्त्रादिकांच्या योगानें व नखांनीं वध करण्यास आरंभ केला. धर्मा, त्या वेळचें तें

नृसिंहाचें उग्ररूप

पाहण्याचें कोणासही धैर्य होईना. त्याच्या मानेवरील केसांच्या योगानें मेघ कंपायमान होऊन विखरून गेले; त्याच्या नेत्रांच्या प्रखर तेजापुढें ग्रहांचें तेज फिकें पडलें; त्याचा श्वासवेग त्या वेळीं इतका जबर होता कीं, त्या योगें समुद्र सुद्धां खवळले; आणि गर्जनेच्या योगानें भयभीत झालेले दिग्गज ओरडत पळत सुटले! त्याच्या मानेवरील केसांच्या योगानें वर उडालेल्या विमानांची आकाशांत गर्दी होऊन, त्यामुळें स्वर्ग डळमळूं लागला; त्याच्या पायांच्या आघातानें पृथ्वी कंपायमान झाली; आणि पर्वत कोसळून पडूं लागले! त्याप्रमाणेंच त्याच्या तेजानें आकाश आणि दशदिशा अगदीं निस्तेज दिसूं लागल्या! पुढें, आपल्या दासाच्या ऐश्वर्याचें कौतुक मानून श्रीनृसिंह त्या वेळीं सभेमध्यें असलेल्या राजसिंहासनावर आरूढ झाले. त्या समयीं त्यांची मुद्रा इतकी भयप्रद दिसत होती कीं, कोणाकाही त्यांच्यासमीप जाण्याचा हिय्या होईना; असो.

हिरण्यकशिपुवधामुळें सर्वांस हर्ष.

नारद पुढील वृत्तांत सांगतात:—धर्मराजा, सर्व त्रैलोक्याला दुःसह जो आदिदैत्य हिरण्यकशिपु, त्याचा श्रीहरीनें वध केला, असें ऐकतांच देवांगनांचीं अंतःकरणें अतिशय प्रफुल्लित झालीं, व नृसिंहावर त्या एकसारखी पुष्पवृष्टि करूं लागल्या. त्या वेळीं नृसिंहाचें दर्शन घेण्याकरितां आलेल्या देवांच्या विमानांनीं आकाश अगदीं भरून गेलें. देव आनंदसूचक वाद्यें वाजवूं लागले; अप्सरा नृत्य करूं लागल्या; आणि गंधर्वांनीं गायन आरंभिलें. धर्मा, तेथें ब्रह्मदेव, इंद्र, शिव आदिकरून सर्व देव, ऋषि, पितर, सिद्ध, विद्याधर, मोठमोठे सर्प, मनु, प्रजापति, गंधर्व, अप्सरा, चारण, यक्ष, किंपुरुष, वेताळ, किन्नर आणि सुनंद-कुमुदादि विष्णूचे पार्षदगण असे सर्व आले होते. त्यांनीं हस्तद्वय जोडून सिंहासनावर आरूढ झालेल्या नृसिंहाची स्तुति केली.

## ब्रह्मादिकांनीं श्रीनृसिंहाची केलेली स्तुति.

ब्रह्मदेव म्हणाला:—

नतोऽस्म्यनंताय दुरंतशक्तये विचित्रवीर्याय पवित्रकर्मणे ।
विश्वस्य सर्गस्थितिसंयमान्गुणैः स्वलीलया संदधतेऽव्ययात्मने ॥

'हे अनंता, तुझ्या प्रभावाचा पार नाहीं. तुझें सामर्थ्य विलक्षण आहे. तुझ्या लीला श्रवण करितांच श्रवण करणारा पवित्र होतो. तूं गुणसामर्थ्यानें स्वतांच्या लीलामात्रेंकरून या जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं करितोस; तथापि तुझ्या ठिकाणीं विकार म्हणून मुळींच संभवत नाहीं.'

श्रीरुद्र म्हणाला:—

कोपकालो युगांतस्ते हतोऽयमसुरोऽल्पकः ।
तत्सुतं पाह्युपसृतं भक्तं ते भक्तवत्सल ॥

'हे भक्तवत्सला, तूं हा असुर मारिलास; ह्यास्तव आतां क्रोध पुरे कर. कारण तुझ्या कोपाचा हा काल नव्हे. सहस्र युगांचा अंत होण्याचा समय जो प्रलयकाल, तोच तुझ्या क्रोधाचा काल होय. तेव्हां आतां क्रोध आवरून, हा तुझा महाभक्त प्रल्हाद तुजसमीप उभा आहे, याचें रक्षण कर.'

इंद्र म्हणाला:—

प्रत्यानीताः परम भवता त्रायता नः स्वभागा ।
दैत्याक्रांतं हृदयकमलं त्वद्गृहं प्रत्यबोधि ॥
कालग्रस्तं कियदिदमहो नाथ शुश्रूषतां ते ।
मुक्तिस्तेषां नहि बहुमता नारसिंहापरैः किम् ॥

'भगवंता, यज्ञांत आम्हांस हविर्भाग मिळतो. हा कांहीं आमचा मोठासा पुरुषार्थ नव्हे, पण तुझी सेवा करणें हाच आमचा खरा पुरुषार्थ होय. आमच्या अंतरीं तूंच वास करितोस; म्हणून, हे देवाधिदेवा, आमच्या हविर्भागांचा खरा खरा भोक्ता तूंच अहेस. या असुराला मारून तूं आपले हविर्भाग परत मिळविलेस, आणि तुझें स्थान जें आमचें हृदय, तें भीतिरहित केलेंस. या प्रकारें तूं आपलीं कार्यें साधून घेतलींस, म्हणून आतां कोप आवर. कदाचित् तूं म्हणशील कीं, तुझें ऐश्वर्य तुला मिळावें, म्हणून एवढा खटाटोप केला; परंतु, देवा नृसिंहा, तुझी भक्ति करणारे पुरुष ऐश्वर्याची पर्वा मुळींच करीत नाहींत; इतकेंच नव्हे, तर मोक्षाला देखील ते तुच्छ मानतात; मग बाकीच्या ऐश्वर्यांची काय कथा?"

ऋषि म्हणाले:—

त्वं नस्तपः परममात्थ यदात्मतेजो येनेदमादिपुरुषात्मगतं ससर्ज ।
तद्विप्रलुप्तममुनाऽद्य शरण्यपाल रक्षागृहीतवपुषा पुनरन्वमंस्थाः ॥

'हे आदिपुरुषा, हें तुझ्या स्वरूपीं लीन झालेलें विश्व तूं ज्या तपःसामर्थ्याच्या योगें उत्पन्न केलेंस, तें अद्वितीय तपःसामर्थ्य आम्हांस व्यक्त करून दाखविलेंस. त्या तुझ्या तपःप्रभावाच्या अनुरोधानें आम्ही तपाचरण करीत असतां मध्येंच ह्या असुरानें विघ्न केलें होतें. हे शरणागतपालका, त्या असुराचा तूं नाश करून फिरून आम्हांस तप करण्याची आज्ञा दिलीस. तुला नमस्कार असो.'

पितर म्हणाले:—

श्राद्धानि नोऽधिबुभुजे प्रसभं तनूजैर्दत्तानि तीर्थसमयेऽप्यपिबत्तिलांबु ।
तस्योदरान्नखविदीर्णवपाद्य आर्च्छत्तस्मै नमो नृहरयेऽखिलधर्मगोप्त्रे ॥

'हे नृसिंहा, आमचे पुत्र आम्हांस श्राद्धसमयीं पिंड वगैरे देत, व तीर्थयात्राप्रसंगी आमचें तर्पण वगैरे करीत, ते सर्व हा दैत्य बलात्कारानें घेई. आज आपण नखाग्रांनीं याचें उदर विदारण करून तें सर्व अन्नोदक बाहेर काढिलें, आणि श्राद्धादिकांचा उद्धार करून धर्म संरक्षिला; आपणास नमस्कार असो!'

सिद्ध म्हणाले:—

यो नो गतिं योगसिद्धामसाधुरहार्षीद्योगतपोबलेन ।
नानादर्पं तं नखैर्निर्ददार तस्मै तुभ्यं प्रणताः स्मो नृसिंह ॥

'हे नृसिंहा, ज्या दुष्टानें आमच्या सर्व योगसिद्धि योगतपोबलानें हरण केल्या होत्या, अशा ह्या अतिशय गर्विष्ठ दैत्याला तूं नखांनीं फाडून मारिलेंस; तुला आमचा नमस्कार असो.'

विद्याधर म्हणाले:—

विद्यां पृथग्धारणयाऽनुराद्धां न्यषेधदज्ञो बलवीर्यदृप्तः ।
स येन संख्ये पशुवद्धतस्तं मायानृसिंहं प्रणताः स्म नित्यम् ॥

'ह्या तत्त्वज्ञानशून्य आणि मदोन्मत्त दैत्यानें, आम्हीं धारणेच्या योगानें संपादन केलेल्या विद्या आम्हांपासून हिरावून घेतल्या होत्या. तूं मायेच्या योगानें नृसिंहरूप धारण करून या दैत्याला युद्धामध्यें पशूसारखें मारिलेंस; आम्ही तुला वंदन करितों.'

नाग म्हणाले:—

येन पापेन रत्नानि स्त्रीरत्नानि हृतानि नः ।
तद्वक्षःपाटनेनासां दत्तानंद नमोऽस्तु ते ॥

'हे ईश्वरा, आमच्या मस्तकावरील मणि आणि आमच्या सुस्वरूप ललना हरण करणाऱ्या ह्या दैत्याच्या तूं वध केलास आणि आम्हांस आनंद दिलास; तुला आमचा प्रणिपात असो.'

मनु म्हणाले:—

मनवो वयं तव निदेशकारिणो दितिजेन देव परिभूतसेतवः ।
भवता खलः स उपसंहृतः प्रभो करवाम ते किमनुशाधि किंकरान् ॥

'देवा, आम्ही तुझे आज्ञापालक आहों. आम्हीं घालून दिलेल्या धर्ममर्यादा ह्या दैत्यानें मोडल्या; त्याचा तूं वध केलास, हें फार उत्तम झालें. भगवंता, आतां तुझी आम्हां दासांस काय आज्ञा आहे?'

प्रजापति म्हणाले:—

प्रजेशा वयं ते परेशाभिसृष्टा न येन प्रजा वै सृजामो निषिद्धाः ।
स एष त्वया भिन्नवक्षा नु शेते जगन्मंगलं सत्त्वमूर्तेऽवतारः ॥

'भगवंता, तूं आम्हांस प्रजा उत्पन्न करण्यासाठीं निर्माण केलेंस, परंतु हिरण्यकशिपूच्या त्रासामुळें आम्ही अगदीं स्वस्थ बसलों होतों. हा दुष्ट आतां येथें मरून पडला आहे. हे सत्त्वरूपा, हा तुझा नृसिंहावतार सर्व जगाचें कल्याण करणारा आहे. तुजप्रत नमस्कार असो.'

गंधर्व म्हणाले:—

वयं विभो ते नटनाट्यगायका येनात्मसाद्वीर्यबलौजसा कृताः ।
स एष नीतो भवता दशामिमां किमुत्पथस्थः कुशलाय कल्पते ॥

'हे प्रभो, आम्ही नृत्यगायन करून तुझी सेवा करीत होतों. ह्या शक्तिमान आणि महाशूर दैत्यानें आम्हांस आपल्या अधीन करून ठेविलें होतें. त्याचा तूं अशा रीतीनें वध केलास हें योग्यच झालें. कुमार्गानें चालणाराचें कल्याण कधींच होणें नाहीं!'

चारण म्हणाले:—

हरे तवांघ्रिपंकजं भवापवर्गमाश्रिताः।
यदेश साधुहृच्छयस्त्वयाऽसुरः समापितः॥

'नृहरे, साधूंच्या हृदयांत भीति उत्पन्न करणाऱ्या या असुराचा तूं नाश केलास. संसारभयनिवर्तक अशा तुझ्याच चरणांचा आम्ही आश्रय करितों.'

यक्ष म्हणाले:—

वयमनुचरमुख्याः कर्मभिस्ते मनोज्ञैस्त इह दितिसुतेन प्रापिता वाहकत्वम्।
स तु जनपरितापं तत्कृतं जानता ते नरहर उपनीतः पंचतां पंचविंश॥

'देवा, तुझ्या सेवेच्या योगानेंच आमची उत्तमांत गणना होते. त्या तुझ्या दासांना ह्या हिरण्यकशिपूनें पालखी वहावयास लाविलें होतें. नृसिंहा, जगाला होत असलेलें दुःख तुला कळलें; आणि, हे चोवीस तत्त्वांच्या नियामका, तूं अवतार धारण करून त्याला पंचत्वास पाठविलेंस. तुजप्रत नमस्कार असो.'

किंपुरुष म्हणाले:—

वयं किंपुरुषास्त्वं तु महापुरुष ईश्वरः।
अयं कुपुरुषो नष्टो धिक्कृतः साधुभिर्यदा॥

'ईश्वरा, आम्ही किंपुरुष ( तुच्छ प्राणी ) व तूं महापुरुष ( श्रेष्ठ ) आहेस. तुझे भक्त जे साधुजन, त्यांनीं धिक्कार केला, तेव्हांच हा कुपुरुष नाशाप्रत पावला!'

वैतालिक म्हणाले:—

सभासु सत्रेषु तवामलं यशो गीत्वा सपर्यां महतीं लभामहे।
यस्तां व्यनैषीद्भृशमेष दुर्जनो दिष्ट्या हतस्ते भगवन्यथामयः॥

'देवा, आम्ही सभांमधून आणि यज्ञमंडपामधून तुझी निर्मळ कीर्ति गात असूं; त्या योगानें आम्हांस जो बहुमान मिळत असे, तो ह्या दैत्याच्या योगानें अगदींच बंद झाला होता. अशा ह्या रोगरूप दैत्याचा तूं वध केलास, हें फार उत्तम झालें!'

किन्नर म्हणाले:—

वयमीश किन्नरगणास्तवानुगा दितिजेन विष्टिममुनाऽनुकारिताः।
भवता हरे स वृजिनोऽवसादितो नरसिंह नाथ विभवाय नो भव॥

'ईश्वरा, आम्ही तुझे सेवक आहों. ह्या दुष्टानें आम्हांस वेठीला लाविलें होतें. नरसिंहा, तूं या दुष्टाचा संहार केलास, हें उत्तम झालें; आतां आमचा उत्कर्ष कर.'

विष्णूचे पार्षद म्हणाले:—

अद्यैतद्धरिनररूपमद्भुतं ते दृष्टं नः शरणद सर्वलोकशर्म।
सोऽयं ते विधिकर ईश विप्रशप्तस्तस्येदं निधनमनुग्रहाय विद्मः॥

'हे आश्रयदात्या भगवंता, सर्व जगाला आनंद देणारें असें हें तुझें नृसिंहरूप आज आमच्या दृष्टीस पडलें. जगदीशा, हा दैत्य म्हणजे ब्राह्मणांनीं शाप दिलेला तुझा पार्षदच. तूं याच्यावर अनुग्रह करण्याकरितांच याचा वध केलास, हें आम्हांस माहीत आहे!'

## अध्याय नववा.

—:०:—

### नृसिंहक्रोधसांत्वन.

नारद म्हणाले:—धर्मराजा, नृसिंहाचें रूप क्रोधभरानें अतिशय भयंकर दिसत होतें. ब्रह्मदेव, शंकर वगैरे देवांनीं त्याची स्तुति केली, तरी त्याचा क्रोध शांत न झाल्यामुळें कोणीही त्याच्या पुढें जाण्यास धजेना. तेव्हां नरसिंहाचें सांत्वन करण्याकरितां देवांनीं प्रत्यक्ष लक्ष्मीला आणविलें; परंतु तिनें असें अद्भुत आणि भयंकर रूप कधींही पाहिलें किंवा ऐकिलें नसल्यामुळें, तीही पुढें जाण्यास धजेना. शेवटीं ब्रह्मदेवानें जवळच उभा असलेल्या प्रऱ्हादास, "बाळा, पुढें हो आणि तुझ्या पित्यावर संतप्त झालेल्या प्रभूचें सांत्वन कर." असें सांगितलें. धर्मराजा, तेव्हां तो महाभगवद्भक्त प्रऱ्हाद 'बरें आहे' असें म्हणून हळू हळू पुढें गेला, आणि त्यानें भगवंताला साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां आपल्या चरण कमळीं लीन झालेल्या त्या मुलाला पाहून भगवान नरसिंहाला करुणा आली, आणि काळसर्पाच्या योगानें भयभीत झालेल्या लोकांचें रक्षण करणारा आपला अभयकर हस्त त्यानें प्रऱ्हादाच्या मस्तकीं ठेविला. त्या करस्पर्शाच्या योगानें प्रऱ्हादाचें वासनारूपी सर्व पाप निरसन झालें; आणि तत्क्षणींच त्याला साक्षात्कार होऊन, त्यानें भगवंताचें चरणकमळ हृदयामध्यें धारण केलें. त्या समयीं त्याच्या सर्वांगावर थरारून रोमांच उठले; हृदय प्रेमानें आर्द्र झालें; आणि नेत्रांतून आनंदाश्रूंचा पूर वहूं लागला. नंतर, शांतचित्त अशा त्या प्रऱ्हादानें आपलें मन आणि नेत्र परमेश्वराकडे लाविले, व सद्गदित वाणीनें तो त्या भगवंताची स्तुति करूं लागला.

### प्रऱ्हादकृत नृसिंहस्तुति.

#### ईश्वरप्रसादोपाय.

प्रऱ्हाद म्हणाला:—शुद्धसत्त्वरूप गुणानें युक्त अशा ब्रह्मदेवादि सुरवरांनीं आणि सिद्धजनांनीं परमेश्वराची स्तुति केली असतां तेही ज्याला संतुष्ट करूं शकले नाहींत, तो परमेश्वर हीन दैत्यकुळांत जन्मलेल्या मजवर कसा प्रसन्न व्हावा? परंतु धन, सत्कुलांत जन्म, रूप, तप, पांडित्य, इंद्रियपटुता, कांति, प्रभाव, शक्ति, उद्यम, बुद्धि आणि योग हे गुण अंगीं असले तरच परमेश्वर प्रसन्न होतो, नाहींतर नाहीं, असें मात्र मला वाटत नाहीं. तो केवळ भक्तीमुळेंच प्रसन्न होतो. अहो, गजेन्द्राला परमेश्वर भक्तीमुळेच प्रसन्न झाला. पहा—धनकुलादि सर्व गुण अंगीं वसत आहेत, आणि उत्तम अशा ब्राह्मणकुळांतही जन्म झालेला आहे, परंतु तो पुरुष जर परमेश्वराची भक्ति करीत नसेल, तर त्यापेक्षां परमेश्वराची भक्ति करणारा चांडाळ देखील मी श्रेष्ठ समजतों. कारण, परमेश्वरभक्तीच्या योगानें तो चांडाळ आपल्या सर्व कुळाचा उद्धार करितो; परंतु या अधम ब्राह्मणाच्या हातून स्वतांचाही उद्धार होत नाहीं; मग कुळाचा तो कोठून होणार? द्रव्यादिकांच्या योगानें आपली कोणीं पूजा करावी, असें भगवंताला मुळींच वाटत नसतें; परंतु तो दीनवत्सल जगदात्मा केवळ भक्तांच्या कल्याणाकरितांच तिचा स्वीकार करितो. पहा, मुख सुशोभित केलें असतां प्रतिबिंब सुशोभित दिसतें, त्याप्रमाणें, मनोभावानें परमेश्वराची पूजा केली असतां, मनुष्याचे ठायीं प्रतिबिंबरूपानें वास करणारा जो जीव तो सत्त्वादि गुणांनीं युक्त होऊन सुशोभित दिसतो. अहो, ईश्वर हें मूळ बिंब असून जीव हें त्याचें प्रतिबिंब आहे. याकरितां मी आपल्या शक्त्यनुसार परमेश्वराचे गुण वर्णन करितों. कारण, त्याचें गुणवर्णन केलें असतां, अज्ञानामुळें संसारांत भ्रमण करीत असलेला पतित पुरुष देखील पवित्र होतो!

#### क्रोध आवरण्याविषयीं नृसिंहास प्रार्थना.

प्रऱ्हाद पुढें म्हणाला:—हे भगवता, तुझे जे

प्रेमळ भक्त आहेत, त्यांचें भय निवारण्याकरितांच तुझा अवतार आहे; त्यांना भय उत्पन्न करण्याकरितां नव्हे. देवा, हे ब्रह्मादि देव तुझे प्रेमळ भक्त आहेत, आम्हांसारखे विरोधी भक्त नव्हत. म्हणून तूं आतां आपला क्रोध आवरून धर. जीवांना त्रास देणारे सर्प, विंचू इत्यादि प्राणी जर मारिले, तर लोकांचा उपद्रव कमी झाला म्हणून सज्जनांना आनंद होतो; तसा हा लोकांना पीडा देणारा दैत्य त्वां मारिला, ह्यामुळें सर्व लोकांना आनंद झाला आहे. देवाधिदेवा, आतां तुला क्रोधाविष्ट असण्याचें काय प्रयोजन? आपुढें, भय दूर व्हावें म्हणून सर्व जन तुझें स्मरण करतील व त्या योगानें भय मुळींच उरणार नाहीं. तेव्हां आतां हा कोप तुला कायम ठेवणें नलगे. हे अजिता, तुझें भयंकर मुख आणि जिव्हा, खदिरांगारांसारखे नेत्र, लांब लांब दाढा, रक्तानें भिजलेले केंस, शंकूसारखे उभे कान, आंतड्यांच्या माळा, दिग्गजांना देखील भय उत्पन्न करणारा भयंकर शब्द, आणि तीव्र नखें हीं सर्व अक्राळविक्राळ दिसतात खरीं; परंतु, परमेश्वरा, मला त्यांचें मुळींच भय वाटत नाहीं. देवा, खरोखर मी निराळ्याच गोष्टीला भीत आहें: ह्या संसारचक्रांतील तापत्रयानें मी अगदीं गांजून गेलों आहें. म्हणून मी तुझी

### भवतरणाविषयीं प्रार्थना

करितों. देवा, या संसारांत स्वकर्मांच्या योगानें बद्ध होऊन, भयंकर हिंस्र पशु जे काम-क्रोधादि विकार, त्यांच्या तडाक्यांत मी सांपडलों आहें. हे दीनवत्सला, तूं मज दीनावर दया करून, आपल्या भीतिरहित चरणकमलांजवळ मला केव्हां बरें हांक मारिशील? नरसिंहा, प्रिय आणि अप्रिय वस्तूंचा अनुक्रमें वियोग आणि समागम यांपासून प्राप्त होणारें दुःख मला होत आहे. त्याच्या परिहारार्थ जर कांहीं औषध घ्यावें, तर तें देखील दुःखप्रदच होतें. याप्रमाणें, मी व्यर्थ देहाभिमान धरिल्यामुळें संसारचक्रांत भ्रमण करीत आहें. यांतून निघण्याचा उपाय म्हणजे तुझी सेवा करणें हाच होय. ह्यास्तव तो उपाय कसा करावा हें मला निवेदन कर. नरहरे, माझें उपास्य दैवत काय तें तूंच. ब्रह्मदेवानें तुझें जें गुणवर्णन केलें, तें तुझ्या चरणांचा आश्रय करणाऱ्या साधूंचा समागम घडल्यामुळें मला माहीत झालें. आतां नित्यशः त्या गुणांचें गायन मी करितों; म्हणून माझीं सर्व दुःखें नष्ट होऊन तीं उद्भवण्यास कारण जे रागद्वेषादि गुण, ते मजपासून पळाले आहेत.

### खरा तारक कोण याचा निर्णय.

हे विश्वव्यापका, दुःख निवारण करण्याचे म्हणून जे जे उपाय जगांत प्रसिद्ध आहेत, ते सर्व तुझ्या कृपेमुळेंच फलदायक होतात. तूं उपेक्षा केलीस तर त्यांचा कांहींएक उपयोग नाहीं. मुलांचें पालन करणारे आणि त्यांना सुख देणारे काय ते आईबाप; परंतु आईबाप असूनही थोड्यांना का दुःख होतें! फार काय सांगावें? पण अजीगर्तासारखे बाप तर मुलांना उलट दुःखच देतात. अशीं उदाहरणें किती तरी आढळतील! रोग्याचें तारण म्हणजे औषध हें म्हणणें सुद्धां खरें नव्हे. कारण औषध चालू असूनही रोगी मरावयाचे ते मरतातच! समुद्रांत बुडणारास नौका तारण म्हणावें, तर तसेंही म्हणतां येत नाहीं; कारण समुद्रांत थोड्या का नौका बुडतात? या जगांत अनेक प्राणी जन्म पावतात; व त्यांचे गुण निरनिराळे असतात. कोणी सत्त्वगुणी असतो; कोणी तमोगुणी असतो; व कोणी मिश्रगुणी असतो. त्या प्राण्याचें जन्म ज्यापासून होतें तो पिता; त्याला उत्पन्न करणारा ब्रह्मदेव; त्याच्या जन्मास निमित्त असलेलें पूर्वार्जित कर्म; तो ज्या वेळीं जन्म पावला

१ स्कंद ९ अध्याय ७ 'हरिश्चंद्राची कथा' व स्कं. ९ अ. १६ 'शुनःशेपाचें वृत्त' पहा.

असेल ती वेळ; तो ज्या कारणासाठीं या जगांत उत्पन्न झाला असेल तें कारण; पूर्वकर्मसंबंधानें तो ज्या ठिकाणीं उत्पन्न झाला असेल तें ठिकाण व तो संबंध; त्याच्या जन्मास साहाय्यभूत आणि आधार असणारीं महत्तत्त्वादि महाभूतें; त्यांस प्रेरणा देणारा काल; आणि त्याच्या जन्माचा किंवा मृत्यूचा प्रकार हीं सर्व तुझींच रूपें होत.

### संसारचक्राचा ( मनाचा ) प्रभाव.

देवा, कालाच्या योगानें मायेच्या सत्त्व, रज आणि तम या गुणांचा क्षोभ होऊन, ती माया तुझ्या अंशधारी पुरुषाच्या साहाय्यानें लिंगशरीर उत्पन्न करिते. लिंगशरिराचें संक्षिप्त स्वरूप म्हटलें म्हणजे मनच होय. हें मन जिंकून भगवच्चरणीं लावण्याचें काम फार दुष्कर आहे. वेदांनीं वर्णन केलेला कर्ममार्ग हाच ह्या मनाला पुरुषार्थ वाटतो. हें मन म्हणजे संसारचक्र. ह्या चक्राला एकादश इंद्रियें आणि पंचमहाभूतें मिळून सोळा आरा लाविलेल्या आहेत. त्यांच्या साहाय्यानें संसारचक्र फिरत राहून अज्ञानापासून प्राप्त झालेले कर्मभोग जीव भोगीत राहतो. देवा, तुझी भक्ति न करणारा कोणता बरें प्राणी ह्या चक्रांतून निसटून जाण्यास समर्थ होईल? भगवंता, तुझ्या चैतन्यशक्तीचें सामर्थ्य अवर्णनीय आहे. तिच्या योगानेंच तूं बुद्धीचे सर्व गुण सदोदित जिंकिले आहेस. मायेचा चालक जो काल, तो तूंच होस. देवा, मायेनें मला ह्या सोळा आरांच्या चरकांत घालून अगदीं पिळून काढलें आहे. म्हणून मी तुला शरण आलों आहें. ह्यास्तव तूं मला त्यांतून सोडीव. देवा,

### स्वर्गादि सुखैश्वर्यांची योग्यता

काय आहे, ती मला समजली! कारण, तेथील अधिपति जे लोकपाल, ते, माझ्या पित्याची भुवई किंचित् वक्र झाली असतां थरथर कांपत! परंतु अशाही ह्या महापराक्रमी दैत्याचा वध तूंच केलास! तस्मात् तुझेंच सामर्थ्य असाधारण होय. स्वर्गलोकींच्या त्या तुच्छ सुखांत काय अर्थ? त्याचप्रमाणें, ब्रह्मदेवापासून तों तहत अल्पायुषी मनुष्याचें आयुष्य, इंद्रियसुख, संपत्ति इत्यादि भोग आणि कालगतीनें नाश पावणाऱ्या अणिमादि सिद्धि या सर्वांची योग्यता मला कळून आली आहे! त्यांची मी मुळींच आशा करीत नाहीं. तर तुझे भक्त जे तुझ्या चरणांसमीप वास करितात, त्यांच्याजवळ मला ने. देवा, विषयोपभोगांचें वर्णन ऐकिलें म्हणजे तें कानांस फार गोड लागतें, आणि तें प्राप्त व्हावें म्हणून प्राण्याच्या मनांत लालसा उत्पन्न होऊन तो त्यांच्या प्राप्तीसाठीं यत्न करितो; परंतु ते सर्व उपभोग केवळ मृगजलाप्रमाणें मिथ्या होत. ते सकल भोग आणि आपलें शरीर देखील मिथ्या आहे, असें समजत असूनही मनुष्यांना वैराग्य उत्पन्न न होतां, दुर्मिळ वाटणाऱ्या रतिसुखाची प्राप्ति करून घेण्याकरितां अनेक यत्न करून ते कामाग्नीची शांति करीत बसतात; तेव्हां, देवा, केवढा हा तुझ्या मायेचा अद्भुत प्रभाव!

### एकनिष्ठ भक्तांसच ईशप्रसाद.

ईश्वरा, रजोगुणाच्या प्रभावानेंच केवळ ज्यांचें जन्म झालेलें आहे, व तमोगुणानेंच ज्यांना ग्रासिलें आहे, असे जे दैत्य, त्यांच्या कुळांत जन्मलेला मी कोठें? आणि तुझी कृपा कोठें? पहा, जो संतापहारक हस्त ब्रह्मदेव, शंकर इत्यादि देवांना प्राप्त झाला नाहीं; इतकेंच नव्हे, तर जो प्रत्यक्ष लक्ष्मीला देखील लाभला नाहीं, तो वरद हस्त तूं माझ्या मस्तकीं ठेविलास; तेव्हां हें माझें केवढें भाग्य बरें! देवा, तूं जगाचा आत्मा व हितकर्ता आहेस, म्हणून ब्रह्मादिक देव व मी यांजविषयीं सामान्य जनांच्या मनांत उद्भवणारा उच्चनीचभाव तुझ्या मनांत मुळींच नाहीं. कल्पतरूची सेवा करणाराला जसें त्या सेवेप्रमाणेंच फल मिळतें, तसाच निर्मळ भक्तिमार्ग आचरणारांना तुझा प्र-

साद प्राप्त होतो. प्रत्येकाची सेवा आणि इच्छा त्याप्रमाणें असेल, त्याप्रमाणेंच त्याला धर्मादि फळ मिळत असतें. तें फळ प्राप्त होण्यास उच्च नीचभाव मुळींच आड येत नाहीं. ईश्वरा, संसार हा एक अंधकूप असून त्यांत कालरूपी सर्प आहे. हे सकळ जन भोगाशेनें भ्रमण करीत असतां त्या कूपांत पडतात; व त्यांच्या समागमानें मीही त्यांत पडलों आहें. सांप्रत तूं जशी मजवर कृपा केलीस, तशीच पूर्वीं नारदानें केली. तेव्हां, तुझे जे परमपूज्य भक्त, त्यांचें मी कां बरें सेवन करणार नाहीं? तूं अवतार घेऊन माझें रक्षण आणि माझ्या पित्याचा वध केलास, हें तरी आपल्या भक्तांचीं वचनें खरीं करण्याकरितांच केलेंस. कारण, माझा पिता शस्त्र घेऊन माझा वध करण्यास तयार झाला, त्यावेळीं असें बोलला कीं, 'मजहून वेगळा जो जयन्नायक हरि असेल, तो तुझें रक्षण करो. मी तर तुझें मस्तक धडापासून वेगळें करतोंच!'

### विश्वव्यापक ईश्वरस्वरूप.

हे भगवंता, हें विविध जग तूंच एकटा नटलेला आहेस. तूं ह्याच्या आरंभीं, मध्यें व अंतीही असतोस. आपल्या मायेच्या (प्रकृतिगुणांच्या) योगानें विश्व उत्पन्न करून त्या सर्व विश्वास व्यापून राहणारा, व त्याच त्रिगुणांच्या योगानें जन्म, पालन आणि संहार करणारा परमेश्वर जो प्रतीतीला येतो, तो तूंच. हे परमेश्वरा, हें सर्व विश्व तूंच आहेस, तें तुजहून वेगळें नाहीं; तूं मात्र त्याहून भिन्न आहेस. कारण, प्रारंभीं व अंतीं तूं त्याहून वेगळा राहतोस, असा सिद्धांत असल्यामुळें, अमुक वस्तु आपली आणि अमुक वस्तु दुसऱ्याची अशी भेदबुद्धि केवळ मिथ्या होय. अशी बुद्धि होणें हीच तुझी माया. वृक्षाचें बीज आणि वृक्ष हीं दोन्ही पृथक्‌रूपानें एकच होत; तद्वतच, ज्यापासून ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं कार्यें होतात, त्या परमात्म्याचेंच हें सर्व विश्व कार्य होय!

### ईश्वराची योगनिद्रा.

देवा, प्रलयकालसमयीं हें सर्व विश्व तुझ्या ठिकाणीं लीन होतें; आणि तूं त्या प्रलयकालीन उदकांत शयन करितोस; पण जीवाप्रमाणें अज्ञानरूप निद्रेंत घोरत पडत नाहींस, तर आत्मसुखाचा अनुभव घेत कोणतेही व्यवहार न करितां स्वस्थ पडलेला असतोस. हे नारायणा, त्या वेळीं तूं योगबलानें नेत्र मिटून घेतोस खरे; पण स्वयंप्रकाशाच्या योगानें तूं निद्रेचा नाश करूनच पडून राहतोस. ईश्वरा, ही तुझी अवस्था म्हणजे जागृति, स्वप्न किंवा सुषुप्ति (निद्रा) यांपैकीं एकही नसून, त्याही पलीकडची जी 'तूर्या' ती होय. अज्ञानी प्राण्याला जसे निद्रेंत तम आणि जागृतींत अथवा स्वप्नांत विषय चिकटलेले असतात, तसें तुला कांहींएक नाहीं. त्या प्रलयोदकांत शेषावर शयन करणारा जो तूं, त्या तुझा योगनिद्रारूप समाधि जेव्हां विसर्जन होण्याचा समय प्राप्त झाला, तेव्हां प्रकृतीचे गुण जे सत्त्व, रज आणि तम, त्यांना तूं प्रेरणा केलीस; आणि तुझ्याच ठिकाणीं लीन होऊन राहिलेलें हें तुझें ब्रह्मांडरूप शरीर, मोठ्या कमलाच्या रूपानें तुझ्या नाभिप्रदेशापासून उत्पन्न झालें. त्या कमलापासून प्रथम ब्रह्मदेव जन्मला. त्या वेळीं दुसरें कांहीं उत्पन्न झालेलें नसल्यामुळें त्याला कमलाव्यतिरिक्त दुसरें कांहीं दिसेना. तेव्हां तो तुझा शोध करण्याकरितां पुष्कळ फिरला, परंतु त्याला तूं मुळींच सांपडला नाहींस. तेव्हां पाण्यांत शिरून त्यानें तेथें तुझा शोध चालविला. या गोष्टीस शंभर वर्षें लोटलीं, तरी त्यास तुझा शोध मुळींच लागेना. कारण, तूं त्याच्या अंतरीं व्याप्त असूनही तो तुला दुसरीकडे शोधूं लागला; तेव्हां अशा अज्ञान दृष्टीला तुझें स्वरूप कसें गोचर व्हावें? रोपा तयार

झाल्यावर त्याचें कारणरूप बीज कसें दिसेल ? शेवटीं ब्रह्मदेवाला सखेदाश्चर्य वाटलें, आणि तो पूर्व ठिकाणीं आला. तेथें बहुत काळपर्यंत कडकडीत तपश्चर्या केल्यावर त्याचें अंतःकरण शुद्ध झालें; आणि नंतर, पृथ्वीमध्यें–तिचें कारण जो गंध, तो जसा अतिसूक्ष्म रीतीनें दृष्टोत्पत्तीस येतो, तसें इंद्रियें, भूतें आणि मन यांच्या संयोगानें बनलेलें जें शरीर, त्या शरिराचे ठिकाणीं तूं व्याप्त आहेस असें त्याच्या दृष्टीस पडलें ! ईश्वरा, तुझें जें व्याप्त असें महास्वरूप ब्रह्मदेवाला स्वस्वरूपींच दिसलें, त्याला सहस्रशः मुखें, हस्त, चरण, नेत्र, कर्ण, व अलंकार असून हातांत अनेक आयुधें होतीं. मायेनें युक्त असें तें महास्वरूप पाहून ब्रह्मदेवाला हर्ष झाला. त्या काळीं, रज आणि तम या गुणांनीं उन्मत्त झालेले मधु आणि कैटभ या नांवाचे दैत्य वेदांचा नाश करीत होते. तूं हयग्रीव अवतार धारण करून त्यांचा वध केलास, आणि ते वेद ब्रह्मदेवास परत मिळवून दिलेस. म्हणूनच तुला सत्त्वगुणप्रिय म्हणतात. हे महापुरुषा, तूं ह्याप्रमाणें पशु, जलचर, मनुष्य, ऋषि, देव इत्यादि अवतार घेऊन लोकांचें पालन करितोस, जगाला उपद्रव करणारांना मारितोस, आणि युगायुगांतील धर्म रक्षितोस. देवा, तुला त्रियुग असें म्हणतात, तें ह्यामुळेंच. कारण कलियुगामध्यें तूं दृग्गोचर होत नाहींस. हे वैकुंठनायका, माझें मन अनेक पातकांनीं दूषित झालेलें असून तें बहिर्मुख, कामातुर, व हर्ष, शोक, भय इत्यादिकांनीं व्याकूळ होऊन दुर्धर झालें आहे; म्हणून त्याची तुझ्या कथांवर प्रीति जडत नाहीं. अशा अस्थिर मनाच्या साहाय्यानें म्यां दीनानें तुझ्या तत्त्वांचा कसा विचार करावा बरें ?

**दीन जनांचा उद्धार करण्याचें कारण.**

हे अच्युता, ज्याला अनेक स्त्रिया असतात त्या पुरुषाला, त्या स्त्रिया आपापल्याकडे नेण्याकरितां जशा ओढीत असतात, तसे ह्या माझ्या मनाला अनेक विषय आपल्याकडे ओढीत आहेत. अशी ही दुःखद स्थिति केवळ माझ्याच मनाची झाली आहे असें नाहीं; तर स्वकर्मामुळें संसाररूप नदीमध्यें दुसरेही जे अनेक लोक पडले आहेत, त्यांची सुद्धां हीच स्थिति झाली आहे. हे नित्यमुक्ता, तुला सर्व दिसत आहे. ह्यास्तव या अज्ञान जनांना तूं उद्धरून ने. तूं सर्वशक्तिमान असल्यामुळें तुला हें करणें कठिण आहे असें नाहीं. कारण, ह्या सर्व विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं तूंच करितोस. आतां 'तुला एकट्यालाच उद्धरितों' असें कदाचित् तूं मला म्हणशील; पण मला त्याची गरज नाहीं. कारण, तुझ्या भक्तांची मी नित्य सेवा करीत असतों, तेव्हां मी मुक्तच आहें. याकरितां, तूं या सर्व मूढ जनांना उद्धरून नेशील तरच मोठा अनुग्रह होईल. दुःखितांना साहाय्य करणें तुझें कर्तव्य आहे. हे सर्वोत्तमा, ही दुस्तर संसारनदी तरून जाण्यास मला मुळींच भय वाटत नाहीं. कारण, माझें मन सदैव तुझ्या लीला गात असून त्या आनंदांत रममाण असतें. जे मूर्ख या आनंदाला पराङ्मुख असतात, आणि इंद्रियतृप्तीच्या मिथ्या सुखासाठीं कुटुंबभार वाहतात, त्यांची मात्र मला फार कींव येते ! देवा, तत्त्वज्ञानी मुनि मोक्षप्राप्तीची इच्छा धरून मौन धारण करून बसलेले असतात; तेव्हां ते या जनांना तत्त्वोपदेश करितील, आणि त्या योगें हे जन मुक्त होतील, ही आशा करणें व्यर्थ होय; म्हणून मला या दीन जनांना टाकून एकटेंच मुक्त व्हावें असें वाटत नाहीं. बरें, दुसऱ्या कोणाचा आश्रय करावा, तर ह्या संसारचक्रांत फिरत राहणाऱ्या दीन जनांना तुजवांचून दुसरा कोणताही आधार मला दिसत नाहीं. इंद्रियतृप्तीच्या अति तुच्छ सुखप्राप्तीनें हे संतुष्ट असतात खरें; परंतु त्या सुखाचें पर्यवसान कोणीकडे होत आहे, हें ह्या कामिजनांच्या लक्षांत

येत नाहीं. उदाहरणार्थ:—एखाद्याला खरूज झाली असतां कंड सुटली कीं तो खाजीव खाजीव खाजवितो; पण त्यापासून उद्भवणारी आग मात्र त्याला मागाहून फार त्रासदायक वाटते; आणि इतकें असूनही फिरून कंड सुटली कीं तो खाजविण्यास कमी करीत नाहींच! त्याचप्रमाणें, देवा, या संसाराचा अशाश्वतपणा आणि दुःख हीं माहीत असूनही मूढ कामिजनांना वैराग्य उत्पन्न होत नाहीं, तेव्हां काय म्हणावें बरें! हे परमेशा, विवेकी जन मात्र प्रबल अशा कामेच्छेला खरजेच्या कंडूप्रमाणें सोशितात. देवा, मौनधारण, व्रतानुष्ठान, सच्छास्त्रश्रवण, तप, वेदाध्ययन, स्वधर्माचरण, ग्रंथव्याख्यान, एकांतवास, जप आणि समाधि हीं दहा मोक्षसाधनें आहेत खरीं; पण यांपासून त्या विषयलोलुपांना काय लाभ! ते या साधनांचा उपयोग मोक्षाकडे न करितां निर्वाहाकडे करितात. दांभिकांना तर निर्वाहाची देखील मारामार पडते! देवा, आम्हां मनुष्यांना ओळखण्यास ज्याप्रमाणें काळा, गोरा इत्यादि खुणा असतात, त्याप्रमाणें तुला ओळखण्याचें कांहीं साधन नाहीं. कारण तूं निर्गुण निराकार असा आहेस; पण अशाही तुला ओळखितां यावें म्हणून, बीजांकुराप्रमाणें कारण व कर्म हीं रूपें वेदांनीं उपलक्षणाकरितां सांगितलीं आहेत. त्या योगानें, अग्निहोत्री जसे काष्ठांतील अग्नि मंथनानें प्राप्त करून घेतात, किंवा वृक्षरूपी कार्यांत बीजरूपी कारण आहे असें विचारी पुरुष जाणतात, तसे इंद्रियनिग्रही योगी कार्यकारणांच्या ठिकाणीं व्यापकत्वें असणाऱ्या तुला भक्तिमार्गानें ओळखतात. हे सर्वव्यापका, पृथ्वी, अप्, तेज, वायु, आकाश हीं पंचमहाभूतें; शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हीं सूक्ष्मभूतें; आणि प्राण, मन, इंद्रियें इत्यादि सर्व दृश्यादृश्य वस्तु ह्या सर्व तुजवेगळ्या नाहींत. हे भगवंता, सत्त्वादि गुण, गुणाभिमानी देव, महत्तत्त्वादि तत्त्वें व मनुष्यादिक प्राणी हीं सर्व जन्ममरणाधीन आहेत. त्यांच्या अंतर्यामीं प्रकाशमान असणारा जो तूं, त्या तुझें स्वरूप जीवांना अज्ञानामुळें दिसत नाहीं. हें जाणूनच विद्वान लोक वेदाध्ययन इत्यादि गर्वोत्पादक कर्मांचा उपशम करून तुझी उपासना करितात. देवा, तुझी षडंग भक्ति जी नमन, स्तुति, सर्वकर्मसमर्पण, उपासना, चरणस्मरण व कथाश्रवण, ती केल्याव्यतिरिक्त तुझ्या ठायीं प्राप्त्याची भक्ति कशी उद्भवणार? ती फक्त परमहंसांसच प्राप्त होते. म्हणून परमेश्वरा, ज्या अर्थी निस्सीम भक्तीवांचून मोक्ष मिळत नाहीं, आणि उत्तम सेवेवांचून भक्ति जडत नाहीं, त्या अर्थी मी पूर्वी मागितलेला दास्ययोगच मला दे.

### नृसिंहाची प्रऱ्हादास वर मागून घेण्याची आज्ञा.

नारद म्हणाले:—धर्मराजा, प्रऱ्हादानें भक्तिपूर्वक केलेलें हें स्तवन श्रवण करून भगवान नरसिंह संतुष्ट झाला, आणि त्या नम्र अशा भक्तश्रेष्ठ प्रऱ्हादाला म्हणाला, "हे असुरश्रेष्ठा बाळा प्रऱ्हादा, तुझें कल्याण असो. मी तुजवर प्रसन्न झालों आहें. तूं इष्ट वर मागून घे. कारण, मी पुरुषांच्या इच्छा पुरवितों. हे आयुष्मन्, मला जो प्रसन्न करून घेत नाहीं, त्याला माझें दर्शन होणें अशक्य होय; परंतु माझें ज्याला दर्शन घडलें, त्याला फिरून दुःख प्राप्त होत नाहीं. यास्तव, ज्यांना कल्याणप्राप्तीची इच्छा असते, ते पुरुष सर्व मनोरथ पुरविणारा जो मी, त्या मला परम भक्तीच्या योगानें संतुष्ट करितात."

राजा धर्मा, नरसिंहानें जरी अशा उत्तम वरांची लालूच दाखविली, तरी तो महाभक्त प्रऱ्हाद त्यास भुलला नाहीं!

## अध्याय दहावा.

—:०:—

### प्रऱ्हादास वरांची निरिच्छा.

नारद म्हणाले—धर्मराजा, भक्तश्रेष्ठ प्रऱ्हा-

दाला कोणताही वर म्हणजे भक्तियोगास विघ्न असें वाटलें, आणि तो स्मित हास्य करीत भगवान नरसिंहाला म्हणाला, "देवा, जन्मापासून जो भोगासक्त आहे, व भोगासक्तीमुळेंच भिऊन जाऊन खिन्न होत्साता मुक्ति मिळण्याच्या आशेनें जो तुला शरण आला, त्या मला फिरून त्याच भोगांची आशा कशाला दाखवितोस? प्रभो, विषयभोग हे संसाराला मूळ कारण होत. ह्यांची हृदयाशीं जणू गांठच बांधलेली आहे. असले हे भोग मागून घेण्याकडे तूं माझी प्रवृत्ति करीत आहेस, यांत भक्तांची परीक्षा करण्याशिवाय तुझा दुसरा कांहीं आशय असेलसें मला वाटत नाहीं. नाहींतर तुजसारखा दयाळू पुरुष अशा रीतीनें कोणाला संकटांत घालण्याची इच्छा कां करील? तुजपासून भोग प्राप्त करून घेण्याची इच्छा करणारा पुरुष म्हणजे शुद्ध वणिग्वृत्तीचा होय. जगांत

सेव्यसेवकभाव

दिसून येतो हें खरें आहे, पण तो वास्तविक नव्हे; भगवंता, धन्यापासून आपणास द्रव्य मिळावें एवढ्याच हेतूनें जो सेवा करितो, तो सेवकच नव्हे; तसेंच, चाकराकडून केवळ काम करून घेण्याच्या इच्छेनेंच जो त्यास द्रव्य वगैरे देतो, तो धनीही नव्हे. देवा, या कार्यकारणात्मक सेव्यसेवकभावाप्रमाणें तुझा माझा संबंध नाहीं कारण, मी तुझा निष्काम भक्त आहें, व तूं माझा निरपेक्ष स्वामी आहेस. तथापि तूं वर देणारच असशील, तर, माझ्या अंतःकरणांत कामवासनेचा मुळींच अंकुर उद्भवूं नये, असें वरदान मी मागतों, एवढें मला दे. कारण कामाची उत्पत्ति झाली कीं इंद्रियें, मन, प्राण, देह, धर्म, धैर्य, सारासारविवेक, लज्जा, ऐश्वर्य, प्रताप, स्मृति आणि सत्य या सर्वांचा नाश होतो. हे कमलाक्षा, ज्या वेळीं पुरुष आपल्या हृदयांतील कामनांचा त्याग करितो, त्याच वेळीं त्याला तुझी प्राप्ति होते, एरवीं होत नाहीं. हे पुराणपुरुषा, भक्तदुःखनाशका, अद्भुत नरसिंहरूपधारका, परब्रह्मन्, परमात्मन्, तुजप्रत नमस्कार असो!"

### प्रल्हादास नृसिंहाची आज्ञा.

नृसिंह म्हणालाः—प्रल्हादा, तुजसारखे जे माझे एकनिष्ठ भक्त आहेत, ते इहलोकींच्या अथवा परलोकींच्या भोगांची अपेक्षाच करीत नाहींत; तथापि हें मन्वंतर संपेपर्यंत येथें तूं दैत्यराजाचें ऐश्वर्य भोगीत रहा. 'यापासून मी कर्मबद्ध होईन' अशी कल्पना सुद्धां मनांत आणूं नको. सर्व भूतांचे अंतरीं वास करणारा जो मी एक यज्ञाधिष्ठाता परमेश्वर, त्या माझें तूं नेहमीं अंतःकरणांत स्मरण कर; माझ्या प्रिय कथा गा; आणि सर्व कर्मे मला अर्पण करून माझीच आराधना कर; म्हणजे सुखोपभोगानें पुण्याचा, सदाचरणानें पापाचा, आणि कालगतीनें देहाचा नाश होऊन, तूं अंतीं मत्स्वरूपीं मिळशील; आणि तुझी कीर्ति देव सुद्धां गाऊं लागतील. प्रल्हादा, तूं माझ्या केलेल्या स्तुतीचें, माझें, व या चरित्राचें स्मरण करून जो कोणी याचें पठन करील, तो देखील कर्मबंधनापासून मुक्त होईल.

### पित्याच्या उद्धाराविषयीं प्रार्थना.

प्रल्हाद म्हणालाः—हे जगदीश्वरा, सर्वांत श्रेष्ठ असा वरदाता तूंच आहेस. मी तुजपाशीं एक प्रार्थना करितों, ती ऐक. देवा, क्रोधानें हृदय व्याप्त झाल्यामुळें व ईश्वरी तेज न समजल्यामुळें माझ्या पित्यानें तुझी अतिशय निंदा केली; 'आपल्या भावाला मारणारा तो हाच' अशी भावना धरून तुझा द्वेष केला; आणि तुझ्या भक्ताला म्हणजे मला छळिलें; हें जें दुरंत पातक त्याजकडून घडलें, त्यापासून माझा पिता शुद्ध होवो! हे भक्तवत्सला, तूं आपल्या कटाक्षानें त्याजकडे पाहिलेंस, तेव्हांच तो मुक्त झाला हें खरें; परंतु, देवा, अल्प समजुतीमुळें मी तुझी ही प्रार्थना करीत आहें.

### नृसिंहाचें उत्तर.

नृसिंह म्हणालाः—हे निष्पापा, तुझा पिता आपल्या पूर्वकल्पांतील एकवीस पूर्वजांसुद्धां पवित्र झाला आहे. बाबारे, ज्याच्या घरीं तुझ्यासारखा कुलोद्धारक पुत्र जन्मास आला, त्या पुरुषाला पवित्रता कां मिळणार नाहीं? इतकेंच नव्हे, तर ज्या ठिकाणीं समदृष्टि ठेवणारे, अत्यंत शांत, व सदाचरणी असे माझे भक्त राहतात, ते प्रदेश कीकट देशासारखे अत्यंत अपवित्र असले तरी पवित्र होतात. हे दैत्यश्रेष्ठा, माझे भक्त निरिच्छ असल्यामुळें ते लहान थोर प्राण्यांपैकीं कोणालाही दुखवीत नाहींत; कारण, त्यांना सर्व जग आत्ममय दिसत असतें. बाळा, तुझें जे कोणी अनुकरण करतील, ते सुद्धां माझे निस्सीम भक्त होतील. माझ्या सर्व भक्तांत तूं श्रेष्ठ होस. हे प्रऱ्हादा, तुजसारख्या सुपुत्राच्या जन्मानें आणि माझ्या हस्तस्पर्शानें तुझा पिता पवित्र झाला यांत शंकाच नाहीं; परंतु शास्त्रमर्यादेस्तव तूं त्याचें और्ध्वदेहिक कर, आणि त्याच्या सिंहासनावर बसून, वेदवेत्ते ब्राह्मण सांगतील त्याप्रमाणें कर्मे करून तीं सर्व मला अर्पण करीत जा.

नारद म्हणालेः—धर्मा, श्रीनृसिंहानें सांगितल्याप्रमाणें प्रऱ्हादानें पित्याचें उत्तरकार्य केलें; आणि नंतर श्रेष्ठ अशा द्विजवरांनीं त्याला राज्याभिषेक केला. धर्मा, त्या संकटनाशक प्रभूचें उग्र स्वरूप प्रसन्नतेमुळें सौम्य झालेलें पाहून सर्वांना आनंद झाला. त्या समयीं ब्रह्मदेव पवित्र अशा वाणीनें

### भगवंताची स्तुति

करून त्याला म्हणाला, “हे देवाधिदेवा, तूं सर्वांचा गुरु आणि प्रजापतींचाही पूर्वज आहेस. लोकांना ताप देणाऱ्या ह्या दैत्याचा तूं वध केलास, यामुळें सर्वांना फार आनंद होत आहे. तपाचरणाच्या योगानें मजपासून वर प्राप्त करून घेतल्यामुळें उन्मत्त होऊन, यानें सर्व वैदिक धर्मांचा नाश चालविला होता. मीं उत्पन्न केलेले देव, मनुष्य अथवा इतर प्राणी ह्यांजकडून याचा वध झाला नसता. याचा पुत्र जो महाभगवद्भक्त प्रऱ्हाद बाळ, त्याला तूं मृत्युमुखांतून सोडविलेंस, हें फार चांगलें झालें. हा तुझ्यासन्निध उभा आहे, हें पाहून आम्हांस मोठें कौतुक वाटतें. भगवंता, जो पुरुष शुद्ध मनानें ह्या तुझ्या स्वरूपाचें ध्यान करील, त्याचें सामान्य भयच नव्हे, तर मृत्युभयही चुकेल!

श्रीनृसिंह म्हणालेः–ब्रह्मदेवा, स्वभावतःच क्रूर असणाऱ्या दैत्यांना तूं असे वर देत जाऊं नको. त्यांना असले वर देणें म्हणजे सापाला दूध पाजणें होय.

नारद म्हणालेः–धर्मा, नंतर ब्रह्मदेवानें भगवंताची पूजा केली; आणि सर्व प्राण्यांना अदृश्य असे ते भगवान तेथेंच गुप्त झाले. नंतर, भगवंताचे अंशभूत असे जे ब्रह्मदेव, शंकर, कश्यपादि प्रजापति, व इंद्रादि देव, त्या सर्वांचें प्रऱ्हादानें यथायोग्य पूजन करून त्यांना शिरसा वंदन केलें. त्या वेळीं सर्वांनीं त्याला आशीर्वाद दिले. पुढें ब्रह्मदेवानें शुक्राचार्यादि वेदवेत्त्या ब्राह्मणांच्या साहाय्यानें प्रऱ्हादास दैत्यदानवांच्या आधिपत्याचा अभिषेक केला, व मग ते सर्व प्रऱ्हादाची पूजा ग्रहण करून आपापल्या स्थानीं गेले.

### प्रऱ्हादाख्यानाचा उपसंहार

नारद पुढें म्हणतातः–धर्मराजा, अशा प्रकारें ते विष्णुपार्षद–जयविजय–ब्रह्मशापामुळें दैत्यजन्म पावले, आणि विरोधभक्तीच्या योगानें त्यांना सतत हरिस्मरण घडून हरिहस्तानें मरण आल्यामुळें अंतीं ते सायुज्यपदीं गेले. धर्मा, तेच पुढें रावण–कुंभकर्ण होऊन आणि रामाशीं सतत द्वेष करून अंतीं रामबाणानें मुक्त झाले. तेच पुढें तुझे मावसभाऊ शिशुपाल आणि वक्रदंत झाले. श्रीहरीचें अखंड वैर केल्यानें त्यांना

ज्याचें सतत स्मरण घडून अखेर सायुज्यता कशी मिळाली, हें तूं प्रत्यक्ष पाहिलेंसच. कुंभारणीनें कोंडून ठेविलेला किडा सतत तिच्याच चिंतनानें तद्रूप बनून जातो, तद्वत् कृष्णाशीं सतत वैर केल्यानें त्यांस नेहमीं हरिस्मरण घडून अंतीं हरिदर्शन घडलें; आणि त्या योगें सर्व पापांचा क्षय होऊन ते मुक्त झाले ! धर्मा, चैद्यादि राजे कृष्णद्वेषी असूनही त्यांना मुक्ति कशी मिळाली म्हणून जें तूं मला विचारिलेंस, तें सर्व तुला कथन केलें. या कथेंत, भक्तकैवारी प्रभु जो श्रीकृष्ण परमात्मा, ह्याचें अवतारचरित्र वर्णन केलें आहे. या कथेमध्यें दोघां आदिदैत्यांचा वध, भगवद्भक्त प्रल्हादाचें चरित्र, त्याची भक्ति, ज्ञान व वैराग्य, जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं स्वतंत्रपणें करणाऱ्या श्रीहरीचे गुण व लीला, गुणप्राबल्यामुळें देवदैत्यांच्या स्थानांत होणारा विपर्यास, आणि भगवद्भक्तीला कारण असा परमपूज्य भागवतधर्म हीं वर्णिलेलीं आहेत. त्याचप्रमाणें, यांत आत्मानात्मविवेकाचें विवेचन केलें आहे. हें भगवान विष्णूच्या लीलांनीं भरलेलें आख्यान जो पुरुष भक्तिपुरःसर श्रवण करील, तो कर्मबंधनापासून मुक्त होईल; आणि जो पुरुष ह्या नरसिंहावताराच्या लीला व भक्तश्रेष्ठ प्रल्हादाचे चरित्र गाईल, त्याला सर्वभयरहित असा वैकुंठलोक मिळेल. धर्मराजा, तुम्हां

### पांडवांचें भाग्य

काय वर्णन करावें ? कारण, मनुष्यांना गूढ असें जें परब्रह्म, तें श्रीकृष्णरूपानें तुमच्या येथें प्रत्यक्ष वास करीत आहे; म्हणूनच महान महान सत्पुरुष तुमच्या घरीं चालून येतात. धर्मा, ज्याला तुम्ही आपला आप्त, मातुल, मित्र, गुरु म्हणून मानितां, तो हा श्रीकृष्ण प्रत्यक्ष परब्रह्म होय. धर्मराजा, शंकर, ब्रह्मदेव यांसारख्या महापुरुषांना देखील ज्याचें पूर्णपणें वर्णन करितां आलें नाहीं, तो भगवान स्वयमेव तुमच्या घरीं वास करीत आहे; तेव्हां प्रल्हादापेक्षांही तुमचें भाग्य श्रेष्ठ होय. कारण, प्रल्हादाच्या घरीं भगवान येऊन राहिला नव्हता. राजा, मौन, भक्ति, उपशम इत्यादि साधनांच्या योगानें आम्ही ज्या श्रीकृष्णाची पूजा करितों, तो परमेश्वर आम्हांवर प्रसन्न होवो. धर्मा, पूर्वकालीं, महामायावी जो मयासुर, त्यानें श्रीरुद्राचें यश नष्ट केलें असतां, त्याचा या श्रीकृष्णानेंच विस्तार केला.

धर्मराजा म्हणाला:—मुनिवर्य, मयासुरानें कोणत्या कामांत श्रीशंकराची कीर्ति नष्ट केली, आणि श्रीकृष्णानें तिचा विस्तार कसा केला, तें वृत्त मला निवेदन करावें.

### त्रिपुरासुराख्यान.

नारद म्हणाले:—धर्मराजा, ह्या श्रीकृष्णानें देवांचें रक्षण केलें म्हणून ते सबळ झाले, आणि दैत्यांचा पराभव होऊं लागला; तेव्हां ते सर्व दैत्य, महामायावी जो मयासुर, त्याला शरण गेले. त्या मयासुरानें, ज्यांची अप्रतिहत गति आहे अशीं तीन पुरें—एक सोन्याचें, एक रुप्याचें आणि एक लोखंडाचें अशीं—त्यांना निर्माण करून दिलीं. राजा, त्या पुरांची गति कोणाच्याच लक्षांत येत नसे. त्यांमध्यें युद्धसामग्री अगदीं कडेकोट भरलेली होती. हे पांडुनंदना, त्यांच्या योगानें दैत्यांनीं देवांचा अगदीं नाश केला. त्या कालीं ते सर्व देव श्रीशंकराला शरण गेले. तेव्हां त्यांस आश्वासन देऊन शंकर स्वतः युद्धास निघाले. त्यांनीं धनुष्यास बाण लाविला, आणि त्या बाणावर पाशुपतास्त्राची स्थापना करून तो त्या त्रिपुरांवर सोडिला. पाशुपतास्त्रानें अभिमंत्रण केलेला तो बाण जेव्हां श्रीशंकराच्या धनुष्यापासून सुटला, तेव्हां त्याजपासून हजारों बाण उत्पन्न झाले. ते अग्नीसारखे देदीप्यमान बाण पुढें येतांच दैत्यांचे नेत्र दिपावले, व त्यांस तीं तिन्ही पुरें दिसत नाहींतशीं होऊन ते सैरावैरा धावूं लागले. ह्याप्रमाणें दैत्यांची दाणादाण

होऊन ते पळूं लागले, तेव्हां त्यांस ते अग्नितुल्य बाण लागून सर्व असुर मृत झाले. धर्मराजा, त्या वेळीं त्या मायावी मयासुरानें त्या मृत झालेल्या सर्व दैत्यांस स्वतः निर्मिलेल्या अमृतकूपांत आणून टाकिलें; आणि सिद्धरसस्पर्शानें ते सर्व दैत्य जिवंत होऊन अति तेजस्वी व बलाढ्य दिसूं लागले ! राजा, तें पाहून भगवान शंकर फार खिन्न झाले. तेव्हां या श्रीकृष्णरूप विष्णूनें स्वतः गाईचें रूप घेतलें, आणि ब्रह्मदेवास वत्स करून त्या त्रिपुरांत प्रवेश केला; व त्या कूपांतील सर्व अमृत प्राशन केलें ! राजा, त्या समयीं त्या अमृतकूपाचें रक्षण करणारे दैत्य ह्या भगवान श्रीकृष्णाच्या मायेनें इतके मोहित झाले होते कीं, त्यांनीं त्या गाईचें निवारण सुद्धां केलें नाहीं. पुढें ह्या मायावी मयासुराला हें सर्व कृत्य उमगलें; तरी दैवगतीचा फेरा मनांत आणून तो स्वस्थ राहिला; इतकेंच नव्हे, तर तो उलट त्या शोक करणाऱ्या दैत्यांचें समाधान करूं लागला ! तो म्हणाला, “ दैत्यांनो, ह्या जगांत देव, दैत्य, मनुष्य अथवा इतर कोणीही प्राणी दैवानें प्राप्त झालेलें फल टाळण्यास समर्थ होत नाहीं. ” धर्मा, नंतर ह्या विष्णूनें धर्म, ज्ञान, वैराग्य, समृद्धि, तप, विद्या, कृपा इत्यादि आपल्या शक्तींच्या योगानें शंकराला अनुक्रमें रथ, सारथी, ध्वज, अश्व, धनुष्य, कवच, बाण वगैरे सर्व युद्धसामग्री सिद्ध करून दिली. नंतर भगवान शंकर अभिजित् मुहूर्तीं त्या रथावर आरूढ होऊन धनुष्यबाण घेऊन सिद्ध झाले; आणि त्यांनीं त्या सुमुहूर्तावर धनुष्याला बाण जोडून त्रिपुरांवर सोडिला व त्या योगानें तीं पुरें जळून गेलीं ! तेव्हां आकाशांत दुंदुभि वाजूं लागल्या; विमानांची एकच दाटी झाली; देव, ऋषि, पितर व सिद्ध ह्यांनीं जयघोष करून पुष्पें उधळलीं; अप्सरा नाचूं लागल्या; गंधर्व गायन करूं लागले; आणि सर्व देवांनीं शंकराची स्तुति केली ! नंतर भगवान शंकर स्वस्थानीं गेले. धर्मा, तोच हा जगद्गुरु श्रीकृष्ण सांप्रत मायेच्या योगानें मनुष्यावतार घेऊन तुमच्या घरीं वास करीत आहे; पण याचीं चरित्रें अगम्य आहेत. ऋषि त्या चरित्रांचें गायन करितात, व तें ऐकून इतर लोक पवित्र होतात. राजा, हा तूं विचारलेला वृत्तांत मीं तुला कथन केला, आणखी तुला काय निवेदन करूं ? बोल.

## अध्याय अकरावा.

—:०:—

### वर्णाश्रमधर्मवर्णन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—राजा परीक्षिता, प्रल्हाद भगवद्भक्तांमध्यें अग्रगण्य होता. सर्व सभांमधून सर्वांनीं आदरानें गावें, असें त्याचें तें अद्वितीय चरित्र ऐकून धर्मराजास हर्ष झाला. तो नारदांस म्हणाला, “ब्रह्मन् , मनुष्यांना उत्तम गति देणारे जे त्याच्या वर्णाश्रमांचे सनातन धर्म, ते आपण मला सांगावे. आपण प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचे पुत्र असून, तपाचरण, योगाभ्यास, समाधि इत्यादि गुणांनीं भूषित आहां, म्हणून ब्रह्मदेवाचें आपल्यावर फार प्रेम आहे तेव्हां हे सगळे धर्म आपणांस ठाऊक असतीलच. इतर ऋषींनीं ह्या सनातन धर्मांचें आपल्या स्मृत्यादि ग्रंथांतून बरेंच विवेचन केलें आहे; परंतु आपल्यासारख्या दयाळू, शांत आणि निस्सीम भगवद्भक्ताला धर्माचें गुह्य तत्त्व जसें कळतें, तसें इतरांना कळत नाहीं. ”

### सामान्यधर्ममीमांसा.

नारद म्हणाले:—धर्मराजा, सर्व मनुष्यांच्या धर्ममार्गास आश्रयभूत जो जन्ममरणातीत भगवान परमात्मा नारायण, तो, धर्मपत्नी जी दक्षकन्या मूर्ति, तिच्या उदरीं अवतार घेऊन आपल्या नर नामक अंशासह लोककल्याणार्थ बदरिकाश्रमीं तप करीत आहे, त्या नारायणाला नमस्कार करून, तेथें त्याच्याच मुखानें श्रवण केलेले धर्म

तुला मी सांगतों. धर्मराजा, सर्ववेदमय भगवान श्रीहरि, वेदवेत्त्यांच्या स्मृति, आणि ज्याच्या योगानें आपलें मन संतुष्ट होतें तें आचरण, हीं तीन धर्माचीं प्रमाणें होत. आतां मनुष्यांच्या साधारण धर्माचीं लक्षणें सांगतों. राजा, सत्य, दया, एकादशीचा उपवास इत्यादि तप, शुद्धत्व, सहनशीलता, सदसद्विचार, आत्मसंयमन, बाह्येंद्रियदमन, अहिंसा, ब्रह्मचर्य, दान, योग्य मंत्राचा जप, सरळपणा, संतोष, सर्वभूतीं समदृष्टि ठेवणाऱ्या साधूंची सेवा, प्रवृत्तिमार्गातील ग्राम्याचारांचा हळूहळू त्याग, मनुष्यांना कर्माचें फल कसें मिळतें त्याचें अवलोकन, व्यर्थ भाषण न करणें, आत्मविचार, प्राण्यांना यथायोग्य अन्नवस्त्रादिक वांटणें, सर्व भूतांचे ठायीं व विशेषतः मनुष्यांचे ठायीं आत्मबुद्धि व ईश्वरबुद्धि ठेवणें, आणि महात्म्यांना आधारभूत जो हा श्रीकृष्ण परमात्मा, त्याचें कथाश्रवण, कीर्तन, स्मरण, सेवन, अर्चन, नमन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन, असा हा भगवंताची प्राप्ति करून देणारा तीस लक्षणांनीं युक्त धर्म ऋषींनीं 'उत्तम' म्हणून वर्णन केला आहे. ह्याच्या अनुष्ठानानें चित्ताची उत्तम शुद्धि होते.

धर्मराजा, ज्याचे गर्भाधानादि सर्व विधि अविछिन्नपणें व मंत्रयुक्त झाले आहेत, व ज्याला ब्रह्मदेवानें 'मंत्रयुक्त संस्कारवान्' असें म्हटलें आहे, तोच द्विज होय. जन्मानें व आचरणानें शुद्ध असलेल्या द्विजांना म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांनाच, अध्ययन, यजन व दान आणि आश्रमांना विहित असलेलीं कर्में करण्याचा अधिकार आहे. राजा, आतां

## चारही वर्णांचे उपजीविकाधर्म

सांगतों: ब्राह्मणांनीं अध्ययन, यजन व दान हीं आश्रमकर्में म्हणून, व अध्यापन, याजन व प्रतिग्रह हीं निर्वाहाचीं साधनें म्हणून आचरावीं. क्षत्रियाला फक्त आपत्कालींच अध्यापन आणि याजन हीं दोन कर्में सांगितलीं आहेत. क्षत्रियास प्रतिग्रह केव्हांही विहित नाहीं. प्रजापालक राजानें ब्राह्मणेतरांकडून कर वगैरे घेऊन त्यावर आपली उपजीविका करावी; वैश्यानें ब्राह्मणांच्या अनुरोधानें वागून व्यापार, शेतकी, गोरक्षण आणि य/जबड्या यांवर आपला निर्वाह चालवावा; आणि शूद्रानें द्विजसेवा करून त्यावर आपला चरितार्थ चालवावा. आतां

## ब्राह्मणांच्या मुख्य वृत्ति

कथन करितों: धर्मराजा, कृषिकर्म, गोरक्षण, व्यापार इत्यादि गोष्टी करणें, आपोआप मिळालेलें घेणें म्हणजे अयाचित वृत्तीनें राहणें, नित्य धान्यभिक्षा मागणें, आणि शिलें व उंछें यांवर निर्वाह चालविणें ह्या वृत्ति ब्राह्मणांस विहित आहेत. त्यांपैकीं अनुक्रमानें पहिलीपेक्षां दुसरी, दुसरीपेक्षां तिसरी, आणि तिसरीपेक्षां चौथी अशा श्रेष्ठ होत. राजा, आपत्कालाव्यतिरिक्त कोणींही कनिष्ठ वर्णाच्या पुरुषानें श्रेष्ठ वर्णाच्या वृत्तींचा अंगीकार करूं नये; परंतु आपत्कालीं सर्वांना सर्व वृत्ति विहित आहेत. क्षत्रियांना मात्र कोणत्याही कालीं प्रतिग्रह वर्ज्य आहे. राजा, मनुष्यानें ऋत, अमृत, मृत, प्रमृत आणि सत्यानृत या वृत्तींच्या योगेंकरून आपला निर्वाह चालवावा; परंतु श्ववृत्तीचा अंगीकार केव्हांही करूं नये.

आतां, ऋतादि वृत्तींचें स्पष्टीकरण करून सांगतों: शिल आणि उंछ ही वृत्ति 'ऋत' अर्थात् सर्वोत्तम होय; अयाचित अर्थात् आपोआप मिळालेलें घेणें ही वृत्ति 'अमृत' होय; नित्य याचना करणें ही वृत्ति 'मृत' होय; कृषिकर्म करणें ही 'प्रमृत' होय; वाणिज्य म्हणजे 'सत्यानृत' अर्थात् खरेंखोटें; आणि 'श्ववृत्ति' म्हणजे नीचसेवा. म्हणून, सर्ववेदमय अशा ब्रा-

---

१ शिल=शेत कापल्यानंतर त्यांत पडलेलीं कणसें गोळा करून त्यांवर निर्वाह करणें. उंछ=बाजारांत पडलेले धान्यकण वेंचून आणून त्यांवर निर्वाह करणें

ह्मणांनीं व सर्वदेवमय अशा क्षत्रियांनीं ह्या श्व-वृत्तीचा कधींही स्वीकार करूं नये. राजा, आतां

सर्व वर्णांचे स्वरूपबोधकधर्म.

सांगतों: आत्मसंयमन, बाह्येंद्रियदमन, तप, शुद्धपणा, संतोष, क्षमा, सरलता, विवेक, दया, सर्वदा भगवच्चरणीं लक्ष आणि सत्य हीं ब्राह्मणांचीं लक्षणें होत. युद्धोत्साह, प्रभाव, धैर्य, तेज, औदार्य, मनोनिग्रह, क्षमा, ब्राह्मणांचे ठिकाणीं भक्ति, प्रसन्नता आणि प्रजारक्षण हीं क्षत्रियांचीं लक्षणें होत. देव, गुरु आणि भगवान अच्युत यांचे ठिकाणीं दृढ भक्ति, धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांचें उत्तम प्रकारें साधन, आस्तिक्यबुद्धि, अखंड उद्योग आणि चातुर्य हीं वैश्यांचीं लक्षणें होत. नम्रता, स्नानादि कर्में करून शुचिर्भूत असणें, स्वामीची निष्कपट सेवा करणें, नुसत्या नमस्कारानें यज्ञ करणें, चोरी न करणें, सत्य भाषण आणि गोब्राह्मणांचें रक्षण हीं शूद्रांचीं लक्षणें होत. राजा, आतां

स्त्रीधर्म

सांगतों: स्त्रीनें पतिसेवा करावी; पतीला अनुकूल असें आचरण ठेवावें; त्याच्या बंधूंची शुश्रूषा ठेवावी; तो ज्या व्रतांचें पालन करीत असेल, तीं व्रतें पाळावीं; असतील ते अलंकार घालून नेहमीं सुशोभित असावें; घरांतील सर्व सामान घांसून स्वच्छ ठेवावें; झाडसारव करून रांगोळीचीं स्वस्तिकादि मंडलें काढून घर शृंगारावें; पतीला काय लागतील ते लहान मोठे पदार्थ वेळेवर देऊन त्यास संतुष्ट ठेवावें; आणि विनय, इंद्रियनिग्रह, सत्य व प्रिय भाषण, आणि निष्कपट प्रेम यांचे योगानें त्याची यथायोग्य कालीं सेवा करावी. अशी जी वागते, तिलाच साध्वी म्हणतात. तिनें नेहमीं संतुष्ट, विषयोपभोगांविषयीं अनासक्त व निरलस असावें. तिनें सावध, शुद्ध, धार्मिक व सत्यभाषणी राहून आपल्या पतीचें सेवन करावें. लक्ष्मी जशी श्रीहरीच्या सेवेमध्यें तत्पर असते, तशी पतीला आपलें दैवत मानून त्याच्या सेवेंत तत्पर असणारी स्त्री अंतीं पतीसह वैकुंठपदाप्रत जाते, व तेथें तीं उभयतां यथेच्छ उपभोग भोगितात.

हीन वर्णांचे धर्म.

धर्मराजा, अंत्यज[1], अंतेवसायी[2], प्रतिलोमज[3] व अनुलोमज[4] यांनीं वंशपरंपरा चालत आलेल्या साधनद्वारा आपली उपजीविका करावी. हिंसा आणि चौर्यकर्म परंपरा चालत आलें असलें तरी तें आचरूं नये. गुणस्वभावानुसार ज्याचा जो धर्म असेल, तोच त्यानें आचरण करावा. त्याच्या योगानें इहपरलोकीं सुख प्राप्त होतें, असें वेदवेत्त्या मुनींचें मत आहे. स्वाभाविक वृत्तीला अनुसरून स्वकर्माचरणानें वागणारा पुरुष जो असतो, त्याच्या सर्व कर्मांचा स्वाभाविक रीतीनेंच हळू हळू क्षय होऊन तो निर्गुणावस्थेला पोहोंचतो. राजा, दरसाल पेरणी होत गेली तर जमीन हळू हळू निःसत्त्व होत जाते; व शेवटीं ती अगदीं निरुपयोगी होऊन तिजमध्यें बीं देखील रुजत नाहीं; तद्वतच, वासनारूप विषय ज्यामध्यें वास करितात त्या मनाची स्थिति आहे. हें मन अतिशय भोग भोगिल्यावांचून विरक्त होत नाहीं. पहा—अग्नि हा थेंब थेंब तूप टाकिलें असतां पेटतच राहतो, परंतु त्यांत एकदम पुष्कळ तूप टाकिलें असतां तो शांत होतो; तसाच अतिशय भोग भोगिले म्हणजे कामाग्नि हा शांत होतो. राजा, तुला जे मीं वर्णबोधक धर्म सांगितले, ते धर्म जर दुसऱ्या एखाद्या वर्णाच्या पुरुषाच्या अंगीं दिसून आले, तर तो पुरुष त्या वर्णाचा समजावा. मनोनिग्रह वगैरे ब्राह्मणाचे गुण एखाद्या वैश्याच्या ठिकाणीं दिस-

१ रजक, चर्मक, नट, बुरूड, कोळी, मेद व भिल्ल २ चांडाल, पुल्कस, मांग वगैरे. ३. नीच वर्णाच्या पुरुषापासून उच्च वर्णाच्या स्त्रीच्या ठिकाणीं झालेले. ४. उच्च वर्णाच्या पुरुषापासून नीच वर्णाच्या स्त्रीच्या ठिकाणीं झालेले.

तील, तर तो वैश्य ब्राह्मणच होय असें समजावें. वर्णव्यवस्था ही जन्मावर अथवा वंशपरंपरेवर अवलंबून नाहीं;–ती व्यक्तींच्या गुणधर्मावर अवलंबून आहे!

## अध्याय बारावा.

—:०:—

### ब्रह्मचाऱ्याचे धर्म.

नारद म्हणाले:–धर्मा, ब्रह्मचाऱ्यानें इंद्रियदमन करून गुरुगृहीं वास करावा; सेवकाप्रमाणें अगदीं नमून वागावें; त्यांचें हित करीत जावें; त्यांजवर दृढ प्रेम ठेवावें; सकाळीं आणि सायंकाळीं गुरु, अग्नि, सूर्य व श्रीविष्णु यांची उपासना करावी; एकाग्र अंत:करणानें गायत्रीचा जप करून त्रिकाळ संध्या करावी; सूर्योदयीं आणि सूर्यास्तसमयीं संध्याकालनिमित्त मौन धारण करावें; गुरुजींनीं हांक मारिली, तरच जवळ जाऊन सुव्यवस्थित रीतीनें त्यांजपासून पाठ शिकावे; अध्ययनाच्या आरंभीं व अंतीं गुरुजींस नमस्कार करावा; शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें कटिसूत्र, व मृगचर्म, जटा, यज्ञोपवीत, दंडकमंडलु आणि हस्ताचे ठायीं दर्भ हीं धारण करावीं; सांजसकाळ भिक्षाटन करावें; त्यांत जें कांहीं प्राप्त होईल, तें गुरूंस अर्पण करावें; गुरुजींनीं आज्ञा दिली, तरच भोजन करावें; एखादे वेळीं आज्ञा न दिली तर त्या दिवशीं उपोषण करावें; ब्रह्मचाऱ्यानें सुस्वभावी, मिताहारी, दक्ष, जितेंद्रिय आणि श्रद्धायुक्त रहावें; स्त्रियांशीं अथवा स्त्रीलंपट पुरुषांशीं अवश्य कारणापुरतेंच भाषण करावें; त्यांनीं स्त्रियांच्या गोष्टी बोलूं नये; कारण, इंद्रियग्राम बलवान आहे; तो मोठमोठ्या जितेंद्रिय पुरुषांची देखील त्रेधा उडवून सोडतो! तसेंच, तरुण ब्रह्मचारी पुरुषानें आपले केस विंचरवून घेणें, अंगमर्दन करून घेणें, किंवा अभ्यंग वगैरे, गुरुपत्न्या अथवा इतर तरुण स्त्रिया यांजकडून कधींही करवून घेऊं नये; कारण, स्त्री प्रत्यक्ष अग्निरूप असून पुरुष हा तुपानें भरलेल्या घटासारखा आहे. पुरुषानें प्रत्यक्ष कन्येशीं देखील कारणापुरतें बोलावें. एकांतीं तर मुळींच बसूं नये. धर्मराजा, स्वस्वरूपाचा साक्षात्कार होऊन, हें सर्व आभासमात्र आहे असें जोंपर्यंत निश्चयात्मक वाटूं लागलें नाहीं, तोंपर्यंत हा जीव स्वतंत्र होत नाहीं; आणि म्हणूनच तावत्कालपर्यंत स्त्री आणि पुरुष ही भेदबुद्धि कायम राहते; याकरितांच हे सर्व प्रतिबंध सांगितले आहेत. ह्या सर्व गोष्टी गृहस्थ आणि यति यांनाही आवश्यक आहेत. गृहस्थाश्रमी पुरुषानें ऋतुकालीं स्वस्त्रीशीं गमन करावें; गुरूचा परामर्ष घ्यावा; परंतु संसार चालवून जर गुरूची उपजीविका चालविण्याचें त्याला सामर्थ्य असेल, तर त्यानें ती चालवावी; नाहींपक्षीं न चालविली तरी हरकत नाहीं. ब्रह्मचाऱ्यानें अंगाला किंवा डोक्याला तेल लावणें, अंग रगडून घेणें, स्त्रियांशीं भाषण करणें, स्त्रियांचीं चित्रें काढणें, मद्य किंवा मांस यांचें सेवन करणें, माळा, उटी, अलंकार वगैरे धारण करणें हीं सर्व कर्में वर्ज्य करावीं. द्विजांनीं गुरुगृहीं राहून उपनिषदें आणि अंगें यांसुद्धां तीनही वेदांचें आपल्या शक्त्यनुसार अध्ययन करावें आणि ज्ञान संपादन करावें. नंतर, आपलें सामर्थ्य असेल तर इच्छित गुरुदक्षिणा देऊन गुरूंचा संतोष करावा, आणि त्यांनीं आज्ञा दिली, तर गृहस्थ, वानप्रस्थ किंवा संन्यास आश्रम घ्यावा; अथवा नैष्ठिक ब्रह्मचारी होऊन गुरुगृहींच वास करावा; आणि अग्नीमध्यें, गुरूच्या ठायीं, स्वतांच्या ठिकाणीं व सर्व भूतांच्या ठायीं आश्रयभूत परमात्मा वास करीत आहे, अशी बुद्धि ठेवावी. धर्मराजा, कोणत्याही वर्णाश्रमाचा पुरुष, या धर्ममर्यादांचें पालन करून परमेश्वरस्वरूपीं रत राहील, तर त्यास ज्ञान उत्पन्न होऊन अंतीं मोक्षपद मिळेल. आतां

**वानप्रस्थाश्रमाचे धर्म** सांगतो: या धर्मांचें जो अवलंबन करितो, त्यास महर्लोकीं जाण्यास अगदीं आयास पडत नाहींत. राजा, वानप्रस्थाश्रमांतील पुरुषानें, जमीन नांगरून पिकविलेलें तांदूळ वगैरे धान्य व भाजीपाला वगैरे अन्य पदार्थ सेवन करूं नयेत. तसेंच, जमीन नांगरल्यावांचूनही अकालीं होणारीं म्हणजे एकदा कणसें काढून किंवा कापून घेतल्यावर मागाहून त्याच टोंबांवर आपल्या आपोआप पिकणारीं धान्यें किंवा दुसरे पदार्थ भक्षण करूं नयेत. ह्या आश्रमांतील मनुष्यास अग्नीवर शिजविलेलें अथवा कच्चें अन्न वर्ज्य आहे. त्यानें केवळ सूर्यकिरणांनीं परिपक्क होणारीं कंदमुळें सेवन करून निर्वाह करावा.

वानप्रस्थ मनुष्यानें चरुपुरोडाश करणें तो नीवार, कांग, देवभात इत्यादि वनधान्यांचा करावा. नवीन खाद्य पदार्थ प्राप्त झाले असतां जुने टाकून द्यावे; अन्नसंग्रह अगदीं करूं नये. पर्वताच्या गुहेचा किंवा पर्णकुटिकेचा आश्रय करावयाचा, तो तरी अग्निसंरक्षणाकरितांच. शीत, उष्ण, पर्जन्य, वायु, अग्नि, सूर्यताप इत्यादि सहन करण्याचा अभ्यास करावा; त्यांच्यापासून स्वतांचें रक्षण करण्याकरितां म्हणून गिरिकंदरांमध्यें किंवा उटजांमध्यें वस्ती करावयाची नाहीं. वानप्रस्थाश्रमी मनुष्यानें जटा धारण कराव्या; केश, रोम, नखें व श्म हीं वाढवावीं; शरीरावरील पेशिपिंड ( स्वाभाविक मळ ) काढण्याकरितां कृत्रिम साधनांचा उपाय करूं नये; वल्कलें, मृगचर्म, दंड व कमंडलु हीं धारण करावीं; अग्नीच्या आराधनेकरितां स्रुचि, स्रुवा इत्यादि परिच्छेद ग्रहण करावीं; व बुद्धिबळ ठाम राहून जितकीं वर्षे अशी तपश्चर्या करितां येईल तितकीं—बरा, आठ, चार, दोन, एक, इतकीं—वर्षे वानप्रस्थाश्रम चालवावा. वानप्रस्थाश्रमी मनुष्यास वार्धक्य किंवा व्याधि ह्यांच्या योगानें स्वकर्म अथवा ब्रह्माभ्यास करण्यास व्यत्यय येऊं लागेल, तर त्या वेळीं त्यानें निरशन करावें.

राजा, निरशन करून लंघन करितांना, प्रथम आत्म्याच्या ठायीं अग्नीची अधिष्ठापना करावी, आणि त्यांत अहंकार व ममत्वबुद्धि ह्यांचा लय करावा; नंतर जडतनूचा पंचमहाभूतांत विलय करावा; देहांतील नवद्वारांचें आकाशामध्यें मेळन करावें; शरीरस्थ पंचप्राणांचा वातावरणांत लोप करावा; रक्त, श्लेष्मा, पू वगैरे प्रवाही द्रव्यांचा जलामध्यें अंतर्भाव करावा; व अस्थिमांसादिक जड द्रव्यांचा पृथ्वीमध्यें समारोप करावा.

ह्याप्रमाणें स्थूलदेहाचा पंचमहाभूतांत न्यास केल्यावर सूक्ष्मदेहाचाही लय करणें इष्ट आहे. वाणी हें इंद्रिय व वाणीचें भाषणरूप फल ह्यांचा योग अग्नि देवतेमध्यें करावा; हस्तादिक अवयवांची क्रियाशक्ति व फलें हीं इंद्र देवतेच्या ठिकाणीं लीन करावीं; पाय व त्यांची शक्ति हीं विष्णुपदीं अर्पावीं; रति व उपस्थेंद्रिय हीं प्रजापति देवतेंत सामील करावीं; गुद व त्याचे व्यापार हीं मृत्यूकडे पोंहोंचवावीं; कर्णेंद्रिय व त्याचें फल नाद हीं दिशांत योजावीं; आणि त्वचा व तिचें सामर्थ्य वायु देवतेमध्यें मिळवून टाकावें. तसेंच, नेत्रेंद्रिय व त्याची शक्ति मार्तंडास अर्पण करावी; रसना व तिचें कार्य वरुण देवतेस देऊन त्यांचा जलांत लय करावा; आणि नासिका व तिचें फल हीं अश्विनीकुमारांस अर्पण करून त्यांचा पृथ्वींत लय करावा. मन व वासना ह्यांचा चंद्राच्या ठिकाणीं, बुद्धि व ज्ञान ह्यांचा ब्रह्मदेवाच्या ठिकाणीं, अहंकार व कर्म ह्यांचा शंकराच्या ठिकाणीं, चित्त

१ डोक्यावरील केश. २अंगावरील केश; लव इत्यादि. ३ यज्ञसमयां अग्नींत अभिमंत्रित तूप टाकण्याकरितां केलेलें लाकडाचें पळीसारखें पात्र हें बहुतकरून 'पलाश' किंवा 'खदिर' या वृक्षाचें केलेलें असतें. ४. पळीसारखेंच दुसरें एक यज्ञपात्र.

व चेतना ह्यांचा जीवाच्या ठिकाणीं, आणि माया व तिचे सत्त्वादिक गुण ह्यांचा निर्गुण परब्रह्माच्या ठिकाणीं पूर्ण लय करावा. धर्मराजा, शेवटीं पृथ्वीचा उदकामध्यें, उदकाचा तेजामध्यें, तेजाचा वायूमध्यें, वायूचा आकाशामध्यें, आकाशाचा अहंकारामध्यें, अहंकाराचा महत्तत्त्वामध्यें, महत्तत्त्वाचा मायेमध्यें, आणि मायेचा परमात्म्यामध्यें समारोप करावा. ह्याप्रमाणें सर्व उपाधींचा निरास झाला, म्हणजे चिन्मय आत्मा अवशिष्ट राहील; व तो तशा प्रकारें शेष राहिल्यावर संसारांतील त्रिविध तापांची त्यास मुळींच बाधा होणार नाहीं, आणि तो शांतिसुखांत सदैव निमग्न राहील!

## अध्याय तेरावा.

—:०:—

### चतुर्थाश्रमाचे धर्म व आचरण.

नारद म्हणाले:—धर्मराजा, व्याधिग्रस्त किंवा जरठ पुरुषानें काय करावें, तें सांगितलें. आतां, ज्ञानाभ्यासाचें सामर्थ्य ज्यास असेल, त्यानें कसें आचरण ठेवावें तें सांगतों. अशा प्रकारच्या पुरुषानें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें भावना धरून संन्यासदीक्षा ग्रहण करावी. नंतर, कोणतेही गांवांत एका रात्रीपेक्षां जास्त वेळ न राहतां पृथ्वीवर भ्रमण करीत असावें. दंड, कमंडलु आदिकरून चिन्हांशिवाय, दीक्षा धारण करण्याचे पूर्वीं ज्यांच्या त्याग केला असेल तीं चिन्हें स्वीकारूं नये. शीतज्वरादि आपत्कालीं मात्र तीं धारण करण्यास मोकळीक आहे. यतीनें नेहमीं नारायणस्वरूपीं लक्ष ठेवावें; त्यानें कोणाची संगति करूं नये; सर्वभूतीं सारखी दृष्टि ठेवून जीवमात्राशीं मित्रत्वानें वागावें; वृत्ति सदैव शांत असूं द्यावी; आणि कोणत्याही वस्तूचे ठिकाणीं आसक्ति ठेवूं नये. कार्य आणि कारण या दोहोंहून वेगळा जो आत्मा, तो अविनाशी असून त्याच्या ठिकाणीं हें विश्व कल्पनामय आहे, व कार्यकारणयुक्त संसारांत सर्व ठिकाणीं परमात्मा व्याप्त आहे, असें अवलोकन करावें. आतां, 'जीवात्मा बद्ध व परब्रह्म मुक्त' असतां त्या दोघांचें ऐक्य कसें? अशी याजवर कोणी शंका घेतील; तर तिचें निराकरण असें:—यतीनें निद्रा घेण्याचे पूर्वीं व जागेपणाच्या अंतीं जीवात्म्याचे स्वरूपाकडे लक्ष लावावें, आणि बंधमोक्ष हे केवळ काल्पनिक आहेत असें मानून, जीवात्म्याचे ठिकाणीं परब्रह्मरूप अवलोकन करावें. याचें कारण—निद्रावस्थेंत जीवात्मा अज्ञानानें व्याप्त असतो, आणि जागृतावस्थेंत विक्षेपाच्या योगेंकरून तो चंचल होतो. निद्रेच्या व जागेपणाच्या सांध्यांवर अज्ञान आणि विक्षेप यांपैकीं कोणताच उपाधि नसतो. त्या वेळीं आत्मतत्त्वावर लक्ष ठेवून विचार केला असतां, परब्रह्माचें व जीवात्म्याचें ऐक्य दिसून येतें. देहाला मृत्यु हा निश्चित आहे; म्हणून ह्या क्षणभंगुर देहाविषयीं आनंद अथवा अहंकार न बाळगितां, भूतांची उत्पत्ति व संहार करणारा जो काल, त्याची वाट पहात स्वस्थपणें कालक्रमणा करावी. ज्या शास्त्रांत आत्मप्रतिपादन केलेलें नसेल, तीं शास्त्रें यतीनें अगदीं वर्ज्य करावीं, त्यांजकडे मुळींच लक्ष पुरवूं नये; ज्योतिषादि विद्यांच्या योगेंकरून उपजीविका करूं नये; वितंडवाद उत्पन्न होईल असे तर्क काढीत बसूं नये; वृथा पक्षाभिमान धरूं नये; उगीच शिष्यशाखा जमवूं नये; नानाविध ग्रंथांचा अभ्यास करूं नये; व्याख्यानावर उपजीविका चालवूं नये; आणि कोणतेही ठिकाणीं मठ वगैरे बांधूं नयेत. धर्मराजा, परमहंस हा नेहमीं शांत व समदृष्टि असतो; अशा त्या महात्म्याचा आश्रम बहुतकरून धर्माचरणासाठीं नसतो. म्हणून त्यानें वाटल्यास दंडादि आश्रमचिन्हें लोकसंग्रहार्थ धारण करावीं, अथवा त्यांचा त्याग करावा. त्यानें ज्ञानप्राप्ति होईपर्यंतच हे नियम पाळावे; पुढें त्यास त्यांची

आवश्यकता नाहीं. पूर्ण ज्ञान झालें नाहीं तर यति कदाचित् योगभ्रष्ट होईल, म्हणून त्यानें आत्मानुसंधान बाळगून सतत आत्म्याचेच ठिकाणीं रत असावें; व आश्रमचिन्हें लोकांस दाखवूं नयेत. त्या बुद्धिमान पुरुषानें लोकदृष्टया उन्मत्त, वेड्यासारखें आणि विद्वान असूनही मुक्याप्रमाणें वागावें. हे कुरुकुलावतंसा धर्मराजा, याविषयीं तुला मी एक फार प्राचीन इतिहास सांगतों, तो ऐक

## अजगर मुनींची कथा.

भक्तश्रेष्ठ प्रल्हाद हा राज्य करीत असतां अजगर नांवाचे एक मुनि सह्य पर्वताजवळ कावेरी नदीचे तटाकीं वास करीत होते. ते सदोदित भूतलावर निजत, म्हणून त्यांचें शरीर नेहमीं धुळींत मळलेलें असे. त्या योगानें त्यांचें निर्मल तेज अगदीं झांकून गेलें होतें. प्रल्हाद हा नेहमीं आपल्या प्रधानांना बरोबर घेऊन, तत्त्व जाणण्याच्या इच्छेनें लोकांमध्यें फिरत असे. एके समयीं तो असाच फिरत असतां, अजगर मुनि त्याच्या दृष्टीस पडले. कर्म, आकृति, वाणी, वर्ण, आश्रम इत्यादि चिन्हांवरून, त्या मुनींविषयीं, लोकांना, हा सिद्ध आहे किंवा कोण आहे याची कांहींच कल्पना होत नसे. अशा त्या अजगर मुनींस पाहून भक्तश्रेष्ठ प्रल्हादानें त्यांचें पूजन केलें, आणि वंदन करून तत्त्वज्ञानाच्या इच्छेनें त्यांस प्रश्न केला.

### प्रल्हादाची अजगर मुनींस पृच्छा.

प्रल्हाद म्हणाला, "मुने, मनुष्याला भोग मिळाले तर त्याचें शरीर पुष्ट होतें, अन्यथा तें तसें होत नाहीं; द्रव्यसाधन असलें तरच भोग मिळतात, व द्रव्य तर उद्योग केल्याशिवाय मिळत नाहीं; आणि आपण तर या जागेवर बसून कांहीं उद्योग न करितां काळ कंठितां; तेव्हां, आपल्याजवळ द्रव्य आहे, व त्या योगें आपण भोग भोगितां, ही कल्पना निराधार होय; मग आपलें शरीर पुष्ट आहे हें कसें? त्यांतूनही, ज्याचे अंगीं सामर्थ्य नाहीं तो गृहस्थ सुद्धां द्रव्यार्जनासाठीं अतिशय खटपट करितो; आणि आपण तर चांगले दक्ष, चतुर, विद्वान आणि मनोरंजक कथा सांगणारे आहां; मग असे स्वस्थ पडून राहतां हें काय?" धर्मा, प्रल्हादाचें तें अमृतासारखें मधुर भाषण श्रवण करून अजगर मुनींनीं विस्मयपूर्वक हास्य केलें; आणि

### प्रल्हादास उत्तर

दिलें, "दैत्यराजा, तूं ज्ञानी पुरुषांना मान्य आहेस, तेव्हां प्रवृत्ति व निवृत्ति या दोन्ही मार्गांचीं फलें काय आहेत हें तुला ठाऊक असलेंच पाहिजे. तुझ्या हृदयांत प्रत्यक्ष नारायणरूप सूर्य वास करीत आहे, तेव्हां तुझ्या ठिकाणीं अज्ञानांधकाराची वार्ता सुद्धां नाहीं, हें उघड आहे. तथापि, हे राजा, तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें आम्हीं जशीं ऐकिलीं आहेत, तशीं देतों. कारण मुमुक्षु जनांत तूं अत्यंत श्रेष्ठ आहेस. राजा,

### कर्मांपासून अलिप्त राहण्याचें कारण

असें कीं, यथायोग्य उपभोगांनींहीं तृप्त न होणाऱ्या संसारप्रवाहांत आशेनें मला ढकलून दिलें, आणि नानाप्रकारचीं कर्में करवून अनेक योनींत मला जन्म घ्यावयास लाविलें. प्रल्हादा, मी बहुविध कर्में करीत असतां दैवयोगानें हा मानव जन्म पावलों आहें. राजा, हा मनुष्यदेह म्हणजे चहूंकडे जाण्याचा एक मार्गच होय. कारण, यांत धर्माचरण केलें तर स्वर्ग प्राप्त होतो; अधर्माच्या योगानें श्वान, सूकर इत्यादि जन्म प्राप्त होतात; धर्माधर्माचें समान आचरण घडलें, तर तोच जन्म फिरून येतो; आणि निवृत्तिमार्गाचें आचरण केलें तर मोक्ष मिळतो; परंतु अशाही मनुष्यजन्मांत येऊन, सुखप्राप्तीकरितां अश्रांत श्रम करणाऱ्या स्त्रीपुरुषांना दुःखरूप उलट फल मिळतें हें जेव्हां मीं पाहिलें, तेव्हां त्या कर्मांपासून मी निराळा राहिलों! उगीच 'सुख, सुख' करीत कां भटकत फिरावें? राजा, जीवाचें जें स्वरूप, तेंच सुख होय कर्म-

निवृत्ति झाली म्हणजे तें आपोआप प्रकाशमान होतें. मनःकल्पित भोग अशाश्वत आहेत हें जाणूनच त्यांचा त्याग करून, प्रारब्धकर्मभोग भोगीत मी येथें स्वस्थ पडलों आहें. प्रल्हादा,

### संसारी पुरुषांचीं दुःखें

काय वर्णन करावीं? स्वतांजवळ सुखरूप पुरुषार्थ वास करीत असूनही पुरुष तो विसरून जातो, आणि मग जन्ममरणादिकांनीं युक्त अशा त्या भयंकर संसारसमुद्रांत पतन पावतो! शेवाळ, गवत वगैरेंनीं आच्छादित असलेल्या वास्तविक जलाचा त्याग करून अज्ञानी पुरुष मृगजलाकडे धाव घेतो, आणि शेवटीं फसतो, त्याप्रमाणें, प्रत्येक वस्तूच्या ठिकाणीं आच्छादित असलेलें आत्मसुख प्राप्त करून घेण्याचें सोडून देऊन प्राणी भोगादि सुखांकडे धाव घेतो, आणि शेवटीं फसतो! राजा दैवाधीन असणारे जे देहादि विषय, त्यांच्या योगानें प्राणी सुखप्राप्तीसाठीं आणि दुःख निवृत्तिसाठीं अनेक यत्न करितात; पण दैव प्रतिकूल असल्यामुळें ते सर्व निष्फळ होतात. कदाचित् ते यत्न सफल झाले तरी त्यांजपासून कांहीं उपयोग आहे का? कांहीं सुद्धां नाहीं! कारण, आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक दुःखांनीं गांजलेल्या प्राण्यांस, संकटानें प्राप्त करून घेतलेले उपभोग आणि ऐश्वर्य यांजपासून कितीसें सुख होणार? श्रीमान पुरुष देखील दुःखी असतात असें आपण पाहतों. त्यांना द्रव्यलोभ अतिशय असतो; इंद्रियनिग्रह होत नाहीं; सर्वविषयीं त्यांचें मन शंकित असतें; आणि इतकें असूनही नेहमीं भयादिक दुःखें पुढें उभीं असतातच! जगण्याची इच्छा करणाऱ्या द्रव्यलोभी श्रीमानाला राजा, चोर, शत्रु, स्वजन, पशु, पक्षी, याचक व काळ यांजपासून आणि स्वतांच्या मतिभ्रंशाच्या शंकेपासूनही नेहमीं भय प्राप्त होतें. राजा, ज्यामुळें शोक, भय, क्रोध, मोह, हानि, दैन्य, श्रम इत्यादि संकटें भोगावीं लागतात, त्या द्रव्याचा आणि प्राणाचा शहाण्या मनुष्यानें मोह धरूं नये. भक्तश्रेष्ठा, मीं या जगांत

### दोन उत्तम गुरु

पाहिले. त्यांच्यापासून प्राप्त झालेल्या ज्ञानानुसार माझें वर्तन असतें. त्यांपैकीं एक मधमाशी व दुसरा अजगर. मधमाशी जसा मधाचा संचय करिते, व तो मध दुसराच कोणी घेऊन जातो, तसा मनुष्यही अनेक संकटें सोसून द्रव्यार्जन करितो, आणि तें तिसराच कोणी तरी उपटून नेतो! म्हणून मधमाशीजवळून मी वैराग्यवृत्ति शिकलों; आणि अजगरापासून सर्वदा संतुष्ट अशी वृत्ति (अजगरवृत्ति) स्वीकारिली. प्रल्हादा, अजगराप्रमाणें मी कांहींही उद्योग न करितां स्वस्थ पडून राहतों. अनायासें मिळेल तेवढें मी ग्रहण करितों, व कांहींएक न मिळाल्यास अजगराप्रमाणेंच धैर्य धरून स्वस्थ पडला राहतों.

### अजगर मुनींची स्थिति.

प्रल्हादा, एखादे वेळीं थोडें, एखादे वेळीं पुष्कळ, एखादे वेळीं स्वादिष्ट, एखादे वेळीं बेचव, कधीं उत्तम, कधीं कनिष्ठ असें जें मिळेल तें अन्न मी भक्षण करितों. कोणी तें सन्मानपूर्वक व कोणी कुत्सित बुद्धीनें आणितो, तरी मला त्याचें कांहीं नाहीं; मी दोहोंचाही स्वीकार करितों. मला कधीं दिवसा जेवावयास मिळतें, कधीं रात्रीं मिळतें, आणि कधीं मुळींच मिळत नाहीं. एखादे दिवशीं दिवसास दोनदां जेवावयाचा प्रसंग येतो, व कधीं कधीं रात्रीं सुद्धां असेंच होतें. महावस्त्र, कद, तागाचें वस्त्र, वल्कल, चिंध्या—काय सांपडेल तें मी पांघरतों; कारण, प्रारब्धकर्माप्रमाणें फलोपभोग घेत मी संतुष्ट असतों. मी कधीं भूमीवर, कधीं गवतावर, कधीं पाचोळ्यावर, कधीं पाषाणावर, कधीं धुळीमध्यें, तर कधीं दुसऱ्याच्या इच्छेनें राजाच्या पलंगावरही शयन करितों. तसेंच, हे प्रल्हादा, दुसऱ्याच्याच इच्छेनें मी कधीं उटी

लावून स्नान करितों; आणि माळा व अलंकार धारण करून कधीं रथ, अश्व, गज यांजवर आरोहण करून संचार करितों; आणि कधीं कधीं तर नग्न असून केवळ पिशाचाप्रमाणें भटकत फिरतों! राजा, जन वेगळाल्या स्वभावांचे आहेत. त्या विषम जनांची मी स्तुति अथवा निंदा कांहींच करीत नाहीं; उलट त्या सर्वांना मोक्षप्राप्ति व्हावी असें इच्छितों. हे राजा,

मुनीचें आचरण कसें असावें

तें ऐक. सत्यदर्शी मुनीनें प्रथम मनोवृत्तीचे ठिकाणीं जातिरूपादिक भेदाचें ऐक्य करावें; मनाच्या ठिकाणीं देहबुद्धि, आत्मबुद्धि वगैरे भ्रांति असते, त्या भ्रांतिरूप मनोवृत्तीचा मनांत लय करावा; मनाचा अहंकारांत विलय करावा; अहंकाराला महत्तत्त्वद्वारा मायेचे ठायीं विरवावें; आणि मायेला आत्मानुभवाच्या आनंदांत लीन करावें. राजा, मुनीनें याप्रमाणें वागून सर्व व्यापार बंद ठेवावे, आणि स्वानुभवाच्या योगानें स्वस्वरूपीं स्थित होऊन विराम पावावें. प्रल्हादा, मंदबुद्धि लोकांना शास्त्रबाह्य आणि विलक्षण वाटणारें जें माझें हें चरित्र, त्याचें खरें स्वरूप तूं महाभगवद्भक्त असल्याकारणानें तुला सांगितलें."

नारद म्हणाले:—धर्मा, याप्रमाणें प्रल्हादानें परमहंसाचे धर्म ऐकिले, तेव्हां त्यास फार संतोष झाला; आणि अजगर मुनींची पूजा करून त्यानें स्वस्थानीं गमन केलें.

## अध्याय चौदावा.

—:०:—

### गृहस्थाश्रमी पुरुषाचे धर्म.

धर्मराज म्हणाला:—नारद मुने, एखादा गृहस्थाश्रमी पुरुष जर मूढ बनला असेल, तर त्याला कोणत्या धर्माच्या आचरणानें तें मोक्षपद अनायासें प्राप्त होईल, तें मला कथन करावें.

नारद म्हणाले:—धर्मा, गृहस्थानें आपल्या आश्रमाला उचित अशीं कर्मे आचरून तीं भगवंताला अर्पण करावीं, आणि मोठमोठ्या मुनींचें सेवन करावें. नेहमीं भगवद्भक्तांच्या समागमांत असावें, आणि कर्मानुष्ठाच्या कालाखेरीज जो काळ जाईल, तो भगवंताच्या कथाश्रवणांत आणि नामस्मरणांत घालवावा. स्त्री, पुत्र, शरीर इत्यादिकांचा वियोग काळगतीनें स्वभावतःच होतो हें नेहमीं ध्यानांत ठेवून, स्वप्नगत पदार्थावरील आसक्ति आपण जशी सोडून देतों, तशी गृह, स्त्री, पुत्र इत्यादिकांवरील आसक्ति सत्समागमाच्या योगानें हळू हळू सोडून द्यावी. बुद्धिमान पुरुषानें शरिराशीं आणि गृहादिकांशीं आवश्यक तेवढाच संबंध ठेवावा, आणि अंतर्यामीं प्रपंचाविषयीं अगदीं विरक्त असावें. मात्र वैराग्याचें ढोंग माजवून, उगाच लोक गोळा होणार नाहींत, अशी खबरदारी घ्यावी. बाह्यात्कारीं प्रपंचावर आसक्ति ठेवून लोकांत वागावें. ज्ञातिजन, मातापितर, इष्टमित्र, पुत्रभ्राते इत्यादि सर्व जन जें जें कांहीं बोलतील अथवा इच्छितील, त्या त्याविषयीं ममता न धरितां त्यास अनुमोदन द्यावें. कोणाचाही अभिमान न बाळगितां गृहांतील वस्तूंनीं त्यांची इच्छा पुरवावी. राजा, गृहस्थानें जलवृष्टीपासून उत्पन्न झालेलें धान्य वगैरे, भूमिगत द्रव्य, अथवा अयाचित प्राप्ति या तिहींचा स्वीकार करून, आपल्या कर्मांचें आचरण करावें. राजा, उदरनिर्वाहास जितकें लागेल, तितक्यावरच पुरुषाचें स्वामित्व आहे; त्यापेक्षां अधिकावर सत्ता ठेवणारा पुरुष चोर होय. म्हणून दैवयोगानें जरी पुष्कळ धन मिळालें, तरी त्याजवर आसक्ति ठेवूं नये. मृग, उंट, गाढव, वानर, उंदीर, साप, पक्षी, माशा यांजवर सुद्धां आपल्या पोटच्या पोरांप्रमाणें प्रेम करावें. त्यांच्यांत आणि आपल्या लेंकरांत काय अंतर आहे? गृहस्थाश्रमी पुरुषानें कष्टानें द्रव्य संपादून धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थांचें आचरण करूं नये. दैववशात् जें प्राप्त होईल

तेवढ्यांतच हे तीन पुरुषार्थ साधावे. श्वान, पतित आणि चांडाळ यांना सुद्धां अन्नादि वस्तु यथायोग्य वांटून द्याव्या, आणि आपल्या अत्यंत प्रिय अशा धर्मपत्नीला देखील अतिथिअभ्यागतांच्या सेवेला लावावें. ज्या स्त्रीच्या प्रेमपाशांत बद्ध होऊन, वेळ पडल्यास मनुष्य प्राण सुद्धां देतो, व प्रसंगीं गुरूचा किंवा पित्याचा वध करण्यास मागेंपुढें पहात नाहीं, त्या स्त्रीवरील 'अभिमान' सोडून द्यावा. ईश्वरास जिंकणें दुर्घट खरें, पण अशा रीतीनें वागणारांच्या तो अधीन असतो. शरिराचा परिणाम कीटक, विष्ठा किंवा राख ह्यांपैकीं कांहीं तरी व्हावयाचा, हें निश्चयात्मक होय. तेव्हां अशा ह्या तुच्छ शरिराच्या किंचिन्मात्र सुखाचें साधन जी बायको, ती कोणीकडे ? व स्वतांच्या महिम्यानें ब्रह्मांडाला व्यापून टाकणारा तो आत्मा कोणीकडे ! म्हणून मनुष्यानें गृहादिकांवरील ममता सोडून आत्मप्राप्तीचा यत्न करावा. दैवयोगानें प्राप्त झालेल्या अन्नादिकांच्या योगानें पंचमहायज्ञादि कर्में करून, जें अवशिष्ट राहील त्यावर निर्वाह करावा, आणि बाकीच्यावरील आसक्ति सोडावी. धर्मराजा, याप्रमाणें जो पुरुष वागेल, तो परमहंसगतीला जाईल. मनुष्यानें आपल्या धंद्यांत मिळालेल्या द्रव्याच्या योगानें देव, ऋषि, पितर, मनुष्यें आणि भूतें यांना पंचमहायज्ञांच्या योगानें संतुष्ट करून उरेल त्यांत आपला निर्वाह करावा. अशा प्रकारें पंचमहायज्ञांच्या योगानें या पांचांचें आणि जठराग्नीच्या शांतीच्या योगानें अंतराधिष्ठ जो परमात्मा त्याचें आराधन करावें. जर सर्व यज्ञसाधनें अनुकूल असलीं, तर ग्रंथोक्त विधीनें अग्निहोत्रादि यज्ञ करावे; पण त्याविषयीं फारच हेका धरूं नये. कारण, ब्राह्मणभोजन केलें असतां परमेश्वर जितका संतुष्ट होतो, तितका यज्ञकुंडांतील आहुतींनीं होत नाहीं. म्हणून ब्राह्मण, देव, ऋषि इत्यादिकांना संतुष्ट करून अंतरात्म्याचें पूजन करीत जावें. त्यांतही ब्राह्मणांचें पूजन आधीं करावयाचें हा नियम नेहमीं लक्षांत बाळगावा. राजा, आतां तुला

### श्राद्धदिवस

सांगतों: ज्यास द्रव्यानुकूलता असेल, त्यानें आपलीं मातापितरें आणि तत्संबंधी जे आप्त—चुलता, आजी, आत वगैरे, त्यांचें भाद्रपद वद्य पक्षीं महालयश्राद्ध करावें. अयन (दक्षिण आणि उत्तर), मेष अथवा तूळ संक्रांतीचा दिवस, व्यतीपात, क्षयतिथि, सूर्य-चंद्र ग्रहण, श्रवणनक्षत्रयुक्त द्वादशी, अक्षय्यतृतीया, कार्तिक शुद्ध नवमी, हेमंत व शिशिर ह्या ऋतूंतील चार चार अष्टम्या, माघांतील प्रथम सप्तमी, मघायुक्त राका[1], मघा किंवा मासनक्षत्र[2] ह्यानें युक्त अशी अनुमति[3], अनुराधा, श्रवण, उत्तरा, उत्तराषाढा व उत्तराभाद्रपदा यांपैकीं एखाद्या नक्षत्रानें युक्त अशी द्वादशी, उत्तरा, उत्तराषाढा व उत्तराभाद्रपदा ह्यांपैकीं एकानें तरी युक्त अशी एकादशी, आणि आपलें जन्मनक्षत्र किंवा श्रवण हीं ज्या दिवशीं असतील त्या दिवशीं गृहस्थाश्रमी पुरुषानें श्राद्ध करावें. राजा, मनुष्याच्या कल्याणवृद्धीकरितां हे योग मोठे श्रेष्ठ आहेत. त्या त्या काळीं इतर धर्मकृत्यें करूनही आयुष्यसाफल्य करावें. हे योग ज्या दिवशीं असतील त्या दिवशीं स्नान, होम, जप वगैरे कांहीं धर्मकृत्य अथवा देव, ऋषि, पितर इत्यादिकांच्या उद्देशानें कोणतेंही सत्कृत्य केलें असतां, तें अक्षय फलदायक होतें. तसेंच, आपल्या स्त्रियेच्या पुंसवनादि

---

१ ज्या पौर्णिमेला चंद्रबिंब पूर्ण कलांनीं युक्त असतें, ती पौर्णिमा. २ पौर्णिमेच्या दिवशीं येणाऱ्या नक्षत्रांवरून महिन्यांचीं नांवें पडलीं आहेत. तीं अशीं: चित्रांवरून चैत्र; विशाखांवरून वैशाख; ज्येष्ठांवरून ज्येष्ठ; आषाढांवरून आषाढ; श्रवणांवरून श्रावण; भाद्रपदांवरून भाद्रपद; अश्विनींवरून आश्विन; कृत्तिकांवरून कार्तिक; मृगांवरून मार्गशीर्ष; पुष्यांवरून पौष; मघांवरून माघ; आणि फाल्गुनींवरून फाल्गुन. ३ ज्या पौर्णिमेस चंद्रबिंब एक कलेनें कमी असतें, ती पौर्णिमा.

संस्काराचे दिवशीं, पुत्राच्या जातकर्मादि संस्काराचे दिवशीं, यज्ञदीक्षेचे समयीं, प्रेतदहनाचे दिवशीं, क्रियाकर्मांतराचे व वर्षश्राद्धाचे दिवशीं, आणि इतर मंगल कार्यांचे दिवशीं मनुष्यानें धर्माचरण करून पुरुषार्थांचें संपादन करावें. राजा, आतां

धर्माचरणास योग्य देश

कोणते तें सांगतों: चराचर विश्वस्रष्ट्या परमेश्वराची केवळ मूर्ति, आणि तप, विद्या, क्षमा, दया इत्यादि गुणांनीं युक्त व श्रुतिस्मृत्यादिकांमध्यें पारंगत असे सत्पात्र विद्वान ब्राह्मण जेथें वास करीत असतील, तो देश धर्मकृत्यें करण्यास योग्य होय. तसेंच, ज्या ठिकाणीं नेहमीं श्रीहरीचें पूजन होत असेल तो प्रदेश, त्याप्रमाणेंच गंगा, यमुना इत्यादि पुराणप्रसिद्ध नद्या, पुष्करादि पवित्र सरोवरें, साधुजन वास करीत असतील तीं क्षेत्रें, कुरुक्षेत्र,गया,प्रयाग, पुलहाश्रम, नैमिषारण्य, फाल्गुनक्षेत्र, सेतुप्रभास. द्वारका, वाराणसी,सेतु, मथुरा, पंपा व बिंदु हीं सरोवरें, बदरिकाश्रम, नंदा नदी, सीतेचा आणि रामाचा आश्रम, महेंद्रमलयादि सर्व कुलपर्वत[1], आणि ज्या ठिकाणीं श्रीहरीच्या स्थिर प्रतिमा असतील ते देश हीं सर्व स्थानें अत्यंत पुण्यप्रद होत. मनुष्यानें वारंवार तेथें जाऊन धर्माचरण करावें. त्या ठिकाणीं केलेलीं धर्मकृत्यें इतर स्थलीं केलेल्या धर्मकृत्यांपेक्षां सहस्रपट अधिक फलदायक असतात. राजा, मोठमोठ्या ज्ञात्या पुरुषांनीं जो

सत्पात्रनिर्णय

करून ठेविला आहे, त्यांत, हें चराचर विश्व ज्याचें स्वरूप होय, तो भगवान परमात्माच एक सत्पात्र होय, असें त्यांनीं वर्णिलें आहे. म्हणूनच तुझ्या राजसूय यज्ञाचे वेळीं, सनत्कुमारादि मोठमोठे ब्रह्मनिष्ठ मुनि प्राप्त झाले असतांही 'श्रीकृष्णच अग्रपूजेला सत्पात्र होय;' असें सर्व ब्राह्मणांनीं ठरविलें. ह्या जीवसमुदायांनीं युक्त असा जो ब्रह्मांडवृक्ष, त्याचें मूळ हा श्रीकृष्ण परमात्माच आहे. त्याला संतुष्ट केलें म्हणजे सर्व जीवांना व स्वतः आपल्यालाही संतुष्ट केल्यासारखें होतें. यानेंच मनुष्य, देव, तिर्यग्योनि, ऋषि इत्यादि पुरें ( शरीरें ) निर्माण केलीं असून त्यांत हा जीवरूपानें वास करितो. म्हणूनच ह्याला 'पुरुष' असें म्हणतात. राजा, ह्या सर्व शरीरांचे ठायीं तो कमीजास्त प्रमाणानें—अंशानें—राहतो; म्हणून ज्या स्थलीं ज्ञानाचा—परमेश्वराचा—अंश विशेष असेल, तें स्थल अधिक सत्पात्र होय असें समजावें. राजा, असे सत्पात्र ब्राह्मण—प्रत्यक्ष परमेश्वराचे अंश—भूतलावर विद्यमान असतां

लोक मूर्तिपूजा कां करितात

असें कदाचित् तूं म्हणशील, तर तेंही सांगतों, ऐक. त्रेतायुगामध्यें लोक एकमेकांचा द्वेष करूं लागले; त्या वेळीं, उपासनामार्ग अव्यवस्थित होऊं नये म्हणून बुद्धिमान पुरुषांनीं मूर्ति उत्पन्न केल्या. तेव्हांपासून कित्येक लोक मूर्तींवर श्रद्धा ठेवून पूजासाहित्येंकरून श्रीहरीची आराधना करून उपासना करितात. राजा, मूर्तीची पूजा तर करायाची, व मनुष्यांचा द्वेष केल्याशिवाय तर रहावयाचें नाहीं, तेव्हां त्या मूर्तिपूजेचा काय उपयोग? तें सर्व निष्फल आहे असें समजावें. सर्व मनुष्यांशीं समदृष्टीनें वागेल, तर मंदाधिकारी सुद्धां मूर्तिपूजेच्या योगें तरून जाईल. राजा, मनुष्यांत सुद्धां तपस्वी, ज्ञानी, सदा संतुष्ट आणि हरीचें स्वरूप जे वेद ते धारण करणारा जो ब्राह्मण, तोच सत्पात्र होय. राजा, ब्राह्मणांची इतकी योग्यता आहे कीं, प्रत्यक्ष भगवान कृष्ण देखील त्यांस अत्यंत पूज्य मानितो; त्यांच्या चरणधूलीच्या स्पर्शानें त्रिजगत पवित्र होतें.

---

१ महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमान् ऋक्षपर्वतः।
विंध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः॥

# अध्याय पंधरावा.

—:०:—

## श्राद्धव्यवस्था.

नारद म्हणाले:—धर्मराजा, कित्येक ब्राह्मण कर्मनिष्ठ असतात; कित्येक अध्यापनाविषयीं तत्पर असतात; आणि कित्येक ज्ञानमार्गांत व योगमार्गांत निमग्न असतात. ज्या पुरुषाला मोक्षप्राप्तीची इच्छा असेल, त्यानें पितरांच्या उद्देशानें देण्यास योग्य जें कव्य अन्न, आणि देवांच्या उद्देशानें देण्यास योग्य जें हव्य अन्न, तें ज्ञाननिष्ठ ब्राह्मणाला द्यावें; आणि जर कदाचित् तसा ब्राह्मण न मिळाला, तर साधारण चांगला ब्राह्मण पाहून त्याला द्यावें. त्यांत देवस्थानीं दोन आणि पितृस्थानीं तीन ब्राह्मण बसवावे; किंवा दोहों ठिकाणीं एकेकच बसवावा. मनुष्यानें, सामर्थ्य असलें तरी, श्राद्धाच्या ब्राह्मणांचा विस्तार करूं नये. आप्त सुहृत् व इष्टमित्र बोलवावयाचे, ते तरी ब्राह्मण म्हणून बोलावूं नयेत. कारण, आप्तांना बोलावून मग त्यांचे जे कोणी जवळचे नातलग असतील त्यांना कसें वगळावें? एतावता, देशकालानुरूप श्रद्धा, द्रव्य, पात्र, अर्घ्य इत्यादिकांच्या योगें श्राद्ध विधि यथासांग पार पडण्याकरितां उत्तम सत्पात्र ब्राह्मण बोलावून त्यांसच पितृस्थानीं आणि देवस्थानीं बसवावें. देव, ऋषि, पितर, भूतें व आप्तजन या सर्वांच्या ठिकाणीं ईश्वरबुद्धि ठेवून त्यांना श्राद्धदिवशीं उत्तम अन्न भोजनास वाढून संतुष्ट करावें. धर्मतत्त्वावर लक्ष देऊन श्राद्धाच्या दिवशीं ब्राह्मणांनाही मांस घालूं नये, व स्वतः आपणही भक्षण करूं नये. ऋषींना तंडुलादिकांचें जें अन्न प्रिय असतें, तें देवादिकांनाही प्रिय असतें. ऋषींप्रमाणें देवांनाही पशुहिंसा समाधानकारक नाहीं. प्राणिमात्राला काया, वाचा व मन यांपैकीं कशानेंही पीडा न देणें यासारखा उत्तम धर्म नाहीं; आणि म्हणूनच कित्येक यज्ञवेत्ते ज्ञानी पुरुष, आत्मज्ञानानें प्रज्वलित केलेल्या मनोनिग्रहरूप अग्नीच्या ठिकाणीं कर्मांचें हवन करितात; म्हणजे मनोनिग्रह करून बाह्य कर्मांचा त्याग करितात, आणि यज्ञयागादिकांच्या व्यर्थ खटाटोपीपासून दूर राहतात. राजा, एखाद्यानें पशुयज्ञ करण्यास आरंभ केला कीं, त्या आत्मतत्त्व न जाणणाऱ्या यज्ञकर्त्याला पाहून सर्व प्राण्यांना त्याचें भय वाटतें. त्यांना असें वाटतें कीं, हा पोटभरू निर्दय आतां आम्हांला मारील! म्हणून, राजा, धर्मतत्त्व जाणणाऱ्या पुरुषानें दैवयोगानें प्राप्त झालेल्या तंडुलादि अन्नावर संतुष्ट रहावें, आणि प्रतिदिवशीं नित्यनैमित्तिक कर्में संतोषानें आचरण करावीं.

## अधर्मविचार.

धर्मराजा, धर्मज्ञ पुरुषानें, निषिद्ध कर्मांचा ज्याप्रमाणें त्याग करावयाचा, त्याचप्रमाणें विधर्म, परधर्म, आभास, उपमा आणि छल या पांच अधर्मांचा त्याग करावा. सद्बुद्धीनें एखादें अनुष्ठान करूं लागलें असतां त्यापासून जर स्वधर्मास बाध येतो, तर तो 'विधर्म' होय; एका वर्णाला विहित असलेला धर्म दुसऱ्या वर्णानें स्वीकारणें हा 'परधर्म' होय; पुष्कळ धर्म घडावा या इच्छेनें परधर्मांतील कर्म करणें हा 'आभास' होय; वेदविरुद्ध जो पाखंडी धर्म, ती 'उपमा' होय; आणि धर्मवाक्यांतील शब्दांचे भलतेच अर्थ करणें म्हणजे 'छल' होय!

धर्मा, निर्धन पुरुषानें धर्म करण्याकरितां किंवा यात्रा करण्याकरितांही द्रव्य मिळविण्याविषयीं कष्ट करूं नयेत. अजगर कांहीं उद्योग न करितां स्वस्थ पडून राहतो, तरी त्याचा निर्वाह चालतो; तसा निरिच्छ पुरुष कांहींएक मिळण्याची खटपट करीत नसला तरी त्याचा निर्वाह चालतो. जो नेहमीं निरिच्छ, संतुष्ट व स्वात्मसुखीं रममाण असतो, त्या पुरुषाला जें

सुख मिळतें, तें नानाप्रकारच्या उपभोगांविषयीं जिवापाड श्रम करणाराला देखील मिळत नाहीं. राजा, रतिसुखासाठीं किंवा जिव्हातृप्तीसाठीं कुत्र्यासारखें दुसऱ्याच्या मर्जीप्रमाणें वागण्यापेक्षां उदक प्राशन करून निर्वाह करणें संतुष्ट जनांना सुखकर वाटतें. इंद्रियाधीन व असंतुष्ट अशा ब्राह्मणाचें तेज, विद्या, तप व यश हे गुण लयास जातात, आणि तो ज्ञानशून्य होतो. क्षुधा व तृषा यांची निवृत्ति झाली असतां 'काम' नाहींसा होतो; ज्या कारणानें क्रोध प्राप्त झाला असेल, तें कारण संपलें असतां 'क्रोध' नाहींसा होतो; पण दाही दिशा जिंकून सर्व पृथ्वी उपभोगायास मिळाली, तरी 'लोभ' नाहींसा होत नाहीं! या असंतोषाच्या पायीं मोठमोठे ज्ञाते पुरुषही नरकांत पडतात! आतां

**कामादिकांचा जय कसा करावा**

तें सांगतों: धर्मराजा, संकल्पाचा त्याग करून कामाचा पराजय करावा. कामाचा मोड झाला असतां क्रोध नाहींसा होतो. सर्व विषय अनर्थावह आहेत, अशी बुद्धि ठेविली असतां लोभाचा नाश होतो. सर्व जग आत्मस्वरूपीं विद्यमान आहे, असा तत्त्वविचार केला असतां भीति नष्ट होते. आत्मानात्मविवेकानें शोक आणि मोह नाहींतसे होतात. साधु पुरुषांची सेवा केली असतां दंभ नाहींसा होतो. मौनधारणेच्या योगानें योगाभ्यासाला येणारीं विघ्नें दूर होतात. शरिरादिकांची इच्छा सोडिली असतां हिंसा घडत नाहीं. दुसऱ्यानें अपकार केला असतां त्याजवर उपकारच करावे, म्हणजे तो आपल्याला पीडा देत नाहीं. समाधीच्या योगानें मनाचे ताप दूर होतात. प्राणायामादि योगबळाच्या योगानें शरीरजन्य दुःखें होत नाहींत. सत्त्वासेवनानें सत्त्वगुणाची वृद्धि होऊन त्याच्या योगें रज व तम या गुणांचा नाश होतो. मनोनिग्रह केला असतां सत्त्वगुण स्थिर होतो; आणि गुरुकृपेच्या योगें मनाचा अनायासें निग्रह करितां येतो. राजा, हें उज्ज्वल ज्ञान प्राप्त करून देणारा जो 'गुरु' तो प्रत्यक्ष परमेश्वर होय. तो मनुष्य आहे अशी बुद्धि धारण करणारे जे पुरुष, त्यांचें अध्ययन गजस्नानाप्रमाणें व्यर्थ होय. राजा, ह्या श्रीकृष्णाला लोक मनुष्य असें समजतात, पण हा मनुष्य नसून प्रकृतिपुरुषांचा नियामक भगवान होय. मोठमोठे योगी याच्या चरणदर्शनाची इच्छा करितात. राजा, शास्त्रांतील सर्व नियमविधि षड्रिंद्रियवर्गाचें संयमन करण्यामध्येंच पर्यवसान पावतात; वास्तव, तें होऊनही योगसिद्धि न घडेल, तर ते विधि केवळ श्रम देणारेच होत. राजा, कृषिकर्मादिक व्यवसाय जसे मनुष्याला संसारांत अधिकाधिक टाकितात, तसे इष्टापूर्तादिक धर्मविधि सुद्धां बाह्यदृष्टि पुरुषाला संसारातच अधिकाधिक टाकितात!

**योगाभ्यासी पुरुषाचें आचरण.**

नारद पुढें सांगतात:—धर्मराजा, जो पुरुष चित्त जिंकण्याची इच्छा करील, त्यानें सर्वसंगपरित्याग करून संन्यासग्रहण करावें; त्यानें कशावरही आसक्ति ठेवू नये; संग्रह करण्याची वासना सोडून द्यावी; एकटें रहावें; एकांतात बसावें; व भिक्षा मागून निर्वाह चालवावा. ज्याला योगाभ्यास करावयाचा असेल, त्यानें सपाट व शुद्ध जागेवर स्थिर, समान व सुखावह आसन घालून त्यावर बसावें, आणि मुखानें ॐकाराचा जप करावा. नंतर नासिकाग्रीं दृष्टि लावून मन विषयरहित होईपर्यंत पूरक, कुंभक आणि रेचक या प्राणायामांच्या योगानें प्राण व वायु यांचा निरोध करावा; आणि विषयलुब्ध मन इकडे तिकडे जाऊं लागेल, तर ज्ञानी पुरुषानें त्याला तेथून माघारें वळवून हळू हळू हृदयांतच स्थिर करावें. अशा रीतीनें निरंतर अभ्यास करणाऱ्या यतीचें चित्त, इंधनें संपलीं म्हणजे जसा अग्नि शांत होतो तसें शांत होऊन जातें; आणि

मग तो विषयपराङ्मुख व शांतचित्त योगी ब्रह्मानंदीं मग्न होऊन फिरून कधींही विषयासक्त होत नाहीं. धर्मराजा, आतां संन्यास घेऊनही जर कोणी विषयभोगांची इच्छा करील, तर तो 'ओकलेलें' भक्षण करणारा निर्लज्ज होय! कारण, ज्या पुरुषानें देहाला अनात्मा, नाशिवंत व विष्टा, कीटक किंवा भस्म म्हणून मानून त्याच्याविषयीं आसक्ति सोडिली, त्याच पुरुषानें देहाचा पुनः गौरव करून त्यास आत्मतुल्य मानणें हें किती नीच आहे? पहा—ब्रह्मचारी जर आपल्या व्रतांचा त्याग करील, गृहस्थ जर कर्ममार्ग सोडील, वानप्रस्थ जर गांवांत येऊन राहील, आणि यति जर इंद्रिसुखाची इच्छा करील, तर हे सर्व व्यवसाय आपापल्या आश्रमाला कलंक लावणारे होत. असें समजावें. असले हे दांभिक पुरुष भ्रष्ट व मायावश झाले आहेत, असें मानून केवळ दयेमुळें त्यांजविषयींचा विचार सोडून द्यावा. राजा, जर आत्म्याच्या सच्चिन्मय स्वरूपाचें ज्ञान होऊन ऐहिक विषय तुच्छ भासूं लागतील, तर तो ज्ञानवान पुरुष देहादिकांचें पोषण कां करील बरें?

## योगयुद्ध

### (देहरथाचें वर्णन.)

धर्मराजा, तत्त्ववेत्ते पुरुष देहास रथ मानितात. इंद्रियांस अश्व, इंद्रियचालक मनास लगाम, शब्दादि विषयांस मार्ग, बुद्धीस सारथी, चित्तास बंधन, प्राणास कणा, पापपुण्यांस चक्रें, जीवास रथी, ॐकारास धनुष्य, शुद्ध जीव हा बाण, आणि परब्रह्मास लक्ष्य याप्रमाणें ते समजतात. रथी जसा धनुष्याला बाण लावून तो लक्ष्यावर योजतो, तशी जीवानें ॐकाराची परब्रह्मरूपी योजना करावी. राग (प्रीति,) द्वेष, लोभ, शोक, मोह, भय, मद, मान, अपमान, असूया, कपट, हिंसा, मत्सर, अहंकार, प्रमाद, क्षुधा, निद्रा आदिकरून सर्व शत्रु होत. यातील कांहीं दोष रजोगुणप्रभावानें व कांहीं तमोगुणप्रभावानें घडून येतात. समाधि साध्य झाला असतां, केव्हां केव्हां परोपकारादि सत्कृत्यें सुद्धां शत्रु होतात. कारण परोपकार केला, तरी त्याचें फळ भोगण्यासाठीं जन्म घ्यावे लागणारच! राजा, जोंपर्यंत इंद्रियें आणि देह हे स्वाधीन आहेत, तोंपर्यंतच महासाधूंना शरण जाऊन ज्ञानरूपी खड्ग हातीं घ्यावा, आणि भगवच्चरणांचा आश्रय करून रागद्वेषादि शत्रूंचा नाश करावा. त्या योगानें शांति मिळून आत्मानंदसुख मिळेल; आणि असें होऊन शरीराचा शांतपणें त्याग करितां येईल. राजा, जो मनुष्य बेसावध राहून ह्याप्रमाणें कांहींएक करीत नाहीं, त्याचीं अनावर झालेलीं इंद्रियें आणि भ्रांत झालेली बुद्धि हीं त्याला विषयरूप कुमार्गांत नेऊन टाकितात; आणि मग त्या विषयांच्या योगानें तो अज्ञानांधकारयुक्त संसारकूपांत अडकून राहतो, व तेथें त्यास मृत्यूपासून सदैव भय प्राप्त होतें. धर्मराजा, वैदिक कर्मांचे दोन मार्ग आहेत:

## प्रवृत्तिमार्ग

आणि निवृत्तिमार्ग. प्रवृत्तिमार्गानें जाणारा पुरुष पुनः पुनः संसारांत भ्रमण करीत असतो; व निवृत्तिमार्गानें जाणारा पुरुष मोक्षसुखाचा अनुभव घेतो. राजा, श्येनयागादि हिंसामय व्यवसाय, द्रव्यमय अग्निहोत्रादि कर्में, त्याप्रमाणेंच दर्शपूर्णमास, चातुर्मास्य, पशुयज्ञ, सोमयाग, वैश्वदेव व बलिहरण यांना 'इष्ट' असें म्हणतात. देवालय बांधणें, उपवन तयार करणें, कूप बांधणें, पाणपोई वगैरे घालणें या सर्वांस 'पूर्त' अशी संज्ञा आहे. या कर्मांवर आसक्ति ठेविली आणि त्याविषयींच्या फलांची अपेक्षा धरिली, तर तीं कर्में 'प्रवृत्तिसंज्ञक' होतात. तसेंच, राजा, प्रवृत्तिकर्में आचरणारा मनुष्य, कर्माचरणाचे वेळीं हवन केलेल्या

१ यास उदाहरण जडभरताचें. स्कं. ५ अ. ८–९ पहा.

चरुपुरोडाशादिकांच्या योगानें निर्माण झालेलें शरीर घेऊन, अनुक्रमें यज्ञाभिमानी, रात्र्यभिमानी, कृष्णपक्षाभिमानी, दक्षिणायनाभिमानी, आणि दर्शाभिमानी देवतांच्या स्थानाप्रत पावून नंतर चंद्रलोकास जातो; तेथें उपभोगाच्या योगानें पुण्य क्षीण झालें कीं तो फिरून पर्जन्यांतून भूमीवर पडतो; या स्थलीं ओषधि व वनस्पति यांच्या रूपांत मिसळून अन्नरूपानें पोटांत जातो; आणि मग रेताशीं ऐक्य पावून गर्भरूपानें स्त्रीच्या उदरांत वास करून योग्य कालीं जन्मास येतो. राजा, ज्याचे पुंसवनापासून अंत्येष्टीपर्यंत सर्व संस्कार घडले असतील, तो प्रवृत्तिमार्गी पुरुष योग्यतेनें वरिष्ठ होतो. धर्मा, आतां तुला

निवृत्तिमार्ग

कथन करितों: जो पुरुष इष्टापूर्तादि कर्मेंद्रियव्यापारांचा ज्ञानेंद्रियांच्या ठिकाणीं, ज्ञानेंद्रियांचा संकल्पविकल्पात्मक मनाच्या ठिकाणीं, विकारी मनाचा वाणीच्या ठिकाणीं, वाणीचा वर्णसमुदायाचे ठिकाणीं, वर्णसमुदायाचा—अकार, उकार, मकार ह्यांनीं युक्त अशा ॐकाराच्या ठिकाणीं, ॐकाराचा बिंदूच्या ठिकाणीं, बिंदूचा नादाच्या ठिकाणीं, नादाचा सूत्रात्मक प्राणाच्या ठिकाणीं, व प्राणाचा ब्रह्माच्या ठिकाणीं लय करितो, 'तो निवृत्तिमार्गी' पुरुष होय. असा निवृत्तिमार्गी ज्ञानी पुरुष अग्नि, सूर्य, दिवस, काल, पक्ष, अयन इत्यादिकांच्या अभिमानी देवतास्थानांस अनुक्रमानें पावून ब्रह्मलोकीं जातो. तेथील भोग संपल्यावर तो प्रथम विश्वरूप ( स्थूलोपाधि ) पावतो. नंतर तैजस ( सूक्ष्मोपाधिक ) व पुढें प्राज्ञ ( कारणोपाधिक ) होऊन शेवटीं त्या प्राज्ञ नामक कारणोपाधीचाही साक्षिरूपांत लय करून तुर्यावस्था पावतो, व नंतर तो शुद्धात्मस्वरूप होऊन मुक्त होतो. राजा, ह्या देवमार्गानें जाणारा पुरुष कधींही पुनः संसारांत येत नाहीं. जो पुरुष ह्या वेदप्रणीत देवमार्गाचें व पितृमार्गाचें तत्त्व जाणतो, तो लोकाचारांत असला तरी मोह पावत नाहीं. कां कीं, देहाच्या आरंभीं कारणरूपानें व अंतीं कालरूपानें, बाह्यतः योगरूपानें व अंतरीं भोगरूपानें, तसेंच उच्च-नीच, ज्ञान-ज्ञेय, वचन-वाच्य, तम-प्रकाश या सर्व रूपांनीं जें कांहीं आहे, तेंच हा ज्ञानी पुरुष स्वतः होतो. मग जो स्वतांच सर्व होतो, म्हणजे ज्याला आत्म्यावांचून दुसरें कांहीं आहे असें भासतच नाहीं, त्याला मोह कशाचा पडणार?

देहादिकांच्या खोटेपणाचें विस्तृत विवेचन.

नारद म्हणतात:—राजा, आतां, अशा प्रकारचा ज्ञानी पुरुष, सर्व कांहीं भासमय अर्थात् खोटें असें जाणून तें सोडितो खरें; पण त्याला प्रथम द्वैतभावनाच कां व्हावी अशी शंका येईल, तर तिचें निराकरण असें:–सूर्याचें जें प्रतिबिंब जलांत दिसतें, तें प्रतिबिंब वास्तविक सूर्य नसतें; तरी तें प्रत्यक्ष दिसत असूनही तर्कानें 'तें नाहीं' असें जाणावें लागतें. तसेंच इंद्रियांनीं उपभोगण्याचे सर्व विषय भासमय म्हणजे कल्पित आहेत; ते प्रत्यक्ष दिसत असले तरी नाहींतच असें तर्कानें जाणावें लागतें. कारण, ते खरे होणें दुर्घट होय. राजा, पृथ्वी, अप्, तेज, वायु, आणि आकाश या पांच महाभूतांच्या एकीकरणानें बनलेल्या या विश्वांतील देहादिक वस्तु ह्यांना पंचमहाभूतांचा समुदाय, विकार किंवा परिणाम ह्यांपैकीं कांहींच म्हणतां येत नाहीं. कसें तें पहा: अनेक वृक्षांनीं बनलेल्या स्थलास आपण वन म्हणतों, तेव्हां वन म्हणजे वृक्षांचा समुदाय असें म्हटलें तर चालेल; पण तसाच अनेक भूतांच्या समुदायानें देह बनतो, म्हणून त्याला भूतांचा समुदाय असें म्हणावें तें जुळत नाहीं. कारण, वनांतील एकच वृक्ष ओढिला असतां तें सर्व वन ओढिलें जात नाहीं, पण देहाचें एक बोट ओढिलें तरी सर्व देह ओढिला जातो; त्या अर्थीं या देहाला पंच-

महाभूतांचा समुदाय असें म्हणणें बरोबर नाहीं. बरें, हा देह पंचमहाभूतांचा विकार अथवा रूपांतर असें म्हणावें, तर तसेंही संभवत नाहीं; कारण, असें होण्यास, तो सावयव देह ज्यांचें रूपांतर आहे, त्यांहून भिन्न असला पाहिजे किंवा त्यांनीं युक्त तरी असला पाहिजे. रूपांतर पावलेला अवयवी देह पंचमहाभूतांहून निराळा आहे, असें तर म्हणतांच येत नाहीं; कारण ही गोष्ट प्रत्यक्ष अनुभवाशींच विरुद्ध आहे. आतां तो पंचमहाभूतांनीं युक्त आहे असें म्हणावें, तरी ही शंका येतेच कीं, तो पंचमहाभूतात्मक देह प्रत्येक अवयवांत सगळाच मिळून राहतो कीं अंशानें राहतो ? जर तो प्रत्येक अवयवांत सगळाच मिळून राहतो असें म्हणावें, तर बोटाला सुद्धां देह म्हणावें लागेल. बरें, तो अंशानें युक्त आहे असें म्हणावें, तर दुसरा अंशदेह मानावा लागेल; आणि तसें मानिलें तर तो अंशदेह बोटाच्या ठिकाणीं कसा आहे हा प्रश्न निघतोच. मग तेथेंही फिरून 'अंशानें' असेंच उत्तर द्यावें लागणार आणि याप्रमाणें सर्वच अनवस्थाप्रसंग येणार! ह्यास्तव देहादिक सर्व वस्तु व त्यांचीं कारणें भूतें हीं खोटींच आहेत, असें म्हटलें पाहिजे. कारण, अवयवी दिसेल तर अवयव आहे म्हणावयाचें. अवयवीच जर नसेल, तर अवयव आहे, असें कसें म्हणावें ? देहादिकांनाच जर ठाव नाहीं, तर त्यांचें कारण जीं पंचमहाभूतें त्यांना तरी ठाव कोठून असणार ? आतां, देहादि अवयवी पदार्थ जर खोटे आहेत, तर उत्पत्ति, स्थिति व नाश हीं स्थित्यंतरें होत असतां, अमुक मनुष्य लहान होता तो आतां मोठा झाला इत्यादि ओळख कशी राहते ? असें म्हणशील, तर त्याचें उत्तर असें: एक मुलगा लहान होता, तोच पुढें मोठा झाला, हें, त्या लहान मुलासारखाच तो मोठा मुलगा दिसतो म्हणून वाटतें हें खरें ना ? मग असें वाटण्यास सारखेपणाखेरीज दुसरें कांहीं कारण राहिलें नाहीं, हें ठरलें. आतां, सारखेपणा म्हटला कीं तेथें दुसरी वस्तु आली; आणि लहानपणा व मोठेपणा हा भास आपल्याला एकाच वस्तूवर होत असतो; तेव्हां ही सर्व कल्पना आहे हें सिद्ध होय. वास्तविक जो लहान होता म्हणून भासत होतें, तोच पुढें मोठा झाला असें भासूं लागलें; तेव्हां लहान भासणें आणि थोर भासणें हा केवळ भ्रम होय. भ्रम तो भ्रमच ! तो खरेपणाला आला म्हणजे त्याला खरा भ्रम हेंच म्हणावयाचें, दुसरें काय ? भ्रम होणें हें अविद्येचें (अज्ञानाचें) लक्षण. ही अविद्या (अज्ञान) परमात्मस्वरूपीं भ्रम उत्पन्न करिते. त्या अविद्येचा नाश झाला म्हणजे, तिचें कार्य जो भ्रम तो मुळींच नाहींसा होतो; आणि एकच वस्तु द्विधा दिसणें नाहींसें होऊन सर्वत्र एकच वस्तु प्रत्ययास येते.

आतां, सर्व वस्तु मिथ्या आहेत, तर अमुक करावें आणि अमुक करूं नये असा विधि आणि निषेध शास्त्रानें कां ठरविला आहे, अशी शंका राहते, तिचें निराकरण असें:—स्वप्नामधील जागेपण व त्या स्वप्नांतील स्वप्न हीं जशी मिथ्या, तशींच मिथ्या सृष्टींतील शास्त्रें आणि त्यांचे विधिनिषेध हींही मिथ्या होत. ज्ञानवान मुनि आत्मस्वरूपाचा अनुभव संपादून त्या आत्मानुभवाच्या योगानें भावाद्वैत, क्रियाद्वैत आणि द्रव्याद्वैत ह्या अद्वैतत्रयीला जाणतो, व संसारांतील जागृति, स्वप्न व निद्रा या अवस्थात्रयीची निवृत्ति करितो. राजा, या

### अद्वैतत्रयीचें स्वरूप

तुला सांगतों: वस्त्र आणि तंतु ह्यांत ज्याप्रमाणें तंतुच वस्त्र आहे, त्याचप्रमाणें सर्वत्र कार्यकारणरूप वस्तु एकच आहे, हें जाणणें म्हणजे त्याला भावाद्वैत म्हणतात. तसेंच, कायावाचामनेंकरून केलेलीं कर्में फलाची इच्छा न करितां परब्रह्माचे ठिकाणीं अर्पण करणें, याला क्रियाद्वैत म्हणतात. त्याचप्रमाणें, स्वतः, स्त्री, पुत्र व इतर सर्व प्राणी

आणि त्यांचें वित्तादिक हें सर्व पंचमहाभूतात्मक असून त्याचा भोक्ता परमेश्वर होय, म्हणून सर्वांचे अर्थ व काम एकच आहेत, असें मानणें ह्याला द्रव्याद्वैत म्हणतात. राजा, ज्या देशांत, ज्या काळीं, ज्या उपायानें, जें द्रव्य, ज्या पुरुषाला ज्या कर्मासाठीं निषिद्ध नसेल, त्या देशांत, त्या काळीं, त्या द्रव्यानें, तो उपाय करून, त्या पुरुषानें तीं कर्में करावीं. आपत्काळ नसतांना निषिद्ध द्रव्यांनीं कोणतींही कर्में करूं नयेत. राजा, जो पुरुष ईश्वराचा भक्त आहे, तो हीं व दुसरींही वेदोक्त कर्में करीत गृहस्थाश्रमांत राहिला, तरी त्याला परमात्मरूपीं गति मिळते. हे धर्मराजा, ह्याला उदाहरण प्रत्यक्ष तुमचें. तुम्ही श्रीकृष्ण परमात्म्याचा आश्रय धरिला आणि त्याची सेवा केली, म्हणून सर्व संकटांतून मुक्त होऊन पृथ्वीवरील सर्व राजांना जिंकिलें, व सांप्रत राजसूयादिक यज्ञ करीत आहां !

### नारदांचा पूर्वजन्मेतिहास.

नारद म्हणतातः—धर्मा, सत्पुरुषांची अवज्ञा केल्यानें श्रीकृष्णाची सेवा व्यर्थ जाते, व त्यांच्याच कृपेनें फलप्रद होते, ह्याला उदाहरण स्वतः माझें ! मीं पूर्वी एका कल्पांत उपबर्हण नांवाचा गंधर्व होतों. सुंदर रूप, कोमल अंतःकरण, मार्मिक भाषण इत्यादि लोकप्रिय गुण माझे अंगीं असल्यामुळें, सर्व गंधर्वांत मला मोठा मान असे. या गुणांनीं मी पुरुषांना जितका प्रिय होतों, त्याहीपेक्षां स्त्रियांना अधिक प्रिय होतों. माझ्यावर स्त्रिया फार अनुरक्त असत, म्हणून मीही त्यांच्याशीं अत्यंत लंपट झालों. मला शुद्ध कसली ती मुळींच राहिली नाहीं. एके दिवशीं देवसभेंत हरिकथांचें गायन करण्याकरितां प्रजापतींनीं सर्व अप्सरांना आणि गंधर्वांना बोलाविलें होतें. तेव्हां आपल्याबरोबर बऱ्याच स्त्रियांचा मेळा घेऊन मी विमानांत बसलों आणि निघालों, तो वाटेनें गायन करीत करीतच गेलों! पण तें माझें उन्मत्त वर्तन प्रजापतींना सहन न होऊन त्यांनीं मला शाप दिला कीं, ' तूं आमची अवज्ञा केलीस, त्या अर्थी तूं ऐश्वर्यभ्रष्ट होऊन शूद्र हो !' धर्मराजा, तात्काळ मी एका दासीच्या उदरीं जन्मास आलों. पुढें त्या जन्मीं मी ब्रह्मज्ञानी पुरुषांची सेवा केली; आणि म्हणून मी या कल्पांत ब्रह्मदेवाचा पुत्र झालों; असो. धर्मा, ज्या धर्मानें परमहंसाला मिळणारी गति गृहस्थाश्रमी पुरुषासही प्राप्त होते, तो धर्म मीं तुला सांगितला. या लोकांत तुमची योग्यता फार मोठी आहे. कारण प्रत्यक्ष परब्रह्म श्रीकृष्णरूपानें तुमच्या घरीं रहात आहे; आणि म्हणूनच मोठमोठे मुनि तुमच्या घरीं चालून येतात ! राजा, अशा या परमेश्वराला आमचा नमस्कार असो !

श्रीशुकाचार्य म्हणालेः—परीक्षिता, भरतकुलावतंस धर्मराजानें नारदाच्या मुखानें हे सर्व धर्म श्रवण करून तो परम सद्गदित झाला; आणि त्यानें नारदांची व श्रीकृष्ण भगवंताची परम भावानें पूजा केली. नारदांनीं त्या पूजेचा स्वीकार करून कृष्णास वंदन केलें, व धर्मराजाचा निरोप घेऊन ते स्वस्थानीं गेले. परीक्षिता, श्रीकृष्ण हा परब्रह्मस्वरूप होय असें ऐकून धर्मराजाला विस्मय वाटला. असो. राजा, दक्षकन्यांचे निरनिराळे वंश—ज्यांत देव, दैत्य, मानव इत्यादिकांची उत्पत्ति वर्णिली आहे, ते हे मीं तुला कथन केले.

१ या जन्माविषयींचें वृत्त पान १६ मध्यें ' नारदांचें पूर्वजन्मचरित्र ' या सदराखालीं पहा.

# श्रीमद्भागवत.

## अष्टमस्कंध.

### अध्याय पहिला.

—:०:—

#### मन्वंतरवर्णन.

#### स्वायंभुव मन्वंतर.

परीक्षित राजा म्हणाला:–गुरुवर्य, ज्याप्रमाणें आपण स्वायंभुव मनूचा वंश सांगून मरीचिप्रभृति प्रजापतींच्या संततीचा इतिहास निवेदिला, त्याप्रमाणें इतर मनूचाही वंश सांगून त्यांतील पुरुषांच्या संततीचा इतिहास निवेदावा, अशी माझी आपल्याजवळ प्रार्थना आहे. शिवाय, ज्या ज्या मन्वंतरामध्यें, जेथें जेथें भगवंतानें अवतार धेऊन जीं जीं चरित्रें केलीं असतील, तो करीत असेल व करणार असेल, तीं सर्व आपण कृपा करून मला सांगावीं. महाराज, विद्वान लोक भगवद्यशाचें नित्य कीर्तन करीत असतात.

#### यज्ञाचें चरित्र.

श्रीशुकाचार्य म्हणाले:–परीक्षित राजा, चालू कल्पामध्यें स्वायंभुव मनूसह एकंदर सहा मनु होऊन गेले. त्यांपैकीं पहिल्याचें चरित्र आणि त्या मन्वंतरांतील देवादिकांचें जन्मवृत्त मीं तुला सांगितलें. त्या स्वायंभुव मनूच्या आकूति आणि देवहूति नामक कन्यांच्या उदरीं, लोकांना धर्माचा व ज्ञानाचा उपदेश करावा म्हणून, ईश्वरानें अवतार घेतला होते. त्यांपैकीं देवहूतीचा पुत्र जो भगवान कपिल, त्याचें वृत्त मीं तुला सांगितलेंच आहे. आतां, आकूतीच्या उदरीं पुत्ररूपानें अवतार घेतलेल्या भगवान यज्ञाचें चरित्र मी तुला सांगतों.

राजा, सर्वसंगपरित्याग करून शतरूपेसह वनांत गेलेल्या स्वायंभुवानें, सुनंदा नदीच्या तिरीं एका पायावर उभें राहून शंभर वर्षेपर्यंत उग्र तप केलें. त्या तपाच्या योगानें त्याला आत्मसाक्षात्कार झाला. त्या वेळीं, झोंपेंत मनुष्य बोलतो त्याप्रमाणें तो बोलूं लागला. राजा, त्या

#### मनूचे उद्गार

असे: "अहो, ज्याच्या योगानें हें विश्व सचेतन होतें, पण ज्याला हें विश्व सचेतन करूं शकत नाहीं; आणि हें विश्व निद्रावस्थेंत असताही जो साक्षिरूपानें जागृत असतो, त्या परमेश्वराला हे लोक जाणत नाहींत, हें एक मोठेंच आश्चर्य आहे ! प्राण्या, सावध हो. हें सर्व जग ईश्वरानें व्यापिलें आहे; ह्याकरितां, ईश्वरानें जें कांहीं तुला दिलें असेल, त्यावरच संतुष्ट राहून भोग भोगीत जा; परद्रव्याचा अभिलाष धरूं नको; आणि त्याकरितां व्यर्थ यातायात करूं नको. जो सर्वशक्तिमान परमेश्वर सर्व प्राण्यांच्या नेत्रेंद्रियाला पाहण्याची शक्ति देतो, पण आपण स्वतः त्या नेत्रेंद्रियाला दिसत नाहीं, त्या परमेश्वराला भज. ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय करणारा तोच असून विश्व हें त्याचेंच रूप होय, आणि इतकें करूनही तो जन्मादि-विकाररहित, स्वयंप्रकाश, शाश्वत व परब्रह्मरूप असा आहे. तो आपल्या मायेच्या योगानें हे सर्व व्यापार

करितो, आणि नित्यसिद्ध ज्ञानाच्या योगानें त्या मायेचाही त्याग करून तिजपासून अलिप्त राहतो. परमेश्वराजवळ सकल ऐश्वर्य ओतप्रोत भरलेलें आहे. त्याला कोणतीही इच्छा नाहीं. सृष्ट्यादि व्यापार करावयाचे झाल्यास त्यास दुसऱ्याकडून प्रेरणा मिळावी लागत नाहीं. तो स्वतः कोणतीही गोष्ट करण्यास समर्थ आहे. तो केवळ स्वेच्छेनें मनुष्यादिक अवतार घेतो, व तदनुरूप वर्तन ठेवून लोकांकडून धर्माची प्रवृत्ति अस्खलित चालवितो. अहो, ईश्वर कर्म करूनही त्यापासून अलिप्त राहतो, म्हणूनच ऋषि वगैरे मोक्षप्राप्तीची इच्छा करणारे लोक कर्म करूनही निष्काम राहतात, आणि त्या योगानेंच ते भगवत्स्वरूपीं मिळतात. कर्मे करून जो त्या कर्मांत बद्ध होतो, त्याला त्या पदाची प्राप्ति व्हावयाची नाहीं. मी त्या अहंकाररहित परमेश्वराला शरण आहें."

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, स्वायंभुव मनु समाधीमध्यें ह्याप्रमाणें वेदांततत्त्वांचा उच्चार करीत असतां दैत्य-राक्षसांस वाटलें कीं, हा खरोखरीच झोपेंत बरळत आहे, व असें पाहून ते बुभुक्षित दैत्य-राक्षस त्याला खाण्याकरितां त्याच्यावर धावून आले. इतक्यांत सर्वव्यापी यज्ञ नामक श्रीहरानें याम नामक देवांसह तेथें येऊन त्या दुष्ट दैत्यराक्षसांना मारिलें आणि स्वर्गाचें राज्य केलें. परीक्षित राजा, प्रत्येक मन्वंतरांत सहा अधिकारी असतात: मनु, मनूचे पुत्र, देव, इंद्र, ऋषि आणि ईश्वराचा अंशावतार. ह्या मन्वंतरांत स्वायंभुव मनु होता; प्रियव्रत व उत्तानपाद हे मनुपुत्र होते; यामादि देव होते; मरीचिप्रभृति सप्तर्षि[1] होते; यज्ञ हा इंद्र होता; व ईश्वराचा अंशावतारही तोच होता. आतां दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या मन्वंतरांत कोण कोण अधिकारी होते, तें सांगतों. परीक्षिता, दुसरें

स्वारोचिष मन्वंतर.

यांत अग्नीचा पुत्र स्वारोचिष हा मनु होता; द्युमान्, सुषेण, रोचिष्मान् आदिकरून मनुपुत्र होते; तुषितादि देव होते; यज्ञाचा पुत्र रोचन हा इंद्र होता; ऊर्ज, स्तंभ, प्राण, बृहस्पति, दत्त अत्रि व च्यवन हे सात ऋषि होते; आणि वेदशिरा ऋषीच्या तुषिता नामक पत्नीच्या उदरीं विभु या नांवाचा झालेला पुत्र हा ईश्वराचा अंशावतार होता. हा विभु ब्रह्मचारी असतां ८८००० मुनींनीं त्याजपासून ब्रह्मचर्यव्रताची दीक्षा घेतली, व ते नित्य ब्रह्मचर्य पाळीत राहिले! तिसरें

उत्तम मन्वंतर

होय. यांत, प्रियव्रताचा पुत्र जो उत्तम, तो मनु होता; पवन, सृंजय, यज्ञहोत्र वगैरे मनुपुत्र होते; सत्य, वेदश्रुत आणि भद्र हे देव होते; सत्यजित् नामक इंद्र होता; वसिष्ठाचे पुत्र प्रमदादिक सप्तर्षि होते; आणि धर्माच्या सूनृता नामक पत्नीच्या उदरीं सत्यसेन नामक पुत्र झाला, तो ईश्वराचा अंशावतार होता. या सूनृतेला सत्यव्रत नांवाचे आणखीही पुत्र होते. त्यानें इंद्राशीं (सत्यजिताशीं) सख्य करून दुष्ट, दुराचारी व नीच अशा यक्षराक्षसांचा व प्रजापीडक भूतगणांचा वध केला. आतां चौथें जें

तामस मन्वंतर

त्यांतील अधिकारी सांगतों: तिसरा मनु जो उत्तम, त्याचाच तामस नांवाचा एक भाऊ होता,

---

1 मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि भृगु.

2 यांचीं नांवें चतुर्थस्कंधाच्या पहिल्या अध्यायांत-पृष्ठ २०३ मध्यें दिलीं आहेत, तीं पहा. 3 यांस आणखी दुसरीं नांवें असून एकंदर हे दहाजण होते. त्यांचीं नांवें इष, ऊर्ज, तर्ज, शुचि, शुक्र, मधु, माधव, नभस्य, नभ व सह हीं होत. 4. यांचीं दुसरीं नांवें कौकुरुंडि, दालभ्य, शंख, प्रवहण, शिव, सित आणि सस्मित हीं होत.

तो तामस मन्वंतरांतील मनु होय; त्याचे पृथु ख्याति, नर, केतु आदिकरून दहा मुलगे होते, हे मनुपुत्र होत; सत्यक, हरि, वीर इत्यादि देव असून त्रिशिख या नांवाचा इंद्र होता; ज्योतिर्धाम[1], पृथु, काव्य, चैत्र, अग्नि, धनद व पीवर हे सात ऋषि होते; व हरिमेधाची पत्नी जो हरिणी, तिच्या उदरीं झालेला हरि नांवाचा पुत्र हा भगवंताचा अंशावतार होता या हरीनें गजेंद्राला नक्रापासून सोडविलें. या मन्वंतरांत विधृतीचे पुत्र वैधृति हेही आणखी देव होत. यांनीं काळगतीनें नष्ट झालेल्या वेदांचें आपल्या पराक्रमानें पुनरुज्जीवन केलें.

परीक्षित राजा म्हणाला:—शुक मुने, नक्रापासून गजेंद्राला श्रीहरीनें कसें सोडविलें, तो इतिहास ऐकण्याची मला फार इच्छा झाली आहे, तर तो आपण कृपा करून मला सांगावा. कारण, त्यामध्यें पुण्यकीर्ति भगवंताचें कांहीं तरी अद्भुत चरित्र असेल. महाराज, ईश्वराच्या कथा कृतार्थ करणाऱ्या होत.

सूत म्हणतात:—ऋषीहो, अशा प्रकारें त्या अनशन व्रताचा संकल्प करून बसलेल्या परीक्षित राजानें भगवत्कथा सांगण्याविषयीं श्रीशुकाचार्यांस विनंती केली असतां, आनंदित झालेल्या त्या शुकाचार्यांनीं त्याचें अभिनंदन करून तें गजेंद्रमोक्षाचें आख्यान सांगण्यास आरंभ केला.

## अध्याय दुसरा.

—:o:—

### गजेंद्रमोक्षाख्यान.

#### त्रिकूटपर्वतवर्णन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, क्षीरसमुद्रामध्यें त्रिकूट नांवाचा एक सुंदर व महान पर्वत आहे. त्याची उंची आणि विस्तार चाळीस हजार कोस असून, त्याला एक लोखंडाचें, एक रुप्याचें आणि एक सुवर्णाचें अशीं तीन मोठालीं शिखरें आहेत. त्या शिखरांच्या योगें तो पर्वतत्या समुद्राला, दिशांना व अंतराळाला शोभवितो. याशिवाय नानाविध रत्नांनीं व अनेक जातींच्या वृक्षवेलींनीं भरलेलीं अनेक शृंगें त्या पर्वतावर असल्यामुळें तो पर्वत फारच रम्य दिसतो. त्यावर कित्येक जलप्रवाह आहेत; व त्यांच्या झुळझुळ वाहण्यानें चित्त फारच आकर्षित होतें. त्या पर्वतासभोंवतीं क्षीरसमुद्राचा वेढा असल्यामुळें, त्याच्या लाटांनीं आकाश दणाणून जातें; व पर्वताच्या पायथ्यावरील रत्नांचे निधि उघडे पडून पाचमण्यांच्या हिरव्या कांतीनें तेथील भूमि हिरवी दिसते! त्या पर्वतावर अनेक गुहा असून त्यांत क्रीडा करण्यासाठीं सिद्ध, चारण, गंधर्व, विद्याधर, महान सर्प, किन्नर व अप्सरा तेथें वारंवार जमतात; आणि त्यांची क्रीडा चालू असतां संगीतध्वनि सुरू झाले म्हणजे ते ऐकून मृगेंद्रांना जणू काय अन्य मृगेंद्रच गर्जत आहेत अशी भ्रांति पडते, व असहिष्णुतेमुळें ते स्वतांही गर्जना करूं लागतात! परीक्षित राजा, त्या पर्वतावरील झाडींत अनेक जातींच्या वनपशूंचे थवेचे थवे फिरत असतात. त्या पर्वतावर चित्रविचित्र वृक्षांनीं भरलेलीं व पक्ष्यांच्या मधुर शब्दांनीं गजबजलेलीं अनेक देवोपवनें आहेत. तशींच तेथें स्वच्छ जलानें परिपूर्ण असलेलीं अनेक सरोवरें असून त्यांच्या भोंवतीं रत्नमय वालुकेनें शोभणारीं अनेक पुलिनें आहेत. त्या ठिकाणीं देवांगना जलविहार करून इतस्ततः परिभ्रमण करितात, यामुळें जलांच्या प्रवाहांतून व वायूच्या ओघांतून सुगंधाचे लोट चालतात! त्या पर्वताच्या पहाडामध्यें ऐश्वर्यसंपन्न वरुणानें ऋतुमत् नांवाचें एक उपवन आहे. तें उपवन फलपुष्पवृक्षांनीं भरलेलें आहे. मंदार, पारिजात, पाटल,

१ यांचीं दुसरीं नांवें—अकल्मष, धन्वी, तपोमूल, तपोधन, तपोरति, तपस्य, तपोद्युति, परंतप, तपोभागी, आणि तपोयोगी हीं होत. २. यांचीं दुसरीं नांवें—कवि, पृथु, अग्नि, अकपि, कपि, जल्प, आणि धीमान् हीं होत.

अशोक, चंपक, आम्र, प्रियाळ, फणस, आंबाडे, पोफळी, नारळी, खजुरी, पेरू, मोह, साक, ताड, तमाल, असाणा, अर्जुन, रिठे, उंबर, पिंपरी, वड, पळस, चंदन, लिंब, कोविदार, सरल, देवदार, द्राक्षा, इक्षु, कदली, जांभळी, बोरी, अक्ष, हिरडे, आंवळी, बेल, कवठी, ईड, बिबवे इत्यादि अनेक वृक्ष त्या स्थळीं आहेत. तेथें एक उत्तम सरोवर असून त्यांत विविध सुवर्णकमलें शोभतात. कुमुदें, कल्हारें, उत्पलें, शतपत्रें वगैरे त्या ठिकाणीं विपुल आहेत. भृंगांचा मंजुळ गुंजारव व पक्ष्यांचा मनोहर किलबिलाट तेथें सारखा चालू असतो. हंस, कारंडव, चक्रवाक, सारस, पाणकोंबडे, टिटव्या इत्यादिकांनीं तें उपवन नित्य गजबजलेलें असतें. त्यांत मासे व कांसवें एकसारखीं हालचाल करीत असल्यामुळें कमळांचे पराग उदकांत नित्य गळत असतात. कळंब, देवनळ, नीप, बकुळ इत्यादिकांचे रोपे त्या सरोवराच्या सभोंवतीं विराजत असतात. कुंद, कोरांटे, अशोक, शिरीष, कुटज, हिंगणबेट, कुब्जक, सोनजाई नागचंपक, पुन्नाग, जाई, मोगरे, शतपत्रें, माधवी, जालक वगैरे अनेक पुष्पवृक्षांनीं त्या सरोवराचा तीरप्रदेश शोभत असून त्यामुळें एकंदर सर्व वन फारच शोभतें.

परीक्षित राजा, अशा प्रकारच्या त्या दिव्य पर्वतावरील अरण्यांत गजेंद्र राहत असे. त्या मत्त गजेंद्राच्या मदाचा वास आला, कीं तेथील वनपशु भयानें पळून जात. सिंह, मोठाले हत्ती, सर्प, हरिणें, गेंडे, महान महान नाग, गौर व कृष्ण मृग, शरभ, वनगाई, लांडगे, डुकरें, रेडे, अस्वलें, साळ, गोपुच्छ, वानर, माकडें इत्यादि सर्व उच्च नीच प्राणी त्या गजेंद्राच्या भीतीनें सैरावैरा पळत! त्या अरण्यांत गजेंद्राचें वास्तव्य असल्यामुळें सिंहादिक हिंस्र पशु इतके भयभीत झालेले असत कीं, त्यांस हरिणें वगैरे दुर्बळ पशु सुद्धां भीत नसत! एके वेळीं, ज्याच्या चालण्यानें पृथ्वी गदगद हालत आहे, व ज्याच्या गंडस्थलांतून वहात असलेल्या मदावर भ्रमरांचे थवेचे थवे बसले आहेत, असा तो प्रचंड गजेंद्र आपल्या हजारों हत्तिणी आणि त्यांचे छावे व इतर मोठमोठे हत्ती यांसह त्या वनांत स्वच्छंदानें फिरत असतां, उन्हाचा दुःसह ताप झाल्यामुळें भगवान वरुणाच्या ऋतुमत् नांवाच्या उपवनांतील सुवर्णकमलांनीं भरलेल्या त्या सरोवराजवळ मोठ्या झपाट्यानें आला. त्या वेळीं त्याचे नेत्र मदानें धुंद झाले होते. त्या सरोवरामध्यें शिरून त्यानें थोडा वेळ क्रीडा केली; व कमलपरागांनीं सुगंधयुक्त झालेलें तें अमृताप्रमाणें मधुर जल त्यानें यथेच्छ प्राशन केलें. नंतर शांत झाल्यावर त्या गजेंद्रानें आपल्या सोंडेंत पाणी घेऊन, तेथें आलेल्या सर्व हत्तिणी व त्यांचे छावे यांना स्नान घातलें, आणि कडिवाळपणानें लहान लहान छाव्यांच्या तोंडांत जलधारा सोडून त्यांस तो पाणी पाजूं लागला.

### गजेन्द्रग्राह.

राजा, असा तो मायेनें अंध झालेला व स्त्रीपुत्रादिकांचे ठिकाणीं आसक्त असलेला गजेंद्र आनंदानें विहार करीत असतां अवचित एका बलाढ्य नक्रानें त्याचा पाय मोठ्या त्वेषानें धरिला! तेव्हां आपल्या प्राणावर येऊन बेतली आहे, असें पाहून त्या महाबलवान गजराजानेंही आपल्यापरी त्या संकटांतून सुटण्याचा प्रयत्न चालविला. आपल्या अधिपतीला कोणी पाण्यांत जोरानें ओढीत आहे व त्यामुळें तो अगदीं विव्हल झाला आहे, असें पाहून भोंवतालच्या हत्तिणी व त्यांचे छावे मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागले! तेथें असलेल्या इतर मोठमोठ्या हत्तींनींही गजराजाला सोडविण्याकरितां आपली सर्व शक्ति खर्च केली; तरी कांहीं एक उपयोग झाला नाहीं! नक्रानें गजेंद्राला आंत ओढावें, आणि गजेंद्रानें नक्रास बाहेर ओढावें, असा झगडा चालतां चालतां एक हजार दिव्य वर्षें निघून गेलीं;

तेव्हां देवांनाही मोठें आश्चर्य वाटलें. गजेंद्राचें खाणें पिणें बंद पडल्यामुळें तो अगदीं निःशक्त होत चालला, आणि नक्राचें बळ मात्र एकसारखें वृद्धिंगत होत गेलें. ह्याप्रमाणें दैवगतीनें तो गजेंद्र नक्राच्या तडाख्यांत सांपडून अगदीं हताश झाला, तेव्हां तो आपल्या सुटकेविषयीं विचार करूं लागला. शेवटीं

### गजेंद्राचा विचार

असा झाला कीं, 'हा नक्र म्हणजे केवळ मृत्यूचा पाश होय. ह्या पाशांतून सोडविण्यास हे माझे आप्तगण केवळ असमर्थ आहेत. म्हणून, ब्रह्मादिकांनाही आश्रयभूत जो परमेश्वर, त्यालाच आतां शरण जावें हें उचित होय. काळसर्पाचा वेग फार प्रचंड आहे; त्या महाभुजंगाला भ्यालेल्या शरणागतांचें जो रक्षण करितो, तोच ईश्वर मला या संकटांतून सोडवील.

## अध्याय तिसरा.

—:०:—

### गजेंद्रमोक्षाख्यान.

श्रीशुकाचार्य म्हणालेः—परीक्षित राजा, याप्रमाणें गजेंद्रानें ईश्वराला शरण जाण्याचा निश्चय करून आपलें मन स्थिर केलें, आणि पूर्वजन्मीं शिकलेल्या सर्वोत्कृष्ट स्तोत्राचा जप आरंभिला.

### गजेंद्रजपित स्तोत्र.

गजेंद्र म्हणालाः—

ॐ नमो भगवते तस्मै यत एतच्चिदात्मकम् ।
पुरुषायादिबीजाय परेशायाभिधीमहि ॥
यस्मिन्निदं यतश्चेदं येनेदं य इदं स्वयम् ।
योऽस्मात्परस्माच्च परस्तं प्रपद्ये स्वयंभुवम् ।
यः स्वात्मनीदं निजमाययाऽर्पितं क्वचिद्विभातं क्व च तत्तिरोहितम् ॥
अविद्धदृक्साक्ष्युभयं तदीक्षते स आत्ममूलोऽवतु मां परात्परः ॥
कालेन पंचत्वमितेषु कृत्स्नशो लोकेषु पालेषु च सर्वहेतुषु ।
तमस्तदासीद्गहनं गभीरं यस्तस्य पारेऽभिविराजते विभुः ॥
न यस्य देवा ऋषयः पदं विदुर्जंतुः पुनः कोऽर्हति गंतुमीरितुम् ।
यथा नटस्याकृतिभिर्विचेष्टतो दुरत्ययानुक्रमणः स माऽवतु ॥
दिदृक्षवो यस्य पदं सुमंगलं विमुक्तसंगा मुनयः सुसाधवः ।
चरंत्यलोकव्रतमव्रणं वने भूतात्मभूताः सुहृदः स मे गतिः ॥
न विद्यते यस्य च जन्म कर्म वा न नामरूपे गुणदोष एव वा ।
तथापि लोकाप्ययसंभवाय यः स्वमायया तान्यनुकालमृच्छति ॥
तस्मै नमः परेशाय ब्रह्मणेऽनंतशक्तये ।
अरूपायोरुरूपायो नम आश्चर्यकर्मणे ॥
नम आत्मप्रदीपाय साक्षिणे परमात्मने ।

नमो गिरां विदूराय मनसश्चेतसामपि ॥
सत्त्वेन प्रतिलभ्याय नैष्कर्म्येण विपश्चिता ।
नमः कैवल्यनाथाय निर्वाणसुखसंविदे ॥
नमः शांताय घोराय मूढाय गुणधर्मिणे ।
निर्विशेषाय साम्याय नमो ज्ञानघनाय च ॥
क्षेत्रज्ञाय नमस्तुभ्यं सर्वाध्यक्षाय साक्षिणे ।
पुरुषायात्ममूलाय मूलप्रकृतये नमः ॥
सर्वेंद्रियगुणद्रष्ट्रे सर्वप्रत्ययहेतवे ।
असता छाययोक्ताय सदाभासाय ते नमः ॥
नमो नमस्तेऽखिलकारणाय निष्कारणायाद्भुतकारणाय ।
सर्वागमाम्नायमहार्णवाय नमोऽपवर्गाय परायणाय ॥
गुणारणिच्छन्नचिदूष्मपाय तत्क्षोभविस्फूर्जितमानसाय ।
नैष्कर्म्यभावेन विवर्जितागमस्वयंप्रकाशाय नमस्करोमि ॥
मादृक्प्रपन्नपशुपाशविमोक्षणाय मुक्ताय भूरिकरुणाय नमोऽलयाय ।
स्वांशेन सर्वतनुभृन्मनसि प्रतीतप्रत्यग्दृशे भगवते बृहते नमस्ते ॥
आत्मात्मजाप्तगृहवित्तजनेषु सक्तैर्दुष्प्रापणाय गुणसंगविवर्जिताय ।
मुक्तात्मभिः स्वहृदये परिभाविताय ज्ञानात्मने भगवते नम ईश्वराय ॥
यं धर्मकामार्थविमुक्तिकामा भजंत इष्टां गतिमाप्नुवंति ।
किं त्वाशिषो रात्यपि देहमव्ययं करोतु मेऽदभ्रदयो विमोक्षणम् ॥
एकांतिनो यस्य न कंचनार्थं वांछंति ये वै भगवत्प्रपन्नाः ।
अत्यद्भुतं तच्चरितं सुमंगलं गायंत आनंदसमुद्रमग्नाः ॥
तमक्षरं ब्रह्म परं परेशमव्यक्तमाध्यात्मिकयोगगम्यम् ।
अतींद्रियं सूक्ष्ममिवातिदूरमनंतमाद्यं परिपूर्णमीडे ॥
यस्य ब्रह्मादयो देवा वेदा लोकाश्चराचराः ।
नामरूपविभेदेन फल्ग्व्या च कलया कृताः ॥
यथार्चिषोऽग्नेः सवितुर्गभस्तयो निर्यांति संयात्यसकृत्स्वरोचिषः ।
तथा यतोऽयं गुणसंप्रवाहो बुद्धिर्मनः खानि शरीरसर्गाः ॥
स वै न देवासुरमर्त्यतिर्यङ् न स्त्री न षंढो न पुमान्न जंतुः ।

नायं गुणः कर्म न सन्न चासन्निषेधशेषो जयतादशेषः ॥
जिजीविषे नाहमिहामुया किमंतर्बहिश्चावृतयेभयोन्या ।
इच्छामि कालेन न यस्य विप्लवस्तस्यात्मलोकावरणस्य मोक्षम् ॥
सोऽहं विश्वसृजं विश्वमविश्वं विश्ववेदसम् ।
विश्वात्मानमजं ब्रह्म प्रणतोऽस्मि परं पदम् ॥
योगरंधितकर्माणो हृदि योगविभाविते ।
योगिनो यं प्रपश्यंति योगेशं तं नतोऽस्म्यहम् ॥
नमो नमस्तुभ्यमसह्यवेगशक्तित्रयायाखिलधीगुणाय ।
प्रपन्नपालाय दुरंतशक्तये कदिंद्रियाणामनवाप्यवर्त्मने ॥
नायं वेद स्वमात्मानं यच्छक्त्याऽहंधिया हतम् ।
तं दुरत्ययमाहात्म्यंभगवंतमितोऽस्म्यहम् ॥

'ज्या परमात्म्यापासून हे देहादिक जड पदार्थ सचेतन होतात, त्या कारणरूपानें देहामध्यें प्रविष्ट असलेल्या प्रकृतिपुरुषरूप परमेश्वराला माझा नमस्कार असो. जो हें विश्व निर्माण करितो व पाळितो; ज्याच्या आधारावर हें विश्व उभें आहे; आणि जो स्वतः विश्वरूप असून ह्या विश्वाच्या कार्यकारणादिकांपासून अगदीं भिन्न आहे, त्या सिद्ध पुरुषाला माझा नमस्कार असो. जो स्वताचे ठिकाणीं मायेनें रचिलेलें हें जग कधीं असतें व कधीं नसतें असें पाहतो, आणि जो स्वयंप्रकाश व अखंड तेजस्वी असून नेत्रादिकांचाही प्रकाशक आहे, तो सर्वसाक्षी परमेश्वर माझें रक्षण करो. प्रलयकाळीं सर्व लोकपाल व सर्व कारणें नाश पावून अपार अंधकार पडलेला असतां त्याच्याही पलीकडे जो तेजोरूप परमात्मा प्रकाशमान असतो, त्याला माझा नमस्कार असो. रंगभूमीवर नटवेष घेऊन आलेल्या नाट्यकलानिपुण नटाचें स्वरूप जसें मनुष्यांना ओळखितां येत नाहीं, तसें ज्याचें चरित्र महान महान ऋषि व देव यांनाही ओळखितां येत नाहीं, तो अनिर्वचनीय परमेश्वर माझें रक्षण करो. ज्याच्या पदांचें दर्शन व्हावें म्हणून मोठमोठे साधु, सर्वसंगपरित्याग करून व सर्वांभूतीं समदृष्टि ठेवून ब्रह्मचर्यादि व्रतांचें निर्दोष आचरण करितात, तो परमेश्वर मला दर्शन देवो. ज्याच्या ठिकाणीं जन्म, कर्म, नाम, रूप, गुण, दोष इत्यादि कांहींएक नसूनही, जगताची उत्पत्ति, स्थिति व संहार हीं कार्यें चालावीं म्हणून जो आपल्या मायेच्या योगानें जन्मकर्मादिकांचा स्वीकार करितो, त्या अचिंत्यशक्तिमान, अनंतवीर्य, निर्गुणनिर्विकार व परब्रह्मरूप परमेश्वराला माझा नमस्कार असो. ज्याचें स्वरूप इंद्रियांना अगोचर असून जो इंद्रियांचा प्रकाशक आहे, त्या परात्पराला माझा प्रणिपात असो. ज्याचें ज्ञान प्राप्त होण्याला विद्वान पुरुषांना सर्वसंगपरित्याग करून अंतर्मुख दृष्टि करावी लागते, निष्कामबुद्धीनें कर्में करणारांस जो कैवल्य सुद्धां देतो, व जो केवळ सच्चिन्मयस्वरूप आहे, त्याला माझा नमस्कार असो. सत्त्व, रज आणि तम ह्या गुणांच्या योगानें ज्याचीं रूपें कांहीं शांत, कांहीं उग्र व कांहीं मूढ अशीं निरनिराळ्या प्रकारचीं दिसतात, तरी जो वास्तविक-

पणें सर्वत्र साम्यस्थितीनें राहत असतो, त्या एक, अद्वितीय व सर्वव्यापी परमेश्वराला माझा नमस्कार असो. क्षेत्रज्ञ जो जीव व सर्व जीवांस कारणीभूत असा, जो सर्वांतर्यामी आत्मा तो परमेश्वरच असल्यामुळें मायेचाही उत्पादक तोच आहे, त्या सकललोकाधार परमेश्वराला माझें वंदन असो. इंद्रियांच्या विषयांस जो पाहणारा आहे, सर्व इंद्रियांच्या वृत्ति ह्या ज्याचा बोध करून देण्यास साधनीभूत आहेत, अहंकारादिक मिथ्या प्रपंच ज्याचें अस्तित्व निश्चित करितो, त्या परमेश्वराला मी वंदन करितों. महासागरामध्यें जसें सर्व नद्यांचें पर्यवसान आहे, तसें ज्याच्या ठिकाणीं सर्व शास्त्रांचें व वेदांचें पर्यवसान आहे, त्या सर्वकारणात्मक आणि मोक्षस्वरूप परमेश्वराला माझे शतशः नमस्कार असोत. जसा मंथनकाष्ठांत अग्नि गुप्त असतो, तसा जो सगुणरूपांत चैतन्यरूपानें गुप्त आहे, व कर्मशून्य आत्मतत्त्वाची भावना धरून विधिनिषेधरूप आगमांचा त्याग करणाऱ्या पुरुषांच्या हृदयामध्यें जो स्वतांच प्रकट होतो, त्या स्वयंप्रकाश परमेश्वराला माझा नमस्कार असो. जो अत्यंत दयाळू व समदृष्टि असल्यामुळें मजसारख्या शरणागत पशूच्या अज्ञानरूप पाशाचा नाश करण्यास पूर्णपणें समर्थ आहे, त्या भक्तसंकटनिवारक, अनंत व अपरिमेय प्रभूला मी शरण आहें; तो माझें रक्षण करो. जो गुणसंघरहित असल्यामुळें गृहादिकांचे ठिकाणीं आसक्त असणाऱ्या पुरुषांना प्राप्त होत नाहीं, आणि म्हणूनच ज्ञानी जन सर्व विषयांवरील आसक्ति सोडून केवळ ज्याच्या सत्य स्वरूपाचेंच चिंतन करितात, त्या निर्गुण निर्विकार परमेश्वराला माझा नमस्कार असो. चतुर्विध पुरुषार्थांची इच्छा करणारे साधुजन ज्याला भजतात, व जो त्यांनीं इच्छा केली नसतांही त्यांना सर्व उपभोग आणि शाश्वत शरीर देऊन शेवटीं आत्मस्वरूपीं मिळवितो, त्या दयाळू परमेश्वरानें माझी मुक्तता करावी. ज्याचे एकनिष्ठ भक्त भगवद्गुणांचें गायन करण्यामध्यें दंग होऊन चतुर्विध पुरुषार्थांनाही तुच्छ मानितात, व ज्याच्या भक्तांस भगवच्चिंतन करीत असतां केवळ आनंदसागरांत बुडून गेल्याप्रमाणें वाटून अन्य कोणत्याही विषयाविषयीं अभिलाष उत्पन्न होत नाहीं, तसाच जो अज्ञेय असतांही ब्रह्मचिंतन करणारांस सुगम होतो, व विषयासक्त पुरुषांना तर जो केव्हांही प्राप्त होत नाहीं, अशा त्या सर्वांतर्यामी, विनाशरहित व परिपूर्ण परमेश्वराला माझा नमस्कार असो. नामरूप धारण करणारे हे ब्रह्मादि देव, वेद व चराचर लोक ज्यानें आपल्या किंचित् अंशानें निर्माण केले, अग्नीच्या ज्वालेप्रमाणें किंवा सूर्याच्या किरणाप्रमाणें ज्याच्यापासून बुद्धि, मन, इंद्रियें, देह इत्यादि गुणांनीं युक्त असलेलें हें सर्व विश्व उत्पन्न झालें, व ज्याच्यामध्येंच या सर्व विश्वाचा लय होणार आहे, तो दयालु परमेश्वर मला मुक्त करण्यास प्रकट होवो. परमेश्वराचें वास्तव स्वरूप निर्गुण व निर्विकार आहे. देव, दैत्य, मनुष्यें, पशु, पक्षी इत्यादिकांपैकीं कोणतेंही परमेश्वराचें रूप नव्हे. तो स्त्री नाहीं, पुरुष नाहीं, अथवा नपुंसकही नाहीं. त्यास गुण, कर्म, कारण, कार्य असें कांहीएक म्हणतां येत नाहीं. ब्रह्मांडांतील सर्व वस्तुस्वरूपाचा निषेध केल्यावर जें कांहीं अवशिष्ट राहतें, तें निर्गुण निर्विकार परब्रह्मस्वरूप परमेश्वराचें होय. त्या मायेनें नटणाऱ्या महापुरुषाचा दिग्विजय होवो! मला ह्या अंतर्बाह्य अज्ञानानें व्यापिलेल्या गजदेहाची मुळींच गरज नाहीं; पण ज्याच्या कृपेनें या अज्ञानाचा मोक्ष होऊन मी अविनाशी परब्रह्मरूपांत मिळून जाईन, त्या परमेश्वराच्या दर्शनाची मी इच्छा करीत आहें; म्हणून मी त्याला अनन्यभावानें वंदन करितों. भागवतधर्म पाळिल्यानें मनुष्यांचीं अंतःकरणें शुद्ध झाल्यामुळें त्यांच्या सर्व



गजेंद्रमोक्ष.

कर्मांचा नाश होऊन त्यांना ज्या परमेश्वराचें दर्शन होतें, त्या योगेश्वराला मी नमस्कार करितें. ज्याच्या त्रिगुणात्मक शक्तीचा वेग असह्य आहे, व विषयोन्मुख इंद्रियांनीं युक्त असलेल्या जनांना ज्याचा मार्ग सांपडत नाहीं, आणि जो शरणागतांचा रक्षक आहे, त्या अनंतशक्ति परमेश्वरास माझा नमस्कार असो. अहंकारानें मायेच्या तडाख्यांत सांपडलेल्या प्राण्याला ज्याच्या स्वरूपाचें ज्ञान होणें अशक्य आहे, त्या अचिंत्यशक्ति जगच्चालकाला माझा नमस्कार असो!'

### गजेंद्राला श्रीहरिदर्शन व मुक्ति

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, अशा प्रकारें त्या गजेंद्रानें भेदशून्य परमतत्त्वाचें वर्णन केलें असतां, मूर्तिभेदाभिमानी ब्रह्मादिक देवांपैकीं कोणीही त्याजवळ आले नाहींत. तेव्हां, सर्व देवांचाही देव जो भगवान श्रीहरि, तो गरुडावर आरूढ होऊन अन्य देवांसमवेत चक्रायुधासह भगवत्स्तवनांत निमग्न असलेल्या त्या गजेंद्राजवळ आला. परीक्षित राजा, सर्वदेवमय श्रीहरि अंतरिक्ष मार्गांतून आपणासमीप येत आहे असें पाहून, गजेंद्रानें त्या सरोवरांतील सुवर्णकमल आपल्या शुंडादंडानें उचलून त्याच्या चरणीं अर्पण केलें; आणि मोठ्या कष्टानें, "हे नारायणा, जगद्गुरो, भगवंता, तुला नमस्कार असो!" असे शब्द उच्चारिले! भगवंतानेंही त्या गजेंद्राची दीन वाणी ऐकून नक्रासह त्याला बाहेर काढिलें, व चक्रानें त्या नक्राचें मुख विदारण करून सर्व देवांसमक्ष गजेन्द्राला मुक्त केलें!

## अध्याय चौथा.

—:०:—

### नक्राचें पूर्वजन्मवृत्त.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, श्रीहरीनें नक्रापासून गजेंद्राला मुक्त केलेलें पाहून देवांनीं, ऋषींनीं व गंधर्वांनीं त्या कृत्याची प्रशंसा करून भगवंतावर पुष्पांची वृष्टि केली. देवांनीं नौबदी वाजविल्या, गंधर्वांनीं नृत्यगायन आरंभिलें, आणि ऋषि, चारण व सिद्ध हे भगवत्स्तव करूं लागले. परीक्षिता, भगवंतानें नक्राचें मुख फाडिलें असतां तो नक्रदेह तेथेंच पडला, आणि त्यापासून एक अतितेजस्वी असा पुरुष उत्पन्न झाला. त्यानें आपलें मस्तक नम्र करून भगवंताला शिरसा वंदन केलें, आणि त्याला प्रदक्षिणा घालून सर्वांसमक्ष तो स्वर्गलोकीं निघून गेला. राजा, हा नक्र पूर्वी हूहू नांवाचा गंधर्व होता. देवल ऋषींच्या शापानें तो नक्र झाला असून त्याची ह्या वेळीं त्या शापापासून निवृत्ति झाली; असो. इकडे गजेंद्रही भगवंताच्या स्पर्शानें अज्ञानबंधांतून मुक्त झाला, आणि त्याला सरूपता मुक्ति मिळाली.

### गजेन्द्राचा पूर्वजन्मवृत्तांत.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—परीक्षित राजा, गजेंद्र हा पूर्वजन्मीं द्रविड देशांतील पांड्य प्रांताचा इंद्रद्युम्न नामक राजा होता. हा द्रविडदेशाधिपति इंद्रद्युम्न महाभगवद्भक्त असून मलय पर्वतावर तपश्चर्या करण्याकरितां जटा वगैरे धारण करून राहिला होता. एके दिवशीं स्नानसंध्यादिक कर्म आटोपून व मौन धारण करून तो ईश्वराची आराधना करीत बसला असतां, दैवयोगानें शिष्यसमूहासह अगस्त्य मुनि तेथें प्राप्त झाले. राजा ध्यानस्थ बसलेला होता, ह्या-

१ हा गंधर्व पूर्वी एके वेळीं आपल्या स्त्रियांसमवेत एका सरोवरांत क्रीडा करीत होता; त्या वेळीं तथें देवल ऋषि स्नानाकरितां उतरले असतां, त्यानें त्यांचे पाय धरून ओढिले. त्यामुळें त्या ऋषींनीं यास 'तूं नक्र होशील' असा शाप दिला. हें ऐकून हूहूनें त्यांची प्रार्थना केली असतां त्यांनीं असा उःशाप दिला कीं, 'गजेंद्राला उद्धरितांना भगवान श्रीहरि तुला मुक्त करतील.'

मुळें त्यानें अगस्त्य ऋषींचें आदरातिथ्य वगैरे केलें नाहीं. तेव्हां, हा आपलें आदरातिथ्य न करितां एकांतामध्यें स्वस्थ बसला आहे हें अगदीं अनुचित होय असें मनांत आणून अगस्त्य ऋषि क्रोधाविष्ट झाले, व त्यांनीं

### इंद्रद्युम्नास शाप

दिला कीं, "यानें ब्राह्मणांचा अवमान केला आहे, ह्यास्तव ह्यास अंधतम नरकाची प्राप्ति व्हावी. हा गजाप्रमाणें उद्धट असल्यामुळें ह्यास अज्ञानरूप गजयोनि मिळो!" परीक्षित राजा, इतकें बोलून अगस्त्य ऋषि आपल्या शिष्यगणांसह तेथून निघून गेले. इकडे राजर्षि इंद्रद्युम्नही, तें आपल्या पूर्वकर्माचें फल आहे असें समजून, स्मृतीचा नाश करणाऱ्या गजयोनीला प्राप्त झाला! परंतु हरिपूजेच्या प्रभावानें त्या योनींतही त्याला आत्मस्मृति राहिली; असो. भगवंतानें त्या गजेंद्राला व नक्राला पुढें मुक्त केलें.

### गजेंद्राख्यानमाहात्म्य.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—परीक्षित राजा, गजेंद्राची मुक्तता केल्यावर सर्वव्यापक भगवान हरीनें असें सांगितलें कीं, "गजेंद्रा, तूं ज्या स्तोत्रानें माझी स्तुति केलीस, त्या स्तोत्राचा जे लोक नित्य प्रभातसमयीं पठ करतील, त्यांना मरणकाळीं निर्मळ बुद्धि प्राप्त होईल, व अंतीं उत्तम गति मिळेल. तसेंच जे लोक ब्राह्मसमयीं एकाग्र चित्तानें तुझें, माझें, ह्या सरोवराचें, पर्वताचें, गिरिकंदरांचें, वनाचें, वृक्षलतांचें, कुंजांचें, ह्या शिखरांचें, ब्रह्मदेवाच्या, माझ्या व शंकराच्या मंदिरांचें, क्षीरसागराचें, श्रीवत्साचें, कौस्तुभाचें, वैजयंतीचें, सुदर्शन चक्राचें, पांचजन्याचें, गरुडाचें, शेषाचें, लक्ष्मीचें, नारदादिक माझ्या विभूतींचें, मत्स्यकूर्मादिक माझ्या अवतारांचें, सूर्याचें, चंद्राचें, अग्नीचें, ॐकाराचें, मायेचें, गोब्राह्मणांचें, सनातन धर्माचें, दक्षकन्यांचें, गंगा, यमुना इत्यादिक पुण्य नद्यांचें, ऐरावताचें, ध्रुवाचें, सप्तर्षींचें व पुण्यश्लोक नरांचें स्मरण करतील, त्यांचीं सकळ पातकें दग्ध होतील!" राजा, इतकें सांगून श्रीहरीनें क्षीरसमुद्रांत उत्पन्न झालेला उत्तम शंख वाजविला, व सर्वांना आनंदवीत गरुडावर आरोहण करून सर्व पार्षदांसह तो वैकुंठलोकीं गेला. नंतर देव आदिकरून सर्व आपापल्या स्थानीं गेले.

श्रीशुक म्हणाले:—परीक्षिता, हें गजेंद्रमोक्ष नामक आख्यान सर्व मनोरथ पूर्ण करणारें आहे. ज्यांना आपल्या कल्याणाची इच्छा असेल, त्यांनीं पहाटे उठून स्नान वगैरे करून याचा पाठ करावा, म्हणजे त्यांच्या इच्छित कामना पूर्ण होतील

## अध्याय पांचवा.

—:०:—

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, पापाचा नाश करणारें हें गजेंद्रमोक्षाचें आख्यान मीं तुला सांगितलें. आतां पांचवें जें

### रैवत मन्वंतर

तें तुला सांगतों. या मन्वंतरांत तामसाचा भाऊ रैवत हा मनु होता; अर्जुन, बलि, विंध्य इत्यादि मनुपुत्र होते; भूतरयादिक देव होते; विभु नांवाचा इंद्र होता; हिरण्यरोमा[1], वेदशिरा, ऊर्ध्वबाहु, देवबाहु, सुधामा, पर्जन्य व महामुनि हे सात ऋषि होते; व शुभ्र नामक ऋषीच्या विकुंठा पत्नीच्या उदरीं वैकुंठ पुत्र झाला, तो वैकुंठ ईश्वराचा अंशावतार होता. भगवान वैकुंठानें रमादेवीचें कोड पुरविण्याकरितां सर्व लोकांना वंद्य असा वैकुंठलोक निर्माण केला. त्याच्या पराक्रमाचें आणि ब्राह्मणभक्तीचें वर्णन मीं तुला पूर्वीं सांगितलेंच आहे. ईश्वराच्या सर्व गुणांचें वर्णन करणें अ-

---

१ यांचीं दुसरीं नांवें—अरुण, तत्त्वदर्शी, धृतमान, हव्यवान, कवि, युक्त, निरुत्सुक, सत्त्व, निर्मोह आणि प्रकाशक हीं होत.

शक्य आहे. पृथ्वीच्या रजःकणांचीही गणना करवेल, पण ईश्वराच्या गुणांची गणना होणें अशक्य आहे. राजा, या मन्वंतरानंतर सहावें जें

**चाक्षुष मन्वंतर**

झालें, त्याचें अधिकारिमंडळ तुला सांगतों: या मन्वंतरांत चक्षूचा पुत्र चाक्षुष हा मनु होता; पुरु, पूरुष, सुद्युम्न इत्यादि मनुपुत्र होते; आप्यादिक देवगण होते; मंत्रद्रुम नामक इंद्र होता; हविष्मान्, वीरक, सुमेधा, उत्तम, मधु, अतिनामा व सहिष्णु हे सात ऋषि होते; आणि वैराजाची पत्नी संभूति इच्या उदरीं अजित या नांवाचा जो पुत्र झाला, तो ईश्वराचा अंशावतार होता. राजा, या अजितानें क्षीरसमुद्राचें मंथन करून देवांना अमृत मिळवून दिलें; आणि स्वतः कूर्मरूप घेऊन, फिरणाऱ्या मंदर पर्वताला आपल्या पाठीवर तारून धरिलें.

परीक्षित राजा म्हणाला:—अहो मुनिवर्य, भगवंतानें क्षीरसागराचें मंथन कशाकरितां व कसें केलें, आणि देवांना अमृताची प्राप्ति कशी झाली, हें मला आपण सविस्तर सांगावें. तसेंच, मंदर पर्वताला पाठीवर धरण्याला काय कारण झालें तेंही अद्भुत चारित्र मला सांगावें. ईश्वराचीं चरित्रें कितीही ऐकिलीं तरी तृप्ति होत नाहीं.

## समुद्रमंथनाचा इतिहास.

श्रीशुकाचार्य म्हणाले:–परीक्षित राजा, दुर्वास ऋषींच्या शापानें इंद्र ऐश्वर्यहीन झाला, व त्याजबरोबर सर्व त्रैलोक्याचें ऐश्वर्य नष्ट होऊन सर्व क्रिया लुप्त झाल्या, असें पाहून दैत्यांनीं देवांवर स्वारी केली; आणि देवदैत्यांचें युद्ध सुरू झालें. त्यांत, देवांवर तीक्ष्ण बाणांचे प्रहार करून दैत्यांनीं त्यांपैकीं पुष्कळांचे प्राण हरण केले. त्या समयीं इंद्रानें पुष्कळ उपाय केले, पण देव जिवंत होईनात. तेव्हां अवशिष्ट देवांनीं आणि इंद्रानें असा विचार केला कीं, आतां ब्रह्मदेवाकडे गेलें पाहिजे; त्याखेरीज कांहीं उपाय निघणार नाहीं. नंतर ते देव व इंद्र मिळून मेरु पर्वतावर 'ब्रह्मसभा' आहे तेथें गेले, आणि ब्रह्मदेवाला नमस्कार करून त्यांनीं झालेली सर्व हकीकत त्याला सांगितली. भगवान ब्रह्मदेवानें देवांची ती स्थिति पाहून आणि लोकांत सर्वत्र अमंगल प्रकार वाढत चालला आहे व दैत्यांचा मात्र उत्कर्ष होत आहे, असें मनांत आणून, परमेश्वराचें ध्यान केलें, व ठरविलें कीं, यास आतां एकच उपाय आहे; आणि तो हाच कीं, सर्वांनीं मिळून भगवान

**विष्णूला शरण जाण्याचा विचार**

करावा, म्हणजे तो सर्वांना संकटापासून मुक्त करील. असा विचार ठरवून ब्रह्मदेव म्हणाला, "देवहो, मी, शंकर व तुम्ही, तसेच दैत्य, मानव, पशु, पक्षी, सर्प, कीटक, वृक्ष, लता इत्यादि सर्व कांहीं परमेश्वराच्या अवतारांच्या कला होत. या प्रसंगांतून पार पाडण्यास एक तो परमेश्वर मात्र समर्थ आहे. याकरितां, आपण सर्व त्याच्याकडे जाऊं. त्याला कोणाचाही पक्षपात करण्याची आवश्यकता नाहीं. तो जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करण्याकरितां योग्य वेळीं सत्त्व, रज आणि तम ह्या गुणांचा अंगीकार करितो. प्रस्तुतच्या प्रसंगीं प्राण्यांच्या उत्कर्षाकरितां त्याला सत्त्वगुणाचा स्वीकार करून सृष्टीचें रक्षण करणें अवश्य आहे. म्हणून आपण त्या परमेश्वराकडेच शरण जाऊं या. म्हणजे तो आपलें कल्याण करील."

---

१ पुरु, कुत्स, त्रित, द्युम्न, सत्यवान्, धृतव्रत, अग्निष्टोम, अतिरात्र, प्रद्युम्न, शिबि आणि उल्मुक हीं यांचीं दुसरीं नांवें होत.

२ पूर्वी एके वेळीं इंद्र ऐरावतावर बसून फिरत असतां, दुर्वास ऋषींची व त्याची मार्गांत गांठ पडली. तेव्हां दुर्वासांनीं प्रसाद म्हणून इंद्राला आपल्या गळ्यांतील माळ दिली. पण ऐश्वर्यानें उन्मत्त झालेल्या इंद्रानें ती माळ घेऊन ऐरावताच्या मस्तकावर टाकिली, आणि त्यानेंही ती घेऊन पायांखालीं तुडविली! हा प्रकार पाहून दुर्वास ऋषींना फार कोप आला व त्यांनीं इंद्राला असा शाप दिला कीं, "तूं आणि तुझ्याबरोबर हें सर्व त्रैलोक्य ऐश्वर्यरहित होईल!"

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, असा विचार करून, ते सर्व देव क्षीरसमुद्रांत ज्ञानमयप्रदेशीं जेथें भगवान राहतो तेथें गेले, आणि त्यांनीं एकाग्र चित्त करून वैदिक वचनांनीं परमात्म्याची स्तुति करण्यास आरंभ केला. राजा, त्यांनीं परमात्म्याचें स्वरूप केवळ ऐकिलेलें मात्र होतें. त्यांनीं तें प्रत्यक्ष पाहिलेलें नव्हतें. असो; त्यांनीं स्तुति केली ती अशी:

## ब्रह्मदेवादिकांनीं केलेली परमेश्वरस्तुति.

ब्रह्मदेव म्हणाला:—

अविक्रियं सत्यमनंतमाद्यं गुहाशयं निष्कलमप्रतर्क्यम् ।
मनोऽग्रयानं वचसाऽनिरुक्तं नमामहे देववरं वरेण्यम् ॥
विपश्चितं प्राणमनोधियात्मनामर्थेंद्रियाभासमनिद्रमव्रणम् ।
छायातपौ यत्र न गृध्रपक्षौ तमक्षरं खं त्रियुगं व्रजामहे ॥
अजस्य चक्रं त्वजयेर्यमाणं मनोमयं पंचदशारमाशु ।
त्रिणाभि विद्युच्चलमष्टनेमि यदक्षमाहुस्तमृतं प्रपद्ये ॥
य एकवर्ण तमसः परं तदलोकमव्यक्तमनंतपारम् ।
आसांचकारोपसुपर्णमेनमुपासते योगरथेन धीराः ॥
न यस्य कश्चातितितर्ति मायां यया जनो मुह्यति वेद नार्थम् ।
तं निर्जितात्मात्मगुणं परेशं नमाम भूतेषु समं चरंतम् ॥
इमे वयं यत्प्रिययैव तन्वा सत्त्वेन सृष्टा बहिरंतराविः ।
गतिं न सूक्ष्मामृषयश्च विद्महे कुतोऽसुराद्या इतरप्रधानाः ॥
पादौ महीयं स्वकृतैव यस्य चतुर्विधो यत्र हि भूतसर्गः ।
स वै महापूरुष आत्मतंत्रः प्रसीदतां ब्रह्म महाविभूतिः ॥
अंभस्तु यद्रेत उदारवीर्यं सिद्ध्यंति जीवंत्युत वर्धमानाः ।
लोका यतोऽथाखिललोकपालाः प्रसीदतां ब्रह्म महाविभूतिः ॥
सोमं मनो यस्य समामनंति दिवौकसां वै बलमंध आयुः ।
ईशो नगानां प्रजनः प्रजानां प्रसीदतां नः स महाविभूतिः ॥
अग्निर्मुखं यस्य तु जातवेदा जातः क्रियाकांडनिमित्तजन्मा ।
अंतःसमुद्रेऽनुपचन्स्वधातून्प्रसीदतां नः स महाविभूतिः ॥
यच्चक्षुरासीत्तरणिर्देवयानं त्रयीमयो ब्रह्मण एष धिष्ण्यम् ।
द्वारं च मुक्तेरमृतं च मृत्युः प्रसीदतां नः स महाविभूतिः ॥

प्राणदभूद्यस्य चराचराणां प्राणः सहो बलमोजश्च वायुः ।
अन्वास्म संम्राजमिवानुगा वयं प्रसीदतां नः स महाविभूतिः ॥
श्रोत्राद्दिशो यस्य हृदश्च खानि प्रजज्ञिरे खं पुरुषस्य नाभ्याः ।
प्राणेंद्रियात्माऽसुशरीरकेतं प्रसीदतां नः स महाविभूतिः ॥
बलान्महेंद्रस्त्रिदशाः प्रसादान्मन्योर्गिरीशो धिषणाद्विरिंचः ।
खेभ्यश्च छंदांस्यृषयो मेढ्तः कः प्रसीदतां नः स महाविभूतिः ॥
श्रीर्वक्षसः पितरश्छाययाऽऽसन्धर्मः स्तनादितरः पृष्ठतोऽभूत् ।
द्यौर्यस्य शीर्ष्णोऽप्सरसो विहारात्प्रसीदतां नः स महाविभूतिः ॥
विप्रो मुखं ब्रह्म च यस्य गुह्यं राजन्य आसीद्भुजयोर्बलं च ।
ऊर्वोर्विडोजोऽङ्घ्रिरवेदशूद्रौ प्रसीदतां नः स महाविभूतिः ॥
लोभोऽधरात्प्रीतिरुपर्यभूद्द्युतिर्नस्तः पशव्यः स्पर्शेन कामः ।
भ्रुवोर्यमः पक्ष्मभवस्तु कालः प्रसीदतां नः स महाविभूतिः ॥
द्रव्यं वयः कर्म गुणान्विशेषं यद्योगमायाविहितान्वदंति ।
यद्दुर्विभाव्यं प्रबुधापबाधं प्रसीदतां नः स महाविभूतिः ॥
नमोऽस्तु तस्मा उपशांतशक्तये स्वाराज्यलाभप्रतिपूरितात्मने ।
गुणेषु मायारचितेषु वृत्तिभिर्न सज्जमानाय नभस्वदूतये ॥
स त्वं नो दर्शयात्मानमस्मत्करणगोचरम् ।
प्रपन्नानां दिदृक्षूणां सस्मितं ते मुखांबुजम् ॥
तैस्तैः स्वेच्छाधृतै रूपैः काले काले स्वयं विभो ।
कर्म दुर्विषहं यन्नो भगवांस्तत्करोति हि ॥
क्लेशभूर्यल्पसाराणि कर्माणि विफलानि वा ।
देहिनां विषयार्तानां न तथैवार्पितं त्वयि ॥
नावमः कर्मकल्पोऽपि विफलायेश्वरार्पितः ।
कल्पते पुरुषस्यैष स ह्यात्मा दयितो हितः ॥
यथा हि स्कंधशाखानां तरोर्मूलावसेचनम् ।
एवमाराधनं विष्णोः सर्वेषामात्मनश्च हि ॥
नमस्तुभ्यमनंताय दुर्वितर्क्यात्मकर्मणे ।
निर्गुणाय गुणेशाय सत्त्वस्थाय च सांप्रतम् ॥

' देवा, मनापेक्षांही ज्याची गति अत्यंत वेगवान, आणि ज्याचें वर्णन वाणीनें करणें अगदींच अशक्य, असा जो तूं आद्यंतरहित, सत्यस्वरूप, निर्विकार, निरुपाधिक, ज्ञानगम्य, अतर्क्य, श्रेष्ठतम, व अत्यंत वंदनीय प्रभु, त्या तुला आमचा नमस्कार असो. तूं प्राण, मन, बुद्धि व अहंकार ह्यांचा ज्ञाता असून, शब्दादि विषय आणि इंद्रियें यांच्या रूपांनीं भासतोस; तूं जन्मरहित व देहरहित आहेस; तुझ्या ठिकाणीं भेद-दृष्टि नसून सर्वांच्या ठिकाणीं तूं समरूपी आहेस; तूं अविनाशी व शाश्वत असून आकाशासारखा व्यापक आहेस; आणि तूं तिन्ही काळीं एकसारखा प्रकाशमान असतोस. देवा, तुला आमचा नमस्कार असो. परमेश्वरा, ज्याला दहा इंद्रियें व पंचप्राण ह्या पंधरा आरा आहेत; सत्त्व, रज, तम हे तीन गुण ज्याला तुंबे आहेत; अष्टधा प्रकृति ह्या ज्याला धावा आहेत; अनादि माया ही ज्याला चालक आहे; ज्याची मन ही गति आहे; आणि विद्युल्लतेप्रमाणें जें त्वरित चालतें, अशा शरीररूप चक्राचा प्रेरक जो तूं, त्या तुज सच्चिदानंद व सत्स्वरूप परमात्म्याला आम्ही शरण आलों आहों. ज्ञान हेंच ज्याचें स्वरूप असून, जीवांच्या कर्माकर्मांचा जो नियामक व साक्षी आहे; ज्याला आदि, अंत आणि मध्य हीं नसल्यामुळें जो नित्य आहे; ज्याचें रूप कोणासही कळत नाहीं; जो अज्ञानमय प्रकृतीच्या पलीकडे आहे; ज्यास काळाची, स्थळाची वगैरे कांहींएक इयत्ता नाहीं; योग हेंच ज्याच्या प्राप्तीचें साधन आहे; व ज्ञानी पुरुष योगाभ्यासानेंच ज्याची उपासना चालवितात, त्या तुज अगम्य जगच्चालकाला आमचा नमस्कार असो. ज्याच्या मायेच्या गुणांना मोहित होऊन जीव स्वस्वरूपापासून च्युत होतो व भवचक्रांत फिरत राहतो; ज्याच्या मायेचें अतिक्रमण कोणीही करूं शकत नाहीं; पण अशा दुर्धर मायेलाही ज्यानें जिंकिलें आहे, असा जो तूं मायातीत, समदृष्टि व परात्पर परमात्मा, त्या तुला आम्ही नमस्कार करितों. रज आणि तम ह्या गुणांच्या योगानेंच ज्यांचीं शरीरें बनलीं आहेत असे जे असुर, त्यांना तुझें स्वरूप ओळखतां येत नाहीं, यांत मोठेंसें आश्चर्य नाहीं; कारण, केवळ सत्त्वगुणापासूनच ज्यांची उत्पत्ति, असे जे आम्ही देव व ऋषि, त्या आम्हांलाही तुझें अंतर्बाह्य व्यापून राहिलेलें निरुपाधिक स्वरूप ओळखतां येत नाहीं. हे देवाधिदेवा, आम्ही तुला अनन्यभावानें शरण आहों. ईश्वरा, तुझी शक्ति अचिंत्य आहे. ही सर्व भूतसृष्टि तूं केवळ आपल्या इच्छामात्रेंकरून निर्माण केली आहेस. तुझ्या विराट्स्वरूपाचे चरण म्हणजे ही भूतसंघ धारण करणारी पृथ्वी होय. देवा, तुला चरण आहेत तरी तूं चरणयुक्त जीवांप्रमाणें पराधीन नाहींस. तूं अगदीं स्वतंत्र व परिपूर्ण आहेस. तुला आम्ही नमस्कार करितों. ज्या अपूर्व शक्तीपासून हें त्रैलोक्य व लोकपाल उत्पन्न झाले; व ज्याच्या रेतोरूप उदकापासून यांतील प्राणी उत्पन्न होतात, वांचतात आणि वृद्धि पावतात, तो ऐश्वर्यवान विश्वाधिपति आम्हांवर प्रसन्न होवो. देवांचें बळ, अन्न आणि आयुष्य असून वृक्षांचा अधिपति व प्रजांची वृद्धि करणारा जो चंद्र, तो ज्याचें मन आहे, त्या परमात्म्यानें आम्हांवर कृपा ठेवावी. यज्ञादि कर्मांसाठीं ज्याची उत्पत्ति, धनादिकांचा जो उत्पन्नकर्ता, अन्नादि रसांचें पचन करण्याकरितां जो जठराग्निरूपानें उदरांत राहतो, व समुद्रामध्येंही वडवाग्निरूपानें राहून जो जलाचें शोषण करितो, तो अग्नि हें ज्याचें मुख होय, त्या परमेश्वरास आम्ही वंदितों. परमेश्वरा, देवमार्गाची देवता, वेदांचा आत्मा, ब्रह्माचें उपासनास्थान, मुक्तीचें द्वार, काळाचा आत्मा, व प्रत्यक्ष मोक्ष असा जो सूर्य, तो तुझी दृष्टि आहे. आम्ही तुला शरण आहों. हे देवाधिदेवा, चराचर विश्वाची मानसिक व

शारीरिक शक्ति चालण्यास आधार जो प्राणवायु, तो तुझ्याच प्राणापासून उत्पन्न झाला आहे; तशाच दिशा तुझ्याच श्रवणेंद्रियापासून; शरीरावरील छिद्रें तुझ्याच हृदयापासून; प्राण, अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय हे दहा प्राण, आणि इंद्रियें, मन व शरीर यांना आश्रयभूत जें आकाश, तें तुझ्याच नाभीपासून; इंद्र हा तुझ्याच बळापासून; सर्व देव तुझ्याच प्रसादापासून; शंकर तुझ्याच क्रोधापासून; ब्रह्मदेव तुझ्याच बुद्धीपासून; छंद व ऋषि तुझ्याच इंद्रियछिद्रांपासून; प्रजापति तुझ्याच शिश्नापासून; लक्ष्मी तुझ्याच वक्षस्थलापासून; पितर तुझ्याच छायेपासून; धर्म तुझ्याच स्तनांपासून; अधर्म तुझ्याच पाठीपासून; स्वर्ग तुझ्याच मस्तकापासून; अप्सरा तुझ्याच क्रीडेपासून; ब्राह्मण व वेद हे तुझ्याच मुखापासून; क्षत्रिय हे तुझ्याच बाहूंपासून; वैश्य हे तुझ्याच मांड्यांपासून; शूद्र हे तुझ्याच चरणांपासून; लोभ हा अधरोष्ठापासून; प्रीति ही तुझ्याच ऊर्ध्वोष्ठापासून; कांति ही तुझ्याच नासिकेपासून; काम हा तुझ्याच स्पर्शापासून; यम हा तुझ्याच भ्रुकुटीपासून; आणि काळ हा तुझ्याच पापण्यांपासून उत्पन्न झाला! हे पुरुषोत्तमा, हीं अतर्क्य पंचमहाभूतें, काल, कर्म, सत्त्वादिक तीन गुण व महाभौतिक प्रपंच हीं सर्व तुझ्याच मायेपासून उत्पन्न झालीं! देवाधिदेवा, तुला आमचा नमस्कार असो. हे परमात्मन्, तू आत्मानंदांत परि-

असून तुझ्या ठिकाणीं सर्व शक्ति शांत झाल्या आहेत; तूं वायूप्रमाणें सर्वत्र संचार करीत असूनही कोठें आसक्त होऊन रहात नाहींस; तुला आम्ही वंदन करितों. देवा, तुझें स्वरूप अचिंत्य आहे; याकरितां, आमच्या इंद्रियांना गोचर होईल, असें स्वरूप तूं आम्हांला दाखीव; आम्ही तुझें हास्यमुख पाहण्याची फार इच्छा करीत आहों. भक्तांची इच्छा पूर्ण करण्याकरितां तूं नानातऱ्हेचीं रूपें धारण करितोस, हें आम्हांस माहीत आहे. देवा, संसारामध्यें निमग्न राहून प्राणी जीं जीं कर्में करितात, तीं तीं तुला अर्पण केलीं नसल्यामुळें जसें त्यांचें त्यांना विपरीत फळ मिळतें, तसें तुला अर्पण करून केलेल्या निष्काम कर्माचें फळ विपरीत असें कधींही मिळणार नाहीं, अशी आमची खातरी आहे. हे परमेश्वरा, प्राणी एखादें क्षुल्लक कर्म करीना, जर तो तें कर्म तुला अर्पण करील, तर तेवढ्यानें सुद्धां त्या प्राण्याला शाश्वत फळ प्राप्त होतें; कारण, ईश्वर हा प्रत्यक्ष आत्मा होय, असें समजून त्यास कोणतेंही कर्म अर्पण केल्यानें तें फलद्रूप व्हावयाचेंच. हे विश्वाधारा, वृक्षाचें मूळ पाण्यानें शिंपिलें असतां जसा शाखादिकांसहित सर्व वृक्ष टवटवीत होतो, तशी एक तुझी भक्ति केल्यानें तूं व सर्व प्राणी संतुष्ट होतात. भगवंता, आम्ही जीं जीं कर्में करितों, तीं तीं सर्व तुलाच अर्पण करीत असतों, हें तूं जाणतच आहेस. तूं आम्हां सर्वांचा रक्षक असून कल्पनातीत असा स्वयंप्रकाश व सच्चिदानंदरूप आहेस. आम्ही तुला नमस्कार करितों!'

## अध्याय सहावा.

—:०:—

### समुद्रमंथनप्रकरण.

#### देवांस श्रीहरिस्वरूपदर्शन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, अशा प्रकारें देवगण भगवंताची स्तुति करीत असतां, ज्याची कोटि सूर्यांप्रमाणें प्रभा पडली आहे असा भगवान श्रीहरि तेथें प्रकट झाला. त्याच्या तेजानें सर्व देवांचे नेत्र दिपून गेले. त्यांस स्वतांचीं शरीरें सुद्धां दिसतना; मग आकाश, दिशा, पृथ्वी वगैरे काय दिसणार! परमेश्वराच्या निर्मळ मूर्तीचा वर्ण मरकताप्रमाणें

श्यामल असून नेत्र कमलगर्भाप्रमाणें किंचित् आरक्त होते. त्याचें रूप कसें अगदीं रेखल्यासारखें वैगुण्यरहित दिसत होतें. मुख मनोहर व भुंवया हृदयंगम होत्या. मस्तकावर अमूल्य रत्नांचा मुकुट झळकत असून, कानांतील कुंडलांची प्रभा गालांवर पडल्यामुळें मुखकमल अनुपम शोभायमान दिसत होतें. हातांमध्यें कडीं, बाहूंवर भूषणें, गळ्यांत कौस्तुभ आणि वनमाला, हृदयाचे ठिकाणीं श्रीवत्सलांछन, कमरेभोंवतीं तप्तसुवर्णमय पीतांबर व त्यावरून कमरपट्टा, हस्तांचे ठायीं शंख, चक्र, गदा व पद्म, आणि पायांत पैंजण हीं शोभत असल्यामुळें, तें स्वरूप फारच प्रेक्षणीय दिसत होतें. परीक्षिता, अशा त्या दिव्य स्वरूपाला पाहून देवश्रेष्ठ ब्रह्मदेवानें शंकरासहित सर्व देवांसह त्या ईश्वराच्या चरणीं लोटांगण घातलें, आणि हात जोडून त्या परमपुरुषाची स्तुति केली.

## ब्रह्मदेवानें केलेली परमेश्वराची स्तुति.

ब्रह्मदेव म्हणाला:—

अजातजन्मस्थितिसंयमायागुणाय निर्वाणसुखार्णवाय ।
अणोरणिम्नेऽपरिगण्यधाम्ने महानुभावाय नमो नमस्ते ॥
रूपं तवैतत्पुरुषर्षभेज्यं श्रेयोर्थिभिर्वैदिकतांत्रिकेण ।
योगेन धातः सह नस्त्रिलोकान्पश्याम्यमुष्मिन्नु ह विश्वमूर्तौ ॥
त्वय्यग्र आसीत्त्वयि मध्य आसीत्त्वय्यंत आसीदिदमात्मतंत्रे ।
त्वमादिरंतो जगतोऽस्य मध्यं घटस्य मृत्स्नेव परः परस्मात् ॥
त्वं माययाऽऽत्माश्रयया स्वयेदं निर्माय विश्वं तदनु प्रविष्टः ।
पश्यंति युक्ता मनसा मनीषिणो गुणव्यवायेऽप्यगुणं विपश्चितः ॥
यथाऽग्निमेधस्यमृतं च गोषु भुव्यन्नमंबूद्यमने च वृत्तिम् ।
योगैर्मनुष्या अधियंति हि त्वां गुणेषु बुद्ध्या कवयो वदंति ॥
तं त्वां वयं नाथ समुज्जिहानं सरोजनाभातिचिरेप्सितार्थम् ।
दृष्ट्वा गता निर्वृत्तिमद्य सर्वे गजा दवार्ता इव गांगमंभः ॥
स त्वं विधत्स्वाखिललोकपाला वयं यदर्थास्तव पादमूलम् ।
समागतास्ते बहिरंतरात्मन्किं वाऽन्यविज्ञाप्यमशेषसाक्षिणः ॥
अहं गिरित्रश्च सुरादयो ये दक्षादयोऽग्नेरिव केतवस्ते ।
किं वा विदामेश पृथग्विभाता विधत्स्व शं नो द्विजदेवमंत्रम् ॥

' ईश्वरा, तुला जन्म, स्थिति आणि नाश व तसेच कोणतेही गुण किंवा उपाधि हीं नसून मोक्षसुखाचा तूं समुद्र आहेस. तूं अणूपेक्षां अणु ( सूक्ष्म ) असून तुझें सामर्थ्य केवळ अनंत व अपरिमेय आहे. तुझ्या अचिंत्यशक्ति स्वरूपाला आमचा नमस्कार असो. हे पुरुषश्रेष्ठा, कल्याणेच्छु

जनांनीं तुझ्या ह्या अद्वितीय मूर्तीची वेदोक्त व तंत्रोक्त विधींनीं पूजा करावी. तुझ्या ह्या विश्वरूपामध्यें योगबलानें आम्हांसह सर्व त्रैलोक्य मला स्पष्ट दिसत आहे. हे परात्परा, हें सर्व ब्रह्मांड उत्पत्तिकालापूर्वी तुझ्याच ठिकाणीं होतें, प्रस्तुत तुझ्याच ठिकाणीं आहे, व अंतीं तुझ्याच ठिकाणीं लय पावणार. घटाचे आदि, मध्य व अंत हे जशी मृत्तिका, तसे ह्या ब्रह्मांडाचे आदि, मध्य व अंत हे तूंच होस. कारण, तूं प्रकृतीच्या अगदीं पलीकडे शाश्वतरूपानें आहेस. हे परमेश्वरा, तूं स्वतंत्र असून आपल्या आश्रयानें राहणाऱ्या मायेच्या योगानें हें विश्व उत्पन्न करितोस, आणि त्याच्या अंतरीं प्रविष्ट होतोस. तें तुझें निर्गुण व निर्मल स्वरूप योगिजन मनानें पाहतात; आणि ह्यास्तव तेच खरे विवेकी व ज्ञाते होत. मंथन केलें असतां काष्ठांत जसा अग्नि सांपडतो, दोहन केलें असतां गाईपासून जसें दूध मिळतें, नांगरिलें असतां जसें पृथ्वीपासून धान्य प्राप्त होतें, खणलें असतां जसें उदक लागतें, अथवा उद्योगानें जशीं चारितार्थाचीं साधनें सुलभ होतात, तसें विद्वान लोकांना बुद्धीच्या साहाय्यानें तुझ्या स्वरूपाचें ज्ञान सुलभ होतें; व ते तदनुसार तुझें वर्णन करितात. देवा, तुझ्या दर्शनानें आम्हांला अत्यंत आनंद झाला आहे. आम्ही तुझ्या दर्शनाची फार इच्छा करीत होतों. वणव्यांत सांपडलेल्या हत्तीला गंगेचें उदक प्राप्त झाल्यानें जसें सुख होतें, तसें सुख आज आम्हांस तुझ्यापासून होत आहे. देवा, तूं सर्वज्ञ असल्यामुळें, आम्ही ज्याकरितां तुझ्या चरणांजवळ आलों आहों, तें कार्य तूं जाणतच आहेस. अग्नीपासून ज्याप्रमाणें ठिणग्या उत्पन्न होतात, त्याप्रमाणें मी, शंकर, इतर देव व प्रजापति हे सर्व तुझ्या अंशापासून उत्पन्न झालेले आहों. आम्हां अज्ञ प्राण्यांना आमच्या कल्याणाचा मार्ग तूंच सांग.

## भगवंताची देवांस आज्ञा.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, भगवंतानें देवांचें हृद्गत जाणून गंभीर अशा वाणीनें त्यांस म्हटलें, "देवहो, ! मी तुम्हांला एक युक्ति सांगतों; त्याप्रमाणें तुम्ही निःसंशय अंतःकरणानें प्रयत्न करा, म्हणजे तुमचें कल्याण होईल. तूर्त दैत्य आणि दानव यांजवर कालाची पूर्ण कृपा आहे. याकरितां, जर तुम्हांला आपलें महत्कार्य साधावयाचें असेल, तर ते दैत्यदानव जरी तुमचे शत्रु आहेत, तरी, ज्याप्रमाणें पेटाऱ्यांत कोंडलेला सर्प बाहेर निघण्यास मार्ग सांपडावा म्हणून उंदराशीं सुद्धां मैत्री करितो, त्याप्रमाणें तुम्ही त्या दैत्यदानवांशीं मैत्री करा. नंतर त्यांना बरोबर घेऊन, मृत प्राण्यालाही अमर करणारें जें अमृत, तें उत्पन्न करण्याचा यत्न करा. तो असा कीं, प्रथम वल्ली, तृण, लता व औषधि आणून क्षीरसमुद्रामध्यें घाला; मग मंदर पर्वताची रवी करून त्याला वासुकीची दोरी गुंडाळा; व एका बाजूस दैत्य व एका बाजूस तुम्ही अशा प्रकारें ती धरून त्या क्षीरसागराचें मंथन करा; म्हणजे दैत्य क्लेश भोगणारे होतील, व तुम्ही फलग्राही व्हाल. देवांनो ! या वेळीं असुर जें जें म्हणतील, त्याला त्याला मुकाट्यानें अनुमोदन द्या. त्यांच्या इच्छेविरुद्ध बोलूं नका. समुद्रांतून ज्या वस्तु निघतील, त्यांमध्यें कालकूट विष निघेल, त्यास भिऊं नका; आणि इतर वस्तूंविषयीं काम, क्रोध किंवा लोभ दर्शवूं नका; म्हणजे तुमचे मनोरथ परिपूर्ण होतील. परीक्षित राजा, इतकें सांगून भगवान गुप्त झाले.

## समुद्रमंथनाची तयारी.

श्रीशुक पुढें सांगतात:—परीक्षित राजा, नंतर ब्रह्मदेव आणि शंकर स्वस्थानीं निघून गेले. व इतर सर्व देव दैत्यराज बलीकडे प्राप्त झाले. देव निःशस्त्र आले आहेत, असें पाहून बलीचे सेनापति त्यांशीं युद्ध करण्यास प्रवृत्त झाले, परंतु त्या शुद्ध व उदार अंतःकरणाच्या बलि राजानें

त्यांचें निवारण केलें. कारण, संधि केव्हां करावा, व युद्ध केव्हां करावें, हें त्यास पूर्णपणें माहीत होतें. तो अतुल-प्रतापी विरोचनपुत्र बलि राजा छत्रचामरादि राजचिन्हांसह सिंहासनावर अधिष्ठित असतां व सभोंवतीं महान महान दैत्य पहारा करीत असतां, देवांसह इंद्र तेथें गेला; आणि त्यानें आदरपूर्वक व मधुर शब्दांनीं पुरुषोत्तमानें सांगितलेला अमृतप्राप्तीचा समुद्रमंथनविधि त्याला सांगितला. त्या वेळीं बलि राजाच्या सभेमध्यें पौलोम, कालकेय, शंबरासुर, अरिष्टनेमि वगैरे दैत्याधिपति व इतर मोठमोठे वीर बसले होते. इंद्रानें सांगितलेली हकीकत सर्वांनीं ऐकिली. व तें कृत्य बलि राजासुद्धां सर्वांना पसंत पडलें. हे शत्रुदमना परीक्षिता, नंतर त्या देवांनीं व दैत्यांनीं आपसांत सख्य करून एकमतानें अमृतप्राप्तीचा उद्योग आरंभिला. प्रथम मंदर पर्वत बलात्कारानें उपटून तो ते समुद्रतीरावर नेऊं लागले; पण त्या सुवर्णमय प्रचंड पर्वताचें ओझें आणतां आणतां ते सर्व महाबलिष्ठ दैत्य आणि देव अगदीं थकून गेले. शेवटीं त्यांच्यानें एक पाऊलही पुढें टाकवेना; तेव्हां त्यांनीं वाटेंतच त्या पर्वताला खालीं टाकिलें, आणि तो कनकपर्वत खालीं पडतां पडतां कित्येक दैत्य व देव त्याखालीं चिरडून मेले ! अशा प्रकारें त्या देवदैत्यांचें बल व धैर्य क्षीण झालें आहे व ते उत्साहरहित होत आहेत असें पाहून भगवान गरुडध्वज तेथें प्रकट झाला आणि मरून पडलेल्या देवदैत्यांकडे त्यानें आपल्या अमृतदृष्टीनें अवलोकन करून त्यांना सजीव केलें. नंतर त्या अचिंत्यशक्ति परमेश्वरानें तो प्रचंड पर्वत सहज लीलेनें आपल्या एका हातानें उचलिला, आणि त्यासह गरुडावर बसून तो समुद्रतीरावर आला. तेथें भगवंतानें तो पर्वत खालीं ठेविला, व गरुडास वैकुंठलोकीं जाण्याची आज्ञा दिली. परीक्षित राजा, असें करण्याचें कारण इतकेंच कीं, त्या ठिकाणीं वासुकीला दोरीच्या ऐवजीं उपयोगांत आणावयाचें होतें; तेव्हां जर गरुड तेथें असेल, तर वासुकि तेथ येणार नाहीं, याकरितां भगवंतानें गरुडाला तेथून परत लाविलें; असो. इतक्यांत देवदैत्यही तेथें येऊन पोहोंचले.

## अध्याय सातवा.

—:०.—

### समुद्रमंथन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, भगवंतानें मंदर पर्वत समुद्राजवळ आणून ठेविल्यावर पुढें त्या दैत्यांनीं व दानवांनीं, समुद्रांतून निघालेल्या अमृताचा कांहीं भाग नागराज वासुकीला देण्याचें कबूल करून त्याला वश करून घेतलें. नंतर त्यांनीं त्या वासुकीला दोरीप्रमाणें पर्वताला गुंडाळिलें, आणि तो पर्वत समुद्रांत घालून घुसळण्यास आरंभ केला. राजा, दैत्यांना प्राणापेक्षा मानाची योग्यता जास्त वाटत होती, हें तत्त्व जाणून, घुसळण्यास आरंभ करतेवेळीं भगवंतानें प्रथम वासुकीच्या तोंडाकडील बाजू आपल्या हातीं धरिली, त्याबरोबर इतर देवांनींही तीच बाजू धरिली; पण शेंपटीची म्हणजे अमंगळ भागाची बाजू आपल्या वांटणीला आली असें पाहून ते मानी, अध्ययनशील, विख्यात व शूर दैत्य ती बाजू धरण्यास कबूल होईनात. तेव्हां, ज्याकरितां आपण एवढा प्रयत्न केला तो सफळ झाला, असें पाहून देवांनीं दैत्यांचा हिरमोड केला नाहीं; अर्थात् शेंपटीकडील बाजू धरण्याचें त्यांनीं पतकरिलें. परीक्षित राजा, पुढें जेव्हां समुद्राचें घुसळणें सुरू झालें, तेव्हां तो प्रचंड पर्वत हळू हळू समुद्रांत बुडूं लागला. देवांनीं व दैत्यांनीं तो पर्वत बुडूं नये म्हणून पुष्कळ प्रयत्न केले, पण व्यर्थ. शेवटीं भगवंताला वाटलें कीं, आतां यांजकडून हें काम रेटत नाहीं. तेव्हां



कूर्म अवतार.

त्यानें तत्क्षणींच कांसवाचें रूप धरिलें आणि समुद्रांत प्रवेश करून बुडत चाललेला पर्वत आपल्या पाठीवर घेऊन त्याला वर काढिलें. राजा, हाच भगवंताचा

कूर्मावतार

होय. या वेळीं भगवंतानें धरिलेलें कांसवाचें रूप फारच मोठें होतें. त्या कांसवाच्या पाठीचा घेर एक लक्ष योजनें होता. त्या कांसवाचा पृष्ठभाग म्हणजे एक महान द्वीपच होतें. मंदर पर्वत वर आला असें पाहतांच देवदैत्य फिरून मोठ्या जोरानें समुद्र घुसळूं लागले; व तो मंदर गिरि भगवंताच्या पाठीवर गरगर फिरूं लागला. राजा, एवढा मोठा तो पर्वत भगवत्पृष्ठीं फिरत असतां, त्या देवाधिदेवाला केवळ पाठ कुरवाळल्याप्रमाणें वाटलें! राजा, त्या समयीं, भगवंतानें, दैत्यांना बळ व हुरूप यावा, देवांनाही आवेश चढावा, आणि वासुकीला तें घर्षण सहन व्हावें, म्हणून त्या सर्वांच्या शरिरांत सूक्ष्मरूपानें प्रवेश केला; व मग त्या सर्वांनीं मंदराचलास जोरानें गरगर फिरविण्याची सुरुवात केली. परंतु, त्या समयीं इकडे अशी स्थिति झाली कीं, त्या जोराच्या घुसळण्यामुळें मंदर गिरि डळमळूं लागला. तेव्हां फिरून भगवंतानें सहस्त्रबाहु पुरुषाचें अजस्त्र रूप धरिलें, आणि मंदर पर्वताच्या मस्तकावर आपले हात ठेवून त्याला दाबून धरिलें, आणि आपण वर बसला! राजा, भगवंताची मूर्ति एखाद्या महान पर्वताप्रमाणें जेव्हां त्या मंदरावर अधिष्ठित झाली, तेव्हां ब्रह्मादिक देवांनीं पुष्पवृष्टि केली. असो. ह्याप्रमाणें खालीं वर चांगला आधार मिळाल्यामुळें पर्वताचें बुडणें व डळमळणें बंद होऊन देवांना व दैत्यांना तो समुद्र घुसळण्यास चांगलेंच अवसान सांपडलें. त्यांनीं मोठ्या नेटानें आणि एकमतानें घुसळणें चालविलें. तेव्हां समुद्र अत्यंत क्षुब्ध होऊन त्याच्या पोटांतील नक्रमकरादिक जलचरांची दुर्दशा उडूं लागली. त्या घुसळण्याच्या वेगानें नागराज वासुकीच्या सहस्त्रावधि उग्र नेत्रांतून आणि मुखांतून विषमय ज्वाला निघूं लागल्या; आणि दैत्य तोंडाकडे असल्यामुळें त्यांपैकीं कित्येक त्या ज्वालांनीं जळून गेले, व पौलोम, कालकेय, बलि, इल्वल वगैरे महान महान दैत्य वणव्यांत सांपडलेल्या वृक्षांप्रमाणें अगदीं करपून जाऊन निस्तेज झाले! देव जरी शेंपटीकडे होते, तरी मुखाकडून येणाऱ्या नुसत्या वाफाऱ्यानेंच त्यांची दुर्दशा उडाली! त्यांच्या प्रभा लुप्त झाल्या; त्यांचीं वस्त्रें, माळा, पोषाख व मुखें अगदीं धुरकटून गेलीं; आणि ते फार घाबरले! तेव्हां भगवंतानें मेघांस पर्जन्य पाडण्यास आज्ञा केली. तेव्हां त्या पर्जन्यानें आणि समुद्राच्या लाटांच्या तुषारांनीं देवदैत्यांचा दाह थोडा कमी झाला.

## हालाहल विषाची उत्पत्ति व त्यामुळें सर्वांची त्रेधा.

श्रीशुकाचार्य पुढें सांगतात:—परीक्षित राजा, इतकीं संकटें आणि प्राणहानि सोसूनही जेव्हां अमृत निघेना, तेव्हां भगवान अजित स्वतांच मंथन करूं लागला. त्या वेळीं भगवंतानें प्रचंड रूप धारण केलें होतें; त्याची अंगकांति मेघाप्रमाणें श्यामल होती; त्यानें सुवर्णाप्रमाणें देदीप्यमान वस्त्र परिधान केलें होतें; कर्णांतील कुंडलें विद्युल्लतेसारखीं चमकत होतीं; मस्तकावर कुरळ केश विकसत होते; वक्षस्थळीं आपादलंबिनी माळा शोभत होती; नेत्र आरक्त दिसत होते; हस्तांत पर्वत होता; आणि सर्व जगाला अभय देणाऱ्या करांनीं तो मंदर पर्वत घुसळीत होता. राजा, ह्याप्रमाणें सर्व शक्तिमान परमेश्वर स्वतः मंथन करूं लागला, तेव्हां घुसळण्याचा वेग फारच भयंकर झाला. समुद्र अगदीं दरारून गेला. त्यांतील जलचरांची जिवाची आशा नष्ट झाली; आणि इतक्यांत त्या प्रक्षुब्ध

समुद्रांतून हालाहल विष बाहेर आलें. राजा, हें विष बाहेर येतांच त्याच्या ज्वालांनीं त्रैलोक्य तळमळूं लागलें; सर्व प्रजापति आणि प्रजा घाबरल्या; त्या प्रसंगांतून त्यांना कोणीही वांचविणारा दिसेना; आणि शेवटीं सर्वजण कैलास पर्वतावर भगवान शंकरांकडे गेले ! तेथें, शंकर पार्वतीसह अधिष्ठित होते; आसमंताद्भागीं मुनिगणांचा परिवार होता; आणि ते भगवान शंकर, त्या भक्तसमूहाच्या कल्याणाकरितां तपश्चर्येंत निमग्न होते. पुढें त्यांना त्या सर्व प्रजापतींनीं आणि प्रजाजनांनीं वंदन केलें, व त्यांची स्तुति करण्यास आरंभ केला.

## हालाहल विषापासून रक्षण करण्याविषयीं प्रजापतींची शंकरांस प्रार्थना.

प्रजापति म्हणाले:—

देवदेव महादेव भूतात्मन्भूतभावन ।
त्राहि नः शरणापन्नांस्त्रैलोक्यदहनाद्विषात् ॥
त्वमेकः सर्वजगत ईश्वरो बंधमोक्षयोः ।
तं त्वामर्चंति कुशलाः प्रपन्नार्तिहरं गुरुम् ॥
गुणमय्या स्वशक्त्यास्य सर्गस्थित्यप्ययान्विभो ।
धत्से यदा स्वदृग्भूमन्ब्रह्मविष्णुशिवाभिधाम् ॥
त्वं ब्रह्म परमं गुह्यं सदसद्भावभावनः ।
नानाशक्तिभिराभातस्त्वमात्मा जगदीश्वरः ॥
त्वं शब्दयोनिर्जगदादिरात्मा प्राणेंद्रियद्रव्यगुणस्वभावः ।
कालः क्रतुः सत्यमृतं च धर्मस्त्वय्यक्षरं यत्त्रिवृदामनंति ॥
अग्निर्मुखं तेऽखिलदेवतात्मा क्षितिं विदुर्लोकभवांघ्रिपंकजम् ।
कालं गतिं तेऽखिलदेवतात्मनो दिशश्च कर्णौ रसनं जलेशम् ॥
नाभिर्नभस्ते श्वसनं नभस्वान्सूर्यश्च चक्षूंषि जलं स्म रेतः ।
परावरात्माश्रयणं तवात्मा सोमो मनो द्यौर्भगवन् शिरस्ते ॥
कुक्षिः समुद्रा गिरयोऽस्थिसंघा रोमाणि सर्वौषधिवीरुधस्ते ।
छंदांसि साक्षात्तव सप्तधातवस्त्रयीमयात्मन् हृदयं सर्वधर्मः ॥
मुखानि पंचोपनिषदस्तवेश यैस्त्रिंशदष्टोत्तरमंत्रवर्गः ।
यत्तच्छिवाख्यं परमार्थतत्त्वं देव स्वयंज्योतिरवस्थितिस्ते ॥
छाया त्वधर्मोर्मिषु यैर्विसर्गो नेत्रत्रयं सत्त्वरजस्तमांसि ।
सांख्यात्मनः शास्त्रकृतस्तवेक्षा छंदोमयो देवऋषिः पुराणः ॥

न ते गिरित्राखिललोकपालविरिंचवैकुंठसुरेंद्रगम्यम् ।
ज्योतिः परं यत्र रजस्तमश्च सत्त्वं न यद्ब्रह्म निरस्तभेदम् ॥
कामाध्वरत्रिपुरकालगराद्यनेकभूतद्रुहः क्षपयतः स्तुतये न तत्ते ।
यस्त्वंतकाल इदमात्मकृतं स्वनेत्रवन्हिस्फुलिंगशिखया भसितं न वेद ॥
ये त्वात्मरामगुरुभिर्हृदि चिंतितांघ्रिद्वंद्वं चरंतमुमया तपसाऽभितप्तम् ।
कत्थंत उग्रपरुशं निरतं स्मशाने ते नूनमूतिमविदंस्तव हातलज्जाः ॥
तत्तस्य ते सदसतोः परतः परस्य नांजः स्वरूपगमने प्रभवंति भूम्नः ।
ब्रह्मादयः किमुत संस्तवने वयं तु तत्सर्गसर्गविषया अपि शक्तिमात्रम् ॥
एतत्परं प्रपश्यामो न परं ते महेश्वर ।
मृडनाय हि लोकस्य व्यक्तिस्तेऽव्यक्तकर्मणः ॥

'हे देवाधिदेवा महादेवा, तू सर्व भूतांचा आत्मा असून तूंच त्या सर्वांचा प्रतिपाळ करितोस. देवांनीं आणि दैत्यांनीं अमृताच्या आशेनें आरंभिलेल्या समुद्रमंथनापासून त्यांना अमृताची तर अद्याप प्राप्ति नाहींच; पण सांप्रत समुद्रांतून जें हालाहल विष निघालें आहे, त्यानें सर्व त्रैलोक्य जळून जाण्याची वेळ आलेली आहे. आतां या वेळीं आमचें रक्षण करण्यास तुंजवांचून दुसरा कोणी समर्थ नाहीं. सर्व जगाच्या बंधमोक्षाचा अधिपति एक तूंच आहेस. शरणागतांचें रक्षण करण्याविषयीं तूंच एक समर्थ आहेस; आणि ह्यास्तव विद्वान व ज्ञानी पुरुष तुझीच आराधना करितात. समर्था, ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय करण्याची जेव्हां तुला इच्छा होते, त्या वेळीं तूंच ब्रह्मा, विष्णु आणि महेश हीं रूपें घेतोस तूंच स्वतःसिद्ध ज्ञानवान आहेस! हे जगदीशा, नानाशक्तींनीं जगद्रूपानें भासणारें जें ब्रह्म, तें तूंच आहेस. तूंच उच्चनीच सर्व प्रजा उत्पन्न करितोस; त्यांचा नियामकही तूंच आहेस. महत्तत्त्व, अहंकार, प्राण आणि इंद्रियें यांस तूंच कारण असून वेदांचेंही उद्गमस्थान तूंच आहेस. त्रिगुणात्मक जी माया, ती तुझ्याच आश्रयानें असते. स्वभाव, काळ, संकल्प आणि सत्य व ऋत असे उभयविध धर्म हे सर्व तूंच आहेस. देवा, अग्नि हें तुझें मुख; भूमि हे तुझे चरण; काळ ही तुझी गति; दिशा हे तुझे कान; वरुण ही तुझी जिव्हा; आकाश ही तुझी नाभि; वायु हा तुझा श्वास; सूर्य हें तुझें नेत्रेंद्रिय; जळ हें तुझें रेत; सर्व जीवांचा आश्रय हा तुझा अहंकार; चंद्र हें तुझें मन; स्वर्ग हें तुझें मस्तक; समुद्र हें तुझें उदर; पर्वत ह्या तुझ्या अस्थि; ओषधि व सर्व वल्लि हे तुझे रोम; गायत्र्यादिक सप्तछंद ह्या तुझ्या सप्तधातु; धर्म हें तुझें हृदय; ज्यांच्यापासून अडतीस कलारूप मंत्र होतात, तीं पंचोपनिषदें हीं तुझीं पांच मुखें; शिव नामक जें स्वयंप्रकाश परमार्थतत्त्व, तीच तुझी शांत अवस्था; अधर्माच्या दंभलोभादि ज्या लहरी, ती तुझी छाया; सत्त्व, रज व तम हे तुझे तीन नेत्र; ज्ञानप्रतिपादक शास्त्र हें तुझें स्वरूप; आणि गायत्र्यादि छंदोमय सनातन वेद हें तुझें अवलोकन होय. शंकरा, तुझें हें ब्रह्मस्वरूप

जाणण्यास कोणीही समर्थ नाहीं. सकल लोकपाल, ब्रह्मदेव, विष्णु व देवेंद्र हे सर्व तुझ्या व्यापक स्वरूपाचा विचार करून विस्मित होतात. तुझ्या ठायीं सत्त्वादिक त्रिगुणांचा लेश सुद्धां नाहीं. तुझी दृष्टि सर्वत्र एकसारखी आहे; आणि मदन, दक्षयज्ञ, त्रिपुरासुर व कालकूटविष इत्यादि अनेक शत्रूंचा तूं नाश केला आहेस. हे देवाधिदेवा, तुझ्या ह्या कृत्यांचें वर्णन केल्यानें तुझ्या वास्तविक सामर्थ्याचें वर्णन केलें असें होत नाहीं; कारण, तुझीं कृत्यें अगणित व अतर्क्य आहेत. हें सर्व ब्रह्मांड तूं आपल्या इच्छेनेंच उत्पन्न करितोस, व तूंच आपल्या नेत्रांतील अग्नीनें ह्याचा संहार करून टाकितोस. देवा, तुझें सामर्थ्य इतकें अपूर्व आहे कीं, सृष्टीचा संहार करून त्याची तुला दाद सुद्धां नसते. हे परात्परा, महान महान ब्रह्मनिष्ठ पुरुष आपल्या हृदयाकाशांत तुझ्या चरणद्वयाचें चिंतन करितात व त्या योगें सर्व जगास हितकारक असा मार्ग दाखवून देतात. हे लोकभावना, तूं जी तपश्चर्या करितोस, तिचें स्वरूप फारच उग्र व लोकोत्तर आहे. कित्येक लोक, तूं पार्वतीस बरोबर घेऊन हिंडत असतोस, ह्यावरून तूं विषयासक्त आहेस; व तूं स्मशानांत राहतोस, म्हणून तूं क्रूर व घातकी आहेस, अशी तुझ्याविषयीं गर्हा करितात; पण त्या मूर्खांस तुझ्या वास्तविक अधिकाराचा लेश तरी समजत आहे काय ? अहो, निर्मल महात्मे ज्याचें चिंतन करितात, व जो सदैव तपश्चर्येंत रत असतो, तो पुरुष विषयासक्त व क्रूर वगैरे कसा असेल बरें ? हे महादेवा, तूं मायातीत आहेस. तुझें यथार्थ ज्ञान मिळविण्यास ब्रह्मादिक देव सुद्धां समर्थ नाहींत; मग तुझ्या शक्तीचें वर्णन आम्ही काय करावें ? आम्हीं केलेली ही स्तुति केवळ आमच्या शक्तीला अनुसरून केलेली आहे. कारण, हे महेश्वरा, केवळ तुझें हें दृश्य स्वरूप आम्ही अवलोकन करीत आहों. याहून दुसरें जें तुझें सर्व कारणभूत अति सूक्ष्म स्वरूप, तें आम्हांस दिसत नाहीं. आम्ही तुझ्या दर्शनानेंच कृतार्थ झालों आहों. आमचें तूं संरक्षण कर.'

## विषप्राशन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, हें त्या प्रजापतींचें दीनवाणें भाषण ऐकून भोळानाथ शंकरांचें अंतःकरण कळवळलें; व ते मोठ्या कळवळ्यानें पार्वतीला म्हणाले, "प्रिये, क्षीरसमुद्रांतून निघालेल्या हालाहल विषापासून या प्रजाजनांना किती ताप झाला आहे तो पहा ! आतां यांना अभय देणें हें माझें कर्तव्य आहे. स्वतः दुःख सोसून दुसऱ्याचें हित करणें हेंच सज्जनांस मोठें भूषण वाटतें. भगवंताच्या मायेनें मोहित झालेले प्राणी एकमेकांशीं कलह करूं लागले म्हणजे थोर पुरुष आपले प्राण सुद्धां खर्ची घालून तो कलह दूर करीत असतात. कारण, नश्वर अशा प्राणांची त्यांस कांहीं विशेष महती वाटत नाहीं. प्रिये, दीनवत्सल साधुजनांवर परमात्मा प्रसन्न होतो, व तो प्रसन्न झाला असतां या चराचर विश्वासह मीही संतुष्ट होतों. याकरितां, पार्वती, मी हें हालाहल विष प्राशन करितों; म्हणजे हे सर्व सुखी होतील."

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, शंकरांची शक्ति सतीस पूर्णपणें माहीत होती, म्हणून तिनेंही त्यांस अनुमोदन दिलें. नंतर त्या भूतपालक महादेवानें लोककल्याणाकरितां तें विष आपल्या तळहातावर घेतलें, आणि तत्काळ प्राशन करून टाकिलें ! राजा, शंकरांवर देखील त्या विषानें आपला प्रभाव गाजविला ! त्याच्या प्रखरतेनें शंकरांचा कंठ काळानिळा झाला; पण त्यांस तेंही एक भूषणच झालें ! असो. भक्तसंकटनिवारण प्रभु देवाधिदेव शंकरानें हें केलेलें अद्भुत कर्म पाहून, सर्व देवांनीं व प्रजाजनांनीं त्याची स्तुति केली. राजा, शंकर त्या प्रखर विषाचें प्राशन करीत असतां त्यां-

त्याचा किंचित् भाग खालीं पडला, तो वृश्चिक, सर्प विषौषधि व विषारी प्राणी यांनीं ग्रहण केला !

# अध्याय आठवा.

—:०:—

## समुद्रमंथन.

### कामधेनु, उच्चैःश्रवा इत्यादिकांची उत्पत्ति.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, शंकरांनीं तें हालाहल विष प्राशन केल्यामुळें देवदैत्यांनाही आनंद झाला; व त्यांनीं फिरून मोठ्या उत्साहानें मंथन करण्यास सुरुवात केली. तों त्या क्षीरसागरांतून कामधेनु बाहेर निघाली. होमहवनास लागणारें तूप, दूध तिच्यापासून उत्पन्न होतें, म्हणून वेदवेत्त्या ऋषींनीं तिचा स्वीकार केला. नंतर चंद्राप्रमाणें स्वच्छ असा उच्चैःश्रवा नामक अश्व निघाला. दैत्यराज बलीनें त्याजविषयीं इच्छा दर्शविली असतां, दैत्य म्हणतील त्याला अनुमोदन द्यावयाचें असें पूर्वीच ठरलें असल्यामुळें, इंद्रादिक देवांनीं ती इच्छा मान्य केली. नंतर शुभ्र वर्णाचा व चार दांतांचा असा ऐरावत नामक एक महान हत्ती निघाला; तो आपल्या श्वेत दंतांनीं जणू काय कैलास पर्वताचेंच महत्त्व हरण करीत होता ! त्या हत्तीचा इंद्रानें स्वीकार केला. नंतर पद्मराग जातीचें कौस्तुभ रत्न त्या महासागरामधून बाहेर आलें. त्याचा भगवान श्रीहरीनें स्वीकार केला, आणि त्यानें तें आपल्या वक्षस्थलावर धारण केलें. नंतर स्वर्गलोकाला भूषणभूत होणारा पारिजातक वृक्ष निघाला; याजपासून स्वर्गांतील लोकांस इच्छित वस्तु प्राप्त होतात. नंतर अत्यंत रूपवान व वस्त्रभूषणांनीं शृंगारलेल्या अशा अप्सरा निघाल्या. त्यांनीं आपल्या सौंदर्यानें, मनोहर गतींनीं, सलील कटाक्षांनीं, आणि गुणांनीं देवांना मोह उत्पन्न केला.

### लक्ष्मीची उत्पत्ति व तिचा सन्मान.

श्रीशुकाचार्य पुढें सांगतात:—परीक्षित राजा, नंतर, विद्युल्लतेप्रमाणें जिची कांति, व जी साक्षात् संपत्तीची मूर्ति, अशी ती भगवंतावर अनुरक्त असलेली लक्ष्मी बाहेर आली. राजा, त्या लक्ष्मीचें रूप, औदार्य, वय, वर्ण, माहात्म्य वगैरे पाहून सर्व देव आणि दैत्य अत्यंत मोहित झाले; आणि ज्याला त्याला ती आपल्याला मिळावी अशी इच्छा उद्भवली. जो तो तिचा सत्कार करूं लागला. देवेंद्रानें तिला उत्तम आसन दिलें. महान महान नद्यांनीं सुवर्णपात्रांत तिजकरितां जल भरून आणून ठेविलें. भूमीनें तिजला अभिषेक करण्याकरितां उपयोगीं पडतील अशा ओषधि दिल्या. गाईंनीं पंचगव्यें (दूध, दहीं, तूप, गोमूत्र, गोमय ) अर्पण केलीं. वसंतानें फलपुष्पादिक अर्पिलीं. ऋषींनीं विधिपूर्वक अभिषेक करण्याची तयारी केली. गंधर्व गायन करूं लागले. अप्सरा नृत्य करूं लागल्या. मेघांनीं गंभीर शब्द करणारीं मृदंग, प्रणव, मुरज, गोमुख, शंख इत्यादि वाद्यें वाजविलीं. नंतर, हातांत कमल धारण केलेल्या त्या लक्ष्मीवर दिग्गजांनीं अभिषेक केला. ब्राह्मणांनीं मंत्र म्हटले. सागरानें उत्तम उत्तम वस्त्रें दिलीं. वरुणानें वैजयंती माळ अर्पिली. विश्वकर्म्यानें बहुमोल अलंकार पुढें ठेविले. सरस्वतीनें हार दिला. ब्रह्मदेवानें कमल अर्पिलें, आणि नागांनीं कुंडलें दिलीं.

### स्वयंवरप्रसंगींचे लक्ष्मीचे विचार.

श्रीशुक म्हणतात:—परीक्षित राजा, अशा प्रकारें सर्वांनीं जिचा सत्कार केला, ती लक्ष्मी हातांत कमल घेऊन इकडे तिकडे फिरूं लागली. ह्या प्रसंगीं तिचें मुखकमल प्रफुल्लित झालें असून त्यावर सलील हास्य व मुग्ध लज्जा ह्यांची छबी उमटली होती. तिच्या कर्णांतील कुंडलांचें तेज तिच्या कपोलप्रांतावर झळाळत होतें.

तिचें उदर अतिशय कृश होतें. तिचे पयोधर एकसारखे उन्नत असून त्यांमध्यें अगदीं अंतर नव्हतें; आणि ते चंदनाच्या व कुंकुमाच्या उट्यांनीं चर्चित केलेले होते. ती इतस्ततः परिभ्रमण करीत असतां तिच्या पायांतील पैंजण मधुर शब्द करीत होते, व त्यामुळें ती एखाद्या सुवर्णलतेप्रमाणें शोभत होती. त्या कोमलांगीनें षड्गुणैश्वर्यसंपन्न असा पति आपल्यास मिळावा म्हणून पुष्कळ शोध केला; पण गंधर्व, यक्ष, दैत्य, सिद्ध, चारण व स्वर्गस्थ देव ह्यांमध्यें तसा एकही पुरुष तिला आढळला नाहीं. दुर्वासासारख्या मुनींच्या ठिकाणीं तपश्चर्या हा गुण होता, पण त्यांना क्रोध जिंकिलेला नव्हता; गुरुशुक्रादिकांच्या ठायीं ज्ञान होतें पण वैराग्य नव्हतें; ब्रह्मदेव, चंद्र इत्यादिक मोठमोठे महात्मे होते, पण त्यांनीं काम जिंकिलेला नव्हता; इंद्रादिक देव श्रेष्ठ खरे, पण त्यांना पराश्रयाची अपेक्षा होती; परशुरामादिक अनेक धर्मनिष्ठ महात्मे होते, पण त्यांचे ठिकाणीं भूतदया वसत नव्हती; शिबि राजासारखे दानशूर राजेही पुष्कळ होते, पण तो त्यांचा गुण मुक्तीला कारण असा नव्हता; कार्तवीर्यासारखे महाबलाढ्य वीरही अनेक होते, पण त्यांना कालाची भीति होती; सनकादिकांसारखे महामुनि होते, पण ते सदैव समाधिसुखांत निमग्न; मार्कंडेयांसारिखे दीर्घायु होते, पण ते ब्रह्मचर्यव्रतानेंच राहणारे; हिरण्यकशिपूसारखे स्त्रियांवर प्रेम करणारेही अनेक होते, पण अल्पायु; शंकर पूर्णायु असून त्याचा स्वभावही स्त्रियांना सुखकारक असा खरा, पण त्याची वृत्ति पडली अमंगल! मिळून कोणीही लक्ष्मीच्या मनास येईना; असो.

### लक्ष्मीस्वयंवर.

श्रीशुकाचार्य पुढें सांगतातः—राजा, शेवटीं त्या लक्ष्मीला इतक्या मंडळीमध्यें अत्यंत मंगलरूप व षड्गुणैश्वर्यसंपन्न असा एक पुरुष आढळला; पण तो कांहीं तिची इच्छा करीना. शेवटीं पुष्कळ विचार करून तिनें त्या मुकुंदालाच वरिलें! तिनें आपल्या हातांतील पुष्पमाला भगवंताच्या गळ्यांत घातली, आणि लज्जायुक्त हास्यमुख करून ती त्याच्या वक्षस्थलाकडे पहात उभी राहिली. राजा, वक्षस्थलाकडे पाहण्याचें कारण इतकेंच कीं, तें स्थान आपल्याला प्राप्त व्हावें, अशी तिला इच्छा होती; असो. भगवंतानेंही लक्ष्मीचा हेतु जाणून तिला राहण्याकरितां आपलें वक्षस्थल अढळपद करून दिलें. लक्ष्मीही आपण इच्छिलेलें स्थान आपल्यास मिळालें म्हणून तेथें आनंदानें राहून, आपल्या कृपाकटाक्षांच्या योगानें त्रैलोक्याचा उत्कर्ष करूं लागली. राजा, भगवान विष्णु हे त्रैलोक्याचे जनक व भगवती लक्ष्मी ही त्रैलोक्याची जननी ह्यांचें ऐक्य झालें असें पाहून सर्वांना आनंद झाला. जिकडे तिकडे मंगलवाद्यें वाजूं लागलीं. सर्व देव, ऋषि इत्यादिकांनीं भगवंतावर पुष्पवृष्टि केली, व त्यांनीं विष्णुप्रतिपादक अमोघ मंत्रांनीं त्याची स्तुति केली. राजा, लक्ष्मीनें कटाक्ष फेंकितांच सर्व देव व प्रजापति ह्यांना परम आल्हाद वाटला, व त्यांची चित्तवृत्ति प्रसन्न होऊन त्यांचे स्वभाव वगैरे तात्काळ शुद्ध झाले. असो. राजा, लक्ष्मीनें दैत्यांना वरिलें नाहीं, म्हणून दैत्य फार खजील झाले! असो; नंतर त्या देवदैत्यांनीं पुनः मंथन चालविलें; तेव्हां, राजा, त्या क्षीरसमुद्रांतून, कमळाप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी सुरादेवी निघाली; आणि विष्णूच्या अनुमतानें दैत्यांनीं तिचा स्वीकार केला; असो.

### अमृताची उत्पत्ति व त्याचें दैत्यांकडून हरण.

श्रीशुक आणखी सांगतातः—परीक्षित राजा, नंतर फिरून मंथन सुरू झालें, तों त्यापासून एक अद्भुत पुरुष बाहेर निघाला. तो शरीरानें पुष्ट असून त्याची कांति मेघासारखी होती. त्याचे बाहु दीर्घ व बळकट असून मान शंखासारखी गोल व त्रिवळीनें युक्त होती. त्याचे

नेत्र आरक्त असून त्याच्या कंठांत माळ होती. तो पितांबर नेसलेला असा असून त्याच्या शरिरावर अनेक अलंकार होते. त्याचें वक्षस्थल विशाल असून त्याच्या कानांत कुंडलें झळकत होतीं. त्याचे केंस कुरळ असून त्यांचीं अग्रें तुळतुळीत होतीं. त्याचें वय लहान असून तो अत्यंत पराक्रमी दिसत होता; आणि तो मोठा सुंदर असून त्याच्या हातांत अमृताचा कलश होता. राजा, भगवंताच्या अंशापासून उत्पन्न झालेला हा धन्वंतरी होय. तो वैद्यशास्त्रांत निष्णात असून यज्ञांतील हविर्भाग भक्षण करणारा होता. राजा, त्या पुरुषाच्या हातांत अमृताचा कलश आहे, असें पाहिल्याबरोबर दैत्यांनीं गडबड करून तो हिसकावून घेतला. अमृतकलश दैत्यांच्या हातीं गेला असें पाहून देवांचीं मनें खिन्न झालीं, आणि ते सर्व जण ईश्वराला शरण गेले. देवांचीं मुखें सुकून गेलीं आहेत व ते अगदीं दीन झाले आहेत, असे पाहून भगवंतानें देवांना आश्वासन दिलें, आणि सांगितलें कीं, " तुम्ही कधीं होऊं नका; मी आपल्या मायेच्या योगानें दैत्यांना मोह घालीन, आणि त्यांचा परस्परांमध्यें कलह लावून देऊन तुमचें कार्य सिद्धीस नेईन. " परीक्षित राजा, दैत्यांनीं अमृताचा कलश हिसकावून नेला खरा; पण

### अमृतप्राशनाबद्दल दैत्यांमध्यें कलह

उत्पन्न झाला. एक म्हणे, ' मी आधीं पिणार, ' दुसरा म्हणे, ' मी आधीं पिणार, ' असा एकच कोलाहल सुरू झाला ! त्या दैत्यांमध्यें कांहीं जे अशक्त होते, त्यांना वाटलें कीं, ह्या दांडग्यांबरोबर कांहीं आपल्याच्यानें टिकाव धरवत नाहीं, आणि आपल्याला कांहीं अमृत मिळत नाहीं; तेव्हां त्यांनीं धर्मशास्त्र सांगण्यास सुरुवात केली ! ते म्हणूं लागले, " बाबांनो, तुम्ही उगीच झगडा माजवूं नका. अमृतप्राप्तीकरितां देवांनीं व आपण सारखेच श्रम केले आहेत; तेव्हां त्याचा वांटा सर्वांना सारखा मिळणें योग्य आहे, आणि सनातनधर्महीं असेंच सांगतो. सत्रयागांत जसा सर्वांना सारखा भाग मिळतो, तसा यांतही सर्वांस सारखा भाग मिळाला पाहिजे ! " परीक्षित राजा, अशा प्रकारचा वाद त्या दैत्यांत माजला आहे असें पाहून सर्वकलानिपुण भगवंतानें तत्काल स्त्रीरूप धारण केलें. हे भरतकुलावतंसा,

### मोहिनी अवतार

म्हणतात तो हाच. या वेळीं भगवंतानें घेतलेलें स्त्रीरूप केवळ अवर्णनीय होतें. त्या स्त्रीचा वर्ण नीलकमलाप्रमाणें श्यामल असून सर्व अवयव अगदीं रेखलेले आणि गोंडस होते. तिच्या कानांत जीं बहुमोल कुंडलें होतीं, त्यांची प्रभा तिच्या गालांवर पडल्यामुळें तिचें तें उन्नत नासिकेनें युक्त असें मुखकमल फारच रमणीय दिसत होतें. तिच्या मुखांतून निघणाऱ्या श्वासाच्या सुगंधावर लुब्ध होऊन तिच्या भोंवतीं भ्रमर गुंजारव करीत होते. त्या नवयौवनसंपन्न कृशकटि स्त्रीनें आपल्या बुचड्यामध्यें मोगरीचा फुललेला गजरा घातला होता. कंठांतील अलंकारांनीं तिची मान फारच मनोहर दिसत होती. तिनें नेसलेलें पांढरें शुभ्र पातळ इतकें नाजुक होतें कीं, दुरून पाहणारास तिच्या एकंदर अवयवांची ठेवण स्पष्ट दिसे; आणि तिच्या पायांतील नूपुरांच्या मधुर ध्वनीनें सर्वांचीं मनें तिजकडे आकर्षित होत होतीं. परीक्षित राजा, ज्याच्या मायेनें त्रैलोक्य भुललें आहे, त्यानेंच स्वतः घेतलेल्या त्या मोहिनीरूपाला कोण भुलणार नाहीं ? राजा, अशा प्रकारें त्या मोहिनीरूपधारी विष्णूनें आपल्या नेत्रकटाक्षबाणेंकरून दैत्यांच्या अंतःकरणांत कामराजाची प्रेरणा केली !

## अध्याय नववा.

—:o:—

### मोहिनीस्वरूपानें दैत्यांस मोह.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, दैत्या-

नीं पूर्वीचा आपसांतील मित्रभाव सोडून दिला, आणि अमृतपात्राकरितां ते एकमेकांपाशीं झगडूं लागले, व शिवीगाळ करूं लागले. इतक्यांत ही मोहिनी त्यांच्या दृष्टीस पडली. तिला पाहतांच सर्वजण तिच्या त्या अत्यंत मोहक स्वरूपाला भुलले, आणि तिची वाखाणणी करीत करीत तिच्या जवळ येऊन तिला म्हणाले, "हे कमलनयने चारुगात्री, आमच्या मनाला क्षोभ उत्पन्न करणारी अशी तूं आहेस तरी कोण? कोणाची? आणि आलीस कोठून? येथें येऊन तुला कोणतें कार्य साधावयाचें आहे? सुंदरी, तुझ्याकडे पाहून आम्हांला असें वाटतें कीं, तूं न हुंगलेल्या पुष्पाप्रमाणें अगदीं शुद्ध असावीस. आम्ही—कश्यपाचे पुत्र—परस्परांमधील बंधुप्रेम विसरून, एकाच वस्तूकरितां एकमेकांशीं भांडत असतां तूं येथें प्राप्त झाली आहेस, त्या अर्थी ईश्वरानें तुला आमच्याकरितांच पाठविलें आहे हें खास. म्हणून, हे मानिनी! अमृतप्राप्तीकरितां सारखे श्रम करणाऱ्या आम्हां बांधवांमध्यें विरोध न येईल, अशा रीतीनें तूं आम्हांला वांटणी करून दे.

मोहिनीचें छद्मी भाषण.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, दैत्यांचें तें भाषण ऐकून स्त्रीरूप हरि किंचित् हसले, आणि मनोहर नेत्रकटाक्षांनीं दैत्यांकडे पहात पहात म्हणाले, "हे कश्यपपुत्रहो, तुम्ही असलें हें महत्त्वाचें काम मजवर सोंपविता, पण हें चांगलें नव्हे. कारण, आम्ही जारिणी स्त्रिया म्हणजे नित्य नव्या नव्या पुरुषावर प्रेम करणाऱ्या; मधुर मधुर भाषणानें दुसऱ्यांचीं मनें आकर्षण करणाऱ्या; व आपल्या अंतःकरणाचा ठाव कोणास कधींही न लागूं देणाऱ्या आहों अर्थात् आम्ही कोणाच्याच विश्वासास पात्र नाहीं! सुज्ञ पुरुष आम्हां कामिनी स्त्रियांवर मुळींच विश्वास ठेवीत नाहींत. अहो, लांडग्यांचें आणि जारिणी स्त्रियांचें सख्य अनिष्टपरिणामी होय!"

श्रीशुक म्हणतातः—परीक्षित राजा, मोहिनीच्या ह्या पाताळयंत्री भाषणानें दैत्यांचा तिच्यावर जास्तच विश्वास बसला, आणि त्यांनीं हसत हसत अमृताचा कलश तिच्या हातीं आणून दिला. भगवंतांनीं तो कलश आपल्या हातांत घेतला आणि ते दैत्यांस म्हणाले, "दैत्यहो, मी नको नको म्हणत असतां अमृताची वांटणी करण्याचें काम तुम्ही मजवर सोंपवीत आहां; पण तें करितांना जर मी कांहीं बरें किंवा वाईट केलें, तर त्याविषयीं तुम्ही अवाक्षरही बोलतां कामा नये. हें तुम्हांला कबूल असेल, तर मी हें काम करितें." परीक्षित राजा, मोहिनीच्या मुखांतून हे शब्द निघाल्याबरोबर, त्या तमोगुणी दैत्यांना तिच्या बोलण्यांतील पांचपेच न समजून त्यांनीं 'ठीक आहे!' कबूल! असें तिला म्हटलें. नंतर

अमृतप्राशनाची तयारी

झाली. त्या सर्वांनीं स्नान केलें, आणि अग्नीमध्यें हविर्द्रव्याचा होम केला. त्या दिवशीं ते उपोषित राहिले. त्यांनीं गाईंना, ब्राह्मणांना व सर्व प्राण्यांना अन्नदान केलें; व ब्राह्मणांकडून पुण्याहवाचन करवून त्यांनीं आपल्या आवडीचीं नवीं नवीं वस्त्रें व अलंकार धारण केले. नंतर पुष्पांनीं व धूपदीपांनीं सुशोभित केलेल्या मंडपांत ते सर्व दैत्य आले, आणि पूर्वेकडे दर्भांचीं अग्रें करून त्या दर्भासनांवर पूर्वाभिमुख बसले. त्या समयीं त्या मंडपांत देवही आले. नंतर ती मोहिनी आपल्या हातांत अमृताचा कलश घेऊन सलज्ज व सस्मित मुद्रेनें त्या सभेंत प्राप्त झाली. तेथें आल्यावर तिनें देवांना आणि दैत्यांना निरनिराळ्या पंक्तींना बसविलें. दैत्यांना तिच्या रूपाच्या योगानें इतका मोह पडला होता कीं, ती जें जें बोले, तें अमृतच आहे असें त्यांना वाटे. मोहिनीनें पूर्वीच त्यांजकडुन वचन घेतलें होतें कीं, मी कांहीं केलें तरी तुम्ही तें कबूल केलें पाहिजे; व त्यांनींही तिला, तूं यथान्याय वांटणी कर, असें सांगितलें होतें.

या दोन्ही गोष्टींत तिनें आपल्याला हवी तशी सवड साधून घेतली होती. ह्या समयीं तिनें विचार केला कीं,

**देवांनाच अमृतपान**

करविणें योग्य आहे. कारण, दैत्यांनीं आपल्यास यथान्याय वांटणी करण्यास सांगितलें आहे; तेव्हां 'न्याय' म्हटला म्हणजे क्रूर दैत्यांना अमृत पाजिल्यानें सर्पाला दूध पाजण्यासारखें होय; याकरितां, फक्त देवांनाच अमृत पाजिलें पाहिजे. परीक्षित राजा, त्या प्रसंगीं दैत्य कदाचित् गडबड करितील, म्हणून त्यांची तिनें मोहक शब्दांनीं समजूत केली कीं, 'देव फार हावरे आहेत, त्यांना दम निघावयाचा नाहीं; याकरितां हें त्यांनाच आधीं पाजितें, म्हणजे त्यांचा त्रास राहणार नाहीं.' अशा रीतीनें दैत्यांना चढवून ती देवांना अमृत पाजूं लागली. राजा, दैत्यांना तिचें कपट समजून आलें नाहीं असें नाहीं; परंतु ते वचनबद्ध झाले असल्यामुळें, आपल्या वचनाची महती बाळगणाऱ्या त्या मानी दैत्यांनीं तोंडांतून ब्र देखील काढला नाहीं; आणि शिवाय, आपण कांहीं बोललों तर या सुकुमारीच्या मनाला दुःख होऊन आपल्या प्रेमांत अंतर येईल, असेंही त्यांना वाटलें!

**राहूचें कपट व त्याचा शिरच्छेद.**

श्रीशुकाचार्य पुढें सांगतातः—परीक्षित राजा, याप्रमाणें मोहानें व वचनानें बद्ध झालेले ते दैत्य स्वस्थ बसले असतां, त्यांतून राहु नांवाचा दैत्य उठला; आणि गुप्तपणें देवाचें सोंग घेऊन व चंद्र-सूर्यांच्या मध्यें बसून सर्वांबरोबर अमृत प्याला. पण हें त्याचें कपट चंद्र-सूर्यांनीं ओळखिलें, आणि तत्काल त्यांनीं ती गोष्ट मोहिनीरूप भगवंताला खुणेनें कळविली. तेव्हां, राहूनें प्राशन केलेलें अमृत त्याच्या घशाखालीं उतरलें नाहीं तोंच, भगवंतानें आपल्या तीक्ष्ण धारेच्या चक्रानें त्याचें मस्तक तोडिलें. राजा, राहूच्या घशाखालीं अमृत उतरूं दिलें नव्हतें, यामुळें त्याचें धड भूमीवर पडलें; पण मुखांत अमृत असल्यामुळें तें धडापासून वेगळें झालें तरी त्यांतील जीवांश नष्ट झाला नाहीं. शेवटीं भगवंतानें त्याची गृहमालेंत योजना केली. त्या द्वेषानें तो राहु अजूनपर्यंत पौर्णिमा व अमावास्या या दिवशीं चंद्र-सूर्यांना ग्रासण्याकरितां त्यांच्या अंगावर धावून जातो; आणि ग्रहणसमयीं याची प्रतीति सर्वांना येतेच; असो. याप्रमाणें तें अमृत देवांना पाजितां पाजितां संपलें, तेव्हां भगवंतानें दैत्यांच्या समक्ष आपलें कृत्रिमरूप टाकून पूर्वरूप धारण केलें. राजा परीक्षिता, ह्याप्रमाणें स्थल, काल, हेतु, साहित्य, इच्छा आणि प्रयत्न हीं सर्व देवांचीं आणि दैत्यांचीं सारखींच असतांही

**देवांनाच चांगलें फल मिळण्याचें कारण**

इतकेंच कीं, देवांनीं भगवंताचा आश्रय केला होता, आणि दैत्य त्यापासून विमुख होते. याकरितां, कल्याणाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें नारायणाच्या चरणकमलांचा आश्रय धरावा; म्हणजे कितीही अडचणी आल्या तरी ईश्वराच्या कृपेनें त्या सर्व दूर होतात आणि त्याला इच्छित प्राप्त होतें. प्राणी नानाप्रकारचीं कर्में करितात, पण तीं ईश्वरप्रीत्यर्थ नसून शरीरपुत्रादिकांप्रीत्यर्थ असतात; यामुळें तीं कर्में वृक्षाच्या शाखांवर पाणी शिंपडल्याप्रमाणें व्यर्थ होतात. म्हणून, कोणतेंही कर्म करावयाचें तें ईश्वराप्रीत्यर्थच करावें. वृक्षाच्या मुळाशीं पाणी घातलें असतां तें जसें त्या वृक्षाच्या सर्व भागांचें पोषण करितें, तसें परमेश्वराप्रीत्यर्थ केलेलें कर्म कर्त्याच्या सर्व कामना पूर्ण करितें.

## अध्याय दहावा.

—:०:—

### देवदैत्यांचा पुनः संग्राम.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, देवांनीं आणि दैत्यांनीं अमृतप्राप्तीकरितां सारखे

श्रम केले असतां, वासुदेवाची भक्ति न केल्यामुळें दैत्यांना अमृताची प्राप्ति झाली नाहीं; व देवानीं ती केल्यामुळें त्यांस तें प्राप्त झालें. ह्याप्रमाणें भगवंतानें आपल्या भक्तांना अमृताचा लाभ करून देऊन तो गरुडावर बसून चालता झाला. परंतु अशा प्रकारें देवांचा झालेला उत्कर्ष दैत्यांना सहन न होऊन त्यांनीं शस्त्रें उचलिलीं, आणि ते देवांवर चालून आले. अमृतप्राशन केलें असल्यामुळें, आणि भगवंताचा पूर्ण आश्रय होता म्हणून, देवही त्यांच्याशीं युद्ध करण्यास निर्भयपणें सिद्ध झाले. राजा, शेवटीं, ज्या समुद्रतीरावर एकाच कार्याकरितां एकमतानें देव आणि दैत्य आले होते, त्याच ठिकाणीं त्यांची ती उभयतांमधील प्रेमबुद्धि जाऊन ते एकमेकांचे शत्रु बनले; सारांश, जे देवदैत्य पूर्वी स्नेहभावानें वागत होते, ते अशा रीतीनें एकमेकांचे गळे कापण्यास सिद्ध झाले. दोन्ही पक्षांकडील वीरांचीं मनें खवळलीं. दोन्हीकडील रणवाद्यांच्या योगानें आकाश दणाणून गेलें, आणि लागलीच उभयतांमध्यें भयंकर रण माजलें. त्या युद्धांत असंख्य जीवांची हत्या झाली. रक्ताचे पूर समुद्राला मिळाल्यामुळें तो सर्व रक्तमय दिसूं लागला. ह्या रणकंदनांत मेलेल्या योद्धयांचीं प्रेतें वाहनांच्या पायांखालीं तुडविलीं गेल्यामुळें, त्यांचे तुकडे तुकडे होऊन तो एक प्रकारचा रक्त, मांस आणि अस्थि यांचा चिखलच बनला! त्याच्या योगानें लढत असलेल्या योद्धयांचीं वाहनें त्या रक्तमांसमय चिखलांत रुतूं लागलीं! राजा, त्या भयंकर युद्धाला 'दैवासुरयुद्ध' असें स्वतंत्र नांव पडलें. दैत्यांचा अधिपति विरोचनपुत्र बलि हा त्या वेळीं, मयासुरानें निर्मिलेल्या वैहायस नामक विमानांत बसलेला होता; व त्याजबरोबर नमुचि, शंबर, बाण, विप्रचित्ति, अयोमुख, द्विमूर्धा, कालनाभ, प्रहेति, हेति, इल्वल, शकुनि, भूतसंताप, वज्रदंष्ट्र, विरोचन, हयग्रीव, शंकुशिरा, कपिल, मेघदुंदुभि, तारक, चक्रदृक्, शुंभ, निशुंभ, जंभ, उत्कल, अरिष्ट, अरिष्टनेमि, मय, त्रिपुरासुर, पौलोम, कालेय, निवातकवच इत्यादि मोठमोठे योद्धे आपापल्या विमानांत बसले होते. ज्यांनीं पूर्वी अनेक वेळां देवांना जिंकिलें होतें, ते दैत्य अमृताचा भाग न मिळाल्यामुळें पराकाष्ठेचे खवळून गेले; व त्यांनीं देवांना भय उत्पन्न करणारीं आपापलीं वाद्यें वाजविलीं, व ते सिंहनाद करूं लागले. तेव्हां, शत्रु अत्यंत प्रबळ झालेले पाहून क्रुद्ध झालेला इंद्र आपल्या ऐरावतावर बसला, आणि इतर देवही आपापल्या वाहनांवर बसून तयार झाले. नंतर त्या उभयपक्षांमध्यें वाग्युद्ध सुरू झालें असतां, एकमेकांला मर्मभेदक भाषणें बोलतां बोलतां चिडून जाऊन, त्या

### देवदैत्यांमध्यें द्वंद्वयुद्ध

सुरू झालें. परीक्षित राजा, त्या द्वंद्वयुद्धाचें समग्र वर्णन करणें अशक्य आहे. तथापि, जे कांहीं प्रमुख योद्धे एकमेकांशीं द्वंद्व खेळत होते, त्यांचीं नांवें तुला सांगतों: इंद्राबरोबर बलि; तारकासुराबरोबर षडानन; हेतीशीं वरुण; प्रहेतीशीं मित्र, कालनाभाशीं यम; मयासुराशीं विश्वकर्मा; त्वष्ट्याशीं शंबर; विरोचनाशीं सविता; नमुचीशीं अपराजित; वृषपर्व्याशीं अश्विनीकुमार; बलि राजाच्या बाणासुरादि शतपुत्रांबरोबर सूर्यदेव; राहूशीं चंद्र; पुलोम्याशीं वायु; शुंभ-निशुंभांशीं महावेगवती देवी भद्रकाली; जंभासुराशीं वृषाकपि; महिषासुराशीं विभावसु; वातापि व त्याचा बंधु इल्वल यांशीं ब्रह्मपुत्र; दुर्मर्षाशीं कामदेव; उत्कलाशीं मातृगण; शुक्राचार्याशीं बृहस्पति; नरकासुराशीं शनैश्वर; निवातकवचांशीं मरुद्गण; कालेयांशीं देव अष्टवसु; पौलोमांशीं विश्वेदेव; व क्रोधवशांबरोबर रुद्र द्वंद्वयुद्ध करूं लागले. याप्रमाणें ते वीर आपापल्या बरोबरीचा योद्धा पाहून लढत होते. राजा, जयाची इच्छा दोहोंकडील वीरांना अर्थात् सारखीच होती.

म्हणून ते आपापल्या शत्रूवर चवताळून शस्त्रांचे प्रहार करीत होते. त्यांनीं भृशुंडी, चक्रें, गदा, खड्ग, पट्टे, शक्ति उल्मुक, प्रास, परशु, भल्ल, परिघ, मुद्गर, भिंदिपाल इत्यादि आयुधांनीं एकमेकांचीं मस्तकें तोडिलीं. तुटून पडलेले अवयव आणि गळून पडलेलीं किरीट कुंडलें, बाहुभूषणें, शस्त्रें, वस्त्रें इत्यादिकांनीं त्या रणमैदानास एक प्रकारची भयंकर शोभा आली होती. ते वीर एकमेकांशीं अत्यंत त्वेषानें लढत असल्यामुळें एकाएकीं मस्तकें तुटून जाऊन शिलक राहिलेलीं नुसतीं धडेंच एकमेकांचे तुकडे करीत होतीं; आणि धडांविरहित मस्तकें डोळे लाल करून दांतओंठ चावीत होतीं ! मांस, अस्थि, अलंकार, शिरें, धडें, धुराळा आणि रक्त यांनीं तें समरांगण म्हणजे एक विस्तीर्ण दलदलच बनली होती ! बळीचा पराक्रम अद्भुत होता. त्यानें एके वेळीं एकदम महेंद्राला दहा, ऐरावताला तीन, ऐरावताच्या चौवां पादरक्षकांना चार, व महाताला एक असे बाण मारिले. राजा, ते सर्व बाण येऊन पोहोंचण्याचे पूर्वीच इंद्रानें आपल्या चपळ हस्तलाघवानें तोडून टाकिले. बळीला तो इंद्राचा पराक्रम सहन झाला नाहीं. त्यानें तत्काळ एक धगधगीत शक्ति उचलिली. तिचें तेज विद्युल्लतेप्रमाणें होतें. पण इंद्रानें ती त्याच्या हातांत असतांनाच तोडून टाकिली ! हातांतल्या हातांत इंद्रानें शक्ति तोडिली, त्यामुळें तर बळि अधिकच खवळला. त्यानें लागलीच शूल हातीं घेतला; तोही इंद्रानें तेथेंच तोडिला. तेव्हां बळीनें प्रास उचलिला; तोही इंद्रानें तोडून टाकिला. ह्याप्रमाणें जीं जीं शस्त्रें वगैरे बळीनें इंद्रावर टाकण्याकरितां उचललीं, तीं तीं सर्व इंद्रानें बळीच्या हातांत असतांनाच तोडिलीं ! शेवटीं बळीनें

असुरी माया

उत्पन्न केली. ह्या मायेच्या योगानें देवांच्या सैन्यावर ज्वालायुक्त असा एक विस्तीर्ण पर्वत आला त्यांतून तापून लाल झालेले मोठमोठे दगड देवांच्या अंगावर पडूं लागले; मोठमोठे वृक्ष जळून त्यांचे निखारे खालीं येऊं लागले; तसेंच भुजंग, सर्प, नाग, विंचू हे देवांच्या अंगावर डासळूं लागले; त्या पर्वतावरील क्रूर पशु त्यांच्या अंगावर पडत आणि त्यांच्या अंगाचे लचके तोडीत ! दैत्यांच्या मायेनें तेथें असंख्य अक्राळविक्राळ राक्षस व राक्षसिणी उत्पन्न झाल्या; आणि हाणा, मारा, तोडा, अशा शब्दांनीं त्यांनीं हलकल्लोळ करून सोडिला. नंतर आकाशांत गंभीर व कठोर शब्द करणारे मेघ येऊन ते निखाऱ्यांचा वर्षाव करूं लागले; आणि त्यांतच भयंकर सोसाटयाचा वारा सुटल्यामुळें व विजांचा कडकडाट सुरू झाल्यामुळें, आतां त्रैलोक्य जळून त्याची राख होते कीं काय असें वाटूं लागलें! अशा प्रकारें बळीनें प्रलयकाळचा अग्नि उत्पन्न केला. व त्याला वाऱ्याची अनुकूलता मिळाल्यामुळें देवांचें सैन्य जळूं लागलें ! इतक्यांत समुद्रही खवळला व आपली मर्यादा सोडून पृथ्वीला बुडवीत आहे असें दिसलें; आणि सोसाटयाच्या वाऱ्यानें पर्वताएवढाल्या भयंकर लाटा उसळूं लागल्या !

### भगवदागमनामुळें मायेचा नाश.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, याप्रमाणें त्या दैत्यांनीं अनेक प्रकारच्या माया उत्पन्न केल्या, तेव्हां देव अगदीं घाबरून गेले; इंद्रालाही कांहीं उपाय सुचेना. शेवटीं देवांनीं विश्वपाल भगवंताची स्तुति केली. तेव्हां, भक्तांवर संकट आलें आहे असें पाहून, भक्तकामकल्पद्रुम परमेश्वर गरुडावर बसून अष्टभुजरूपानें तत्काल तेथें प्राप्त झाले. राजा, ईश्वराचा प्रभाव अतर्क्य आहे. भगवान तेथें येतांच दैत्यांच्या सर्व माया नष्ट झाल्या. कारण, भगवच्चिंतनाच्या योगानें सर्व संकटांचा परिहार होतो हा सिद्धांत आहे; असो.

### भगवंताचें व दैत्यांचें युद्ध.

राजा, भगवान तेथें गरुडावर बसून आला आहे असें पाहतांच, सिंहवाहन काळनेमि दैत्यानें आपला शूल पेलून भगवंतावर फेंकिला. त्रैलोक्यपति भगवंतानें, तो शूल गरुडाच्या मस्तकावर येऊन पडणार तोंच त्याला सहज हातानें धरिलें; आणि तोच उलट त्याच्या अंगावर भिरकावून त्यानें वाहनासुद्धां काळनेमीला ठार केलें. चक्राच्या योगानें भगवंतानें माली व सुमाली या प्रबल दैत्यांना तोडिलें. ही स्थिति पहात असतांही माल्यवान् भगवंताजवळ आला, आणि गरुडावर गदेचा प्रहार करण्यास तयार झाला, तेव्हां भगवंतानें त्याचाही शिरच्छेद केला!

## अध्याय अकरावा.

—:०:—

### देवदैत्यांचें युद्ध.

### इंद्राकडून बलीचा धिक्कार.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, भगवंताच्या कृपेनें देवांना पुनः अवसान आलें; आणि ज्यांनीं ज्यांनीं त्यांना मारिलें होतें, त्या त्या सर्वांना झोडण्यास त्यांनीं पुनः सुरुवात केली. भगवान इंद्रानें बलीवर वज्र उचलिलें. बलीनेंही आपलीं सर्व आयुधें घेतलीं आणि तो इंद्रासमोर येऊन उभा राहिला. तेव्हां इंद्र धिक्कारपूर्वक त्याला म्हणाला, "मूर्खा, नानाप्रकारचीं सोंगें घेऊन बहुरूपी जसे मुलांना खेळवितात, तसे तुम्ही दैत्य आपल्या राक्षसी मायेनें आम्हांस खेळवूं पाहतां काय? पण तुम्ही पूर्ण लक्षांत ठेवा कीं, आम्ही बहुरूप्यांचे गुरु आहों! तुमच्या कपटविद्येला आम्ही भिणारे नाहीं; ज्या मूर्खांना वाटत असेल कीं, कपटविद्येच्या योगानें आम्ही स्वर्गापेक्षांही उच्चपदास जाऊं, त्या चोरांना मी त्यांच्या पहिल्याच पदावरून खालीं ढकलतों! हें पहा आतांच या माझ्या वज्रानें तुझ्या मस्तकाचें चूर्ण करितों! हे कपटपटो, आतां बोलाव आपल्या साथीदारांना, आणि कर आपल्या रक्षणाचा उपाय काय असेल तो!"

### बलीचें इंद्राला मार्मिक उत्तर.

बलि म्हणाला:—इंद्रा, जे जे म्हणून युद्धाकरितां समरांगणावर येतात, त्यांना कीर्ति, जय, पराजय व मृत्यु यांपैकीं कांहींना कांहीं तरी प्राप्त व्हावयाचेंच; ह्या गोष्टी काळाच्या स्वाधीन आहेत, व त्याच्याच प्रेरणेनें लोक कर्में करीत असतात. म्हणून शहाणे लोक जय मिळाला तरी आनंद मानीत नाहींत; आणि पराजय झाला तरी दुःख करीत नाहींत. परंतु तुम्हां मूर्खांना हा विचार कोठचा? कर्ते काय ते आम्ही, अशी तुम्हांला घमेंड आहे, आणि म्हणूनच तुम्ही दुसऱ्याला मर्मभेदक भाषणें बोलतां. पण या तुमच्या कृतीबद्दल विद्वानांना तुमची कींव येते!

### दैत्यांचा पराभव.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, बलि राजानें याप्रमाणें धिक्कारयुक्त वाक्प्रहारांनीं अगोदर इंद्राला लज्जित केलें, आणि नंतर त्यावर आकर्ण धनुष्य ओढून अति तीक्ष्ण बाण सोडिले. बलीचे ते वाग्बाण इंद्राच्या काळजाला अतिशय झोंबले; शत्रूचा नायनाट करणारें आपलें वज्र त्यानें तत्काळ बलीचा प्राण घेण्याकरितां उचलिलें; आणि मोठ्या त्वेषानें त्याचा बलीवर प्रहार केला. बलीला तो आघात सहन झाला नाहीं! पंख तुटलेला पर्वत आकाशांतून खालीं पडावा, त्याप्रमाणें बलि राजा, आपल्या वाहनावरून खालीं पडला. आपला मित्र पडला असें पाहतांच, बलीचा सखा जंभ हा त्याला साह्य करण्याकरितां समरांगणीं धावला, आणि त्या सिंहारूढ जंभानें आपली प्रबल गदा इंद्राच्या मानेवर व ऐरावताच्या गंडस्थळावर हाणिली. गदेच्या तडाक्याबरोबर ऐरावत खालीं वाकला आणि त्यानें गुडघे टेंकले; व त्याला त्या घायानें

प्रबळ मूर्च्छा आली ! अशा प्रकारें इंद्र संकटांत पडला आहे असें पाहतांच, मातलीनें सहस्र अश्व जोडलेला त्याचा रथ तत्काल तेथें आणून त्याच्याजवळ उभा केला; तेव्हां इंद्र ऐरावतावरून उतरून रथांत बसला. राजा, त्या वेळच्या मातलीच्या चलाखीबद्दल जंभानेंही त्याची प्रशंसा केली, आणि हसत हसत एक देदीप्यमान शूल त्याच्या अंगावर फेंकिला. मातलीला तो शूल मर्मस्थानीं लागला, तरी त्याची दुःसह पीडा त्यानें तशीच सहन केली;पण सारथ्य सोडिलें नाहीं. त्या प्रसंगीं इंद्रासही पराकाष्ठेचा त्वेष चढला, आणि त्यानें क्रुद्ध होऊन आपल्या वज्रानें जंभाचें मस्तक धडापासून वेगळें केलें. जंभ मेल्याचें वर्तमान नारदांनीं त्याच्या बांधवांना सांगितलें, तेव्हां नमुचि, बळ, पाक हे दैत्य तत्काल तेथें येऊन पोहोंचले. त्यांनीं वाक्प्रहारांनीं इंद्राचें अंतःकरण आणि शरप्रहारांनीं त्याचें शरीर अगदीं विद्ध करून सोडिलें. बळ दैत्यानें मोठ्या चपलतेनें इंद्राच्या रथाच्या घोड्यांना हजार बाण मारून एकदम घायाळ केलें. पाक दैत्यानें एकदम दोनशें बाण सोडून सारथि आणि चक्रादिकांसह रथ हे दोन्ही निरुपयोगी केले. इतक्यांत नमुचीनें भयंकर गर्जना केली, आणि पंधरा बाण इंद्रावर सोडिले. राजा, पर्जन्यकालीं मेघ ज्याप्रमाणें सूर्याला आच्छादितात, त्याप्रमाणें त्या दैत्यांनीं घोडे, सारथि व रथ यांसह इंद्राला आच्छादून टाकिलें. इंद्र कोठें दिसेना असें पाहून देवगण घाबरले; आणि देवसैन्यांत जिकडे तिकडे हाहाकार उडाला ! दैत्यांनींही, देवसैन्य निर्नायक झालें आहे असें पाहून त्याजवर निकराचा हल्ला केला आणि त्याचा पराभव केला. समुद्रांत नौका फुटून गेली असतां व्यापाऱ्यांची जशी स्थिति होते, तशी देवांची स्थिति झाली. इतक्यांत, ज्याप्रमाणें रात्र संपल्यावर सूर्यनारायण आपल्या किरणांनीं जगाला प्रफुल्लित करितो, त्याप्रमाणें इंद्र आपल्या रथासह बाणांचें आच्छादन दूर सारून बाहेर पडला, व त्यानें देवसैनिकांच्या मनाला प्रफुल्लित केलें. आपल्या परोक्ष शत्रूंनीं आपल्या सैन्याची दुर्दशा उडविली असें पाहून, इंद्रानें शत्रूंचा उच्छेद करण्याकरितां आपलें वज्र उचलिलें, आणि त्या त्वेषांत बळ व पाक यांचीं मस्तकें उडविलीं. ही स्थिति पाहून इतर दैत्यांना मोठें भय वाटलें. बळ आणि पाक मेले असें पाहून नमुचीला अत्यंत शोक झाला; आणि इंद्राचें हें कृत्य त्याला सहन न होऊन तो इंद्राच्या अंगावर धावून आला. राजा, तें

### इंद्राचें व नमुचीचें युद्ध

फारच भयंकर झालें. नमुचीनें आपला शूल उचलून मोठी गर्जना केली, आणि 'दुष्टा, मेलास !' असें म्हणून तो शूल त्यावर फेंकला. पण इंद्रानें आपल्या बाणाच्या योगानें त्या शूलाचे आकाशांतच सहस्रशः तुकडे केले ! राजा, इंद्रालाही राग आला होता; म्हणून त्यानें नमुचीचा शिरच्छेद करण्याकरितां त्याच्या मानेवर वज्रप्रहार केला. पण त्यापासून त्याच्या त्वचेला सुद्धां धक्का लागला नाहीं ! तेव्हां इंद्राला मोठें आश्चर्य वाटलें. ज्या वज्राच्या जोरावर आपण वृत्रासुराचा वध केला, त्या वज्रानें नमुचीच्या त्वचेला नुसता धक्का सुद्धां लागला नाहीं, हें पाहून इंद्र दचकला. तो मनांत म्हणूं लागला कीं, "जेव्हां पर्वतांना पंख होते, तेव्हां ते आकाशांत उडत आणि भूमीवर पडत; त्यामुळें प्रजांचा फार नाश होई, म्हणून त्या पर्वतांचे पंख मीं या वज्रानें तोडिले; त्वष्ट्याच्या तपाची केवळ मूर्तिच असा जो महाप्रबळ दैत्य वृत्रासुर, त्याचीही मान मीं या वज्रानें चिरली; आणि कोणत्याही आयुधांनीं ज्यांच्या त्वचेचा भंग होत नव्हता, असे अनेक दैत्यही मीं या वज्रानें मारिले; पण असें असतां आज तें वज्र या क्षुद्र दैत्यापुढें तुच्छ ठरलें काय ! हें वज्र म्हणजे

दधीचि ऋषीचें तेज; पण आज त्याची एखाद्या सोडण्यापेक्षां जास्त योग्यता राहिली नाहीं म्हणून आतां मी याला हातीं धरणार नाहीं !"

नमुचीचा वध.

श्रीशुकाचार्य म्हणतातः—परीक्षित राजा, अशा प्रकारें इंद्र आश्चर्य व खेद करीत आहे, इतक्यांत आकाशवाणी झाली: "इंद्रा, हा दैत्य शुष्क वस्तूंनीं मरावयाचा नाहीं, व ओल्या पदार्थांनींही मरावयाचा नाहीं; कारण, तसा याला माझा वर आहे. म्हणून याला मारण्याकरितां तूं अन्य उपायांची योजना कर." हें ऐकून इंद्रानें एकाग्र अंतःकरण करून विचार केला, तों ओलीही नाहीं व कोरडीही नाहीं अशी एक वस्तु त्याच्या लक्षांत आली. ती म्हणजे पाण्यावरील फेंस होय. तत्काल इंद्रानें तो मिळविला, आणि त्याच्या योगानें नमुचीचा वध केला ! त्या वेळीं मुनिगणांनीं इंद्राची स्तुति केली, आणि देवांनीं त्याजवर पुष्पवृष्टि केली; विश्वावसु व परावसु हे मुख्य गंधर्व गायन करूं लागले; अप्सरा नृत्य करूं लागल्या; आणि मंगलवाद्यांचा गजर होऊं लागला. नमुचीला मारिल्यावर बाकी राहिलेल्या दैत्यांना, सिंह मृगांना मारितो त्याप्रमाणें इतर देवांनीं मारिलें. इतक्यांत, दानवांचा संहार होत आहे असें पाहून नारद तेथें आले, आणि त्यांनीं देवांना प्रतिबंध केला: नारद म्हणाले, "देवहो, तुम्ही भगवंताच्या आश्रयानें राहून अमृताची प्राप्ति करून घेतली आहे; व त्यामुळें तुमची शक्ति वाढली आहे. ह्यास्तव आतां हा व्यर्थ कलह सोडून द्या."

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, नारद मुनींनीं सांगितल्याबरोबर त्यांच्या वचनाला मान देऊन देवांनी युद्धप्रसंग बंद केला, आणि ते सर्वजण आपापल्या विमानांत बसून स्वर्गलोकीं गेले. इकडे अवशिष्ट राहिलेल्या दैत्यांनीं, नारदांच्या आज्ञेनें, विपन्न स्थितींत पडलेल्या बलीला अस्ताचलावर नेलें. तेथें, ज्यांचे अवयव गेले होते आणि धडें व शिरें होतीं, त्यांना शुक्राचार्यांनीं आपल्या संजीवनी मंत्राच्या योगानें पहिल्यासारखें केलें. शुक्राचार्यांनीं स्पर्श केल्याबरोबर बलीचीं सर्व इंद्रियें पूर्ववत् झालीं, आणि तो देहभानावर आला. आपला पराजय झाला म्हणून त्यानें किंचितही दुःख केलें नाहीं; कारण तो मोठा ज्ञाता होता !

# अध्याय बारावा.

—:०:—

## शंकरास मोहिनीदर्शनेच्छा.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, भगवान विष्णूनें स्त्रीरूप घेऊन असुरांना मोह पाडला, आणि देवांना अमृत पाजिलें, हें वर्तमान शंकरांला कळलें. तेव्हां तें विष्णूचें स्त्रीरूप पाहण्याच्या इच्छेनें कैलासपति शंकर भवानीसह नंदिकेश्वरावर बसून तेथें आले. त्यांनीं आपल्या सर्व भूतगणांनाही ती मौज पाहण्याकरितां बरोबर आणिलें होतें. शंकर आले आहेत असें पाहून भगवान महाविष्णूनें त्यांचा सत्कार केला, आणि त्यांस बसावयास उत्तम आसन दिलें. तेव्हां शंकरांनींही विष्णूचा गौरव करून हसत हसत बोलण्यास प्रारंभ केला.

### श्रीविष्णूची स्तुति.

शंकर म्हणाले:—हे देवाधिदेवा जगद्व्यापका, तूं सर्व पदार्थांचें कारण व आत्मा असल्यामुळें ईश्वरही तूंच आहेस. तूं जगद्रूपी आहेस; पण त्यासारखा जड किंवा असत्य नसून तुला उत्पत्ति, आणि लय नाहींत; कारण जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं ज्या निर्विकार ब्रह्मापासून होतात, व जें (ब्रह्म) भोग्य आणि भोक्ता या रूपांनीं स्वतः नटलेलें असूनही ज्याला उत्पत्यादिक विकार नाहींत, तें सत्यज्ञानात्मक ब्रह्म तूंच होस. याला मुमुक्षु लोकांचें आचरण हेंच प्रमाण आहे. पहा—ते मुनि इहपरलोकींच्या

उपभोगांची इच्छा सोडून तुझ्या चरणांची निष्कामपणें सेवा करितात. आतां कदाचित् तूं असें म्हणशील कीं, 'जर मी निःसंग व उदासीन ब्रह्म आहें, तर माझ्या चरणांची सेवा करून मुमुक्षु जनांना काय मिळणार ?' तर, हे परमेश्वरा, तूं निर्गुण, शोकरहित, निर्विकार, आनंदमय, सर्वव्यापक व सर्वांहून निराळा असा आहेस खरा; पण तूं अत्यंत उदासीन नाहींस. तूं प्रपंचाच्या उत्पत्तिस्थितिलयांचें कारण असून उत्पत्त्यादिक उपाधींनीं युक्त असलेल्या जीवांना त्यांच्या कर्मांचें फल देणारा आहेस. तरी पण, लोक जसें आपल्या सेवकांच्या सेवे बद्दल म्हणून त्यास फळ देतात, तसें तूं देत नाहींस; तर, निरपेक्षबुद्धीनें तूं तें देतोस. तूं शाश्वतसुखात्मक ब्रह्मस्वरूपी असल्यामुळें तुला कशाचीही अपेक्षा नाहीं. म्हणून तुझें ऐश्वर्य स्वार्थाकरितां नसून तें भक्तांवर अनुग्रह करण्याकरितांच आहे. देवा, द्वैतभावानें भासणारें कार्य व अद्वैतभावानें प्रतीतीस येणारें कारण हीं दोन्ही तूंच असल्यामुळें वास्तविक तूं एकच आहेस. सोनें आणि त्याचा घडलेला दागिना हीं भिन्न आहेतशीं दिसतात; पण वास्तविक पाहतां दागिना आणि सोनें ह्या कार्यकारणांत सोनें ही जशी एकच वस्तु असते, त्यांत भेद मुळींच नसतो, तसा तुझ्यामध्यें व ह्या अखिल सृष्टींमध्येंही भेद नाहीं. हा भेद वाटण्याचें कारण लोकांचें अज्ञान हें होय. या अज्ञानामुळें ते तुझें नानाप्रकारांनीं वर्णन करितात; कित्येक ( वेदांतवादी ) तुला ब्रह्म मानितात; कित्येक ( मीमांसक ) तुला धर्म मानितात; कित्येक ( सांख्य ) तुला पुरुषाहून भिन्न असा ब्रह्मादिकांचा ईश्वर मानितात; कित्येक ( पांचरात्र ) तुला विमला, उत्कर्षिणी, ज्ञाना, क्रिया, योगा, प्रव्ही, सत्या, ईशाना आणि अनुग्रहा या नऊ शक्तींनीं युक्त परमेश्वर असा मानितात; व कित्येक ( पातंजल मताचे लोक ) तूं जन्मादिविकाररहीत असून स्वतंत्र आहेस असें मानितात. हे विश्वेश्वरा, मी, ब्रह्मदेव व मरीचिप्रमति ऋषि या सर्वांची सत्त्वगुणापासून उत्पत्ति झाली आहे; तथापि तूं रचलेल्या सृष्टीचें सुद्धां आम्हाला ज्ञान होत नाहीं; मग तुझें ज्ञान कसें होईल बरें ? तेव्हां आमच्यासारख्यांची जर ही अशी स्थिति, तर ज्यांची रज आणि तम या गुणांपासूनच उत्पत्ति, त्या दैत्यांना व मानवांना तुझें ज्ञान कसें होणार ! पण, देवा ! तूं जगाचा आत्मा व ज्ञानरूप असल्यामुळें, वायु जसा चराचर शरिरांत आणि आकाशांत संचार करितो, तसा सर्व जगांत संचार करून, तूंच उत्पन्न केलेल्या या जगताला प्राप्त झालेला संसारबंध आणि मोक्ष यांना जाणतोस.

### मोहिनीरूप दाखविण्याविषयीं प्रार्थना.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, याप्रमाणें शंकरांनीं विष्णूची स्तुति केली, आणि नंतर त्याची प्रार्थना करून त्यास म्हटलें, "ईश्वरा, तूं आजपर्यंत आपल्या मायेच्या योगानें क्रीडा करण्यासाठीं जीं जीं रूपें धारण केलींस, तीं तीं सर्व मीं पाहिलीं; पण आतांच ज्याच्या योगानें तूं दैत्यांना मोह घालून देवांना अमृत पाजिलेंस, तें तुझें स्त्रीरूप मीं पाहिलें नाहीं; ह्यास्तव तें पाहण्याची मला फार इच्छा आहे. आम्ही सर्व तुझ्या त्या स्त्रीरूपाचें दर्शन घेण्याकरितां येथें आलों आहों; तर तें तूं आम्हांला कृपा करून दाखव."

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, शंकरांनीं केलेली विनंती ऐकून भगवान विष्णूच्या मनांत कांहीं गूढ विचार आला, व तो हसून म्हणाला, "शंकरा, अमृताचें पात्र दैत्यांच्या हातीं गेलें, तेव्हां तें आपल्या हातीं कसें येईल या विचारांत मी पडलों असतां मला एक युक्ति सुचली, व ती माझ्या मनानें पसंत ठरल्यावर मीं लागलीच स्त्रीवेष घेतला. आतां तुम्हांला जर तें रूप पाहण्याची इच्छा आहे, तर कामिजनांना प्रिय असें तें रूप मी तुम्हांला दाखवितों."

### शंकरांना मोहिनीदर्शन.

श्रीशुकाचार्य पुढें सांगतात—परीक्षित राजा, असें बोलत असतांच भगवान विष्णु तेथें गुप्त झाला, आणि एकदम तेथली सर्व चिन्हें नाहींतशीं होऊन तें स्थळ एक सुंदर उपवन बनलें! त्या उपवनाला नानाप्रकारच्या पुष्पवृक्षांनीं फारच शोभा आलेली असून भवानीसह शंकर तेथेंच बसलेले होते! त्या समयीं त्यांचें चित्त उपवनाची शोभा पाहण्यांत मग्न झालें. इतक्यांत शंकरांला त्या उपवनांत एक सुंदर स्त्री चेंडू खेळत आहे असें दिसलें. राजा, भगवंतानें घेतलेल्या त्या

### मोहिनीरूपाचें वर्णन

करावें तितकें थोडेंच! तिनें एक अतिशय पातळ वस्त्र परिधान केलें असल्यामुळें, तिचे ते सुंदर अवयव त्या वस्त्रांतून स्पष्ट दिसत होते. ती चेंडू उडविण्याच्या नादांत असल्यामुळें, ज्या ज्या वेळीं त्या चेंडूला हस्तप्रहार करण्याकरितां ती खालीं वाके, त्या त्या वेळीं तिचे स्तनकलश त्या पातळ वस्त्रामधून किंचित् हलताहेतसे दिसत; आणि कंठांतील पुष्पहाराच्या भारानें तिची ती कृशकटि मोडेल कीं काय, अशी भीति वाटे! चेंडूला त्या स्त्रीनें थाप मारिली, कीं जसा कांहीं तो आनंदानें उड्या मारूं लागे; व तो अज्ञान चेंडू उड्या मारूं लागला, कीं त्या स्त्रीला फारच आनंद होई! त्याचें उड्डाण जरा कमी झालें कीं लागलीच ती फिरून त्याला थाप मारी. या वेळचें तिचें नेत्रचापल्य केवळ अवर्णनीय होतें. तिनें आपल्या कानांत बहुमोल रत्नांचीं कुंडलें घातलीं होतीं, व त्यामुळें तें तिचें मोहक मुखकमल फारच सुशोभित दिसत होतें. चेंडू खेळण्याच्या धांदलींत तिची फारच तारांबळ उडत होती. कधीं तिचें वस्त्र निसटे, कधीं बुचडा सुटून केस मोकळे होत आणि ते कुंडलांत अडकत, आणि त्यांतल्या त्यांतच ती एका हातानें चेंडूला प्रहार करी, व दुसऱ्या हातानें ते सावरून धरी!

### मोहिनीदर्शनानें शंकरांची गाळण!

परीक्षित राजा, मोहिनीची ती लीला पाहतां पाहतां शंकरांचें लक्ष तिच्या स्वरूपीं गढून गेलें. शंकरांनीं आपल्याकडे पाहिलें, असें त्या स्त्रीच्या लक्षांत आल्याबरोबर तिनें किंचित् लाजून स्मितहास्य केलें, आणि वक्रदृष्टि करून एकवार शंकरांकडे कटाक्ष फेंकिला, व फिरून ती चेंडू खेळूं लागली. त्या तिच्या नेत्रकटाक्षबाणानें शंकर अगदीं घायाळ झाले; त्यांची शुद्ध गेली; आणि आपल्याजवळ भवानी व भूतगण आहेत, ह्याचेंही भान त्यांना राहिलें नाहीं! त्यांना फक्त ती स्त्री व ती खेळवीत असलेला तो चेंडू एवढेंच काय तें दिसूं लागलें. पुढें तो चेंडू उडत उडत जरा लांब गेला, तेव्हां त्याबरोबर तीही तिकडे धावत चालली; आणि इतक्यांत वाऱ्यानें तिच्या देहावरील तें अतिसूक्ष्म वस्त्र उडविलें! कैलासाधिपति शंकरांची दृष्टि तिकडे होतीच! त्यांच्या नजरेस तो प्रकार पडतांक्षणींच त्यांची विचारशक्ति अगदींच नाहींशी झाली! तेवढ्यांत तिनें आणखी एक कटाक्षबाण त्यांजवर सोडिला; त्यामुळें तर शंकरांच्या मनांत कामोद्भव होऊन, भवानी पहात असतांही ते तेथून निघून तिच्या जवळ जवळ चालले! देहावरील वस्त्र उडालें असल्यामुळें, शंकर आपल्याकडे येत आहेत असें पाहून ती स्त्री फारच लाजली, आणि किंचित् हसून जवळच असलेल्या प्रफुल्लित पुष्पवेलींमध्यें लपली! पण तिनें ज्यांचें अंतःकरण हरण करून आपल्याबरोबर नेलें होतें, ते काममदानें उन्मत्त झालेले शंकर, हत्ती जसा हत्तिणीच्या मागें बेफामपणें धावतो, तसे तिच्या मागें बेफामपणें धावत चालले! शंकर आपल्या मागें लागले आहेत असें पाहतांच ती स्त्री पळूं लागली. शंकरही पहिल्यापेक्षां जास्त वेगानें धावले आणि त्यांनीं तिचा बुचडा धरिला, व तिची इच्छा नसतांही बळेंच तिला जवळ घेऊन

घट्ट आलिंगन दिलें! राजा, शंकररूपी व्याधाच्या पाशांत पूर्णपणें सापडलेली ती मोहिनीरूप हरिणी, त्याजपासून सुटावें म्हणून धडपड करूं लागली; पण कांहीं केल्या शंकर तिला सोडीनात. तिचे केंस अस्ताव्यस्त झाले; भयानें तिला घाम सुटला; आणि श्रमानें तिचे नेत्र किंचित् आरक्त झाले; तरी तेथून सुटण्याचा तिचा प्रयत्न चाललाच होता! शेवटीं एकदाची ती बिचारी अबला शंकरांच्या बाहुपाशांतून निसटली व धूम पळत सुटली! शंकरही तिच्या मागोमाग धावत चालले! शंकरांना मदनानें या वेळीं पूर्णपणें जिंकिलें होतें; गाय आटोक्यांत येण्यास उशीर लागला असतां, तिच्या मागें लागलेल्या बैलाचें जसें रेतस्खलन होतें, तसें मोहिनीच्या मागें धावत असलेल्या त्या अमोघवीर्य शंकरांचें रेत मार्गांतच स्खलन होऊं लागलें! याप्रमाणें, मोहिनी पुढें आणि शंकर मागें, अशीं तीं दोघें पळत असतां कित्येक नद्या, सरोवरें, पर्वत, वनें, उपवनें, व ऋषींचे आश्रम ह्यांस त्यांनीं ओलांडिलें! मग, रेतस्खलन झालें असें जेव्हां शंकरांच्या लक्षांत आलें, तेव्हां भगवंताच्या मायेनें आपण पूर्णपणें वेडावून गेलों असें त्यांस समजलें! आणि नंतर त्यांनीं आपणाला त्या मायेपासून निवृत्त करून घेतलें, व अपरिमित योगमायेनें युक्त अशा श्रीहरीचें व आपलें मूळचें माहात्म्य जाणिलें! राजा, या वेळीं जेथें जेथें शंकरांचें रेत पडलें, तीं तीं स्थळें सुवर्णमय आणि रौप्यमय झालीं; असो. परीक्षिता, शंकर मोहरहित झाले असें पाहून भगवान विष्णूनेंही आपलें स्वरूप धारण केलें आणि शंकरांना म्हटलें, " देवाधिदेवा! मीं आपल्या मायेनें स्त्रीरूप घेऊन तुला मोह घातला असूनही, तूं आपल्या विचारशक्तीच्या योगानें मूळरूपीं स्थिर झालास, हें पाहून मला फार संतोष झाला. तुजवांचून इतर कोणता पुरुष या दुस्तर मायासमुद्राचें उल्लंघन करणार आहे! माझी ही त्रिगुणात्मक माया आतां तुला मोह घालणार नाहीं. कारण, मी सृष्ट्यादिकांचें निमित्त असून कालरूपी आहें; व रजःसत्त्वादि गुणविभागांच्या रूपानें मायेशीं मिळून असतों, म्हणून ती माझ्या अधीन आहे!"

### शंकरांचें कैलासीं गमन.

श्रीशुक म्हणतातः—परीक्षित राजा, अशा प्रकारें भगवान विष्णूनें सत्कार केल्यावर, शंकर आपल्या भूतगणांसह पार्वतीला घेऊन कैलास लोकीं गेले. तेथें गेल्यावर भगवान शंकरांनीं विष्णूच्या मायेचा सर्व चमत्कार पार्वतीला आणि ऋषींना सांगितला; व तो ऐकून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें.

शंकर म्हणालेः—भवानी, ईश्वराची माया तूं पाहिलीस का? मला सुद्धां तिच्या योगानें मोह पडला, मग इतरांना पडेल यांत काय नवल! पूर्वी, सहस्रसंवत्सरांच्या शेवटीं योगबलानें मी निद्रा घेत असतां ज्याबद्दल तूं मला प्रश्न केलास, तोच हा पुराणपुरुष होय. ह्याच्या ठिकाणीं कालाची किंवा वेदांची गति नाहीं.

### कथामाहात्म्य.

श्रीशुकाचार्य म्हणालेः—परीक्षित राजा, ज्यानें समुद्रमथनसमयीं मंदराचलाला आपल्या पाठीवर धारण केलें, त्या भगवंतानें केलेलें अद्भुत चरित्र मीं तुला सांगितलें. राजा, जो ही कथा वारंवार श्रवण किंवा पठन करील, तो हा दुस्तर मायासमुद्र तरून जाईल. कारण, देव भक्तांचा कैवारी आहे. मोठमोठे देव ज्याला शरण गेले, म्हणून त्यानें मोहिनीचें रूप घेऊन दैत्यांना मोह पाडिला, आणि त्यांजपासून अमृत घेऊन देवांना दिलें. माझा त्याला नमस्कार असो!

# अध्याय तेरावा.

—:०:—

## मन्वंतरवर्णन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, एकंदर चौदा मन्वंतरांतील सहा मन्वंतरांची व्यवस्था मीं तुला सांगितली. आतां बाकी राहिलेल्या आठ मन्वंतरांचीं नांवें आणि त्यांतील अधिकारिमंडल तुला सांगतों; तें तूं लक्षपूर्वक ऐक: सांप्रत प्रचलित असलेलें

### वैवस्वत मन्वंतर

सातवें होय. या मन्वंतरांत, विवस्वानाच्या संज्ञा नामक पत्नीच्या उदरीं जीं यम, यमुना आणि श्राद्धदेव हीं तीन अपत्यें झालीं, त्यांपैकीं श्राद्धदेव हा मनु आहे; त्याचे जे इक्ष्वाकु, नभग, धृष्ट, शर्याति, नरिष्यंत, नाभाग, दिष्ट, करूष, पृषध्र, आणि वसुमान् हे दहा मुलगे, ते मनुपुत्र होत; द्वादशादित्य, अष्टवसु, एकादशरुद्र, विश्वेदेव, मरुद्गण, अश्विनीकुमार आणि ऋभुगण हे देव होत; पुरंदर हा इंद्र होय; कश्यप, अत्रि, वसिष्ठ, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि आणि भरद्वाज हे सात ऋषि होत; आणि कश्यपाच्या अदिति नामक पत्नीच्या उदरीं झालेल्या द्वादशादित्यांत धाकटा जो वामन, तो ईश्वराचा अंशावतार होय. राजा, हें मन्वंतर संपल्यावर पुढें आठवें

### सावर्णि मन्वंतर

होईल. विवस्वानाच्या छाया नामक दुसऱ्या भार्येच्या उदरीं झालेल्या सावर्णि, शनैश्चर आणि तपती या तीन अपत्यांपैकीं पहिला पुत्र जो सावर्णि, तो मनु होणार आहे. छायेची कन्या तपती ही संवरण राजाची भार्या झाली. विवस्वानाला, त्वष्टा नामक विश्वकर्म्याच्या कन्या संज्ञा आणि छाया या दोन पत्न्या असून, वडवा या नांवाची तिसरी पत्नी होती असें म्हणतात. पण माझ्या मतें वडवा हें संज्ञेचेंच नामांतर

---

१ स्कंध ६ अ. ६ पहा. २ क्रतु, दक्ष, वसु, सत्य, कालकाम, मुनि, कुरज, मनुज, बीज आणि रोचमान् (मत्स्य० अ० २०२). ३ स्कंध ६ अ० १८ पहा. ४ हे दोघे आहेत. यांस 'नासत्यौ' 'अश्विनौ' 'दस्रौ' अशा साधारण नांवांनीं हांक मारण्याचा जरी परिपाठ आहे, तरी वडिलाचें नांव 'नासत्य' आणि धाकट्याचें 'दस्र' असल्याचें दिसून येतें. (भारत अनु० अ० १५०.) हे देवांचे वैद्य असून यांस बराच कालपर्यंत यज्ञामध्यें हविर्भाग नसे; पण पुढें तो च्यवन मुनींनीं चालू केला. (स्कं० ९ अ० ३ पहा.) यांचें विशेष वृत्त, वडवा शब्दावर दिलेल्या पुढील टीपेंत पहा.

१ इतर ग्रंथांवरून पाहतां 'छाया' व 'वडवा' हीं संज्ञेचींच नामांतरें आहेत, असें सिद्ध होतें. त्याचा सर्व वृत्तांत असा कीं, त्वष्ट्यानें आपली कन्या 'संज्ञा' ही विवस्वान् आदित्यास दिली. कांहीं कालानंतर या संज्ञेला यम, यमुना आणि श्राद्धदेव हीं तीन अपत्यें झालीं; पण पुढें हिला विवस्वानाचें तेज सहन होईना, म्हणून हिनें छायारूप घेतलें; व त्या रूपानें विवस्वानाजवळ राहून वडवारूपानें (घोडीच्या रूपानें) ती दूर जाऊन राहिली. याच काळात छायेला (छायारूपधारिणी संज्ञेला) सावर्णि, शनि आणि तपती हीं तीन अपत्यें झालीं. पुढें एके समयीं अशी गोष्ट घडून आली कीं, खऱ्या संज्ञेचा जो यम नांवाचा मुलगा, त्यानें कांहीं शुल्लक अपराध केला असतां या छायेनें त्यास भयंकर शाप दिला. तें पाहून, आपणास असा दुर्धर शाप देणारी ही आपली माता नसावी, असा त्याला संशय आला; व त्यानें तें वृत्त आपल्या पित्याला कळविलें. तेव्हां विवस्वानानें त्याचा शोध केला असतां त्याला वस्तुस्थिति कळून आली; म्हणून तो आपल्या पत्नीच्या शोधास गेला; तों ती अश्विनीरूपानें आहे असें त्यास आढळलें. तेव्हां त्यानेंही अश्वरूपानेंच तिची भेट घेतली असतां, उभयतांची ओळख पटल्यानंतर त्या ठिकाणीं यांचा समागम झाला; व त्यापासूनच दोन पुत्र जन्मले. ते अश्विनीपासून झाले, म्हणून त्यांस 'अश्विनीकुमार' असें साधारणतः म्हणतात. या हकीकतीवरून 'वडवा' आणि 'छाया' या

असावें. या वडवेच्या उदरीं अश्विनीकुमार हे पुत्र झाले; असो. या मन्वंतरांत निर्मोक, विरजस्क इत्यादिक मनुपुत्र होतील; सुतपस् विरज व अमृतप्रभ हे देव होतील; विरोचनाचा पुत्र बलि हा इंद्र होईल. भगवान विष्णूंनीं पूर्वी बलीजवळ तीन पावलें भूमि मागितली, व बलीनें त्यांना त्याप्रमाणें भूमि दिली; म्हणून विष्णूच्या प्रसादानें त्याला इंद्रपद मिळेल; पण तो त्याचा त्याग करून सिद्धगतीस जाईल. राजा, भगवंतांनीं बलीला बद्ध केलें खरें, परंतु त्याचें शुद्धसत्त्व पाहून अंतःकरण प्रसन्न झाल्यामुळें त्यांनीं त्याला पुनः स्वर्गापेक्षांही उत्तम अशा सुतलामध्यें ठेविलें आहे. व तो सांप्रत तेथें स्वर्गाच्या राजाप्रमाणें ऐश्वर्य भोगीत असतो; असो. गालव, दीप्तिमान्, परशुराम, अश्वत्थामा, कृपाचार्य, ऋष्यशृंग व आमचा पिता वेदव्यास हे सप्तर्षि होतील; व देवगुह्य नामक ब्राह्मणाच्या सरस्वती नामक भार्येपासून सार्वभौम नामक ईश्वराचा अंशावतार होणार आहे. हा सातव्या मन्वंतरांतील पुरंदर नामक इंद्रापासून इंद्रपद हरण करून घेऊन ते बलीला देईल. हे मन्वंतर संपल्यावर

**दक्षसावर्णि मन्वंतर**

होईल. त्यांत वरुणाचा पुत्र दक्षसावर्णि हा मनु होईल; भूतकेतु, दीप्तकेतु इत्यादि मनुपुत्र होतील; अद्भुत हा इंद्र होईल; द्युतिमान्, सवन, हव्य वसु, मेधातिथि, ज्योतिष्मान् व सत्य हे सप्तर्षि होतील; व आयुष्मानाच्या अंबुधारा नामक पत्नीच्या उदरीं ऋषभ नामक ईश्वराचा अंशावतार होईल. हा आपल्या पराक्रमानें त्रैलोक्य जिंकून पहिल्या इंद्राला पदच्युत करील, आणि त्याच्या जागेवर अद्भुताची स्थापना करील. राजा, दहावें

**ब्रह्मसावर्णि मन्वंतर.**

यांत उपश्लोकाचा पुत्र ब्रह्मसावर्णि हा मनु होईल; भूरिषेणादिक मनुपुत्र होतील; सुवासन, विरुद्ध इत्यादिक देव होतील; शंभु हा इंद्र होईल; हविष्मान्, सुकृति, सत्य, जय, मूर्ति इत्यादि ऋषि होतील; व विश्वसृजाच्या घरीं विषूचीच्या उदरीं विष्वक्सेन नामक पुत्र होईल, तो ईश्वराचा अंशावतार होय. हा शंभूला (इंद्राला) साहाय्य करील. पुढें अकरावें जें

**धर्मसावर्णि मन्वंतर**

त्यांत धर्मसावर्णि हा मनु होईल; सत्यधर्मादिक दहा मनुपुत्र होतील; विहंगम, कामगम व निर्वाणरुचि हे देव होतील; वैधृत नामक इंद्र होईल; अरुण, हविष्मान्, वपुष्मान्, अनघ, ऊरुधिष्ण्य, निश्चर व अग्नितेजा हे सप्तर्षि होतील; व आर्यकाच्या वैधृता नामक पत्नीच्या उदरीं धर्मसेतु या नांवाचा पुत्र होईल, तो ईश्वराचा अंशावतार होय. हा त्रैलोक्याचें पोषण करील. नंतर बारावें जें

**रुद्रसावर्णि मन्वंतर**

त्यांत रुद्रसावर्णि मनु होईल; देववान्, उपदेव, देवश्रेष्ठ इत्यादिक मनुपुत्र होतील; ऋतधामा इंद्र होईल; हरितादिक देव होतील; तपोमूर्ति, तपस्वी, आग्नीध्रक इत्यादि सप्तर्षि होतील; आणि सत्यसहस् ऋषीच्या सूनृता नामक पत्नीच्या उदरीं स्वधामा नामक पुत्र होईल, हा ईश्वराचा अंशावतार होय. हा या मन्वंतराचें रक्षण करील. नंतर तेरावें

**देवसावर्णि मन्वंतर**

होईल. यांत देवसावर्णि हा मनु होईल; चित्रसेन, विचित्र इत्यादि मनुपुत्र होतील; सुकर्मा

---

संज्ञेच्याच प्रतिमा होत, हें सिद्ध झालें. ही हकीकत चाक्षुष मन्वंतराच्या समाप्तकालीं झाली. चालू वैवस्वत मन्वंतरांत 'अश्विनीकुमार' देव आहेत, व छायेचा मुलगा 'सावर्णि' पुढील मन्वंतरांत मनु होणार आहे. तपतीनें संवरण राजास वरिलें. त्या तपतीलाच 'कुरु' नामक पुत्र झाला. त्या कुरूनें ज्या ठिकाणीं तपश्चर्या केली, तें स्थल कुरुक्षेत्र या नांवानें प्रसिद्ध आहे.

व सुत्रामा या नांवाचे देव होतील; दिवस्पति नामें इंद्र होईल; निर्मोक, तत्त्वदर्शी, निष्कंप, निरुत्सुक, धृतिमान्, अव्यय व सुतपा हे सप्तर्षि होतील; आणि देवहोत्राच्या बृहती नामक भार्येपासून योगेश्वर नामक पुत्र होईल; हा ईश्वराचा अंशावतार होय. हा दिवस्पतीला त्रैलोक्याचे राज्य मिळवून देईल. राजा, पुढें चौदावें

**इंद्रसावर्णि मन्वंतर**

होईल. यांत इंद्रसावर्णि हा मनु होईल; उरु, गंभीरबुद्धि इत्यादिक मनुपुत्र होतील; पवित्र व चाक्षुष हे देव होतील; शुचि या नांवाचा इंद्र होईल; अग्निबाहु, शुचि, शुद्ध, मागध आदिकरून सात ऋषि होतील; व सत्रायणाला त्याच्या विताना नामक पत्नीपासून बृहद्भानु नामक पुत्र होईल, हा ईश्वराचा अंशावतार होय. हा कर्मकांडाचा विस्तार करील.

श्रीशुक म्हणतात:—राजा परीक्षिता, याप्रमाणें चौदाही मन्वंतरें पूर्ण होत तोंपर्यंत एक हजार युगांचा काळ जातो. एवढा काळ लोटला म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. यासच ' कल्प ' अशी संज्ञा आहे. ही चतुर्दश मनूंची कथा जो श्रवण किंवा पठन करील, त्यावर भगवान लोकनायक प्रसन्न होईल.

## अध्याय चौदावा.

—:०:—

### मन्वंतरांची सामान्य व्यवस्था.

परीक्षित राजा म्हणाला:—मुनिवर्य, आतां प्रत्येक मन्वंतरामध्यें असणारे जे अधिकारी तुम्हीं सांगितले, त्यांना कोणीं कोणकोणत्या कामीं कसें लाविलें, तें मला सांगावें.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, प्रत्येक मन्वंतराला ईश्वराचा अंशावतार म्हणून जो मीं तुला सांगितला, तो भगवान श्रीहरि, त्या त्या मन्वंतरांतील बाकीच्या मंडळींस त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें कामें सांगतो, व त्याप्रमाणें ते ते अधिकारी तीं तीं कामें बजावून मन्वंतराचें पालन करितात. राजा, ऋषींना लोकांमध्यें सनातन धर्माची प्रवृत्ति करण्याविषयीं भगवान आज्ञा देतो; व तीप्रमाणें ते ऋषि कृतयुगाच्या आरंभीं कालगतीनें नष्ट झालेल्या वेदाचें आपल्या तपोबलानें पुनरुज्जीवन करून त्यांची लोकांमध्यें प्रवृत्ति करितात. नंतर श्रीहरीनें आज्ञापिलेले मनु मनोनिग्रह करून आपआपल्या मन्वंतरामध्यें चारही चरणांनीं युक्त अशा धर्माचें रक्षण करितात; प्रजांचें पालन करणारे मनूचे पुत्र व त्यांचे वंशज हे, यज्ञांतील हविर्भाग ग्रहण करणाऱ्या देवांच्या साहाय्यानें मन्वंतर संपेपर्यंत धर्माचें पालन करितात; आणि इंद्र हा श्रीहरीच्या आज्ञेनें सकळ ऐश्वर्यांचा उपभोग घेऊन त्रैलोक्यांत पर्जन्यवृष्टि करितो. राजा, याप्रमाणें व्यवस्था करूनही, भगवान श्रीहरि प्रत्येक युगामध्यें सनकादि सिद्धांचें रूप धारण करून ज्ञानाचा, याज्ञवल्क्यप्रभृति ऋषींचें रूप धारण करून कर्ममार्गाचा, व दत्तात्रेयादिक योगेश्वरांच्या रूपानें योगमार्गाचा उपदेश करितो. मरीचिप्रभृति प्रजापतींच्या रूपानें तो प्रजोत्पत्ति करितो; राजांच्या रूपानें दुष्ट लोकांचा वध करितो; व कालरूपानें पंचमहाभूतांचा प्रकोप करून शेवटीं सर्वांचा नाश करितो. राजा, नानाप्रकारच्या शास्त्रांनीं ईश्वरस्वरूपाचें निरूपण करणारे जन त्या ईश्वराच्या नामरूपात्मक मायेनें मोहित झालेले असतात, म्हणून त्यांना ईश्वराचें ज्ञान होत नाहीं. राजा, ज्यामध्यें चौदा मन्वंतरें असतात, तें प्राचीन विद्वानांनीं वर्णिलेलें कल्पाचें प्रमाण हें असें आहे. असो.

## अध्याय पंधरावा

—:०:—

### वामनावतारकथा.

परीक्षित राजा म्हणाला:—शुकमुने, सकलैश्वर्यसंपन्न श्रीहरीनें एखाद्या दरिद्र्याप्रमाणें तीन पावलें भूमि बळीपाशीं काय म्हणून मागितली, व ती मिळाली असतां पुनः त्यानें बळीला काय कारणानें बद्ध केलें, तें कृपा करून सांगावें. गुरुवर्य, लोकनायक प्रभूनें बळीकडे याचना केली, व त्याची इच्छा बळीनें पूर्ण केली असतां त्या निरपराधी बळीला भगवंतानें बांधून टाकिलें, हें मोठें चमत्कारिक भासतें !

### बळीचा यज्ञ व त्याला युद्धसामुग्रीची प्राप्ति

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, इंद्रानें बळीला जिंकून युद्धामध्यें त्याचा प्राण घेतला असतां, शुक्राचार्यांनीं त्याला फिरून जिवंत केलें. तेव्हां बळीनें त्यांचें शिष्यत्व पतकरून त्यांची निःसीम सेवा केली. त्या सेवेनें ते त्याला प्रसन्न झाले; आणि स्वर्गाची इच्छा करणाऱ्या त्या बळीला त्यांनीं ऋग्वेदी ब्राह्मणांमध्यें असलेल्या ऐंद्रमहाभिषेकानें विधिपूर्वक अभिषेक केला, व त्याजकडून विश्वजित् नामक यज्ञ करविला. तेव्हां यज्ञनारायण संतुष्ट होऊन, त्या होमकुंडांतून इंद्राच्या रथासारखा एक सुवर्णमंडित रथ, दोन श्रेष्ठ अश्व, एक सुवर्णधनुष्य, दोन अक्षय्य भाते, आणि एक दिव्य कवच बाहेर निघालें. त्याचा पितामह प्रल्हाद यानें कधीं ही न सुकणारी एक माळ त्याला दिली, आणि शुक्राचार्यांनीं एक शंख दिला. अशा रीतीनें ब्राह्मणांनीं त्याला युद्धाची सामुग्री संपादन करून दिली व त्याचें स्वस्तिवाचन केलें. बलि राजानें ब्राह्मणांना प्रदक्षिणा घातली, व त्यांना आणि प्रल्हादाला नमस्कार करून तें दिव्य कवच अंगांत चढविलें, आणि धनुष्य, बाणभाते, शंख वगैरे घेऊन तो त्या अजिंक्य रथांत बसला; आणि त्याच्या बरोबर त्याचे बलाढ्य सेनापतिही निघाले. परीक्षिता, बळि राजा ह्याप्रमाणें आपला सर्व सेनासमूह बरोबर घेऊन निघाला, आणि त्यानें

### इंद्रपुरीवर स्वारी

करून त्या नगरीला वेढा दिला, व गुरूजींनीं दिलेला शंख मोठ्यानें वाजविला. राजा, त्या इंद्रपुरीचें वर्णन काय करावें ? तिच्या सभोंवतीं नंदनादिक सुंदर उपवनें आहेत. त्यांपैकीं कित्येकांत फळें अतिशय असतात व कित्येकांत फुलेंच अतिशय असतात. त्या उपवनांतील लतापादपांवर पक्ष्यांचीं जोडपीं मंजुळ शब्द करीत असतात व मत्त मधुकर मकरंद पिऊन गुंजारव करण्यांत दंग असतात. त्या उपवनांतील देववृक्षांच्या शाखा व उपशाखा पल्लवांनीं, पुष्पांनीं व फळांनीं अगदीं वांकलेल्या असल्यामुळें मोठी दिव्य शोभा दिसते. तेथें अनेक सरोवरेंही आहेत. त्यांमध्यें हंस, सारस, कारंडव, चक्रवाक इत्यादि पक्षी खुशाल आनंदानें इतस्ततः संचार करितात; आणि त्या सरोवरांत क्रीडा करण्याच्या उद्देशानें पुष्कळ देव व देवांगना तेथें प्राप्त होतात. देवी आकाशगंगा ही खंदकाच्या ऐवजीं त्या नगरीस वेढा देऊन राहिली आहे. तिच्या सभोंवतीं अग्नितुल्य उंच उंच सुवर्णाचे तट असून त्यांजवर मधून मधून मनोरे केलेले आहेत. परीक्षिता, ती नगरी प्रत्यक्ष विश्वकर्म्यानें बांधिली असल्यामुळें तींतील व्यवस्था फारच मनोहर आहे. त्या नगरीच्या वेशींना सुवर्णाचे अडसर असून त्यांतील जमिनी स्फटिकांच्या केलेल्या आहेत. तिच्यामध्यें अनेक राजमार्ग असून जागोजाग सभागृहें व अंगणें केलेलीं आहेत. त्या नगरींत विमानें तर कोट्यवधि दृष्टीस पडतात. तेथील चवाठे रत्नखचित असून पार्श्वपथ हिऱ्यांचे व पोंवळ्यांचे आहेत. तेथें सोळा सोळा वर्षांच्या तरुण व सुंदर स्त्रिया दागदागिने घात-

लेल्या व उंची वस्त्रें परिधान केलेल्या सदैव आढळतात. त्या नगरींतील वायु, देवस्त्रियांच्या वेणींतून पतन पावलेल्या सुगंधित पुष्पांच्या समागमानें सदोदीत सुगंधित झालेला असतो. त्या नगरींत सुवर्णाच्या खिडक्यांतून अगुरु चंदनाच्या धुराचे लोट नित्य बाहेर पडत असल्यामुळें मार्गही स्पष्टपणें दिसत नाहीं. त्या नगरींतील त्या अंधक मार्गांतून अप्सरांचे समुदाय निरंतर इकडे तिकडे जात येत असतात. तेथ कित्येक स्थळीं मोत्यांचीं छतें, कित्येक ठिकाणीं सुवर्णमंडित व रत्नखचित ध्वजपताका, आणि कित्येक जागीं विमानांचीं मनोहर अग्रें दृग्गोचर होतात. त्या नगरींत मयूर, कपोत व भ्रमर हे नित्य मंजुळ रव करीत असतात; अप्सरांचें गायन तर सर्वत्रच चाललेलें असतें; आणि मृदंग, शंख, दुंदुभि, टाळ, वीणा, ऋष्टि, मुरलि इत्यादि वाद्यांच्या तालसुरावर गंधर्व नानाप्रकारें ताना घेत असतात. राजा, त्या नगरींत अधर्मशील, दुष्ट, भूतद्रोही, कपटी, लोभी व नीच पुरुष प्रवेशही करूं शकत नाहींत. असो. अशा त्या इंद्रपुरीला मोठ्या कडेकोट तयारीनें बलीनें वेढा दिला, त्या समयीं बलीची ती तयारी पाहून इंद्रानें तत्काळ सर्व देवांची सभा भरविली; आणि बृहस्पतीला विनंती केली, "अहो गुरुवर्य! आमचा जुना शत्रु जो बलि, त्यानें मोठी कडेकोट तयारी करून आमच्या नगरीला वेढा दिला आहे, आणि या वेळीं त्याची शक्तिही फार अचाट दिसत आहे. तर असें होण्याचें काय कारण असावें, तें आपण आम्हांस सांगा."

**बृहस्पतींची युक्ति व बलीला इंद्रपदप्राप्ति**

बृहस्पतीनें उत्तर केलें, "इंद्रा! ब्रह्मवादी भृगु ब्राह्मणांनीं त्या बलीला हें सर्व ऐश्वर्य आणि सामर्थ्य मिळवून दिलें आहे; तेव्हां या वेळीं त्याच्यापुढें तुमच्यानें टिकाव धरवणार नाहीं. या करितां, काळावर दृष्टि देऊन तुम्ही हें स्थल सोडून गुप्त व्हा. ह्याचें सामर्थ्य आतांच फार वाढलेलें आहे, आणि ब्राह्मणांच्या प्रसादानें तें दिवसानुदिवस अधिकाधिक वृद्धिंगत होईल. पुढें हा कांहीं काळानें मत्त होईल आणि ब्राह्मणांचा अपमान करील, तेव्हां त्यांच्याच शापानें हा आपल्या ऐश्वर्यापासून भ्रष्ट होईल. तेव्हां तुम्ही आपल्या जागेवर फिरून या." परीक्षित राजा, गुरूनें असें सांगितल्यावर लागलेंच सर्व देवांनीं त्याला वंदन केलें; आणि तत्काल ज्याला जें वाटेल तें रूप घेऊन ते तेथून निघून गेले. नंतर, कोणीही आपल्यास प्रतिकार करणारा राहिला नाहीं, असें पाहून बलीनें आपली गादी तेथें स्थापन केली. ह्या त्रैलोक्याच्या स्वामीवर भृगूंचें फार प्रेम असे, व तोही आपल्या गुरूंच्या आज्ञेंत वागत होता. भृगूंनीं त्या बलि राजाकडून शंभर अश्वमेध करविले. अशा प्रकारें ब्राह्मणांनीं मिळवून दिलेलें ऐश्वर्य तो बलि राजा बहुत काल भोगीत राहिला, व त्या योगें त्यास कृतार्थता वाटली.

# अध्याय सोळावा.

—:०:—

## वामनावतारकथा.

### अदितीच्या मनाचा खेद.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, बलि प्रबळ झाल्यामुळें सर्व देवांना आपापलीं स्थानें सोडून गुप्तरूपानें रहावें लागलें; तेव्हां ती त्यांची हीन स्थिति पाहून, देवांची माता जी अदिति, तिला अत्यंत दुःख झालें. तिचा पति जो भगवान कश्यप, त्यानें पुष्कळ दिवस लाविलेला समाधि उतरून तो घरीं आला, तों अदितीचें मुख म्लान दिसलें; परंतु तशाही स्थितींत त्या महासाध्वीनें पतीचा सत्कार केला. नंतर आसनाधिष्ठित होऊन कश्यपानें तिला प्रश्न केले.

**कश्यपाचे अदितीस प्रश्न.**

कश्यप म्हणाले:—प्रिये सुशीले, तुझ्या चेह-

त्यावर अत्यंत खिन्नता आलेली दिसते, याचें कारण काय बरें असावें ! ब्राह्मणांवर, धर्मावर, किंवा ... जनांवर कांहीं संकट ओढवलें नाहींना? आमच्या गृहस्थाश्रमाला काय तो आधार तुम्हांसारख्या पतिव्रता स्त्रियांचा; म्हणून विचारितों कीं, घरामध्यें धर्म, अर्थ व काम हे पुरुषार्थ साधण्यांत कांहीं न्यून तर झालें नाहींना ? अतिथि आले असतां त्यांचा योग्य सत्कार करीत होतीसना? कारण, ज्या घरांत अतिथींचा सत्कार होत नाहीं, तीं घरें म्हणण्यापेक्षां त्या क्रूर श्वापदांच्या गुहा होत ! हे साध्वी ! मी तपश्चर्येस गेलों असतां कांहीं कारणानें तुझें चित्त उद्विग्न झाल्यामुळे एखादे वेळीं तुजकडून होम करण्याची वेळ चुकली नाहींना ? प्रिये, गृहस्थाश्रमी पुरुषाच्या सर्व इच्छा अग्नीची पूजा केली असतां पूर्ण होतात; कारण, अग्नि आणि ब्राह्मण हीं भगवंताचीं मुखें होत. बरें, तुझीं सर्व मुलें खुशाल आहेतना? हे सुव्रते, तुझ्या उदास वृत्तीकडे पाहून मला फारच वाईट वाटत आहे ! तर असें होण्याचें खरें कारण काय असेल तें त्वरित सांग.

## अदितीचें कश्यपास उत्तर.

अदिति म्हणाली:—हे ब्रह्मन्, ब्राह्मण, गाई व सर्व प्रजाजन कुशल आहेत. व आपल्या पुण्यप्रतापानें मजकडून अतिथींची आणि अग्नीचीही सेवा होण्यांत कधीं किंचित् सुद्धां अंतर पडलें नाहीं. प्रजापते, आपण नित्य मला धर्माचें महत्त्व सांगत असतां, त्या कृत्यांत मी कशी बरें चूक पडूं देईन ! भगवन्, आपली मजवर कृपा असतां मला काय उणें पडणार आहे ? पण, मुनिवर्य, माझ्या मुलांचें सर्व ऐश्वर्य शत्रूंनीं हरण केलें आहे व त्यामुळें मी दुःखसागरांत बुडालें आहे. महाराज, सत्त्व, रज आणि तम अशा त्रिविध गुणांच्या प्रजा आपल्याच मनापासून आणि शरीरापासून उत्पन्न झाल्या आहेत, तेव्हां आपणांस सर्वांशीं सप्रेमभावानें वागलें पाहिजे ही गोष्ट खरी; पण, हे समर्था, परमेश्वर देखील भक्तांचा पक्ष स्वीकारतो, आणि माझे परमेश्वर तर आपणच; तेव्हां मी जर आपली निस्सीम सेवा करितें, तर माझे मनोरथ आपणच पूर्ण केले पाहिजेत. तर, हे साधो असा कांहीं तरी उपाय आपण मला सांगा कीं, जेणेंकरून माझ्या मुलांचें गतवैभव फिरून त्यांना प्राप्त होईल. भक्तांचें कल्याण करण्यांत आपण नेहमीं तत्पर असतां, म्हणून मजवर एवढा अनुग्रह केला पाहिजे.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, अशा प्रकारें अदितीनें प्रार्थना केली असतां प्रजापति कश्यप म्हणाले, "अहो, विष्णूच्या मायेचा केवढा तरी प्रभाव हा ! हें सर्व जग त्याच मायापाशानें बद्ध झालें आहे. पंचमहाभूतांचें कार्य जो हा जड देह, तो कोणीकडे ? आणि प्रकृतीहून पर असा जो आत्मा तो कोणीकडे ? अहो, पतिपुत्र इत्यादि हे कोणाचे कोण ? संसार हा सर्व भ्रम आहे; असो. प्रिये, आपले मनोरथ पूर्ण व्हावे अशी जर तुला इच्छा असेल, तर तूं सर्वांतर्यामी जो परमेश्वर त्याची उपासना कर. तो सर्व जगाचा गुरु आहे. भगवद्भक्ति हा कार्यसिद्धीचा निश्चित उपाय होय." अदिति म्हणाली, "ब्रह्मन्, सत्यसंकल्पाचा दाता जो नारायण, तो ज्या योगानें मला लवकर प्रसन्न होईल, अशा त्याच्या उपासनेचा मार्ग आपण मला सांगा. पुत्रांना झालेल्या दुःखामुळें माझ्या मनास चैन पडत नाहीं."

## कश्यपाची दितीस पयोव्रत करण्याची अनुज्ञा.

कश्यप म्हणाले:—हे सुव्रते, मला जेव्हां पुत्रप्राप्तीची इच्छा झाली होती, तेव्हां मीं ब्रह्मदेवाला असाच प्रश्न विचारला होता. त्या वेळीं त्यानें जें पयोव्रत मला सांगितलें, तेंच मी तुला सांगतों. त्या पयोव्रताचें तूं उत्तम तऱ्हेनें दृढविश्वासपूर्वक पालन कर, म्हणजे तुझे सर्व अर्थ सिद्ध होतील. त्या

## पयोव्रताचा विधि

असा: हें व्रत करण्यास फाल्गुन शुक्ल पक्षीं आरंभ

करावयाचा. त्याकरितां प्रथम अमावास्येच्या दिवशीं रानडुकरानें उकरलेली माती आणावी, आणि ती अंगास लावून उत्तम तीर्थामध्यें स्नान करावें. माती अंगाला लावितांना,

त्वं देव्यादिवराहेण रसायाः स्थानमिच्छता ।
उद्धृताऽसि नमस्तुभ्यं पाप्मानं मे प्रणाशय ॥

हा मंत्र म्हणावा. नंतर नित्यनैमित्तिक कृत्यें आटोपल्यावर प्रतिमा, स्थंडिल, सूर्य, जल, अग्नि किंवा गुरु यांपैकीं कोणावरही, हाच ईश्वर आहे, अशी दृढ भावना धरावी आणि मंत्रांनीं त्याचें आह्वान करावें. प्रिये, ते मंत्र असेः

नमस्तुभ्यं भगवते पुरुषाय महीयसे ।
सर्वभूतनिवासाय वासुदेवाय साक्षिणे ॥
नमो व्यक्ताय सूक्ष्माय प्रधानपुरुषाय च ।
चतुर्विंशद्गुणज्ञाय गुणसंख्यानहेतवे ॥
नमो द्विशीर्ष्णे त्रिपदे चतुःशृंगाय तंतवे ।
सप्तहस्ताय यज्ञाय त्रयीविद्यात्मने नमः ॥
नमः शिवाय रुद्राय नमः शक्तिधराय च ।
सर्वविद्याधिपतये भूतानां पतये नमः ॥
नमो हिरण्यगर्भाय प्राणाय जगदात्मने ।
योगैश्वर्यशरीराय नमस्ते योगहेतवे ॥
नमस्त आदिदेवाय साक्षिभूताय ते नमः ।
नारायणाय ऋषये नराय हरये नमः ॥
नमो मरकतश्यामवपुषेऽधिगतश्रिये ।
केशवाय नमस्तुभ्यं नमस्ते पीतवाससे ॥
त्वं सर्ववरदः पुंसां वरेण्य वरदर्षभ ।
अतस्ते श्रेयसे धीराः पादरेणुमुपासते ॥
अन्ववर्तंत यं देवाः श्रीश्च तत्पादपद्मयोः ।
स्पृहयंत इवामोदं भगवान्मे प्रसीदताम् ॥

[ हे मंत्र असल्यामुळें त्यांचा अर्थ दिला नाहीं. ]

याप्रमाणें भगवंताचें आह्वान केल्यावर भक्तियुक्त अंतःकरणानें पाद्य, आचमन इत्यादि उपचारांनीं त्याची पूजा करावी. मग त्याची गंधपुष्पादिकांनीं पूजा करून त्याला दुग्धस्नान घालावें. वस्त्र, उपवीत व अलंकार दिल्यावर, "ॐ नमो भगवते वासुदेवाय" या द्वादशाक्षरी मंत्रानें पुनः पाद्य, आचमन, गंध, धूप, दीप इत्यादिकांनीं पूजा करावी, व सामर्थ्य असेल तर दुधांत शिजविलेल्या तांदुळांच्या खिरीचा त्यास नैवेद्य समर्पण करून, पूर्वी सांगितलेल्या द्वादशाक्षरी मंत्रानें हवन करावें. नैवेद्य अर्पिल्यावर व हवन झाल्यावर आचमन देऊन पूजा करावी आणि तांबूल द्यावा. नंतर द्वादशाक्षरी मंत्राचा अष्टोत्तरशत जप करावा, व परमेश्वराचें स्तवन करावें. स्तवन झाल्यावर त्याला प्रदक्षिणापूर्वक साष्टांग नमस्कार घालावा, व त्याचा निर्माल्य आपल्या मस्तकीं धारण करून त्या मूर्तीचें विसर्जन करावें. कमींत कमी दोन ब्राह्मणांना तरी खिरीचें भोजन घालावें, व देवास समर्पण केलेला नैवेद्य ब्राह्मणास घालावा; अथवा तो आपण स्वतः भक्षण करावा. ब्राह्मणांची आज्ञा घेऊन इष्टमित्रांसह आपण भोजन करावें. व्रतकर्त्यानें त्या रात्रीं ब्रह्मचर्यव्रतानें रहावें. याप्रमाणें प्रथम अमावास्येच्या दिवशीं करून हाच क्रम पुढें प्रतिपदेपासून बारा दिवसपर्यंत चालू ठेवावा. या दिवसांत दुधावांचून इतर कांहीएक खाऊं नये. नित्य तीन वेळां स्नान करावें; भूमीवर शयन करावें; कोणालाही पीडा देऊं नये; आणि सतत वासुदेवाचें चिंतन करावें. त्रयोदशीच्या दिवशीं विद्वान ब्राह्मणांकडून विधियुक्त पंचामृताचें स्नान ईश्वराला घालावें; व द्रव्यशाठ्य न करितां त्याची षोडशोपचारांनीं पूजा करून त्याला खिरीचा नैवेद्य समर्पण करावा ब्राह्मणांना भोजन, वस्त्रें, अलंकार इत्यादि देऊन व गाईला उत्तम उत्तम चारा घालून संतुष्ट करावें; त्या दिवशीं ब्राह्मणापासून तों चांडालापर्यंत लहानथोर, दीनदुबळे वगैरे सर्वांना सारखें भोजन घालावें. प्रिये, अंधळे, पांगळे इत्या-

दिकांचा संतोष झाला म्हणजे प्रत्यक्ष भगवान विष्णु संतुष्ट होत असतात, हें लक्षांत ठेवावें. याप्रमाणें सर्वांना भोजन वगैरे घातल्यानंतर आपण स्वतः भोजन करावें. नृत्य, वादन, गायन करवावें; मंगलकारक मंत्र म्हणवावे; व भगवत्कथा करवून परमेश्वराची आराधना प्रत्यहीं चालवावी. हे महाभाग्यवती, असें हें पयोव्रत तूं दृढविश्वासपूर्वक केलेंस, म्हणजे तुला ईश्वर प्रसन्न होऊन इच्छित वर देईल. या व्रतास कोणी 'सर्वयज्ञ' व कोणी 'सर्वव्रत' असेंही म्हणतात. या व्रताचें जो कोणी विश्वासपूर्वक आचरण करितो, त्यास ईश्वर प्रसन्न होतो आणि त्याच्या सर्व कामना पूर्ण करितो.

# अध्याय सतरावा.

—:०:—

## वामनावतारकथा.

### अदितीला भगवद्दर्शन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, कश्यपानें अदितीला पयोव्रताचा विधि सांगितला, त्याप्रमाणें तिनें निष्ठापूर्वक त्या व्रताचें अनुष्ठान केलें. राजा, त्या सुव्रतेची निष्ठा पाहून भक्तकामकल्पद्रुम पीतांबरधारी चतुर्भुज परमेश्वर तिजपुढें प्रकट झाले. आपल्या समोर प्रत्यक्ष भगवान उभे आहेत, असें दृष्टीस पडतांच अदिति झटकन् उठून उभी राहिली. राजा, प्रेमामुळें तिचा कंठ भरून आला, आणि त्यामुळें तिच्या नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागले, व तिनें भगवच्चरणीं लोटांगण घातलें. नंतर ती उठून हात जोडून उभी राहिली; पण गहिंवरानें तिच्या तोंडांतून एक शब्दही निघेना; आनंदाश्रूंनीं तिचे नेत्र भरून आले; तिचें सर्वांग रोमांचित झालें; आणि भगवद्दर्शनानें तिचा देह थरथर कांपूं लागला! पुढें कांहीं वेळानें तिनें आपले नेत्र भगवान लक्ष्मीपतीकडे निश्चल लाविले; आणि सद्गदित वाणीनें ती हळू हळू ईश्वराची स्तुति करूं लागली.

### अदितिकृत परमेश्वरस्तुति.

अदिति म्हणाली:—हे यज्ञपते, पुरुषोत्तमा, अच्युता, तूं दीनांचा पालक असून शरणागतांना अभय देणारा आहेस. तुझे गुणानुवाद पुण्यकारक आहेत. तुझ्या नामानें प्राण्यांना सद्गति प्राप्त होते. तूं आमचें रक्षण कर. या विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं तूं आपल्या मायेच्या गुणांनीं करितोस, तरी तूं त्यामध्यें लिप्त होत नाहींस, आणि निर्विकार असा स्वतंत्र राहतोस; तुला माझा नमस्कार असो. देवा! तूं जर प्रसन्न झालास, तर तुजपासून दीर्घ आयुष्य, सुंदर आणि सुदृढ शरीर, विपुल संपत्ति, त्रैलोक्याचें ऐश्वर्य, अणिमादि सर्व सिद्धि, धर्मादि तिन्ही पुरुषार्थ व तत्त्वज्ञान हीं प्राप्त होतात. मग माझी इच्छा पूर्ण होईल यांत नवल तें काय!

### अदितीच्या उदरीं अवतरण्याविषयीं भगवंताचा तिला वर.

परीक्षित राजा, याप्रमाणें अदितीनें स्तुति केली असतां सर्वांतर्यामी भगवान म्हणाला, "हे देवमाते, दुर्मद दैत्यांना समरांगणांत पूर्णपणें जिंकून तुझ्या मुलांचें गतवैभव फिरून प्राप्त व्हावें, ही तुझी इच्छा मी समजलों. परंतु, हे देवी, प्रस्तुत त्या दैत्यांचा पराभव होणें अगदींच अशक्य आहे. कारण, परमसमर्थ ब्राह्मणांनीं त्यांचें रक्षण केलें आहे; तरी ज्या अर्थी तूं व्रताचरणानें माझें मन संतुष्ट केलें आहेस, त्या अर्थी मला कांहीं तरी उपाय योजणें भाग आहे. याकरितां मी तुला असें सांगतों कीं, कश्यपाच्या उग्र तपामुळें उत्पन्न झालेल्या तेजाच्या ठिकाणीं स्थित झालेला मी आपल्या अंशानें तुझें पुत्रत्व स्वीकारून तुझ्या पुत्रांचें रक्षण करीन. हे भद्रे, आतां, आपल्या पतीच्या ठिकाणीं तेजोरूपानें मी स्थित आहें अशी भावना धरून, तूं त्याची

सेवा कर, आणि मी तुला दिलेल्या ह्या वचनाचा कोठेंही परिस्फोट करूं नको."

### अदितीला गर्भसंभव.

परीक्षित राजा, इतकें सांगून भक्तरक्षक परमेश्वर गुप्त झाला. नंतर ती पतिव्रता अदिति आनंदित अंतःकरणानें पतीची सेवा करूं लागली. इकडे, भगवान कश्यपानेंही, आपले ठिकाणीं श्रीहरीचा अंश प्रविष्ट आहे असें जाणिलें. नंतर, ज्याप्रमाणें वायु सर्वत्र सारखा असूनही घर्षणाच्या योगानें काष्ठाच्या ठिकाणीं वनाला जाळणारा अग्नि स्थापन करितो, त्याप्रमाणें सर्व पुत्रांविषयीं सारखी दृष्टि ठेविलेल्या कश्यपानें बहुत काळपर्यंत धारण केलेलें दैत्यनाशक वीर्य अदितीच्या उदरीं स्थापन केलें. राजा, अदितीच्या उदरीं भगवान गर्भरूपानें राहिला आहे हें जाणून ब्रह्मदेवानें

### अदितीच्या गर्भाची स्तुति

केली: ब्रह्मदेव म्हणाला, "हे षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वरा. असंख्य लोक तुझ्या गुणांचें वर्णन करितात, तुझा जयजयकार असो. अनेक लोक तुझ्या पदाची इच्छा धरून तुजकडे येण्याकरितां मार्गक्रमण करीत असतात, तुजप्रत माझा नमस्कार असो. तूं ब्राह्मणांचें हित करणारा असून गुणत्रयाचा नियंता आहेस; व तूं ज्ञानदाता असून आपल्या मायेच्या योगानें अनेक लीला करितोस. हे भगवंता, तुला नमस्कार असो. तूंच पूर्वी पृश्नीच्या[1] उदरीं अवतार घेतला होतास. वेद तुझ्याच योगानें प्रकाशमान झाले आहेत. तुझें नाभिकमळ हेंच त्रैलोक्याचें मूळ उत्पत्तिस्थान होय. तूं तीन्ही लोकांपेक्षां श्रेष्ठ ठिकाणीं वास करितोस. तूं जीवांच्या ठिकाणीं अंतार्यामिरूपानें वास करीत असून सर्व विश्व व्यापून राहतोस. तुला माझा नमस्कार असो. हे ईश्वरा, जगताचा आदि, अंत व मध्य तूंच आहेस, म्हणून तुला अनंत म्हणतात. ज्याप्रमाणें उदकाचा मोठा प्रवाह तृणादि पदार्थ ओढून नेतो, त्याचप्रमाणें, हे भगवंता, प्रलयकाळसमयीं काळप्रवाहाच्या योगानें हें विश्व तूं ओढून नेतोस. देवा, स्थावरजंगमात्मक प्रजा आणि त्यांचे अधिपति ह्यांना तूं आपल्या इच्छेनेंच उत्पन्न करितोस. ईश्वरा, पाण्यांत बुडणाऱ्याला जसा नौकेचा आधार असतो, तसा स्वर्गापासून च्युत झालेल्या आम्हां देवांचा तूंच आधार होस."

[1] अदितीचें पूर्वजन्मींचें नांव.

## अध्याय अठरावा.

—:०:—

### वामनावतार.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, ब्रह्मदेवानें देवकार्याकरितां अवतार घेणाऱ्या त्या ईश्वराचें स्तवन केलें असतां, जन्ममरणशून्य भगवान परमात्मा प्रकट झाला. त्याला चार भुज असून चारी हातांत शंख, चक्र, गदा व पद्म अशीं आयुधें होतीं. त्यानें पीतांबर परिधान केलेला असून त्याचे नेत्र कमळासारखे तेजःपुंज व विशाळ होते. त्या महापुरुषाचा वर्ण काळसांवळा व निर्मळ असून त्याच्या कर्णांतील मकरकुंडलांची प्रभा मुखारविंदावर पडल्यामुळें तें अतिशय खुलत होतें. त्याच्या वक्षस्थळावर श्रीवत्सलांछन असून सर्व देहावर कडीं, बाजुबंद, मेखळा, पैंजण, किरीट वगैरे दिव्य अलंकार शोभत होते. त्याच्या कंठांत वनमाला विराजत असून तिच्या भोंवतीं सुगंधलोलुप भ्रमर गुंजारव करीत घिरट्या घालीत होते; आणि त्याच्या कंठांत कौस्तुभ रत्न विलसत असून त्याच्या प्रभेनें कश्यपगृहांतील सर्व अंधकार नष्ट झाला होता. परीक्षित राजा, भगवंताची मूर्ति प्रकट होतांच चोहोंकडे प्रसन्नता दिसूं लागली; जलाशयांत अपूर्व कांति आली; प्रजांना अत्यंत

आनंद झाला; ऋतूंच्या ठायीं सर्व गुण आले; व स्वर्ग, आकाश, पृथ्वी, देव, गाई, ब्राह्मण, पर्वत वगैरे हर्षित झाले. राजा, तो दिवस भाद्रपद शुक्ल द्वादशीचा असून, त्या दिवशीं चंद्र श्रवण नक्षत्राच्या पहिल्या अंशावर असल्यामुळें अभिजित् मुहूर्त होता. जन्मकालीं सूर्य मध्यान्हीं होता. या दिवशीं ईश्वरानें अवतार घेतला म्हणून या दिवसाला 'विजया द्वादशी' हें नांव मिळालें आहे. हा दिवस सर्वांना आनंदाचा झाला. जिकडे तिकडे मंगलवाद्यें वाजूं लागलीं. अप्सरा नृत्य करूं लागल्या. गंधर्वांनीं गायन आरंभिलें. ऋषिजनांनीं भगवच्चिंतन चालविलें. देव, मनु, पितर, अग्नि, किंपुरुष, किन्नर, सिद्ध, विद्याधर, चारण, यक्ष, राक्षस, गरुड, महान महान सर्प, व देवांचे परिचारक ह्यांनीं आनंदाचा जयघोष करीत आश्रम आच्छादून टाकिला. सर्वांनीं आपापल्या घरापुढें ध्वज उभारिले; दरवाज्यांवर तोरणें लाविलीं; आणि चोहोंकडून पुष्पवृष्टि होऊं लागली. राजा, भगवंताचें चरित्र अद्भुत आहे. त्या अव्यक्त परमेश्वरानें प्रथम जें स्वरूप दाखविलें, तें गुप्त करून नंतर बटुवेष धारण केला. त्या बटु वामनाला पाहून मोठमोठ्या ऋषींना आनंद झाला, आणि त्यांनीं कश्यपाकडून त्याचे जातकर्मादि संस्कार करविले.

### वामनाचें उपनयन.

श्रीशुक पुढें सांगतातः—राजा, पुढें तो थोडा मोठा झाल्यावर त्याचा मौंजीबंधनविधि झाला. त्या वेळीं त्याला गायत्रीमंत्राचा उपदेश स्वतः सूर्यानें केला. बृहस्पतीनें यज्ञोपवीत दिलें. कश्यपानें मेखला ( कटिसूत्र ) दिली. भूमीनें कृष्णाजिन दिलें. ओषधीपति सोम यानें दंड दिला. मातेनें कौपीन ( लंगोटी ) दिली. स्वर्गदेवतेनें छत्र दिलें. वेदपिता जो ब्रह्मदेव, त्यानें कमंडलु दिला. सप्तर्षींनीं दर्भ दिले. सरस्वतीनें अक्षमाला[1] दिली. कुबेरानें भिक्षापात्र दिलें, व जगज्जननी भवानी हिनें भिक्षा घातली. अशा प्रकारें सर्वांनीं सत्कारिलेला तो प्रभु त्या ब्रह्मर्षिसमुदायांत अतिशय शोभूं लागला नंतर त्या वामनानें अग्नीची स्थापना केली, आणि त्याला प्रज्वलित करून त्याची यथाविधि पूजा व त्यांत होम केला.

### वामनाचें बलीच्या यज्ञमंडपीं गमन.

श्रीशुकाचार्य आणखी सांगतातः—परीक्षित राजा, पुढें कांहीं दिवसांनीं वामनाला अशी वार्ता कळली कीं, बलीकडून भृगु ऋषि अश्वमेध यज्ञ करवीत आहेत. म्हणून तो सर्वशक्तिमान परमेश्वर नर्मदेच्या उत्तर तीरावर भृगुकच्छ नामक प्रदेशांत, जेथें बलीचे ऋत्विज यज्ञ चालवीत होते तेथें प्राप्त झाला. राजा, बटुवामनरूपी परमेश्वर यज्ञमंडपापासून दूर अंतरावर आला, तोंच त्याच्यापुढें बलि राजाचें व यज्ञमंडपांतील ऋत्विक्सदस्यादिक सर्वांचें तेज फिकें दिसूं लागलें. यज्ञमंडपाकडे येणाऱ्या त्या देदीप्यमान मूर्तीला पाहून, तो कोण असावा याबद्दल अनेकांनीं अनेक तर्क चालविले. कोणी म्हणे, हा प्रत्यक्ष सूर्यच यज्ञ पहाण्याकरितां येत आहे; कोणी म्हणे, हे सनत्कुमार येत आहेत; कोणी म्हणे, हा अग्निनारायणच येत आहे; असे नानाप्रकारचे तर्क चालले असतां भगवान वामन यज्ञमंडपांत येऊन पोहोंचला. ज्याच्या एका हातांत दंड व कमंडलु असून ज्यानें दुसऱ्या हातांत छत्र धरिलें आहे, व ज्याच्या कमरेला मुंजतृणाची मेखला असून ज्यानें कृष्णाजिन पांघरलें आहे, अशा त्या अत्यंत तेजस्वी ब्रह्मचारी वामनमूर्तीला पाहून सर्वांचीं मनें आणि नेत्र चकित झाले; व यजमानासह यज्ञमंडपांतील सर्व ब्राह्मणांनीं आणि होमकुंडांतील प्रत्यक्ष अग्नींनींही उत्थापन देऊन त्या

### वामनाचा आदरसत्कार व गौरव

केला. नंतर बलीनें त्याला आसन दिलें, आणि

[1] मण्यांची माळ. ही रुद्राक्ष, मणि, पाच, मोत्यें, रत्नें इत्यादिकांची केलेली असते.

अर्घ्यपाद्यादिकांनीं त्याची पूजा केली. राजा, ज्याचें चरणतीर्थ प्रत्यक्ष शंकर देखील आपल्या मस्तकीं धारण करितात, त्या बटुरूपी वामनाचें चरणतीर्थ त्या धर्मज्ञ बळीनें आपल्या मस्तकीं वंदन केलें, आणि म्हटलें, "हे ब्रह्मन्, आपल्या आगमनानें हा यज्ञमंडप पवित्र झाला आहे. आज आमचें हें यज्ञानुष्ठान यथासांग सिद्धीस गेलें. मी आपणांस नमस्कार करितों. हे बटो, आपण मजपाशीं कांहीं तरी मागण्याकरितां आलां आहां, असें मला वाटतें. तर मला आज्ञा करावी, आपली जी इच्छा असेल ती पूर्ण करण्यास मी सिद्ध आहें. आपण साक्षात् ब्रह्मर्षीचें मूर्तिमंत तप आहां. गाई, सुवर्ण, गृह, उत्तम अन्न, विवाहार्थ एखाद्या ब्राह्मणाची कन्या, गांवें, हत्ती, घोडे, रथ अथवा काय पाहिजे असेल तें आपण मागावें."

## अध्याय एकोणिसावा.

—:०:—

### वामनावतारकथा.

#### वामनाकडून बळीची प्रशंसा.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, विरोचनपुत्र बळीचें तें आदरयुक्त व धर्मनिष्ठतेचें भाषण ऐकून भगवान वामनाला संतोष वाटला, आणि त्यानें बळीची प्रशंसा करून म्हटलें, "हे त्रैलोक्यपते, मजविषयीं तूं जो हा आदर व्यक्त केलास, तो तुझ्या कुळाला शोभेसाच आहे. अरे! परलोकप्राप्तीचें साधन जो धर्म, तो संपादन करण्याविषयीं ज्याला शुक्राचार्यांसारखे ब्राह्मण आणि प्रल्हादासारखे महाभगवद्भक्त उपदेश करणारे आहेत, त्याच्या हातून कसें वर्तन होईल हें उघडच आहे." हे परीक्षित राजा, अशा प्रकारें स्वतः बळीची प्रशंसा करून, वामनानें

#### बळीच्या पूर्वजांची प्रशंसा

करण्यास आरंभ केला! वामन म्हणाला, "हे बळे राजा, याचकानें कांहीं मागितलें असतां 'नाहीं' म्हणणारा सत्त्वहीन पुरुष तुझ्या कुळांत निपजलाच नाहीं. मग ती भिक्षा संपत्तीची असो, वा युद्धाची असो. बळि राजा, तुझे पूर्वज महान योद्धे होते, आणि तसेच दानशूरही होते. नक्षत्रांचा अधिपति जो चंद्र, त्याप्रमाणें तुझ्या कुळांत प्रल्हाद हा आपल्या शुद्ध व दिव्य यशानें शोभत आहे. तुझा पणजा जो हिरण्याक्ष, त्याच्या पराक्रमाबद्दल, त्याचा प्रत्यक्ष शत्रु विष्णु यालाही मोठें कौतुक वाटलें! रसातळांतून पृथ्वी वर आणितांना अंगावर धावून आलेल्या हिरण्याक्षाला जरी विष्णूनें मारिलें, तरी त्यानें आपल्याला विजयी मानिलें नाहीं; कारण, हिरण्याक्षाला जिंकण्यास किती कष्ट पडले, तें त्याला पूर्णपणें आठवत होतें. त्याचा बंधु जो हिरण्यकशिपु, तोही तसाच पराक्रमी होता. आपल्या बंधूस विष्णूनें मारिलें ही वार्ता कळतांच हातांत शूळ घेऊन विष्णूला मारण्याकरितां तो विष्णुलोकीं गेला. तो यमस्वरूपी दैत्य आपल्यालाच मारण्याकरितां आला आहे असें पाहून महाविष्णुही घाबरला. आतां आपण कोठेंही गेलों तरी हा दैत्य आपल्या मागून पाठलाग करीत येणारच, तेव्हां कोठें तरी लपून बसलें पाहिजे, असा विचार करून त्यानें तत्काळ सूक्ष्म रूप धारण केलें, व हिरण्यकशिपूच्या श्वासवायूंत शिरून तो त्याच्याच हृदयांत दडून बसला! बळि राजा, विष्णु शत्रूच्याच हृदयांत दडून बसला हें ऐकून तुला आश्चर्य वाटेल; पण तसें वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. कां कीं, देहाभिमानी पुरुषांची दृष्टि नेहमीं बाह्य विषयांवर असते; अंतरंगांत काय आहे इकडे ते मुळीच पहात नाहींत. शिवाय हिरण्यकशिपुही तशाच योग्यतेचा होता; म्हणून त्याच्याच हृदयांत महाविष्णूनें वसतिस्थान केलें! नंतर भगवंतानें कल्पना केल्याप्रमाणें तो हिरण्यकशिपु वर वर पाहूं लागला, तों त्याला त्याचा बंधु मारणारा विष्णु

कोठें दिसेना. यामुळें त्यानें संतापून मोठी गर्जना केली आणि लागलाच तो तेथून निघाला. बलि राजा, आपल्याजवळ वस्तु असून तो हिरण्यकशिपु तिकडे न पाहतां पृथ्वी, स्वर्ग, आकाश, पाताळ, समुद्र, दिशा इत्यादि ठिकाणीं त्यास पाहूं लागला. इतका शोध करूनही जेव्हां त्यास त्याचा शोध लागेना, तेव्हां तो स्तब्ध राहिला, व आपल्याशींच म्हणतो, "अरे, मीं सर्व त्रिभुवन शोधिलें, तरी हा विष्णु कोठें सांपडत नाहीं; तर जेथें गेलेला पुरुष फिरून परत येत नाहीं. तेथें (ब्रह्मस्वरूपीं) तो गेला खास!" तेव्हां आतां त्याच्याशीं वैर करणें व्यर्थ होय." बलि राजा, आतां तुला शंका येईल कीं, त्या वीराशिरोमणीनें, भगवान वैकुंठाधिपति विष्णूशीं वैर केलें तें त्याच्या मृत्यूपर्यंतच कां? तर ह्याचें उत्तर असें कीं, देहाभिमानी पुरुषांचा वैरसंबंध मृत्यूपर्यंतच चालावयाचा. कारण, वैर हें क्रोधापासून आणि क्रोध हा अज्ञानजन्य अहंकारापासून वाढलेला असल्यामुळें तो मरणापर्यंतच राहतो. दैत्यराजा, ही तुझ्या पूर्वजांची हकीकत झाली. आतां, तुझा पिता जो विरोचन, त्या

## विरोचनाच्या दानशूरत्वाची एक गोष्ट

तुला सांगतों, ती ऐक. एके वेळीं देवांनीं ब्राह्मणांचीं रूपें घेऊन त्याजपाशीं त्याच्या आयुष्याची याचना केली. तेव्हां, हे आपले शत्रु आहेत, असें त्याला कळलें असूनही त्यानें आपलें आयुष्य त्यांना दिलें!

## त्रिपादभूमियाचना.

वामन पुढें म्हणतो:—हे बलि राजा, तूंही आपल्या पूर्वजांप्रमाणेंच पराक्रमी आणि दानशूर आहेस. माझें तुझ्याजवळ इतकेंच मागणें आहे कीं, माझ्या पायाच्या तीन पावलांनीं व्यापेल इतकी भूमि तूं मला दे. यापेक्षांही ज्यास्त देण्यास तूं समर्थ आहेस खरा; पण कार्यापेक्षां ज्यास्त घेणें शहाणपणाचें लक्षण नव्हे; त्यापासून पाप घडतें. याकरितां मला तूं एवढेंच दे म्हणजे झालें!

बलि म्हणाला:—हे बटो! तूं केलेलें भाषण वृद्ध वृद्ध जनांनाही मान्य होईल असें आहे. पण तूं बाळ आहेस, म्हणून स्वार्थाचें साधन कसें करावें याचें तुला अद्याप ज्ञान प्राप्त झालें नाहीं. याकरितां मी तुला सांगतों कीं, मी त्रैलोक्याचा राजा आहें आणि तुझ्या भाषणानें संतुष्ट झालों आहें. या वेळीं तूं मागशील तें देण्यास मी समर्थ असतां, फक्त तीन पावलें भूमि तूं मजजवळ मागतोस, तेव्हां तुला काय म्हणावें! अरे, मजसारखा पुरुष प्रसन्न झाला असतां फिरून याचना करण्याचें कारणच राहूं नये, असें याचकानें मागून घ्यावें.

भगवान म्हणाले:—बलि राजा, जो इंद्रियाधीन आहे, त्याला त्रैलोक्यांत जितके म्हणून अत्यंत प्रिय विषय आहेत तितके सर्व दिले तरी संतोष व्हावयाचा नाहीं. वैन्य, गय इत्यादि राजे सप्तद्वीपांचे अधिपति होते, पण ते तितक्यानें सुद्धां तृप्त झाले नाहींत, असें मी ऐकतों. याकरितां, राजा, मीं तुजजवळ मागितलें, तितकेंच मला पुरे. दैवयोगानें मिळेल त्यांत जो पुरुष संतोष मानतो, तोच सुखी होय. तीन पावलांनीं ज्याला समाधान झालें नाहीं, त्याला नऊ खंडांनीं युक्त असें सकल जंबुद्वीप मिळालें तरीही समाधान वाटणार नाहीं. कारण, जंबुद्वीप प्राप्त झाल्यावर आणखी राहिलेलीं द्वीपेंही मिळावीं, अशी त्यास इच्छा होईल. राजा, अर्थ व काम ह्याविषयीं असंतोष हें संसारपरिभ्रमणाचें मुख्य कारण आहे. सहज प्राप्त झालेल्या वस्तूनें तृप्ति मानिली असतां ब्राह्मणाचें तेज वाढतें; व तिच्यापासून तृप्ति मानिली नाहीं तर सर्व तेज नष्ट होऊन, उदकानें भिजलेल्या अग्नीप्रमाणें ब्राह्मणाच्या तेजाची अवस्था होते!

श्रीशुक म्हणतात:—राजा परीक्षिता, कितीही प्रकारें सांगितलें तरी ब्राह्मण-बटु जास्त इच्छा करीत नाहीं, असें पाहून बलि राजा हसला आणि "हे बटो, तुझी इच्छा असेल तितकेंच घे." असें म्हणून त्रिपादपृथ्वीदानाचें उदक वामनाच्या हातावर घालण्याकरितां त्यानें पात्र हातीं घेतलें. राजा, दैत्यगुरु शुक्राचार्य महाज्ञानी होते. त्यांनीं हें विष्णूचें सर्व कृत्य ओळखिलें आणि बलि राजास उपदेश करण्यास आरंभ केला.

**शुक्राचार्यांची वकिली व बलीचा निषेध.**

शुक्राचार्य म्हणाले:—हे विरोचनपुत्रा, पुढें काय अनर्थ ओढवणार आहे, याचा विचार न करितां तूं ह्याला जें दान देण्याचें कबूल केलेंस, तें मला प्रशस्त दिसत नाहीं. अरे, हा जो तुला ब्राह्मण-बटु दिसत आहे, तो प्रत्यक्ष भगवान विष्णु असून, देवांचें कार्य साधण्याकरितां अदितीच्या उदरीं वामनरूपानें अवतीर्ण झाला आहे. हा ब्रह्मचारी बाळ तुझें स्थान, ऐश्वर्य, लक्ष्मी, तेज, विख्यात यश वगैरे सर्व हरण करून तें इंद्राला देईल. बाबा, सर्व जग हें याचें शरीर होय. हा आपल्या तीन पावलांनीं त्रैलोक्याचें आक्रमण करील. मग तूं राहशील कोठें ? तूं वचन पाळण्याचें मनांत आणशील, तर तेंही पूर्ण होणें कठिण दिसतें. कारण, हा आपल्या एका पायानें पृथ्वी आक्रमण करणार, दुसऱ्यानें स्वर्ग घेणार, आणि शरिरानें आकाश व्यापणार; मग तिसऱ्या पावलाची वाट काय ? मला वाटतें, वचनाप्रमाणें दान देतां न येऊन तुला आतां नरकवास भोगावा लागणार ! तूं जी तीन पावलें भूमि देण्याचें कबूल केलें आहेस, ती देण्याची तुझी कांहीं शक्ति नाहीं. मूर्खा ! जें दिलें असतां स्वतांच्या निर्वाहास सुद्धां साधन राहत नाहीं, अशा देण्यास कोणी तरी चांगलें म्हणेल काय ? जो पुरुष धर्म, अर्थ, काम, कीर्ति आणि कुटुंब या पांचांच्या ठिकाणीं आपली संपत्ति वांटून देतो, त्याला इहपरलोकीं सुख प्राप्त होतें. राजा, एकदां 'देतों' म्हणून कबूल केलें असतां, आतां फिरून 'नाहीं' असें कसें म्हणूं म्हणून म्हणशील, तर त्याविषयीं श्रुतीमध्यें एक वचन आहे, तें तुला सांगतों, ऐक. 'ॐ' असें म्हणून ज्याचा अंगीकार केला असेल, तें सत्य; व 'नाहीं' असें म्हणून नाकारिलें असेल तें असत्य होय. आतां सत्य जें आहे, त्यांत यत्किंचित् तरी असत्याचा अंश असल्यावांचून तें फलद्रूप होत नाहीं; कसें तें पहा: देहरूप वृक्षाचें सत्य हें पुष्प व फल असून अनत हें या वृक्षाचें मूळ होय, असें श्रुतीनें सांगितलें आहे. तेव्हां सत्यरूप फळ प्राप्त व्हावें अशी ज्यास इच्छा असेल, त्यानें त्या वृक्षाच्या मुळाचें रक्षण केलें पाहिजे. त्या मुळाचें रक्षण झालें, तरच वृक्ष जिवंत राहील, व त्याला सत्यरूप फळ येईल; पण मूळच जर उपटून टाकिलें, तर वृक्ष सुकून जाईल ! मग त्याला फळ कसें येणार? यासाठीं, देहाचें रक्षण होण्याकरितां अनृताचें रक्षण केलें पाहिजे. राजा, सत्यामध्येंही कांहीं दोष आहेत, आणि असत्यांतही कांहीं गुण आहेत. पहा: ॐ म्हणजे होय अथवा 'देतों.' देतों हा शब्द उच्चारिला, कीं तो उच्चारणाऱ्यापासून द्रव्य हरण करून नेतो, व जो याचकाला 'सर्व देतों' म्हणून म्हणतो, त्याला स्वतांला उभें राहण्यास देखील जागा राहत नाहीं, इतका या शब्दांत दोष आहे. आतां 'नाहीं' म्हणण्यांत किती गुण आहे तो पहा: जो नित्य 'माझ्याजवळ नाहीं' असें म्हणतो, त्याच्याजवळचें द्रव्य जात नाहीं; आणि या 'नाहीं ! नाहीं !' म्हणण्यामुळें लोकांना त्याची दया येऊन लोक त्याला द्रव्य देतात ! यावरून, नेहमीं अनृत बोलावें असा माझ्या म्हणण्याचा अर्थ नाहीं. सर्वदा जो 'नाहीं' म्हणून अनृत बोलतो, त्याची अप

कीर्ति होते; आणि अपकीर्ति होऊन जिवंत राहण्यापेक्षां मेलेलें सुद्धां फार चांगलें; पण प्रसंग पडल्यास देहसंरक्षणाकरितां अनृत बोललें असतां पाप लागत नाहीं, इतकाच माझ्या सांगण्याचा आशय आहे. स्त्रियांकडून एखादें कार्य करून घ्यावयाचें असल्यास त्या वेळीं, किंवा विनोदांत, किंवा उपजीविकेकरितां, किंवा प्राणावर संकट गुदरलें असतां, किंवा गाई, ब्राह्मण अथवा कोणीही प्राणी यांचा जीव वांचत असेल तर त्या समयीं असत्याचा उपयोग केला असतां दोष लागत नाहीं!

## अध्याय विसावा.

—:o:—

### वामनावतारकथा.

#### बलीचें शुक्राचार्यांस उत्तर.

श्रीशुकाचार्य म्हणतात:—परीक्षित राजा, कुलगुरु शुक्राचार्य यांनीं 'दान देऊं नको' म्हणून सांगितल्यावर बलि राजा थोडा वेळ स्तब्ध राहिला आणि नीट विचार करून त्यांना म्हणाला, "गुरुवर्य, ज्याच्या योगानें अर्थ, काम, कीर्ति व वृत्ति हीं साध्य करून घेण्यांत व्यत्यय येणार नाहीं तो धर्म होय, असें जें आपण मला सांगितलें, तें अक्षरशः खरें आहे. पण एकवार 'देतों' म्हणून वचन दिल्यावर फिरून उलटणें हें माझ्या कुलाला लांच्छनास्पद होय. माझा जन्म प्रल्हादाच्या कुलांत झाला आहे, ही गोष्ट मी विसरतां कामा नये. पृथ्वीनें सुद्धां म्हटलें आहे कीं, मी सर्वांचे भार सहन करीन, पण असत्यपटु मनुष्याचा भार मला सोसत नाहीं. कारण, असत्यापेक्षां दुर्धर असा कोणताच अधर्म नाहीं. मी तर ब्राह्मणाला फसविण्यापेक्षां नरकाचें, दारिद्र्याचें, पदच्युतीचें, इतकेंच नव्हे, पण मृत्यूचें देखील भय कमी मानितों. द्रव्यादिक ज्या वस्तु आहेत, त्या फार झालें तर मनुष्याच्या मृत्यूपर्यंत त्याजजवळ राहणार; मेल्यावर त्या थोड्याच बरोबर येणार आहेत! मग त्या आपण असतांनाच देऊन टाकिल्या तर त्यांत वाईट तें काय? आतां, निर्वाहाकरितां थोडें राखावें म्हटलें, तर तशानें ब्राह्मणाचा संतोष होत नाहीं; आणि ज्या दानानें याचक संतुष्ट होत नाहीं, तें दान केवळ निरर्थक होय. दधीचि, शिबि यांच्यासारखे सत्पुरुष याचकांची इच्छा पूर्ण करण्याकरितां जर आपले प्राण देखील देतात, तर मग पृथिव्यादिकांची प्रतिष्ठा ती काय? मुनिवर्य, युद्धांत किंवा दान देण्यांत ज्या ज्या दैत्यवीरांनीं आजपर्यंत कीर्ति संपादन केली आहे, ती त्यांची कीर्तिच काय ती मागें राहिली आहे; त्यांनीं मिळविलेले इहपरलोक आणि भोग हे केव्हांच त्यांच्यापासून कालानें हिरावून घेतले. मला तर असें वाटतें कीं, युद्धामध्यें माघार न खातां प्राण देणारे पुष्कळ वीर आढळतील; पण सत्पात्र चालून आलें असतां त्याच्या इच्छेस येईल तें दान देणारा पुरुष क्वचितच आढळेल. आतां सर्वस्व दिलें असतां दारिद्र्य येईल इतकेंच आपलें म्हणणें असेल, तर त्यावर माझें असें उत्तर आहे कीं, जे उदार व दयावंत पुरुष आहेत, ते, सामान्य याचकांचे मनोरथ पुरविल्यानें सुद्धां दैन्य आलें तरी सुख मानितात; मग आपल्यासारख्या ब्रह्मज्ञानी पुरुषांच्या इच्छा पूर्ण करण्यांत तें दारिद्र्य जर मला प्राप्त झालें, तर काय वाईट? तें तर उत्तमच होय! म्हणून, गुरुवर्य, मी या बटूचे मनोरथ पूर्ण करणार. आतां आपण कदाचित असें म्हणाल कीं, हा बटु नसून विष्णु आहे, तर मग दान करण्याचा माझा संकल्प जास्तच दृढ झाला. कारण, अहो आचार्य, ज्याच्या प्राप्तीकरितां आपणांसारखे मोठमोठे विद्वान पुरुष पशुवधरहित आणि पशुवधयुक्त यज्ञ करितात, तोच विष्णु जर आपण होऊन मजकडे याचक म्हणून आला आहे, तर आणखी तें काय पाहिजे?

मी तर याला दान देणारच. मग तो मला वर देवो अथवा माझा शत्रु होवो! मीं अपराध केला नसतां जर हा अधर्मानें मला बांधणार असेल, तर बांधीना! ज्या अर्थी मला भिऊन यानें ब्राह्मणाचें रूप धारण केलें आहे, त्या अर्थी मी याला मुळींच मारणार नाहीं. आतां, त्यालाच आपली कीर्ति घालवूं नये असें वाटेल, तर तो मजशीं युद्ध करून मला मारून पृथ्वी हरण करून घेईल, किंवा आपण युद्धांत मरून पडेल!"

श्रीशुकाचार्य म्हणाले:–राजा परीक्षिता, अशा प्रकारें पांडित्य करून आपली आज्ञा बळीनें मोडण्याचा निश्चय केला असें पाहून शुक्राचार्यांना राग आला, आणि त्यांनीं

बलीला शाप

दिला कीं, "मूर्खा, ज्या अर्थी तूं स्वतांच आपल्याला शहाणा समजतोस, आणि माझ्या आज्ञेचा उपमर्द करतोस, त्या अर्थी तूं लवकरच ऐश्वर्यभ्रष्ट होशील!"

## वामनाला त्रिपादभूमिदान.

श्रीशुक पुढें सांगतातः—परीक्षित राजा, गुरूंनीं असा शाप दिला, तरी तो महात्मा सत्यापासून यत्किंचित् ढळला नाहीं. त्याची पत्नी विंध्यावळी ही उदकानें भरलेला सुवर्णकलश घेऊन तेथें प्राप्त झाली, व तिनें आणिलेल्या उदकानें बलि राजानें वामनाचे पाय धुतले, आणि जगाला पावन करणारें तें भगवंताचें चरणतीर्थ आपल्या मस्तकीं धारण केलें. नंतर त्यानें त्याची अर्घ्यपाद्यादिकांनीं पूजा केली आणि त्रिपादभूमिदानाचें उदक त्याच्या हातावर सोडिलें. राजा, भगवंताच्या हातावर त्रिपादभूमीचें उदक पडल्यावरोबर देव, गंधर्व, विद्याधर, सिद्ध, चारण इत्यादिकांना मोठा आनंद झाला; सहस्रावधि दुंदुभि वाजूं लागल्या; गंधर्व, किन्नर व किंपुरुष यांनीं गायनास आरंभ केला; बलीच्या त्या निष्कपट कृतीची सर्वांनीं वाहवा केली; आणि त्याजवर सर्वांनीं विपुल पुष्पें उधळिलीं! राजा, जाणून बुजून ज्यानें आपलें सर्वस्व शत्रूला अर्पण केलें, त्याची थोरवी आणि औदार्य काय वर्णन करावें? असो.

## वामनाच्या विश्वरूपानें त्रिभुवनव्याप्ति.

परीक्षित राजा, पुढें त्या अनंतशक्ति परमेश्वराचें तें बटुरूप वाढत चाललें; आणि वाढतां वाढतां तें इतकें वाढलें कीं, भूमि, आकाश, दिशा, स्वर्ग, पाताळ, समुद्र, तिर्यग्योनि, मनुष्य, देव, ऋषि इत्यादि सर्व त्यामध्यें सामावलीं! ऋत्विज, आचार्य आणि सदस्य यांसुद्धां सर्व त्रैलोक्य त्या अतुलैश्वर्यसंपन्न प्रभूच्या रूपांत बलीला दिसूं लागलें. पायांवर पृथ्वी दिसली; पोटऱ्यांवर पर्वतशिखरें दिसलीं; गुडघ्यांवर पक्षिगण दिसले; मांड्यांवर वायुसमूह दिसला; वस्त्राच्या ठिकाणीं संध्या दिसली; कटिपुरोभागीं स्वतांसुद्धां सर्व असुर दिसले; गुह्यस्थानीं मरीचिप्रभृति प्रजापति दिसले; नाभीचे ठिकाणीं अंतरिक्ष दिसलें; उदराचे ठिकाणीं सप्तसमुद्र दिसले; उरस्थलीं नक्षत्रें दिसलीं; हृदयाच्या ठिकाणीं धर्म दिसला; स्तनांच्या ठिकाणीं ऋत व सत्य हीं दिसलीं; मनामध्यें चंद्र दिसला; वक्षस्थलाच्या ठिकाणीं हातामध्यें कमळ धारण केलेली लक्ष्मी दिसली; कंठामध्यें सामवेद दिसला; भुजांमध्यें इंद्रादिक देव दिसले; कर्णांच्या ठिकाणीं दिशा दिसल्या; मस्तकीं स्वर्ग दिसला; केंसांच्या ठिकाणीं मेघ दिसले; नासिकेच्या ठिकाणीं प्राणवायु दिसला; नेत्रांच्या ठिकाणीं सूर्य दिसला; मुखाच्या ठिकाणीं अग्नि; वाणीच्या ठिकाणीं चार वेद; जिव्हास्थानीं वरुण; भुंवयांच्या ठिकाणीं विधि व निषेध; पापण्यांच्या ठिकाणीं दिवस व रात्र; ललाटस्थानीं क्रोध; अधरोष्ठाच्या ठिकाणीं लोभ; त्वचेच्या ठिकाणीं काम; रेतस्थानीं जल; पृष्ठभागीं अधर्म; पाऊल टाकण्यांत यज्ञ; आणि छायेमध्यें मृत्यु दिसला. राजा, भगवंताच्या त्या विराट्स्वरूपाच्या हास्याच्या ठिकाणीं बलि राजाला

माया दिसली; अंगावरील रोमांच्या ठिकाणीं ओषधींच्या सर्व जाति दिसल्या; तसेंच, सर्व नद्या ह्या त्या विराटपुरुषाच्या नाड्यांच्या ठिकाणीं; पाषाण नखांच्या ठिकाणीं; व सर्व जगाचा जनिता जो ब्रह्मदेव, तो बुद्धीच्या ठिकाणीं दिसला; आणि देवगण व ऋषि इंद्रियांच्या ठिकाणीं दिसले!

राजा परीक्षिता, ह्याप्रमाणें सर्व भूतांसह हें स्थावरजंगमात्मक विश्व भगवंताच्या देहामध्यें आहे असें पाहून सर्व दैत्य भयभीत होऊन मूर्छित झाले; असो. ज्याच्यासमीप शंख, चक्र, गदा, असि, दोन अक्षय्य बाणभाते व शार्ङ्ग धनुष्य हीं आयुधें आहेत, ज्याच्या कंठांत वनमाला शोभत आहेत, ज्याच्या मस्तकावर दिव्य किरीट विलसत आहे, ज्याच्या देहावर मकरकुंडलें, बाजुबंद, श्रीवत्सलांच्छन, कौस्तुभमणि, उत्तम मेखळा व पीतवसन हीं झळाळत आहेत, आणि लोकपालांसह सुनंदप्रभृति पार्षद्गण ज्याच्या सेवेसाठीं तत्पर आहेत, त्या विराट्स्वरूपी भगवान त्रिविक्रमानें आपल्या एका पायानें बळीची सर्व भूमि आक्रमण केली; त्यानें आपल्या शरीरानें सर्व आकाश व्यापून टाकिलें; बाहूंनीं दशदिशा वेढिल्या; आणि दुसऱ्या पावलानें स्वर्ग घेतला. राजा, आतां बळीनें कबूल केलेल्या तिसऱ्या पावलाला त्याजवळ कांहींच शिल्लक राहिलें नाहीं. कारण, भगवंताच्या पावलानें महर्लोकादि वरचे सर्व लोक व्यापून, तें सत्यलोकीं जाऊन पोहोंचलें!

## अध्याय एकविसावा.

—:०:—

### वामनावतारकथा.

#### सत्यलोकीं भगवच्चरणपूजा.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, भगवंताचें चरणकमल सत्यलोकीं जाऊन पोहोंचलें असतां त्याच्या तेजापुढें सत्यलोकांतला प्रकाश फिका पडला! नंतर ब्रह्मदेव, मरीचिप्रभृति ऋषि, नारदादि नैष्ठिक ब्रह्मचारी, सनंदनप्रभृति योगी, वेद, उपवेद, वेदांगें, यमनियमादि नियम, तर्कशास्त्र, इतिहास, पुराणें, पंचरात्रादि संहिता व सर्वसंगपरित्यागी पुरुष हे सर्व त्या चरणाजवळ आले; आणि ज्याच्या स्मरणामुळेंच कर्मांनीं अप्राप्य अशा ब्रह्मलोकाला ते गेले होते, तें चरणकमळ प्रत्यक्ष आपल्याजवळ आलें आहे असें पाहून, त्यांनीं त्याला परमादरानें वंदन केलें. ज्याच्या नाभिकमलापासून आपण उत्पन्न झालों, त्याच्या चरणाचें दर्शन झाल्याबरोबर ब्रह्मदेवानें त्याचें अर्घ्यपाद्यादिकांनीं पूजन करून भक्तिपूर्वक त्याचें स्तवन केलें. राजा, ब्रह्मदेवाच्या कमंडलूंतील उदक भगवंताच्या पादस्पर्शानें पवित्र झाल्यामुळें तें गंगारूप झालें, आणि आकाशांतून पडत पडत तें भूलोकीं आलें. तीच गंगा हल्लीं सर्व जगाला पवित्र करीत आहे. पुढें भगवंतानें आपलें विराट्स्वरूप आवरून वामनरूप धरिलें, तेव्हां ब्रह्मादि लोकपालांनीं अत्यंत आदरपूर्वक त्याची पूजा केली. त्यांनीं पूजेला उपयुक्त असें निर्मळ जळ, दिव्य माळा, उत्तम उत्तम सुगंधि द्रव्यें, धूप, दीप, लाह्या, अक्षता, फळें, अंकुर वगैरे पदार्थ परमेश्वराला अर्पण केले; त्यांनीं भगवंताचीं लोकोत्तर चरित्रें प्रेमपूर्वक गाइलीं; आणि नानाप्रकारें त्याचा स्तव केला. त्याप्रमाणेंच त्यांनीं अत्यंत जयघोष करून नृत्य, गायन, वादन, शंख, दुंदुभि इत्यादिकांच्या योगें त्रिविक्रमाची सेवा केली; व ऋक्षाधिपति जो जांबवान् त्यानें दशदिशांच्या ठिकाणीं दुंदुभि वाजवीत भगवंताच्या कीर्तीचा जयघोष केला.

#### दैत्यांचा वामनावर रोष.

परीक्षित राजा, इकडे हा असा प्रकार चालला असतां, तिकडे बलि राजानें आरंभिलेल्या यज्ञाच्या मंडपांत काय प्रकार झाला तो तुला सांगतों. आपला स्वामी यज्ञदीक्षा घेऊन बसला असतां

वामनानें तीन पावलांची भिक्षा मागून त्रैलोक्य हरण केलें, असें पाहून दैत्यवीरांना संताप आला आणि त्यांनीं त्याला दुर्भाषणें करण्यास सुरुवात केली; नंतर आपसांत विचार करून त्याला मारण्याकरितां शस्त्रें उचलिलीं; व बलीची इच्छा नसतांही ते वामनाच्या अंगावर धावून आले. दैत्य वामनाच्या अंगावर धावून येत आहेत असें पाहून, विष्णूच्या पार्षदगणांनीं हसून आपलीं आयुधें उचलिलीं आणि त्यांचें निवारण केलें. राजा, विष्णुगणापैकीं प्रत्येकाच्या अंगीं दहा दहा हजार हत्तींचें बळ होतें; वास्तव नंद, सुनंद, जय, विजय, प्रबळ, बळ, कुमुद, कुमुदाक्ष, विश्वक्सेन, पक्षिराज, जयंत, श्रुतदेव, पुष्पदंत व सात्वत ह्या महान महान विष्णुगणांनीं त्या दैत्यांचा तेव्हांच विध्वंस उडविला!

### बलीचा दैत्यांस उपदेश.

परीक्षित राजा, हा प्रकार पाहून दैत्यराज बलीनें आपल्या सैनिकांस आवरून म्हटलें, "हे विप्रचित्ते! हे राहो! हे नेमे! हल्लीं आपणाला काळ प्रतिकूल आहे, याकरितां तुम्ही युद्ध करूं नका. दैत्यांनो! सर्व प्राण्यांस सुखदुःख मिळवून देणारा जो काल, त्याच्या विरुद्ध वागण्यांत काय अर्थ! आपल्या उत्कर्षाला आणि देवांच्या अपकर्षाला जो कारणीभूत झाला, तोच भगवान काळ आतां फिरला आहे. त्याचें अतिक्रमण बळानें, बुद्धीनें, मंत्रानें किंवा कोणत्याही उपायानें होणें शक्य नाहीं. ज्या वेळीं तुम्हांस तुमचें दैव अनुकूळ होतें, त्या वेळीं जे देव तुम्हांस पाहतांच दडले, तेच आतां तुम्हांस मारीत आहेत; याकरितां आतां त्यांना जिंकण्याची आशा सोडून तुम्ही काळाची वाट पहात स्वस्थ बसा!"

### बलीला वरुणपाशबंधन.

श्रीशुकाचार्य म्हणाले:--परीक्षित राजा, विष्णु पार्षदांनीं आपल्या शस्त्रप्रहारांनीं जर्जर केलेल्या त्या दैत्यांच्या आणि दानवांच्या सेनापतींनीं बलि राजाचें तें सयुक्तिक भाषण ऐकून युद्ध करण्याचें सोडून दिलें, आणि ते रसातळीं गेले. पुढें कश्यपपुत्र गरुडानें भगवंताची इच्छा जाणून त्या बलि राजाला वरुणपाशानें बद्ध केलें. राजा परीक्षिता, असें करण्यांत परमेश्वराचा हेतु इतकाच होता कीं, त्याचें सर्वस्व हरण केलेंच, आतां फक्त त्याचें शरीर घेऊन त्याचा 'मी' पणा काढून टाकावा आणि त्याच्यावर मोठा अनुग्रह करावा. पण हें करण्यापूर्वीं, त्याचें वचन पाळण्याविषयींचें धैर्य जगांत प्रसिद्ध व्हावें, याकरितां त्याला थोडा वेळ अधोगतीस पाठवावयाचें होतें; असो. हा बलीला बांधण्याचा प्रकार, ज्या दिवशीं यज्ञामध्यें सोमरस काढितात त्या दिवशीं झाला. त्या त्रैलोक्यपति बलि राजाला बांधीत असतां स्वर्गांत आणि भूमीवर हाहाकार झाला! राजा, अशा स्थितींतही तो धैर्यशाली बलि अगदीं शांत होता, यामुळें त्याची कीर्ति सर्वत्र पसरली; असो.

पुढें भगवान वामन त्याला म्हणाला, "हे असुरा, तूं मला तीन पावलें भूमि देण्याचें कबूल केलेंस; पण हें सर्व विश्व माझ्या दोन पावलांतच राहिलें. आतां तिसरें पाऊल देण्यास तुजजवळ कांहीं उरलें नाहीं. याकरितां, कबूल करून दान न देणाऱ्या तुला आतां नरकवास भोगणें भाग आहे; आणि तुझ्या गुरूचीही याचप्रमाणें आज्ञा आहे. यास्तव, ज्या अर्थीं 'मी त्रैलोक्याचा अधिपति आहें' असा अभिमान धरणारा तूं मला 'देतों' असें म्हणून फसविलेंस, त्या अर्थीं तुला असत्यफलरूप नरकाचा कांहीं वर्षें उपभोग घेतला पाहिजे!"

## अध्याय बाविसावा.

—:०:—

### वामनावतारकथा.

**बलीचें भाषण व तिसऱ्या पावलाच्या पूर्ततेकरितां वामनास स्वमस्तकाचें अर्पण.**

श्रीशुकाचार्य म्हणाले:--परीक्षित राजा, बलीनें



वामन अवतार

सत्यापासून ढळावें म्हणून भगवंतानें त्याला इतकें छळिलें, तरी तो आपासून किंचितही ढळला नाहीं. त्यानें मोठ्या गंभीर वाणीनें वामनाला उत्तर दिलें, "हे उत्तमकीर्ते सुरश्रेष्ठा, तूं कपटानें प्रथम वामनरूप घेऊन भिक्षा मागितलीस, व आतां मोठें रूप घेतलेंस, तेव्हां अर्थात् माझें वचन खोटें पडत नाहीं; तरी पण तुला तें खोटें वाटत असेल, तर ज्या रीतीनें मी वागलों असतां तुझ्या मनानें तें खरें ठरेल, त्या रीतीनें वागण्यास मी तयार आहें. याकरितां, आतां तुला तिसरें पाऊल ठेवण्यास मी आपलें मस्तक देतों, त्यावर तूं तें स्थापन कर, देवा! लोकांत अपकीर्ति होईल ह्याबद्दल मी जितका भितों, तितका इतर कोणत्याही गोष्टीस भीत नाहीं. परमपूज्य लोकांनीं केलेला दंड स्तुत्य आहे असें मी मानितों. कारण आई, बाप, भाऊ व मित्र हे मायेमुळें शिक्षा करीत नाहींत. ईश्वरा, तूं उघडपणें आमच्याशीं शत्रुरूपानें वागतोस, पण तूं आंतून आम्हां दैत्यांचा खरा हितकर्ता असा श्रेष्ठ गुरु आहेस! अनेक प्रकारच्या मदांनीं आम्ही अंध झालों होतों, म्हणून आमच्या डोळ्यांत ऐश्वर्यभ्रष्टतेचें अंजन घालून तूं आम्हांस दिव्यदृष्टि दिलीस. आजपर्यंत अनेक दैत्य, तुझी विरोधभक्ति केल्यामुळें, ज्या गतीला तुझे निःसीम भक्त पावतात त्या गतीला पोहोंचले आहेत; म्हणून तूं मला धरून वरुणपाशांनीं बांधिलें आहेस तरी त्याबद्दल मला लाज वाटत नाहीं आणि दुःखही होत नाहीं. देवा! तूं जो मजवर एवढा अनुग्रह करात आहेस, त्याचें कारण--तुझा परम भक्त जो प्रऱ्हाद, त्याच्या वंशांतला मी आहें, हेंच असावेंसें मला वाटतें. वास्तविक पाहिलें तर तुझी कृपा व्हावी इतकी माझी योग्यता नाहीं. भगवंता, माझा आजा जो प्रऱ्हाद, तो महाज्ञानी होता. शरीर, पुत्र, स्त्री, बंधु, ऐश्वर्य, संपत्ति ह्यांच्या सहवासानें आयुष्य मात्र क्षीण होतें, म्हणून तो त्यावर कधींच आसक्ति ठेवीत नसे; आणि जरी तूं दैत्यांचा संहार करीत होतास, तरी तो अत्यंत निर्भय अशा तुझ्याच चरणांला शरण आला. त्याच्याच पुण्याईनें मी आज तुझ्या चरणांजवळ आलों आहें."

श्रीशुकाचार्य म्हणाले:--परीक्षिता, बलि राजा असें बोलत आहे, इतक्यांत ईश्वराचा प्रिय भक्त प्रऱ्हाद तेथें प्राप्त झाला. आपला आजा आला असें बलीनें पाहिलें; पण तो वरुणपाशानें बद्ध असल्यामुळें नित्याप्रमाणें त्याला प्रऱ्हादाची पूजा करितां आली नाहीं. त्यानें त्याला वंदन मात्र केलें. स्वतांच्या अहंकारादि अपराधाचें त्याला स्मरण झाल्यामुळें त्याचे नेत्र आसवांनीं भरून आले; व लज्जेनें तो खालीं मुख करून उभा राहिला! राजा, भक्तसंरक्षक परमेश्वर आपल्या पार्षदगणांनीं वेष्टित असा तेथें आहे असें पाहून प्रऱ्हादानें त्याला वंदन केलें; व आपला नातू बलि याजवर भगवंतानें अनुग्रह केला, हें पाहून प्रऱ्हादाचे नेत्र अश्रूंनीं भरून आले, आणि त्या स्थितींतच तो बोलूं लागला.

### प्रऱ्हादाचें भाषण.

प्रऱ्हाद म्हणाला:--हे प्रभो, ह्या बलीला सर्व ऐश्वर्यांनीं युक्त असें इंद्रपद तूंच दिलें होतेंस, व तें आतां तूंच हरण केलेंस, हें फार चांगलें झालें. कारण, ऐश्वर्य हें आत्म्याला मोह घालणारें आहे. इंद्रियनिग्रही पुरुषांनाही दुस्तर मायानदींत बुडविणारें तें ऐश्वर्य जवळ असतां कोण बरें पुरुष आत्मप्राप्तीचें ज्ञान संपादन करील? नारायणा, तूं अत्यंत दयाळू आहेस. तुला माझा नमस्कार असो!

श्रीशुकाचार्य म्हणाले:--परीक्षित राजा, प्रऱ्हाद भगवंतापुढें हात जोडून उभा असतां जगत्पिता ब्रह्मदेव कांहीं बोलणार होता; इतक्यांत पतीला बांधिल्यामुळें भयभीत झालेली बलीची

पत्नीही तेथें आली; व तिनें हात जोडून नम्रपणें परमेश्वराची प्रार्थना केली.

### विंध्यावलीची ईश्वरास विनंती.

विंध्यावली म्हणाली:—ईश्वरा, हें विश्व तूं आपल्या स्वतांच्या क्रीडेसाठीं निर्माण केलें आहेस; तेव्हां अर्थात् ह्याचा स्वामी तूंच आहेस. जे लोक, आम्ही त्रैलोक्याचे अधिपति आहों असें म्हणतात, ते अज्ञान आहेत. माझे पतिही त्याच वर्गांतले होत. 'आम्ही स्वतंत्र व कर्ते' हीं त्यांचीं भाषणें देखील तूं समूळ नाहींतशीं केलींस. आतां ते तुला काय अर्पण करणार? तिसऱ्या पावला-करितां ते जें स्वतांचें शरीर देण्यास सिद्ध झाले आहेत, तें तरी त्यांचें आहे का? पण हें त्यांच्या अद्याप लक्षांत येत नाहीं. यावरून नाहीं का सिद्ध होत, कीं देहाभिमानानें त्यांना पूर्ण पछाडिलें आहे म्हणून? पण, देवा, तूं दयाळू आहेस. तर तूं त्यांजवर दया करून त्यांना सोडीव.

### ब्रह्मदेवाचें भाषण.

ब्रह्मदेव म्हणाला:—हे भूतोत्पादका देवाधिदेवा, तूं ह्या बलीचें सर्वस्व हरण केलें आहेस; आतां याचा व्यर्थ छल करूं नको. ज्या तुझ्या चरणाच्या ठिकाणीं अर्घ्यदूर्वांकुरादिकांचें अर्पण केलें असतां मुक्ति मिळते, त्या तुला या उदार बलीनें निष्कपट बुद्धीनें त्रैलोक्य आणि आपला देहही अर्पण केला आहे; तेव्हां आतां तूं ह्याला मुक्त कर.

### भगवंतांचें भाषण.

भगवान म्हणाले:—हे ब्रह्मदेवा, ज्याच्यावर मला अनुग्रह करावयाचा असतो, त्याचें सर्वस्व मी प्रथम हरण करून घेतों. कारण, त्याच्या योगानें मनुष्य मत्त असतो, आणि त्याला माझें स्मरण मुळींच होत नाहीं. या परतंत्र जीवात्म्याला कृमिकीटकादि अनेक योनींमध्यें फिरावें लागतें, तेव्हां कोठें तो देव, दैत्य, नर वगैरे जन्मास येतो; आणि त्यांत रूप, गुण, ऐश्वर्य, वय हीं गर्व वाहण्यास कारणीभूत होतात! त्यामुळें त्या प्राण्याचें कल्याण होत नाहीं. वय, रूप, विद्या, ऐश्वर्य, द्रव्य इत्यादिकांबद्दल जर गर्व नसेल, तर त्या प्राण्यावर माझा अनुग्रह आहेच असें समजावें. माझा भक्त ह्यांच्या योगानें मोह पावत नाहीं. ब्रह्मदेवा, हा दैत्य मोठा सत्यनिष्ठ आहे. याचें द्रव्य गेलें, राज्य गेलें, याला ज्ञातींनी सोडिलें, शत्रूंनीं याला खालीं पाडून बांधिलें व यातना भोगण्यास लाविलें, आणि गुरूनें शापिलें, तरी यानें सत्य सोडिलें नाहीं! यामुळेंच याची कीर्ति वाढत आहे. माझी माया कोणीही जिंकूं शकत नाहीं, पण यानें ती जिंकिली. मी कपटी भाषणानें याला धर्म सांगितला, पण हा सत्यापासून ढळला नाहीं. याकरितां, देवांनाही जें दुर्मिळ, त्या पदीं मीं याला पोहोंचविलें आहे. हा सावर्णि मन्वंतरांत इंद्र होईल, आणि मी याचें पालन करीन. तोंपर्यंत, ज्या ठिकाणीं राहणारांना मनोव्यथा, शारिरिक दुःखें, ग्लानि, आळस, पराभव इत्यादि ताप भोगावे लागत नाहींत, त्या, विश्वकर्म्यानें उत्पन्न केलेल्या सुतलामध्यें हा राहील.

### भगवंताचा बलीस वर व त्याची सुतलीं स्थापना.

याप्रमाणें भगवंतानें ब्रह्मदेवाला सांगितलें आणि लागलीच तो बलीला म्हणाला, "बा इंद्रसेना, तुझें कल्याण असो. आतां, स्वर्गांतील देव देखील ज्याची इच्छा करितात, त्या सुतलामध्यें आपल्या ज्ञातिबांधवांसह तूं जाऊन रहा. तेथें इंद्रादि लोकपाल सुद्धां तुला उपसर्ग देऊं शकणार नाहींत; आणि ही माझी आज्ञा मोडून जो तुला त्रास देईल, त्याचा माझें चक्र नाश करील. त्या ठिकाणीं सर्व प्रकारांनीं मी तुझा द्वारपाल होऊन तुझें रक्षण करीन. तुझ्या अंगीं दैत्य-दानवांच्या सहवासानें जे असुरी धर्म वसत आहेत, ते सर्व माझ्या प्रभावानें नष्ट होतील.

# अध्याय तेविसावा

—:०:—

## वामनावतारकथेचा उपसंहार.

### सुतलीं जातांना बलीनें केलेली ईशस्तुति.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, भगवंताचें तें दयायुक्त भाषण ऐकून बलीच्या अंत:करणांत आनंदाचा सागर उचंबळला; त्याचा कंठ दाटून आला; व डोळे प्रेमाश्रूंनीं ओतप्रोत भरले! नंतर तो हात जोडून उभा राहिला आणि सद्गदित वाणीनें भगवंताला म्हणाला, " देवा ! तूं जो अनुग्रह मजवर केलास, त्या अनुग्रहाला योग्य असें कांहीं तरी मजकडून घडलें आहे का ? कांहींच नाहीं. म्या नीचानें तुला वंदन सुद्धां केलें नाहीं, तर तें करण्याचा यत्न मात्र केला; आणि तो प्रयत्न केल्यानें जर अनंतकोटि कर्मांनीं किंवा उग्र तपश्चर्यांनीं व अपूर्व दानांनीं न मिळणारें फळ मजसारख्या नीच असुराला मिळालें, तर तुझ्या नमस्काराचा केवढा तरी प्रभाव असावा!" परीक्षित राजा, असें बोलून बलीनें श्रीहरीला, शंकराला आणि ब्रह्मदेवाला साष्टांग नमस्कार केला, व वरुणपाशांतून मुक्त झाल्यामुळें आनंदित झालेला तो बलि असुरांसह सुतलीं जाण्याची तयारी करूं लागला. असो.

याप्रमाणें भगवंतानें बलीपासून इंद्रपद घेऊन तें अदितीच्या पुत्राला दिलें आणि स्वत: उपेंद्र होऊन त्यानें जगाचें पालन केलें. यामुळें अदितीच्या मनाला संतोष झाला. इकडे, आपला नातू वरुणपाशांतून मुक्त होऊन त्याजवर ईश्वराचा मोठा प्रसाद झाला हें पाहून भगवद्भक्त प्रऱ्हादाला अतिशय आनंद झाला, व तो भगवंतापुढें येऊन त्याला म्हणाला, " नारायणा, ज्या तुझ्या चरणांस जगत्पूज्य असे ब्रह्मादिक देव आणि सनक-सनंदनादिक मुनि वंदन करितात, तो तूं आम्हा दैत्यांचा दुर्गरक्षक झालास, हा तुझा आम्हांवर केवढा तरी प्रसाद! असा हा तुझा प्रसाद ब्रह्मदेवाला, शंकराला किंवा लक्ष्मीलाही प्राप्त झाला नाहीं, त्या अर्थी खरोखर आम्ही दैत्य धन्य आहों. भगवंता, ब्रह्मादिक देव तुझ्या चरणांची सेवा करितात, म्हणून त्यांना सृष्टिसामर्थ्यादिक ऐश्वर्यें प्राप्त होतात तें ठीकच आहे; पण असुर म्हणजे अत्यंत दुराचारी—अत्यंत दुष्ट असे असतां, ते तुझ्या कृपेला कसे बरें पात्र झाले ? देवा, ह्या गोष्टीचें मला मोठें आश्चर्य वाटत आहे ! अथवा आश्चर्य वाटण्याचेंही कारण नाहीं. कां कीं, तुझा स्वभावच कल्पवृक्षासारखा आहे. तो ज्याप्रमाणें आपल्या आश्रयाला राहणारा पुरुष जशी इच्छा करील तसें त्याला फळ देतो, त्याप्रमाणें तूं तुझ्या आश्रयाला असणारा पुरुष ज्या फलाची इच्छा करील तें फळ त्याला देतोस. तुजपाशीं समविषम ही बुद्धि मुळींच नाहीं."

भगवान म्हणाले:—बा प्रऱ्हादा, तुझें कल्याण असो. आतां तूं आनंदानें आपल्या नातवाला बरोबर घेऊन सुतलीं जा आणि ज्ञातीसह सुखानें रहा. मी हातीं गदा घेऊन तुझ्या दारांत सदैव उभा आहें, असें तुला दिसेल, आणि माझ्या नित्यदर्शनानें तुझीं सर्व कर्मबंधनें तुटून जातील !

### बलीचें सुतलीं गमन व शुक्राचार्यांकडून यज्ञसमाप्ति.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, नंतर प्रऱ्हादानें हात जोडून भगवंताची आज्ञा ग्रहण केली, आणि बलीसह सर्व दैत्यांना बरोबर घेऊन त्यानें आदिपुरुषाला प्रदक्षिणा घालून वंदन केलें व तो सुतल नामक महाविवरांत शिरला. नंतर त्या बलीच्या यज्ञमंडपांत ऋत्विजांमध्यें शुक्राचार्य बसले होते, त्यांना भगवंतानें सांगितलें, " ब्रह्मन् , बलीनें आरंभिलेल्या यज्ञांत जर कांहीं वैगुण्य आलें असेल, तर

तें आपण पूर्ण करावें. आपली योग्यता फार मोठी आहे. कर्मामध्यें जें वैगुण्य पडलें असेल, तें केवळ ब्राह्मणाच्या कृपावलोकनानेंही भरून येतें!"

शुक्राचार्य म्हणाले, "भगवन्, कोणत्याही कर्मांत न्यून न पडूं देण्याचा उद्देश–भगवंताची प्राप्ति होण्यांत अंतर पडूं नये हा असतो; पण या वेळीं ती भीति मुळींच राहिली नाहीं. कारण, बलीनें आपलें सर्वस्व अर्पण करून, यज्ञभोक्ता परमेश्वर जो तूं, त्या तुलाच वश करून घेतलें आहे. तेव्हां आतां कर्मांत न्यून असलें तरी त्यापासून बिघडणार काय? आणि शिवाय दुसरें असें आहे कीं, कोणत्याही कर्मांत कितीही न्यून पडलें असलें, तरी तें तुझ्या नामस्मरणानें नाहींसें होतें. तथापि, हे सर्वव्यापका परमेश्वरा, तूं आज्ञा करीत आहेस, त्या अर्थीं मी ती शिरसा मान्य करितों. कारण, तुझ्या आज्ञेचें पालन करणें हेंच सर्व पुरुषार्थांचें साधन होय!" राजा परीक्षिता, याप्रमाणें भगवंताच्या आज्ञेनें शुक्राचार्यांनीं त्या यागांत उणें असलेलें कर्म पूर्ण केलें, आणि यज्ञ सिद्धीस नेला; असो.

### वामनाची उपेंद्रपदीं स्थापना.

पुढें, कश्यपाला व अदितीला संतोष व्हावा आणि सर्व प्राण्यांचा उत्कर्ष व्हावा याकरितां, प्रजापति ब्रह्मदेवानें देव, ऋषि, पितर, भूपाळ, दक्ष, भृगु, अंगिरा, कुमार व शंकर यांचें अनुमत घेऊन वामनाला लोकांचें आणि लोकपालांचें आधिपत्य दिलें. राजा, सर्वांचा अधिपति इंद्र होता; पण वेद, सर्व देव, धर्म, यश, श्री, मंगलें, व्रतें, स्वर्ग आणि मोक्ष यांचें पालन करण्यांत वामन अति दक्ष असल्यामुळें, उपेंद्र (साहाय्यकारी इंद्र हें) नांव देऊन ब्रह्मदेवानें त्याची त्या अधिकारावर स्थापना केली.

### वामनाचें इंद्रासह स्वर्गलोकीं गमन.

परीक्षिता, वामनाला उपेंद्रपदीं स्थापिल्यामुळें सर्व भूतांना आनंद झाला. नंतर इंद्रानें ब्रह्मदेवाची आज्ञा घेऊन वामनाला विमानांत बसवून आपल्याबरोबर स्वर्गलोकीं नेलें. याप्रमाणें इंद्राला त्याचें गतवैभव फिरून प्राप्त झालें, आणि प्रत्यक्ष भगवान त्याचें साहाय्य करण्यास प्राप्त झाला, यामुळें त्याला अतिशय आनंद झाला. इकडे ब्रह्मदेव, शंकर आदिकरून सर्वजण ईश्वराच्या कृतींचें कौतुक करीत आणि अदितीची प्रशंसा करीत आपापल्या स्थानीं निघून गेले.

श्रीशुक सांगतात:—हे पांडवकुलोद्धारका, सर्व पातकांचा नाश करणारें हें वामनाचें चरित्र मी तुला सांगितलें. भगवंताचीं चरित्रें अनेक आहेत; त्या सर्वांचें वर्णन कोण करूं शकेल? कारण, पृथ्वीवरील रज:कणांची गणना करणें जर अशक्य आहे, तर त्याहून असंख्यपटीनें गणना करण्यास अशक्य असणारीं भगवंताचीं चरित्रें कोण वर्णन करूं शकेल? असो. राजा, हें वामनाचें पुण्यप्रद चरित्र जो नित्य पठन किंवा श्रवण करील, त्याला सर्व सुखें प्राप्त होऊन अंतीं मोक्ष मिळेल. कोणतेंही कर्म आरंभिलें असतां त्यामध्यें जर या चरित्राचें कीर्तन होईल, तर तें कर्म यथासांग शेवटास जाईल. त्यांत कांहीं न्यून पडलें असलें, तरी त्यापासून कर्मांत कांहीं उणेपणा राहणार नाहीं.

## अध्याय चोविसावा.

-:०:-

### मत्स्यावतार.

परीक्षित राजा म्हणाला:—गुरुवर्य, आपण परमेश्वराचें जें जें चरित्र सांगतां, तें तें अद्‌भुत असतें! याकरून, भगवंतानें पहिल्यानें जो मत्स्यावतार घेतला, त्याचें वर्णन आपल्या मुखानें ऐकावें अशी मला इच्छा झाली आहे. कारण, मत्स्यरूप म्हणजे लोकांत अति निंद्य मानिलें आहे, आणि शिवाय तमोगुणापासून त्याची उत्पत्ति आहे. असें असतांही जेव्हां भगवंतानें

एखाद्या कर्मानें गांजलेल्या जीवाप्रमाणें तें शरीर धारण केलें, तेव्हां तें त्याचें चरित्र फारच अपूर्व असेल यांत शंका नाहीं. म्हणून तें चरित्र आपण कृपा करून मला निवेदन करावें.

श्रीशुकाचार्य म्हणाले:-परीक्षित राजा, तूं मोठा भगवद्भक्त आहेस, म्हणूनच तुझें लक्ष ईश्वराच्या गुणानुवादांकडे पूर्ण लागलें आहे. तुझें कल्याण असो. राजा, तुझ्या इच्छेप्रमाणें आतां भगवंताच्या

मत्स्यावताराचा इतिहास

तुला सांगतों, ऐक. बाबारे, वायु कोणत्याही स्थलीं फिरला तरी त्याला त्या स्थलाचे दोष जसे लागत नाहींत, आणि तो जसा नेहमीं निर्दोषच असतो. तसा ईश्वर कोणत्याही योनींत अवतरला तरी त्याला दोष लागत नाहीं;—तो निर्दोषच असतो, राजा, ईश्वर जो अवतार घेतो, तो केवळ गाई, ब्राह्मण, साधु, वेद, धर्म व अर्थ ह्यांचें रक्षण करावें ह्या इच्छेनें घेतो. याखेरीज त्याचें दुसरें कांहीं-एक कारण नसतें; असो. आतां

भगवंताला मत्स्यावतार घेण्याचें कारण

काय झालें, तें तुला सांगतों: मागील कल्पाच्या शेवटीं ब्रह्मदेव निद्रा घेऊं लागला, तेव्हां त्या निमित्तानें प्रलय झाला असतां, ही पृथ्वी व स्वर्गादि सर्व लोक समुद्रांत बुडाले. ब्रह्मदेवास गाढ निद्रा लागली असतां त्याच्या मुखांतून वेद गळून पडले. इतक्यांत, तेथें हयग्रीव नामक एक महाबलाढ्य दैत्य ब्रह्मदेवाजवळच होता, त्यानें ते वेद हरण केले. राजा, ईश्वराचें चरित्र अतर्क्य असतें. ब्रह्मदेव निद्रावस्थेंत असतां असें होणार आहे हें ईश्वराला पूर्वीच कळलें होतें, व तेव्हांच त्यानें त्या दैत्याच्या नाशाची तयारी करून ठेविली होती. भक्तांचें संरक्षण करणें हेंच ज्याचें ब्रीद, तो प्रभु अतिशय सूक्ष्म असें मत्स्याचें रूप घेऊन, प्रलयाच्या पूर्वींच कृतमाला नदीमध्यें भक्तांचें रक्षण आणि दुष्टांचा नाश करण्याची संधि पहात संचार करीत होता. इतक्यांत भक्तांचें रक्षण करण्याची वेळ प्राप्त झाली.

श्रीशुक पुढें सांगतात:—हल्लींच्या मन्वंतरांत ज्याला मनूचा अधिकार प्राप्त झाला आहे, तो विवस्वानाचा पुत्र श्राद्धदेव हा ब्रह्मदेवास निद्रा लागण्याच्या पूर्वीच्या कल्पांत सत्यव्रत या नांवाचा राजर्षि होता. तो महाभगवद्भक्त राजर्षि, जेथें भगवान मत्स्यरूप घेऊन संचार करीत होते, त्याच कृतमाला नदीच्या तीरावर फक्त उदकप्राशन करून तपश्चर्या करीत बसला होता. एके दिवशीं तो तर्पण करीत असतां त्याच्या ओंजळींतील पाण्यांत एक अगदीं लहान मासा आला. तेव्हां तो द्रविडदेशाधिपति सत्यव्रत राजा त्याला फिरून पाण्यांत सोडूं लागला; कारण, त्या बिचाऱ्याला काय माहीत कीं हा प्रत्यक्ष परमेश्वर आपल्या हातांत आहे! असो. सत्यव्रत राजा त्या मत्स्याला पाण्यांत सोडूं लागला, तेव्हां त्यानें करुणस्वरानें त्या राजाला म्हटलें, "हे दयाळा, जलचर आपल्या ज्ञातीला खातात; आणि मी तर लहान आहें, तेव्हां मला ते केव्हांच खाऊन टाकतील; म्हणून तूं माझें रक्षण कर!" अहाहा! सर्व जगाला रक्षण करण्याचें ज्याचें सामर्थ्य, त्यानें का यःकश्चित् जीवाची स्वतःचें रक्षण करण्याविषयीं प्रार्थना करावी? पण त्याचें कर्तृत्व कोणाला समजणार आहे! असो. राजा, त्या माशाचें तें दीनवाणें भाषण ऐकून सत्यव्रताला त्याची दया आली, आणि त्यानें त्याला आपल्या उदककलशांत घालून घरीं नेलें. घरीं नेल्यावर तो वाढला आणि त्याला तो कलश पुरेना; तेव्हां त्यानें फिरून त्याला विनंती केली कीं, मला हें स्थल संकुचित होतें, याकरितां मला तूं एखाद्या विस्तीर्ण स्थलीं ठेव. नंतर सत्यव्रतानें त्याला तेथून काढून मोठ्या भांड्यांत ठेविलें. पण तेथेंही थोडक्याच वेळांत तो आणखी वाढला आणि त्याला तेंही स्थल

पुरेनासें झालें. म्हणून त्यानें फिरून राजाची विनंती केली आणि म्हटलें, "राजा, मी तुला शरण आलों आहें, त्या अर्थी मला चांगलें विस्तीर्ण स्थल दे." अशी त्याची विनंती ऐकून सत्यव्रतानें त्याला एका सरोवरांत नेऊन सोडिलें. परीक्षिता, जो सर्व त्रैलोक्य भरून उरला, त्याला त्यांतील एखादें लहानसें पात्र किंवा सरोवर कसें पुरणार? तो मत्स्यरूपी भगवान तेथेंही वाढला, आणि फिरून तो राजाला म्हणूं लागला, "हें सरोवर मला पुरत नाहीं; याकरितां, जेथील पाणी कधींही नाहींसें होणार नाहीं, तेथें मला नेऊन सोड!" तेव्हां राजानें फिरून त्याला तेथून काढिलें, आणि पहिल्यापेक्षां ज्याचें जल जास्त होतें अशा डोहांत नेऊन सोडिलें; तेथेंही तो वाढलाच आणि 'हीही जागा पुरत नाहीं' म्हणून कुरकुरूं लागला. त्यावरून शेवटीं सत्यव्रत त्याला समुद्रांत नेऊन सोडूं लागला, तेव्हां तो मासा त्याला म्हणाला, 'राजा, येथें मला मगर वगैरे बलाढ्य जलचर खाऊन टाकतील; याकरितां तूं मला येथें सोडूं नको.' अशा प्रकारचें त्या माशाचें मोहक भाषण ऐकून राजा त्याला म्हणाला, "बा मत्स्या! तुझ्यासारखा सामर्थ्यवान जलचर आजपर्यंत मीं कधीं पाहिला नाहीं व ऐकिलाही नाहीं. तूं एका दिवसांत शंभर योजनें लांबरुंद वाढलास, तेव्हां तूं कोणी अपूर्व प्राणी आहेस. मला इतर जलचर खातील म्हणून भय वाटतें, अशा प्रकारचें करुणायुक्त भाषण बोलून वरचेवर तूं मला मोह पाडितोस, तेव्हां तूं आहेस तरी कोण, तें आम्हांला सांग. तुझ्या अश्रुतपूर्व सामर्थ्यावरून मला तर असें वाटतें कीं, तूं प्रत्यक्ष परमेश्वर असून प्राण्यांवर अनुग्रह करण्याकरितां मत्स्यरूपानें अवतरला असावास! हे महापुरुषा! तुला जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करण्याचें सामर्थ्य आहे. आम्हां शरणागत भक्तांची गति तूंच आहेस. माझा तुला नमस्कार असो! हे विश्वव्यापका, तुझे लीलावतार प्राण्यांच्या उत्कर्षास कारण असतात. तेव्हां, हें रूप तूं कशाकरितां घेतलें आहेस, हें कळावें अशी माझी इच्छा आहे. जे जन तुला ओळखीत नाहींत आणि देहावर अभिमान ठेवितात, त्यांना शरण जाऊन काय उपयोग? तुला शरण गेल्याचें फळ किती आहे हें तूं आतां दाखविलेलें अद्भुत रूप पाहून माझी खातरी होत आहे!"

श्रीशुकाचार्य म्हणाले:—परीक्षित राजा, जगत्पालक प्रभूच्या मनांत युगाच्या समाप्तिकालीं प्रलयसमुद्रांत क्रीडा करावी, अशी इच्छा असल्यामुळें त्यानें मत्स्यरूप धरिलें होतें, असो. भगवंतानें त्या आपल्या भक्ताचें भाषण ऐकून घेऊन त्याला सांगितलें, "हे शत्रुदमना सत्यव्रता, माझें भाषण लक्षपूर्वक ऐक. आजपासून सातवे दिवशीं भूलोकादि सर्व लोक प्रलयसमुद्रांत बुडतील त्या वेळीं त्या प्रलयोदकांत एक प्रचंड नौका तुजजवळ प्राप्त होईल. तूं सर्व ओषधि, बीजें आणि सप्तर्षि यांना बरोबर घेऊन त्यांत बैस. त्या वेळीं सूर्याचा प्रकाश जरी असणार नाहीं, तरी तुझ्याबरोबर असलेल्या ऋषींच्या तेजाच्या योगानें तुला सर्व प्रकाशमय दिसेल, आणि निर्भयपणें तूं चोहींकडे संचार करशील. प्रचंड वाऱ्यानें तुझी नौका हेलकावे खाऊं लागल्यास, वासुकीची दोरी करून तिनें तूं आपली नौका माझ्या शिंगाला बांध; म्हणजे ती तुझी नौका ब्रह्मदेवाची रात्र संपेपर्यंत मी घेऊन फिरेन; आणि नंतर तूं मला

---

१ 'हा वास्तविक प्रलय नव्हे. भगवंताच्या मनांतून सत्यव्रताला ब्रह्मज्ञानाचा उपदेश करावयाचा होता, म्हणून त्यास प्रथम वैराग्य उत्पन्न होण्यासाठीं, व आपलें सामर्थ्य कळून येण्यासाठीं भगवंतानें नुसता हा भाव दाखविला होता. चालू वैवस्वत मन्वंतरांत मार्कंडेयांस प्रलयभास दाखविल्याचें असेंच दुसरेंही एक उदाहरण आहे,' असें टीकाकार श्रीधर म्हणतात.

श्न कर, म्हणजे माझ्या परब्रह्मरूपाचें ज्ञान करून णारा उपदेश मी तुला करीन, व त्या उपदेशाच्या योगानें तें तुला प्रत्यक्ष दिसून येईल ! ”

परीक्षित राजा, याप्रमाणें सत्यव्रताला सांगून स्वरूप भगवान जलामध्यें गुप्त झाले. इकडे, तो त्यव्रतही पूर्वाभिमुख दर्भांवर उत्तर दिशेस मुख रून प्रभूनें सांगितलेल्या दिवसाची वाट पहात च्या चरणांचें ध्यान करीत राहिला. पुढें गवंतानें सांगितलेला दिवस येतांच मेघ भयंर वृष्टि करूं लागले, आणि समुद्र आपली र्यादा सोडून पृथ्वीला बुडवूं लागले. इतक्यांत नें सांगितल्याप्रमाणें एक अतिविस्तीर्ण नौका सत्यव्रताजवळ आली. तेव्हां भगवंताच्या आज्ञेप्रमाणें राजानें सर्व ओषधि बीजें आणि सप्तर्षि यांना बरोबर घेतलें व तो त्या नौकेंत बसला. मुनींनीं संतुष्ट होऊन राजाला केशवाचें ध्यान करण्यास सांगितलें. तें करीत असतां, ज्याचें शरीर सुवर्णासारखें असून जो दहा लक्ष योजनें लांब आहे व ज्याला एक शिंग आहे, असा एक महान मत्स्य त्याच्या जवळ प्राप्त झाला. राजानेंही तत्काल वासुकीची दोरी करून त्या दोरीच्या एका टोंकानें नाव आणि दुसऱ्या टोंकानें त्या मत्स्याचें शिंग बांधिलें, आणि निर्भय होऊन त्यानें भगवताची स्तुति केली.

## सत्यव्रतानें मत्स्यरूप भगवंताची केलेली स्तुति.

सत्यव्रत म्हणाला:—

अनाद्यविद्योपहतात्मसंविदस्तन्मूलसंसारपरिश्रमातुराः ।
यदृच्छयेहोपसृता यमाप्नुयुर्विमुक्तिदो नः परमो गुरुर्भवान् ॥
जनोऽबुधोऽयं निजकर्मबंधनः सुखेच्छया कर्म समीहतेऽसुखम् ।
यत्सेवया तां विधुनोत्यसन्मतिं ग्रंथिं स भिंद्याद्धृदयं स नो गुरुः ॥
यत्सेवयाऽग्नेरिव रुद्ररोदनं पुमान्विजह्यान्मलमात्मनस्तमः ।
भजेत वर्णं निजमेष सोऽव्ययो भूयात्स ईशः परमो गुरोर्गुरुः ॥
न यत्प्रसादायुतभागलेशमन्ये च देवा गुरवो जनाः स्वयम् ।
कर्तुं समेताः प्रभवंति पुंसस्तमीश्वरं त्वां शरणं प्रपद्ये ॥
अचक्षुरंधस्य यथाऽग्रणीः कृतस्तथा जनस्याविदुषोऽबुधो गुरुः ।
त्वमर्कदृक्सर्वदृशां समीक्षणो वृतो गुरुर्नः स्वगतिं बुभुत्सताम् ॥
जनो जनस्यादिशतेऽसतीं मतिं यथा प्रपद्येत दुरत्ययं तमः ।
त्वं त्वव्ययं ज्ञानममोघमञ्जसा प्रपद्यते येन जनो निजं पदम् ॥
त्वं सर्वलोकस्य सुहृत्प्रियेश्वरो ह्यात्मा गुरुर्ज्ञानमभीष्टसिद्धिः ।
तथापि लोको न भवंतमंधधीर्जानाति संतं हृदि बद्धकामः ॥
तं त्वामहं देववरं वरेण्यं प्रपद्य ईशं प्रतिबोधनाय ।
छिंध्यर्थदीपैर्भगवन्वचोभिर्ग्रंथीन् हृदय्यान्विवृणु स्वमोकः ॥

'हे भगवन्, अनंत कालच्या अज्ञानानें ज्यांचें आत्मज्ञान नष्ट झालें आहे, आणि त्यामुळें जे अज्ञानमूलक संसारांत पडून त्यांतील दुःखें भोगीत आहेत, ते जन, या संसारांत असतांही ज्याच्या अनुग्रहानें तुझी प्राप्ति करून घेतात, तो मोक्षदाता परमेश्वर तूंच आहेस. हे कर्मनाशका, कर्मबंधनांनीं बद्ध झालेले अज्ञानी जन सुखाच्या इच्छेनें आणखी कर्मेंच करीत असतात; तेव्हां ती सुखेच्छारूप कर्मबुद्धि ज्याच्या सेवेनें नष्ट होते, तो परमेश्वर आमचा गुरु होऊन आमच्या हृदयांतील अज्ञानरूप ग्रंथि तोडून टाको. हे निर्मला, रुपें जसें अग्नीच्या सेवेनेंच आपला मळ टाकून देतें आणि शुद्धस्वरूप बनतें, तसे मुमुक्षु पुरुष ज्याची सेवा करून आपल्या शुद्धस्वरूपाप्रत पावतात, तो परात्पर अव्यय परमात्मा आमचा गुरु होवो. हे समर्था, देव, गुरु व इतर सर्व जन या सर्वांनीं मिळून प्रसाद केला असतांही तो तुझ्या प्रसादाच्या एका अणुरेणूएवढा देखील होत नाहीं; तेव्हां अशांना शरण जाणें म्हणजे अंधळ्यांनीं अंधळ्याला पुढारी करण्यापैकींच आहे. याकरितां, आत्मतत्त्व जाणण्याची इच्छा करणारा मी तुलाच गुरु करितों. हे देवाधिदेवा, तुजवांचून इतर गुरु कसे आहेत पहा: ते दुसऱ्यांला अर्थकामादिविषयक बुद्धीचा उपदेश करितात, आणि त्याच्या योगानें ते जन दुस्तर अशा संसारांत पडतात; पण तूं तसा नाहींस;—या कष्टमय संसाराचा ज्याच्या योगानें नाश होईल, आणि प्राणी अनंत सुख पावेल, अशा आत्मप्राप्तीचाच तूं उपदेश करितोस. देवा, तूं सर्व लोकांचें हित करणारा, सर्वशक्तिमान, भूतवत्सल, सन्मार्गोपदेशक, ज्ञानस्वरूप व केवल आत्मा आहेस; आणि असें असतांही मूर्ख जन तुला शरण यण्याचें सोडून, संसारांत सुख हातीं लागेल या इच्छेनें त्यांतच गटंगळ्या खात राहतात, आणि तूं त्यांच्या हृदयांत असतांही ते तुझ्याकडे पाहण्याची इच्छा सुद्धां करीत नाहींत ! भगवंता, मी मात्र तुला शरण आलों आहें. याकरितां मला तूं परमार्थतत्त्वाचा उपदेश कर, आणि आपल्या कृपेनें माझ्या अंतःकरणांतील अहंकारग्रंथि तोडून टाक. स्वतांचें चिन्मय स्वरूप मला दाखीव.

श्रीशुकाचार्य म्हणाले:—राजा, याप्रमाणें सत्यव्रतानें स्तुति केली असतां मत्स्यरूपानें क्रीडा करणाऱ्या त्या भगवंतानें, ज्यामध्यें ज्ञान, योग आणि क्रिया यांचें वर्णन केलेलें आहे, अशा आत्मरहस्यरूप मत्स्यपुराणसंहितेचा त्याला उपदेश केला. राजा परीक्षिता, याप्रमाणें भगवंतानें ऋषींसह नौकेंत बसलेल्या सत्यव्रताला उपदेश केला; आणि तेथून गुप्त होऊन हयग्रीवानें हरण केलेले वेद त्याला मारून त्याजवळून घेतले; व त्या प्रलयाच्या शेवटीं ब्रह्मदेव जागा झाला, तेव्हां ते वेद त्याला दिले. परीक्षित राजा, ज्याला शास्त्रोक्त आणि अनुभवजन्य ज्ञान प्राप्त झालें होतें, तो सत्यव्रत ह्या कल्पामध्यें विष्णूच्या प्रसादानें श्राद्धदेव नामक वैवस्वत मनु झाला आहे.

राजा, तुझ्या इच्छेवरून हें मत्स्यावताराचें आख्यान तुला सांगितलें. हें आख्यान मोठें पुण्यप्रद आहे. ह्याचें पठन करणाराचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. प्रलयकालीं ब्रह्मदेव निद्रा घेऊं लागला असतां हयग्रीव दैत्यानें त्याच्या मुखांतून वेदांचें हरण करून ते समुद्रांत नेले, त्या वेळीं ज्यानें त्या दैत्यास मारून ब्रह्मदेवाला वेद परत आणून दिले व सत्यव्रत राजा आणि ऋषि यांना प्रलयसमुद्रांत ब्रह्मोपदेश केला, त्या सर्व कारण मत्स्यरूप भगवंताला माझा नमस्कार असो !



मत्स्य अवतार.